# मराठी वाङ्मयाचा इतिहास.

## खंड १ ला

## ( पृ. सं. ८३२ किंमत रु. ४ )

[ दुसऱ्या खंडाकडे वळण्यापूर्वी पहिल्या खंडाची वाचकांस एकवार आठवण करून देणें अवश्य आहे. ती मी करून देण्यापेक्षां महाराष्ट्रांतील चार प्रमुख वर्तमानपत्रकर्त्यांनीं त्यावर जे अभिप्राय दिले आहेत त्यांकडेच वाचकांचें लक्ष वळवणें बरें !

**ज्ञानप्रकाश**:—" हें आठशेंवर पृष्ठांचे पुस्तक मुमुक्षुपत्राचे विद्वान् संपादक रा. ल. रा. पांगारकर यांनीं केलें आहे. मराठी वाङ्मयाचा इतिहास या पुस्तकमालेच्या नांवावरूनच त्याची व्यापकता दिसून येणारी आहे. पुस्तकाला व्यापक नांव देणें हें कांहीं मोठेंसें कठिण नाहीं, पण या नावानुरूप करणी करून दाखविणें हेंच काम खरोखर बिकट आहे त्यास नुसता उत्साह असून चालत नाहीं. त्या उत्साहाचें योग्य चीज होण्यास दीर्घ व्यासंग व प्रशंसनीय विद्वत्ता यांची अवश्य जोड लागते. हे सर्व गुण रा. पांगारकर यांच्या अंगीं पूर्णतेनें वसत आहेत याबद्दल समंजस माणसात प्रायः मतैक्यच होईल, असा आम्हांस भरंवसा वाटतो. रा. पांगारकर यांचा मराठी भाषेचा व्यासंग अनेक वर्षांचा आहे, किंबहुना त्यांनीं तें आपले जीवितकार्यच केले आहे असें म्हटलें असताही चालेल. आजपर्यंत त्यांनीं मराठी वाङ्मयास व पर्यायानें त्याच्या इतिहासास साहाय्यक किंवा उपकारक होणारीं अशीं अनेक वाचनीय पुस्तकें लिहिलीं आहेत. पण त्यांचा प्रस्तुतचा प्रयत्न हा त्या सर्वांच्या शिरोभागीं बसविण्यासारखा आहे. त्यांची इतिहासदृष्टि फार व्यापक व पल्लेदार असल्याचें दिसून येईल. आपण केलेल्या दीर्घव्यासंगाचा जनतेस खरोखर योग्य उपयोग व्हावा अशी श्रेयस्कर दृष्टि बाळगूनच त्यानीं हें पुस्तक अत्यंत परिश्रमशीलतेनें व वाचकांस बहुश्रुत करण्याच्या सदिच्छेनें लिहिले असल्याचा प्रत्यय येतो. रा. पांगारकर यांनीं उत्तरार्धाच्या प्रकरण ८ व ९ मध्यें महाराष्ट्रदेश व मराठी भाषा यासंबधानें सविस्तर विवे-

चन केलें आहे. संतकवींनीं आपल्या ग्रंथांतून ज्या मार्गाचें विवरण केलें आहे त्या भक्तिमार्गाची पूर्वपीठिकाही दिल्याशिवाय या इतिहासाची पार्श्वभूमि समजणार नाहीं.याकरितांच या पंथाची परंपरा प्राचीन कशी आहे हें वेदविद्या, उपनिषदांतील ब्रह्मविद्या, भगवद्गीता, श्रीमद्भागवत, भक्तिमार्गाचें अनादित्व वगैरे पूर्वार्धातील पहिल्या पाच प्रकरणांत दाखविलें आहे. ' वेदांतील मुख्यतः ऋग्वेदांतील वैदिक दैवतांच्या प्रार्थना व अध्यात्मविद्या यांतूनच भक्तिमार्ग व ज्ञानमार्ग निघाले असून पुढे उपनिषदांनीं ज्ञानमार्ग उर्फ ब्रह्मविद्या अधिक स्पष्टपणें सांगितली व तिलाच भक्तीची जोड देऊन गीताभागवतांनीं ज्ञानभक्तिप्रधान असा धर्मविचारांचा राजमार्ग जगास दाखवून दिला ' हेंच या प्रकरणांतून दाखविलें आहे. भक्तिमार्गाचा किंवा वैदिकधर्माचा प्रवाह कसा वहात आला आहे हें दाखवितांना त्या प्रवाहांत खंड पाडणारे जे प्रसंग उद्भवले त्यांचाही या इतिहासांत समावेश होणें जरूरच आहे. त्याप्रमाणें त्याचें विवेचन सहाव्या प्रकरणांत केलें आहे. यांत वेदविरोधी बौद्ध व जैनपंथ भरतखंडांत निघाले अशोकामुळें बौद्धपंथ फैलावला; पुष्पमित्र विक्रमादित्य, चंद्रगुप्त, हर्षवर्धन, ललितादित्य, भोज इ. सम्राटांच्या राजवटींत हे दोन्ही पंथ मागें पडून वैदिकधर्मानें आपलें साम्राज्य पुन्हां स्थापिलें; परधर्मीय व परदेशीय लोकांच्या टोळधाडी भरतखंडावर कोसळल्या असतांही हिंदुराजांनीं त्यांचा प्रतिकार केला; तथापि अखेर यवनांचे पाय येथें रोवून भरतखंडाचा नकाशा बदलला हा सुमारें दीड हजार वर्षांचा इतिहास ६ व्या प्रकरणांत दिला आहे. यानंतरचा काल म्हणजे संतकवींनीं केलेल्या धर्माच्या पुनरुज्जीवनाचा होय. या बाबतींतील अग्रेसरत्व तामीळ राजे, तामीळ संत व तामीळ आचार्य यांच्याकडे जातें. बौद्ध व जैन या पंथांशीं झगडून वैदिकधर्माची ध्वजा फडकवीत ठेवण्यास त्यांचें चांगलें सहाय्य झालें, याचा सुंदर वृत्तांत सातव्या प्रकरणांत दिला आहे. तामीळ भाषा प्राचीनतर असल्यामुळें ज्ञानेश्वर—नामदेवांच्यापूर्वी पांचसातशें वर्षें त्यांच्याच तोलाचे संतकवि तामीळ वाङ्मयात झाले. त्यांचाही मराठी वाचकांशीं परिचय ७ व्या प्रकरणांत करून दिला आहे. त्याचप्रमाणें कुमारिलभट्ट, शंकराचार्य, रामानुजाचार्य व मध्वाचार्य या पुरुषांचें धर्मकार्यही यांतच वर्णिलेलें आहे. प्र. १० व प्र. ११ यांमध्यें मुकुंदराज व महानुभाव ग्रंथ यांच्या मराठी ग्रंथसंपत्तीचें वर्णन देण्यांत आलें आहे, व महानुभावपंथ

व वारकरीपंथ यांच्यांत मिळते कोठे आहे हेंही यांत दाखविलें आहे. नाथपंथाशीं ज्ञानेश्वराचा निकट संबंध असल्यामुळें तेराव्या प्रकरणांत ' श्रीज्ञानेश्वरदर्शन ' घडविण्यापूर्वी बाराव्यांत नाथसंप्रदायाचा वृत्तांत दिला आहे. चौदाव्या प्रकरणांत नामदेवाची हकीकत देण्यात आली आहे. संतमेळा व त्याचें अभंग वाङ्मय यांचे वैशिष्ट्य प्र. १५ मध्यें दिलें आहे व सोळाव्यांत ज्ञानेश्वरीचें अंतरंग आविष्कृत केलें आहे. ज्ञानेश्वरीची सर्वतोमुखीं स्तुति होत असते, पण ज्ञानेश्वरी म्हणजे काय चीज आहे हें या प्रकरणावरून उत्कृष्ट रीतीनें दिसून येणार आहे. ज्ञानेश्वरींतील प्रतिपादित विषय किती हृद्य व मनोरम रीतीनें या ग्रथांत वर्णन केले आहेत याचा प्रत्यय पुढील म्हणजे सतराव्या प्रकरणावरून कोणासही येण्यासारखा आहे. ज्ञानेश्वरीची दृष्टि आध्यात्मिक असली तरी त्या दृष्टींत आधिभौतिक सृष्टीही कशी सामावली आहे हें १७ व्या प्रकरणांत विस्तारानें दाखविलें आहे. यावरून पुस्तककर्त्याचा ज्ञानेश्वरीचा व्यासंग जसा उत्कृष्ट दृष्टोत्पत्तीस येतो त्याचप्रमाणें रम्य स्थळें निवडून काढण्यासंबंधांतील त्यांची रसिकताही निदर्शनास येते. राजकीय परिस्थिति, व्यापार व उद्योगधंदे, मोतीचौक, बाजारपेठा, शेतीबागाईत, नानाप्रकारचे लोक, लौकिक समजुती, शास्त्रीय कल्पना वगैरे सर्व विषयांचा ज्ञानेश्वरांनीं दृष्टांतरूपानें यथोचित परामर्ष घेतला आहे, त्यावरून ज्ञानेश्वरमहाराजांची सर्वव्यापी किंवा सर्वकष निरीक्षणशक्ति दृग्गोचर होते. ज्ञानेश्वरमहाराज स्वत: संन्यस्त होते तरी पति–पत्नीचें परस्पर एकरूपतेचें नातें, लग्न–पाहुणे, भोजनाचे पदार्थ, पातिव्रता स्त्री, अपत्यप्रेम, तरुणाचे खेळ व विनोद वगैरे सांसारिकांच्या जिव्हाळ्याचे विषय खुद्द त्यांलाही वर्णितां येणार नाहींत अशा समर्पकतेनें ज्ञानेश्वरांनीं वर्णन केले आहेत. चंदन, कमल, निंब, पशुपक्षी व कृमिकीटक, चकोर व चातक, भ्रमर, कासवी, बक व इतर प्राणी यांचें वैशिष्ट्य वर्णन करण्यासंबंधात त्यांनीं केवळ कविसंकेतासच चिकटून न रहातां श्रेष्ठ प्रकारची निसर्गनिरीक्षणशक्ती दाखविली आहे. याप्रमाणें हा ग्रंथ ऐतिहासिकदृष्टीनें सर्वस्वीं वाचनीय असाच झाला आहे. एवढ्या काळाचा सुसंगत इतिहास लिहिण्याचा रा. पांगारकर यांनीं संकल्प करून त्यांतला पाहिला खंड, पुढील खंडहि उत्कृष्ट निघतील अशी ग्वाही देणाऱ्या स्वरूपांत, काढला याबद्दल त्यांचें कोणीही प्रशंसापूर्वक अभिनंदनच करील. अशा व्यापक पण सर्वोपयोगी विषयास रा. पांगारकर यांच्यासारखा परिश्रमशील, पर्युत्सुक व

पारंगत असा ग्रंथकार लाभला हें मराठी वाङ्मयाचें सुदैवच समजलें पाहिजे. पुढील खंडही यथाक्रम लवकर छापून प्रकाशित होवोत अशीच प्रस्तुत खंडाची शोभन मांडणी पाहून कोणीही सदिच्छा प्रदर्शित करील."

**२ महाराष्ट्र ( नागपूर )** :— "विद्वत्तेच्या, भाषाप्रभुत्वाच्या, आणि ग्रंथकर्तृत्वाच्या दृष्टीनें ज्यांना मराठी वाङ्मयाचे आचार्य म्हणतां येईल अशा श्रेष्ठ ग्रंथकारात रा. पांगारकर याची गणना होते. प्राचीन मराठी काव्यांचें त्यांच्याइतकें व्यापक व नैष्ठिक अध्ययन केलेला पंडित आज महाराष्ट्रांत प्राय: एकही सांपडणार नाहीं. प्राचीन कवींचा व्यासंग—त्यांच्या ग्रंथांच्या व विचाराच्या भूमिकेशीं समरस होऊन—केलेला बहुश्रुत ग्रंथकार आज महाराष्ट्रांत पांगारकराशिवाय एकही नाहीं. त्यांनीं गेल्या ३२ वर्षांत जे छोटे मोठे ३२ ग्रंथ निर्माण केले आहेत त्यापैकीं निम्याहून अधिक निरनिराळ्या संतकवींच्या जीवितकार्यावर असून ते त्यांच्या व्यासंगाची व्याप्ति तशीच गाढताही दर्शवितात... रा. पांगारकरांचा प्रस्तुत ग्रंथ सर्वस्पर्शी व सर्वसमावेशक असून प्राचीन मराठी वाङ्मयाची भूमिका विशद करण्यासाठी त्यांनीं अतिशय परिश्रम घेतले आहेत. ज्या भागवतधर्माचा पुरस्कार संतकवींनीं इतक्या तळमळीनें केला आहे, आणि जो प्राचीन मराठी कवितेचा अनन्य विशेष समजला जातो त्याची मीमांसा—महाराष्ट्राच्या चतु:सीमेपलीकडे जाऊन—अशी दुसऱ्याच कोणत्याही मराठी ग्रंथकारानें केलेली नाहीं... शंकर, रामानुज व माध्व या तीन आचार्यांच्या द्वैताद्वैतादि मताचे ओघ तामिल तेलंगणांत प्रादुर्भूत होऊन ते पुढें सर्व भरतखंडभर फैलावले. श्री. पांगारकर यांनी प्रस्तुत ग्रंथाच्या पूर्वार्धात वैदिक आणि तामिळ वाङ्मयाचा विस्तारानें केलेला प्रपंच समर्थनीयच वाटतो... महाराष्ट्र देश आणि मराठी वाङ्मय याच्या विकासाची व महानुभावांच्या वाङ्मयाची माहिती त्यांनी विस्तारानें दिली आहे. या प्रकरणांतून माहितीचे नवे नवे कण तसे विचारांचे नवे किरण बरेच आढळतात. 'नाथपरंपरा' हें प्रकरण ज्ञानेश्वरीची भूमिका समजावयाला उपयुक्त आहे. ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी याच्याविषयीं २५० पानांत जें विवेचन केलें आहे, त्यात त्यांच्या अध्ययनाचा परिपाक सांठविलेला असून तें सर्वच दृष्टीनीं उत्कृष्ट वाटतें. एकच दोष—भक्तमहिमा आणि भक्तिसुख यांचें वर्णन करण्याच्या भरांत एकदा पांगारकर आले म्हणजे त्याच्या वाणीला पाझर फुटतात व अशा वेळीं पाल्हाळ

किंवा पुनरुक्ति हटकून होते !... ह्या ग्रंथांत मराठी भाषा आणि प्राचीन मराठी काव्य यांची भूमिका परिश्रमपूर्वक आणि मार्मिकतेनें विशद केली असून मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव यांच्या काव्याचें विवेचन अत्यंत सरस केलें आहे. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना हा ग्रथ म्हणजे एक वरदानच वाटेल."

**३ केसरीः**—"रा. लक्ष्मणरावजी पांगारकर यांनीं २८ वर्षांपूर्वी कविवर्य मोरोपंत यांचें चरित्र लिहून त्यावर सत्कीर्ति संपादिली. संताची चरित्रें त्यांनी गायिलीं आहेत व त्यांच्या ग्रंथांचें भक्तिपूर्वक विवेचन केलें आहे. मराठी वाङ्मयाचा इतिहास या विषयावरील त्यांचें गाढ प्रेम व दीर्घव्यासंग लक्षांत आणता प्रस्तुतग्रंथास पांगारकरांच्या सर्व लिखाणांत अग्रस्थान द्यावयास पाहिजे. असा इतिहास लिहिण्याचा संकल्प त्यांनी ३५ वर्षांपूर्वी बी. ए. होण्याच्या अगोदरच केला होता. या दीर्घकाळात त्यांच्या बुद्धीस, विचारशक्तीस, विवेचकपणास व व्यासंगास परिपक्वता प्राप्त झाली असल्यामुळे त्यांचा श्रेष्ठपणा आपोआपच सिद्ध होत आहे. ... पहिला भाग आर्यांचे धर्मग्रंथ, विविधपंथ व प्रसिद्ध राजांचा इतिहास-अखेरीस शंकराचार्य, रामानुजाचार्य व मध्वाचार्य यांच्या मतांची माहिती देऊन इतिहासाचा ओघ कालानुक्रमानें महाराष्ट्र देश, मराठे लोक व त्यांच्या वाङ्मयाचा उगम यांजपाशीं आणून सोडला आहे. मराठी वाङ्मयाच्या पितृस्थानीं वेद, उपनिषदें, गीता व भागवत हे ग्रंथ असून त्यांतील तत्वांचा व ज्ञानाचा प्रसार मराठी संतमंडळींनी बहुजनसमाजात केला. या दृष्टीनें प्रस्तुत खंडाच्या पूर्वार्धाची जरूर आहे. भागवतपंथाबरोबर महानुभावपंथ महाराष्ट्रांत स्थापन झाला, व त्या पंथाने मराठीत बहुत ग्रंथ निर्माण केले असा उल्लेख भावे याच्या ' महाराष्ट्र सारस्वत ' या पुस्तकांत आहे तथापि त्या संबंधीचें विस्तृत व सुसंगत विवेचन पांगारकरांच्या प्रकृत इतिहासांतच प्रथम वाचावयास सापडतें. पंढरपूर संप्रदायाला महानुभावपंथ जितका जवळ आहे तितका दुसरा कोणताही पंथ जवळ नाही असे पांगारकरांनीं केलेले विधान यथार्थ आहे ... ज्ञानेश्वरनामदेवांच्या प्रमुखत्वाखालीं किती तरी संतकवींची व कवयित्रींची नावें झांकली जातात. महाराष्ट्रकाव्यकल्पद्रुमाच्या फुलांचा बहुतेक बहर याच काळांत होऊन गेला ( प्र. १४ व १५ पहा. ) बहुजनसमाजांत पुस्तकी शिक्षण फैलावलें नसतां स्त्रीपुरुष व मुलेंबाळे भक्तिमार्गात इतकीं दंग झालीं यावरून सांप्रत आमच्या देशात उद्भवलेल्या राजकीय स्फूर्तीपेक्षांही तत्कालीन धार्मिकस्फूर्ति अधिक जिवंत, अधिक प्रबळ व अधिक उत्साहवर्धक

होती असें कबूल करणें भाग पडते, ... ईश्वरावर दृढ विश्वास ठेवणाऱ्या संतांची छाप महाराष्ट्रीयांवर किती बसली याची उत्कृष्ट कल्पना पांगारकरांचा प्रकृत ग्रंथ वाचून येते. या काळचें वाङ्मय इतकें प्रेमळ, रसाळ व उदात्त आहे कीं ते वांचून कोणासही निरतिशय आनंद होतो. या रत्नशाळेतील कोहिनूर ज्ञानेश्वरी–त्याचें अंतरंग पांगारकरांनी आपल्याकडून शक्य तितके उकलून मांडले आहे. ज्ञानेश्वरीची योग्यता व शिकवण कळण्याच्या दृष्टीनें हे प्रकरण अत्यंत महत्वाचें समजलें पाहिजे. ... एकंदर ग्रंथाची रचना फार परिश्रमपूर्वक झाली असून मराठी भाषेत या विषयावर हा ग्रंथ पहिलाच ठरत असल्यानें महाराष्ट्र वाङ्मयाच्या या सेवेबद्दल लक्ष्मणरावजींचें जितकें अभिनदन करावें तितके थोडेच आहे.'

**४ नवाकाळः**—" रा. पांगारकर यांनीं संतवाङ्मयाच्या व संतचरित्रांच्या अभ्यासास स्वतःला गेलीं ३०-३५ वर्षे वाहून घेतलें आहे व त्या कार्यात त्यांनी मोठा अधिकार संपादन केला आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, मोरोपंत, मुक्तेश्वर यांचीं चरित्रें त्यानीं लिहिलीं असून तीं सर्वमान्य झाली आहेत. संपूर्ण मराठी वाङ्मयाचा इतिहास त्यांच्या हातून व्हावा अशी लोकांची अपेक्षा त्यानीं हा पहिला खंड प्रसिद्ध करून अंशतः पार पाडली आहे...मराठी वाङ्मयाच्या विकासाचे कारण जो भागवतधर्म त्याची इत्थंभूत माहिती वेदकालापासून तो अर्वाचीन परंतु ऐतिहासिक आचार्यादिकाच्या कालापर्यंत पूर्वार्धात दाखल केली आहे. उत्तरार्धाच्या सुमारें ५०० पानांत महाराष्ट्रभाषेच्या इतिहासाला प्रारंभ होऊन ज्ञानेश्वरनामदेवांच्या अखेरीपर्यंत तो आणून सोडला आहे. रा. पांगारकर यांचा ज्ञानेश्वरविषयक अभ्यास दीर्घकाळाचा असून त्याचा परिपाक येथें अनेक प्रकारें उतरला आहे. ' ज्ञानेश्वरीचें अंतरंग ' व ' ज्ञानेश्वरी सृष्टि ' ही दोन प्रकरणें सरस उतरलीं असून पांगारकरांच्या व्यासंगाची कल्पना येण्यासाठीं तीं अवश्य पहावींत. त्यांनीं ज्ञानेश्वराच्या ग्रथांतून वेदांतविषयाच्या मनोहर निरूपणांत झांकलेली ज्ञानेश्वरकाळांतील समाजसृष्टि निराळी दाखविली आहे. ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकाना हें प्रकरण अभिनव वाटेल. भागवतधर्माच्या बैठकीचा विसर पडून व परंपरेला दृष्टिआड ठेवून इतराचे इतिहास लिहिले गेले असल्यानें त्यांत जीं न्यूनें राहिलीं ती भरून काढण्याचा सुसंगत यत्न श्री. पांगारकरांनीं केला आहे. भाषाशैलीबद्दल लिहिण्याची गरज नाहीं, मधुर व प्रेमळ भाषाशैलीबद्दल त्यांची ख्यातिच आहे."

———

# मराठी वाङ्मयाचा इतिहास-खंड दुसरा.

## एकनाथ-तुकारामांचा काल.

## विषयानुक्रमणिका.

**१. तेराव्या चौदाव्या शतकांतील ग्रंथकार:- ( पृ. १ ते ४६ )**
चांगावटेश्वरांचा " तत्त्वसार " ग्रंथ १ सत्यामलनाथ व त्यांची परंपरा ६ " उषाहरण " कर्ता चोंभा १५ अज्ञान कवीचा वरदनागेश ग्रंथ २६ बाहिरा जातवेद उर्फ बहिरापिसा २९ पाठक मंडळी ३६ पचोपाख्यान ऊर्फ पंचतंत्र ( गद्य ग्रंथ ) ३७ शके १२२१ चा मराठी ताम्रपट ४४.

**२. मुसलमानी राजसत्ता व तिचे परिणाम:- ( पृ. ४७ ते ८८ )**
प्रास्ताविक ४७ महंमद पैगंबर व त्याचा धर्म ४८ महंमदीयाचा जगज्जय ५० हिंदुस्थानावर मुसलमानाच्या टोळधाडी ५४ प्रतीकार ५७ खिलजींच्या स्वाऱ्या व जाधवराज्याचा शेवट ५९ विजयानगरचें साम्राज्य ६० बहामनीशाही ६३ विजापूरची आदिलशाही ६८ निजामशाही ७२ गोवळकोंड्याची कुतुबशाही ७४ मुसलमानी राजसत्तेचे परिणाम ७६

**३. बेदरची पाच्छाई व चार संतकवी:- ( पृ. ८९ ते ११२ )**
बेदरची पाच्छाई व मंगळवेढें ८९ कान्होपात्रा ९१ दामाजीपंत ९३ भानुदास ९९ मृत्युंजय उर्फ मुंतोजी ब्राह्मणी ११०.

**४. नृसिंहसरस्वति व दत्तसंप्रदाय:- ( पृ. ११३ ते १४२ )—**
गुरुचरित्रग्रंथ ११३ ग्रंथरचनाकाल ११५ श्रीपादश्रीवल्लभ व नृसिंहसरस्वति ११७ गुरुकृपेनें रजकाचा राजा झाला १२१ सतीचा करुणरसमय विलाप १२४ स्त्रीवर्गास उपदेश १२६ आचारधर्म १२८ दत्तसंप्रदायाचे वैशिष्ट्य १२९ जनार्दनस्वामी १३१ जनार्दनस्वामी व एकनाथ १३३ नाथांचा गुरुगृहवास व दत्तकृपा १३६ नाथांचे दत्तावरील अभंग १३९ अवधूतांचे चोवीस गुरु १४१.

**५. दासोपंत व त्यांचा अफाट कवितासमुद्र:-- पृ. १४३ ते**

**१७४ )** दासोपंत १४३ दासोपंतांची काव्यसंपत्ति १४४ गीतार्णवाचें वैशिष्ट्य १४५ नाथ व दासोपंत १४७ गीतार्णवाचा परिचय १४९ शुद्ध मराठीचा एक नमुना १५४ दासोपंती सुभाषितें १५५ ग्रंथराज हा दासबोधाचा पूर्वावतार १५६ सुंदरबोध १६० दासोपंतांच्या पदांची मधुरता १६३ सगुणप्रेम १६५ दर्शनाची तळमळ १६६ प्रेम दे मज प्रेम दे १६८ कृतार्थता १६९ उपदेश १७२

**६. देशाची सामाजिक व धार्मिक दुरवस्थाः— ( पृ. १७३ ते २१२ )** लोकांची दुःस्थिती १७५ वर्णधर्म आणि वर्णबाह्य १७७ कर्मभ्रष्ट ब्राह्मण व ब्राह्मणांचा तेजोभंग १७८ कलियुगाचें प्राबल्य १८० सोंगेंढोंगें व बुवाबाजी ! १८२ अभाविक ह्म. नास्तिक व तर्कटी १८६ आत्मानुभवावांचून सर्व विद्या व कला फोल आहेत १८९ ब्रह्मज्ञानाचें तें वर्म चुकलेरे ! १९२ तुकोबाराय व वर्णाश्रम १९५ तुकोबांनीं केलेला दंभस्फोट १९८ प्रापंचिकांची कानउघाडणी २०४ नाथांचें चिरंजीवपद २०५ स्त्रियांस उपदेश करावा किंवा नाहीं ? २०८.

**७. एकनाथांचें चरित्र व चारित्र्यः— ( पृ. २१३ ते २४५ )** पैठण २१३ ग्रंथकार व साधु २१५ एकनाथ व तुळशीदास २१७ नाथांचा गृहस्थाश्रम २१८ कीर्तनें व प्रवचनें २२० काशी व पंढरी २२१ ज्ञानेश्वर व नाथ २२३ नाथांची गुरुभक्ति २२४ निंदकछलकांविषयीं बुद्धिसाम्य २२७ नाथांची “ निजशांति ” २३१ नाथांच्या साधुत्वाच्या गोष्टी २३१ श्रीखंड्या व नाथदारीचा रांजण ! २३४ नाथांचें निर्याण व पैठणची षष्ठी २३६ नाथांचा वंशवेल २३७ नाथांची अमोल कामगिरी २४२ नाथांची लोकमान्यता २४४.

**८. साधुसंत व प्रपंचपरमार्थविवेकः— ( पृ. २४७ ते २७८ )** प्रपंच आणि तुकोबाराय २४९ प्रपंच आणि समर्थ २५३ द्रव्यापासून अनर्थ व द्रव्याचा विनियोग २५६ गृहस्थाश्रमाचे निर्बंध, नियम व महत्त्व २६१ संसार कोणाला आहे व कसा आहे ? २६४ ब्रह्म सत्यं जगत् मिथ्या–याचा खरा अर्थ २६७ साधूंच्या व मुक्तांच्या लक्षणांत नाथांचें आत्मचरित्र २७०.

**९ अध्यात्म प्रकरणें, आख्यानें व संतचरित्रें:— ( पृ. २७९ ते ३१८ )** नाथांची ग्रंथसंपत्ति २७९ चतुःश्लोकी भागवत २८१ हस्तामलक २८५ शुकाष्टक २८९ स्वात्मसुख २९० आनंदलहरी २९१ रुक्मिणीस्वयंवर २९५ एका कृपणाचा पश्चाताप ! २९९ कांहीं आख्यानें ३०२ लीलाविनोदपर काव्यें

३०४ प्राचीन व अर्वाचीन भक्ताची चरित्रें ३१० जिवाजीपंत व आत्मारामपंत यांचा पत्रव्यवहार ( गद्य ) ३१५.

**१० उपासना–देव, भक्त आणि नाम:–– ( पृ. ३१९ ते ३५४ )** देव निर्गुण आहे, सगुण आहे व मूर्तीतही आहे ३१९ उपासनाप्रेम ३२६ श्रीकृष्णावतार ३२७ श्रीकृष्णाच्या बाललीला ३२९ कृष्णावरची मनोहर पदें ३३० कृष्णरूपाची शोभा ३३५ गोपांच्या खेळातील अध्यात्म ३३८ गोपाळांची अर्जी ! ३४० काला ३४२ गोपीप्रेम ३४३ पंढरी आणि विठ्ठल ३४३ नामसंकीर्तन ३४७ सत्संगाची महती ३५३.

**११. एकनाथी भागवत:–– ( पृ. ३५५ ते ४०२ )** ज्ञानेश्वरी व नाथभागवत ३५५ नाथ व भगवद्गीता ३५६ ग्रंथरचनेची प्रेरणा ३५७ स्थलकालनिर्देश ३५८ भागवतधर्मपरंपरा ३६० भागवतधर्माची सुलभता व सर्वसंग्राहकता आणि ३६२ भागवतधर्माचें स्वरूप ३६३ मोक्षाच्या नाना साधनांत भक्तिच श्रेष्ठ ३६९ भाव, भक्ति आणि मुक्ति ३७२ देव, भक्त आणि भक्ति २७७ भक्ताच्या तीन पायऱ्या–उत्तम भक्त कोणता ? ३८० महत्त्व भक्तीला, जातीला नाही ! ३८१ देवाचें भक्तप्रेम ३८६ मनोजयाचा उपाय-भक्तिच ! ३८७ गुणदोषदर्शन व स्तुतिनिंदा ३९० त्रिगुणांचा विचार ३९२ त्रिगुणांचें कोष्टक ३९४ दोन पक्षी ! ३९७ आत्मा अवस्थात्रयाचा साक्षी आहे ३९८ ब्रह्मप्राप्तीचा सुगम उपाय-भागवतधर्माचरण ३९९.

**१२. नाथांचें भावार्थरामायण:–– ( पृ. ४०३ ते ४२२ )** भावार्थरामायणाचा विशेष ४०३ नाथ आणि गावबा ४०६ दोघांचा मिळून ग्रंथ ? ४०८ रामकथेचें अध्यात्म ४०९ दशरथ व त्याच्या बायका ४११ कौसल्येचे डोहाळे ४१२ रामजन्म ४१५ राम आणि सीता ४१७ रामभेट ४१८ कनककांता व कादंबरी ४२० रामाची मुद्रिका पाहून ! ४२१

**१३. एकनाथी भारुडें:— ( पृ. ४२३ ते ४६८ )** भारूड म्हणजे काय ? ४२३ भारूड–वाङ्मय ४२४ नाथाच्या भारूडांचा अजबखाना ! ४२७ भजनी मंडळें व गोंधळी, भराडी, वाघे वगैरे लोक ४२९ मातापूर, तुळजापूर व सप्तशृंगी ४३१ आदिमायेवरील एक ओजस्वी भारूड ४३५ गोंधळ, फुलौरा, रोडगा व जोगवा ४४० खंडोबा आणि वाघेमुरळ्या ४४३ वाघे व मुरळ्या ४४६ भैरवनाथाचे भराडी ४४७ कुडमुड्या जोशी ४४९

बाळसंतोष व वासुदेव ४५१ पांगुळ, बहिरा, मुका व पिसा ४५५ जागल्या व पाईक ४५३ जीवसृष्टींतील काही प्राणी ४५५ थट्टा व्हा० विषयासक्ती व 'एडका मदन' ४५६ भूत ४५८ मोती ४५९ सासुरवास व संसार ४६१ भोळी आणि दादला ४६१ ढालगज, शंखीणडंखीण, सारी ४६३ जोहार। मायबाप! जोहार! ४६४

**१४ कविवर्य मुक्तेश्वरः— ( पृ. ४६९ ते ५०४ )** कुलवृत्त ४६९ मुक्तेश्वराचे शिक्षण ४७१ नाथ व मुक्तेश्वर ४७३ मुक्तेश्वराची कविता ४७४ मुक्तेश्वरी भारताची लोकप्रियता ४७५ सरस प्रकरणें ४७८ उत्कृष्ट उतारे ४७९ मुक्तेश्वरकालीन भोजनाचे प्रकार ४८७ वस्त्रांचें वर्णन ४९० सृष्टिसौंदर्याचीं वर्णनें ४९१ मुक्तेश्वरी नीतिरत्नमाला ४९५ रामायण व स्फुट प्रकरणें ५०० मुक्तेश्वरी भारतीचे विशेष गुण ५०२.

**१५ बालबोधकर्ते त्र्यंबकराजः— ( पृ. ५०५ ते ५१८ )**

**१६ शिवकल्याणः— ( पृ. ५१९ ते. ५४४ )** गुरुपरंपरा ५१९ कालनिर्णय ५२२ उपास्य–श्रीकृष्ण व्हा० विठ्ठल ५२३ ज्ञानेश्वरांविषयीं पूज्यभाव ५२४ शिवकल्याणांचा दशम ५२५ श्रीकृष्ण जन्मपंचाध्यायी ५२९ ब्रह्मस्तुती ५३६ वेदस्तुती ५३९ अमृतानुभवटीका ५४१.

**१७ रमावल्लभदासः— ( पृ. ५४५ ते ५६४ )** जन्मकाल व बालपण ५४५ वैराग्यलाभ व गुरुकृपा ५४६ पूर्वीचा मी व आतांचा मी ५४९ मित्रलाभ व ग्रंथरचनारंभ ५५१ कानडा प्रांतांत कृष्णभक्तीचा प्रसार व आवडी मठ ५५३ श्रीकृष्णजयन्तीव्रतोत्सवभजन ५५५ चमत्कारी टीका ५५८ थोडे उतारे ५६१ संतनामावळी ५६३.

**१८ पंधरा सोळाव्या शतकांतील कांहीं संतकविः– ( पृ. ५६५ ते ६०४ )** रामाजनार्दन ५६५ विटारेणुकानंद ५६६ जनीजनार्दन ५६७ मोरया गोसावी ५७२ विष्णुदास नामा ५७८ कृष्णदास मुद्गल ५८२ महालिंगदास ( शके १४८७ ) ५८५ रंगनाथ मोगरेकर ५८८ कृष्ण याज्ञवल्की व मधुकर कवि ५९८ गीताटीकाकार–माधवदास ६०२ लोलिंबराज ६०३.

**१९ तुकोबारायः— ( पृ. ६०५ ते ६२१ )** नाथ, तुकोबा व समर्थ यांचे कालनिर्णय ६०५ देहू आणि लोहगांव ६०६ जातकुळी व घराण्याची प्रतिष्ठा ६०८ तुकोबांचे पूर्वज ६१२ बाळपण ६१३ संसाराचा थोडा अनुभव

६१४ आपत्तींचा कडेलोट ६१५ तुकोबांच्या आयुष्यक्रमाचा नकाशा ६१८ आत्मचारित्रपर अभंग ६१९.

**२० नामसंकीर्तनाचा महामंत्र ! :— ( पृ. ६२३ ते ६४० )** भक्तिपंथ बहु सोपा ६२३ एकादशीव्रत ६२७ वारकरी संतांचा मेळा ६२७ नामसंकीर्तनानें माझें कार्य झाले ६२९ नामाची सुलभता व गोडी ६३१ नाममहिमा देवालाही ठाऊक नाही ! ६३५ कीर्तनाने लोकोद्धार ६३७ कीर्तनाचा आनंदोल्हास ६३८ तुकोबांचे पूर्णोद्धार ६३९.

**२१ तुकोबांचें उपदेशामृतः-- ( पृ. ६४१ ते ६६० )** सर्वास समान्यउपदेश ६४१ स्त्रीवर्गास बोध ६४५ तुकोबा व शिवबा ! ६४७ धरणेकरी ब्राह्मणास उपदेश ६५१ तुकोबांचा संप्रदाय ६५३ तुकोबांची सुभाषितें ६५४.

**२२ तुका वाणीः— ( ६६१ ते ६७० )** सहा तुकाराम ६६१ ‘ धनकोनाम तुका वाणी ! ऋणकोनाम विठ्ठल धनी ’ ६६१ पंढरीच्या पेठेंत तुकोबांचें दुकान ६६५ भांडवल धन्याचें, भांडाराची किल्ली माझे हातीं ६६९.

**२३ विनोद-उपरोध-उपहासपर अभंगः-- ( ६७१ - ६८२ )**

**२४ देशी भाषांचा-विशेषतः मराठीचा उत्कर्षः-- ( ६८३ - ७२३ )** सिंहावलोकन ६८३ देशभाषा अनेक आहेत ६८४ आठ प्रमुख देशभाषा ६८५ कानडी तेलगू व मल्याळी ६८६ गुजराथी ६९० बंगाली ६९१ हिंदी ६९४ भागवतधर्माची प्रचंड लाट ६९६ देशी वाङ्मयाचा आत्मा एक आहे ६९७ सर्वांचा सिद्धांत एकच ६९९ मराठी वाङ्मय हा सुखासनाचा मार्ग आहे ७०० ही गोडी संस्कृतांत कैंची ? ७०२ संस्कृत प्राकृतच्या अभिमान्यांची खडाजंगी ७०३ एकनाथांचे मराठीवरील प्रेम ७१० नाथांच्या मराठीचें मराठपण ७१५ सत्कवि व असत्कवि ७२१ मराठीची वकीली ७२२

**२५ महानुभाव वाङ्मयः-- ( ७२५ - ७८० )** भिन्न भिन्न लिपी ७२६ मुनिव्यास व स्थानपोथी ७२९ न्यायव्यास याचा हेतुस्थळ ७३१ बोपदेवशिष्य भीष्माचार्य ७३२ पंचवार्तिक ७३३ गीतगोविंदाची महाराष्ट्रटीका ७३६ मार्गप्रभाकर ७३६ निर्वेदस्तोत्र, भीष्माचार्य लासूरकर व पंडित ज्ञानदेव कृत पंडुगीता ७३८ महानुभावांच्या धार्मिक वाङ्मयाचे विभाग ७४१ गुर्जर शिव व्यासांचे तिन्ही स्थळ ७४१ चाल्हणशिष्य नृसिंह कवि ७४४ यादवसाम्राज्यानंतर ७४६ संतोषमुनि कृष्णदासकृत रुक्मिणीस्वयंवर ७५५ पंजाबांत

प्रवेश ७५९ शके १५०० ते १५७२ पृ. ७६० कवि कृष्णडिंभ विराट ७६२ कमळाकर कोमराज अंतवर्णन ७६५ लक्षधरि कवि ७६६ शारङ्गधर भोजने यांची तीर्थमालिका व नवरसी नारायणाचें महाभारत ७६९ मुरारमल्ल कविकृत दर्शनप्रकाश ७७० विश्वनाथ व्यास बीडकर व गोपीभास्कर ७७१ कवि मंडलीक एल्हण ७७३ उपसंहार ७७८

---

# मराठी वाङ्मयाचा इतिहास–खंड २ रा.

## प्रवेशिका.

श्रीपांडुरंगाच्या कृपाप्रसादानें मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा हा दुसरा खंड आज विजयादशमीच्या मंगल दिवशीं वाचकांच्या हातांत पडण्याचा सुयोग आला आहे. मराठीचें आद्य कवि मुकुंदराज यांचें विवेकसिंधु व परमामृत हे प्रसिद्ध ग्रंथ शके १११० चे सुमारास प्रगट झाले आणि बरोबर १०० वर्षांनीं ( शक १२१२ ) ज्ञानेश्वरीग्रंथाचा उदय झाला. ज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई वगैरे २५–३० सर्वजातीय संतांनीं आपली दिव्य अभंगवाणी वेंचून भागवतधर्माचा पंढरीच्या वाळवंटांत जयजयकार केला. त्या काळचा म्हणजे १२ व्या व १३ व्या शतकांतला मराठी वाङ्मयाचा इतिहास पहिल्या खंडांत सविस्तर दिलेलाच आहे. आतां याच्या पुढच्या काळाचा म्हणजे नामदेवांच्या समाधीपासून तों तुकोबारायांच्या प्रयाणापर्यंतच्या ( शक १२७२ ते १५७२ ) सुमारें ३०० वर्षांत निर्माण झालेल्या मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा आपणांस या खंडांत सविस्तर विचार करावयाचा आहे. ह्या काळांत नृसिंह सरस्वती, दासोपंत, एकनाथ, मुक्तेश्वर, शिवकल्याण, रमावल्लभदास, तुकोबाराय इत्यादि विख्यात संतकवींनीं महाराष्ट्रांत भागवतधर्माचा विस्तार आणि विकास केला, व तत्साधन म्हणून मराठीभाषेचा अत्यंत प्रेमानें व उत्साहानें पुरस्कार करून मराठीभाषेचें ऐश्वर्य अपार वाढविलें. ह्यापैकीं एकनाथ व तुकाराम ह्या अत्यंत लोकप्रिय व अत्यंत मोठ्या प्रमाणावर व्यापक समाजकार्य करणाऱ्या महाविभूतींचें नांव प्रस्तुत खंडास मी दिलें आहे. ह्या दोघांशिवाय इतरांच्या लोककार्याचा व भाषासेवेचा यथास्थित आढावा घेण्यात अगदी कसूर केली नाहीं, तथापि राजकीय स्थिति-

निदर्शक असे एखादें नांव देण्यापेक्षां त्यांतल्याच दोन थोर विभूतींच्या नांवानेंच प्रस्तुत खंड प्रसिद्ध करणें मला उचित वाटलें, व म्हणून ह्या कालखंडास ' एकनाथ तुकारामाचा काल असें नामाभिधान मी दिलें आहे.

२. प्रस्तुत खंडाची एकंदर रचना व त्यांत आलेल्या विषयांची माहिती विषयानुक्रमणिकेवरून वाचकांस होतच आहे, तथापि त्यातील कांहीं महत्त्वांच्या विषयांकडे वाचकांचें चित्त वेधणें अवश्य आहे. ज्ञानेश्वरांनीं समाधि घेतल्यावर लौकरच मुसलमानाची सत्ता महाराष्ट्रावर प्रस्थापित झाली. प्रथम बहामनीशाहीच्या व नंतर आदिलशाहीच्या व निजामशाहीच्या पकडींत महाराष्ट्र सांपडला. महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यास खग्रास ग्रहण लागलें. ग्रहण म्हटलें म्हणजे त्याला स्पर्शकाल, ग्रासकाल व मोक्षकाल असे तीन काल असतात. स्पर्शकालांत परसत्तेची छाया हळूं हळूं पसरत जाते. ग्रासकालांत ती संपूर्णपणें ग्रासून टाकते व मोक्षकालात ती ओसरत असते. अगदी असाच प्रकार या ३०० वर्षांत झाला. मुसलमानी राजसत्ता, मुसलमानी धर्म, मुसलमानी भाषा, व मुसलमानी संस्कृती यांचें प्राबल्य क्रमानें वाढत गेलें, व त्याच्या पूर्वप्रभावांत हिंदु व महाराष्ट्रीय संस्कृतीला जबर धक्के बसले. धर्म, भाषा व संस्कृति यांचें संगोपन आणि संवर्धन करण्यांत, आमच्या संतकवींनी आपल्या जीवाची, बुद्धीची व परिश्रमांची पराकाष्ठा केली व म्हणून ह्या तीनही गोष्टी महाराष्ट्रात जिवंत राहिल्या. त्यांच्या प्रयत्नांचें फळ म्हणूनच राष्ट्राचें ग्रहण पार सुटून महाराष्ट्र स्वातंत्र्यसूर्याच्या प्रकाशांत पुन्हां नांदूं लागला. पुढील खंडाच्या ' स्वराज्याचा अरुणोदय ' ह्या पहिल्या प्रकरणांत याचा स्फूर्तिदायक आढावा घेण्याचें मी ठरविलें आहे. सामान्यतः असें म्हणतां येईल कीं शके १२५० ते १३५० हा ग्रहणाचा स्पर्शकाल होय. शके १३५० ते १४५० हा ग्रासकाल होय व १४५० ते १५७५ हा मोक्षकाल होय. ग्रहणाची कृष्णछाया पडत चालली अशा

वेळीं ह्म० शक १३०० च्या आंतबाहेर नागनाथ म्हणून एक महासिद्ध वालेघाटाकडे होऊन गेले. त्यांच्या शिष्यांपैकीं एक शिष्य अज्ञान कवी यानें वरदनागेश नांवाचा ग्रंथ लिहिला व दुसरा शिष्य बहिरंभट उर्फ बहिरापिसा यानें भागवताच्या दशमस्कंधावर पाऊण लाख ओव्यांचा एक प्रचंड ग्रंथ निर्माण करून महाराष्ट्रीयास श्रीकृष्णचरित्राची गोडी लाविली ! हा ग्रंथ तीन शतकें अत्यंत लोकप्रिय होता. अज्ञानकवि किंवा बहिरंभट यांच्याप्रमाणेंच ह्या स्पर्शकालीं आणखी कांहीं मराठी ग्रंथकार झाले आहेत. चोंभा कवीचा ‘ उपाहरण ’ नामक एक सुंदर काव्यात्मक ओवीबद्ध ग्रंथ शके १३२० च्या सुमारास झाला. व्यवहार शिकवि-णाऱ्या पंचतंत्रादिक ग्रंथांची कांहीं गद्यपद्यात्मक रूपांतरें झालीं. ज्ञाने-श्वरशिष्य चांगदेव ह्यानें शके १२३४ मध्यें लिहिलेला पण नुकताच उजेडांत आलेला ‘ तत्वसार ’ नांवाचा एक ग्रंथ आहे. तसेंच ज्ञाने-श्वरशिष्य सत्यामलनाथ यांची शिवदिनकेसरीपर्यंत चाललेली एक मोठी योगपरंपरा महाराष्ट्रांत रूढ झाली होती. म्हणून पहिल्याच प्रकरणांत चांगदेव, सत्यामलनाथ, चोंभाकवी अज्ञानकवी व बहिरापिसा यांच्या काव्यग्रंथांची व ‘पंचोपाख्यान’ या गद्य ग्रंथाची वाचकांस ओळख करून देण्यांत आली आहे. दुसऱ्या प्रकरणांत मुसलमानी राजसत्तेचा व तिच्या दुष्परिणामांचा इतिहास अनेक इतिहासग्रंथांच्या आधारें दिला आहे. इतिहास व वाङ्मय हे जावळ्या फळासारखे एकात्मक आहेत. इतिहास डावलून वाङ्मयाचा विचार करितां येत नाहीं, किंवा वाङ्म-याकडे डोळेझांक करून कोणी इतिहास लिहील तर त्याची ती कृति अपूर्णच राहील. ह्या तीनशें वर्षांच्या काळांचा वाङ्मयाचा इतिहास पाहतांना, तत्कालीन राजसत्तेचें चित्र वाचकांचे डोळ्यांपुढें अवश्य उभें राहिलें पाहिजे. म्हणून या दुसऱ्या प्रकरणांत महंमद पैगंबर व त्याचा जयिष्णु धर्म, महंमदीयाचा जगज्जय, हिंदुस्थानावर कोसळणाऱ्या मुसल-मानांच्या टोळधाडी व त्यांच्या प्रतीकाराचे प्रयत्न, खिलजीच्या स्वाऱ्या

व जाधवराज्याचा शेवट, विजयानगरचे साम्राज्य व बहामनीशाही, आदिलशाही, निजामशाही आणि कुतुबशाही अशा क्रमानें मुसलमानी राजसत्तेचा यांत विचार केला आहे. महाराष्ट्राच्या राजकीय, धार्मिक व सामाजिक जीवनावर कोणते अनिष्ट परिणाम झाले ह्याचाही ह्या प्रकरणाच्या शेवटीं ( पृ. ७६–८८ ) व प्रकरण ६ मध्यें सविस्तर विचार केला आहे. ह्या ऐतिहासिक भाग नीट पाहिला म्हणजे आमचे संतकवि देशस्थितीविषयीं उदासीन होते ह्या आक्षेपाचें आयतेंच खंडण होईल. साधुसंत यांचें देशाच्या व समाजाच्या स्थितीकडे पूर्ण लक्ष होते हें यावरून व प्रसंगोपात्त येणाऱ्या त्यांच्या कवितेंतील अवतरणांवरूनही स्पष्ट होणार आहे.

३ ह्या घोरकालांत बेदरच्या पादशाहींतील दामाजीपंत व कान्होपात्रा आणि एकनाथांचे पणजे भानुदास महाराज ह्या तिघांचा विचार तिसऱ्या प्रकरणांत केला आहे. ह्यांनीं आपल्या चरित्रांत व कवनांत विठ्ठलभक्तिसंप्रदायाचें आध्यात्मिक तेज प्रगट केलें व पंढरीचा भक्तिपंथ जिवंत ठेविला. त्या भक्तीपंथाचा माध्यान्हकाल पुढें नाथतुकोबादि भक्तवीरांच्या चरित्रांत व काव्यांत प्रगट झालेला दिसेलच. मुसलमानी राजसत्तेपासून धर्माचें व समाजाचें आपल्या तेजस्वी चारित्र्यानें व उपदेशानें संरक्षण करणारा एक महापुरुष ग्रासकालीं अवतीर्ण झाला. तो पुरुष म्हणजे प्रख्यात श्रीनृसिंहसरस्वती हे होत. ह्यांचें अध्यात्मबल, योगबल व आचारनिष्ठा हे गुण अतुलनीय होते. यांच्या लीलांचें व कर्तबगारीचें वर्णन शके १४८० मध्यें प्रगट झालेल्या 'गुरुचरित्र' या ग्रंथानें केलें आहे, तथापि त्यांचा इहलोकीचा वास शके १३०० ते १३८० हाच ठरत आहे. यांनीं महाराष्ट्रांत दत्तोपासना रूढविली. जनार्दनस्वामी, एकनाथ व दासोपंत हे प्रख्यात दत्तोपासक होते, म्हणून ४ थ्या प्रकरणांत नृसिंहसरस्वती व दत्तसंप्रदाय यांचा

इतिहास व गुरुचरित्राची शिकवण हा भाग दिला आहे. ५ वें प्रकरण दासोपंतांना दिलें आहे.

१ **दासोपंत**—हे नाथांचे समकालीन होत. दासोपंत हे नाथांइतके प्रभावशाली व लोकप्रिय नसले तरी त्यांची ग्रंथरचना इतकी अवाढव्य आहे कीं तिचें मोजमाप करणेंही कठिण आहे. त्यांची गीतेवरील मुख्य टीका जी 'गीतार्णव' ह्या यथार्थ नांवानें प्रसिद्ध आहे तिची ओवीसंख्या १। लाख आहे! तिचे ३।४ अध्याय छापून काढतां काढतां विनायकराव भावे टेकीस आले. वेदांतभक्तीपर ग्रंथ सतत लिहित राहणें हा एकच व्यवसाय त्यांनीं जन्मभर केला व वाचकांचेही डोळे फाटून जातील एवढी अफाट ग्रंथसंपत्ति त्यांनीं निर्माण केली! त्यांनीं १। लाख पदें लिहिलीं असून त्यांपैकीं सारीं १६०० पदें छापलीं आहेत. त्यांच्या ग्रंथांची संख्या शंभरावर आहे. त्यांची सारी कविता तीन लक्षांवर भरेल! त्यांच्याइतकी ग्रंथसंपत्ति मराठींत तरी दुसऱ्या कोणाही कवीची नाहीं, इतर भाषांतही एकादा असा बृहद्ग्रंथप्रसविता असेल कीं नाहीं याचा संशयच आहे. यांनीं दशोपनिषदांवर संस्कृत-भाष्येंही केलीं आहेत. एवढा गाढा पंडित व सुबोध मराठी लिहितो हेंच आश्चर्य आहे. त्यांचा 'ग्रंथराज' दासबोधाचा पूर्वावतार आहे. त्यांची दत्तभक्तिपर पदें बहारीचीं आहेत. दासोपंताच्या एकंदर कवितेंत त्यांची गाढी विद्वत्ता, निस्सीम दत्तभक्ति, अफाट ज्ञान, बहुश्रुतपणा, विनोद, दृष्टांतउत्प्रेक्षादि अलंकार, मनोरंजक संवाद, चटकदार गोष्टी, हें सर्व कांहीं आहे आणि वर्णनाची हातोटी, सरळपणा, सुबोधपणा आणि भाषाप्रभुत्व हे गुणही अतुलनीय आहेत. पाल्हाळ कंटाळवाणा आहे, पण भाषेंत साधेपणा आहे. हा संस्कृतप्राकृत कवीश्वराचार्य खराच!

२ **एकनाथः**— नाथांचें चरित्र, चारित्र्य, ग्रंथकर्तृत्व, लोकोद्धाराची प्रचंड कामगिरी ह्या सर्वांचा एकदम विचार मनांत आला म्हणजे वाटतें कीं, ते प्रस्तुत कालखंडांतीलच काय पण एकंदर महाराष्ट्रवाङ्मयांतले

हिमालय आहेत. त्यांनीं वेदांतजिज्ञासूच्या हातीं चतुःश्लोकी भागवत, हस्तामलक, शुकाष्टक, स्वात्मसुख, आनंदलहरी इ० सुमारें ३ हजार ओव्यांचीं सात आठ अध्यात्मपर स्फुट प्रकरणें ठेविलीं, जाणत्यानेणत्यांसाठीं ज्ञानेश्वरीच्या तोलाचा अत्यंत रसाळ व भक्तिज्ञानवैराग्याचा महासमुद्र असा आपला वीस हजार ओव्यांचा भागवतग्रंथ ( एकादशटीका ) रचिला; कथापरांसाठीं रुक्मिणीस्वयंवरादि आख्यानेंउपाख्यानें लिहिण्याचा प्रघात पाडला; ध्रुवप्रल्हादादि प्राचीन व ज्ञानेश्वरनामदेवादि भक्तांचीं चरित्रें सुबोधवाणीनें गाण्याचा उपक्रम केला. रामभक्तांसाठीं भक्तिरसानें ओथंबलेला भावार्थरामायण हा ४० हजार ओव्यांचा ग्रंथ लिहिला, सुलभ व प्रेमळ भाषेंत 'देवभक्तनाम' इ० विषयांवर ४ हजार अभंग म्हटले; अठरापगड जातींच्या सर्व लोकांचा अध्यात्मज्ञान 'लोकबोलींत' देण्यासाठीं अनेक चमत्कृतिजनित भारुडें रचिलीं. याप्रमाणें सर्वांगपरिपूर्ण व सर्वाधिक अशी अपूर्व वाङ्मयसेवा केली आणि आपल्या उज्ज्वल चारित्र्यानें व भूतदयान्वित आचरणानें गृहस्थाश्रमाचा लोकोत्तर कित्ता जगापुढें ठेवून प्रपंच गोड करूनही परमार्थसाधन व लोकसेवा दोन्ही उत्कृष्ट रीतीनें करितां येतात हें जगाला शिकविलें ! हें प्रचंड कार्य करण्यास अवश्य ते दयाक्षमाशांत्यादि उदार व व्यापक हृदयाचे गुण भागवतधर्माचरणानें त्यांच्या अंगीं पूर्ण मुरलेले होते व ते त्यांनीं लोकांस स्वतः आचरून शिकविले. वर्णाश्रमधर्माचार न सोडतांहि ब्राह्मणांपासून महारमांगांपर्यंत सर्व लोकांत ते आत्मभावानें मिळूनमिसळून वागले. 'सर्वांभूतीं भगवद्भाव' हे त्यांच्या चारित्र्याचें व कवित्वाचें सूत्रवाक्य आहे. लोकांचे दोष निर्भयपणानें सांगूनही त्यांनीं त्यांच्यांत प्रेमभाव वाढविला. सर्वांच्या उपयोगाचें नवीन नवीन वाङ्मयप्रकार त्यांच्या त्यांच्या बोलत्या भाषेंत निर्माण करून सर्व समाजांत नवचैतन्य ओतण्याचें काम खरोखरीच एकनाथमहाराजांइतकें दुसऱ्या कोणाच्याही हातून झालें नाहीं. मला निभ्रांत वाटतें कीं नाथांइतकी महाराष्ट्राची कामगिरी दुसऱ्या

कोणाच्याही हातून घडली नाहीं. नाथांची वाणी अत्यंत रसाळ, प्रासादिक व मनमोहक आहे, गंभीर व प्रसंगीं विनोदरसपूर्ण आहे, सर्वांना सहज समजणारी व हृदयाला भिडणारी आहे. प्रसंगीं झणझणित पण सर्वदा अतिकोमल आहे. त्यांचें हृदय मोठें व्यापक, विशाळ व उदार आहे व याचा त्यांच्या ग्रंथांवर पूर्ण ठसा उमटलेला आहे. नाथांच्या चारित्र्याचा व ग्रंथांचा संस्कार महाराष्ट्रावर इतका पुरा उमटला कीं महाराष्ट्रांतील अनेक संतकविपरंपरा नाथांपासून प्रसृत झाल्या आहेत.

३ **मुक्तेश्वरः**— प्रस्तुत कालखंडांतील सर्व कवींत किंबहुना सर्व मराठी कवींत मुक्तेश्वराच्या कवितेची योग्यता कांहीं विशेष आहे. मुक्तेश्वराचें व्यक्तित्व त्याच्या काव्यांत लोपून गेलें आहे, तथापि साहित्याच्या व रसवत्तेच्या दृष्टीनें मुक्तेश्वर खरोखरीच अद्वितीय आहे. त्याच्या वाणीनें नव्याजुन्या सर्व रसिकांना मोडून टाकलें आहे. त्याच्या भारताचीं पांचच पर्वें उपलब्ध आहेत पण हीं पर्वें व इतर पांचसात स्फुट प्रकरणें मिळून त्याची १७।१८ हजार कविता आज प्रसिद्ध आहे. मराठींत भारतग्रंथावर २५।३० कवींनीं ग्रंथरचना केली आहे पण त्यांत मुक्तेश्वराच्या तोलाचा कोणी नाहीं. अभिजात व सुसंस्कृत मराठीचा उत्कृष्ट नमुना म्हणून मुक्तेश्वराकडे बोट दाखवितां येतें. त्याच्या वाणींत साहित्याचें सौंदर्य, रचनाचातुर्य, रसिकता, उज्ज्वल प्रतिभा, व भाषेची प्रौढी आणि विनोदपरता हे गुण उत्कटत्वानें प्रगट झाले आहेत. त्याचें स्वभावरेखन व सृष्टिसौंदर्यवर्णन अतुलनीय आहे. मुक्तेश्वर हा राष्ट्रीय भावनांनीं उचंबळलेला असा कवि आहे. महाराष्ट्र स्वराज्योन्मुख झाल्यावेळचा हा दांडगा कवि आहे.

४ **रमावल्लभदासः**— गोदा आणि कृष्णा ह्या दोन्ही महानद्यांचें पाणी पिऊन महाराष्ट्रांतील भागवतधर्माची मशाल साताराप्रांतांतून कोकणांत, गोवाप्रांतांत व तेथून उत्तर कानडाप्रांतांत फिरवणारा एक मोठा भक्त कवि मुक्तेश्वराच्याच काळीं महाराष्ट्रांत होऊन गेला, आणि तो कवि

म्हणजे रमावल्लभदास हा होय. भक्तीच्या अमृतरसानें कोकणपट्टी भिजवणारा हा पहिलाच एकच एक महाराष्ट्र संत होय ! मुक्तेश्वरासारखा रसिक असून भक्तप्रेमानें ओथंबलेल्या ह्या आम्रवृक्षाचें गोव्याच्या दक्षिण प्रदेशांत बीज रुजलेलें अद्याप दिसत आहे ! याच्या उपासनाप्रधान व रसपूर्ण कवितेची उपज शक १५४० ते १५७० ह्या काळांत झालेली आहे.

रमावल्लभदासांचा 'चमत्कारी टीका' नांवाचा एक सुबोध, प्रेमळ व भक्तिभावपूर्ण असा गीतेवर एक टीकाग्रंथ आहे. हे मोठे कृष्णभक्त होते, अत्यंत सगुणप्रेमी होते. यांची पट्टशिष्यीण आवडाबाई व 'आवडी-मठ' व असे अनेक मठमंदिरें तिकडे कारवाराकडे अद्याप आहेत. सर्व मठांत पंधरा दिवसांचा कृष्णजन्मोत्सव त्यांनीं दाखविलेल्या पद्धतीनें होत असतो. त्यासाठीं त्यांनीं 'कृष्णजयन्ती महोत्सवा'चा रोजचा क्रम आंखून दिलेला आहे. हा उत्सव पाहण्याचा व त्यांचीं पदें ऐकण्याचा लाभ मला मिळाला आहे. आवडाबाईचे वंशज वै. सुब्रावबाबा उभय-कर उर्फ चंदावरकर यांनीं माझे गोवेकर मित्र रामचंद्र कृष्ण व विठ्ठल-कृष्ण कामत यांच्या साह्यानें रमावल्लभदासांची कविता छापली आहे.

**५ शिवकल्याणः—** ह्या काळाच्या ग्रंथकारांत शिवकल्याण हें एक मोठेंच धेंड होऊन गेलें. हे नाथांच्या मागून आले. ज्ञानेश्वरीची पूर्ण छाप यांचे ग्रंथांवर आहे. यांनीं नित्यानंदैक्यदीपिकानामक अमृता-नुभवावर एक अतिसुंदर टीका लिहिली आहे. हिच्या ओव्या ६३०० वर आहेत. जुन्या पठडीच्या विद्वानांत व वरच्या दर्जाच्या वारकऱ्यांत हा ग्रंथ पूर्वीपासून मान्यता पावला आहे. यांनींही दशमावर एक लाख ओव्या लिहिल्या आहेत पण त्यांपैकीं ४१५ प्रकरणांवरील बारा हजार ओव्या तेवढया उपलब्ध झाल्या आहेत. शिवकल्याण पंडित तर होतेच पण पूर्णस्वरूपानुभवी होते यांत शंका नाहीं.

**६ तुकारामः—** नाथांची भागवतधर्माची परंपरा पुढें चालविणारे व

त्यांच्यासारखीच लोकोद्धाराची व लोकजागृतीची कामगिरी करणारे ह्या काळांतले दुसरे महापुरुष म्हणजे तुकोबाराय हे होत. तुकोबांच्या चरित्रांत एक विशेष आहे व कवित्वांत एक विशेष आहे व ह्या दोन विशेषांमुळें त्यांची लोकप्रियता असामान्य वाढलेली आहे. त्यांच्या चरित्रांतला विशेष हा कीं मुमुक्षु–साधक–सिद्ध ह्या तिन्ही अवस्था दोन तपांत त्यांनीं अनुभवून आपल्या अंगीं दाखविल्या ! यामुळें उपलब्ध असलेल्या सुमारे ४॥ हजार अभंगांत तीनही अवस्थांचीं स्वरूपें वाचकांस आढळून येतात. तुकोबांचे अभंग हे पारमार्थिकाला आरशांसारखे निजरूप दाखवून मार्गदर्शक होतात. आपण कोठें आहोंत, आपल्या उणिवा काय आहेत व आपल्याला कोठें जायचें आहे हें वाचकपाठकांना ते शिकवितात. त्यांनीं नामसंकीर्तनाचा महामंत्र जगाला उघड सांगितला. हजारों लोकांना त्यांनीं भक्तिमार्ग सुगम करून दिला व रामेश्वरभटासारखे धेंड भक्तिबळानें आपल्या पायांशीं आणले. जुनेच विचार पण तुकोबांच्या भक्तिभावाच्या व अत्युत्कट भावनांच्या मुशींतून प्रगट झाल्यामुळें त्याला चौगुणे तेज व बळ प्राप्त झालें आहे ! त्यांच्या वाणीवर नाथांचे संस्कार झालेले सर्वभर दिसत आहेत. आपलें लोकोद्धाराचें कार्य पुढें चालविण्यासाठीं तुकाराम व रामदास ह्या दोघांना साहित्य व स्फूर्ति देऊन नाथ निजधामाला गेले असें मला ह्या तिघांचे ग्रंथ पाहून वाटतें.

**कांहीं कवि:**—पंधरासोळाव्या शतकांतील इतर कांहीं कवींचीं ओळख १८ व्या प्रकरणांत करून दिली आहे. त्यांत रामाजनार्दन, जनी जनार्दन, विठा रेणुकानंदन, मोरग्या गोसावी, विष्णुदास नामा, कृष्णदास मुद्गल, महालिंगदास, रंगनाथ मोगरेकर, कृष्ण याज्ञवल्की (ब्राह्मण) व मधुकर ( क्षत्रिय ) ही कथाकल्पतरु लिहिणारी गुरुशिष्यांची जोडी, वगैरे आहेत. रामदास व रामदासपंचायतनांतले संतकवि हे पुढील खंडासाठीं ठेवले आहेत. तुकोबांचे शिष्य बहिणाबाई व निळोबाराय यांचाही समावेश पुढील खंडांतच होईल. प्रस्तुत कालखंडांतील उरल्यासुरल्या कवींचा समाचार तेथेंच घेऊं.

देशी भाषांचा व विशेषतः मराठी भाषेचा उत्कर्ष म्हणजे विस्तार व विकास यासाठीं २४ वें प्रकरण स्वतंत्र लिहिलें आहे तें भाषा व वाङ्मय या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचें आहे. मराठी संतकवींचे मराठी भाषेवर केवढें गाढ प्रेम होतें, आपली मराठी भाषा सर्व देशी भाषांत कशी श्रेष्ठ आहे व लोकांच्या हितबोधार्थ व स्वानुभवसुखार्थ आपण मराठी ग्रंथ-रचना कशी करीत आहोंत हें अनेक कवींनीं मोठ्या उत्साहानें व कळ-कळीनें सांगितलेलें येथें आपणांस आढळून येईल. कानडी, बंगाली, गुजराथी व हिंदी वाङ्मयाचा प्रारंभीं आढावा घेतला असून मराठीचा विशेष काय आहे हें सांगितलें आहे. त्र्यंबकरायाचें, कृष्णदास मुद्गलाचें, मुक्तेश्वराचें, दासोपंतांचें व विशेषतः नाथांचें भाषाप्रेम अवर्णनीय आहे. संस्कृत व मराठी यांच्या अभिमान्यांच्या खडाजंगीचा उतारा मोठा मनोवेधक आहे व त्यांचें अलोट भाषाप्रभुत्व तेथें प्रगट होत आहे. एकनाथांच्या भाषाप्रभुत्वाचें येथें अधिक विस्तृत्व वर्णन केलें आहे व त्याबद्दलची सुंदर प्रमाणें दाखल केलीं आहेत. ह्या खंडांतील दासो-पंत, नाथ, मुक्तेश्वर आणि तुकाराम हे खरेच मराठी भाषाप्रभु आहेत. तुकोबांचें भाषाप्रभुत्व व त्यांच्या विनोदउपरोधपर अभंगांतील मौजा दोन प्रकरणांत दाखविल्या आहेत. आमचे संतकवि हास्य, विनोद, विडंबन हे काव्याचे प्रकारही जाणत असत हें तुकोबांच्या ( प्रकरणें २२ व २३ ) व नाथांच्या लीलाविनोदपर काव्यांवरून ( पृ. ३०० ते ३१० ) व त्यांच्या भारुडांच्या अजबखान्यांतील अनेक पद्यांवरून तेथेंच स्पष्ट केलें आहे. संत हे अध्यात्मप्रवण तर होतेच पण मोठे मार्मिक, विनोदी, आनंदी व रसिक होते हें अनेक ठिकाणीं व्यक्त झालें आहे. त्यांच्या स्त्रीविषयक कल्पना किती उदार व रसिकपणाच्या होत्या हेंही मी अनेक स्थळी स्पष्ट केलें आहे. मुक्तेश्वर ( पृ. ४८३ ), नाथ ( पृ. ४१७ ) पहा. बहुतेक संत गृहस्थाश्रमी होते. नृसिंहसर-स्वतींनीं संन्यासधर्माचा उत्कर्ष आपले अंगीं दाखविला तर नाथांनीं

गृहस्थाश्रमाचा उत्कर्ष आचरणांत दाखविला यावरून आश्रम-विषयक अभिमान व जातिवर्णविषयक अभिमान ( पृ. ३८१ ते ३८६ ) व्यर्थ होत, रहाणी मुख्य आहे हें सिद्ध आहे. विषय-वासना ताब्यांत ठेवून ( पृ. ४५७ ) गृहस्थधर्मांत असगंत्वानें राहतां आलें पाहिजे. नाथांनी द्रव्याचे अनर्थ दाखवितांना द्रव्याची उपयुक्तताही सांगितली आहे ( पृ. २६० ). गृहस्थधर्माचें आचरण कसें असावें याविषयीं त्र्यंबकरायांनीं ( पृ. ५१६ व ५१७ ) व नाथांनीं अनेक स्थळीं सांगितलें आहे ( पृ. २६१ ते २७८ ). त्यावेळीं प्रचलित असलेल्या भोजनांतील पदार्थांचें व वस्त्रांचें वर्णन मुक्तेश्वरानें (पृ. ४८७ ते ४९०) विनोदानें केलें आहे. भागवतधर्माचें खुलें विवरण नाथानीं आपल्या भागवतांत केलें आहे. संत एकदेशी नव्हते, सर्वदर्शी होते. त्यांच्या विषयीं नवशिक्षितांत अनेक दुग्रह झाले आहेत ते ह्या ग्रंथाच्या समग्र वाचनानें निरस्त होतील अशी मला उमेद आहे.

**आभाराचे दोन शब्द:**—एवढा हा ८०० पृष्ठांचा ग्रंथ पुण्याच्या हनुमान प्रेसचे मालक रा. लक्ष्मणराव कोकाटे यांनीं एका महिन्यांत छापून व बांधून माझ्या हातीं दिला या त्यांच्या तत्परतेबद्दल त्यांचे आभार मानावेत तितके थोडेच आहेत. तसेच यवतमाळचे सुप्रसिद्ध साहित्यसेवक रा. यशवंतराव देशपांडे यांनीं प्रस्तुत खंडासाठीं महानुभावांचें वाङ्मय हें प्रकरण माझ्या विनंतीवरून लिहून पाठविलें याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. आपल्या श्रीएकनाथभक्तीमुळें मुंबईचे रा. पागनीस, पेटकर आणि मंडळी यांनीं रु. २०० पाठवून मला उपकृत केलें आहे.

———

# समर्पण



वाक्पुष्प माझें तुजला समर्पण
माझें म्हणायासि नसेहि कारण ।
वाचा तुझी बोलवितांहि तूं हरी !
सत्ता तुझी गाजतसे चराचरीं ॥ १ ॥

नृदेह हा दुर्लभ निर्मुनी भला
त्वां वाग्लता लाविलि यांत कोमला ।
प्रेमामृतें सिंचुनि आपण स्वयें
संगोपिली त्वां सदयेंहि चिन्मयें ॥ २ ॥

सप्रेम वाणी तव वाहिली तुला
म्यां कोठुनी गा हरि ! आणिलें हिला ? ।
बा ! अंगसंगें करूनी सुनिर्मला
प्रेमादरें स्वीकारि गा ! हिला-मला ॥ ३ ॥

# एकनाथ-तुकारामांचा काल



## तेराव्या-चौदाव्या शतकांतील ग्रंथकार.



### १. चांगा वटेश्वरांचा ‘ तत्त्वसार ’ ग्रंथ ( शके १२३४ ).

श्रीज्ञानेश्वरसमकालीन पण नवीनच उपलब्ध झालेल्या अशा एक दोन ग्रंथकारांचा प्रथम परामर्ष घेऊन मग आपण प्रस्तुत कालखंडांत प्रवेश करूं. चांगदेवाचें लोकप्रसिद्ध चरित्र व त्यास झालेल्या मुक्ताबाईच्या उपदेशाचा प्रकार आपण पूर्वी पाहिला आहे (खंड १ ला पृ० ६२३ ते ६२६ पहा.) चांगदेवाचा योगविद्येंतला गुरु वटेश्वरनामक सिद्धपुरुष होता व त्यास पुढें अद्वैतज्ञानाचा उपदेश मुक्ताबाईनें केला हें आपण तेथें पाहिलें आहे. मुक्ताबाईचे व चांगदेवाचे कांहीं अभंग उपलब्ध आहेत पण चांगदेवाचा एखादा ओवीबद्ध ग्रंथ असेल अशी कोणाचीही कल्पना नव्हती. नाथांनीं आपल्या भागवतांत गुरुकृपा झालेले ‘ निवृत्तिप्रमुख ज्ञानेश्वर । नामदेव चांगदेव-वटेश्वर ’ ह्या ‘ प्राकृत कवीश्वरांना ’ वंदन केलें आहे तेव्हां त्यांना किंवा त्यांच्या काळीं इतरांना चांगदेवाच्या ग्रंथाची माहिती असावी असें अनुमान होतें, पण चांगदेवाचा एखादा ग्रंथ असेल अशी पुसटही कल्पना कोणास झाली नव्हती.

चांगदेवांचा ‘ तत्वसार ’ ग्रंथ नुक्ताच उपलब्ध झाला आहे. चांगदेवांचा समाधिकाल शके १२४७ क्रोधन संवत्सर ज्येष्ठ शुद्ध ७ हा निश्चित दिसतो. प्रस्तुत ग्रंथ ग्वाल्हेरराज्यांत उपलब्ध झाला असून त्यावर

प्रो. ह. रा. दिवेकर यांचा एक लेख बडोद्याच्या ‘ सहविचार ’ मासिकांत ( फेब्रुवारी १९३४ ) नुकाच प्रसिद्ध झाला आहे. प्रस्तुत ग्रंथ समग्र प्रसिद्ध झाल्यावर मराठी वाङ्मयास एका महत्वाच्या ग्रंथाची जोड मिळेल यांत शंका नाहीं. ह्या ग्रंथाच्या १०३६ ओव्या असून त्यांपैकीं ४०० ओव्या उपलब्ध झाल्या आहेत म्हणजे ग्रंथ अजून त्रुटित स्वरूपांतच उपलब्ध आहे. ग्रंथाच्या शेवटीं ग्रंथरचनेचा काल शक १२३४ हा दिला आहे. “ शके चौतिसें बारा । परिधावी संवत्सरा । मार्गशिर शुध बीज । रविवार । नाम संख्या ॥ १०२८ ॥ हरिश्चंद्र नाम पर्वतु । तेथ महादेओ भक्तु । सुरसिद्धगणीं विख्यातु । सेविजे जो ॥ २९ ॥ इति गुरुशिष्यसंवादे । तत्वसार प्रबंधें । कथिलें वटेश्वरप्रसादें । योगरहस्य हें ॥ ३५ ॥ ऐसी चतुर्विध भक्ती रसाळ । वोविया दसाड शतरत्नमाळ । वाहिली वटेश्वर चरणयुगुळा । चांगा म्हणे ॥ १०३६ ॥ ” ह्या ग्रंथसमाप्तीच्या ओव्यांवरून वटेश्वराचा शिष्य चांगा यानें हरिश्चंद्रगडावर शके १२३४ परिधावी संवत्सरीं मार्गशीर्ष शुद्ध २ रविवार या दिवशीं योगरहस्य सांगणारा हा तत्वसारनामक ग्रंथ रचिला असें उघड होतें. हरिश्चंद्रगडावर महादेवाचें स्थान असून तेथून निघणाऱ्या नदीला मंगलगंगा म्हणतात असें चांगदेवानें म्हटलें आहे. नगर जिल्ह्यांत आकोले तालुक्यांत एक हरिश्चंद्राचा डोंगर आहे तेंच हें स्थान असावें.

‘ सिद्धपंथांतल्या ’ कांहीं योगसिद्धांची नामावळि प्रस्तुत ग्रंथांत दिली आहे तींत किती तरी अज्ञात नांवें आढळतात. आपणांस परिचित अशा सिद्धांची नांवें पाहूंः—

**आदिनाथा प्रसादें । उमास्वामि-संवादें ।**
**मछिंद्र प्रबोधें । प्रकट जाले ॥ ८६७ ॥**
**जो पदपिंडक्षाता । निगाले करचरण दृष्टांता ।**
**तो जाण चौरंगी सिद्धांता । कुळदीपकु ॥ ८६८ ॥**
**श्रीगोरक्षनाथु । देहसिद्धि सिद्धांतु ॥**

**परमतत्त्व विख्यातु । आचार्य जाणा ॥ ८६९ ॥**
**श्रीमुक्तादेवी योगिनी । जे समस्तसिद्धशिरोमणी ।**
**तियें प्रसादें चक्रपाणी । ज्ञानसिध्दु ॥ ८७० ॥**

ज्ञानेश्वरींत दिलेल्या परंपरेशीं ही परंपरा जुळते. आदिनाथ-मच्छद्र गोरक्ष-मुक्ताबाई-चक्रपाणि ( चांगदेव ) अशी ही परंपरा आहे. हातपाय तुटलेल्या चौरंगीनाथांना पुन्हां मत्स्येंद्रकृपेनें हातपाय आले ही वरील ८६८ व्या ओवींत चांगदेवांनीं सांगितलेली गोष्ट ज्ञानेश्वरांनींही ' तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं । भग्नावयवा चौरंगी । भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ' ( ज्ञाने० १८-१७५३ ) अशीच सांगितली आहे. 'पदपिंडाचा' शब्दप्रयोग ज्ञानेश्वरींतही त्याच अर्थानें आलेला आहे. ज्ञानेश्वर-चांगदेवांचा काल योगसिद्धींच्या उत्कर्षाचा दिसतो. चांगदेवांनीं आणखीही अनेक योग्यांचीं नांवें दिलीं आहेत. त्यावरून सर्व जातींचे स्त्रीपुरुष त्याकालीं योगविद्येंत पारंगत होते असें दिसतें. ' चर्पटकर्पटीकासारी, चाटु भाटु कुंभारी, कनखळु मेखळु चमारी, जिराबाई खेचरी, गोपीचंद, भर्तृहरी, जयचंद इ० अनेक नांवें योग्यांच्या यादींत आहेत. वटेश्वर हे योग-सिद्ध होते व मुक्ताई ज्ञानसिद्ध होत्या. वटेश्वरांचा चांगदेवांचे गुरु म्हणून व चांगदेवांचा चक्रपाणी म्हणून उल्लेख ज्ञानेश्वरांनींही ' चांगदेव-पासष्टींत ' केला आहे.

ग्रंथारंभीं गणेश, शारदा व सद्गुरु यांना नमन आहे. शारदास्तवन पहाः—

**जे शब्दब्रह्माची मूळिका । जे काश्मीरीची नायिका ।**
**जे बुद्धीसी प्रेरका । वागेश्वरी ॥ ६ ॥**
**जे महिमानें गहन । स्वभावें प्रसन्न ।**
**' भला रे ' म्हणौनि वचन । अनुवादली ॥ १३ ॥**

खेड्यापाड्यांतून ग्रामदेवतेच्या उत्सावप्रसंगीं ' चांगा भला ' असा जयजयकार होत असतो त्याचा या चांगदेवाशीं कांहीं निकट संबंध

असला पाहिजे व तो प्रगट झाल्यास चांगदेवाच्या लोकप्रियतेचें निदर्शन चांगलेंच करितां येईल. मराठी वाङ्मयाचा पांक्त अभ्यास होण्यास समाजांतील रूढ झालेल्या चालीरीतींची गूढ प्रमेयें उकललीं गेलीं पाहिजेत.

तत्वसार ग्रंथांतील कांहीं ओव्या नमुनादाखल देणें अवश्य आहे. त्या पहात पहात ग्रंथाची तोंडओळख करून घेऊं. चांगदेवांचा हा तत्वसार ग्रंथ योगप्रधान आहे हें उघड आहे. ह्या ग्रंथाच्या पूर्वार्धांत 'स्थूल सूक्ष्म भक्ती। बोलिली ज्ञानवैराग्य संमती' व उत्तरार्धांत 'आतां परिसा निर्गुण भक्ती। चांगा म्हणे.' 'चांगदेवांनीं वैराग्य तें ऐसें। जें देह-अहंतेसी रुसे' म्ह० देहाहंकाराचा लेश नसणें म्ह० वैराग्य अशी वैराग्याची गोड व्याख्या केली आहे. ते निर्गुणभक्तीचें लक्षण सांगतातः—

**जे पापपुण्यापूर्वीं। जन्ममरणातें हारवी।**
**महाबोधु चेववी। आत्मस्वरूपें॥ ५९७॥**
**जे दुसरेपणा हाणी। स्वर्गसंसारा धुणी।**
**जे सेविता निर्वाणीं। स्वयं शिव॥ ५९८॥**

त्यांनीं निर्गुणभक्तीचें स्वरूप दाखवितांना मनपवन, षट्चक्रें, कुंडलिनी, लयलक्षयोग, समाधि, पंचभूतें, शून्य, वज्रासन, इ० आपलीं योगाचीं सर्व आयुधें आणलीं आहेत व अनुभवाचें वर्णन केलें आहे, व हठयोगानें दीर्घकाल वांचतां येतें पण त्यानें कांहीं देहाभिमान नष्ट होत नाहीं असें म्हटलें आहे. योगाभ्यासानें समाधि लावून मन निर्विषय करणें ही निर्गुणभक्ती.

**त्रिगुणगौप्य गव्हरु। तो स्वामी माझा वटेश्वरु।**
**तस्य प्रसादें संसारु। उन्मळिला॥ ६७६॥**
**तेणें आत्मब्रह्म दाविलें। माझें मज उपदेशिलें॥**
**असत संसारिक नाहीं जालें। चांगा म्हणे॥ ६७७॥**

'त्यागाचा' अर्थ फार बहारीचा केला आहे. संसारत्याग म्ह० काय? देह किंवा बायकोपोरें टाकून बैरागी बनणें नव्हे! घरांतील पाहिजे ती

वस्तु शोधण्यासाठीं आपण हातीं दिवा घेतो व इष्ट वस्तु प्राप्त झाली कीं दिव्याचा अपाप त्याग होतो, अथवा परतीरी जाण्यापूर्वी आपण नांवेचा स्वीकार करितो पण ती परतीरीं पोंचतांच नांव जेथल्या तेथें राहते, त्याप्रमाणें देहांतील परमात्मवस्तु प्राप्त झाली कीं, देहादिप्रपंचत्याग सहज होतो! स्थूलत्याग हा खरा त्याग नव्हे.

**जैसी करीं ज्योति घेऊनी । गृहवस्तु अवलोकुनी ।**
**स्वयं ठेविलें देखोनि । त्याग कीजे ॥ ६८१ ॥**
**नातरि पैलिथडिये नांवेचा । कीजे प्रयत्नु स्वीकार तियेचा ।**
**पैलुपारु पावलेयां तिचा । पांगु फिटे ॥ ६८२ ॥**
**तैसें देहस्थें देहातीत देखिलें । गुरुप्रसादें जाणितलें ।**
**म्हणोनि त्यजीं पुत्रा म्हाणितलें । अशेषही ॥ ६८३ ॥**

पांग म्ह० पराधीनता. परतीरीं गेल्यावर नावेची गरज राहत नाहीं, पण नांवेंतून विहार करण्यास हरकत नाहीं!

पुढील म्हणजे ध्येय वस्तूच्या प्राप्तींत मागील गोष्टींचा त्याग अपापच होत जातो. कुल, गोत्र, जीवत्व यांचा असाच त्याग बोलिला आहे. इंद्र ब्रह्मरूपीं, ब्रह्म विष्णुरूपीं, विष्णु रुद्ररूपीं, रुद्र शिवरूपीं, शिव शून्यांत 'विरमोनि जाती' येथें 'काय राहती?' पुण्यपाप, वर्णभेद, स्तुति-निंदा, मानापमान, दुःखसुखें, आस्तिक्य–नास्तिक्य, रिद्धिसिद्धि, कर्म-निष्कर्म इ० सोडतां सोडतां किंवा सुटतां सुटतां—

**मनीं मन विरालें । महाशून्य उरलें ।**
**तत्वसार पावलें । तेंचि तूं जाण ॥ ७२० ॥**

तें तत्त्व अप्रमेय, अविनाश, आनंदमय, शांत, मंगल, वेदवेद्य, प्रणवरूप, अच्युत आहे—

**जेथ सृष्टि होए जाए । महासुख विसंबलें राहे ।**
**तें तूं प्रत्यक्ष आहे । परिस पुत्रा ॥ ७२८ ॥**

अशी ही निर्गुणभक्ति चांगदेवांनीं सुबोधवाणीनें वर्णिली आहे. त्यांचें

लेखन कोणाचीही समजूत पटण्यासारखें आहे. परमपद 'जीवाचें जिव्हार परमात्मा माहेर' आहे.--

**ऐसें वैराग्य उपजलें । तुज तूंचि प्रकाशलें ।**
**तरि संसार हारपलें । स्वरूपींचि ॥ ७६९ ॥**

ह्या महाबोधांत असतांना उचित-अनुचित कर्माचें म्ह० विधिनिषेधाचें भय उरत नाहीं.

**जऱ्ही महायज्ञ केलें । का महापाप घडलें ।**
**केलें कर्म मनोहूनि सुटलें । तऱ्ही कवण भोगी ? ॥ ७८६ ॥**
**मन पापपुण्य करी । उन्मनी भोगे जरी ।**
**पापपुण्य तरी । बाधिजेना ॥ ७८७ ॥**

ह्या बोधानें शिष्य 'अंतःकरणीं सुटला । जीवभावा मुकला । स्वयंबोधें बोधला । गुह्यसुखें.'

---

## २ सत्यामलनाथ व त्यांची परंपरा.

ज्ञानेश्वर महाराजांपासून एक मोठी योगपरंपरा महाराष्ट्रांत चालू झाली. त्यांचे शिष्य सत्यामलनाथ यांनीं लिहिलेला सिद्धांतरहस्य उर्फ ललितप्रबंध नांवाचा एक सुंदर काव्यग्रंथ खानदेशांतील एदलाबाद येथील दाजीसाहेब देशमुख यांचे ग्रंथसंग्रहांत होता तो त्यांजकडून कल्याणचे इतिहाससंशोधक रा. दिवेकर यांस मिळाला व तो मजजवळ दोन महिने होता. मी तो ग्रंथ समग्र वाचला आहे. तो छापला गेल्यास मराठींतील पहिल्या पांच ओवीबद्ध ग्रंथांत गणला जाईल इतका तो उत्कृष्ट आहे-असा तो वाचून माझा ग्रह झाला. सांप्रत तो कोणाजवळ आहे हें मला माहीत नाहीं. त्याचा छपाईखर्च देण्याचें श्री. खंडेराव मेहेंदळे यांनीं कबूल केलें आहे असें दिवेकर मजजवळ बोलले होते, पण तो छापला गेला नाहीं. दिवेकर व मेहेंदळे दोघेही दिवंगत झाले आहेत !

सत्यामलनाथांच्या सिद्धांतरहस्याचीं दहा प्रकरणें आहेत, पण

त्यांतील ९ वें प्रकरण अनुपलब्ध आहे. बाकीच्या नऊ प्रकरणांतील मिळून ओवीसंख्या १० हजारांवर आहे. ९ वें प्रकरण सांपडून जमेस धरलें तर सारा ग्रंथ १२ हजार ओव्यांचा आहे असें म्हणतां येईल. हा बारा हजार ओव्यांचा ग्रंथ इतका उत्कृष्ट आहे कीं तो मागें कसा राहिला याचें नवल वाटतें. मला खात्री वाटतें कीं ह्या विद्याप्रसाराच्या काळांत तो प्रसिद्ध होऊन लोकांपुढें आला तर मान्यता पावेलच पावेल. त्यांत अध्यात्म आहे, योग आहे, भक्ति आहे, वर्णनें रसाळ आहेत, धांवती व सुलभ ओवी असून एकदा हातीं घेतला कीं सारा ग्रंथ कोणासही वाचावासाच वाटेल! ग्रंथकार त्या वृत्ताला ओवी म्हणतात पण त्याचे चरण अभंगासारखें लीलेनें म्हणतां येतात. चरण सुटसुटित आहेत, वाणी प्रौढ व प्रासादिक आहे. माझा हा ग्रंथ स्वतंत्र आहे, टीकारूप नाहीं असें ग्रंथकार अभिमानानें सांगतातः—

**सोलीव शास्त्रार्थे। अनुभवसिद्ध। आत्मरस शुद्ध। ग्रंथपात्रीं॥४२८२॥**
**संस्कृत असोनि। वरी टीका केली। तैसी नव्हे झाली ग्रंथोत्पत्ती॥८४॥**
**वेदांतवनींचीं। वेंचोनियां फुलें। दाहा हार केले। प्रकरणांचे ॥ ८५॥**
**प्रेमाचिया सूत्रीं। गुंफोनिया माळा। बुका तो योजिला। सद्भावाचा॥८६**
**एवं हारबुका घेवोनी श्रीकंठीं। करतया–भेटी। पातलों मी ॥ ८७॥**
**श्रीनाथें समाधी। घेतलिया वरी। इंद्रायणीतीरीं। आळंदीयें ॥ ८८॥**
**येक संवत्सर। मासत्रय पूर्ण। जाहल्या वेदीन। वरि तधी ॥ ८९॥**
**सिद्धांतरहस्य। ग्रंथ हा समाप्त। झाली श्रीमन्नाथ। कृपादृष्टी॥ ९०॥**

असा हा स्वतंत्र ग्रंथ एक वर्ष तीन महिन्यांत लिहिला गेला. ग्रंथाच्या शेवटीं ग्रंथाचें नांव ग्रंथकारानेंच ‘सिद्धांतरहस्य’ असें दिलें आहे, तथापि ग्रंथाच्या मलपृष्ठावर याचें नांव ललितप्रबंध असें लिहिलें आहे. दहाव्या प्रबंधाच्या प्रारंभीं १५ श्लोक आहेत. ही पोथी ग्रंथकाराच्या हातची मूळ नसून नक्कल आहे असें उघडच दिसत आहे, नक्कल मात्र कोणीतरी सुविद्य माणसानें केलेली असून प्रत शुद्ध आहे. ग्रंथ अशुद्ध लिहिला गेला नाहीं, त्याप्रमाणें ग्रंथाचें अर्वाचीकरणही फारसें झालेलें

नाहीं. नाथपूर्वकालीन शब्दादिकांचीं रूपें त्यांत बरींच दिसतात. नक्कल मात्र रामदासकालीन आहे. १० व्या प्रकरणांत कवीनें ओवी १५२५ पासून तो १७०० व्या ओवीपर्यंतच्या १७५ ओव्यांत श्रीगुरु ज्ञानेश्वरांचें चरित्र वर्णिलें आहे. ग्रंथरचनेचा ओघ व विषयप्रतिपादनाचा थाट पाहतां मूळ ग्रंथ नाथांच्या पुष्कळच पूर्वीचा असावा असें वाटतें. या ग्रंथांतील ज्ञानेश्वरचरित्रपर सुंदर ओव्यांचा परिचय मी वाचकांस या पूर्वींच करून दिला आहे ( खंड १ ला पृ० ५०६ ते ५१० पहा ) म्हणून येथें पुनरुक्ति करीत नाहीं. येथें फक्त सत्यामलनाथांच्या कालाचाच विचार करितों.

सत्यामलनाथांच्या कालाविषयीं थोडा बारीक विचार करायला पाहिजे. प्रस्तुत ग्रंथाच्या ५ व्या प्रबंधांत एके ठिकाणी वैदिक व पौराणिक काळाचे ऋषि आणि ऐतिहासिक काळांतले संत यांना नमन केलेलें आहे. ते येणेंप्रमाणें:—

**श्रीगोविंदपूज्य-। पादाचार्य गुरु। ब्रह्मज्ञानमेरू। नमो आधीं ॥ ४१ ॥**
**श्रीमुकुंदयोगी। श्रीशंकराचार्य। विद्यारण्य आर्य। रामराजा ॥ ४२ ॥**
**पद्मपूज्यपाद। श्रीधरादिवर्य। नमो विद्याचार्य। अनुभूती ॥ ४३ ॥**
**मछेंद्र गोरक्ष। गैणी श्रीनिवृत्ति। ज्ञानेश्वरयति। गुरु नमो ॥ ४४ ॥**
**मुक्ताई सोपान। विसोबा नामया। नमन यांचिया। पादारविंदीं ॥ ४५ ॥**
**नानक कबीर। रामानंद तुका। रामदास येका। जनार्दन ॥ ४६ ॥**
**केशव मानको। सावता संताई। गोरा मिराबाई चोखामेळ ॥ ४७ ॥**
**सेना नरहरी। भानु रोहिदास। नागा सुरदास जसवंत ॥ ४८ ॥**
**तुलसी सदाना (?)। भर्तृ गोपिचंद। महता भक्तेंद्र नरसिंह ॥ ४९ ॥**
**नारायणाश्रम। मुद्गल दामाजी। एवं संतराजी। भूतभावी ॥ ५० ॥**

यांतील संत सर्व प्रसिद्ध आहेत. श्रीआद्य शंकराचार्यांपासून तों रामदासापर्यंतच्या सर्व संतांना येथें वंदन आहे. ह्या दहा चरणांवरून पाहिलें तर सत्यामलनाथ हे रामदासानंतरचे ठरतात, पण याला अडचण नाथांच्या एका अभंगाची आहे. नाथांचे आपल्या परंपरेवर जे अभंग आहेत त्यांत पुढील अभंग आहे:—

**ज्ञानराजें बोध केला सत्यामला । रेडा बोलविला प्रतिष्ठानीं ॥ १ ॥**
**भोजलिंग ज्याचो समाधी आळंदी । ज्ञानराज बोधी तिघांजणां ॥२॥**
**सत्यामलें बोध गैबीराया केला । स्वयें ब्रह्म झाला सिद्धरूप ॥ ३ ॥**
**एका जनार्दनी ऐसी परंपरा । दाविलें निर्धारा कथूनीयां ॥ ४ ॥**

येथें ज्ञानेश्वरांनीं ज्या ' तिघांजणां ' साक्षात् बोध केला ते तिघे म्हणजे एक सत्यामल, दुसरा ज्याच्या मुखानें त्यांनीं वेद बोलविले तो रेडा व तिसरा भोजलिंग. रेड्याची समाधि पुणें जिल्ह्यांत आळें येथें आहे. भोजलिंगाची समाधि आळंदीस आहे. सत्यामलनाथांची समाधि कोठें आहे समजत नाहीं. नाथांची ' परंपरा ' पाहता एकनाथ (शके १४५० ते १५२१ ) यांच्या पूर्वी सत्यामलनाथ व त्यांचे शिष्य गैबीनाथ हे दोघेही होऊन गेले असले पाहिजेत हें उघड होतें.

आतां सिद्धांतरहस्यांतील ज्या दहा ओव्या वर दिल्या आहेत त्यांतील रामदासांच्या उल्लेखावरून पाहिलें तर सत्यामलनाथ हे रामदासानंतरचे वाटतात, व नाथांच्या अभंगावरून पाहतां ते व त्यांचे शिष्य गैबीनाथ हे दोघेही नाथांच्या पूर्वींचे ठरतात. समर्थांचा काल ( शके १५३०-१६०३ ) व नाथांचा काळ ( शके १४५० ते १५२१ ). चांदोरकर सत्यामलनाथांचा काळ शके १४०० नंतरचा असावा असें म्हणतात ! कालाचा सुसंभाव्य निर्णय झाला पाहिजे, त्याचा येथें प्रयत्न करूं.

**आदिनाथ-मत्स्येंद्रनाथ-गोरखनाथ-गैनी ( गहिनी ) नाथ-निवृत्तिनाथ-ज्ञाननाथ ( ज्ञानेश्वरमहाराज )**

ही परंपरा आपण पहिल्या खंडांत पाहिलीच आहे. या पुढची परंपरा परंपरेंतीलच एका पुरुषानें दिलेली आहे, ती अशी आहे:—

**ज्ञाननाथ-सत्यामलनाथ-गैबीनाथ-गुप्तनाथ-उद्बोधनाथ-केसरीनाथ-शिवदिननाथ-नरहरिनाथ-लक्ष्मीनाथ-मालोनाथ-**

मालोनाथांनीं वरील परंपरेवर २० श्लोक रचिले असून शिवाय ज्ञानेश्वरांवर एक अष्टक रचिलें आहे. या परंपरेंत शिवदिननाथ हे अधिक प्रसिद्ध व लोकप्रिय आहेत. त्यांचा मठ पैठणास आहे. त्या मठांतला

पदसंग्रह मला मिळाला आहे. त्यांत उद्बोधनाथ, केसरीनाथ व शिवदिननाथ यांचीं पदें, आरत्या, अभंग, अष्टकें वगैरे आहेत. मी शके १८२४ सालीं १५ दिवस पैठणास राहिलों होतों; तेथें एकनाथ, कृष्णदयार्णव, शिवदिनकेसरी, अमृतराय इ० संतकवींच्या मठांत कागदपत्रें शोधिलीं व कांहीं लाभही झाला. राजवाडे यांनींही 'शिवदिनकेसरी' वरच्या टिप्पणींत जी परंपरा दिली आहे ती वरील परंपरेला व माहितीला जुळती आहे. शिवदिन, मालोनाथ इत्यादिकांचीं अष्टकें, श्लोक वगैरे देऊन मीं येथें जागा अडवीत नाहीं. सत्यामलनाथाच्या पूर्वीची व नंतरची अशा ज्या दोन परंपरा वर दिल्या आहेत त्या अगदीं बिनचूक आहेत हें येथें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. शिवदिनकेसरींच्या मठांत परंपरेचें एक भजन म्हणत असतात तेवढें येथें देतों:—

**आदिनाथ की जय ॥ मत्स्येंद्रनाथ की जय ॥**
**गोरक्षनाथ की जय ॥ गैणिनाथ की जय ॥**
**निवृत्तिनाथ की जय ॥ ज्ञाननाथ की जय ॥**
**सत्यामळनाथ की जय ॥ गैबीनाथ की जय ॥**
**गुप्तनाथ की जय ॥ उद्बोधनाथ की जय ॥**
**केसरीनाथ की जय ॥ भोलानाथ की जय ॥**
**शिवदिननाथ की जय ॥ नरहरिनाथ की जय ॥**
**लक्ष्मीनाथ की जय ॥ सवसंतन की जय ॥**

कालनिर्णयासाठीं शिवदिनापासून मागें गेलें पाहिजे.

**शिवदिननाथ केसरी–समाधि पैठणास शके १६९६ महाशिवरात्र.**
**केसरीनाथ–समाधि आळंदीस शके १६४६ मार्गशीर्ष शुद्ध २.**
**उद्बोधनाथ–समाधि राशिन येथें शके १६०९ वैशाख वद्य ९.**

हे शक सर्वमान्य आहेत. उद्बोधनाथांच्या मागे गुप्तनाथ, त्यांच्या मागे गैबीनाथ व त्यांच्यामागे सत्यामलनाथ आहेत हें लक्षांत ठेवलें म्हणजे सत्यामलनाथांचा काल रामदासानंतर अथवा रामदासकालींही येऊं शकत नाही आणि नाथांचा अभंगही त्या समजुतीला विरुद्ध आहे. असें

असून दिवेकरांचें म्हणणें आहे कीं नाथांचा अभंग प्रक्षिप्त आहे. तो प्रक्षिप्त नाहींच; उद्बोधनाथ शके १६०९ मध्यें समाधिस्थ झाले म्ह० त्यांची हयात १५३०-१६०९ ठरते; म्हणजे ते अर्थातच समर्थकालीन ठरतात. मग त्यांच्याही पूर्वींच्या चौथ्या पिढीचे—सत्यामलनाथ समर्थकालीन कसे असूं शकतील ?

याला आणखीही एक प्रमाण आहे. शिवरामस्वामींच्या संतमालिकेंत 'सत्यामला' चें नांव आहे आणि शिवरामस्वामी हे शके १६०१ मध्यें समाधिस्थ झाले हें प्रसिद्ध आहे. म्हणजे रामदास, उद्बोधनाथ व शिव-रामस्वामी हे अगदीं समकालीन ठरतात तेव्हां नाथाच्या अभंगांत सत्या-मलनाथांचें नांव येण्यास कांहींच हरकत नाहीं.

ह्या सर्व प्रमाणांवरून सत्यामलनाथ नाथांच्या पूर्वींचे ठरतात, अर्थात् नाथांचा अभंग प्रक्षिप्त मानण्याचें कारण नाहीं. उलट असें म्हणता येतें कीं सिद्धांतरहस्य ह्या ग्रंथाच्या आरंभींचें संतनमन नकलकारानें पदरचें घातलें असलें पाहिजे. त्याच्या वेळीं प्रसिद्ध असलेले तुकोबासमर्थ इत्यादि संतांना नमनांत घातल्याशिवाय त्याला चैन पडलें नसावें ! असे प्रकार वाङ्म-याच्या इतिहासात कोठें कोठें झालेले आहेत. एकच उदाहरण देतों. 'कथा-कल्पतरू'चा जोड ग्रंथकार मधुकर कवि यानें ग्रंथसमाप्तीचा काल शके १५४५ हा दिला आहे व तो अगदीं बरोबर आहे. पण ह्या ग्रंथाच्या नकलकारानें महाभारतावरील लेखकांचा उल्लेख करितांना १६५१ त जन्मलेल्या 'मोरोबा पराडकर' यांचाही उल्लेख केला आहे ! अर्थात् याचा दोष नकलकाराकडे आहे, ग्रंथकाराकडे नाहीं.

असो. सत्यामलनाथ व गैबीनाथ हे नाथांच्या पूर्वींचे आहेत, म्हणजे नाथांचा अभंग प्रक्षिप्त नाहीं. हें ठरल्यावरही एक भानगड उभी राहते. उद्बोधनाथांचा समाधिकाल शके १६०९ व ज्ञानेश्वरांचा समा-धिकाल शके १२१८ हा प्रसिद्धच आहे. तेव्हां ज्ञाननाथ-सत्यामलनाथ-गैबीनाथ-गुप्तनाथ-उद्बोध ह्या पांच पिढ्यांना मिळूनही १६०९ ते १२१८

म्हणजे जवळजवळ ४०० वर्षे कां लागावींत हा प्रश्न उद्भवतो. राजवाडे व दिवेकर यांनीं अर्थात् मधें कोठें तरी खंड पडलेला आहे असें ठरविलें. 'प्रत्येक पिढी ३० वर्षांची धरली तर ह्या ४०० वर्षांत १३ पुरुष पाहिजेत आणि आपल्याजवळ तर पांचच पुरुष आहेत तेव्हां हा खंड सत्यामलनाथ व गैबीनाथ ह्यांमध्यें असावा' असें राजवाडे यांचें मत आहे व तो ज्ञाननाथ व सत्यामलनाथ यांमध्यें असावा असें दिवेकरांचें मत आहे! सिद्धांतरहस्य ग्रंथ बारकाईनें पाहतां सत्यामलनाथांना ज्ञानेश्वरांचा साक्षात् सहवास होता असें माझें निश्चित मत झालें आहे. आतां गैबीनाथ हे मोठे योगी होते व कदाचित् योगबलानें दोन तीनशें वर्षे जगले असतील असें मानायला राजवाडे तयार नाहींत, कारण 'तसा ऐतिहासिक पुरावा नाहीं व मानवी इतिहासाला धरून चालणेंच योग्य आहे.' योगबलानें दीर्घकाल वांचणें अशक्य आहे असें मला वाटत नाहीं, तथापि इतिहासदृष्टीला मान देऊन मी असें म्हणतों कीं ज्ञाननाथानंतर सत्यामल व गैबी हे एकामागें एक झाले व गैबीनाथांनंतर गुप्तनाथांपर्यंत मध्यें काहीं पुरुष झाले असून ते परंपरेंत सांगितले नाहींत, अर्थात् खंड पडला असला तर तो गैबीनाथ व गुप्तनाथ यांच्यामध्यें पडला असेल. गैबीनाथांनीं राशिन येथें राहणाऱ्या गंगा नांवाच्या परम अधिकारी स्त्रीस बोध केला व तिचें सांप्रदायिक नांव गुप्तनाथ असें ठेविलें. तिनें आपल्याच गांवांत राहणाऱ्या उद्धव नाईक ठिपसे यांस योगज्ञानमार्गाचा उपदेश केला व त्याचें नांव उद्बोधनाथ असें ठेविलें. हे राशीन येथें राहात असतांना तेथील अहंकारी मामलतदार केसोपंत नांवाचा होता, त्यास सुधारून त्यांनीं त्यांचें नांव केसरीनाथ ठेविलें.

गुप्तनाथ व उद्बोधनाथ यांच्या समाधी राशीन येथें शेजारीशेजारी आहेत व केसरीनाथांची समाधि आळंदीस आहे. केसरीनाथांपासून दोन भिन्न शाखा झाल्या. केसरीनाथांचे शिष्य दोन, एक मल्हारीनाथ व दुसरे शिवदिननाथ. मल्हारीनाथांपासूनची परंपरा राशीन येथें आहे व शिवदिन-

केसरीपासूनची परंपरा पैठणास असून त्याचे तेथें मोठें संस्थान आहे. भोलानाथ हे केसरीनाथांचे पहिले शिष्य होते.

मला गुप्तनाथांचा पुढील अभंग पैठणच्या वाडांत व दुसऱ्याही एका (म्हणजे बहिणाबाईच्या) वाडांत मिळाला आहे:—

**ध्येय ध्याता ध्यान आह्मां गुरु जाण। इष्ट मित्र पूर्ण गुरुरूप॥ १॥**
**माता पिता त्राता अरि पुत्र भ्राता। गुरुविण आतां नाहीं दुजा॥ २॥**
**पशुपक्षीयातीं गुरुरूप भासती। ऐसी ज्याची स्थिति तोचि जाणे॥ ३॥**
**वृक्षवल्ली पाहीं अणुरेणु तेही। गुरुविण नाहीं रितें कोठें॥ ४॥**
**ऐसा गुरुनाथ भज गुरु व्यापक। गुप्त (गुप्ता) बोले रंक राज सम॥ ५॥**

गुप्तनाथांचा दुसरा एक अभंग प्रसिद्ध आहे:—

**सर्व करी देवाधिदेव। त्यासी नेणती मानव॥१॥**
**वाहती देह-अभिमान। देव सर्व कांहीं जाणे॥ २॥**
**अहंपणें आतां। देह न दिसे सर्वथा॥ ३॥**
**अहंकर्ता जो मी म्हणे। तेणें केली आपुली हानी॥ ४॥**
**चाले देवासी भिऊन। गुप्त म्हणे तोचि धन्य॥ ५॥**

गुप्तनाथ हे नाथसमकालीन आहेत, म्हणून त्यांचीं दोन पदें वर दिलीं आहेत. सत्यामलनाथ हे ज्ञानेश्वरकालीन असून त्यांची हयात शके १२०० ते १२७० व गैबीनाथ १२५०-१३०० पर्यंतचे म्हणजे दोघेही तेरावे शतकांतले असावेत. यानंतर गैबीनाथ हे गुप्तनाथांवर अनुग्रह करण्यासाठीं योगबलानें दोनशें वर्षे वांचले म्हणा किंवा इतिहास-दृष्टीनें पाहणें झाल्यास गैबीनाथ व गुप्तनाथ यांच्या मध्यें खंड पडून ५।७ पुरुष झाले असावेत असेंही म्हणा. आग्रह नाहीं! १६० वर्षे वांचलेल्या चार दोन पुरुषांच्या हकीकती इंग्रजी वर्तमानपत्रांतून ह्या पांच चार वर्षांत आम्हीं वाचलेल्या आहेत, तेव्हां शिस्तीनें व नीतिरीतीनें वागणारीं माणसें पाश्चात्य राष्ट्रांत आजही १६० वर्षे वांचूं शकतात, मग सत्यामल व गैबी यांसारखे योगविद्यानिष्णात पुरुष दीर्घकाळ वांचले असल्यास

विशेष नवल वाटायला नको, आणि हें खरें धरल्यास मध्यें खंड पडल्याची कल्पनाही करावयास नको, अर्थात् सत्यमलनाथांपासून उद्बोधनाथांपर्यंतची परंपरा मध्येंच खंडित झाली असेंही मानायला नको.

उद्बोधनाथापासून पुढची विस्तृत शिष्यपरंपरा अशी आहे:—



ह्या परंपरेंतील उद्बोधनाथ, केसरीनाथ, शिवदिननाथ, नरहरिनाथ, लक्ष्मीनाथ व महिपतिनाथ यांची बरीच कविता उपलब्ध आहे. यांपैकीं शिवदिननाथ अत्यंत प्रसिद्ध असून महिपतिनाथांचीं पदें अत्यंत बहारीचीं व लोकप्रिय असून उत्तर हिंदुस्थानांत ग्वाल्हेर, उज्जेन, इंदोर, देवास, धार वगैरेकडे अद्याप सर्वत्र ऐकूं येतात. ज्ञानेश्वरांपासून महिपतनाथां-पर्यंतची एकच परंपरा अशी उज्वल आहे कीं, जी सतत सहाशें वर्षे अविछिन्न चालली असून जिच्यांतल्या बहुतेक पुरुषांनीं महाराष्ट्राची व मराठी वाङ्मयाची कांहींना काहीं तरी सेवा केली आहे. केसरीनाथांचा सिद्धांतसार हा दशप्रकरणात्मक एक ग्रंथ (शके १६३८) असून शिवदिनकेसरी व महिपतिनाथ यांचीं पदें महाराष्ट्रभर पसरलीं आहेत व लोकप्रिय झालीं आहेत. ह्या सर्वांचा विचार पुढील खंडांत योग्यस्थळीं होईलच सत्यामलनाथांची परंपरा अशी महाराष्ट्रव्यापी आहे. ते स्वतः ज्ञानेश्वर-महाराजांचे अनुग्रहीत आहेत. त्यांचा काल शके १२०० ते १२८० हा असावा, निदान ते एकनाथापूर्वींचे आहेत हें तरी निश्चित आहे. ह्यांत आणखी शोधांची भर पडून कालनिर्णयांत कांहीं बदल करावा लाग-ल्यास त्यास माझी तयारी आहे; तूर्त तरी मी सत्यामलनाथास तेराव्या शतकांतील ग्रंथकार मानतों व चांगावटेश्वराच्या जोडीस बसवितों.

---

## ३ ‘उषाहरण’ कर्ता चोंभा.



शके १३०० ते १३५० च्या सुमारास चोंभानामक कवीनें उषाहरण काव्य लिहिलेलें उपलब्ध झालें आहे, पण तें त्रुटित आहे. हें काव्य २५०० ओव्यांचें असावें, पण त्यांपैकीं साऱ्या ५७५ ओव्याच सांपडल्या आहेत. चोंभा हें व्यक्तिनाम आहे कां आडनांव आहे हें समजण्यास मार्ग नाहीं, तथापि जुन्या काळीं आडनांवें प्रचारांत नव्हतीं त्यामुळें तें

व्यक्तिनामच असावें असें वाटतें. प्रस्तुत काव्य फार चांगलें आहे, हें समग्र मिळतें तर बरें झालें असतें. अहंमदनगराजवळ तिसगांव येथील दिनकर रामदासी यांच्या मठांत जुन्या पोथ्यांच्या गठ्ठ्यांत हें काव्य शंकरराव देव यांस सांपडलें, तें त्यांनीं राजवाडे यांच्या स्वाधीन केलें, व राजवाडे यांनीं व्युत्पत्तिव्याकरणशास्त्रदृष्ट्या तपासून परिश्रमपूर्वक सुंदर टीपा देऊन शके १८३३ सालच्या भा. इ. सं. मंडळाच्या अहवालांत छापून प्रसिद्ध केलें. ग्रंथ प्राचीन असून अक्षर सुवाच्य आहे असें राजवाडे म्हणतात. ग्रंथाच्या भाषेवरून पाहतां ग्रंथ ज्ञानेश्वरीला अगदीं जवळ असावा असें वाटतें. ज्ञानेश्वरींतील शब्द, वर्णनशैली, शब्दांचीं व नामाचीं रूपें जशींच्या तशीं यांत सांपडतात. कवीचा संप्रदायही ज्ञानेश्वराचाच असावा. चोंभा कवि वैष्णवपंथीय असावा अशीं १।२ गमकें प्रस्तुत त्रुटित काव्यांतही आढळतात. हरिवंश व भागवत ह्या ग्रंथांचा कवीनें एके ठिकाणीं उल्लेख केला आहे.

**सैवां ( शैवां ) आणि वैष्णवांसी जालें । हरी हर मीसळलें ।**
**बापु जुंझ विपरीत । आपण आपणेयां रुसलें ॥**
**जेणें कृस्णातें वोळगावें । तेणें ईश्वरासी भेयावें ।**
**तें आधींचि जाणीतलें । असे प्रल्हाददेवें ॥**
**उपजौनि संवसारीं । तेथें चुकलें जे मुरारी ।**
**तेयांचा जननेयेसी भारु । पडे नवमासवरी ॥**

ह्या ओव्यांवरून हरिहरांची एकात्मता कवीस पटली असून कृष्ण-प्राप्तीसाठीं आधीं शंकराची प्रसन्नता जोडली पाहिजे असें जें त्यानें म्हटलें आहे तें भागवतधर्माला अनुसरूनच आहे. महाराष्ट्रीय वैष्णवांचे विष्णु हें उपास्य आहे व शंकर हे आदिगुरु आहेत. चोंभा कवीचा देवदास, रंगनाथस्वामी निगडीकर, शेखमहंमद इ० कवींनीं आपापल्या संतमालिकेंत समावेश केला आहे. ' चोंभा म्हणे अनुवादेन । उपाहरणाचा प्रसंगु ' ' आतां हरिहरांचें जुंझ । चोंभा म्हणे अवधारा '

ह्या दोनच स्थळीं कवि–काव्यनामांचा उल्लेख आहे. काव्याच्या आद्यंतीचीं अनेक पृष्ठें गहाळ झालीं असल्यामुळें कविकाव्यविषयक कांहींच वार्ता समजण्याची सोय राहिली नाहीं. महानुभावपंथीय वाङ्मयाशी कवीचा परिचय दिसत नाहीं. ह्या काव्याची भाषा शुद्ध मराठी आहे. त्यांत फारशी शब्द एकही नाहीं व संस्कृत शब्दही कार्याकारणच आले आहेत. शुद्ध मराठी भाषेंतलें जुनें काव्य या दृष्टीनें याची योग्यता विशेष आहे. संपूर्ण काव्य सांपडलें नाहीं याबद्दल चुटपुट वाटण्याइतकें मनोहरत्व त्यांत निःसंशय आहे. भाषेचा ओघ सहज आहे. कृत्रिमपणाचा लवलेश नाहीं. चोंभाकवीच्या ओवीची घडण मात्र विलक्षण आहे. वर उध्दृत केलेल्या तीन ओव्यांकडे पाहिलें म्हणजे पहिल्या दुसऱ्या व चौथ्या चरणांचे अंतीं यमक आहे तर तिसरा चरण निर्यमक आहे असें दिसतें. हा त्याच्या यमकाचा सामान्य नियम आहे. तथापि कित्येक ओव्या निर्यमकही आहेत. त्याची कविता सयमक, निर्यमक व सार्धयमक अशी विविध प्रकारची आहे. ओवी मात्र एकनाथी ओवीप्रमाणें चार चरणांची असते.

ज्ञानेश्वरीच्या काळाजवळचा हा कवि असल्यामुळें व बहुधा ज्ञानेश्वराच्याच भागवतधर्मांतला असल्यामुळें ज्ञानेश्वरी भाषेची छाप त्याच्या भाषेवर चांगलीच पडलेली आहे. पवाडे, कोमाइला, दळवाडें, हातीयेरु, सीक ( शिक्षा ), मांदी, कारीसवाणें, भिंगुळवाणें, असिवार ( स्वार ), साउमा ( समोर ), वंकट ( वक्र ), बैसका, लाठावीर, अडदर, सुहाडा ( सुभटा ), नोकणें ( अपमान करणें, ) परौता, गुंडे, रहंवर ( रथ ) इ० ज्ञानेश्वरींतील शब्द या ग्रंथांत विपुल आहेत. शिवाय ' उसिना घाई जुंझावे ' ' झळंबले तिन्ही लोक ' ' कीळें म्ह० किरणें फाकती ' ' जैसें उसळलें काळकूट ' ' निसाणा ( रणभेरी, नगारा ) घावो दीधला ' ' पायाचे मोगर ' ' प्रळयकाळींचे जळधर । वोळले अंबरीं ' इ० ज्ञानेश्वरींतले शब्दसमूह किंवा वाक्यप्रयोग प्रस्तुत काव्यांत सांपडतात. थापटणे-

कार, भालेकार, काठीकर, दारवठेकार इ० लोकभाषेंत रूढ असलेले कार-प्रत्ययांत शब्द याचे काव्यांत कांहीं कमी नाहींत. ज्ञानेश्वरांचे भाषा-प्रभुत्व चोंभाकवींपेक्षां अर्थातच वरच्या कोटींतलें आहे. मराठी भाषेंत जें चारपांच शब्दसृष्टीचे ईश्वर आहेत त्यांतलेही ते अग्रगण्य आहेत.

भक्त प्रल्हादाचा नातु बलि व बलींचा पुत्र बाणासुर. बाणासुराला उषा नामक एक रूपवती कन्या होती. तिला स्वप्नांत एका सुंदर तरुणाचा समागम घडला. जागृत झाल्यावर तिला त्याचाच निदिध्यास लागला. ती चिंतातुर व विरहदु:खी झाली आहे हें पाहून तिची मैत्रीण, कुभांड प्रधानाची कन्या, चित्ररेखा, हिनें तिला विरहाचें कारण विचारलें. मला तोच स्वप्नगत पुरुष पाहिजे नाहीं तर माझी अवस्था ठीक नाहीं असें उषा म्हणाली. चित्ररेखा चित्रकलेंत निष्णात होती. तिनें त्रैलोक्यांतील पुरुषमात्रांचीं चित्रें काढून उषेला रोज दाखवीत असावें पण तें पाहून उषा हिरमुसली व्हावी, असें करितां करितां हिनें एके वेळीं द्वारकेच्या यादव-कुळांतील पुरुषाची चित्रें काढलीं. तेव्हां उषा कावरीबावरी झाली. कृष्णाचें व त्याचा पुत्र प्रद्युम्न यांचीं चित्रें पाहून तर ती लज्जित झाली. प्रद्युम्नाचा सुत अनिरुद्ध याचें चित्र पाहतांच ती 'हाच तो प्रियकर' म्हणून मूर्च्छित पडली. चित्ररेखा सर्व समजली व तिनें योगसामर्थ्यानें अनिरुद्धाला पर्यंका-सह उचलून शोणितपुरांत उषेच्या महालांत आणून सोडलें. उषेस परा-काष्ठेचा आनंद झाला. गांधर्वविधीनें त्यांचा विवाह झाला व चार महिने-पर्यंत उषा व अनिरुद्ध सुखांत राहिले. एकदा मंदिररक्षकांच्या दृष्टीस उषा पडली तेव्हां तिला पुरुषसमागम झाल्याचें चिन्ह त्यांना कळून आलें व त्यांनीं बाणासुरास कळविलें. तो संतप्त होऊन उषेच्या महालांत आला तेव्हां उषा व अनिरुद्ध द्यूत खेळत असतांना त्यानें पाहिलें. त्याचें व अनिरुद्धाचें युद्ध जुंपलें. बाणासुरानें नागपाश टाकून त्याला पकडलें व प्रतिबंधांत ठेवलें. इकडे द्वारकेंत अनिरुद्ध नाहींसा झाल्या-पासून यादवमंडळ बहुत शोकांत पडलें होतें. नारदानें त्यास त्याचा

पत्ता सांगितला. कृष्ण व बलराम मोठी यादवसेना घेऊन निघाले व त्यांनीं शोणितपुरास वेढा दिला. उभयपक्षांचें तुमुल युद्ध झालें. शंकरानें बाणासुराच्या रक्षणार्थ रुद्र ठेवला होता व तोही गणांसह बाणासुरास मिळाला. शेवटीं घनघोर युद्ध होऊन श्रीकृष्णानें बाणासुराचे चार हात तोडून टाकले पण बाणमातेच्या विनवणीवरून त्याला जीवदान दिलें. बाणासुरानें जावयास बंधमुक्त केलें; व उभयपक्ष युद्धार्थ जमले होते तेच वऱ्हाडी बनून उषा व अनिरुद्ध यांचा थाटानें विवाह झाला. नंतर यादव मोठ्या विजयानें मिरवत द्वारकेस परत आले. ही कथा मूळ भागवताच्या दशमस्कंधांत अ० ६२–६३ मध्यें वर्णिली आहे.

चोंभानें ही कथा आधाराला घेऊन त्यावर आपल्या कवित्वाची इमारत उभारली आहे. त्याचें काव्य हें भाषांतर किंवा रूपांतरही नसून स्वतंत्रच आहे. त्याचें वर्णन पौराणिक थाटाचें आहे. युद्धवर्णनांत काव्याचा मोठा भाग खर्ची पडल्यानें कथासंदर्भ नीट संभाळण्याकडे त्याचें पाहिजे तितकें लक्ष राहिलें नाहीं. शंकराचे तीन पुत्रवीरभद्र, गणपति व कार्तिकस्वामी यांजबरोबर प्रद्युम्नादिकांचीं वीररसाचीं भाषणें व त्यांचें युद्ध तसेंच हरिहरांचें म्हणजे शंकर व कृष्ण यांचें युद्ध यांत काव्यांचा बराच भाग खर्ची पडला आहे. त्यांतच नागास्त्र व गरुडास्त्र, अग्न्यस्त्र व वारुणास्त्र ह्या अस्त्र्यांचीं युद्धें व त्यांचे परिणाम यांचाही 'पलाळ' म्ह० पाल्हाळ बराच झाला आहे. काव्याचे सर्व भाग प्रमाणांत ठेवणें हें धोरण चोंभास साधलें आहे असें वाटत नाहीं. असो. शके १३०० च्या सुमारचें मराठी काव्य ही आपली येथें दृष्टि आहे. तेव्हां काव्यावर अधिक टीका न करितां चोंभाच्या मराठी काव्यवाणीचाच आपण आतां परिचय करून घेऊ.

( १ ) भवानी देवीच्या प्रसादानें हें काव्य लिहिण्याची मला बुद्धि झाली असें कवि पहिल्या प्रसंगांतच म्हणतो—

**ऐसा मंदभक्तु देवा। उपजाविला कवणां काजा॥**

**जीवीं नाहीं नीर्मळपण । सदा काठिण अंतःक्रण ।**
**पाये न व्हाती कव्हणीये वेळे । जातां दिंडी जागरणा ॥**
**जरी बैसलेयां देषें संत । आरत मनन केची तेथ ।**
**ऐसी कांहीं नुपजेची बुधी । त्यासी घालीजे दंडवत ।**
**ऐसा विनविला करुणावचनीं । तवं ते कृपाळु भवानी ।**
**अभयेंकरु ठेवीला माथां । उपदेसीला हरीचरणीं ॥**
**आतां मज सक्तीचा प्रसादु । वरी भक्तीचा अनुवादु ।**
**चोंभा म्हणे अनुवादेंन । उषाहरणीचा प्रबंधु ॥**

देषे = देखे. 'ष' बद्दल सर्वत्र 'ख' वाचावा. सक्तीचा = शक्तीचा, भवानी देवीचा.

( २ ) बाणासुरानें आधींच उषेला चांगल्या संरक्षणांत ठेवलें होतें.

**भंवती अस्त्रीयांची राषणे । तेथें घातली ते राजकुंमरी ॥**
**पांच सतें सोवासीणी । उषा तयाचे राषणी ॥**
**आंगाजवळी प्रधानकन्या । जे कां बुधीवंता सीरोमणी ।**
**प्रधान्यकन्या देषा । जीये नावं चित्ररेषा ।**
**तीयेसी नीरोवीली ते बाळा । तुज लागे हें माणीक ॥**
**पार्वतीचिये वोळगे न्यावी । रायाजवळी आणावी ।**
**दों ठाई स्वरसु असे । आणी केउती जांवों नेदावी ॥**
**पुरुषाचेनि नावें पाहीं । तेथ वारेया सौरसु नाहीं ।**
**मरण बाधोनी पालवीं । कवण रीगेल तीये ठाई ॥**
**ऐसीये परीची जतन केली । बहुत–येक द्वीस गेले ।**
**रायें मानीला वीस्वासु । वीघ्न न घडेचि लोटलें ॥**

सभोंवार स्त्रियांचीं राखणें; पांचशें सुवासिनी–त्यांच्या संरक्षणांत उषेला ठेवलें होतें. नीरोविली = निरविली, स्वाधीन केली. वोळगे = सेवेला. स्वरसु = प्रेमाची परवानगी. सौरसु = योग्यता. वाराही तेथें जाऊं शकत नसे. पालवीं = पदरांत ( मरण बांधून ). द्वीस = दीस. अखेर इतकें जपूनही न घडणारें विघ्न तेथेंच प्राप्त झालें !

( ३ ) पार्वतीच्या सेवेला मंदिरांत जाण्यासाठीं उषा चित्ररेखेसह

निघाली. 'नेसली षीरोदकु ( उत्तम शुभ्र रेशमी ) सेला' त्यावर 'उबारेन गादेल' म्ह० उकाड्यामुळें घाबरी होईल म्हणून 'तेयावरी वाली-पेचों बुथी,' घेतली म्ह० पातळ बुरखा. यावरून राजकन्या अगदीं उघडयावर तशा जात नसत असें दिसतें. पूजेसाठीं 'कापुरेसाहितु घेतला विडा' मुखांत घालण्यासाठीं फळ ( फोडी ) व 'हातीं पाणे' म्ह० हातांत उदकपात्र घेतलें व सूर्योदय झाला म्हणून 'मग ते नीघाली झडझडा.' देवदर्शनाला थोरामोठयांच्या स्त्रिया कशा जात याचें हें एक सुंदर चित्र आहे.

( ४ ) मधलीं सहा पानें गेल्यामुळें उषा व अनिरुद्ध यांच्या स्वप्नसमागमाचा व भेटीभापणाचा प्रसंग कवीनें कसा काय वर्णिला आहे तें समजण्यास मार्ग नाहीं! उषेचें वियोगदुःख पाहून मी तुझ्या प्रियकराला 'गिवसूनी आनीन निभ्रांत' असें चित्ररेखेनें तिला वचन दिलें. ती म्हणाली कीं 'मी मन्मथ—भुजगांचें वैद्यक जाणणारी आहे,' पण मला त्याच्या खुणा सांग.'' कवणु काह्याचा नेणे। देषीलियां वोळषैन'—पाहिल्यावर ओळखीन असें उषा म्हणाली. चित्ररेखा म्हणालीः—

**नाभी बाळे आन करीन । तीन्ही लोक चीत्रीं लीहीन ।**
**जेयाचे सारीषें दाषवीसी । घडीये माजी घेऊनी येईन ॥**

मग चित्ररेखेनें मंत्र जपला.

**ऐसा प्राभीला मंत्रु । तवं उदो जाला दीनकरु ।**
**पुर्व दिसा उजळलीया । पळौनी गेला अंधकारु ॥**

प्राभीला = प्रारंभिला. चित्ररेखेनें चित्रें काढण्यापूर्वी भिंती कशा तयार केल्या याचें मनोहर चित्र चित्रकारांचा व्यवसाय करणारेच जाणतील. कवि म्हणतोः—

**चीत्र लीहावेयाची आइती केली । नीट भींती कापडीली ।**
**षडी सारूनी घोटाळली । वर्ते षडी मेळवीली ॥**
**षडी पाची हींगुळु अळीता । नीळी मनसीळ गोंदतां ।**
**मसी डीकु दोडे धउ । केलिया लिषणीया बहुता ॥**
**भींगी मारुनु केला संपु । मग आदरीलें चीत्र रेषुं ॥**

हें वर्णन अर्थात् चोंभाकर्वाचें स्वतंत्र आहे, याला हरिवंशांत किंवा भागवतांत आधार नाहीं. आइती=डौल. षडी=खडी. लिपणीया=लेखण्या. यापुढें २० पृष्ठें गहाळ आहेत !

( ५ ) बाणासुरानें उषेच्या प्रासादाला वेढा घातला, तेव्हांची भीतिप्रद तारबंळ पहाः—

सरंक्षकांच्या आरोळ्यांनीं व बाणांनीं ‘ गर्जिन्नला ब्रह्मकटाहो ’

**देषा उठावला दळभारु । भवंता वेढिला अवारु ।**
**सैन्या संख्या कवण जाणे । नाहीं मर्यादा अंतपारु ॥**

सैनिक भिंतीवर वळचूं लागले. उषेची व तिच्या प्रियकराची कोण त्रेधा उडाली !

**बाहीरीं सातवां द्वारीं । होती दारवठेकारी ।**
**ते धांवती सांघो गेली । उषेकुमरीसी भीतरी ।**
**‘ माये ! वो आमुचाची परीवारु । पण तो कैसा भयासुरु ।**
**लषलषात लोहोजाळ । भवंता वेढिला अवारु ॥**
**मज पाहतां ऐसें होईल । हा राजकुमरु उमंटेल ।**
**कोपें काळाग्निरुद्र । रावो उभा असे ठाकला ॥ ’**
**दोषें षेळते होतीं सारी । फासे होते उषेकरी ।**
**ते गळीनले हातोनीया । प्राणु नाहीं तीये अवस्वरी ॥**

उषेनें गिरिजेची प्रार्थना केली.

**तूंची जालीसी प्रसन । मी लाधलीये सुखनीधान ।**
**सक्तीवाङ्क्य लटिकें नव्हे । या सवदां करी षा जतन ॥**

उषा थरथरा कांपूं लागली. ती पतीच्या ‘ आळुकी गळेया झोंबीनली । काइ करीन प्राणेस्वरा. ’ आम्ही यादवकुळींचे वीर असून आमचें सामर्थ्य अद्भुत आहे, तुला भिण्याचें अगदी कारण नाहीं, असें अनिरुद्धानें तिला आश्वासन दिलेंः—

**वायां रुदना करीसी टळमला । जात असे डोळांचे काजळ ।**
**अस्वपात पडती नयनीं । काळें होत असे वकेस्तळ ॥**

वकेस्तळ=वक्षस्थळ. त्यानें उषेचे नेत्र पुसले व तिला धीर दिला.

( ६ ) अनुर्घ ह्म० अनिरुद्ध यावेळीं मूर्तवीरासारखा वागला. हातांत कवाडाची अर्गळा घेऊन सिंह गजांच्या कळपांत शिरतो तसा तो शत्रुसैन्यांत घुसला. त्याच्यावर असंख्य शस्त्रघात झाले.

**गुण वाजती रुणझुणा । भाली येताती सणसणा ।**
**वरिपडताती इटाळे । हातगुंडे पाषाण ॥**
**सस्त्रजाळ सुटले कैसे । माजी अनुर्घु न दिसे ।**
**मेघपटळीं झांकोळले । सूर्याचें बींब जैसे ॥**

गुण=धनुष्याची दोरी. भाली = बाण. इटाळे = विटा. तुंबळ युद्ध माजलें. ' नागवे नागवे हा रणसुभटु । सैन्या भवंतुसे आटू '— हा रणसिंह हातीं लागत नाहीं, सैन्यही आटत चाललें, हें पाहून बाणासुरही चमकला. तूं कोणाचा कोण असें बाणासुरानें विचारिलें. तेव्हां अनुर्घु म्हणाला कीं ' भारें दाटली वसुंधरा ' व गाईचें रूप घेऊन ती विष्णुकडे गेली व पृथ्वीचें रक्षण करण्यास तिनें विनविलें तेव्हां विष्णूनें आठवा अवतार घेतला व देवकिये उदरीं जन्मला—तो दैत्यांचा काळ श्रीकृष्ण आमचा आजा व त्याचा कुमर जो मदन ह्म० प्रद्युम्न तो आमुचा पिता. ' हें ऐकतांच बाण गर्भगळित झाला. तो उषेला भेटायला गेला. ती म्हणालीः—

**तुझेया बीजाची निर्मळ । उधरीन तुझें कुळ ।**
**जाईन भ्रतारासरीसी । सत्व पाहे आपुलां डोळां ॥**

उषा बाणाची अत्यंत लाडकी कन्या. त्याचें वात्सल्य प्रगट झालें.

**उषा पाढियें जीउ प्राणु । तेव्हळी उंचबळला बाणु ॥**
**आंगीं रोमाचळ उठीलें । घर्ग पडिलें हातौनु ॥**
**कोडीसवाणे पाये धाकुले । रायें हातें प्रवसीलें ।**
**आतां बुझावीलीसी वो माये । म्हणौनी नींडळीं लाविले ॥**

तेव्हळी=ते वेळीं. घर्ग = खड्ग. कोडीसवाणे = सुकुमार. प्रवसीले = कुरवाळले. शृंगार, वीर व वात्सल्य हे तीनही रस प्रस्तुत काव्यांत

कवीनें समयोचित घातले आहेत. या काव्यांत रसांचा उठाव जागोजाग चांगला साधला आहे.

( ७ ) इकडे द्वारकेंत अनिरुद्ध नाहींसा झाल्यामुळें आकांत झाला. त्याच्या आईनें तर प्राणच जणुं बाहेर काढला:—

**दुखें भूमीवरी लोळे । केस सुटले मोकळे ।**
**अधर वाळले बोभातां । रक्तवर्ण जाले डोळे ॥**
**आपणयातें न संभाळीत । पांबेसीं कपाळ आदळीत ।**
**जीव्हा आसुडील म्हणोनी । रुक्मिणी धरिले हात ॥**

बोभातां=आक्रोश करितां करितां. पांबेसीं=खांबांवर 'सोडा सोडा वो माते'। म्हणत मला प्राणत्याग करूं द्या असें तिनें एकसारखें आक्रोश करणें चालविले. मुलाचे बालगुण आठवूं लागली. 'पेळतु देपे वो पाळणा । पाठीं जालावो रांगणा । अवघिये मंदिरीं न माये '—खटका । पुढें पुष्टें गहाळ !!

यापुढील भाग सारा युद्धवर्णनांनीं भरून निघाला आहे. त्यांत कथेची गोडी तितकीशी राहिली नाहीं.

( ८ ) चोंभा कवीच्या वीररसाचा थोडा आस्वाद घेऊन त्याची रजा घेऊं. नारदांनीं द्वारकेंत जाऊन अनिरुद्धाची वार्ता सांगितल्यावर यादववीर खवळले व त्यांनीं बाणासुरावर चढून जाण्याचें ठरविलें. 'पलाणारे पलाणा । म्हणौनी नीसाणा घावो दीधला '—घोडयावर खोगीर घालून सज्ज व्हा असा गांवभर नगारा पिटला.

**देवें अस्फुरिला संखु । गर्जीन्नला ब्रह्मलोकु ।**
**सप्ते पातळें दणदणीली । भेण पुटीं बसला सेषु ॥**
**अंबर गर्जत निसाणी । जाली पलाणा वलाणी ।**
**वीर धांवती सैरावैरा । थरारीत आहे मेदिनी ॥**

१ पुटीं बैसला=भयानें शेष वेटाळें घालून बसला. 'रथ पातले घडघडीत.' छपन्न कोटी यादव रणांगणावर निघाले तेव्हां 'प्रळयकाळींचे जळंधर । जैसे बोळले अंबरीं' असे भासले. सेना चालली

तेव्हां ' सुटला प्रतापाचा वारा । तेणें उधळताये धुळौरा. ' कल्पांत मेघासारखें यादवसैन्य दिसलें.

**ना ते यादवांचे वीर । रण समुद्रींचे जुंझार ।**
**रथ तारुवांसारीषे । प्रति भासले अवधारा ॥**

सारीषे=सारिखे. हें समुद्राचें रूपक पुढें ७८ ओव्यांत चांगलें विस्तारलें आहे. वीररसानें कवीची वाणीही मोठी प्रस्फुरित झाली आहे. मध्येंच गरुडानें आपल्या स्वामीचें थोडेसे पराक्रम वर्णिले आहेत. पंढरीच्या वर्णनाची पुढील ओवी पहा:—

**पुंडलीकाचा घरीं । उभे असे पांढरपुरी ।**
**जाली दक्षिणद्वारावती । देषा जुगानजुगवरी ॥**

मध्येंच श्रीवत्सलांछन कृष्णाचें बिरुद्र सांगतांना ' मज पाहतां तीहीं लोकीं । ब्राह्मणु पवित्र समर्थु ' । असा ब्राह्मणगौरवाचाही उद्गार काढला आहे.

( ९ ) ' पाहातीये पाहारीं ' म्ह० अगदीं प्रभातकाळीं शोणितपुरावर यादवांची धाड पडली व ' सुधी ( शुद्धी ) नेणती असुर । भवंती वेढिली नगरी ! ' इतक्यात गरुडानें अनिरुद्धाची मुक्तता केली व तो धांवतच उषेच्या महालांत आला. प्रेमसंमीलन झालें. उषा आनंदानें उचंबळली व पदरानें तिचे अश्रुपात पुसून व श्रीकृष्ण यादव सेनेसह आल्याचें गोडवृत्त तिला कथन करून तो यादवसेनेंत आला तेव्हां ' येरयेरां क्षेम जालें । तेणें आनंदें गगन भरलें. ' ( पुढें १५ पृष्ठें गहाळ ! )

( १० ) बाणासुराचें ऐश्वर्य, शंकराची प्रसन्नता ( पुढें २० पृष्ठें गहाळ ! ) शंकराचे पुत्र वीरभद्र व कार्तिकेय यांशीं प्रद्युम्नाचें युद्ध व त्यांचीं अटीतटीचीं भाषणें यांत मोठीसी गोडी वाटत नाहीं. शेवटीं शंकर व कृष्ण यांचा सामना होऊन समेट झाला व वधूवरांना वस्त्रालंकार देऊन बाणानें श्रीकृष्णास प्रेमाचा निरोप दिला. हें आनंदपर्यवसायी

नाटक झालें. ह्या कथेवर कोणी प्रतिभासंपन्नकवीनें नाटक केल्यास तें फार बहारीचें होईल. मोहनीरूपाचें व गायनाचें सुंदर वर्णन देऊन चोंभा कवीची अत्यादरपूर्वक रजा घेतोंः—

**गीताचेन नादें । चरों वीसरलीं स्वापदें ।**
**हरणीं वोढवीले कर्ण । तींयें राहिली नादबोधें ॥**
**नादें व्यापिलें अंबर । पंक्षुजाती नेघती चारा ।**
**वीसरौनु एक जाले । पंचानन आणि कुंजर ॥**
**ठेलिया समुद्राचिया लता । वाहों विसरलिया सरिता ।**
**गगनीं वारा मंदु जाला । सैरा धडधडीतु होता ॥**
**प्रगटलें मोहनास्त्र । आकर्षले यादववीर ।**
**चैतन्यें आकर्षिलीं । पांचै इंद्रियें येक जालीं ॥**

---

## ४ अज्ञानकवीचा वरदनागेश ग्रंथ.

हा विवेकसिंधूच्या धर्तीचा वेदांतपर ग्रंथ शके १३०० ते १३५० ह्या काळांतीलच आहे. वरद नागेश ह्या ग्रंथाचे ११ अध्याय असून ओवी संख्या १८५० आहे. ह्याशिवाय प्रस्तुत कवीचीं कालज्ञान ५००, गुरुशिष्यसंवाद ५१७, पंचीकरणप्रमेय, इ० स्फुट प्रकरणें असून त्याचे कांहीं अभंगही आहेत. हे सारे ग्रंथ शके १५०० म्हणजे एकनाथकालीं नकललेले आज उपलब्ध आहेत, रचनाकालीं लिहिलेले उपलब्ध नाहींत. अज्ञानकवि हा नागनाथ उर्फ नागेश नामक साधुपुरुषाचा शिष्य होता. यापलीकडे कवीचीं कांहीं एक माहिती नाहीं. कवीनें आपल्या व गुरूच्या नावांचा उल्लेख बहुत ठिकाणीं केला आहेः--

**ऐसें श्रीगुरुनागनाथें । प्रबोधूनी अज्ञान शिष्यातें ॥ ३-१८५ ॥**
**तूं उदारु नागनाथा । फेडी अज्ञानाची वेथा ॥ ५-१११ ॥**
**सद्गुरु नागनाथें । उपदेसिलें अज्ञान सिष्यातें ॥ ५-२१७ ॥**
**नागनाथें निरासिलें । अज्ञान-मातितें ॥ १०-६२ ॥**

यावरून कवीचें नांव अथवा त्यानें स्वीकारलेलें नांव 'अज्ञान' व त्याच्या गुरूचें नांव 'नागनाथ' उर्फ नागेश होतें हें उघड होतें. आतां वडवाळ नागनाथ व सिद्धनागनाथ असे दोन वेगवेगळे पुरुष होते कां एकाच पुरुषाचीं हीं दोन नावें आहेत, याचाही उलगडा त्याच्याच ग्रंथानें केला आहेः--

**जाणे हें ब्रह्मांड। नागेशु अखंड। वडवाळ वितंड। हें विश्वरूप॥४·६९॥**
**सांठवी नागेशु। वडवानळ भासु। जठरीं तो हुतासु।**
**धरियेला जेणें॥ ४-९३॥**
**अकळु ते सकळा। विश्वरूप वडवाळ। सिधलिंग निर्मळ।**
**गुरु नागनाथु॥ ४-१२७॥**

यावरून नागनाथ, नागेश, वडवाळ नागेश, सिद्धलिंग, सिद्धराज हीं नावें एकाच पुरुषाचीं असून तो अज्ञानकवीचा गुरु होता हें स्पष्ट आहे. ज्ञानेश्वराप्रमाणें नागनाथही नाथसंप्रदायी दिसतात. अज्ञान आपल्या योगास 'सिवयोग' म्हणतात व मी 'सिवतत्त्वें उजळलों' असें सागतात. त्यानें आपल्या ग्रंथाला 'वरदनागेश' असें नांव दिलें आहे. नागेश हा वाळेघाटाकडील राहणारा एक सिद्ध पुरुष होता. गेल्या शतकांतील अक्कलकोटच्या स्वामींप्रमाणें त्याची राहणी निःसंग निर्विकार मुक्तपणाची होती. वस्तुवस्तुंत परमात्मा भरला आहे हें तत्व त्याच्या मनीं इतकें पुरें बाणलें होतें कीं, शुद्धाशुद्धादि सकल भेदभाव त्याचे ठिकाणचे लयाला गेले होते व तो मोरींतलें पाणी 'जय गंगामाय' म्हणून पीत असे! 'मंगलं भगवान् विष्णुः' असा मंगलायतन हरि अणुरेणुंत भरला आहे यावांचून तो कांहींच जाणत नसे! त्याची ती अलौकिक ब्रह्मस्थिति पाहून अज्ञान कवि व बहिरापिसा हे त्याचे चरणीं लागले यांत नवल नाहीं. अज्ञान कवीच्या वाणीचा प्रसाद घेऊन आपण बहिऱ्यापिशाकडे वळूं.

प्रस्तुत ग्रंथांत स्वरूपसाक्षात्कार, पंचीकृत उत्पत्ति म्ह० पंचीकरण, त्वंपदतत्पदमिश्रित पिंडब्रह्मांडऐक्यता, स्थूलादि चारदेहांच्या उपाधींचें

निरसन, महावाक्यविवरण म्ह० जीवशिवांची ऐक्यता हे मुख्य विषय असून सद्गुरु, शिष्य, आत्मानुभव, ब्रह्म, माया, अहंकार, पंचदशतत्वें, सद्गुरुमहती, सहजस्थिति, मुक्तिभेद, चार भूमिका, मानसपूजा, अजपा-जप, तत्वमसि, संप्रज्ञातसमाधि इ० वेदांतांतर्गत सर्व विषयांचें स्पष्टी-करण कर्वानें सोप्या भाषेंत केलेलें आहे. बाराव्या शतकांतील विवेकसिंधु व सोळाव्या शतकांतील दासबोध यांच्या मधला चौदाव्या शतकांतला हा एक दुवा आहे! विवेकसिंधुप्रमाणें याही ग्रंथाची छाप दासबोधावर पडलेली दिसते. पाहिलें व तिसरें प्रकरण पाहिलें असतां हें ध्यानांत येणार आहे.

ह्या ग्रंथाची थोडीशी ओळख पुढील उताऱ्यांवरून होईलः--

**१ सद्गुरुः—जयजय सद्गुरु जयेवंता। विजये विजये विजयवंता।**
**सहज सहज सहज आत्मता। निज निवता नित्यारूपा॥१-१७**
**अज्ञान अविद्येचा पाखाळा। ज्ञानअहंतेचा उखाळा।**
**देउनी स्तंभन करिसी निश्चळा। विज्ञानस्वरूपीं॥ २-३०॥**
**२ ब्रह्मः- पवना पुढेंमागें मध्यगत। असोनि अंचचळ चंचळातीत।**
**तें परब्रह्म नित्य। सर्वगत समत्वें॥ ३-२१॥**
**जे गगनाचा पाठीं पोटीं। सून्येत्वाची करूनी आटाटी।**
**स्वानंदभरित सृष्टी। निजस्वरूप॥ २२॥**
**जे सर्वत्र विवर्तता। सर्वांगा आतळोनि नातळता।**
**अंगा अंगत्वें निःसंगता। निजात्मता निजांगें॥ २३॥**
**ते सद्गुरुकृपा पाविजे। जाणिवेविणे जाणिजे।**
**जाणिवे नेणिवेते जाणिजे। तें परब्रह्म॥ २९॥**
**३ मायाः-जैसें गगनाचा पोटीं। अभ्र असंख्यात उठी।**
**क्षणां पाहतां दृष्टी। कांहींचि नाहीं॥ ३-४८॥**
**ब्रह्म निराकार तैसें। माया तेथें अभ्र भासे।**
**इछेविण परियेसें। उद्भवती जाहली॥ ३-५०॥**
**४ मायास्वरूपः-येक उभा गंगातिरीं। तो दिसे उदकाभीतरीं।**
**परी हा अपुला शरीरीं। अलिप्त असे॥ ३-१२९॥**

ते आहे ह्मणों तरी हातां नये । नाहीं ह्मणों तरी दिसताहे ।
ऐसे मायामये । असे ना नसे ॥ ३-१३० ॥
कां पाहतां मुख दर्पणीं । दुसरें दिसतें नयेनीं ।
तें अरूप रूप ज्ञानी । पाही कैसें ॥ ३-१३१ ॥
तें असे ह्मणों तरी नसे । नसे ह्मणों तरी असे ।
तैसें अरूपरूप पिसें । जाण मायेचें ॥ ३-१३२ ॥

---

## ५ बहिरा जातवेद उर्फ बहिरापिसा. ( श. १३५० )

बहिरंभट उर्फ भैरव नांवाचा एक कौडिण्यगोत्री ब्राह्मण पैठणक्षेत्रीं राहत होता. तो अत्यंत विद्वान् होता. तो षट्शास्त्रीं निपुण व वेदांतज्ञानीं प्रवीण होता. मोठमोठे पंडित आपणांस त्याचे विद्यार्थी म्हणवीत. त्यानें घरीं अग्निहोत्र ठेवलें होतें, अर्थात् तो अयाचित वृत्तीनें राहत असे. एकदा तो भोजनास बसला असतां सहज बायकोस म्हणाला, ‘ आज भाजी काय आळणी केली आहेस ! भाजींत मीठ कां नाहीं ? ’ बायकोनें तत्काळ उत्तर केलें. ‘ एवढें वय झालें ! वेदांती ज्ञानी म्हणवितां ! आणि खाण्यांत किती लक्ष हें ! ज्याला जीभ आवरतां आली नाहीं तो मन काय आवरणार आणि ज्यानें मनाला लगाम घातला नाहीं त्याला आत्मज्ञान कसचें होणार ? ’ बायको हें सहज बोलून गेली पण त्याचा बहिरंभटाच्या मनावर एकदम परिणाम झाला ! तो वैराग्य संगतीला घेऊन घराबाहेर पडला. शास्त्रज्ञ पहिला होताच. ठिणगी लागली. आत्मज्ञानाशिवाय सारें व्यर्थ आहे व तें देणारा कोण भेटेल या विचारांत तो मग्न झाला ! तुळसीदासांसारखी—बायकोच त्याला गुरुरूप जाहली. वर्णजातिसंबंध सारा तुटेल, लोक निंदा करून छळ करितील, असें कांहीं अचाट करावें म्हणजे देहबुध्दि पार नष्ट होईल असा विचित्र विचार करून तो मशीदींत गेला व काजीची गांठ घेऊन मुसलमानधर्माची त्यानें दीक्षा घेतली ! त्यावर सारा ब्राह्मणसमाज अर्थातच खवळला व त्यानें त्याज-

वर बहिष्कार घातला. त्याला मुसलमान धर्मांत कांहीं विशेष दिसलें असें नाहीं. ‘ ईश्वरप्राप्तीस्तव जाण। मी स्वेच्छेनें जालों यवन। परी येथेंही आत्मप्राप्तीचें चिन्ह। न ये दिसोन सर्वथा. ’ बहिरंभटाची लोक निंदा करीत पण तो चित्तांत निर्भय व सावध होता. जन त्रिविध आहे. कोणी कांहीं कोणी कांहीं बोलत. त्याच्या मनांत एकदा मौज करायची आली. यानें ब्राह्मणसमुदायास भेटून आपणास पश्चाताप झाल्याचें सविनय सांगितलें. ‘ ब्राह्मणांनींही यासी विधियुक्त प्रायश्चित्त देऊनी। आपणांत आणावा ’ असा पोक्त विचार मनांत आणला! पैठणकर पंडितांनीं विचार केला कीं ‘ गांवोगांवचे भ्रष्ट लोक शुद्ध होण्यासाठीं आमचेकडे येतात मग आम्ही आमच्याच गांवच्या सत्पात्र ब्राह्मणाला पावन करून घेतले तर आम्हांला कोण विचारणार!’ ब्राह्मणांनीं त्या पतिताला पावन करून घेतले! सारें अविंध गोळा झाले व ‘ तुम्ही यवनाचा ब्राह्मण कैसा केला। सांगा चला राजद्वारीं! ’ हें पहातांच बहिरंभट त्यांस म्हणाला कीं ‘ तुम्ही मला यवन म्हणतां पण माझ्या कानाची भोकें बुजलीं नसल्यामुळें मी यवन कसा होईन! ’ यवन निघून गेल्यावर हा ब्राह्मणांस म्हणाला कीं, ‘ माझी सुंता झाली असल्यामुळें तुम्ही मला ब्राह्मण तर काय पण हिंदु तरी कसा म्हणतां! शेंडी वाढविलीत पण चर्म कांहीं वाढत नाहीं! ’ हिंदूंनीं व मुसलमानांनीं दोघांनींही त्याचा त्याग केला व त्याला लोक ‘ बहिरा पिसा ’ असे म्हणूं लागले. मी कोण? ‘ मी हिंदु कां मुसलमान ’ असें तो जो भेटेल त्यास विचारूं लागला! कांहीं काळानें वडवाळचे नागनाथ सिद्ध यांची त्यानें भेट घेतली. त्या सिद्धपुरुषानें कांहीं चमत्कार करून त्याचे डोळ्यांत अंजन घातलें; ‘ हिंदु व मुसलमान हे देहधर्मानें मानले जातात. तूं स्वतःसिद्ध आत्माराम आहेस ’—त्यांनीं कृपादृष्टीनें त्याचा संसारभ्रम उडवला. सद्गुरुकृपेनें बहिरा पिसा उद्धरला. तो आत्मज्ञानी होऊन हरिभजनीं लागला. बहिरापिसा निजात्मस्वरूप पावून पंढरीस गेला व विठ्ठलस्वरूप प्रेमभरानें पाहून कृतकृत्य झाला. त्यानें:—

**श्रीभागवतदशमस्कंद देखा । त्यावरी केली महाराष्ट्र टीका ।**
**त्या सप्रेम ओव्या अमोलिका । ऐकतां भाविका निजसुख ॥९६॥**
**आणिक पदपदांतरें शेवटीं । काव्य रचिलें बहिरंभटीं ।**
**दुरितें पळती उठाउठी । कर्णसंपुटीं ऐकतां ॥ ९७ ॥**

बहिरापिसा याचे चरित्रांत अद्भुतपण आहे. एका टोंकाला गेलेला तऱ्हेवाईक मनुष्य दुसऱ्या टोंकाला जाऊन प्रचंड ग्रंथही निर्माण करण्यास समर्थ होतो, देहादि प्रपंचाचीं बंधनें व वर्णाश्रमधर्माचार सोडून स्वच्छंदानें वागणारा मनुष्य शेवटीं हिंदुसमाजांत पूज्य व भगवद्भक्त गणला जातो—यांत अम्दुतपण आहे. वस्तुतः कोणीही प्राणी तिरस्करणीय नाहीं. भाग्याची वेळ यावी लागते. सत्संग भेटावा लागतो. बाटून परधर्मांत गेलेला मनुष्य शास्त्रमार्गानें स्वधर्मांत परत घेतां येतो हें त्या काळचें उदाहरण चिंतनीय आहे.

शके १८०२ सालीं गोडबोले यांनीं आपल्या ' भरतखंडाचा अर्वाचीन कोश ' ह्या ग्रंथांत ' बहिरापिसा ' ह्या सदराखालीं जी माहिती दिली आहे तींत म्हटलें आहे कीं " ह्या कवीच्या दशमावरील टीकेचें पूर्वार्ध आमच्या पाहण्यांत आलें व तें सुमारें पंचेचाळीस हजार आहे. यावरून समग्र टीका पाऊण लक्ष असेल असें आमचें अनुमान आहे. याचें ' संकटहरणी शिवग्रंथ ' नांवाचें १४१ ओव्यांचे एक छोटेंसें प्रकरण आहे त्यात रचनाकाल शक १३१३ मार्गशीर्ष वद्य २ गुरुवार असा दिला आहे. बहिरंभट विद्यारण्याच्या पूर्वीचा असावा, असें आम्हांस वाटतें; कारण, म्लेंच्छांनीं बाटविलेल्या ब्राह्मणानें प्रायश्चित्त केल्याचें उदाहरण पंचदशीमध्यें तृप्तिदीपांत श्लोक २३९ यांत आहे तें याच्याशिवाय इतिहासांत दुसरें आढळत नाहीं. " बहिरापिसा यानें दशमावर पाऊण लाख ओवी लिहिली असी प्रसिद्धि आहे, पण प्रो० पोतदार यांना या ग्रंथाचे ६० अध्याय मिळाले आहेत पण त्यांतील ओव्यांची संख्या १६२८४ भरत असून सारा ग्रंथ ३६००० ओव्यांचा असावा असें त्यांचें मत आहे.

बहिरंभट, बहिरापिसा, बहिरा जातवेद हीं नांवें एकाच व्यक्तीचीं असून त्या व्यक्तीनें सुमारे ५०० वर्षापूर्वी कृष्णचरित्रावर मराठी प्रचंड ओवीबद्ध ग्रंथ लिहिला हें निर्विवाद आहे.

संतमालिकांतून याचें नांव आढळतें. नाथांनीं संतमालिकेंत 'बहिरा पिसा' व 'वडवाळ सिद्ध नागनाथ' ह्या दोघांनाही गोंवलें आहे. बहिरा पिसा याची दशमावरील टीका नाथांच्याही फार पूर्वीपासून अत्यंत लोकप्रिय होती. या टीकेनें लोकांस कृष्णभक्तीची गोडी लागली. नाथांच्या नंतरच्या काळांत शिवकल्याण, जयरामस्वामी, कृष्ण दयार्णव, मोरोपंत इ० कवींनीं दशमावर म्ह० कृष्णचरित्रावर मोठमोठे ग्रंथ लिहिले आहेत, पण बहिरा पिसा यांचा हा ग्रंथ पहिला आहे व महिपतीनें म्हटल्याप्रमाणें त्याच्या 'सप्रेम ओव्या अमोलिका। ऐकतां भाविकां निजसुख' देणाऱ्या आहेत. बहिरापिसा यास 'जातवेद' म्हणतात. 'जातवेद' हें काय आडनांव आहे कां जातवेद म्ह० अग्नि—अग्नितुल्य अर्थात् तापट स्वभावाचा असा त्याचा अर्थ आहे कां जातवेद म्ह० वेदाध्ययन केलेला, वेदज्ञ असा अर्थ आहे—कोण जाणे! तीनही अर्थ येथें संभवतात! याच्या कुलस्वामिनीचें नांव म्हाळसा—महालसा. म्हाळसा म्ह० खंडोबाची स्त्री नव्हे तर म्हाळसा म्ह० नेवासे येथील मोहनीराज! नेवासे येथें ज्या मोहनीराजासमोर ज्ञानेश्वरीग्रंथ लिहिला गेला तो देव, मोहिनीरूपानें प्रगट झालेलें श्रीविष्णुस्वरूप. समुद्रमंथनाच्या वेळीं समुद्रांतून निघालेल्या अमृताबद्दल देवादैत्यांत रण जुंपलें तेव्हां महाविष्णूनें मोहिनीचें रूप घेतलें तो हा अवतार. बहिरा जातवेद म्हणतातः—

**ते समस्त कुळदेवता। देवा दानवा नमितां।**
**जिचिये यकध्वर सत्ता। तीहीं लोकीं॥ २९॥**
**त्या योग्य अयोग्य जाणितलें। देवदैत्य समजाविलें।**
**ज्या आमृत विभागीलें। म्हाळसा देवि॥ ३०॥**

**वाचा कमळनीचां कमळीं । येहिं पांचै पुष्पांजुळीं ।**
**कुळदेवता सावळी । नमस्कारिली ॥ ३१ ॥ ( अ. १ )**

'पीसा बहिरा जातवेद' असें कवीनें आपल्या संतनामावळींत लिहिलें आहे.

असो. बहिरा जातवेद ह्याच्या ह्या ग्रंथाचे मूळ भागवतदशमानुसार ९० अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायाचे शेवटीं कवि आपलें नांव 'जातवेद बहिरा' 'बहिरा जातवेद' अगर नुसता 'बहिरा' असें देतो. बहिरव –भैरव असें कवीचें नांव असून ह्या दशमटीका ग्रंथाला 'भैरवी' ह्म० वहिरवी असें नांव कवीनेंच दिलें आहे.

**या एकुणा हातरि श्लोका । मऱ्हाटि भैरवी टिका ।**
**जातवेदु बहिरा म्हणे आइका । नित्यु श्रृतें ॥ १-४५४ ॥**
**'इति श्रीभागवते महापुराणे दशमस्कंदे भैरवीटीका प्रथमोध्यायः'॥**

मूळ दशमाच्या पहिल्या अध्यायाचे श्लोक 'एकूण हातर' ह्म० ६९ आहेत.

कवि ग्रंथांत जागोजाग आपल्या गुरूचें नांव चिंतामणि देतो व वर तर वडवाळसिद्ध नागेशाचें आपण गौरव केलें आहे हें कसें? 'जें जें मनें चिंतावें । तें तें श्रीगुरु चिंतामणीनें द्यावें' 'मी श्रीगुरु चिंतामणीचा । पदार्थु येकु.'

**श्रीगुरुचिंतामणिप्रसादें । बहिरेंनि जातवेदें ।**
**जें चरित्र केलें गोविंदें । तें गाइलें वाचा ॥ अ० ३३ ओवी ३०६ ॥**

उलटपक्षीं महिपति म्हणतो कीं 'ऐसें असतां बहुतां दिवसीं । हिंडत आला वडवाळेसी । तंव नागनाथसिद्ध त्या पासीं । सद्गुरु मठासी राहिला ॥ नागनाथाची कृपा होतांचि जाण । बहिऱ्या पिशास जालें ज्ञान' महिपतीनें भैरवी टीका व पदपदांतरें पाहिलेलीं तेव्हां महिपतीचें म्हणणें चुकीचें कसें म्हणतां येईल? बरें कवि स्वतः गुरूचें नांव देतो तें तरी अविश्वसनीय कसें मानावें! किंबहुना तेंच पूर्ण विश्वसनीय मानलें

पाहिजे. बहिऱ्या पिशाचा समग्र ग्रंथ पाहिल्यावांचून निर्णय देतां येणार नाहीं. कदाचित् चिंतामणि हें नागनाथाचें पूर्वाश्रमीचें नांव असेल, कदाचित् चिंतामणि हें ज्या गुरुपाशीं कवि संपूर्ण लौकिक विद्या शिकले त्या विद्यागुरूचें नांव असेल व नागनाथ हे त्याचे मोक्षगुरु असतील ! चिंतामणी व मुद्गलगोत्री पद्मनाभ पंडित ह्यांच्या कृष्णप्रेमाच्या गोड गोष्टी अहोरात्र चालत असत व त्या उभयतांची संगति मला घडली असें कवीनें म्हटलें आहे.

बहिरापिसा याची कांहीं स्फुट कविता जुन्या बाडांतून कोठें कोठें सांपडते. त्याचें एक 'स्मरणीसारखें' किंवा 'संतमालिकेसारखें' सात-चरणी मोठें पद्य आढळलें आहे त्यांत 'सनकसनंदन सनत्कुमार सनातन हे ब्रह्मकुमार चौघेजण' येथपासून तों 'सुदामा पिंगळ व्याधमूर्ती तूळाधार' येथपर्यंत प्राचीन ५०।६० संतांची नामावळी दिली आहे. त्याचे शेवटचे दोन चरण असे आहेतः—

**येहीं अनंत हरिदासीं तारिलें जगासी जे पूर्ण हरीसी शरणागत ।**
**चिंतामणिप्रसादें कौंडिण्यगोत्री वदे पिशा बहिऱ्याने जातवेदें**
**स्मरण केलें हें ॥ ७ ॥**

याचा एक अभंग पाहाः—

**शेळी साप देखे, चरेना-राहती । टेक लागलें चित्तीं । तैसें जालें ॥१॥**
**नवल वीतलें माझें म्यां देखिलें । बोलणें खुंटलें । बाइयानो ॥ २ ॥**
**सोहंबोध कैसा अंतरीं बोधला । निवांत राहिला बहिरापिसा ॥ ३ ॥**

संतोबा तेली यांच्या हातच्या देहूच्या वहींत हाच अभंग पुढीलप्रमाणें लिहिला आहेः—

**सेत्ळी साप देखे चरेना राहंती : ठक लागलें चीती : तैसें जाळे : ॥१॥**
**नवल वीतळें : माझें म्यां देखिळें : बोळणें खुंटळें : बाईयानो : ॥ ६ ॥**
**सोहंबोध कैसा अंतरीं बोत्ळला : नीवांत राहिळा : बहीरो पींसा ॥२॥**

ह्याच्या ग्रंथांतील एक उतारा भावे यांनीं 'महाराष्ट्र सारस्वतांत' दिला आहे. श्रीकृष्णजन्म होऊन यशोदा पुत्रवती झाली तेव्हां अनेक लेंकुर-

वाळया स्त्रिया ' पुत्रादाण ' करण्याकरितां बाळंतविडा घेऊन तेथें गेल्या त्या प्रसंगाचा पुढील गोड उतारा आहेः—

आतां गोपिकांची लाहा कीं। श्रृंगारू करिती येकीमेकी।
चाला चाला गे नवल कीं। येशोदेसि पुत्र॥
लौकरी चाल गे साजणी। पुत्रेसी वोवाळूं बाळंतिणी।
शीघ्र ल्या गे लेणीं। तांतडीसारिखीं॥
नेसलिया रुचीर्चीं वस्त्रें। वाणें परोचीं विचित्रें।
अळंकारादि कर्णपत्रें। मोतिलगें॥
नेत्रीं सूदलें अंजन। पाहावया यश्वदेचें निधान।
कैसें तांबोळें वदन। सुरंग दिसे॥
नवकुंकुम पिंजरी। तया चिरकुली सुंदरी।
केशरचंदनेसी अंबरीं। मळिवट शोभे॥
थोर असे कटितट। चंचल कुच घणवट।
आवेव दिसती प्रगट। बुंधि जऱ्ही॥
घेवोनि कनकताटें करीं। बाळांतणि विडा आंतरीं।
पुष्पें फळें हरिद्री। आणि वस्त्रें॥
या कृष्णासी बाळलेणें। बिंदुलीं जिवती चरणभूषणें।
सरी आंकुडे सुवर्णें। रत्नमंडित॥
आणि वस्त्रें नंदासी। वरि कृष्णाच्या अळंकारांसी।
ऐश्या आल्या मंदिरासी। बाळांतिणीच्या॥
पाटावरी बाळांतिणी। त्या बैसविती कामिणी।
मग करिती आक्षवाणी। कृष्णेंसहित॥
गोपिका कृष्ण वोवाळिती। वोवाळितां ऐसें मागती।
' चिरकाल आमुते श्रीपती। पाळिता होये '॥
मग अळंकार अर्पिले। पूर्णासीं अंगुळें लेवविलें।
जसवंतिनंदा बैसविले। पाटावरी॥
मग वस्त्रें अर्पिती। मंगळतुरें वाजती।
त्यासह पुत्रा पडती। वोवाळणि॥
हळदिस्नेहें मिश्रित। उदकयागें सिंचन करित।

**तो सर्वद्रष्टा पाहात। टकमकित ॥**

ह्या रसाळ ग्रंथांतले आणखी उतारे देतां येते तर बरें झाले असते. पदपदांतरेंसहित याची कविता आणखी बरीच आहे.

---

## ६ पाठक मंडळी.

ज्ञानेश्वरकालीन प्रख्यात कान्हू पाठक यांच्या वंशजांत कान्हू व नामा हीं नांवें वारंवार आलेलीं आहेत, त्यामुळें कान्हू पाठक व नामा पाठक यांच्या कालगणनेंत घोटाळा होण्याचा संभव आहे. पहिले कान्हो पाठक हे नामदेवांच्या पश्चात् शके १२७५ च्या सुमारास आटोपले. त्यांचा नातु कान्हो पाठक हाही नागेशाचाच शिष्य होता. 'गुरूपदेश नागनाथू। कान्हो पाठक विनवितु' 'हृदयीं धरी नागेश। म्हणे कान्हो पाठक' ह्या त्याच्या उद्गारांवरून तोही अज्ञान व बहिरापिसा याच्याप्रमाणें नागनाथाचाच शिष्य होता असे ठरतें. नागनाथ उर्फ नागेश हा त्या काळांतला महासिद्ध पुरुष होता व त्याचा व त्याच्या शिष्यांचा काल शके १२८० ते १३५० हा असला पाहिजे. ह्या कान्हो पाठकाचा एक मुलगा नामा पाठक होता व त्याचा पुत्र निर्मळ पाठक यानें ओवीबद्ध पंचतंत्र रचिलें. निर्मळ पाठक म्हणतो 'पूर्वी प्रति होती मोकळी। ते वोवीबंधें संकळली। महासाक्षेपें निपजविली। म्हणे निर्मळ पाठकु' यावरून गद्य पंचतंत्राची मराठी प्रत पाहून तीवरून यानें ओवीबद्ध पंचतंत्र लिहिलें, असें दिसतें. गद्य पंचतंत्र शके १३०० च्या सुमारचें असावें व त्याच्या आधारानें ६०।७० वर्षांनीं निर्मळ पाठकानें आपलें ओवीबद्ध पंचतंत्र रचिलें असावें. ह्याच घराण्यांत पण नाथांच्या पूर्वी नामा पाठक म्हणून एक कवि होऊन गेला असून त्याचें नांव नाथांच्या संतमालिकेंत आलें आहे. यानें एक ओवीबद्ध 'अश्वमेध' नामक मोठा ९५ प्रसंगांचा ग्रंथ रचिला आहे. हा ग्रंथ शके १४०० ते १४५० ह्या

काळांतला असावा. यानें नामरत्नमाला, भरतभेट इ० स्फुटप्रकरणेंही लिहिलीं आहेत. पाठक हें देशस्थ यजुर्वेदी घराणें ज्ञानेश्वरांच्या काळापासून तों नाथांच्या काळापर्यंतच्या २।३ शतकांत महाराष्ट्रांत विशेष गाजलेलें असून त्यानें मराठी वाङ्मयाची सेवा त्या काळीं चांगल्या प्रकारें केली असें दिसतें. अधिक शोध झाला पाहिजे.

नाथांच्या वेळेपासून कवींनीं लिहिलेल्या २०।२५ संतमालिका प्रसिद्ध झाल्या आहेत त्या बारकाईनें पाहत । ।ंत त्या त्या काळापर्यंतच्या संतांचीं नांवें गुंफलीं गेलेलीं आढळतात. ह्या संतमालिकांना एक प्रकारचें ऐतिहासिक महत्त्व आहे. नाथांच्या संतमालिकेंत ' वडवाळ सिद्ध नागनाथ ' 'बहिरा पिसा' ' नामा पाठक ' यांना नाथांनीं स्थान दिलें आहे. उद्धवचिद्घनांच्या (शके १६००) संतमालिकेंत 'वडवाळ सिद्ध नागेशमूर्ति' ' बहिरा पिसा, ' ' भक्तराज पाठक कान्हया ' ' नामा पाठकी ' यांचीं नांवें आहेत. इतर संतमालिकांतही ' अज्ञान, सिद्ध नागेश ' ' वडवाळ सिद्ध नागेश ' ' नामा महादेव कान्हा पाठक ' 'चोंभा' 'साळ्या रसाळ ' ' वडवाळ सिद्ध नागनाथ ' ' पिसा बहिरा ' ' अज्ञान, ' सिद्धनाथ प्रसिद्ध ' ह्याप्रमाणें पूर्वींच्या संतांचीं नांवें आलेलीं आहेत.

---

## ७. पंचोपाख्यान उर्फ पंचतंत्र ( गद्यग्रंथ )

संस्कृत भाषेंत महाभारती कथांशिवाय कथासरित्सागरादि कांहीं कथापर ग्रंथ आहेत. मनुष्यप्राणी व पशुपक्षी यांच्या मिश्रकथा कांहीं बौद्धांच्या जातक ग्रंथांतून प्रसिद्ध आहेत, पण सामान्यतः ' पंचतंत्र ' व ' हितोपदेश ' हे ग्रंथ आपल्या समाजांत पहिल्यापासून अधिक लोकप्रिय आहेत. त्यांत ' पंचतंत्र ' अधिक प्राचीन आहे. हितोपदेश हा १० व्या शतकांतला ग्रंथ समजतात. पंचतंत्राचीं भाषांतरेंच मुळीं सिरिअन, अरबी, फारशी, पेहलवी वगैरे भाषांतून ५ व्या ६ व्या शतकांत झालीं

आहेत ! नौशिर्वान नांवाच्या इराणी पातशहानें ख्रि. श. ५३० ते ५८० च्या दरम्यान पंचतंत्राचें मूळ संस्कृतावरून भाषांतर करविलें किंवा केलें ! कालिदासाच्या कुमारसंभवांतील एक व भर्तृहरीच्या नीतिशतकांतील एक असे दोन श्लोक पंचतंत्रांत आढळतात, यावरून वरील दोन ग्रंथांनंतर व २।३ च्या शतकांत पंचतंत्र रचलें गेलें असलें पाहिजे. माणसांच्या व पशुपक्ष्यांच्या गोष्टींतून व्यवहारचातुर्य शिकवण्याच्या हेतूनें पंचतंत्रांतील कथा रचलेल्या आहेत. राज्यशास्त्राचीं व नीतीचीं तत्त्वें या कथांतून गोंविलीं असून मनोरंजनाबरोबर बोध व्हावा हा त्यांचा मूळ हेतु आहे. वेदांताचीं गहन व प्रौढ तत्त्वें एकीकडे व शृंगारादि रसांचे उद्रेक दुसरीकडे अशा दोन टोंकाच्या मध्यें सामान्य व्यवहाराचा उद्बोध करणारें हें पंचतंत्र सर्वजनप्रिय व्हावें यांत नवल नाहीं. 'कालील आणि दिम्न' या नांवाचें याचें भाषांतर ८ व्या शतकांत अरबींत झालें व पुढें शें दोनशें वर्षांनीं ग्रीक, इटालिअन, लॅटिन्, स्लाव्ह, जर्मन, हिब्रू इ० भाषांतून त्याचींच भाषांतरें झालीं, म्हणजे हजार वर्षांपूर्वींच युरोपिअन ख्रिस्ती राष्ट्रांस पंचतंत्राची ओळख झाली होती ! जर्मन भाषांतरांवरून, डॅनिश, डच, आइस्लेंडिक, इंग्लिश वगैरे भाषांतून पंचतंत्राचा प्रसार झाला.

अशा ह्या पंचतंत्राकडे मराठी वाचकांचें १३ व्या शतकांतच लक्ष वेधलें असल्यास नवल नाहीं. आतां हें प्रस्तुत भाषांतर सबंध ग्रंथाचें नाहीं. त्यांतील कांहीं कांहीं कथा मात्र ग्रंथकारानें घेतल्या आहेत. शके १३०० च्या सुमारचें मराठी गद्याचें स्वरूप आपणांस यावरून कांहींसें पाहतां येतें. हें गद्य पंचतंत्र विनायकराव भावे यांनीं शके १८२९ मध्यें महाराष्ट्रकवि नामक मासिकांत प्रसिद्ध केलें. नंतर त्याच्या तिसऱ्या तंत्रापैकीं कांहीं पृष्ठें—'फार प्राचीन काळीं लिहिलेलीं—' प्रो० पोतदार यांस मिळालीं व तीं त्यांनीं भा. इ. स. मंडळाच्या त्रैमासिकांत (शके १८४४) छापून प्रसिद्ध केलीं. दोन्ही प्रतींत थोडी थोडी तफावत आहे. भावे यांनीं

छापलेलें पंचतंत्र संपूर्ण असून सुबोध आहे. पोतदारांनी फक्त तिसऱ्या तंत्राचीं पृष्ठेंच छापली आहेत. वाचकांनी तुलनेनें पहावें. दोन्हीं भाषांतरें वेगवेगळ्या दोन पुरुषांनीं केलीं आहेत असें मला वाटतें! एकच गोष्ट दोघांनी कशी सांगितली आहे हें वाचकांस तुलनेनें पाहतां यावें म्हणून पुढें दोन्ही प्रतींतली मी फक्त पहिलीच एक गोष्ट दिली आहे. पोतदारांस ज्या प्रतीचीं पृष्ठें मिळालीं ती प्रत संपूर्ण मिळाल्यास ती प्राचीनतर ठरेल. मूळ दोन्ही ग्रंथ शके १३००–१४०० ह्या काळांतले आहेत.

प्रस्तुत मराठी ग्रंथास ग्रंथकर्त्यानें 'पंचोपाख्यान' असें नांव दिलें आहे, वस्तुतः तें संस्कृत पंचतंत्राचें मराठी ओवीबद्ध रूपांतर आहे. ग्रंथाच्या रचनेवरून पाहतां तें ज्ञानेश्वरीनंतर १००–१२५ वर्षांनीं लिहिलें असावें असें वाटतें. ग्रंथावर ज्ञानेश्वरीची छाया पडलेली आहे, ज्ञानेश्वरींतील शब्द त्यांत बरेच आढळतात. महानुभावीय ग्रंथांची किंवा पंथाची ग्रंथकर्त्यास ओळख होतीसें दिसत नाहीं. त्याच्या आसपास नग्नक्षपणक ह्म० जैन बरेच असावे असें वाटतें, तथापि त्यांच्याविषयीं त्याचा आदरभाव दिसत नाहीं.

"पूर्वि महिळारोप्य नाम नगरि। तेथें अमरशक्ति नाम राजा होता। तयासि तिघे पुत्र। तिघेजण प्रबुद्ध थोर जाले। परंतु मूर्ख जाणौनि राजा मंत्रियांसि बोलाउनि म्हणे। हे माझे पुत्र जाले तरि हे पढवा आणि राज्यायोग्य करा। यैसें सांघितलें। मग मंत्रियें विचारुनि विष्णुशर्मा नामें ब्राह्मणु बोलाविला। तयाचे सांभाळें तिघे पुत्र केले। विष्णुशर्मा बोलिला। राया तुझे पुत्र सां मासां प्राज्ञ पढते राज्यायोग्य करिन। न करि तरि माझी दुर्दशा करावी। यैसें म्हणौनि राजपुत्रा पढवावया नेलें। राजपुत्रांसि नीतिशास्त्र पंचोपाख्यान सांघे"

असा ग्रंथाचा प्रस्ताव करून विष्णुशर्मा यानें १ मित्रभेदु २ मित्रसंप्राप्ति ३ काकोलुकीय ( काक व उलूक म्ह० घुबड यांचें आख्यान )

४ लब्धप्रणाशु व ५ अपरीक्षित कार्य अशीं पांच तंत्रें राजपुत्रांस पढविलीं.

ग्रंथाचा उपसंहार व फलश्रुति अशी आहे:—

" येसिं पांचहि तंत्रें विष्णुशर्मेनें राजपुत्रांसि सांगितलीं। तेणें ते नीतिवंत राज्यायेग्य जाहाले। मग राजेयानिं विष्णुशर्मियासि बरवा सन्मानु केला। आणि दोनि गांव दिधले। लेणिलुगाडिं दिधालिं। हे कथा जो आइके तयासि धर्म अर्थ काम मोक्ष होय। आणि बुद्धि बरवी होये। प्राज्ञा होये। क्षेत्रियांसि रणिं विजय होये."

आतां पंचोपाख्यानांतील कांहीं कथा नमुन्यादाखल आपण पाहूं:—

( १ ) "कोण्हे येके नगरिं चित्ररथ नामें राजा। तयाचे पद्मसरोवर तेथें सोनियाचे हंस। ते मासा प्रत्येकें पिसें सोनियांचीं दोनिं दोनिं तया रायातें देति। तंव तेथें सोनियाचा पक्षी थो (एक? थाउ) त्या ठिकाणीं वस्तीस आला। तया पक्षियातें हंसिं म्हणितले। आम्ही रायासि सां मासां पिसेर पिसेर दोनि दोनि देतु असों। म्हणोनि तूं येथुनि वेगां जाये। तंव तो पक्षी रागे टेला। रायापासि येसें जाउनि म्हणितिले। जे हंस सरोवरिंचे पक्षि तुमतें न मनिति। म्हणति आह्मि रायापासिं पिसें देतु असों। रावो आमुचे काये करिल। तुह्मि कोण्ही आमुचे सरोवरिं न रहावें। तंव त्या राजेयानिं न विचारितां राजपुरुषांसि निरोपु दिधला। जे अवघे हंस धरुनि आणा। ते धरावया येतु देखोनि वृद्ध पक्षियाचेनि वचनें येकोचि वेळे उडोनि गेले। म्हणोनि तरि भुतांपासुनि वेतयां येसें होये। मग तो राजा त्या हंसाची खंति करि।" **( भावे प्रत )**

( १ ) " कोण्ही एक्ये नगरीं : चित्ररथु नावे राजा तेयाचा धनुधेरी. : पद्मवन नावे सरोवर तिथें बहुत सुवर्णाचे हंस वसति : ते सासां मासां सुवर्णाचे एक पिल्स त्यजीती : ययामध्ये : तया सरोवरा एकु सुवर्णाचा पक्षीया आळा : तेहीं हंसीं ह्मणितळे : तुवा आम्हांमध्यें न वसावे : जेणे कारणे सासां मासां आह्मी रायासि एक पिछ देयावे :

ऐसे ह्मणौनि विकत सरोवर घेतले वर्त्ते काई ह्मणौ : एणें प्रकारें ज्या पक्षीयासि द्वैधीभावु मांडळा : तांये वेळ तो पक्षीया तयाजवळि जाउनि : बोळिला : अगा जी हे पक्षीये ऐसें ह्मताति : जे राउ आम्हासि काइ करिल येथे आम्ही कोण्हासीही वसो नेदु : म्या ह्मणितले : तुह्मी वोपटे बोलिलेति : मी जाउनि रायापुढे सांगेन : म्या ह्मणितले : यैसे राउ चित्ता ए ते करु : इतुके राऐ आइकौनि ओ सेवकांप्रति बोळिला अगा तुम्ही जाउनियां अवघे पक्षीयांथे मारुनि आणा : मग रायाच्ये निरोपे ते सेवक निघाळे. यानंतरें लांकुडे हस्ता राजपुरुषाथें देखौनि : तेथें येक वृध पक्षीये ह्मणितले अगा स्वजातियापासौनि उपटे मांडले. : तरि सकळहीं एक उत्पवन करावें : तेहीं पक्षी तैसेचि केले :...शरणागताथे मारु पाहिजे तरि ऐसे होये ? ( **पोतदार प्रत** )

( २ ) " कोण्हें येकें वनिं सिंहीण व्यालि । दोनिं पिलीं जालिं । सिंहु आहारु आणौनि दे । ते लेंकरयांतें राखति राहे । येकु दिवस आहार न मीळेचि । त्रिळचां ( ? ) येक कोल्हियाचें पीलें तें न मरिच घेउनि आला । मग ते पीलें सींहिणीतें दीधलें । तियां कृपा-वशें आपुलिया स्तनीं लाउनि वाढविलें । येके वेळे हस्ति आले । तयातें देखौनि सींहाचें पीलें मारावया धाविनलें । येर ते पळौनि गेलें । तेणें पळ काडिला । तयातें सिंहाचें पिलें कोपलें । म्हणे तुं पळालासि । तंव कोल्हियाचें पिलें कोपौनि सिंहाचे पिलियांसी मारूं लागले । सिंहि-णीनें वारिलें । म्हणे तुम्ही भांडों नका । तंव तो म्हणे मि काय शूर नव्हे कीं बरवा सुंदर नाहीं कि मज विद्या नाहीं तरि हें मातें कां हांसति । तंव ते सिंहिण तुं सुंदर बरवा आहेसि विद्याही जाणसी । परि जिये कुळिं जन्मलासि तिये कुळीं गज न मरेचची । सिंहिणी म्हणे तुं कोल्हियाचें पिलें म्यां कृपावशें तुज वाढविलें । हें तुतें कोल्हा यैसे जाणति

तरि तुज मारितो। तरि तुं आपुलिये जातिपासि जाये सुखें अस। तंव तो कोल्हा भ्याला आणि पळोनि गेला।"

( ३ ) "कोण्हे एके ठायीं देवशर्मा नामें ब्राह्मणु। तयाचिया भार्येने येकु मुंगुसु आणि येकु पुत्र दोघांतें वाढविलें। परि लेंकुरासि मुंगुस मारिल येसें भय असे। येकवेळ ते पाणियासि गेलि। भर्तारातें म्हणे पाळणां लेंकरूं आहे तें पाहात घरिं असा। तो नावेक होता। कवाड अडकुनि निश्रया आणावयासि गेला। तंव सापु पाळणेयावरि वोळंबतु असे। तो मुंगसें देखिला। तेणें खालिं पाडिला आणि मारुनि त्याचे तुकडे केले। तंव ते पाणि घेउनि आली। तंव तें मुंगुस तिये-जवळिं आलें। तें लाडिजेत मागें पुढें रिघों लागलें। तयातें पाहे तंव त्याचें तोंड रक्तें माखिलें। तें देखोनि न विचारितां भरलि घागर त्यावरि टाकिलि। म्हणे चाडाळा लेंकरूं खादलें। घरांत आलि तंव तें लेंकरूं पाळणां असे। सर्पु मारिला असे। तें देखौनि मग रडत बैसलि। तंव तो ब्राह्मणु आला। म्हणे माझें म्हणितलें न करिसीच तेणें येसणें दुःख पडिलें। तृष्णा अपार करितां ऐसें जालें॥"

( ४ ) "कोण्हे एके गावीं स्वभावकृपणु नामें ब्राह्मणु। तो सातूचें पीठ खाय। उरलि कणिक ते सिंकां ठेवि। यैसी घडुलि तोंडवरि भरिलि। रात्रिं खाटेवरि निजेला। वरि सिंकातें सातुचि घडुलि ठेविली असे। बुद्धि आपण निजोनि चिंतु आदरिलें। म्हणे घडुलि तरि सातुनें भरलि असे। ते दुकाळि रूपटंके दोंसि ( दोन रुपयांस ) विकिन। त्याच्या सेळिया दोनि घेइन त्या सां मासां वीतील। इतुकेनि बहुत होतील। त्या विकुनि येकि गाये घेईन। मग ते गाईस गोन्हे होतिल। कालहवाडि बहुत होतिल। त्या गाई विकुनि म्हैसि घेइन। त्याहिं पडुलि वाढेलि। त्या म्हैसि विकोन घोडा घेइन। तंव ते घोडियेसि सिंगरें बहुत होतिल तेहि विकुन बरवें घर घेईन। इतुकेनि मज बरवीसि रूपवंति कोण्ही कन्या देईल। तिस पुत्र होईल। त्यासि सोमशर्मा नाम ठेविन। तंव मी

घोडशाळेसि घोडियांचिं लक्षणें पाहात असैन । तंव तो सोमशर्मा रिंगतु रिंगतु मजपासिं येईल । तेव्हां मी ब्राह्मणीतें म्हणैन जे तुं हें लेंकरूं घे । ते व्यासंगे नाईकेल आणि लेंकरूं नेघेल । तरि मग मि ते वेळेसि रागेंकरि उठोनि तीतें पापरा हाणैल । म्हणौनिया पांपरा ते सातुचे घडुलिस हाणितिलि । ते खालिं पडिलि । फुटोनि खापरें वेगळालिं जाहालिं । मग ते सातु तोंडावरि आंगावरि सांडालि । अवघा पांढराच जाहाला । तरि अनागत चिंति तया ऐसें होये । लौल्य वोखटें । "

अलीकडच्या लोकांस परिचित असलेल्या ' शेखमहंमदी मनोराज्य ' या गोष्टीचें मूळ वरील विनोदी गोष्टींत सांपडेल. वरील २।३।४ ह्या गोष्टी युरोपिअन राष्ट्रांतून फार लोकप्रिय झालेल्या आहेत. आपल्या अंगावर आकाश कोसळूं नये म्हणून आपला एक पाय वर उचलून घेणारी टिटवी ही तिकडे फार प्रसिद्धि पावली आहे !

(५) " वर्धमान नामें वेव्हारा (व्यापारी) बरवें सुमुहुर्ति वाजतां गाजतां शर्करा आणावया निघाला । गाडि येवोनि वस्तु घातली । बेल दोन्हि हौसेचे जुंपिले । आपण गाडियेवरि बैसला ।...। एकु कदर्मी रुतला । त्याचा पावो दुखवला । तो बैल नुठेचि । तयापासिं दोघजण राखण ठेविले । राणि ( रानांत ) तो बैल आयुष्येंकडुनु वांचला । मग थडियेरि हरियाळि ( हरळ ) चरे पाणि पी । मोठा दृढ जाला । रडि (   ) माथेनें घांसे । थोर शब्दें करुनि गर्जे । वनिचा राजा सिंहु त्याचा सादु ( ध्वनि ) आईकोनि साशंकित जाला "...

---

" रायासि जोहार करुनि उचित स्थानीं बैसविला । रायें दक्षिण करें परिवंसिला ( आलिंगिला ) आणि म्हणितले । निकेन ( खुशाल ) आहासि । तंव तो म्हणे जि राउळिचं ( स्वामींच्या ) पायांचं प्रसादेन कृपेनं निकें असों "......

" राजसभेसि जाणारियें राजमान्यें करुनि गर्व न करावा "

" तपोधनापासिं जाउनि दंडवत घातलें । तंव येरु म्हणे तुं कोणु । तो म्हणे जि मि संसारासि उबगलों ( कंटाळलों ) । संसारपुत्रमित्र कळत्र हें अवघें लटिकें स्वप्नवत् । तरि स्वामिनं मजवरि दया करावी । मज उपदेश देयावा । जेणंकरि मि संसार तरे । म्हणौनि पुढति दंडवत केलें । संन्यासि मज एकांत होत्रा । मठाचे दारिं कोंपि करुनि असावे । "

" म्हणौनि कोण्हाचा विश्वासु न करावा । आणि भृत्यें राजा व्यसना-वेगळा करावा । न करि तरि सेवकासि बोलु लागे । "

अशीं कांहीं वाक्येंही मनोहर आहेत.

---

## ८ शके १२२१ चा मराठी ताम्रपट.

हा ताम्रपट गोंवेप्रांतांतून दत्तोपंत आपटे यांनीं मिळविला आहे. हा दोन पत्र्यांवर लिहिला असून त्याच्या ओळी १७ + १५ = ३२ आहेत. ज्ञानेश्वरीनंतर ९ च वर्षांनीं हा लिहिला गेला असल्यामुळें ज्ञानेश्वरकालीन मराठी गद्याचा एक नमुना म्हणूनच त्याकडे पहावयाचें आहे. त्यांतील मजकुराचें महत्त्व नाहीं व कांहीं शब्दही नीट लागत नाहींत. तो कानडी लिपींत पण मराठी भाषेंत लिहिलेला आहे ! त्यावेळीं गोंवेप्रांतावर कर्नाटकी राजांचा अंमल चालत होता. कांहीं कानडी वाणी गोंव्याकडे गेले. त्यांचें लिहिणें व हिशेबठिशेब कानडींत चाले, पण प्रांताची बोल-भाषा मराठी असल्यामुळें त्यांना मराठींत लिहावे लागे. गोंवेप्रांत अगदी प्राचीन कालापासून महाराष्ट्राचाच एक भाग आहे. तिकडील मराठीवर कानडी अमलामुळें कानडीचा संस्कार घडला व ' कोंकणी मराठी ' भाषा बनली. ' कोंकणी ' भाषाच गोंवेप्रांतीं व आसपास अद्याप लोकांची बोलभाषा आहे.

फोंड ( अंत्रज ) महालांत ' खाडेग्राम ' ( आतां त्याला खंडोळे म्हणतात ) नांवाचें एक गांव आहे व तेथें ह्या ताम्रपटांत उल्लेखिलेली गणनाथाची ( गणपतीची ) मूर्ति आपल्या देवळांत अद्याप विराजमान

आहे. त्या देवाच्या देवळांत सदर अग्रहार लिहिला गेला आहे. खाडे-गांवचे वाणी व सोनार यांचा तंटा पडल्यावेळीं बेरेगांवचे वाणी आपल्या जातीच्या मदतीस धांवून आले व या उपकाराची फेड करण्यासाठीं खाडेगांवच्या वाण्यांनीं त्यांना कांहीं दानमान ठरवून दिले. तो विषय या अग्रहारांत आहे. असो आपणांस तत्कालीन मराठी भाषेचा नमुना म्हणूनच त्याकडे पाहायचें आहे. गोवेनगर, नारवेनगर, वेरे, बडग्राम हीं गांवें आजही फोंडे महालांत आहेत; गोवेनाथ, नागनाथ वगैरे देवळेंही आहेत. अस्तु.

"स्वति श्री साळिवान सक १२२१ वरुसां वरत्तमन सावरी ( शार्वरी ) संवदर ( संवत्सर ) श्रावण बहुळ ( कृष्ण ) ८ मि सोमवारी तिम्ममंतरि (तिम्म नांवाचा मंत्री) धर्माधमि मरिकु भादुरु राज करीत आसतां अग्राहर खाडे ग्रामे वारातु श्रीगणनाथदेवाचा देउळी बहिसिके नगर समस्त मळलेयाचा विवरु गोवे नगरपयिकीं ( पैकीं ) सेटिया नागसेटी जणु १ तथा नगरपयिकीं भयिरसेटी जण १ तथा कायिसेटी जण १ तया लखुसेटी जणु १ नारवेनगरपयिकीं सेटिया विठल सेटी जणु १...... यवं समस्त आमीं नगरानं वेरेकारांसीं अंत्रुजेभीतरीं बलकसेटी सिवा चांदसेटी ··यवं जण ३ तुमी आमचे जातीसमधाचा कारेयासि उपगा ( उपयोगास ) अलेत कवण कार्य म्हणाल तर आमासी आणि सोनारांसि सवादा होउनु हाणमारी जाले समधीं तुमी वेरेकार......समयासि यउनु मानु समेचा राकिला समधी आमी... दान मान लुगडीं विडा गंध आकेत दिधले...... भोगावया दिधले आमी वा आमचा जात वर जातान यावचंद्र पाळावा लिहिलेप्रमाणें तुमी वा तुमच्या जात परजातान यावचंद्रक भोगावे म्हणउनु दिधला दान मानेचा सासनपटु ( शासनपत्र ) होय......... ग्राम सेटु जण ५ लिहित सेणवी कुळ तळी ग्रामे सारांतु आहेत मांग सेणवी स्वस्ति...... श्रीकपिलेस्वरु देउ श्रीनागनाथ देउ......"

---

यानंतरचे कांहीं ताम्रपट व लेख वगैरे उपलब्ध झालेले आहेत व त्यांत फारशी, अरबी वगैरे मायने, शक, शद्ब वगैरे खच्चून भरलेले असतात. ज्ञानेश्वरीप्रमाणेंच या ताम्रपटाला यावनी शद्बाचा संस्पर्शही झालेला नाहीं हा याचा विशेष आहे.



# २. मुसलमानी राजसत्ता व तिचे परिणाम.



## १ प्रास्ताविक.



ज्या कालखंडाचा आपण प्रस्तुत ग्रंथांत विचार करणार आहोंत त्या कालखंडांत महाराष्ट्रावर मुख्य राजसत्ता मुसलमानांची होती. मुख्य म्हणण्याचें कारण संपूर्ण महाराष्ट्र मुसलमानांचे पूर्ण अमलाखालीं केव्हांच नव्हता. कित्येक पठारे, डोंगरी किल्ले, गावें वगैरे आपापले स्वातंत्र्य सांभाळून झगडून शेवटपर्यंत तग धरून राहिले होते. बागलाण ( नाशीक जिल्हा ) प्रांताच्या इतिहासाचा उल्लेख पुढें येणारच आहे. शिरक्यां-सारखे कडवे मऱ्हाठे नेहमीं बाकून असत. कांहीं गांवांवर आपला अंमल चालविणारे नाईक वगैरे सामान्य लोकांचे पुढारीही कांहीं कमी नव्हते. मुसलमानांच्या मोठमोठाल्या फौजांच्या लाटा आल्या म्हणजे स्वसंरक्षणार्थ किल्ल्यांचा, जंगलांचा, दऱ्याखोऱ्यांचा आश्रय करावा व लाटा ओस-रल्या कीं पुन्हां स्वस्थानारूढ व्हावे असा प्रकार अनेक ठिकाणीं होता. तथापि बहामनीशाही, निजामशाही, आदिलशाही यांचा सरास अंमल ( हिंदुस्थानांतील इतर भागांप्रमाणें ) महाराष्ट्रावरही दोनतीन शतक चालला ही गोष्ट अगदीं खरी आहे. असे हे मुसलमान मूळ आले कोठून, त्यांची जात व पंथ बळावला कसा व महाराष्ट्रावर पसरला कसा, याचा विहंगमदृष्टीनें सामान्य वाचकांसाठीं येथें विचार करणें अवश्य आहे. मुसल-मानांच्या राजसत्तेचा थोडासा इतिहास वाङ्मयप्रसाराच्या दृष्टीनें पाहाणें अत्यंत जरूर आहे. 'राजा कालस्य कारणम्' हें प्राचीन काळचें एक मोठें सूत्र आहे, त्याप्रमाणें ह्या मुसलमानी राजसत्तेचे महाराष्ट्राच्या राजकीय, धार्मिक व सामाजिक जीवनावर कोणते परिणाम झाले हें मागा-हून पाहून मग आपण तत्कालीन वाङ्मयाकडे वळूं. महंमद पैगंबर व

त्याचा जयिष्णु धर्म, महंमदीयांचा जगज्जय, हिंदुस्थानावर मुसलमानांच्या टोळधाडी व त्यांच्या प्रतीकाराचे प्रयत्न, खिलजीच्या स्वाऱ्या व जाधवांच्या राज्याचा शेवट, विजयानगरचें साम्राज्य, बहामनीशाही, आदिलशाही, निजामशाही, व कुतुबशाही अशा क्रमानें आपण मुसलमानी राजसत्तेच्या इतिहासाचा अतिसंक्षेपानें विचार करूं. यावनी राजसत्ता, यावनी धर्म, यावनी भाषा, व यावनी संस्कृति यांच्या पकडींत साऱ्या हिंदुस्थानाप्रमाणें महाराष्ट्रही सांपडला होता, पण त्या मगरमिठींतून सुटून महाराष्ट्रानें आपलें स्वातंत्र्य पुन्हा कसें संपादिलें हा इतिहास अत्यंत स्फूर्तिदायक आहे. ह्या इतिहासांतर्गत मराठी संतकवींनीं स्वधर्म, स्वभाषा व स्वसंस्कृति यांच्या संरक्षणाचें जें महत्कार्य केलें त्याचा विचार प्रस्तुत ग्रंथांत सर्वत्र पण विशेषतः शेवटच्या प्रकरणांत होणार आहे. स्वातंत्र्यसंपादनाच्या कार्याचा इतिहास अन्य ग्रंथ प्रगट करीतच आहेत.

---

## २ महंमद पैगंबर ( इ. स. ५७०-६३२ ) व त्याचा धर्म.

आरब लोकांत तेव्हां मूर्तिपूजा सर्रास होती पण महंमद प्रथमपासूनच मूर्तिपूजेच्या विरुद्ध होता. ‘ ईश्वराचा खरा धर्म लोकांत प्रसृत करण्याची मला त्याची आज्ञा झाली आहे ’ असें तो लोकांस सांगे. त्याला अनुयायी मिळत चालले व शत्रुही उत्पन्न झाले. त्याला कित्येक ठार मारण्यासही टपून बसले. तेव्हां तो इ. स. ६२२ मध्यें मदिनेस पळाला. हिजरा ( वतनत्याग करणें, पळणें ) तेथून हिजरी सन सुरू झाला. तो पूर्वीं मक्केस असतांना धर्मोपदेशाचें काम करी, पण मदिनेस आल्यापासून त्यानें तलवारही हातांत घेतली व परशुरामाप्रमाणें ‘ शापादपि शरादपि ’ या न्यायानें उपदेशाचें व राज्यकर्तृत्वाचें अशीं दोन्हीं कामें अंगावर घेतलीं. त्यानें मदिनेस एक मशीद बांधली व ‘ जे खऱ्या धर्माचा उपदेश ऐकणार नाहींत त्यास युद्ध करून जिंकावें, युद्धांत यश आल्यास शत्रूची दौलत मिळेल व मृत्यु आल्यास स्वर्गलोक मिळेल ’ असें त्यानें

जाहीर केलें; म्हणजे 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा मोक्ष्यसे महीम्' ह्या श्रीकृष्णाच्या सिद्धांताचाच त्यानें पुरस्कार केला! महंमदाच्या उपदेशानें त्याच्या अनुयायांत लष्करी आवेश संचरला व धर्मप्रसाराच्या निमित्तानें महंमदीयांनीं चोहोंकडे दारुण युद्धें व कत्तली सुरू केल्या. त्यांनीं मक्का शहर काबीज केलें व काबाच्या प्रसिद्ध मंदिरांतील सर्व मूर्ति फोडून टाकल्या (६२९). त्या वेळेपासून काबा हें त्यांचें मुख्य प्रार्थना-मंदिर बनलें. महंमदानें आरबांचें एक बलाढ्य राष्ट्र बनविलें, इस्तंबूल व मिसर येथील राजांनीं त्याचा पंथ स्वीकारला. लोक त्याला पैगंबर मानून भजूं लागले. महंमद मोठा पराक्रमी, कर्तृत्ववान् व बुद्धिवान् पुरुष होता. तो अलौकिक कर्तबगारीचा होता. तो भक्तिमान् व न्यायनिष्ठुरही असे. त्याचा पंथ एकेश्वरीमताचा आहे. समानबंधुभाव हें त्याच्या वर्तनांतलें मुख्य तत्त्व होतें, पण मूर्तिपूजाविरोध एवढें एकच तत्त्व त्याच्या अनु-यायांनीं पुढें उचललें व जग जिंकण्याच्या महत्त्वाकांक्षेनें त्यांनीं सारें जग पादाक्रांत करण्याची ईर्षा बांधली. राज्यप्राप्तीची ईर्षा, लुटीचा व संपत्तीचा लोभ, कीर्तीची लालसा व स्वर्गसुखाची आकांक्षा या गुणांनीं प्रेरित होऊन महंमुदीयांनीं पुढील हजार वर्षांत आधीं युरोपांत व नंतर हिंदुस्थानांत रणधुमाळी माजवून जगभर एकच हलकल्लोळ उडवून दिला! 'लाइलाह इल्लाल्लाह महंमदुर्रसूलुल्लाह' हा० ईश्वर एक आहे व महंमद त्याचा प्रेषित आहे, ह्या मंत्राचा उपदेश इस्लामधर्म स्वीकार-तांना करावा लागतो. ईश्वर एक आहे हें तत्त्व सर्व धर्मांसच मान्य आहे. मात्र त्याचा प्रेषित येशुख्रिस्त हाच आहे असें ख्रिस्ती मानतात, व तो प्रेषित ख्रिस्त किंवा महंमद नसून तो अजून यावयाचा आहे असें यहुदी (ज्यू) मानतात! मुसलमानी धर्मांत नीतीचीं तत्त्वें फार चांगलीं आहेत, आणि कोणत्याही धर्मांत नीतितत्त्वें चांगलींच असतात! बाय-बल व कुराण दोन्ही धर्मग्रंथ चांगलेच आहेत. फक्त भेदवर्धक आग्रह वाईट आहे व त्यामुळेंच धर्माच्या नांवांवर जगांत अशांति पसरत असते! बायबलांतला जुना करार व त्यांतील इब्राहीम, इस्मईल, इझाक, मुसा

इ० प्रेषित ख्रिस्ती, यहुदी व मुसलमान या तिघांसही मान्य आहेत, भेद काय तो मुख्य प्रेषित कोणता मानायचा याबद्दलचा आहे ! ख्रिस्ती लोक ख्रिस्तास प्रेषित मानतात व तीन देव ( ट्रिनिटी ) मानतात हें मुसलमानांस पसंत नाहीं. कुराण मूळ आरबी भाषेंत असून त्याचे ३० भाग व ११४ सुटे अध्याय आहेत. दारु, भांग, अफू हे मादक पदार्थ व जुगार आणि फलज्योतिष यांचा कुराणांत निषेध आहे. व्यभिचाराची त्यानें बंदी केली आहे, तथापि एका पुरुषास अनेक बायका करण्याची त्यानें मोकळीक ठेवली आहे. कुराणाच्या अर्थाविषयीं चार शाखा व शिया व सुन्नी असे दोन पंथ झाले. पैगंबराच्या गादीवरच्या पुरुषास ‘ खलीफ ’ व मुख्य धर्मोपदेशकास ‘ इमाम ’ म्हणतात. सुफी पंथ आपल्या वेदांतमताचाच दर्शक आहे. वाहबी म्हणूनही पंथ आहे. लहानमोठे ५०० पोटभेद आहेत.

## ३ महंमदीयांचा जगज्जय.

खिलाफतींत अनेक राजवंश झाले व त्यांच्या राजधान्याही मक्का, मदीना, डमास्कस, बगदाद, कोर्डोव्हा इ० ठिकाणीं बदलत गेल्या. महंमदासारखा **जिगीषु** पुढारी भेटल्यामुळें आरब लोकांत उत्साह उत्पन्न झाला व अजिंक्य वीरांचें तें राष्ट्र बनलें. तें जग जिंकीत चाललें. इ. स. ६३४ मध्यें त्यांनीं सिरिया देश जिंकला व जरूसलेम शहर काबीज केलें. ख्रिस्ती लोकांची ती पवित्रभूमि ताब्यांत आल्यापासून ख्रिस्ती राष्ट्रें व मुसलमान यांच्यांत कित्येक शतकें तुंबळ रणें माजून राहिलीं. रोमन बादशाहीशीं युद्ध होऊन इजिप्त देश मुसलमानांनीं जिंकला. ते जातील तेथील देवळें पाडून तेथील लोकांस जबरीनें मुसलमान करायचें असा त्यांनीं दंडक पाडला. इ. स. ६४० मध्यें त्यांनीं अलेक्झांड्रिया येथील प्रचंड ग्रंथसंग्रह जाळून टाकला ! त्यांनीं लागलेच इराणदेशही आपल्या काबूंत आणला. प्रचंड आरमार उभारून त्यांनीं भूमध्य समुद्रावर आपली सत्ता स्थापली व ग्रीस, माल्टा, ऱ्होड्स वगैरे देश जिंकून घेतले. महंमदाच्या

पश्चात् बाराच वर्षांत त्यांनीं एवढी कामगिरी केली व खिस्ती राष्ट्रांना भयचकित करून सोडले ! इराणांतून पारशी लोक पळून हिंदुस्थानांत आले. इ. स. ६८४ ते ७११ पर्यंतच्या २७ वर्षांत मुसलमानांनीं कार्थेज जाळलें, जिब्राल्टरचा किल्ला पश्चिमेकडे बांधून स्पेनदेश पादाक्रांत केला, ट्यूनिसप्रांत घेऊन केरोशहर बांधलें व उत्तर आफ्रिका खंडावर आपली सत्ता स्थापिली ! आरबांनीं पिरिनिज पर्वत ओलांडून फ्रान्स देशांत पाऊल टाकले तेव्हां मात्र खिस्ती राष्ट्रांची पांचावर धारण बसली ! टूर्सच्या प्रचंड लढाईत फ्रेंचांनीं आरबांचा पराभव केला तथापि स्पेन देश ८०० वर्षे मुसलमानांच्याच ताब्यांत राहिला. यूरोपखंडाचा नाश प्रथम गॉथ लोकांनीं, नंतर आरबांनीं व शेवटीं तुर्क व मोगल लोकांनीं केला. रशियावर व हंगेरीवर कित्येक शतकें मोंगलांनीं राज्य केलें.

महंमदाचा जावई अली याच्या वंशजांनीं **बगदाद** शहर स्थापून तेथें पांचशें वर्षे ( इ. स. ७५० ते १२५८ ) मोठ्या वैभवानें राज्य केलें. ह्या वंशांत **हारून-अल-रसीद** ( सन ७८६ ते ८०९ ) व **मामून** ( सन ८१३ ते ८३३ ) हे फार विख्यात झाले. तत्वज्ञान व काव्य यांची भरभराट झाली, पंडित व कवि यांना उत्तेजन मिळालें व शिल्पविद्येचा उद्धार झाला. हारून हा राजकारणनिपुण होताच, पण गरिबांचा कनवाळू व परोपकारी ह्मणून ' अरबी भाषेंतील सुरस गोष्टी'यांनीं त्याला अजरामर करून ठेवलें आहे. मशीदी, विद्यालयें, दवाखाने, शाळा, रस्त, कालवे वगैरे बांधून त्यानें व्यापारी व प्रवासी लोकांच्या सुखसोयी केल्या. हरूनचा मुलगा मामून यानें बापावर कडी केली. त्याच्या वेळीं सर्वत्र आबादीआबाद होती. वनस्पतिशास्त्र, बीजगणित, गणितशास्त्र, खगोल, भूगोल, वैद्यक, इतिहास या विद्यांचा उत्कर्ष झाला. बगदाद शहर त्यावेळीं साऱ्या जगांत पहिल्या प्रतीचें झालें. मोठमोठ्या पाठशाळा उभारल्या गेल्या, तेथें ह्याच्यावेळीं यहूदी, खिस्ती व पारशी यांनीं मंदिरें उभारलीं, सर्वधर्मांच्या लोकांस हा समान सदयतेनें वागवी. विद्वान् व

शास्त्रज्ञ यांनीं बगदाद शहर गजबजलेलें असे. बगदाद शहराची वस्ती २० लाखांवर झाली ! धर्मद्वेष नाहींसा झाला. प्रत्येक मशीदीला विद्यालय जोडलेलें असे. हरून व मामून यांच्या कारकीर्दींत (सन ७८६ ते ८३३) आरबांचें ऐश्वर्य, यश व औदार्य कळसास पोंचलें. नाना विद्या व कला यांचें ऊर्जित झालें. चरक व सुश्रुत ह्या आपल्या आर्यवैद्यक ग्रंथांचीं भाषांतरें आरबी भाषेंत ब्राह्मणांकडून केलीं गेलीं. ग्रीक व संस्कृत भाषांत जें जें उत्तम आहे तें तें आरब विद्वानांनीं ग्रहण केलें. डमास्कस, बगदाद, केरो, कोर्डोव्हा ह्या आरबांच्या राजधान्यांतून ज्या सुधारणा झाल्या त्यामुळें युरोप खंडास नवजीवन मिळालें. पण आरबांच्या मागून तुर्कांनीं २०० वर्षे ख्रिस्ती राष्ट्रांशीं धर्मयुद्धें केलीं त्यांत आरबांची उच्च संस्कृति धुळीला मिळाली व यापुढें मुसलमानांनीं जगभर जो हैदोस घातला त्यांत पुढें आरबांचे सद्‌गुण केव्हांही दिसले नाहींत! मुसलमानी धर्म व राज्य यांची कीर्ति अरबांनीं वाढविली. यानंतर तुर्क व मोगल पुढे आले पण त्यांनीं जगाच्या सुखशांतीचा विध्वंस करण्यांतच लौकिक मिळविला ! चंगीजखान, तैमूरलंग, नादीरशहा यांचीं नांवें जगविख्यात आहेत, पण त्या नांवाबरोबर विध्वंसकपणाचाच बोध होतो. अरबांनीं सिंधप्रांतावर आठव्या शतकांत स्वारी केली. त्यानंतर हिंदुस्थानावर ज्या टोळधाडी आल्या त्या मध्यआशियांतील डोंगर सपाटीवरील यवन, हूण, तुर्क, मोगल, पठाण, अफगाण इ० लोकांच्या आल्या. हे बहुधा क्रूर व संस्कृतिशून्य होते. वायव्य दिशेकडून याच्या झुंडीच्या झुंडी हिंदुस्थानावर कोसळल्या व यांनीं कत्तली, जाळपोळ, लुटालूट, मंदिरविध्वंस करून अगणित प्राणघात केले व हिंदुलोकांच्या सुखासमाधानांत व उच्च संस्कृतींत विष कालविलें! तुर्कांनीं प्रथम ख्रिस्ती राष्ट्रांत व नंतर हिंदुराष्ट्रात महाप्रळय केले, दोघांच्या अंगांचे लचके तोडले. तुर्क व मोंगल यांच्या स्वाऱ्या झंझावातामारख्या जातील तिकडे सत्यानाश करीत, हजारों लोकांच्या कत्तली करीत, गांवचे गांव व प्रांतचे प्रांत बेचिराख करीत. लोकांस ते पौरा-

णिक काळांतले असुर वाटत यांत नवल नाहीं. उत्तरहिंदुस्थानांत तुर्क राज्य स्थापण्याच्या प्रयत्नांत असतांना **चेंगीजखान** मध्य आशिया-खंडांत धुमाकूळ घालीत होता. तो होता मोगल पण त्यानें तुर्कांचे प्रचंड लष्कर उभारलें. त्यानें तार्तार टोळ्या जिंकल्या, कित्येक राज्यें धुळीस मिळविलीं, लाखों लोक मारले, पूर्वेस पूर्वसमुद्र, पश्चिमेस कास्पिअन समुद्र व उत्तरेस व्होल्गानदी एवढा सारा भूभाग त्यानें १२०६ ते १२१२ पर्यंत नुस्ता बडवून काढला. नंतर त्यानें काबूल, कंदाहार, बुखारा, खुरासान वगैरे प्रांत जिंकून घेतले. पुढें इराण देश हस्तगत केला. त्यानें हिंदुस्थानच्या चौपट मुलूख २० वर्षांत आपल्या अंमलाखालीं आणिला. एवढा अफाट मुलूख जगाच्या इतिहासांत दुसऱ्या कोणीही जिंकलेला नाहीं. लढाया, कत्तली, सर्वस्वनाश—हा त्याचा पराक्रम होय ! चीनची भिंत ओलांडून पेकीन राजधानी काबीज करून चीनचा उत्तरभाग त्यानें आपल्या राज्यास जोडला ! युरोपांत जर्मनीपर्यंत त्याच्या टोळधाडी गेल्या. अफगाणिस्तान, तुर्कस्थान, इराण यावर राज्य करणाऱ्या महंमदाची त्यानें राळ उडविली. तो लाख फौज घेऊन याच्याशीं युद्ध करण्यास आला तों यानें ७ लाख फौज त्याच्या फौजेवर घातली. पहिल्याच लढाईंत दीड लाख मुसलमान मेले. यानें २० वर्षांत सारें जग तुडविलें व १ कोटि ४० लक्ष लोकांची कत्तल केली असा याचा लौकिक आहे ! इतका बलाढ्य क्रूरात्मा जगाच्या इतिहासांत दुसरा नाहीं. याच्या नातवानें रशिया व हंगेरी देश उद्ध्वस्त केले व मास्को, कीव्ह, बुदापेस्त इत्यादि शहरें जाळून तेथील लोकांची कत्तल केली. सन १२३८ ते १२४१ पर्यंतच्या तीन वर्षांत अर्धें युरोपखंड जमीनदोस्त झालें व अर्धें गर्भ-गळित झालें ! १२५७ पासून १३६८ पर्यंत ह्या मोगलांनीं पेकिन येथें राहून चीनदेशावर साम्राज्य गाजविलें. चेंगीजखानाच्या वंशजांनीं बुखारा व खिवा येथें राज्यें केलीं पण ते प्रांत रशियानें १८६८ मध्यें जिंकून आपल्या राज्यास जोडले. तार्तार मोंगलांवरचा अंमल रशियावर १४७०

पर्यंत होता. इ. स. १५०० पासून रशियाच्या अर्वाचीन इतिहासास आरंभ झाला. महंमदीयांच्या जगज्जयासंबंधानें पुढील उतारा पहा:—

Little more than a Century later the successors and followers of the Fugitive ( Prophet ) were ruling an empire which extended from the Atlantic to the Indus and from the Caspian to the cataracts of the Nile and included Spain, Portugal, some of the most fertile regions of southern France, the whole of the Northern coast of Africa, Upper and Lower Egypt, their own Native Arabia, Messapotemia, Arminia, Persia, Afganistan, Baluchistan and Transoxiana ( Cambridge History III Page 1. )

---

## ४ हिंदुस्थानावर मुसलमानांच्या टोळधाडी !

पूर्वेकडील चीनदेशापासून पश्चिमेकडील स्पेनदेशापर्यंत व उत्तरआफ्रिकेपासून तों उत्तरेस राशियापर्यंत म्ह० मध्यआशिया, युरोप व आफ्रिका अशा तीन खंडांतील असंख्य मनुष्यप्राण्यांच्या घरादारावर व जीवितांवर निखारे ठेवणाऱ्या महंमदीयांच्या वावटळी शेवटीं वायव्य दिशेनें हिंदुस्थानावरही येऊन धडकल्या ! हिंदु लोकांची उच्च संस्कृति व त्यांचीं सुखविलासांचीं राज्यें त्यांनीं धुळीला मिळविलीं. हें काय अरिष्ट आहे हें पुरती मान वर करून पाहण्यास फुरसत मिळण्यापूर्वी हे विपारी वारे जगभर फैलावले. हा इतिहास अतिसंक्षेपानें आपण पाहून मग आपण महाराष्ट्राकडे वळूं. **आरब लोकांचा** हिंदुस्थानाशीं व्यापारीसंबंध थोडाफार होता. मुसलमानांची हद्द सिंधप्रांताशीं भिडल्यावर हिंदु-मुसलमानांच्या कटकटी सुरू झाल्या. सिंधवर **दाहर** नामक ब्राह्मण राजाचें राज्य होतें. **महंमद कासीमनें** इ. स. ७१२ मध्यें सिंधवर स्वारी केली. देवल येथील देवालयावर त्यानें हल्ला केला. देवालयांत

पुष्कळ ब्राह्मण होते. त्यांनीं प्रतीकार केला, पण दाहर युद्धांत पडला व कासीमनें ब्राह्मणांची कत्तल करून इतरांस गुलाम करून नेले. राणीनेंही निकराची लढाई केली पण ती पराभव पावली. सिंधप्रांत अरबांनीं घेतला व तो ३० वर्षे त्यांच्या ताब्यांत राहिला. दाहरच्या दोन सुंदर मुली कासीमनें खलीफाकडे नजर पाठविल्या. वडील मुलीवर खलीफाची मर्जी बसली. तिनें आपलें रक्षण करण्याची एक युक्ति काढली. ' मजवर कासीमनें बलात्कार केल्यामुळें मी भ्रष्ट आहे ' असें खलीफास तिनें खोटेंच सांगितलें! खलीफनें संतापाच्या भरांत कासीमला ठार मारिलें. तेव्हां तिनें स्पष्ट सांगितलें कीं, ' माझ्या बापाचा घात करणाऱ्या दुष्टाचा सूड उगविण्याकरितां मी कासीमवर हा आरोप केला! मी शुद्धच आहे! ' खलीफानें क्रोधानें तिलाही ठार मारिलें! कासीमचा सूड व स्वसंरक्षण ह्या दोन्ही गोष्टी तिनें साधल्या. दुष्टांशीं कपटनीतीनें वागायचा हा त्या राजकन्येचा कित्ता पुढें रजपूत राजांनीं गिरविला असता व धर्मयुद्धाचे कायदे जरा बाजूस ठेवले असते तरी पुष्कळ अनर्थ टळले असते! ' जशास तसें ' हा न्याय पुढें मराठयांनीं अंमलांत आणला. पंजाबापासून काबूलपर्यंत जयपाळ हा शूर राजा राज्य करीत होता ( इ. स. ९६० ते १००१ ). बुखाऱ्याचा मुसलमान राजा सबुक्तगीन यानें पंजाबवर स्वारी केली पण जयपाळानें त्याशीं निकराचें युद्ध केलें. काश्मीरच्या पुढील तीन राजांच्या कारकीर्दींत सबुक्तगीनचा मुलगा **महंमद गिजनी** यानें २५ वर्षांत हिंदुस्थानावर एकंदर बारा स्वाऱ्या केल्या व असंख्य माणसें मारून अगणित लूट नेली! त्यानें १००१ ला पेशावरवर स्वारी केली व सिंधू नदीच्या पश्चिमेकडील मुलूख आपल्या राज्यास जोडला. पुढील तीन स्वाऱ्यांत हिंदु निकरानें लढले पण चौथ्या स्वारींत नगरकोट येथील देवालय लुटून त्यानें तेथील संपत्ति व हिंदु राजांचे खजिने लुटले. मूर्ति फोडणें, लोकांस बाटवून मुसलमान करणें, गांवचे गांव जाळणें व अपार संपत्ती

लुटून नेणें हीं कामें महंमदानें या स्वाऱ्यांत केलीं. ह्या संपत्तीनें त्यानें आपलें राज्य कॅस्पियनसमुद्रापर्यंत पश्चिमेकडे वाढविलें. इ. स. १०१८ मध्यें नवव्या स्वारींत मथुरा व कनोज हीं प्राचीन पवित्र व धनाढ्य स्थानें त्यानें लुटलीं व हिंदुस्थानांतील अपार संपत्ती पाहून मुसलमानांच्या तोंडास पाणी सुटलें. १०२४ मध्यें त्यानें १२ वी स्वारी केली व गुजराथेंतील सोमनाथाचें मंदिर लुटून ३० कोट रुपयांचें सोनें व जडजवाहीर लुटून नेलें ! ह्या स्वारीनें सारा हिंदुस्थान हादरला. हिंदुस्थानला आपल्या संकटाची जाणीव झाली व मुसलमानांत राज्यतृष्णा अनावर झाली. हिंदु राजे एक होऊन मोठी फौज घेऊन अजमीरच्या वाटेवर महंमुदाला आडवण्यास उभे राहिले, पण महंमूद सिंधच्या वाळवंटांतून लूट व फौज घेऊन पळाला. सामन्यास उभा राहिला नाहीं. पळतांना त्याच्या फौजेचे फार हाल झाले. ह्या स्वाऱ्यांमुळें पंजाबप्रांत तेवढा मुसलमानांच्या ताब्यांत गेला, व हिंदुस्थानांत पाय रोंवतां येईल असा त्यांस विश्वास वाटला. महंमुदाच्या दोन्ही मुलांचे हाल होऊन पुढील अंदाधुदींत ते दोघेही ठार मारले गेले ! १०४३ मध्यें हिंदूंनीं पुन्हा जोर केला व बराचसा पंजाबचा भाग परत घेतला. यानंतर १५० वर्षें हिंदुस्थानाला मुसलमानापासून त्रास झाला नाहीं. पुढें **महंमद्घोरीनें** इ. स. ११७६ ते १२०६ पर्यंत हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून धुमाकूळ घातला. हा अफगाण होता. दिल्लीचा शेवटचा हिंदु राजा पृथ्वीराज इतर राजांच्या साह्यानें महंमद घोरीशीं मोठ्या शौर्यानें लढला, पण आपसांतील फुटीमुळें इ. स. ११९३ मध्यें ह्या विषयलंपट राजाचा पराभव होऊन दिल्ली येथें मुसलमानांचें राज्य स्थापित झालें. ११९३ ते १८५७ पर्यंत सुमारे ६५० वर्षें दिल्लीच्या तख्तावर मुसलमान सुलतान राज्य करीत होते. उत्तर-हिंदुस्थानावर गुलामवंशानें सुमारें शंभर वर्षें राज्य केलें व या काळांत त्यांनीं बंगालही आपल्या राज्यास जोडला. पुढें दिल्लीच्या तख्तावर खिलजी घराणें ( इ. स. १२८८ ते १३२० ), तघलख घराणें

( १३२१ ते १३८८ ), तैमुरलंगाची १३९८ मधील स्वारी, सय्यद घराणें ( १४१६–५० ), लोदी घराणें ( १४५०–१५२६ ) इ० घराण्यांचीं राज्यें होऊन इ. स. १५२६ त मोंगल बादशाही स्थापित झाली.

महंमद गिजनी, महंमद घोरी, अल्लाउद्दीन खिलजी, तैमुरलंग, नादीरशहा, औरंगजेब इ० सुलतानांनीं व त्यांच्या सुभेदारांनीं हिंदुसमाजावर जे अत्याचार केले तसले जगांत दुसऱ्या कोणी राज्यकर्त्यांनीं केलें नसतील ! देवळें व शहरें लुटणें, मूर्ति फोडणें, गांवचे गांव जाळणें, हजारों माणसांच्या कत्तली करणें, स्त्रिया भ्रष्ट करणें व त्यांना पळवून नेणें इ० घोर कर्में करून यांनीं मनुष्यजातीला कलंक लावला आहे ! वेंकटाध्वरीनें म्हटलें आहेः—

**अवनावतीतपवनाश्वशोभिनो । भवनागशायिभवनाभिमर्दिनः ।**
**सवनादिकर्मलवनाय दीक्षिताः । यवनाश्चरन्ति भुवनाबिभीषणाः ॥**

वाऱ्यालाही मागें टाकणाऱ्या घोड्यावर आरूढ झालेले, भव ( शंकर ) व नागशायि ( विष्णु ) यांच्या मंदिरांचा विध्वंस करणारे, यज्ञादि सत्कर्मांचा विध्वंस करण्याचा बाणा बाळगणारे व साऱ्या भुवनाला चळचळा कांपायला लावणारे यवन ह्या पृथ्वीतलावर धुमाकूळ घालीत आहेत ! असो. हा सारा इतिहास शाळाकॉलेजांतल्या मुलांनाही माहीत असतो म्हणून त्याचा येथें विस्तार करीत नाहीं.

---

## ५ प्रतीकार.

परकीयांच्या टोळधाडीचा प्रतीकार हिंदूंनीं पहिल्यापासून शेवटपर्यंत केलेला आहे. शिकंदराच्या वेळपासून ग्रीक, सिथियन, शक, हूण आणि नंतर आरब, अफगाण, तुर्क, मोंगल आणि शेवटीं पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रज हीं ख्रिस्ती राष्ट्रें यांचा हिंदूंनीं वेळोवेळीं मोठ्या शौर्यानें लढून प्रतीकार केलेला आहे. शहाबुद्दीन घोरीपर्यंत १५०० वर्षें परकी-

यांचे हल्ले हिंदूंनीं परतविले. शिकंदरच्या लोकांस **चंद्रगुप्तानें** परतविले. बॅक्ट्रियांतून आलेल्या ग्रीक लोकांचा समाचार **पुष्यमित्रानें** घेतला. शकांनीं तक्षशिला व मथुरा येथें एक शतक राज्य केलें पण इ. स ५७ च्या सुमारास **विक्रमादित्यानें** त्यांना नामशेष केले. शकांच्या दुसऱ्या टोळीस **पुलुमायी शातकर्णी** यानें इ. स. १२५ च्या सुमारास पराभविलें. कनिष्क, हविष्क व वासुदेव ह्या पंजाबांत राहिलेल्या परकी-राजांचा पाडाव ४ थ्या शतकांत **समुद्रगुप्तानें** केला, व त्यांच्या मिहिरकुल नांवाच्या दुष्ट राजास **यशोधर्म** राजानें जिंकलें. सातव्या शतकांत हूणांना कनोजच्या **श्रीहर्षानें** कायमचे हाकून लावले. महंमद गिजनी वगैरेंनीं लुटालूट केली व हिंदूंना पराभूत केले पण ते येथें राहिले नाहींत. घोरींना अडवणारा शेवटचा राजा **पृथ्वीराज** हा होय. बाराव्या शतकाच्या आरंभापर्यंत हे अडवण्याचे प्रकार चालले होते. इ. स. १२०० पासून मात्र मुसलमानांनीं हिंदुस्थानांत कायम वस्ती केली. पुढील काळांत त्यांच्याशीं ५०० वर्षे रजपूत राजे अत्यंत शौर्यानें लढले. मोगलांनीं मात्र ( इ.स. १५२६–१७०७ ) दोनशें वर्षे दिल्लीस राहून हिंदुस्थानचें साम्राज्यवैभव पुरेपूर उपभोगलें. रजपूत व शिख, विजयानगरचे कन्नड राजे व मऱ्हाठे यांनीं अत्यंत बिकट परिस्थितींतही यवनांशीं लढून हिंदु संस्कृति कायम टिकवली. या सर्वांत खरोखर अग्रेसरत्वाचा मान मेवाड उर्फ **उदेपूर** येथील राजघराण्यास दिला पाहिजे. या एकाच घराण्यांत बाप्पा रावळ, समरसिंह, हमीर, रायमल, संग्रामसिंह उर्फ संग राणा, उदयसिंह, प्रतापसिंह, अमरसिंह, राजसिंह इ० सिंहासारखे भीमपराक्रमी वीरपुरुष निर्माण झाले व त्यांनीं पादशाहीचीं हाडें खिळखिळीं केलीं. विजयानगरच्या साम्राज्यांतही कृष्णदेवराय व रामराय यांनीं मुसलमानी सत्ता तुंगभद्रेच्या खालीं न येऊं देण्यांत मोठाले पराक्रम केले. पुढें मराठ्यांचे पराक्रम सर्वत्र मशहूरच आहेत. गुजराथ व बंगाल हे प्रांत मुसलमानांना भुसभुशित सांपडले, पण **रजपूत**, **कन्नड**,

**मराठे व शेवटीं शीख** ह्या क्षात्रधर्मप्रबळ जातींनीं मुसलमानांना सुखानें राज्य करूं दिलें नाहीं, मराठयांनीं तर त्यांच्या साम्राज्याची और्ध्व-देहिक क्रियाच केली. आपण तत्कालीन महाराष्ट्राच्या इतिहासाकडे थोडें वळूं, व मुसलमानी सत्तेचे महाराष्ट्रावर काय परिणाम झाले तें नंतर पाहूं.

---

## ६ खिलजींच्या स्वाऱ्या व जाधवराज्याचा शेवट.

देवगिरीच्या यादवराजांचें व विशेषतः रामदेवराव जाधवाचें वर्णन पहिल्या खंडांत ' महाराष्ट्रदेश व मराठे लोक ' ह्या प्रकरणांत सविस्तर केलें आहेच. रामदेवराव शके ११९३ ( इ. स. १२७१ ) मध्यें गादी-वर आला. जलालुद्दीन खिलजी ह्या कडव्या पठाणानें गुलाम वंशाच्या शेवटच्या सुलतानास ठार मारून दिल्लीचें तख्त बळकावलें व ( इ. स. १२८९–९५ ) पांच वर्षे राज्य केलें. देवगिरीच्या ऐश्वर्याचें वर्णन ऐकून जलालुद्दीनचा पुतण्या **अल्लाउद्दीन** मोठी फौज घेऊन दक्षिणेंत उतरला ( इ स. १२९३ ). दिल्लीहून देवगिरी ७०० मैल दूर. विंध्याद्रीच्या जंगली पहाडांतून मार्ग काढीत तो अकस्मात् देवगिरीच्या ( यासच पुढें दौलताबाद हें नांव मिळालें ) तटाखालीं येऊन थडकला ! राम-देवास याची दादही नव्हती ! त्याचें गुप्त हेरांचें खातें सुप्त झालें होतें. फौज तयार नव्हती ! थोडी झटापट होऊन यवन किल्ल्यांत शिरला. अल्लाउद्दीनानें किल्ल्यास वेढा दिला व शहरांत लुटालूट व जाळपोळ केली. फितूरी झाली होती असें दिसतें ! कसाबसा तह करून व मोठी खंडणी घेऊन अल्लाउद्दीन परत गेला. कपटानें चुलत्यास ठार मारून तो तख्तावर बसला व त्यानें २० वर्षे राज्य केलें ( इ. स. ११९६ ते १३१६ ). मोंगलांनीं पहिल्या सहा वर्षांत दिल्लीचें तख्त घेण्यासाठीं चार वेळां प्रयत्न केले, दोन दोन लाख लोक दिल्लींत घुसले, मातबर लढाया झाल्या पण शेवटीं मोंगलास मागे रेटून अल्लाउद्दीन यशस्वी झाला. ह्या कडव्या पठाणांपुढें मोंगलांचें कांहीं चाललें नाहीं. मेवाड उर्फ उदेपूर

येथील शूर व सुंदर **राणी पद्मिनी** हिच्यावर त्याचा डोळा होता, पण तिच्या वीर रजपुतांपुढेंही त्याचें कांहीं चाललें नाहीं. अल्लाउद्दीनानें गुजराथ घेऊन देवगिरीच्या जाधव राजावर दुसऱ्यांदा हल्ला केला. त्याचा शूर सरदार मलीककाफूर हा माळव्यांतून खानदेशांतून देवगडावर चाल करून आला, तेव्हां रामदेवरावानें त्याच्याशीं तह केला व तो त्याजबरोबर दिलीस गेला. तेथें अल्लाउद्दीनानें खंडणी घेऊन व त्याचा सत्कार करून त्यास परत स्वदेशीं पाठविलें. तेव्हांपासून रामदेवरावानें मुसलमानांशीं सलोखाच ठेवून आपलें राज्य संभाळलें. मलीक काफूरनें दक्षिणेकडील बरींच हिंदु राज्यें जिंकलीं व मुसलमानांचा क्रूरपणा साऱ्या दक्षिणदेशांच्या प्रत्ययास आणून दिला ! हा देवगड व पैठण ह्या शहरांवरून दाक्षिणेंत उतरला. रामदेवराव मरण पावला व त्याचा मुलगा वेळेवर खंडणी देईना म्हणून मलीक काफूरनें त्यास ठार मारिलें. देवगडचें राज्य मुसलमानी राज्यास जोडलें गेलें. जाधवांची सत्ता याप्रमाणें इ. स. १३१२ ( शके १२३४ ) मध्यें समाप्त झाली. महाराष्ट्र मुसलमानांच्या सत्तेखालीं गेला ! मलीक काफूरला त्याच्या दुष्टपणाला कंटाळून तो दिल्लीच्या तख्ताच्या प्रयत्नांत असतांनाच त्याच्या पहारेकऱ्यांनीं ठार केलें. त्याच्या दुष्कृत्याचें फळ त्याला मिळालें, पण महाराष्ट्र स्वातंत्र्याला मुकला. यापुढें ३०० वर्षें महाराष्ट्राला पारतंत्र्यांत पडावें लागलें.

---

## ७ विजयानगरचें साम्राज्य ( इ. स. १४३६–१५६५ )

देवगडचें जाधवांचें राज्य बुडाल्यानंतर १०० वर्षें दक्षिणेंत बजबजपुरीच माजली होती. महंमद तघलखाच्या स्वारीचा खेळखंडोबा झाल्यावर हिंदूंनीं प्रथम डोकें वर काढलें, पण यावेळेस गोदेच्या किंवा कृष्णातीरच्या लोकांस कोणी योग्य पुढारी न मिळाल्यामुळें मुसलमानी सत्तेस प्रतिबंध करण्याचा मान तुंगभद्रातीराकडील हिंदूंस म्हणजे कानडी लोकांस मिळाला. इ. स. १२९३, १३०६ व १३१८ ह्या तीन

सालच्या मुसलमानी स्वाऱ्यानीं देवगडच्या साम्राज्याचा पुरा नाश केला व महाराष्ट्र परतंत्रतेच्या गर्तेत पूर्णपणें सांपडलें. १३०९ मध्यें मलीक काफूरनें तैलंगणांतील वरंगळचें राज्य व १३१० मध्यें म्हैसुराकडचें होयसळ बल्लाळांचें राज्य बुडविलें आणि नर्मदेच्या खालची सारी दक्षिण १३२६ त मुसलमानांस मोकळी झाली! धर्म बुडाला, स्वातंत्र्य गेलें, पुरातन राज्यें गेलीं, मंदिरें जमीनदोस्त झाली, संपत्ति उत्तरेकडे गेली, दैन्य, दारिद्य, दुष्काळ यांनीं सारा दक्षिणदेश व्यापला! अशा बिकट समयीं तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर विजयानगरशहरीं ( सुग्रीवाच्या किष्किंधा-नगरीच्या जागीं ) विद्यारण्यस्वामी ऊर्फ माधवाचार्य यांच्या साह्यानें **हरिहर आणि बुक्क** या बंधूंनीं एका प्रचंड हिंदुसाम्राज्याची मुहूर्तमेढ इ. स. १३३५ मध्यें रोंविली. दहा वर्षांपूर्वीं वरंगळचें राज्य मोंगलांनीं बुडविल्यावर तेथील राजघराण्यातील हे बालसिंह लपतछपत तुंगभद्रेच्या काठीं अनागोंदीचें छोटेसें हिंदु राज्य होतें त्याच्या आश्रयास आले! अनागोंदी तुंगभद्रेच्या उत्तरतीरावर असून तेथील राजे ७०० वर्षांपासून राज्य करीत होते. वरील बंधु प्रथम तेथील राजाच्या पदरीं राहिले. महंमद तघलखाचा पुतण्या बहुद्दीन यानें १३३४ मध्यें अनागोंदीवर हल्ला करून तें राज्य बुडविलें व एकच वर्षानीं ( इ. स. १३३५ ) वरील बंधूंनीं विजयानगर शहर वसविलें! हीं दोन्हीं शहरें समोरासमोर होतीं, तुंगभद्राच मध्यें! अनागोंदीचें सरदार व फौज हरिहरास येऊन मिळाली. हरिहरानें बुक्क यास कारभारी नेमलें व हळूहळू चौफेर हात-पाय पसरण्यास सुरुवात केली. बदामीचा किल्ला बांधला. विजया-नगरच्या जागीं हल्लीं हंपी म्हणून गांव आहे. हरिहरानंतर **बुक्क** गादी-वर आला व त्यानें ३५ वर्षें राज्य केलें ( इ. स. १३४४–७९ ) व तुंगभद्रेपासूनची सर्व दक्षिण आपल्या राज्यास जोडली. याच समयास इ. स. १३४७ मध्यें कलबुर्गा येथें हुसेन गंगूनें प्रख्यात बहामनी राज्याची स्थापना केली. विजयानगर व बहामनी ह्या दोन्ही राज्यांच्या अखेरपर्यंत

एकसारख्या लढाया दोनशें वर्षें चालू राहिल्या. फेरिस्ता म्हणतो कीं मुसलमानांच्या अंगीं शौर्य व क्रौर्य नसतें तर शक्ति, संपत्ति व राज्य-विस्तार या बाबतींत अत्यंत श्रेष्ठ अशा विजयानगरच्या साम्राज्यापुढें बहामनीशाहीचा टिकाव लागला नसता, आणि हिंदूंचें साम्राज्य इतकें जवळ असल्यामुळेंच बहमानीशाहीचे सुलतान हिंदु प्रजेशीं विशेष कडवेपणानें न वागतां साधारणपणें मिळूनमिसळूनच वागूं लागले ! **दुसरा हरिहर** यानें २० वर्षें राज्य केलें ( १३७९ ते १३९९ ). यानें अनेक मंदिरें बांधून त्यांस नेमणुका करून दिल्या. ह्या घराण्यांत देवराय ( १४१९ ते १४४४ ) मोठा प्रतापी निघाला. शेवटचा राजा दुबळ व व्यसनी निघाला तेव्हां **नृसिंहरायानें** ती गादी चालविली. ह्या दुसऱ्या घराण्यांत शूर व धर्मशील राजे निपजले. **कृष्णदेवराय** ( १५०९-१५३० ) **अच्युतराय** ( १५३०-१५४२ ) व **सदाशिवराय** ( १५४२ ते १५६७ ) हे विशेष प्रौढप्रतापी निघाले. बाहामनीशाही संपुष्टांत येऊन तिचीं पाच शकलें झालीं. नृसिंहराय महापराक्रमी होता. त्यानें मुसलमानांशीं सतत झगडून आपलें राज्य मजबूत केलें. **कृष्णदेवरायाची** कीर्ति व कर्तृत्व-शक्ति सर्व राजांत फार मोठी होती. एका पोर्तुगीज गृहस्थानें त्याच्या दर-बारीं राहून प्रत्यक्ष पाहिलेल्या हकीकती लिहून ठेवल्या आहेत. कृष्णराय शूर, उदार, धार्मिक, न्यायनीतिनिपुण व सर्व शारीरिक कसबांत पुरा निष्णात होता. सारा दक्षिणहिंदुस्थान त्याच्या अमलाखालीं असून कैक राजे त्यास करभार देत. १५२० मध्यें आदिलशहाशीं मोठ्या शौर्यानें लढत त्यानें त्याजपासून रायचूर व मुद्गल हे परगणे जिंकून घेतले. त्यानें तेलंगण घेतलें. त्यानें फार मोठालीं मंदिरें व तलाव बांधलें. कृष्ण-स्वामीच्या देवळाजवळ त्यानें नृसिंहाचा एक २५ फ़ूट उंच व १७ फ़ूट रुंद असा प्रचंड पुतळा तयार केला. तो एका दगडाचा कोरलेला आहे. कृष्णरायाच्या खजिन्यांत सोनें, मोतीं, रत्नें, माणकें, हिरे इत्यादि संपत्ति अगणित होती. अप्पया दीक्षित हा प्रख्यात विद्वान् त्याचे पदरीं होता.

असो. पूर्वपश्चिमकिनाऱ्यांपर्यंत त्याचें राज्य पसरलें असून व्यापाराच्या मिषानें द्रव्याचे प्रवाह राज्यांत सतत येत असत. राजधानीचा घेर ६० मैलांचा असून तेथें २० लाखांवर वस्ती होती ! प्रासादतुल्य हजारो वाडे असत. शहराची लांबी १० मैल व रुंदी १२ मैल होती. विजयानगरच्या ऐश्वर्याचें वर्णन अनेक प्रवाशांनीं करून ठेवलें आहे. एवढें वैभवशाली साम्राज्य त्याकाळीं दुसरें कोठेंच नव्हतें. ओरिसासुद्धां सारा पूर्वकिनारा विजयानगरच्या साम्राज्यांत सामील झाला होता. गोवळकोंड्याच्या खाणी त्याच्याच मालकीच्या होत्या. सीलोनचे वकील नजराणे घेऊन येत. मंगलोरला मोठें आरमार होतें. विजयानगरच्या साम्राज्याचे दोन इतिहास सेवेल व सूर्यनारायणराव यांनीं लिहिलेले प्रसिद्ध आहेत. विजयानगरच्या साम्राज्याचा शेवटीं पांचही मुसलमान सुलतानांनीं एक होऊन तालिकोटच्या लढाईत पाडाव केला ( इ. स. १५६५ ) व दक्षिणचें हिंदु ऐश्वर्य विलयास गेलें; तथापि या लढाईनंतर ६५ वर्षांनींच महाराष्ट्रांत शिवरायाचा जन्म होऊन मराठी साम्राज्याची टोलेजंग इमारत उभारण्यास प्रारंभ झाला. मुसलमानांच्या जगद्व्याळ सत्तेस दक्षिणेंत विजयानगरच्या साम्राज्यानें खच्ची केलें व तिचा पूर्ण नाश पुढें मराठ्यांनीं केला !

---

## ८ बहामनीशाही ( इ. स. १३४७ ते १४९० )

विजयानगरच्या पाठोपाठ बहामनीशाहीची स्थापना कलबुर्ग्यास झाली, तथापि ह्या शाहीचें बारसें आणि बारावा दोन्ही विजयानगरनें पाहिलें ! हिचा संस्थापक **हसन** हा दिल्लीस गंगूनामक एका ब्राह्मणाच्या घरीं गुलाम होता. गंगूनें त्याच्या जन्मकाळावरून 'तुला राज्य प्राप्त होईल' असें भविष्य त्याला सांगितलें होतें. त्याप्रमाणें घडलें. तेव्हां हसननें त्याला आपल्या राज्याची फडणिशी दिली व आपल्या नांवास गंगू हें पद लाविलें ! हिंदूंशीं स्नेह जोडण्याकडे याची प्रवृत्ति होती.

पश्चिमेस सह्याद्रि, दक्षिणेस कृष्णानदी व पूर्वेस तैलंगण अशा प्रदेशांवर म्ह० मुख्यतः महाराष्ट्रावर बहामनीशाहीचा अंमल १५० वर्षे चालला हसनगंगूनें ११ वर्षें राज्य केलें. नंतर याचा मुलगा **महंमदशहा** ( इ.स. १३५७ ते १३७५ ) याच्या व त्याच्या पुढील शहांचीं विजयनगरच्या राजांशीं सतत युद्धें चालत. जयापजय आलटून पालटून दोहींकडे असत, तथापि एकंदरीनें विजयानगरच्या हिंदु राजांनीं ह्या शाहीस बरेंच धाकांत ठेवलें. यानें प्रत्येक खात्यावर एक असे आठ खात्यांवर आठ प्रधान नेमले. यानें बहामनीशाहीचीं होन वगैरे नाणीं पाडलीं. बहामनीशाहींत शिया व सुनी आणि परदेशी व दक्षिणी अशा प्रकारची फूट मुसलमानांत असे. हिंदूंचा दाब मुसलमानांवर पडून त्यांचा कडवेपणा कमी झाला. बहामनी-शाहींत **महंमूदखान** ( इ. स. १३७८ ते १३९७ ) हा प्रजावत्सल व न्यायी निघाला. मुसलमानांत विरळ असें यानें एकपत्नीव्रत पाळलें. विद्वानांच्या संगतीची याला आवड होती. यानें शाळा व अनाथगृहें स्थापिलीं. दुष्काळांत धान्य स्वस्तदरानें देण्याची यानें तजवीज केली. **फिरोजशहा** ( १३९७ ते १४२२ ) याचे कारकीर्दीत बाहामनी शाहीच्या ऐश्वर्याचा कळस झाला. विजयानगरवर यानें दोन वेळ जय मिळविले. फिरोजनें एकाच दिवशीं भिन्न जातीच्या प्रांतांतल्या २०० बायकांशीं लग्न लावलें व झनानखाना फुगवला ! हा अनेक विद्यांत प्रवीण होता. फिरोज व अहंमद या उभयतांच्या कारकीर्दीत सय्यद गौसूदराज नांवाचा अवलिया फार प्रख्यातीस आला ! हे दोन शहा व हजारो मुसल-मान त्यांच्या भजनीं लागले. त्याच्या दर्शनास राजेरंक जात व मोठाले नजराणे देत. हा १३२२ मध्यें १०० वर्षांचा होऊन वारला. त्याचा दर्गा कलबुर्गा येथें आहे. तें तेव्हांपासून यात्रेचें मोठें स्थान झालें आहे. वली हा दयाळु होता. २ वर्षांच्या दुष्काळानंतर माणसें ( १४२४।२५ ) पाण्यावांचून मेलीं. तो वनांत जाऊन रडला व त्यानें पर्जन्यासाठीं प्रार्थना केली. तासांत पाऊस पडला. तेव्हांपासून ह्याला वली म्हणूं लागले.

**अहंमदशहा वली** ( इ. १४२२ ते १४३४ ) हा विद्वानांचा व साधूंचा चाहता होता. ह्मणून यास वली ( साधु ) ह्मणत, आणि यानें अनेक सत्कृत्यें केलींही पण तीं मुसलमानांच्या दृष्टीनें ! यानें कित्येक हिंदूंस ठार मारले व कित्येकांस बाटवून मुसलमान केले. कित्येक देवळें पाडून तेथें यानें मशीदी बांधल्या ! यानें आपली राजधानी बेदर येथें नेली. याची कारकीर्द हिंदूंस त्रासदायक झाली. **अलाउद्दीन शहा** ( १४३४–१४५७) हाही वलीसारखाच निघाला. हा शेवटीं व्यसनासक्त झाला तेव्हां कोंकणांतील लोकानीं याची सत्ता झुगारून देण्याचा प्रयत्न केला. कोकणांतील दाभोळ (चोल) व त्याच्या वरचे घाटमाथ्यावरील जुन्नर, चाकण, कोल्हापूर वगैरे प्रांत बहामनीशाहींतच होते; तथापि कांहीं मराठे आपापले किल्ले बळकावून स्वतंत्रपणें नांदत होते. सह्याद्रीच्या हवापाण्यांत स्वातंत्र्याचे वारे खेळूं लागले पण त्याना यश येण्यास अद्याप कालावधि होता ! इ. स. १४५३ मध्यें शहानें तुजार नांवाचा मुसलमान सरदार फौजेनिशी कोंकणावर पाठविला. त्यानें शिर्के यास जिंकले पण त्याला ‘ मुसलमान हो नाहींतर तुला ठार मारतों ’ अशी धमकी दिली. याप्रसंगीं शिरके यानें कारवाई केली. त्याचा चुलतभाऊ शंकरराव खेळणा परगण्याचा राजा होता. विशालगड व त्याखालचा भयंकर जंगली प्रदेश याचा त्यांत समावेश होत असे. तुजार सरदाराशीं बाह्यतः नम्रता दाखवून शिरके त्यास म्हणाला ‘ हा शंकरराव माझा दुष्मान आहे. आपण त्याच्यावर चालून जाऊन त्यास आधी मुसलमान करूं. मी तर मुसलमान होण्यास उत्सुक आहेच ! ’ तुजार हुरळून गेला. शिरक्यानें तुजार व त्याची १७ हजार मुसलमान फौज गर्द झाडींत नेऊन सोडली व शंकररावास इषारा दिला. त्या मुसलमानांस झाडींतून बाहेर पडण्याचा मार्ग सांपडेना. शंकररावानें तीनही बाजूंनीं गराडा घालून तुजारासगट त्याची सारी फौज कापून काढली ! याप्रमाणें शिरक्यानें आत्मसंरक्षण केलें व शत्रूचा निःपातही केला. ही कपटरीति रजपुतात नव्हती. टकास महा-

ठक असे मराठे आहेत हा अनुभव मुसलमानांस अजून यावयाचा होता. मद्यपान व बेताल विषयभोग यांत हे सारे बादशहा निमग्न असत. दंगेधोपे मारामाऱ्या व खून राजघराण्यांत व प्रजेंत सतत चालू असत. चौदा बादशहांपैकीं चार शूर व कर्ते होते. यांत कोणा बादशाहाचे डोळे काढले गेले व कोणाचे खून झाले ! एकंदर १५० वर्षांत १४ बादशहा झाले. शेवटच्या दोनतीन शहांच्या कारकीर्दी ह्मणजे त्यांचा वजीर **महंमद गवान** याचें चरित्र होय. दक्षिणेंत आलेल्या किंबहुना हिंदुस्थानांत आलेल्या सर्व मुसलमानांत महंमदगवानाच्या योग्यतेचा दुसरा कोणी झाला नाहीं. हा अत्यंत शूर असून यानें अनेक हिंदु-राजांशीं लढाया करून सर्व ठिकाणीं अपूर्व यश मिळविलें. कर्नाटक, तेलंगण, कांची, ओढया, माळवा इ० ठिकाणीं त्यानें यशस्वी मोहिमा केल्या व बाहामनीशाहीचा राज्यविस्तार व दरारा वाढविला. कोकण व गोवा हे दुर्गम भागही त्यानें पूर्णपणें जिंकले व खेळण्याच्या शंकर-रावाचा पराभव करून खेळणा घेतला व विजयानगरच्या ताब्यांतील गोवेही घेतलें. हा जुन्नर, चाकण, वांई, दाभोळ, कोल्हापूर वगैरे सर्व प्रांत फिरून आला व सर्वत्र बहामनीशाहीचा त्यानें झेंडा मिरविला. असा शूर असून हा मोठा मुत्सद्दी होता. राज्याचे चार सुभे होते ते यानें आठ केले. न्यायाची, लष्करची व जमाबंदीची उत्कृष्ट व्यवस्था केली. हा स्वतः विद्वान् असून विद्वानांचा साहाय्यक होता. अरबस्थान इराण येथून विद्वान् याच्या भेटीसाठी येत व याच्या वाड्यांत इतिहास, धर्म, नीति काव्य इत्यादि विषयांवर उत्कृष्ट चर्चा चाले. पातशाहाच्या कल्याणार्थ हा सारा पगार व संपत्ति रात्रीं वेषांतर करून फकीर बैरागी लोकांस वांटून टाकीत असे. शेवटीं हा साधु म्हणूनच मरणाधीन झाला. पादशहाचे दक्षिणीपक्षाचे कैफी व विषयी सरदार याचा द्वेष करूं लागले व त्यांनीं याला पादश-हाकडून देहांतशिक्षा ( १४८१ ) देवविली ! त्यावेळीं याचें वय ७८ वर्षांचें होतें. हा शांतपणें 'देव पातशहास क्षमा करो' असें म्हणत मृत्यु-

वश झाला ! मुसलमानी रियासतींत बेइमानीपणा सर्वत्र दिसतो. महंमद-गवानासारखा राज्यनिष्ठ, स्वामिनिष्ठ, इमानी, विद्वान् व निर्लोभवृत्तीचा दुसरा कोणी दिसत नाहीं ! जगाच्या इतिहासांतील अत्यंत थोर पुरुषांत याची गणना झाली पाहिजे. याच्या मरणानंतर शहास पश्चात्ताप होऊन तो ' गवान गवान ' करीत मेला. हा हिंदुसलमानांत सारखाच लोकप्रिय होता. याच्या पश्चात् बाहामनीशाहीचा लवकरच अंत होऊन ( १४९३ ) तिचीं पांच शकलें झालीं:—

( १ ) निजाम उल्मुल्ख बहिरी याचा मुलगा अहंमद बहिरी यानें अहंमदनगर वसविलें ( इ. स. १४९४. ) हा निजामशाहीचा पहिला पातशहा होय ( इ. स. १४८९ ते १६३७ ).

( २ ) युसफ आदिलशहा यानें विजापुरास स्वतंत्र शाही स्थापिली ( १४८९ ते १६८६ )

( ३ ) फत्तेउल्ला यानें १४८४ मध्यें वऱ्हाडांत इमादशाही स्थापन केली (१४८४ ते १५७२). हें राज्य नगरच्या निजामशाहीस जोडलें गेलें.

( ४ ) कासीम बेरीद यानें बेदर येथें बेरीदशाहीचें तक्त उभारलें ( १४९२ ते १६५६ )

( ५ ) कुली उर्फ कुतुबशहा यानें गोवळकोंड्यास कुतुबशाही स्थापिली ( १५१२ ते १६८७ )

या पांच शाह्यांपैकीं नगरची निजामशाही व विजापूरची आदिलशाही ह्या दोन मुसलमानी सत्तेखाली बाहामनीशाहीनंतर महाराष्ट्रास नांदावें लागलें ! या दोन शाहींच्या अमलांतूनच शिवशाही पुढें निर्माण झाली व महाराष्ट्राचें ग्रहण एकदाचें सुटलें !

निजामशाही व आदिलशाही यांचा विचार करण्यापूर्वी महाराष्ट्राचा एक भाग जो खानदेश त्याच्याकडे पाहूं. गुजराथेप्रमाणें खानदेशवरही मुसलमानांच्या अंमलाखालीं दीर्घकाल राहण्याचा प्रसंग आला. दिल्लीचा

पातशहा फिरोज तघलख यानें इ. स. १३७० मध्यें मलीक फरूकी यास खानदेशचा सुभेदार नेमलें. पुढें लवकरच तो स्वतंत्र झाला. त्यानें शेती सुधरून लोकांना भरभराटीचें सुख दिलें. त्यानें ३० वर्षे राज्य सुखानें केलें. त्याच्या मुलानें अशीरगडचा बळकट किल्ला हिंदुराजापासून कपटानें घेतला, व बऱ्हाणपूर शहर बांधून ती खानदेशची राजधानी केली. खानदेश मूळचा सुपीक प्रदेश, व लोक सुखी पण थोडे आळशी! सह्याद्रीच्या हवापाण्याची खळबळ तेथें नाहीं. अकबर पातशहानें इ. स. १५५९ मध्यें खानदेश मोगलसाम्राज्यास जोडला. वरील पांच शाहीं-पैकीं नगर व एलिचपूर येथील संस्थापक मूळचे ब्राह्मण असल्यामुळें तेथील हिंदूंचा विशेषसा छळ झाला नाहीं व शहाजी, धनाजी, उदाराम ह्या पुरुषांना राजकारणांत महत्व प्राप्त झालें.

## ९ विजापूरची आदिलशाही ( इ. स. १४८९ ते १६८६ ).

**यूसफ आदिलशहा** ( १४८९–१५१० ) हा विजापूरच्या आदिलशाहीचा संस्थापक. महंमद गवानानें याचे गुण जाणून याला योग्यतेस चढविलें. हा तुर्कवंशी पुरुष शूर व इमानी होता. यानें विजापूर शहरांत सुंदर इमारती बांधल्या. याचा काळ सारा लढायांतच गेला. यानें मुकुंदराज नामक मऱ्हाठा सरदाराच्या मुलीशीं लग्न केलें व तिचें नांव **बुबूजीखान** ठेविलें. यानें विजापूर राज्याचा विस्तार केला. शौर्य, विद्या, मुत्सद्दीपण इ० गुणांत हा महंमद गवानाचा शिष्य होता. बायको मराठी असल्यामुळें याची मराठमंडळावर मेहेर नजर असे. मराठ्यांस व सामान्यतः हिंदूंस यानें दरबारचीं मोठालीं कामें दिलीं. यानें दरबारचें दप्तर मराठी भाषेंत ठेवलें व यामुळें मराठे सरदार व मराठे ब्राह्मण यांना पुढें सरकतां आलें! विजापूरचा मजबूत तट यानें बांधिला. विजयानगरच्या मुलखांपैकीं बराच मुलूख यानें आपल्या अमलाखालीं आणला. युसफ सर्वसंग्राहक होता. हा परदेशी पक्षाचा पुढारी होता पण

गादी मिळाल्यावर हा दोन्ही पक्षांशीं समतेनें वागला. हा शियापंथी होता पण हा सुन्नींशीं गोडीनें वागला. विजापूर व गोवळकोंडा येथील शहा शिया होते व शेवटचे तीन प्रायः सुन्नी होते. याचा मुलगा **इस्माईल आदिलशहा** ( १५१०–१५३४ ) हा गादीवर आला तेव्हां नऊ वर्षांचा होता. बापानें याला कमालखानाच्या स्वाधीन केलें. त्याच्या मनांत स्वतःच राज्य बळकवावें असें होतें. याचा सुगावा लागतांच बुबूजीखान हिनें आपल्या मुलाचा बचाव करण्यासाठीं यास ठार मारविले व त्याच्या मुलानें बंड पुकारतांच त्यालाही पकडून देहांत शिक्षा दिली. बुबूजी-खानाच्या अंगांत मऱ्हाठी पाणी खेळत होतें. ती जात्या शूर व मुत्सद्दी होती. विजापूर घेण्यासाठीं नगर व वऱ्हाडचे राजे एक होऊन आले पण त्यांस आदिलशहानें फोडून त्यांचा पराभव केला. दोन तीन वर्षें निजामशहानें विजापूर घेण्यासाठीं युद्धें केलीं पण शेवटीं त्याचाच पराजय झाला. बेदरच्या शहास यानें पकडून आपल्या दरबारीं ठेवले. याच्या पुढें निजामशहाचें कांहीं चाललें नाहीं. हा शहा फार चांगला होता. यास काव्यगायनाची व विद्वत्संगतीची आवड होती. हा न्यायी व दयाळू होता, तसाच हा क्षमाशील व शांत होता. चहाडांचें यानें चालूं दिलें नाहीं. याचा भाऊ **इब्राहीम** ( १५३४–१५५७ ) याच्याही कारकीर्दीत दप्तर फारशींत न ठेवतां मराठींत ठेवण्यांत आलें यामुळें निरनिराळ्या खात्यांतून मराठे सरदार व ब्राह्मण यांना नोकऱ्या मिळाल्या. याचा वजीर आसदखान हाही राजनिष्ठ व कर्तबगारीचा होता. त्यानें विजापूरचें राज्य मोठ्या योग्यतेस चढविलें. त्याची मुलगी इब्राहीम-शहास दिली होती. इब्राहीमशहानें विजयानगरावर चाल केली ( इ. स. १५३५ ). कोंकणांतील बंडें शहानें स्वतः जाऊन मोडलीं. आसदखानाच्या शत्रूंनीं त्याजविषयीं शहाचें मन कलुषित केल्यामुळें त्यास ठार मारण्याचें प्रयत्न झाले पण आसदखान महंमद गवानासारखा इमानी होता. त्यानें दूर राहून शहाचें कल्याण केलें. अहं-

मदनगर, विजयानगर येथील मोठाल्या फौजा शहावर चालून आल्या तरी त्यांचा त्यानें फडशा पाडला. हा शहा शेवटीं शेवटीं संशयीखोरपणानें चिडका झाला व हिंदुमुसलमानांस सारख्याच क्रूरतेनें वागवूं लागला! १५४९ मध्यें आसदखान १०० वर्षांचा होऊन मेला. तो मूळचा तुर्क असून फार सज्जन होता. याची कीर्ति मोठी होती. विजापुरावरील संकटाचें निवारण त्याच्या गुणांमुळें झालें. पोर्तुगीज लोक कपटी व क्रूर म्हणून त्यांचा मात्र तो द्वेष करीत असे. इब्राहीमशहाही शेवटीं वेडेचाळे करूं लागला. **अली अदिलशहा** ( १५५७-१५८० ) हा सुसंस्कृत व सुस्वभावी होता. कल्याणी व सोलापूर हे आदिलशाहीचे किल्ले निजामशहानें घेतल्यामुळें तो विजयानगरास रामरायाच्या भेटीस गेला. भेट मोठया थाटाची व सलोख्याची झाली. रामरायाच्या मदतीनें त्यानें आपलें किल्ले परत घेतले व निजामशाहीचा मुलूख बेचिराख केला; पण मदतीस आलेल्या हिंदू फौजेनें मोठाल्या इमारती व मशिदी फोडल्या व घरें जाळलीं. यामुळें मुसलमान संतप्त झाले व तालिकोटच्या लढाईंत ( १५६५ ) त्यांनीं विजयानगर बुडविलें. या कामीं आदिलशहालाही सामील व्हावें लागले. पुढें निजामशहा व आदिलशहा यांच्यांत लढाया झाल्या. तह झाले. दोघांनीं रेवदंडा-गोवा इकडे पोर्तुगीजांवर चाल केली पण त्यास पराभूत व्हावे लागले. या शहाचा एका खोजानें खून केला. या शहाचा मुख्य वसूली कामगार-फडणीस-एक ब्राह्मण होता.

**इब्राहिम आदिलशहा** दुसरा ( १५८० ते १६२६ ) हा अलीचा पुतण्या गादीवर आला तेव्हां ९ वर्षांचा होता. सारा कारभार त्याची चुलती चांदबिबी पाहत असे. कामीलखानानें सत्ता बळकावयाचा प्रयत्न केल्यामुळें चांदबिबीनें त्यास कैद केले व कारभार किश्वरखानाकडे दिला. तोही तसाच निघाला तेव्हां चांदबिबीनें सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. याच्या कारकीर्दींत पुष्कळ गोंधळ सरदारासरदारांत चालले होते. अकबराच्या सैन्यानेंही पुष्कळ मोठी फौज याच्यावर पाठविली पण यानें अकबरास मोठी खंडणी व नजराणे देऊन आपली मुलगी त्याचा मुलगा

दानियल यास दिली व राज्याचें मरण वांचविलें. यानें आपलें मुख्य लक्ष राज्यसुधारणेकडे दिलें. हा न्यायी व प्रजाहितदक्ष होता. हा विद्येचा व कलाकौशल्याचा भोक्ता असून याला गायनवादनाची आवड होती. यानें राजवाडयांत सरस्वतीची मूर्ति स्थापिली असून तो पौर्णिमेस हिंदी गवय्ये संगतीला घेऊन तिची पूजा करी असें म्हणतात ! याच्या कांहीं फर्मानावर 'श्रीसरस्वती' अशीं अक्षरें आहेत. यानें इ. स. १५८८ मध्यें संगीत महाल बांधून त्यांत तिची स्थापना केली. याच्या सर्वधर्मसहिष्णुतेवर प्रसन्न होऊन हिंदु त्याला 'जगद्‌गुरु' म्हणत !' तोडलमलानें जी वसुलाची पद्धत मोगलराज्यांत बांधून दिली होती ती यानें आपल्या राज्यांत सुरू केली. जमीनीची मोजणी करून दर ठरविले. हा सुनी होता तरी धर्माच्या बाबतींत याचें वर्तन समतोलपणाचें होतें. यानें हिंदूंस त्रास दिला नाहीं इतकेंच काय पण लष्करांत व इतर खात्यांत ब्राह्मण व मराठे यांचा भरणा केला. पोर्तुगीज लोकांस जिंकणें बरेंच कठिण आहे हा मागचा अनुभव पाहून यानें त्यांच्याशीं सलोखा ठेवला व त्यांच्या व्यापारास मोकळीक ठेवली. खिस्ती धर्मोपदेशकांस त्यानें आश्रय दिला. वाडे रंगविण्यासाठी पोर्तुगीज चित्रकार ठेवले. अकबरापेक्षाही धर्माच्या बाबतींत हा अधिक उदार होता. याच्या वेळीं प्रेक्षणीय इमारती बांधल्या गेल्या. यानें विजापूर शहराचा विस्तार केला. त्याची स्वतःची मशीद विजापुरास आहे ती बांधण्याचें काम ३६ वर्षें चालले होतें. त्यास ५२ लाख रुपये खर्च झाला. याच्या खजिन्यांत पैका मुबलक होता. **महंमद आदिलशहा** (१६२६–१६५६). महाराष्ट्रीयांना राज्यभाराचें शिक्षण व अनुभव मिळत चालले तसतसे त्यांच्या अंगांत स्वातंत्र्याचें वारें खेळूं लागलें; त्यांच्या अंगचा पराक्रम व बुद्धितेज प्रगट होण्याची वाट पाहूं लागलें ! वंकापूर येथील राजा कदमराव यानें बंडाचें निशाण उभारलें पण तो पकडला गेला व त्याचें शहानें डोकें तोडलें ! मुराररराव नामक एक मराठा जहागीरदार होता तोही थोडी चळवळ करूं लागला. मोगली फौज

विजापुरावर चाल करून आली तेव्हां आदिलशाहीच्या वतीनें मुराररावानें त्या फौजेचा धुव्वा उडविला व ती विजापूरची हद्द सोडून पळाली. मुरारराव परांड्याचे किल्यावर गेला तेथें प्रसिद्ध मुल्कमैदान नांवाची तोफ होती ती आदिलशहाचे हुकमावरून त्यानें विजापुरास आणली ती अद्याप तेथेंच आहे. हिला महांकाळी तोफ म्हणतात. हिचें वजन ४० ते ६० खंडीपर्यंत आहे. लांबी ४० फ़ूट, तोंड २ फ़ूट ४ इंच व जाडी १ फ़ूट आहे. ही निजामशहानें पाडली होती पण परांड्याचा किल्ला आदिलशाहीकडे आला तेव्हां ती ' विजापूरची तोफ ' झाली. मोगलांशीं लढतांना आदिलशहानें निजामशहास मदत केली या रोपानें मोगलांनीं विजापुरावर चाल केली तेव्हां रणदुल्लाखान व शहाजी यांनीं मोगलांचा सडकून पराभव केला. या वेळीं शहाजीनें जुन्नरचा कारभारी श्रीनिवासराव यास पकडून पुणें प्रांत काबीज केला व १२ हजार स्वार हाताखालीं ठेवले. मोगल सरदार मोहबतखान यानें निजामशाही बुडविली व दौलताबादचा किल्ला घेतला. यानंतर शहाजी राजे आदिलशाहीच्या नोकरींत शिरले. येथून पुढील इतिहास येथें देण्याचें कारण नाहीं. अली आदिलशहा ( १६५६ – १६७२ ) व शिकंदर आदिलशहा यांच्या कारकीर्दीत महाराष्ट्रांत शिवाजीराजे यांनीं स्वतंत्र मराठी राज्य स्थापन केलें. आदिलशाहींत अनेक नांमांकित इमारती व मशीदी बांधल्या गेल्या. सोलापूर, परिंडा, मिरज इ० मजबूत किल्ले बांधले गेले. आदिलशाहींत, घाडगे, निंबाळकर, डफळे, माने, सावंत, भोसले इ० अनेक मराठे सरदार उदयास आले. आदिलशाहीनें २०० वर्षे अपार वैभव भोगलें. हत्ती, घोडे, हिरेमाणके, यांचा राज्यांत सुकाळ झाला. हिंदुप्रजेस विशेष त्रास न होतां उलट मराठे वैभवास चढले.

## १० निजामशाही ( इ. स. १४८९–१६२७ )

निजामशाहीचा संस्थापक हा मूळचा तेलंगी ब्राह्मण, विजयानगरच्या तिमाप्पाचा मुलगा मुसलमानांनीं कैद करून बाटविलेला ! महंमद गवा-

नानें याला उदयास आणलें. ह्याचा मुलगा **अहंमद.** हा जुन्नरास राहत असे. यानें शिवनेरी किल्ला, लोहगड, तोरणा व दक्षिणचे बहुतेक किल्ले घेतले व राजापुरापर्यंत कोंकण घेतलें. बहामनीशाहीच्या शेवटच्या राजाशीं झुंजून हा स्वतंत्र झाला व यानें १४९४ मध्यें अहंमदनगरची स्थापना करून ती आपली राजधानी केली. याच्या बापाचें नांव मलीक नाईक निजामुल्मूख असें होतें म्हणून हा **अहंमद** निजामशहा नांवानें प्रख्यातीस आला. यानें प्रथम दौलताबादचा किल्ला वेढा लावून घेतला. यानें एकपत्नीव्रत पाळलें व द्वंद्वयुद्ध खेळून तंट्याचा निकाल करण्याची यानें प्रथा पाडली. हा सद्गुणी होता. याचा मुलगा **बुऱ्हाण निजामशहा** ( १५०८–१५५३ ) यानें विजापूरच्या आदिलशहाच्या मुलीशीं लग्न केलें. याचा दिवाण कंबरसेन यानें हुषारीनें कारभार केला. याच्या वजनामुळें मराठे लोक दरबारांत घुसले. हा शिया होता व गुजराथ, खानदेश व विजापूर येथील सुनी पंथाच्या शहांनी एक होऊन याच्यावर हल्ले केले. विजयानगरच्या राजाची मदत घेऊन यानें विजापुरावर अनेक स्वाऱ्या केल्या. कंबरसेनानें डोंगरी मुलखांतील मऱ्हाठ्यांस वळवून घेऊन मोठाल्या जागा दिल्या. याला पांच मुलगे होते. **हुसेन निजामशहा** ( १५५३–१५६५ ) याच्यापाशीं ६०० तोफा होत्या, व त्यावर युरोपांतील लष्करी खात्यांत नावाजलेला रुमीखान हा मुख्य होता. निजामशहाच्या तोफांचा उपयोग तालिकोटच्या लढाईंत होऊन रामराय मारला गेला. हा २४ व्या वर्षी मेला तरी याला मुलें बरींच होतीं. हिंदूंच्या संगतीनें मुसलमानही बालविवाह करूं लागले. **मुर्तुजा निजामशहा** ( १५६५–१५८६ ). विजयानगरचें राज्य कसें वांटून घ्यावें याविषयीं मुसलमानांत तंटे सुरू झाले व आपापसांत हे शहा लढत राहिले. या शहाचा जंगीजखान नामक हुषार वजीर होता त्याच्या साह्यानें यानें वऱ्हाडच्या इमादशहास ठार मारलें व वऱ्हाड आपल्या राज्यास जोडलें. बेदरचें राज्यही जिंकण्याचें याच्या मनांत होतें पण बेदरच्या वकिलानें याच्या

मनांत जंगीझखानाविषयीं वाईट भरवून दिल्यामुळें यानें त्या राजनिष्ठ शूर पुरुषास ठार मारलें. मग यास पश्चात्ताप झाला व हा वेडेचाळे करूं लागला ! राज्यकारभार चार सरदारांवर सोंपवून हा एकांतांत राहूं लागला. शहाचा मुलगा मिरज हुसेन यानें शहास ठार मारलें. पुढें आपापसांत खून, मारामाऱ्या होत. बुऱ्हाणशहाच्या वेळीं रेवदंड्याच्या पोर्तुगीज लोकांवर स्वारी केली. अखेर अहंमद नांवाचा एक मुलगा नगरच्या गादीवर बसवून पाहिले. अकबरचा मुलगा मुराद यानें नगरास वेढा दिला. तेव्हां **चांदबिबीनें** मोंगलांशीं युद्ध आरंभिलें. प्रथम चांदबिबीनें ( १५९४-१६०० ) व नंतर **मलिकंबरानें** निजामशाही वांचविण्यासाठीं मोंगलांसीं २५ वर्षे शौर्यानें व राजनिष्ठेनें लढाया केल्या पण शेवटीं निजामशाहीचें राज्य मोंगलांनीं मोडून टाकलें. मलिकंबरानें जमाबंदीची व्यवस्था राज्यांत उत्तम लावली. या कामीं त्यास मराठ्यांची मदत चांगली झाली. साबाजी आनंदराव, शिवाजीपंत व सखाराम मोकाशी वगैरे त्याचे मदतगार होत. उत्तरेकडील तोडरमल्लाची पद्धत त्यानें उचलली. वसुली काम ब्राह्मणांच्या हातीं आलें. जमीनी लागवडीस दिल्या. शेतांवर नक्त देणें ठरविलें. रयतेवरचा जुलूम गेला. लोकांत आबादानी झाली. शहाजी हा शूर सरदार व मुत्सद्दी नांवलौकिकांस चढला. त्याच्या साह्यानें १६२४ मध्यें निजामशाहीनें मोंगलांवर जय मिळविला तरी शेवटीं निजामशाही गेलीच !

## ११ गोवळकोंड्याची कुतुबशाही ( इ. स. १५१२-१६८७ )

बहामनीशाही, निजामशाही व आदिलशाही या तीन शाहींचा महाराष्ट्राशी साक्षात् संबंध होता तितका कुतुबशाहीचा नव्हता. ह्या शाहीचा तेलंगणाशी मुख्य संबंध होता. तेलंगणांत अनेक शतकें अनेक हिंदुराजांनीं अंमल गाजविला होता. तेथील राजांना मुसलमानांनीं जिंकावें, त्यांनीं खंडणी द्यावी आणि पुन्हा पहिल्यासारखें राज्य करावें, एकीकडचें राज्य मोडलें तर दुसरीकडे स्थापावें, असा क्रम तीन शतकें चालला होता,

पण बाहामनीशाहीच्या नाशानंतर **कुली कुतुबखान** यानें गोवळकोंडयास आपली शाही स्थापित केल्यावर मात्र तेलंगणाचें स्वातंत्र्य खरें खरें नष्ट झालें. महाराष्ट्र स्वतंत्र झाला पण तेलंगण किंवा आंध्र गोवळकोंडयाच्या अंमलाखालीं गेला. कुलीनें गोवळकोंडा शहर वाढविलें, तेलंगण जिंकून आपलें राज्य पूर्वसमुद्राला नेऊन भिडविलें. यानें ६०।७० किल्ले घेतले व बांधले व मुसलमानी धर्माचा प्रसार लोक भराभर बाटवून केला! त्याच्या मुलानें त्याला ठार मारलें, पण तोही ५।६ वर्षांत मेला. **इब्राहीम कुतुबशहा** ( १५५०–१५८० ) ह्याच्या कारकीर्दींत विजयानगर बुडालें व सर्वत्र मुसलमानी अंमल चालू झाला. हा शहा शांतताप्रिय व न्यायी होता. त्याला बिकट परिस्थितींत राज्यपद मिळवून देण्याचें काम **जगदेवराव** नामक सरदारानें केलें व शहानें त्याचे उपकार स्मरून त्यास आपला वजीर केलें. दुसरा एक वजनदार सरदार रायराय नांवाचा होता. ह्या दोघांच्या वर्चस्वामुळें हिंदूंचा व विशेषतः मराठयांचा भरणा राज्यांत पुष्कळ झाला. मुसलमान सरदारांस हें सहन झालें नाहीं व त्यांनीं शहाकडे तक्रारी केल्या. शहानें शेवटीं रायरायास ठार मारलें. जगदेवरावानें मग तेथून पाय काढला. तो सर्व प्रांत उजाड करीत वऱ्हाडांत गेला. तो अत्यंत कर्तबगारीचा पुरुष असल्यामुळें बुऱ्हाण निजामशहासही तो जड झाला. मुसलमानांचें जूं टाकून मराठयांचें स्वतंत्र राज्य स्थापावें अशी त्यास इच्छा झाली. ती सफळ झाली असती तर हैद्राबादेस आज मराठयांचें राज्य दिसलें असतें! पण भवितव्यता वेगळी होती. जगदेवरावाबरोबर पुष्कळ दक्षिणी व इराणी आरबी फौज होती. तो कुतुबशहाच्या राज्यांत आला पण पराभव पावून विजापुराकडे गेला. त्यानें आदिलशाही व कुतुबशाहीच्या एकवट फौजेचा पराभव करून विजापूरचें राज्य वांचविलें. त्यानें देशांतील नाईकांच्या मदतीनें तेलंगणांतील सर्व किल्ले काबीज केले! कुतुबशहाला त्याची इतकी धास्ती पडली कीं त्यानें त्याची मनधरणी करून त्याला परत बोलावलें. जगदेवरावानें सर्व हिंदु राजांचे

तंटे मिटवून ऐक्य केलें. पण पुढें ! यापुढें जगदेवरावाचें नांवही ऐकूं येत नाहीं ! एवढया पराक्रमी, कर्तबगारीच्या पुरुषास शिवाजीसारखें यश देण्याचें देवाच्या मनांत नव्हतें असें म्हणून स्वस्थ बसलें पाहिजे ! असो. इब्राहिम कुतुबशहाच्या लढाया विजापूर, मऱ्हाठे व तिकडील हिंदु राजे यांजबरोबर एकसारख्या चालल्या होत्या. गोवळकोंडयांतील बहुतेक प्रसिद्ध इमारती त्याच्या कारकीर्दींत झाल्या आहेत. त्याचा परदेशाशीं व्यापारही चांगला चालत असे. राज्य समृद्ध होतें. त्याला ३० मुलें झालीं, त्यांतले ६ मुलगे व १३ मुली त्याच्या मरणसमयीं हयात होत्या. **महंमदकुली कुतुबशहा** ( १५८०-१६११ ). गोवळकोंड्यापासून ५ कोसांवर मुसी नदीच्या कांठीं यानें १५८५ मध्यें एक नवीन शहर वसविलें. त्याची भागावती नांवाची एक आवडती बायको होती तिच्या स्मरणार्थ त्यानें त्यास भागानगरी असें नांव दिलें व मुलगा हैदर याच्या नांवावरून त्यास हैदराबाद असें म्हणूं लागले ! यानें गांवांत नळ आणून पाण्याचा पुरवठा केला. जुम्मा मशीद, चार मिनार, या प्रसिद्ध इमारती व कैक वाडे, दवाखाने, धर्मशाळा यानें बांधल्या. शेतीला पाण्याची सोय केली. त्याच्या कारकीर्दींत ७८ लक्ष होन इमारतींकडे खर्च झाले ! याच्या पश्चात् अबदुला हुसेन ( १६११ ते १६५८ ), अबू हसन (१६५८-१६८७) हे दोन पातशहा होऊन औरंगजेबानें हें राज्य शेवटीं बुडविलें. ह्या घराण्यानें प्रजेच्या सुखसोयीकडे फार लक्ष दिलें. यांतील सहा पुरुषांनीं १७५ वर्षें राज्य केलें. प्रत्येकानें राज्यसुख पुष्कळ भोगलें.

## १२ मुसलमानी राजसत्तेचे परिणाम.

( १ ) मुसलमानांचे इतिहास म्हणजे प्रायः रक्तपात, खून, अनिवार राज्यतृष्णा, विश्वासघात व धर्मवेडाचीं कृत्यें यांच्या काहण्या होत! लेकानें भावास, पुतण्यानें चुलत्यास व सेवकानें स्वामीस कपटानें ठार मारून राज्य बळकवायचें व नंतर 'पीछेसी आयी' या न्यायानें पुढ-

त्यांनीं हाच कित्ता गिरवायचा—या गोष्टी दिल्लीपतींच्या व दक्षिणेंतील मुसलमानी शहांच्या इतिहासांत खच्चून भरल्या आहेत ! यामुळें राजसत्तेच्या हातून लोकसुधारणेचीं चांगलीं कृत्यें होण्यास अवकाशच सांपडला नाहीं. प्रजेच्या सुदैवानें एखादा पातशहा न्यायी व पापभीरु निघाला तर चार व्यसनी, दुराचारी व क्रूर निघायचे. महंमदगवान, चांदबिबी, मलिकंबर यासारखे चारदोन सुबुद्ध व राज्यरक्षक सेवक निघाले तर मालकांशीं व प्रजेशीं बेमान झालेले चौदा निघायचे ! यामुळें यांच्या राज्यांत संतोष व सुखशांति कधींच नांदली नाहीं.

( २ ) मुसलमानी राजांना एक वेड मात्र चांगलें होतें—उत्तम इमारती बांधायच्या. आग्रयाचा ताजमहाल तर जगविख्यात आहेच, पण कलबुर्गा, गोवळकोंडा, विजापूर, भागानगर इ० ठिकाणच्या प्रचंड सुंदर इमारती—राज्यें गेलीं तरी—मुसलमानी राजसत्तेचीं स्मारकें म्हणून राहिल्या आहेत. याबरोबरच उद्वेग आणणारी एक गोष्ट म्हणजे यवनांनीं हिंदूंचीं शेंकडों मंदिरें पाडलीं, मूर्ति छिन्नविछिन्न केल्या व कलाकुसरीचीं हिंदु—शिल्पकलेचीं सुंदर कामें नष्ट केलीं. राक्षसी धर्मवेडापुढें कलाकुशलतेचीही त्यांनीं किंमत ओळखली नाहीं ! त्यांच्या आततायीपणाचीं चिन्हें गांवोगांव अद्याप दृग्गोचर होतात.

( ३ ) बहामनीशाहीच्या पहिल्या शंभर वर्षांत मुसलमानांनीं विशेषसा कडवेपणा दाखविला नाहीं, पण पुढें त्यांना ताळतंत्र राहिला नाहीं. उत्तरहिंदुस्थानाइतका कडवेपणा त्यांना दक्षिणेंत दाखवितांही आला नाहीं. एक तर विजयानगर, वारंगळ, द्वारसमुद्र ( हैसूर ) इ. ठिकाणीं हिंदूंचीं राज्यें होतीं व तीं फीनिक्स पक्ष्याप्रमाणें एके ठिकाणीं दाबलीं तर दुसरीकडे लगेच उत्पन्न होत असत. वारंगळचें हिंदु राज्य बुडालें तरी तत्संबंधी राजपुरुषांनीं दुसरीकडे विजयानगरचें हिंदु साम्राज्य उभें केलें. तेंही बुडालें तरी त्याचीं दहापांच छोटीं मोटीं संस्थानें निर्माण झालीं. मुसलमानांनीं दडपावें व हिंदूंनीं पुन्हा डोकें वर काढावें असे हुतुतूचे

खेळ सर्वत्र चालले होते, यामुळें मुसलमानांनाही सुखाची झोंप आली नाहीं व त्यांचीं राज्येंही दीर्घकाळ टिकलीं नाहींत. दुसरें असें कीं दाक्षिणेंतील लोक अधिक कणखर आहेत, त्यांना दडपणें मुसलमानांनाही शक्य नव्हतें. तेलंगणांत म्ह० आंध्रांत, कर्नाटकीयांत व महाराष्ट्रीयांत अंगचे शौर्यवीर्यादि परंपरेचे क्षात्रगुण असल्यामुळें त्यांच्यावर सर्वकाळ राज्य करणें सुखाचें व सोपें नव्हतें. दक्षिणेंतील मुसलमानांस आपापसांतील कलह मिटवण्यासाठीं व राज्यें टिकवण्यासाठीं हिंदूंची मदत घेणें अवश्य झालें व प्रथम विजयानगरकर नंतर मराठे उदयास आले. मुसलमानी सत्तेच्या ढिलाईचा त्यांनीं चांगला उपयोग करून घेतला.

( ४ ) राष्ट्राचे पुढारीवर्ग जे क्षत्रिय व ब्राह्मण ते तेजोहीन झाले. त्यांची स्वातंत्र्यप्रीति दबली गेली. खुषीनें वा नाखुषीनें त्यांना मुसलमान बादशहांपुढें माना लववाव्या लागल्या, त्यांची नोकरीचाकरी करून पोट भरावें लागलें. परतंत्रतेंत उत्पन्न होणारे दुर्गुण त्यांच्यांत उत्पन्न झाले व त्यांची सर्व प्रकारें अधोगति झाली. पारतंत्र्यांत कर्तृत्वशक्तीला व बुद्धिमत्तेला वाव राहतच नाहीं. ज्यांनीं राज्यें चालवायचीं त्या क्षत्रियांना परकीय राजांपुढें हात जोडावे लागले. महाराष्ट्रांतला अस्सल मऱ्हाठावर्ग हा क्षत्रिय बीजाचा आहे, त्यांच्यांत क्षत्रियाचें रक्त खेळत आहे, हें आम्ही पहिल्या खंडांत दाखविलेंच आहे. राष्ट्रकूट, शालिवाहन, चालुक्य, जाधव, शिलाहार यांच्या राजवटींत मऱ्हाठ्यांनीं मोठमोठे पराक्रम केले होते; पण मुसलमानी राजसत्तेच्या वरवंट्याखालीं ते दोन शतकें चेपले गेले. त्यांनीं अपरिहार्य परिस्थितिपुढें मान लवविली. भोसले, घोरपडे, माने, खटावचे घाडगे हे प्रथम बहामनीशाहींतच चमकले. आदिलशाहींत जावळींचे चंद्रराव मोरे, फलटणचे रावनाईक निंबाळकर (मूळचे पवार,) वाडीचे सावंत हे उदयास आले. निजामशाहींत भोसले, जाधवराव, महाडिक, मोहिते इ. घराणीं नांवलौकिकास चढलीं. नीरा-ववरणा नद्यांच्या मधला प्रांत कबज्यांत घेण्यासाठीं विजापूरच्या पातशहानें

कर्नाटकांतील नाईक मोरे यांस प्रथम बोलावले व त्यांनीं शिरजोर व शूर शिरके ( व महाडीक, मोहिते, मामूलकर, गुजर इ० त्यांचे हस्तक ) यांना पादाक्रांत करून तो सारा डोंगराळ मुलूख म्ह० वाई—जावळीचा प्रांत जिंकून घेतला व ते तेथील राजे बनले. चंद्रराव मोरे ही त्यांस पदवी मिळाली. विजापूरकरांनीं चढविलेले व सर्वस्वी परवश झालेले हे मोरे शिवाजीला पुढें डोईजड झाले व त्याला या ' जावळीच्या राजांचा ' निःपात करावा लागला ! घोरपडे व भोंसले हे मूळ उदेपूरच्या राज-घराण्यांतले, पण घोरपडे म्हणून बहामनीशाहींत विख्यात झाल्यावर त्यांच्या पुढें दोन शाखा झाल्या. एक कापशीचे घोरपडे व दुसरे घटप्रभेचे घोरपडे. कापशीच्या घोरपड्यांना पुढें अमीरउलुमराव असा विजापूर-शाहीकडून किताब मिळाला. डफळापूरचे पाटील डफळे हे विजापूर-करांकडूनच मानास चढलेले डफळे ' जत संस्थान ' संभाळून राहिले. हे मूळचे चव्हाण. सावंतवाडीचे देशमुख सावंत ( मूळचे भोंसले ) हे विजापूरकरांतर्फे पोर्तुगीजांशीं लढून मान्यतेस चढले. निजामशाहींतले प्रमुख सरदार जाधवराव हे शिंदखेडचे देशमुख. हे देवगडकर जाधव-राजांचे वंशज. ह्याच घराण्यांतले लुखजी जाधवराव १० हजार स्वारांचे मनसबदार झाले. भोंसले घराण्यांतील कर्णसिंग व भीमसिंग यांनीं एक कोंकणी किल्ला घोरपड लावून घेतला म्हणून त्यास घोरपडे हें आडनांव पडलें व त्यास राजाबहादर हा किताब व मुधोळची जहागीर मिळाली. तात्पर्य, ज्यांनीं स्वतंत्र राज्यें भोगायचीं त्यांना कालगतीनें यवनांची सेवा करून त्यांच्याकडून मोठेपणा मिळवावा लागला ! ' जमिनीपर्यंत लवून कुर्निसात करणें तुम्हांस बादशहानें कृपाळूपणानें माफ केलें आहे आतां संतोषानें चाकरी करावी ' हा ' मान ' मालोजी घोरपडे यास विजापूरच्या बादशहाकडून स्वीकारावा लागला ( इ. स. १५२१ ) ! कालचक्रापुढें क्षत्रिय वांकले तसे ब्राह्मणांनाही वांकावें लागलें ! असो. कालचक्रानें

उलट खाली तेव्हां याच क्षत्रिय मराठ्यांत 'क्षत्रियाकुलावतंस' व 'गोब्राह्मणप्रतिपालक' शिवप्रभु निर्माण झाले !

( ५ ) फेरेस्तानें आपल्या इतिहासांत म्हटलें आहे कीं 'बाहामनीशाहीच्या प्रारंभीं गंगू ब्राह्मणानें जमाबंदीचें काम आपल्या अंगावर घेऊन यवनांची सेवा करण्याचा पायंडा पाडला पण त्याच्यापूर्वीं ब्राह्मण लोक सेवाधर्म करीत नसत. सेवा करणें हें ते कमीपणाचें समजत. पण त्याच्या वेळेपासून ब्राह्मण लोक परक्यांच्या नोकरींत शिरून पोट भरूं लागले व त्यांतच मोठा मान आहे असें मानूं लागले !' महालिंगदासानें ( शक १४८७ ) आपल्या सिंहासन-( विक्रम )-बत्तिशी नामक ग्रंथांत यवनांची सेवा करून स्वजनांशीं करडेपणानें वागणाऱ्या 'म्लेंच्छ ब्राह्मणांवर' खूप कोरडे ओढले आहेत. 'म्लेंच्छ ब्राह्मण' म्ह० म्लेंच्छांची सेवा करून म्लेंच्छप्राय झालेला ब्राह्मण ! तो 'इच्छा, हृदा, महिमा' म्हणजे आपल्या इच्छा, मन व मोठेपणा हे पार विसरून यवनांच्या नौकरींत शिरतो, व 'मी किंकर तुमचा । काम सांघावें' म्हणून सेवेची याचना करितो ! मी 'स्वामीचा स्वार्थ साधून देईन, धण्याचें उत्पन्न वाढवून दाखवीन व इमानें इतबारें चाकरी करीन' अशी आधींच कबुली देतो ! यवन त्याला मग 'मोठा हुद्दा' देतो. एकदा कां हा नौकरींत शिरला कीं हा 'पापमूर्ति होऊन परद्रव्यावर आर्त' ठेवतो व 'खोटेपण चित्तीं बहु' धरून 'जनपीडेस प्रवृत्त' होतो !

**सत्पात्रीं कदा न भजणें । तरी पाप करी चौगुणें ॥**
**ऐसा पापीष्ट तेणें । जन पीडिले ॥**
**तया षट्कर्माचा विसर । कारकोनि पडिभर ।**
**गायत्रीमंत्राचा अधिकार । थोडा तयासी ॥**
**दग्धाचि बोलणें तेणें । सखा सोइरा मित्र नेणे ।**
**लाचावरी तेणें । ठेविलें चित्त ॥**

त्याचें हें 'दुश्चरित्र' पुढें धण्यास ठाउकें झालें ! अर्थात् 'मग

तेणें धरोनि बंदिखाना घातलें। चाबुकामुखें आक्रंदे ' हा त्याचा स्वाभाविक परिणाम झाला !

**म्यां केली हरामखोरी। आतां न मारावें सोटवरी।**
**ऐसें बोलतां धोत्रावरी। विष्ठाचि केली ! ॥**
**ऐसा तो ब्राह्मण। म्लेंच्छ होय चौगुण।**

अस्सल म्लेंच्छापेक्षां तो चौपट वाईट निघाला ! हें स्वभावाचित्र लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. षट्कर्मांचा लोप झाला, ह्म० यजन–याजन–अध्ययन–अध्यापन–दान–प्रतिग्रह–हीं ब्राह्मणकर्में सुटलीं, ब्राह्मण निर्वाहासाठीं नौकरीचाकरी करून त्यांतच प्रतिष्ठा मानूं लागले, व त्यांचा नैतिक अधःपात झाला. कवीचें हें वर्णन अयथार्थ आहे असें कोण म्हणेल ? त्यांतही एखादा स्वधर्मरक्षण करून प्रजाहितार्थ आत्मदान करण्यास दामाजीपंतासारखा ब्राह्मण तयार झाला तर त्याची धन्यता गाण्यास राष्ट्र तयार होतेंच. जनार्दनस्वामीसारखा एखादा ब्रह्मनिष्ठ निघत असे, पण सेवाधर्माचा स्पर्शही होऊं न देतां ब्राह्मणकर्मानें वागून स्वधर्मरक्षणार्थ व स्वजनाभ्युदयार्थ अविरत श्रम करणारे नृसिंहसरस्वति, एकनाथ, रामदास यांसारखे पुण्यात्मे पुढें झाले त्यामुळें ब्राह्मणवर्णाचीही योग्यता वाढली. निरपेक्ष ज्ञानदान हें ब्राह्मणाचें मुख्य कर्म तें यांनीं केलें व देश उन्नतीच्या मार्गाला लागला.

( ६ ) ब्राह्मणक्षत्रियांच्या दूरवस्थेबद्दल व मुसलमानांच्या अत्याचाराबद्दल त्या वेळच्या मराठी वाङ्मयांत पुष्कळच लिहिलेलें आढळतें. धर्मरक्षक क्षत्रिय दुर्बळ, पराधीन व तेजोहीन झाल्यामुळें व ब्राह्मणवर्ग स्वधर्मच्युत झाल्यामुळें सारा समाज दीन दुबळा झाला व समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें दैन्यदारिद्र्यउद्वेगानें दुःस्थितिप्रत पावला. मुसलमानी सत्तेचें **एकनाथांनीं** आपल्या भागवतांतः—

**गाई ब्राह्मणांसी जाण। पीडा करिती दारुण।**
**क्षेत्रवित्तदाराहरण। स्वार्थें प्राण घेताती ॥**

असें वर्णन केलें आहे! ‘ गाई ब्राह्मणांना दारुण पीडा होत आहे व क्षेत्र (शेती ), वित्त व स्त्रिया यांची सुरक्षितता राहिली नाहीं,’ यापेक्षां त्यावेळच्या अस्मानी सुलतानीबद्दल अधिक काय लिहायचें राहिलें आहे ? नाथांनीं आपल्या अभंगांत ब्राह्मण नीचसेवा करून स्वकर्म सांडीत आहेत, क्षत्रियांनीं आपला प्रजापालनाचा धर्म सोडला आहे व इतर वर्ण अर्थातच निराधार झाले आहेत असें म्हटलें आहे. ‘ पीक न पिके धरणीं ’–अवृष्टि, अतिवृष्टि, दुष्काळ, रोग, अनाचार, दुराचार, नास्तिकणा, दंभ, यांचें पीक मात्र भरपूर आलें आहे असें नाथ सांगतात. मुसलमानांच्या ताबुतांबरोबर हिंदु लोक स्वाभिमान सोडून नाचतात, पीराला भजतात व त्यांचे उष्टें प्रसाद म्हणून खातात या निर्लज्जपणाचा त्यांनीं धिक्कार केला आहे:—

**दावलमलकाची पूजिती गदा । वर्षांतून फकीर होती येकदा ।**
**मग डोला होता थंडा । खाती मलिदा हिंदु तुर्कांचे कीं मायबाप ॥**

सीतेचा शोध करण्यास गेलेल्या मारुतीरायास लंकेंत काय आढळलें तें नाथांनीं आपल्या भावार्थरामायणांत वर्णिलें आहे. तेथें नाथांना वर्तमानकालीन स्थितीचें चित्र रेखाटावयाचें होतें असें दिसतें. लंकेंतही राक्षसांशिवाय सर्व वर्णांचें व जातींचे इतर लोक होतेच! ब्राह्मणक्षत्रियादि श्रेष्ठ वर्णांतही धर्मलोप झाला होता म्हणून त्यांना परमात्म्याची चिच्छक्ति जी सीतादेवी ती आढळली नव्हती. सीता त्यांच्या ‘ शोकस्थळींत ’ नसून ‘ अशोकवनिकेंत ’ होती! मारुतीनें ‘ वनें उपवनें काननें । देवालयें शिवस्थानें । मठमठिका ध्यानभुवनें । सीतेकारणें शोधिलीं ’ पण ‘ सीतासती तेथ नाहीं ! ’ त्यानें नगराच्या बाह्यप्रांतीं व नगराआंत ती शोधिली पण व्यर्थ! शैवदीक्षाधारी लोकांत, यज्ञकर्त्यांत व सर्वांत त्याला राक्षस–‘ गायी मारिती भक्षणार्थ ’ असे दिसले.

तेथें वेदपाठक होते, विजनांत आरण्यकें म्हणणारे विद्वान् होते, अग्नि-

होत्र व वेदाध्ययन होतें, कर्मठ ब्राह्मण होते, पण ' दया सत्य शुचित्वपण ' मात्र दिसत नव्हतें !

**जंव जंव शास्त्राची व्युत्पत्ती । तंव तंव अभिमानाची वस्ती ।**
**तेणेंचि गर्वाची होय स्फूर्ती । सीता सती तेथ नाहीं ! ॥**

बरें, **क्षत्रियांचे थाट** पाहिले तर तेही संपत्तीच्या ताठयानें फुगलेले !

**नाहीं वीरवृत्ती पुरी । मरणभयाची न फिटे शिरी ।**
**ऐसे भेड क्षत्रियांघरीं । सीतासुंदरी तेथ नाहीं ! ॥**
**मरणभय पोटा-आंत । तंव ते क्षत्रिय अति अशक्त ॥**

ब्राह्मणक्षत्रियांचीही ही दशा ! मग ' वैश्यांचे उदिमीं चित्त । अति लोलुप वांछिती वित्त ' अशा वैश्यांची व साळी, माळी, सुतार, शिंपी, सोनार, चाटे ( कापडवाले ), कासार, कळांतर ( व्याजबट्टा ) करणारे, व्यवहारी ( सराफ ), तेली, तांबोळी, रंगारी इ० वर्गांची तर गोष्टच बोलायला नको ! ब्राह्मणांकडे ' स्वाध्याय-अनध्याय, उदात्त-अनुदात्त इ० ' कोरड्या शब्दाची खणाखण ' व क्षत्रियांकडे ' निर्जीव शस्त्रांची खणाखण ! दोन्ही श्रेष्ठ वर्ण मानापमानाच्या ओझ्यांखालीं वाकलेले पण ' रामाची शक्ति ' कोणालाच सांपडलेली नाहीं ! सीता नाहीं मग राम कोठला ? ( सुंदरकांड अ० १ )

शक्तीचें बीज राष्ट्राच्या हातीं यावें अशी नाथकालीं समाजाला भूक लागली. शक्तीचा शोध या नंतरच्या काळांत समर्थ-शिवबांनीं केला. त्यांना ती सांपडली. मुसलमानी अंमलांत हिंदुप्रजेचे कोण अपार हाल झाले यांचें अनेक कवींनी वर्णन केलें आहे. तें गुरुचरित्रग्रंथांत, राघव चैतन्य व केशव चैतन्य यांच्या ओजस्वी ग्रंथांत व समर्थांच्या प्रभावशाली काव्यांत सांपडतें पण विस्तारभयास्तव येथेंच आवरतें घेतो. चैतन्यसंप्रदायाचे ग्रंथ पुण्याचे श्री. बाबासाहेब देशपांडे यांचे संग्रहीं आहेत, पण प्रसिद्ध झाले नाहींत. राष्ट्रपीडा पाहून तुकोबारायांचे कोमल मनही दुखवलें गेलें

( ७ ) भरतखंड ही जणूं जगांतील सर्व राष्ट्रांची उतारपेठच

झाली होती. नाथांचे नातु **मुक्तेश्वर** यांनीं आपले वेळीं मुसलमान व ख्रिस्ती राष्ट्रांविषयीं प्रसंगीं साभिप्राय विशेषणें लावून जे उल्लेख केले आहेत त्यांकडेही आपण थोडें लक्ष देऊं. मुक्तेश्वरी भारताची रचना शके १५६०–७० च्या सुमारास झाली असावी. शके १५९० मध्यें फ्रेंचांनीं आपली पहिली वखार सुरतेस स्थापिली म्हणून फ्रेंचांचा मात्र मुक्तेश्वर उल्लेख करीत नाहीं, बाकी पोर्तुगीज, डच, इंग्रज वगैरेंचा करितो. आदिपर्व ( अ० १५ अ० ३१ व अ० ४० ), सभापर्व ( अ० ५ व ८ ), वनपर्व ( अ० ८ ) इत्यादि ठिकाणीं त्यानें परदेशीयांचे स्पष्ट उल्लेख केले आहेत.

**( १ ) जावी, जंगी, फिरंगी क्रूर । नायी, इंग्रेज; मल्लोबार ।**
**काबे, कावटे, कंकमखर । जळतस्कर, मांसाशी ॥ ९ ॥**
**रूमशाम, खोरासान, । मुलतान, हबशान, अर्बस्तान ।**
**उजबेख पठाण, तुर्कमान । बदकशान; मेवात ॥१०॥**
**( २ ) जावी, जंगी, फिरंगी । इंग्रेज बहुधा रक्तरंगी ।**
**मलेबार नौकामार्गी । विघ्नकर्ते दंडिले ॥ १२७ ॥**
**पारसी भासीक ताम्रमुख, । आरब, हुरमुज, काळमुख ।**
**रूमशाम घोडमुख । नाट पाट पुलिंद ॥ १५६ ॥**

जावी ह्म० जावा बेटांतले डच, 'क्रूर फिरंगी' ह्म० पोर्तुगीज, रक्तरंगी व ताम्रमुख इंग्रज, मलबारांतील कडवे लोक, काबे ह्म० कांबे ह्म० खंबायतच्या आखातांतले, खरकंकम ह्म० कोकणकिनाऱ्याकडचे खळ ( हे मांसाशी मासे खाऊन राहणारे ) व जळतस्कर ह्म० चाचे लुटारू लोक, रूमशाम ह्म० कॉन्स्टँटिनोपल, खोरासान, मुलतान, हबसान, अरबस्तान, उजबेख जातीचे पठाण, तुर्कमान ह्म० तुर्क लोक, पारसी, अरब, घोडमुख ह्म० घोडयांचे मुखवटे घालणारे ' मानव आहार जयांचा ' असे तिबेटाकडील मनुष्यभक्षक लोक इ० भरतखंडांतील व बाहेरचे क्रूर व लुटारू लोकांचे उल्लेख मुक्तेश्वरानें केले आहेत! ह्या सर्वांनीं

प्रजेला त्राहि भगवान् करून सोडले होते. ' समुद्रवासीय म्लेंच्छ जाती। नामें सांगतां नेणो किती ?' ( सभा० ८–७० ) ' म्लेंच्छाचिया महासनीं। संहारती पशूंच्या श्रेणी ' ( सभा. ४०–४५ ) महासनीं ( महाशनीं ) ह्म० मोठया आहारांत हजारो पशु मारले जात ! ' एक फिरंगी रक्तवर्ण। खुरासनी पांडुरवर्ण। बर्बर जन्मले कृष्णवर्ण। स्थूलघ्राण लंबोष्ट,–काळ्यारंगाचे ' स्थूलघ्राण लंबोष्ठ ' ह्म० अर्थात् आफ्रिकेंतले नीग्रो. रक्तवर्ण फिरंगी ह्म० युरोपिअन लोक, पांडुरवर्ण खोरासनी ह्म० मुसलमान व कृष्णवर्ण आफ्रिकेंतले नीग्रो.

( ८ ) महाराष्ट्रांत, विशेषतः गोवेप्रातांत, युरोपांतील **पोर्तुगीज** लोकांनीं आपली पथारी पसरण्यास आरंभ केला ! वास्कोडिगामा हा इ. स. १४९८ सालीं जहाजें घेऊन कालिकत येथें आला. त्यानंतर १२ वर्षांनीं अलबुकर्कनें गोवा शहर घेतलें व व्यापाराचीं सर्व सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. हळूहळू हा वणवा गोवाप्रांतभर पसरला. पोर्तुगीज लोकांचीं अमानुष क्रूरतेचीं कृत्यें इतिहासांत नमूद आहेत ! तदनंतर डच, इंग्रज, फ्रेंच वगैरे लोकही हिंदुस्तानांत व्यापाराच्या व खिस्तधर्मप्रसाराच्या मिषानें घुसले ! पुढचा इतिहास सर्वांस माहीत आहेच. आपल्या धर्ममताचा प्रसार करण्यासाठीं पाद्री भटांनीं मराठी भाषेंत ग्रंथ लिहिण्यासही आरंभ केला ! फादर स्टिफन्सनें आपलें खिस्तपुराण इ. स. १६१४ मध्यें लिहिलें. फादर कुवा यानें पीटरपुराण इ. स. १६३४ मध्यें प्रकाशित केलें, एका फ्रेंच पाद्यानें १५ हजार ओव्यांचा एक ग्रंथ लिहून त्यांत हिंदुधर्माची मनसोक्त निंदा केली ! मुसलमानांचें एक संकट अंगवळणी पडत चाललें होतें तों या खिस्तधर्मीयांच्या दुसऱ्या संकटानें आपला चंचुप्रवेश करून ठेवला ! स्टीफनच्या खिस्तपुराणाच्या तीन आवृत्त्या रोमन लिपींत इ. स. १६१४, १६४६ व १६५३ ह्या वर्षी म्हणजे शिवशाहीच्या आरंभकाळींच छापून गोवेंप्रांतांत प्रसिद्ध झाल्या होत्या, पण ही छापण्याची कला गोव्यांतील खिस्ती लोकांनाच माहीत होती !

महाराष्ट्रांत तिची माहितीही कोणास नव्हती ! ती माहीत झाली असती तर वामनमुक्तेश्वरांच्या व रामदासतुकारामांच्या कवितांचा प्रसार त्याचवेळीं महाराष्ट्रांत छापील पुस्तकांच्या रूपानें मोठया प्रमाणांवर झाला असता !

( ९ ) उत्तरेकडे आरब, तुर्क, अफगाण, पठाण, मोगल ह्या कडव्या जातींचे लोक मध्यआशियांतूनच झंझावातासारखे कोसळत व वाटेल तसे अत्याचार करीत. त्यांना पुरून उरले एक रजपूत वीर. दक्षिणेंतील मुसलमान म्हणजे प्रायः येथीलच पहिले हिंदु ! त्यांच्या रक्तांत हिंदुत्व होतें, राहणें बसणें हिंदूशीं असें ! शिवाय शिया-सुनी, परदेशी-दक्षिणी या आपापसांतल्या फुटीमुळेंही त्यांना हिंदूंना जवळ करावें लागे. हिंदु स्त्रियाही नरम नव्हत्या. चितोडला पद्मीनीसारखी वाघीण निघाली तर विजापूरला आपलें मूळचें मराठपण न विसरणारी व मऱ्हाठयांना पुढें आणून मराठी भाषा दरबारी भाषा करणारी व मुत्सद्दी बाण्याची बुबुजीखान ही निपजली. ही विजापूरच्या आदिलशाहीचा संस्थापक-युसफ याची बायको-मुकुंदराव नामक मराठा सरदाराची बहीण-असून आदिलशाहीचा सारा वंश तिच्यापासून झाला आहे. मराठयांच्या बायकाही पुरुषांप्रमाणेंच मर्दानी स्वभावाच्या व बुद्धिमंत आहेत. आदिलशाहींत मराठयांचें पाऊल प्रथमपासूनच पुढें पडायला ही बुबूजीखानच कारण झाली. मराठे वीर, ब्राह्मण मुत्सद्दी व मराठी भाषा यांचें ऊर्जित विजापुर दरबारांत वाढत गेलें व त्यांतून महाराष्ट्र साम्राज्याचा उदय झाला.

हजारो-नव्हे लाखो-हिंदु स्त्रीपुरुषांना जबरदस्तीनें बाटविण्यांत आले व मुसलमानांची संख्या वाढत जाऊन हिंदूंची घटत चालली. बाटलेल्यांपैकीं कांहीं हिंदूंच्या ऊर्जितास कारण झाले पण त्यांतले बहुसंख्य अस्सल मुसलमानांपेक्षांही हिंदूंना अधिक तापदायक झाले ! हजारो हिंदु स्त्रियांनीं खुषीनें मृत्यूस कवटाळले पण त्यांनीं गोषा पत्करला नाहीं, केवळ जुल्म जबरदस्तीनेंच कांहीं स्त्रियांना मुसलमानांनीं गोषांत नेले.

( १० ) फिरोज तघलखाचा वजीर मक्बुलखान हा मूळचा तैलगणांतील एका उच्च कुळांतला हिंदु होता. तो फिरोजचा वजीर असून त्याचा आवडता सरदार होता. अल्लाउद्दीन खिलजीचा केवळ उजवा हात व त्याचा राज्यविस्तार करणारा शूर सरदार मलीक काफ़ूर हा मूळचा एका हलक्या जातीचा हिंदु होता, तसाच मलीक खुस्रू हा गुजराथेंतील परिया म्ह० अत्यंज होता. हे मूळचे हिंदु असून मुसलमानांच्या राज्यवृद्धीसाठीं यांनीं जीवापाड मेहनत केली व धर्मांतर केल्यानंतर हे स्वधर्मभक्षक बनले हें आश्चर्य आहे ! निजामशाही लोदी हा एका हिंदु सोनाराचा मुलगा असून पुढें बाटला व नांवालौकिकास चढला. गुजराथचें मुसलमानी राज्य स्थापन करणारा मुजफरखान हा मूळचा हिंदु होता. वऱ्हाडच्या इमादशाहीचा संस्थापक फत्तेउल्ला हा मूळचा तेलंग ब्राह्मण असून वऱ्हाडची सुभेदारी करित होता. पाथरी येथील वंशपरंपरेचा कुळकर्णी भैरवभट म्हणून एक ब्राह्मण होता. त्याचा मुलगा तिमाभट उर्फ तिमाप्पा याला मुसलमानानीं जबरीनें बाटवून याचें नांव तिम्माहसन असें ठेविलें. त्याचा मुलगा महंमद बहिरी यानें अहंमदनगरची निजामशाही स्थापन केली ! कांहीं बाटलेले लोक हिंदूंना तापदायक झाले तर कांहीं मूळ न विसरतां हिंदूंचा उर्जित करण्यास पर्यायानें कारण झाले !

( ११ ) राजकीय क्षेत्रांत हिंदू शून्याकार झाले तशी सामाजिक व धार्मिक बाबतींतही त्यांची पराकाष्टेची अवनति झाली. संतकवींच्या वचनाधारें याचें शब्दचित्र साहव्या प्रकरणांत पुढें रेखाटलेलें दिसेल.

मुसलमानांच्या राजवटीचा एकंदर परिणाम चांगला झाला नाहीं. हिंदूंचा स्वातंत्र्यनाश झालाच. स्वातंत्र्यनाशाची भरपाई केव्हांही कशानेंही होत नसते ! हिंदूंची संस्कृति, हिंदूंचा धर्म व हिंदूंची भाषा यांची गळचेपी मोठया प्रमाणांवर झाली पण त्यांच्या संरक्षणार्थ आमच्या संतकवींनीं कंबर बांधली म्हणून हिंदूंचें हिंदुत्व कायम राहिलें. त्यांनीं आप-

त्या संस्कृतीच्या रक्षणार्थ देशीभाषेंत ग्रंथरचना केली व कीर्तनपुराणांतून धर्मरक्षणाचा उपदेश केला. त्यांनीं यावेळीं केलेली धर्मसेवा हीच राष्ट्रसेवा होती; तिला आपण सांप्रत देशभक्ति म्हणतो. त्यांच्या राष्ट्रसेवेचा कसा सुपरिणाम झाला हें शेवटच्या 'स्वराज्याचा अरुणोदय' ह्या प्रकरणांत आपण पाहूं.



# ३ बेदरची पाच्छाई व चार संतकवि.



## १ ‘ बेदरची पाच्छाई ’ व मंगळवेढें.

‘ बेदरची पाच्छाई ’ ही मराठी वाङमयाच्या इतिहासांत कान्हूपात्रा व दामाजीपंत यांच्या चरित्रामुळें गाजून राहिली आहे. बेदर अगर बिदर हें पुरातनकालापासून फार प्रसिद्ध ठिकाण आहे. दक्षिणापथ (डेकन) याचे तामीळ, आंध्र, कर्नाटक व महाराष्ट्र असे चार ठोकळ भाग पडतात. नर्मदेपासून कृष्णेपर्यंतचा मुलूख म्हणजे महाराष्ट्र, त्याच्या खालीं कर्नाटक व त्याच्याही खालीं तामीळ. आंध्र उर्फ तेलंगण याच्या पूर्वेस आहे. बेदर परगणा थोड्याशा उंच पठारावर असून १५ मैल रुंदीचा व ५० मैल लांबीचा सपाट मुलूख आहे. हें पठार आज निजामच्या राज्यांत मराठवाडी म्हणून जे जिल्हे आहेत त्यांतला प्रमुख जिल्हा म्हणून मोडत आहे. बेदरला पूर्वी विदर्भराजधानी म्हणत. बेदर परगण्यांत पहिल्यापासून मराठी बोलणारांचीच मुख्य वस्ती आहे. हा परगणा तेलंगणच्या अगदीं तोंडावर असल्यामुळें त्याची हद्द संपली कीं आंध्रांचाच प्रांत लागतो. याची जमीन तांबडी आहे. बेदर शहर हैद्राबादेहून वायव्येस ८० मैलांवर आहे. शंकराचार्य आपल्या दिग्विजयांत रामेश्वरपासून निघाले ते पांडव, चोल, आंध्र या प्रांतांतून व्यंकटाचलेश म्ह० गिरीच्या व्यंकटेशाला नमस्कार करून ‘ विदर्भराजधानीला ’ म्ह० बेदरला आले व तेथें त्यांचा क्रथकैशिक राजानें मोठा सत्कार केला असें वर्णन आहे. महंमद तघलखानें बेदर घेतलें होतें. बेदरप्रांत अस्सल मराठी म्हणायला आणखीही एक कारण आहे. तेथें मल्हारीमार्तंडाचें एक प्राचीन मंदिर आहे. तेथले पुजारी वाघे हेही मराठी भाषा बोलतात. उत्तर चालुक्यांची राजधानी कल्याण बेदरच्या पठारावर आहे. बाहामनीशाही इ. स. १३४७ मध्यें स्थापन

झाली. तिची राजधानी प्रथम गुलबुर्गा होती. पण अहंमदशहा वली ( इ. स. १४२२ ते १४३४ ) यानें ती इ. स. १४३० सालीं बेदर येथें नेली. मुलूख सपाट, चित्तवेधक व स्वच्छ, हवापाणी उत्तम, म्हणून त्यानें बेदर ही राजधानी केली. इ. स. १४३० पासून 'बेदरची पाच्छाही' हा शब्दप्रयोग मऱ्हाठमंडळांत सुरू झाला. ही पाच्छाही इ. स. १४९३ सालीं मोडून तिचीं पांच शकलें झालीं. त्यांपैकी बेरीदशाहीनें बेदर येथें इ. स. १४९३ ते १६५६ पर्यंत राज्य केलें. पण 'बेदरची पाच्छाई' खरी गाजली ती इ. स. १४३० ते १४९३ या ६३ वर्षांच्या काळांत होय. याच काळांत मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनें तीन महत्त्वाच्या गोष्टी घडल्या. गुरुचरित्रांत वर्णन केल्याप्रमाणें नृसिंहसरस्वतींच्या अनुग्रहानें बेदरचा पातशहा म्हणजे पूर्वजन्मींचा रजक हा स्फोटापासून बरा होऊन उद्धरून गेला व ही गोष्ट इ. स. १४५७ मध्यें घडली. ती हकिकत पुढील प्रकरणांत येणार आहे. दामाजीपंतानें दुष्काळांत धान्याचीं कोठारें लुटविलीं व पांडुरंगानें विठ्या महाराचें रूप घेऊन रसीद पोंचवून त्यांचे प्राण वांचविले- ही गोष्ट इ. स. १४६८ ते १४७५ ह्या काळांत झाली. बाहामनीच्या शेवटच्या २।३ शहांच्या कारकीर्दी दुर्व्यसनें, परदाराभिमर्ष, व मद्यपान यांचीं आगरें झालीं, तेव्हा कान्हूपात्रेची गोष्ट ही इ. स. १४८० त घडली आहे. येथें दामाजीपंत व कान्हूपात्रा यांचा विचार करूं. दोघेही मंगळवेढ्याचे राहाणारे व दोघांसही 'बेदरच्या-पाच्छाही' पासून त्रास झाला. मंगळवेढे पंढरपूरच्या पंचक्रोशींतले म्हणावयास हरकत नाहीं. मंगळवेढ्यास पहिल्यापासून पुण्यात्मे राहात आले आहेत. मध्वाचार्यांच्या शिष्याचे शिष्य जयतीर्थाचार्य यांनीं मध्वाचार्यांच्या ग्रंथांवर सुंदर टीका केल्या आहेत. ते मंगळवेढ्याचेच देशपांडे होत. प्रसिद्ध विठ्ठलभक्त चोखामेळा तेथलाच राहाणारा होय. याचा समाधिकाल इ. स. १३३८ हा होय. त्यानंतर तेथेंच दामाजीपंत व कान्हूपात्रा होऊन गेले.

---

## २ कान्हूपात्रा ( इ. स. १३८० सुमार )

मंगळवेढे येथें श्यामा नांवाची एक नर्तकी होती, तिची मुलगी कान्हूपात्रा होय. आईचा वेश्यापणाचा धंदा पाहून तिला त्या धंद्याची चिळस आली व कांहीं झालें तरी आपला देह पातक्यांच्या स्वाधीन करून विटाळूं द्यायचा नाहीं असा तिनें आपल्या वयाच्या १५ व्या वर्षींच निश्चय केला! बापाचा कृपणपणा पाहून लेख खंतावतो व उधळ्या निघतो! आईचा पापाचा संसार पाहून लेक खंतावली व तिनें आपलें चरित्र शुद्ध ठेवण्याचा निश्चय केला. गायननर्तनांत ती उत्तम तयार झाली. अत्यंत सुस्वरूप व गाणारी अशी ही षोडश वर्षांची बाला—तिच्या घराभोंवती गिधाडें घिरट्या घालूं लागलीं! पण तिच्या निश्चयापुढें कोणाचें चालेना. ती या बाबतींत आईचेंही ऐकेना. लेकीवर श्रीमंत होण्याची आईची इच्छा तृप्त होण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं आईनें लग्न करून एकाला धरून तरी रहा म्हणून तिला आग्रह केला, तेव्हां ‘ माझ्यापेक्षा सुंदर सुकुमार व सुशील पुरुष भेटेल तरच मी लग्न करीन ’ असें तिनें उत्तर केलें पण असा पुरुष भेटेना. पुढें ती वारकऱ्यांचें भजन ऐकून पंढरीस आली व तेथेंच तिनें पुरुषोत्तम श्रीविठ्ठल याला वरिलें व ती त्याची दासी होऊन राहिली! तिच्या लावण्याची ख्याति ऐकून बेदरच्या पातशहानें तिला नेण्यासाठीं आपले शिपाई पाठविले व ती खुषीनें आली नाहीं तर तिला बळजोरीनें आणा असा त्यानें सेवकांस हुकूम दिला! कान्हूपात्रा पूर्ण विरक्त होती. ती राजविलासाला भाळली नाहीं. तिनें नकार दिला पण तिचें ऐकतो कोण? तिला जबरीनें नेऊं लागले तेव्हां विठ्ठलाचें दर्शन घेऊन येते असें तिनें उत्तर केलें. ती विठ्ठलसन्मुख गेली व तिनें देवाला पांच अभंगांत मनोभावें आळविलें. त्यांतील दोन अभंग पहाः—

१

**पुरविली पाठ न सोडी खळ। अधम चांडाळ पापराशी ॥ १ ॥**
**वारितां नायके दुष्ट दुराचार। काय करूं विचार पांडुरंगे ॥ २ ॥**

**तूं माय माउली जगाची जननी। ह्मणोनी मिठी चरणीं घालितसे ४**
**विनवी कान्हुपात्रा जोडोनियां हात । आतां देहांतसमय पातलासे ।।**

२

**नको देवराया ! अंत पाहूं आतां । प्राण हा सर्वथा फुटों पाहे ॥१॥**
**हरिणीचें पाडस व्याघ्रें धरियेलें । मजलागीं जाहलें तैसें देवा ॥२॥**
**तुजवीण ठाव न दिसे त्रिभुवनीं । धांवें वो जननी विठाबाई ॥३॥**
**मोकलोनी आस जाले मी उदास । घेई कान्हूपात्रेस हृदया-आंत ॥४॥**

आणि देवानें तिला हृदयाआंत ठाव दिला ! तिची ज्योत देवाच्या ज्योतींत मिळाली व अचेतन देह देवाच्या पायापाशीं पडला ! भाविकांनीं तिचें प्रेत देवाच्या दक्षिणद्वारीं पुरलें. तेथें तरटीच्या वृक्षाखालीं तिची मूर्ति अद्याप पतितांना पावन करण्यासाठीं उभी आहे !

वेश्येची मुलगी म्हणून समाजानें तिची हेळणा केली नाहीं. तिच्या गुणाचा गौरव करून तिला मंदिरांत स्थान दिलें व भक्तमंडळांत तिची गणना केली. माझा आश्रय करणारे पापयोनी असले तरी ते परम-गति पावतात ह्या भगवंतांच्या उक्तीची ( गीता ९-३२ ) येथें सार्थकता झाली. ' आघवेया अधमांचे शेवटीं पापयोनी ' मूढ असले पण माझ्या ठायीं दृढ राहून ' सर्वभावें भरले ' म्हणजे ते तरतात, ' भक्ति गा येथ सरे । जाति अप्रमाण ' हें ज्ञानेश्वरांचें म्हणणें पटल्याचें लोकांनीं प्रत्ययास आणून दिलें.

कान्हूपात्रेचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत. हे अर्थात् ' ती देवाच्या पायीं गुप्त झाली ' त्याच्या अगोदरचे आहेत. ती नेहमीं गरुडपारावर बसून हातीं वीणा घेऊन सुस्वर वाणीनें देवाचे गुणानुवाद गात असे. भक्तिप्रिय देव तिच्या प्रेमास भुलला होता.

**(१) तूं उदार ह्मणोनी भाकितसे कींव । सोडवी हा जीव पाशांतूनी ॥ १ ॥**
**गुंतलासे मीन लिगाडाचे गळीं । तैसा तळमळी जीव माझा ॥ २ ॥**
**आशा मनशा तृष्णा तोडी यांचें जाळें । घेई उतावेळे काडिये मज ॥ ३ ॥**

सर्वभावें तुज आले मी शरण । कान्होपात्रेचें निर्वाण पाहूं नको ॥४॥
( २ ) उदारा पांडुरंगा धांवा लवकरी। बुडत्ये दुराचारी डोहामध्यें ॥ १ ॥
माझी लाज राखा येवोनी अनंता । निववी चरणीं आतां मन माझें ॥ २ ॥
नको या उपाधी तोडा कृपानिधी । येऊनीयां छेदी क्रोधकाम ॥ ३ ॥
कान्होपात्रा ह्मणे विठोबा जिवलगा। आलिंगनें दे गा सुख मातें ॥४॥

( ३ ) पतित तूं पावना । म्हणविसी नारायणा ॥ १ ॥
तरी सांभाळी वचन । ब्रीद वागविसी जाण ॥ ध्रु० ॥
याती शुद्ध नाहीं भाव । दुष्ट आचरण स्वभाव ॥ ३ ॥
मुखीं नाम नाहीं । कान्होपात्रा शरण पायीं ॥ ४ ॥

( ४ ) दीन पतित अन्यायी । शरण आल्ये विठाबाई ॥ १ ॥
मी तो आहे यातीहीन । नकळे कांहीं आचरण ॥ ध्रु० ॥
मज नाहीं अधिकार । भेटी देई लवकर ॥ ३ ॥
ठाव देई चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥ ४ ॥

( ५ ) नामें दोष जळती । नामें पापी उद्धरती ॥ १ ॥
हें तो आलें अनुभवा । सत्य जीवा प्रत्यया ॥ ध्रु० ॥
नामें अपार तारिलें । नामें जीवन्मुक्त केलें ॥ २ ॥
कान्हूपात्रा नाम घेतां । पायीं जडली तत्परता ॥ ३ ॥

---

## ३ दामाजीपंत.

(१ दुर्गादेवीच्या दुष्काळास दुर्गाडीचा दुष्काळ म्हणतात याचें कारण असें दिसतें. स्मशान=सवसान, शवशयन म्ह०प्रेतें निजविण्याची जागा. स्मशानाजवळ-दुर्गेचें छोटेसें देऊळ असें म्हणून दुर्गाडी शब्द स्मशानवाचक झाला. ह्या दुष्काळात हजारो लोक मेले व त्यांची प्रेतें स्मशानांत दुर्गाडीकडे नेण्यांत आलीं म्हणून दुर्गाडीचा दुष्काळ झा० हजारो लोकांना स्मशानांत नेऊन प्रेतरूप करणारा दुष्काळ. थोडक्यांत–ज्यात हजारो माणसें मेलीं व स्मशानांत प्रेतांचा खच पडला तो दुष्काळ. )

'दुर्गादेवीचा दुष्काळ' ह्या संशोधनात्मक लेखांत राजवाडे यांनीं दाखविलें आहे कीं शके १३९० पासून १३९७ पर्यंत जो सात वर्षांचा दुष्काळ पडला त्या दुष्काळांत मंगळवेढयाचे ठाणेदार दामाजीपंत यांनीं सरकारी धान्याचीं कोठारें लुटवून हजारो गोरगरिबांचे प्राण वांचविले. सोलापूर गॅझिटीअरमध्यें शके १३८० च्या दुष्काळासच दामाजीपंताचा दुष्काळ असें म्हटलें आहे. परधर्मीयांची सेवा न करणें उत्तम पण प्रवाहपतित झाल्यामुळें सेवा करण्याचा प्रसंग आलाच तर प्रामाणिकपणा, स्वधर्मनिष्ठा, परोपकार व भगवद्भक्ति ह्या चार उत्कृष्ट गुणांना रक्षून कठिण प्रसंग कसा निभावून न्यावा हें शिकविणारा दामाजीपंतासारखा सुंदर कित्ता मिळणें दुर्घट आहे. अंतःकरण विकावें लागत नाहीं, स्वधर्म सोडावा लागत नाहीं, भूतदयेनें व परोपकारबुद्धीनें वागतां येते, हें नोकरीपेशांतल्या लोकांना दामाजीच्या उदार चरित्रावरून शिकतां येतें. कमालीचा स्वार्थत्याग केला कीं परमात्मा पाठीराखा होतो व संकटकालीं भक्ताचें रक्षण करितो. 'चिंतनें धांवे भक्तापाठी । धरी कांबळी हातीं काठी' ह्या अभंगपादांत दामाजीच्या कथेचा नाथांनीं उल्लेख केला आहे.

**राजवाडे** यांनीं एक जुना महजर प्रसिद्ध करून नाथतुकोबादिकांनीं वर्णिलेल्या दामाजीपंतांच्या कथेस पुष्टिच दिली आहे! महजराच्या एका नकलेची नकल त्यांना साताऱ्च्या महाराजांच्या दप्तरांत मिळाली. शहरांत व खेडयांत महारांना कोणकोणते हक्क पूर्वापार आहेत याची त्यांत याद आहे. मूळ महजर बेदरची पातशहात असतांना झाला. मूळ महजरावर पातशहाचे शिक्का मोर्तब होतें व तो खुद्द दामाजीपंत मंगळवेढेकर यांच्या हातचा होता. मूळ सनद पैठणास झाली. पैठण हें प्रख्यांत धर्मक्षेत्र व न्यायक्षेत्र, तेथें 'सर्व देशाला महत्वाचे असे जे खटले होत त्यांचा निकाल होत असे.' महाजरांत पुढील वाक्यें आहेतः—

"हे दंणे पाछायाचे व दामाजीपंत याचे हातचा कागद असे. विठया

---

१ शिवचरित्रसाहित्य ( खंड १ )

महार मंगळवेढयाचा पाछायाचे कामी पडला व दामाजीपंत कामी पडला म्हणोन पातशाहाणी विठया महारास हक करून दिल्हे."

यानंतर आणखी कांहीं हक्कांचें गणन करून पुनः खालील हकीकत दिली आहेः—

"बाच्छाव याचीतील कोठींतील कोठाडी लुटल्या त्याजबद्दल लगादा दामाजीपंतास केला ते वेळेस श्रीविठोबाचे विठ्या महारानें रूप धरून बाच्छात याची रसद पोहचती केली. दामाजीपंताचा पैका भरून विठया महारानें दिल्हा आणि बाच्छाणे पुन्हा पावती दिली व दामाजीपंत याजपाशी विठया माहारानें आणोन दिल्ही बाच्छाव याणी चौकशी केली व दामाजीपंत याची चौकशी केली त्याजवरून विठया माहार यास हक दर उपकार पोटास भाकरी व बसावयास जागा करून दिल्ही महाराचे बंदोबस्त करून दिल्हे..."

ही सनद पैठण मुक्कामीं 'देवाचे राउळांत' म्ह० एकनाथांचेंच विठ्ठलमंदिर पूर्वापार होतें त्यांत झाली व तिचें संस्करण पुन्हा सन १०५१ हिजरींत म्हणजे शक १५६३ मध्यें 'पैठणचे मुक्कामीं येकनाथस्वामीचे राउळांत जाहली' त्यांतही वरीलच मजकूर आहे. मूळ सनद पातशाहाच्या शिक्का मोहर्तबासह दामाजीपंतांचे समोर दिली गेली. (अर्थात् एकनाथांच्या पूर्वी) व तिचें संस्करण नाथांच्या पश्चात् त्यांच्याच विठ्ठलमंदिरांत झालें.

यावर राजवाडे लिहितातः—"मंगळवेढयास दामाजीपंत कारभारी उर्फ कमावीसदार असतांना विठया नांवाचा महारही मंगळवेढयास होता कडाक्याचा दुष्काळ पडला असतांना दामाजीपंतानें लोकांकडून धान्याचीं सरकारी कोठारें लुटविलीं. रसदीचे पैसे कोठून पाठवावेत अशा विवंचनेंत दामाजीपंत असतांना विठया महार त्याच्या संकटाचा साक्षी होता. त्याच्यापाशीं बापजाद्यानीं पुरून ठेवलेलें किंवा इतर कोणत्या तरी कारणानें जमा झालेलें द्रव्य होतें व तें कर्मधर्मसंयोगानें रसदीची फेड

करण्याइतकें होतें. तें द्रव्य विठ्ठलरूपी परमेश्वराचा मंगळवेढच्या विठ्या महाराच्या अंगांत संचार होऊन दामाजीपंताकडील रसद म्हणून बेदरास सरकारास भरण्याची विठ्या महारास परमेश्वरप्रेरणा झाली. दामाजीपंताचें संकट वारलें व धरणेंही सुटलें. ही ऐतिहासिक हकीकत प्रस्तुत महजरावरून उपलब्ध होते...परमेश्वर महाराच्या हृदयांत शिरून तद्वारां एका दयार्द्र गृहस्थाचा बचाव झाला. ही खरी हकिकत. ”

दामाजीपंताचा उल्लेख **नाथांच्या** अभंगांत १०।५ वेळ तरी आलेला आहे. एक अभंग पहा:—

**दामाजीचा भाव पाहुनी श्रीहरी। अनामिक निर्धारी स्वयें जाला ॥ १॥**
**घेऊनीयां द्रव्य निघाला श्रीहरी। जोहार जोहार करी पातशहातें ॥ २॥**
**द्रव्य देऊनीयां रसीद घेतली। भक्ताची माउली विठाबाई ॥ ३ ॥**
**एका जनार्दनी भक्ताचीया साठीं। धांवे पाठोपाठीं भक्ताचिया ॥ ४॥**

नाथांनीं दामाजीच्या कथेवर एक ‘ जोहार ’ केला आहे. ‘ विठनाक महार ’ सांगत आहे:—‘ जोहार मायबाप जोहार। मी दामाजीचा लेकरवळा महार। माझें नाव विठू साचार। सारा झाडफेडीचा कारभार। मी करितों कीं जी मायबाप ’॥ ध्रु० ॥ मंगळवेढयाचा ठाणेदार दामाजी यानें गांवचा वसूल जमा करून मज नफरा ( नौकरास ) पाठविलें आहे! दामाजीचा मी विश्वासू नौकर आहे. ‘ दुष्काळ पडला जाणून। शिल्लक पेवें दामाजीनें विकून। चिठ्ठी पैका घेउनि जाण। मज पाठविलें कीं जी मायबाप! ॥ ३ ॥ आदा वसूल खतावणी। जमा करा वसुल घेउनी। बाकी शून्य घालुनी। जाब द्यावा की जी मायबाप ॥ ५ ॥ पैका पोंचल्याची रसद। मज लिहून द्यावी त्वरित। मी जातों हातन की जी मायबाप ॥ ८ ॥ ’ असें म्हणून विठू महार ( विठ्ठल ) आपल्या गांवाकडे ( पंढरपुरीं ) जाण्यास निघाला! इकडे दामाजीनें धान्याची पेवें गोरगरिबांकडून लुटवून खजीना रिता केल्याची तक्रार ( कानडा मुजूमदारानें ) केल्यावरून दामाजीला पकडून आणण्यासाठीं हुकूम

मुटले होते. प्यादे येऊन दामाजीस लगबगीनें बेदरास घेऊन चालले होते. वाटेच्या मुक्कामास दामाजी स्नानोत्तर देवपूजेस बसले असतांना पोथींत त्यांनीं रसद पाहिली. ' रसद पाहतां ते वेळीं । पातशहाची मुद्रा ( शिक्का ) देखिली । विठू महारासवें रसद पाठविली । बाकी शून्य जाली कीं जी मायबाप ॥ १२ ॥ एका जनार्दनी केला जोहार । मोडिला अविद्येचा थार । व्यापुनिया चराचर । भजनीं मादर असावें कीं जी मायबाप ॥ १३ ॥ '

दामाजीपंताची ही कथा नाथांनींच प्रथम वर्णिलेली दिसतें. त्यांच्या नंतर ५० वर्षांनीं **तुकोबांनीं** एका तीस चरणी अभंगांत ही कथा अशीच सांगितली आहे:—

**दामाजीपंताची रसद गुदरली । लज्जा सांभाळिली देवरायें ॥ १ ॥**
**धान्याचीं भांडारें होतीं तीं फोडिलीं । पंढरी रक्षिली दुकाळांत ॥४॥**
**दुबळीं अनाथ तींही वांचविलीं । राष्ट्रांत ते जाली कीर्ति मोठी ॥ ५ ॥**
**अविंधाचें राज्य बेदरीं असतां । कागद पाहतां तलब केली ॥ ७ ॥**

कानडा मुजूमदारानें पाठविलेला कागद ( फिर्यादी अर्ज ) पाहून पातशहानें तलब केली ( बोलावणें–समन्स पाठविलें ). इकडे विठ्ठलानें मात केली. धान्याची धारण होती तिच्या सवाईनें द्रव्य घेऊन व विठू महाराचें रूप घेऊन—

दामाजीपंताच्या नांवें अर्जदास्त लिहून खलेती ( खलिता ) मुद्रा केली. खलिता, खरिता ह्म० थैली, राजपत्र.

**विठो पाडेवार भक्ता साह्य जाला । बेदरासी गेला रायापाशीं ॥ ११ ॥**

पुढील हकीकत वरीलसारखीच आहे. पाडेवार म्ह० महार. रसीद पोंचल्यावर दुसरेच दिवशीं दामाजीपंतास पाहतांच रायाचे नयन निडारले, त्यानें दामाजीचा सत्कार केला. दामाजी ह्मणाले:—

**आतां तुमची सेवा पुरेजी स्वामिया । शिणविले सखया विठोबासी ॥**

दामाजीनें नंतर पंढरींतच कायम वस्ती केली.

**तुका ह्मणे विठो अनाथकैवारी । नुपेक्षी हा हरी दासालागी ॥ ३० ॥**

दामाजीपंताची 'राष्ट्रांत ते जाली कीर्ती मोठी' असें तुकोबांनीं ह्मटलें आहे. दामाजीपंतांची कीर्ति त्यांचे हयातींतच महाराष्ट्रभर पसरली. नाथतुकोबांनींही त्याची कथा गायिली. त्यानंतर महिपतबावानीं 'भक्तविजय' ग्रंथाच्या ४० व्या अध्यायांत सदर कथा सविस्तर वाखाणिली. अमृतरायांच्या कवितासंग्रहांत ७७ कडव्यांचे 'दामाजीचरित्र' छापलें आहे. पण तें वस्तुतः अमृतशिष्य '**ब्रह्मगिरीचें** आहे. तें अत्यंत मधुर असून फार लोकप्रिय आहे. 'वारी संकट हरि दामाजीचें। कौतुक देवाचें' हें त्याचें पालुपद आहे. ह्या पदानें दामाजीची आठवण महाराष्ट्रांत अधिक जागृत ठेविली आहे. हें पद काव्यगुणपूर्ण असून प्रासादिक आहे. दामाजी आणि तो मुजूमदार यांच्यांत 'जैसा गज गाढव न पवे सर। कांदा कापूर ॥ धर्म दुर्योधना जैसें वैर। सोमल साकर ॥ कावळ्याजवळी राजहंस' अशा प्रकारचें तारतम्य कवीनें वर्णिलें आहे. 'विठ्या महाराचें' स्वरूप पहाः—

**अनंत ब्रह्मांडें ज्याचे पोटीं। सांवळा जगजेठी।**
**काळी घोंगडी काळी काठी। काळा दोरा कंठीं॥**
**बोली महाराची थेट मराठी। गांडिस लंगोटी।**
**पायिं वाहणा मोठा शाहणा। पतितपावन नाम जयाचें॥३५॥**
**वारी संकट हरि दामाजीचें। कौतुक देवाचें॥ ध्रु०॥**

हें विठ्या महाराचें वर्णन किती मनोहर आहे! तसेंच तो पातशहाशीः—

**ह्मणे 'मी पंताचा बहु कामाचा। विश्वासू घरचा।**
**बंदा शरमिंदा आहे त्याचा। जन्मोजन्मीचा॥**
**नाजुक जरूर अडलें भिडलें। तेथें काम मज नफराचें॥३८॥**
**वारी संकट हरि दामाजीचें। कौतुक देवाचें॥ ध्रु०॥**

अशा प्रकारचें भाषण वगैरे सारे प्रकार मोठ्या रसभरित व करुणामय वाणीनें ब्रह्मगिरीनें वर्णिले आहेत. आम्ही दामाजीपंताच्या आख्यानावर १०।५ तरी कीर्तनें ऐकलीं आहेत व श्रोतृसमाज तन्मय होऊन नेत्रांतून भक्तिप्रेमाश्रु ढाळतांना स्वतः पाहिलें आहे. आतां कोणी एखादा कागद शोधून 'विठ्या महार' नांवाच्या एका खरोखरीच्या महारानें रसद

गुजरिली असा जरी इतिहास सांगितला तरी दामाजीपंताचा तो ' विठू महार ' लोकांच्या जीवीं जडलेला पुसून जायचा नाहीं! कोरड्या इतिहासापेक्षां आर्द्र भक्तितत्त्वाचा संस्कार अधिक टिकाऊ व परिणामकर असतो. सदर प्रसंगावर **दामाजीपंतांचें म्हणून एक पद** आहे तें पुढें देतोः–

**हरहर विठ्ठल जगदुद्धार। जाहला महार मजसाठीं ॥ ध्रु० ॥**

**धन्य बेदरीचा पाच्छाय। त्याचा केला म्यां अन्याय। धान्य लुटण्याचा उपाय। झाला अपाय मजलागीं ॥ १ ॥ षड्गुणैश्वर्य श्रीभगवान्। सांडुनि देवपणाचा अभिमान। पायीं घालुनि तुटकी वहाण। नेसला जीर्ण लंगोटी ॥ २ ॥ माथां बांधुनि चिंध्याभार। कालि कांवळी खांद्यावर। मुखानें म्हणत असे जोहार। काळा दोर निजकंठीं ॥ ३ ॥ ऐसें केलें कैसें देवा। माझ्या सुकृताचा ठेवा। महार जालासी माधवा। लाविला वणवा मजसाठीं ॥ ४ ॥ ज्याचें धान्य लुटिलें जाण। तो तरि घेतां माझा प्राण। दामा म्हणे गुणनिधान। झाला महार जगजेठी ॥ ५ ॥**

---

## ४ भानुदास ( शके १३७०-१४३५ )

एकनाथांचे पणजे भानुदासमहराज हे आश्वलायनसूत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. हे दामाजीपंतांचे समकालीन असून यानीं शक १३९० ते १३९७ पर्यंतचा दामाजीपंतांचा मोठा दुष्काळ पाहिला होता. पूर्वीपासून पंढरीच्या विठ्ठलाची भक्ति त्यांच्या घराण्यांत चालू होती असें ' आमुचिये कुळीं पंढरीचा नेम। मुखीं सदा नाम विठोबाचें ' असें त्यांच्याच उद्गारावरून स्पष्ट आहे. व्रतबंध झाल्यावर बापानें भानुदासास लौकिकविद्या शिकविण्यास प्रारंभ केला, पण हरिभक्तीचे संस्कार पूर्वसुकृतानें याचे मनावर उमटले असल्यामुळें रूपावळी, समासचक्र, घोकत बसणें त्यास आवडेना. यानें वयाचे १० वे वर्षी गांवाबाहेर एका पडक्या देवळाच्या तळघरांत सूर्याची उपासना केली व सातच दिवसात सूर्यनारायणाचा साक्षात्कार होऊन त्याचा यास प्रसाद झाला! त्यावेळेपासून यांस भानुदास हें नांव

मिळालें. त्यावर यानें तीन गायत्री पुरश्चरणें केलीं. " न करी कोणाचें उपार्जन। उदीमव्यापार देणें घेणें। न करी कदा राजसेवन। पांडुरंग भजन करीतसे ॥ आषाढी कार्तिकी येतां बरी। चालवी पंढरीची वारी। टाळमृदंगघोषगजरीं। कीर्तन करी वाळवंटीं ॥ नानापरीची कवित्वकळा। रचूनि आळवी घनसांवळा। हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा। कीर्तनीं गळा सद्गदित ॥ आपुलें आणि परावें। हे कल्पनाचि नाहीं स्वभावें। सर्वांभूतीं ऐक्यभावें। विकल्प वाव टाकिला " असें याचें वर्णन महिपतीनें (भक्तिविजय अ० ४२) केलें आहे. लग्न होऊन पोरेबाळें झालीं तेव्हां भानुदासाच्या सग्यासोयऱ्यांनीं त्याला कांहीं भांडवल देऊन कापडाचें दुकान काढायला सांगितलें व यानें चाटेगिरीचा धंदा आरंभिला. चाटेपणाचा धंदा करणारे लोक आपलें दुकान चालवून बाजाराच्या दिवशीं घोड्यावर कापडाचीं दिंडे लादून सभोंवारच्या गांवांतून कापडविक्रीसाठीं जात असतात. प्रारब्धानुसार जें मिळेल त्यावर गुजारा करायचा पण खोटें बोलायचें नाहीं अशी भानुदासाची प्रतिज्ञा होती. त्याची सत्यनिष्ठा, सरळपणा, एकवचनीपणा हे गुण पाहून 'याच्या कपाळीं भीकच लिहिली आहे' असें लबाडी अंगवळणी पडलेले 'व लबाडी उद्योगधंद्यास अवश्यच आहे' असें प्रतिपादन करणारे त्याचे कित्येक समव्यवसायी लोक म्हणूं लागले! मनुष्य धंद्यांत पडला म्हणजे प्रायः खऱ्याखोट्याची चाड न बाळगतां लोभाचें मांजर होऊन धनसंचयाच्या मागें लागतो. भानुदास या नियमास अपवाद होता. त्या विघ्नांना न जुमानतां व संकटांना न भितां त्यानें आपलें सत्यव्रत आजन्म पाळलें. दारिद्र्याच्या वेदना सोसाव्या लागल्या त्या त्यानें सात्त्विक धैर्यानें सोसल्या. त्याला धंद्यांत दोनदां बूड आली, सावकारांनीं कावकाव केली, लोक हेळणा करूं लागले. तथापि लोभमोहादिकांना न बधतां निःशंकपणानें सत्यव्रत सतत चालवणें याला लागणारें सात्विक धैर्य भानुदासांत होतें त्याप्रमाणें भानुदास निग्रहपूर्वक सत्याला टिकून सत्यादिव्रतपरिपालनाला विल-

क्षण धैर्य लागत असतें. 'सत्यमेव जयते नानृतम्' ह्या श्रुतिवाक्यानुसार शेवटीं सत्याचा जय झाला. भानुदास मोठा सच्चा आहे अशी त्याची ख्याति झाली. त्याच्याच दुकानाकडे सारे गिऱ्हाईक लोटूं लागलें, चारपांच वर्षांतच अतोनात पैसा मिळून त्याचें दैन्य फिटलें. घरीं लक्ष्मी नांदूं लागली. नारायण त्याच्या चित्तीं ठाण मांडून राहिला, मग नारायणाला सोडून लक्ष्मी कोठें जाईल? भानुदासांनीं मिळवून ठेवलेल्या संपत्तीचा उपयोग पुढें त्यांचे पणतु एकनाथ यांना झाला. पुण्यमार्गानें मिळविलेली संपत्ति दीर्घकाल टिकते.

दामाजीपंतांची परोपकारबुद्धि व भानुदासांचा करारीपणा या दोन्ही सद्गुणांच्या मुळाशीं त्यांची अलौकिक व निष्ठावंत भगवद्भक्ति होती यांत शंका नाहीं. भक्ति ही नाना सद्गुणांची जननी आहे. 'वैष्णवांचा मेळ करिती गदारोळ' अशा वारकऱ्यांना 'घेतां देतां लाभ बहुतांसी झाला। विसावा जोडला पांडुरंग' हाच अनुभव भानुदासास आला. भानुदासांच्या अभंगाचा थोडा प्रसाद पहाः—

**साक्ष अससी सर्वाभूतीं। असुनी न दिसे जगतीं।**
**पांडुरंग बाळमूर्ति। प्रगट उभी विटेवरी॥**
**आगमनिगमाचें स्थान। सर्वा हेचि प्रमाण॥**
**मुनिजनांचें ध्यान। ते हे मूर्ति विटेवरी॥**

* * *

**अद्वय आनंद तो हा परमानंद। शोभे सच्चिदानंद विटेवरी॥१॥**
**सांवळें रूपडें गुणां अगोचर। उभा कटीं कर ठेवुनि विटे॥२॥**

* * *

**वेदीं सांगितलें श्रुतीं अनुवादलें। तें ब्रह्म कोंदलें पंढरीये॥१॥**
**भानुदास ह्मणे तो हरी देखिला। हृदयीं सांठविला आनंदभरीत॥२॥**

* * *

**उन्मनी समाधी नाठवे मनासी। पाहतां विठोबासी सुख बहु॥१॥**
**आनंदीआनंद अवघा परमानंद। आनंदाचा कंद विठोबा माझा॥२॥**
**जागृती स्वप्न सुषुप्ती नाठवे। पाहतां सांठवे रूप मनीं॥३॥**

**भानुदास म्हणे विश्रांतीचें स्थान । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ४ ॥**

* * *

**आलों दृढ धरूनी जीवीं । तो गोसावी भेटला ॥ १ ॥**
**जन्ममरण हरला पांग । तुटला लाग प्रपंचा ॥ २ ॥**
**इच्छा केली तें पावलों । धन्य जालों कृतकृत्य ॥ ३ ॥**
**भानुदास म्हणे देवा । घ्यावी सेवा जन्मोजन्मीं ॥ ४ ॥**

याप्रमाणें भक्तिसुखाचा आनंद घोटीत व संगतीच्या लोकांस देत कांहीं काळ भानुदासांनीं काढला. आषाढीकार्तिकीची पंढरीची वारी त्यांनीं चुकूं दिली नाहीं. बरोबर भक्तभाविकांचा मेळा घेऊन पंढरीस गात नाचत जावें व विठ्ठलविरहानें खिन्न होऊन परत यावें. असें होतां होतां त्यांची गाढ भक्त म्हणून ख्याति झाली. त्यांच्या भक्तीचें जनांस प्रत्यंतर येण्याजोगा एक प्रसंगही घडून आला.

भानुदासांच्या[1] वेळीं तुंगभद्रातटाकीं विजयानगर ऊर्फ अनागोंदी येथें कृष्णराय नांवाचा बलाढ्य राजा राज्य करीत होता. विजयानगरच्या सर्व राजांत याच्यासारखा बलाढ्य, तेजस्वी व धर्मनिष्ठ राजा दुसरा कोणी झाला नाहीं. विजयानगरचें साम्राज्य याच्यावेळीं ऐश्वर्याच्या शिखरास पोंचलें होतें. यानें बावीस वर्षें ( श. १४३०–१४५२ ) राज्य केलें. यानें पूर्व, पश्चिम व दक्षिण या दिशास आपल्या साम्राज्याच्या सीमा समुद्रापर्यंत नेऊन भिडविल्या. तुंगभद्रेचा जगविख्यात कालवा यानें बांधला. यानें व्यापार, शेती, कलाकौशल्य व विद्या यांना उत्तेजन दिलें व हुबळी, बल्लारी व बंगळूर ह्या व्यापारी पेठा यानेंच वसविल्या. याच्या आश्रयाला आठ विद्वद्रत्नें होतीं. त्याना ‘ दिग्गज ’ म्हणत. त्यापैकींच सुप्रसिद्ध अप्पया दीक्षित हे एक होते. याच्या चातुर्याच्या व

१ चिद्घनस्वामीकृत ‘ भक्तिसारामृत ’ — अ० १३ मध्यें ज्या भानुदासांचें चरित्र दिलें आहे ते भानुदास यांच्याहून भिन्न असून यांच्या पूर्वीं झालेले आहेत.

पराक्रमाच्या गोष्टी तेलगू भाषेंत प्रसिद्ध आहेत. असो. हा राजा सहज पंढरीस देवदर्शनास आला असतांना तेथील कीर्तनसोहळा पाहून त्याला श्रीविठ्ठलमूर्ति आपल्या राज्यांत नेण्याची इच्छा झाली ! मुसलमानांचा उपसर्ग पंढरीस होण्याचा संभव आहे असें वाटल्यावरून त्यानें श्रीविठ्ठलास आपल्या राज्यांत नेले असाही कोणाचा तर्क आहे. तेथें देवास नाना भोगोपचार देऊन स्वर्णरत्नांचें अलंकार त्यानें देवाच्या अंगावर घातले. नवरत्नांचे हार त्यानें भक्तिपुरःसर देवास अर्पण केले. देवास कडेकोट बंदोबस्तांत ठेवून त्यानें देवाचें सर्व सोहळे चालू ठेवले. पंढरीचें माहात्म्य आपल्या राजधानीस प्राप्त व्हावें अशीही त्याची सात्विक वासना असेल! असो. आषाढीस नेहमींप्रमाणें वारकरी पंढरीस आले तों देव देवळांत नाहीं ! वारकरी उदास झाले. कांहीं नेमनिष्ठ वारकरी गरुडपारावर पडून राहिले व देव परत येईतों पंढरीसच गरुडखांबाच्या भोंवतीं विठ्ठलभजन करीत राहिले. त्यांत भानुदास होते. ‘ मी विठ्ठलास परत आणतों ’ असें सांगून भानुदास अनागोंदीस गेले ! आपल्या सदाचारानें व उत्कट भक्तीनें भानुदास विठ्ठलास आधींच प्रिय झाले होते. मध्यरात्रीच्या सुमारास ते मंदिराजवळ गेले, तेव्हां कुलुपें अपाप गळून पडलीं, पहारेकरी झोंपी गेले व भानुदास देवासमोर जाऊन उभे राहिले! देहभान विसरून त्यांनीं देवाच्या पायीं मिठी घातली व प्रेमाश्रूंनीं त्याचे पाय न्हाणिले. त्यांनीं देवाची प्रार्थना केलीः—

**भक्त भागवत सकळ पारुषले । निःशब्द तें ठेले तुजवीण ॥ १ ॥**
**रखुमाई आई ते जालीसे उदास । कैसें पुंडलीका मौन पडलें ॥२॥**
**भानुदास ह्मणे चाल आह्मांसवें । वाचाक्रण देवें आठवावें ॥ ३ ॥**

सर्व संतमालिकांतून भानुदासांचें नांव गौरवपूर्वक आलें आहे. श्रीधरस्वामी लिहितातः—

**जे एकनिष्ठा हरिसी धरी हो । कल्पांत जाल्या न टळे तऱ्ही हो ॥**
**श्रीपांडुरंगें दिधली स्वमाळा । त्या भानुदासा स्मर वेळुवेळा॥ १७ ॥**

यानंतर ‘ आवडीच्या सौरसीं । निजकंठीच्या माळेसी । प्रसाद भानुदासासी । घालूनि गळ्यासी बोळविलें ’ ( केशवकृत नाथचरित्र अ० १४ ). माळेबरोबर देवाच्या गळ्यांतला नवरत्नहार भानुदासांच्या गळ्यांत आला ! काकडार्तीच्या वेळीं हार गेल्याचा पुकारा झाला. कड्या-कुलपें व पाहारे ओलांडून कोणता धाडसी चोर वाडयांत शिरला याचा कसून तपास सुरू झाला. विठ्ठलस्वरूपीं समरस झालेले भानुदास शिपायास सांपडले व पुष्पमाळेसह नवरत्नहारही मिळाला ! राजानें क्रोधावेशांत भानुदासाला सुळावर चढविण्याचा हुकूम केला. सुळापाशीं नेतांच भानुदास म्हणाले:—

## अभंग.

**जरी हें आकाश वर पडों पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये ॥**
**वडवानळ त्रिभुवन खाये । तैं मी तुझीच वाट पाहें गा विठोबा ॥१॥**
**सप्तही सागर समरस होती । तैं हे विरोनि जाय क्षिति ।**
**पंचमहाभूतें प्रळय पावती । तैं तूंचि सांगाती विठोबा ॥ २ ॥**
**भलतैसें पडो जडभारी । परी मी नाम न सांडी निर्धारीं ।**
**पतिव्रता जेंवि प्राणेश्वरी । भानुदास म्हणे निर्धारीं गा विठोबा ॥ ३ ॥**

तुकोबांचे लेखक संताजी तेली यांच्या हातच्या वहींत ह्या अभंगाचें लेखन पहा:—

**आकाश वरी पडों पाहे: ‘ ब्रह्मगोळ भंगा जाये’: वडवानल त्रिभुवन खाये : तैं तुझीच वास पाहें ॥ १ ॥ ध्रु० ॥ न करीं आणिकांचा पांगीळा । नामधारक तुझा आंकीळा ॥ ६ ॥ सप्तही सागर समरस होती : तै हें वीळया जाईल क्षीती : पंच महाभूतें प्रलये पावती : तें तुंच माझा सांगाती ॥ २ ॥ भलतैसे जड पडो भारी : नाम न संडी न त्ळळे निर्धारी । पतीव्रता जेवी प्राणेस्वरी: भानुदास म्हणे अवधारी ॥ ३ ॥ ६ ॥**

एवढा प्रचंड निर्धार आणि हा अलौकिक एक भाव ज्या भागवताचा झाला त्याची प्रल्हादप्रिय पांडुरंग उपेक्षा करील काय ? असें कोणतें

संकट आहे कीं, ज्यांतून देव भक्ताला सांभाळणार नाहीं ? देवानें आजवर कोणा भक्ताची कधीं उपेक्षा केली आहे ? या पैठणच्या भक्ताला ताप झाल्यावर 'माउलीहुनि मवाळ, चंद्राहुनि शीतळ व पाणियाहूनि पातळ' म्हणजे प्रेमाचा केवळ कल्लोळ असा भक्तवत्सल पांडुरंग तात्काळ उचंबळला व सुळाला पल्लव फुटले आणि निमिषार्धांत तो सूळ पुष्पफळांनीं डवरून येऊन त्या सुळाचा सुंदर वृक्ष झाला !

चमत्काराशिवाय नमस्कार नाहीं ! ही वार्ता राजास कळतांच तो मनीं चमकला व हा साधा चोर नसून कोणी सत्पुरुष आहे असें वाटून तो भानुदासाचे चरणीं नम्र झाला ! भानुदासानें सांगितलें कीं 'विठ्ठलास मी पंढरीस नेण्यास आलों आहे, तेथें आमचे वारकरी मित्र विरहानें माशासारखे तळमळत आहेत !' ही दृढतर निष्ठा पाहून राजानें मोठ्या समारंभानें पालखींत देवाला ठेवून व बरोबर संरक्षक देऊन पंढरपुरास वाजत गाजत थाटानें पाठविलें. भानुदास विजयानगरहून देवाला घेऊन आले हें कळताच पंढरपूरचे व आसपासचे हजारो भाविक वैष्णववीर दिंड्यापताका व टाळमृदंग घेऊन विठ्ठलनामाचा गजर करीत त्यास सामोरे आले. देवाला रथावर घालून गांवांत मिरवणूक काढली. कार्तिकी एकादशीला देवाच्या रथाची मिरवणूक अद्याप पंढरपुरास मोठ्या समारंभानें निघत असते ती भानुदासांनीं अनागोंदीहून आणलेल्या मंगलदिवसाचें पवित्र स्मारक होय ! ह्या प्रसंगानें भानुदासांची कीर्ति भक्तमंडळांत अजरामर झाली आहे. वरील कथेला अनुलक्षून भानुदासांचे दोन अभंग आहेतः—

## अभंग

**रायें कंठमाळ देवासी घातली । देवें तो दिधली भानुदासा ॥ १ ॥**
**कोणी नेली माळ करिती त्याचा शोध । देखिली प्रसिद्ध याचे गळा २**
**राजदूती नेला म्हणती गे हा चोरु । रायानें विचारु नाहीं केला ॥ ३ ॥**
**शूळीं द्यावया भानुदास नेला । तेणें आठविला पांडुरंग ॥ ४ ॥**

**कोरडिया काष्ठीं अंकुर फुटले । येथें येणं झालं विठोबाचें ॥ १ ॥**
**समर्थाचा आम्ही धरिला आधार । तरीच सत्वर आला येथें ॥ २ ॥**
**माझिये संकटीं आलासी धाउनी । भानुदास चरणीं लागतसे ॥ ३ ॥**

तुंगभद्रेच्या तीरीं हंपी येथें विजयविठ्ठलाचें मंदिर अद्यापही पाहण्यांत येते. आंत मूर्ति मात्र नाहीं! राजानें विठ्ठलासाठीं मंदिर बांधलें पण विठ्ठलाच्या मनांत तेथें वास करायचें नव्हतें. त्याचें अनादि प्रेम भोळ्या-भावड्या वारकरी भक्तांवर आहे. तो तेथील राजभोग सोडून बुक्का-माळेवरच संतुष्ट आहे. देव भावाचा भोक्ता आहे. हंपी येथील ‘ विजय विठ्ठलाचें मंदीर ’ आज पडक्या स्थितींत आहे. तथापि त्याचें शिल्प कौतुकास्पद आहे.

भानुदासांची अभंगरचना सोपी आहे व तिच्यांत उत्कट प्रेमभक्ति आहे. त्यांचे सुमारे १०० अभंग उपलब्ध आहेत. ‘माभळभट’ म्हणून त्यांचा एक चाळीसचरणी अभंग आहे. ‘पंढरीरायाच्या कृपेनें हा विनोद गायिला’ असें त्यांनींच म्हटल्याप्रमाणें तो विनोदपूर्ण आहे. कृष्णानें पूतनेचा वध केल्यावर कंसास काळजी पडली व त्यानें ‘कृष्ण आणा बांधूनी’ अशी आज्ञा केली. माभळभट पडला लोभिष्ट ब्राह्मण. त्यानें पैजेचा विडा उचलला व तो गोकुळांत ज्योतिषी होऊन आला. ‘ शनि मंगळ राहू केतु । दुष्ट ग्रह ऐसे सांगतु ’ व तो म्हणाला ‘ पुढें विघ्न आहे थोर । मागें एक चुकलें गंडांतर । कंसरायाचें भय फार । या बाळकासी असे ’ भगवंतानें माभळभटाचें सोंग ओळखलें व एक माव रचिली! माभळभट ज्या पाटावर बसला होता तो पाटच उठून त्याच्या पाठीस लागला! गोकुळांतले सगळे पाट उठून त्या भटाच्या अंगावर येऊन आदळूं लागले! “ होता बैसकेचा पाटु । तेणें घेतला उच्चाटु । पिढीयाचा खडखडाटू । घरोघरीं सूटला ॥ भट वाचित होता पाताडें । तें तंव मुखीं आदळलें पिढें । येरें सुजविलें थोबाडें । मग भयाभीत पळतु ॥ ” माभळभटाच्या डोक्यावर, तोंडावर, पोटावर, अंगावर जिकडून तिकडून तिवया, तेलातुपाचीं

मापें, लांकडी फळ्या, बडगे, खुंटे, चाट्ट ( लाकडी पळ्या ), लाटणीं, चौरंग, मुसळें, या सर्वांनीं अपाप येऊन ' पूजा बांधिली मस्तकीं ' व त्याला पिटाळून मथुरेंत लावून दिले ! ! ' ब्राह्मण म्हणोनि राखिला । धोत्रांपाताड्या मुकला । मथुराप्रांत ठाकिला । नग्न हिंडे राजबिदीं ! " कंसाचा हाही डाव फसला.

भानुदासाचा पुत्र चक्रपाणी. चक्रपाणीचा पुत्र सूर्यनारायण व त्याची भार्या रुक्मिणी यांच्या पोटीं एकनाथाचा जन्म झाला. म्हणजे भानुदासाचे पणतु एकनाथमहाराज हे होत. आपल्या पणज्या-विषयीं नाथांस योग्य अभिमान वाटत असे. त्यांनीं आपल्या ग्रंथांत ठिकठिकाणीं भानुदासांचा सप्रेम व सादर उल्लेख केला आहे.

( १ ) **मी जन्मलों धन्यवंशी । म्हणोनि हरिभक्ति आम्हांसीं ।**
**संत सोइरे निजसुखासी । वंश कृष्णासी निरविला ॥ १६५ ॥**
— रुक्मिणीस्वयंवर.

( २ ) **पूर्वी भानुकृपासौरस । पितामहपिता भानुदास ॥**
**त्यापासोनि हा वंश । जनार्दनप्रिय ॥ ४३८ ॥** (–श्रीशुकाष्टक टीका)

नाथांनीं आपल्या भागवताच्या उपोद्घातांत मोठ्या पूज्यभावानें म्हटलें आहे:—

( ३ ) **वंदूं भानुदास आतां । जो कां पितामहाचा पिता ।**
**ज्याचेनि वंश भगवंता । जाला सर्वथा प्रियकर ॥ १३० ॥**
**जेणें बाळपणीं आकळिला भानु । स्वयें जाहला चिद्भानु ।**
**चिंतोनि मानाभिमानु । भगवत्पावनु स्वयें जाला ॥ १३१ ॥**
**जयाची पदबंधप्राप्ती । पाहों आली श्रीविठ्ठलमूर्ति ।**
**कानीं कुंडलें जगज्योती । करितां रातीं देखिला ॥ १३२ ॥**
**तया भानुदासाचा चक्रपाणी । तयाचाही सुत सुलक्षणी ।**
**म्हणोनि रखुमाई जननी । आम्हांलागुनी साचची ॥ १३४ ॥**
**हे ग्रंथारंभकळा । वंदिली पूर्वजमाळा ।**
**धन्य निजभाग्याची लीळा । आलों वैष्णवकुळा जन्मोनी ॥**

एका संतस्तवनपर अभंगांत नाथांनीं म्हटलें आहे:—

**(४) वंदूं भानुदास वैष्णवांचे कुळीं । ज्यासी वनमाळी मागेंपुढें ॥ ९**
**बाळपणीं जेणें भानु आराधिला । वंश निरविला देवराया ॥ १० ॥**

भानुदासांमुळें आपला वंश हरीला प्रिय झाला आणि अशा वैष्णवांच्या पवित्र कुळांत मला माझ्या भाग्यानें जन्म मिळाला यासंबंधानें नाथांचें प्रेमळ उद्गार हृदय हालविणारे आहेत. मी भानुदासांच्या शुद्ध-कुळांत जन्मलों म्हणून हरिभक्तीचा मला छंद लागला, असें नाथ सात्त्विक अभिमानानें सांगतात. 'धन्य निजभाग्याची लीळा। आलों वैष्णवकुळा जन्मोनी' ह्या धन्योद्गाराचें मर्म अनुभाविकांनाच कळणार आहे! भानुदासांची सत्यनिष्ठा, त्यांची एकविधभक्ति व त्यांचें शुद्धाचरण या गुणांचा विचार केला म्हणजे, 'शुचि व दैवीगुणांनीं श्रीमंत अशा पवित्र घराण्यांत' एकनाथासारखा योगभ्रष्ट महात्मा जन्माला आला, हे स्वाभाविक आहे असें मनांत येऊन शुद्ध कुलपरंपरारक्षणाचें अत्यंत महत्त्व वाटतें. त्यांच्या अभंगांची थोडी ओळख करून घेऊं.

१

**इहीं श्रवणीं तुझे गुणनाम ऐकेन । इहीं चरणीं तीर्थपंथें चालेन ॥**
**नाशिवंत देह कवणिये काजा । ऐसी प्रेमभक्ती देईं सहजा ॥ १ ॥**
**अखंड तुझें नाम उच्चारी । तेणें संसारा होय उजरी ॥ ध्रु० ॥**
**उदरव्यथेलागी मी न करी धंदा । उच्छिष्ट प्रसादें हरावी हे क्षुधा ॥**
**आपुली स्तुति आणि पराविया निंदा.। हे दोनी आंतळों नेदीं गोविंदा ॥**
**सर्वांभूतीं रामा! तूंतेंचि देखे । तुझेनि प्रसादें सदा संतोखे ।**
**देवा! भानुदास मागे इतुकें । चाड नाहीं आम्हां वैकुंठ लोकें ॥ ३ ॥**

२

**बैसोनी अनुष्ठान रामनामध्यान । यापरी साधन नेणें कांहीं ॥ १ ॥**
**एकविधभाव दृढता हें मन । यापरी साधन आन नाहीं ॥ २ ॥**
**परद्रव्यपरदारेचा विटाळ । यावीण निर्मळ तप नाहीं ॥ ३ ॥**
**भानुदास ह्मणे रामनामगुढी । लाविली चोखडी कलियुगीं ॥ ४ ॥**

३

**चतुर्भुजमूर्ती लावण्य रूपडें । पाहतां आवडे जीवां बहु ॥ १ ॥**
**वैजयन्तीमाळा किरीटकुंडलें । भूषण मिरविले मकराकार ॥ २ ॥**
**कासे सोनसळा पीतांबर पिवळा । कस्तुरीचा टिळा शोभे माथां ॥३॥**
**शंख चक्र हातीं पद्म तें शोभलें । भानुदासें वंदिलें चरणकमळ ॥ ४ ॥**

कित्येक अभंगचरणही गोड असून गुणगुणण्यासारखे आहेत.

**( १ ) योगियांचा देव हातपायांवीण । भक्तांचा सगुण विटेवरी ॥**
**( २ ) कर्तृत्व करूनी आहे तो निराळा । परब्रह्म निर्मळा मळ नाहीं ॥**
**( ३ ) वेदशास्त्रांचें सार । तो हा विठ्ठल विटेवर ॥**
**( ४ ) भानुदास विनंती करी । प्रेमें नाचे महाद्वारीं ।**
**विठ्ठल डोळेभरी । पाहतां मुक्ति प्राणियां ॥**
**( ५ ) भाविकांपाठी उभा । विठु कैवल्याचा गाभा ॥**
**( ६ ) जपता नाम विठ्ठलाचें । भय नाहीं हो काळाचें ॥ १ ॥**
**जन्ममृत्यूंचें खंडण । पापातापाचें दहन ॥ २ ॥**
**विठ्ठल नामें सुखआनंद । भानुदास परमानंद ॥ ३ ॥**

मुमुक्षूंस उपदेश करितांना ‘ योगाचिया आटी नको धरूं पोटीं ’ तसेच ‘ यज्ञाचिया ’ ‘ जपाचिया ’ ‘ तपाचिया ’ ‘ अनुष्ठानाचिया ’ इ० खटाटोपांत न पडतां रामनामांत सदा रंगून रहा असें भानुदासांनीं सांगितलें आहे. ‘ कामाचिया सोसें ’ तसेंच क्रोधाचिया, मदाचिया, लोभाचिया, तृष्णेचिया—सोसें हातीं कांहीं येणार नाहीं. ‘ कल्पनेच्या मागें धांवसी कल्पका । न पवसी सुखा बुडसी वाया ॥ भानुदास म्हणे सर्व हें सोडोनी । एक चक्रपाणी सखा करीं. ’

## हिंदी पद.

**‘ जमुनाके तट धेनु चरावत । राखत है गइया ॥ १ ॥**
**मोहन मेरा साइया ॥ ध्रु० ॥**
**मोरपत्र शिरीं छत्र सुहावें । गोपी धरत बहीया ॥ २ ॥**
**भानुदासप्रभु भगतको वत्सल । करत छत्र—छाइया ॥**

---

## ५ मृत्युंजय उर्फ मुंतोजी ब्रह्मणी. ( शके १४४०-१४८० )

हा एक प्रख्यात पुरुष होऊन गेला. याचें चरित्र बरेंच अद्भुतरम्य आहे. हा मूळचा मुसलमान, व बाहामनी शाहीच्या राजघराण्यांत जन्मलेला होता. याची आई कदाचित् हिंदु असावी. याचे संस्कार हिंदुत्वाचे होते. तारुण्यांत हा राजविलासी होता. एकदा हा आपल्या वाड्यांतील झरोक्यांत आपल्या स्त्रीसह बसून फळें खात होता. उभयता फळें खाऊन साली खिडकींतून खालीं टाकीत. राजवाड्यांतील पद्धतीप्रमाणें खालीं कोणी फिरकायचें नाहीं; तथापि एक भणंग खालीं पडलेल्या साली वेंचून चोरखांत बसला होता! ह्या राजपुरुषानें तें पाहिलें व त्या भिकाऱ्यास लत्ताप्रहर केला. तेव्हां तो भिकारी म्हणाला: ' साली खाण्याबद्दल जर ही शिक्षा, तर आंतला मगज खाण्याबद्दल आपणांस कोणती जबर शिक्षा मिळेल! न्यायान्याय पाहणारा जगाचा नियंता कोणी तरी आहेच कीं नाहीं?' हें ऐकून त्यास विचार पडला. शेवटीं त्यास अनुताप होऊन तो पंढरपुरास गेला. तेथें एके ठिकाणीं विवेकसिंधूचें निरूपण चाललें होतें तें ऐकून याच्या अनुतप्त चित्तात आत्मज्ञानाचा अल्प प्रकाश पडला. तो ती पोथी घेऊन फिरत फिरत कल्याणीस गेला व तेथें ' सहजानंदस्वामी ' होते त्यास शरण गेला. त्यांनीं याच्यावर अनुग्रह केला व याचें नांव मृत्युंजय असें ठेविलें. हा पुढें नारायणपुरास गेला व तेथेंच राहूं लागला.

महिपतबावांनीं भक्तविजयाच्या ४१ व्या अध्यायांत याची गोष्ट दिली आहे. त्यानीं याचें नांव शांतिब्राह्मणी असें दिलें आहे व तो बेदरचा पातशाह होता असें म्हटलें आहे. पण तो बेदरचा पातशहा नसून त्याच्या घराण्यांतीलच कोणी तरुण राजपुरुष असला पाहिजे. त्याची वृत्ति पालटून तो पूर्वसुकृतबळानें पंढरीच्या वाटेस लागला व त्याला पुढचा मार्ग सुलभ झाला. जो पंढरीच्या वाटेला लागला तो दुर्बुद्धि खळ

असला तरी सुधारतो. कल्याणीहून नारायणपूर एक कोसावर आहे. मृत्युंजय वारंवार गुरुदर्शनास जात असे.

भावे यांनीं मृत्युंजय ब्राह्मणीकृत ' प्रकाशदीप व स्वरूपसमाधान ' हे दोन ग्रंथ महाराष्ट्रकवींतून प्रसिद्ध केले असून याशिवाय त्याचे ( १ ) अनुभवसार ( २ ) गुरुलीला ( ३ ) अमृतसार ( ४ ) सीताबोध ( ५ ) पंचीकरण ( ६ ) सिद्धसंकेत हे सहा ग्रंथ उपलब्ध असून शिवाय पदें, अभंग वगैरेही उपलब्ध आहेत असें ' महाराष्ट्र सारस्वतांत ' म्हटलें आहे. मृत्युंजय ब्रह्मणी, बामणी मुंताजी, मुंताजी, मृत्युंजय, मृत्युंजय महायोगी, हीं नांवें याच एका पुरुषाचीं आहेत. संतमालिकांतून मृत्युंजय हें नाव मोठया आदरानें घेतलेलें आढळतें.

वर सांगितलेले दोन्ही ग्रंथ ओवीबद्ध असून त्यांच्या सुमारें हजारभर ओव्या आहेत. दोन्ही ग्रंथ उच्च वेदांताचे आहेत. लेखक मुसलमानाचा हिंदु झाला हें खरेंसुद्धां वाटत नाहीं, इतके ते मुरलेल्या सिद्धाचे ग्रंथ वाटतात. गहन विषय अगदी सोप्या भाषेंत सांगितला आहे. मुसलमानी संस्कृतीचा अगर भाषेचा लेशमात्र संस्कार ग्रंथांवर दिसत नाहीं.

प्रकाशदीपाच्या अखेरीस ग्रंथकार म्हणतोः—

**सकळ शास्त्रांचेनि मतें । आणि महावाक्यांच्या बळें होतें**
**तेंचि म्यां निरुतें । कथन केलें ॥ ५-४८ ॥**
**तरि मज प्रत्यक्ष जालें । आपणां आपण गवसलें ।**
**म्हणोनि बोलिलें । प्रमाणेंसी ॥ ४९ ॥**
**मन चित्त समसरलें । स्वयें स्वरूप प्रकाशलें ।**
**निराकार उघडलें । ब्रह्ममय ॥ ५६ ॥**
**अहर्निशीं ध्यातां । ज्ञान होय त्वरिता ॥**
**ब्रम्हणी मुंतोजी विनवी आतां । प्रकाशदीप ॥ ७८ ॥**

स्वरूपसमाधानांत समाधानाची हातोटी खरोखरीच फार उत्तम सांगितली आहे. ' जाणीव ' म्हणजे काय तें कवि सांगतोः—

**परेशाचिया अनंत शक्ति । तिया काय जाणिवेविण वर्तती ? ।**

मायादि सर्व स्थिति । उत्पत्ति प्रलय ॥ ११ ॥
जे कांहीं स्थूलसूक्ष्मादि रचना । कारण महाकारण जाणा ।
ते न प्रवर्ते जाणिवेविना । कांहींचि पैं ॥ १२ ॥
सकळ जीवांची उत्पत्ति । ते जाणिवेविण नाहीं स्थिति ।
नानाकार्य व्यापार गति । इया जाणीव हेतु ॥ १३ ॥
त्रिगुण पंचभूतास्थिति । जाणीवाचि जीवादि देवताशक्ति ।
ते जाणिवे जयानें होय स्फूर्ति । तो परमेश्वरु ॥ १५ ॥
तयाचिया सूत्र जाणिवा । राहिला चराचराचा ठेवा ।
व्याप्ति जाली सर्व जीवां । धरिलें विश्व ॥ १७ ॥
देह नुसधा मृत्तिकेचा गोळा । यातें प्रकाशिता दीप वेगळा ।
तोचि जाणे अवयवां सकलां । परी अवयव त्या नेणती ॥ ३१ ॥
ज्ञानपणेंचि श्रोत्र शब्द ऐके । त्वक् घे स्पर्शसुखदुःखें ।
जाणपणेंचि चक्षु देखे । नानारूपांतें ॥ ३२ ॥
ज्ञानपणेंचि जिह्वा रस चाखे । घ्राण गंधें तोखे ।
ज्ञानपणेंचि पोखे । नाना वासें ॥ ३३ ॥
हीं ज्ञानेंद्रियें पांचीं । यांत जाणीव असे येकाचि ।
तीसीचि प्रतीति तयांची । परी हीं नेणती तिये ॥ ३४ ॥
ज्ञानपणेंचि प्राणगति । आपुलां व्यापारीं वर्तती ।
निरोधिलिया निरोधती । ज्ञानपणेंचि ॥ ४२ ॥
सकल जाणिवेचिया आधारें । ते नसतां एकही ना व्यापारे ।
वोस पडती अष्टही पुरे । जाणेवेविण ॥ ४६ ॥
ज्ञानपणेंचि जागृति स्वप्न । तेचि मावळलिया सुषुप्तिस्थान ।
ज्ञानपणेंचि तूर्य जाणपण । तिहीं अवस्थांचें ॥ ५१ ॥
जैसें तेजेविणें नेत्र न देखती । तैसी सर्वही आत्मप्रकाशें वर्तती ।
परी आत्मा तो सहजस्थिति । निर्लेप साक्षी ॥ ५६ ॥

---

# ४ नृसिंहसरस्वति व दत्तसंप्रदाय.



## १ गुरुचरित्रग्रंथ.

महाराष्ट्रांतील एक मोठा संप्रदाय म्हणून दत्तसंप्रदायाला मान आहे. याचे मुख्य प्रणेते श्रीनृसिंहसरस्वति व या संप्रदायाचा मुख्य ग्रंथ गुरुचरित्र. मुसलमानांची राजसत्ता हिंदुप्रजेस अत्यंत दुःसह झाली असतांना नृसिंहसरस्वतींचा अवतार झाला. श्रीपाद श्रीवल्लभ व नृसिंहसरस्वति ह्या एकामागें एक प्रगट झालेल्या श्रीदत्तावतारांनीं ज्या लीलांनीं हिंदुप्रजेस तसल्या घोर प्रसंगांत धीर देऊन हिंदूंच्या आचारधर्माचा उपदेश केला त्या लीलाचरित्रांचें वर्णन गुरुचरित्र ह्या ग्रंथांत केलें असून सांप्रदायिकांना हा ग्रंथ वेदतुल्य वाटत असतो. नृसिंहसरस्वति ही ज्ञानेश्वर व एकनाथ ह्यांच्या मधली महाविभूति आहे. हे शके १३८० मध्यें ‘ निजानंदीं बैसले ’ म्हणजे अर्थातच त्याच्या पूर्वींच्या ८० वर्षांत यांचें कार्यक्षेत्र पडतें. गुरुचरित्र ग्रंथ शके १४८० च्या सुमारास म्हणजे शंभर वर्षानंतर झाला. प्रस्तुत ग्रंथांत कांहीं प्रकरणांतून ग्रंथकाराची जाज्वल्य श्रद्धा व त्याचें वेदशास्त्रांचें खोल ज्ञान स्पष्ट दिसतें. चारी वेदांचा विस्तार कसा झाला याबद्दलचा २६ वा अध्याय, कर्मविकासाचा २८ वा अध्याय, गृहस्थाश्रमी पुरुषाचे आचारधर्म व आन्हिक ह्याबद्दलचें सविस्तर विवरणाचे ३६ व ३७ हे दोन अध्याय, रुद्राध्यायमहिमा ( अ० ३४ ), भस्माचें गौरव ( अ० २९ ), रुद्राक्षाचें माहात्म्य ( अ० ३३ ), पूर्वजन्मसंस्कारांविषयींचा अध्याय ( २९ ), अनंतव्रतकथा ( अ० ४३ ), शैलशिवरात्रिमहिमा ( अ० ४४ ), काशीक्षेत्रवर्णन ( अ० ४१ ) व गाणगापूरवर्णन (अ०

४९ ) इत्यादि प्रकरणें दत्तसांप्रदायिकांना तर महत्वाचीं वाटणारीं आहेतच, पण सामान्य वाचकांनाही तीं विचारणीय वाटतील यांत संदेह नाहीं. नृसिंहसरस्वतींचा योगशास्त्रावर व कर्मकांडावर मुख्य भर होता, व प्रस्तुत ग्रंथांत कर्मकांडाचें विवरण सविस्तर आलें आहे. कर्मकांडाचे सर्वच नियम त्या काळींही पाळणें कठिणच होतें. आजकाल तर त्यांतील बहुतेक नियमांचे जुन्या कर्मठ माणसांकडूनही परिपालन होत नाहीं, तथापि सर्व नियमांचें व आचारांचें एकीकरण ज्यांत केलेलें आहे असा एकही ग्रंथ भाषेंत नसावा हें म्हणणें अविचाराचें होईल. चोऱ्या, खून, मारामाऱ्या, दरोडे, परद्रव्यापहार व परकांताहरण इ० गुन्हे सहस्रशः घडत आहेत, म्हणून त्यांचें नियमन करणारें कायद्याचें कोड नसावें हें म्हणणें युक्तीस धरून होणार नाहीं ! असें नियमांचें पुस्तक पुढें असलें म्हणजे देशकालवर्तमानानुसार सूज्ञ लोक तारतम्यानें ग्राह्याग्राह्य विचार ठरवितात. शिवाय अशा जातीचा एवढा एकच ग्रंथ मराठी भाषेंत आहे व त्याचें श्रद्धेनें व पूज्यबुद्धीनें नित्य पाठ करणार हजारो लोक असून त्यांच्या आचारविचारांवर त्याचा थोडा फार संस्कारही घडत असतो. दोन तीन अध्यायांतील धर्मशास्त्रविषयक विचार समजण्यास जरा कठिण आहेत, एरव्ही सारा ग्रंथ सुबोध व सरळ आहे. ह्या ग्रंथांत एकही यावनी शब्द नाहीं. ग्रंथ सुमारें ७००० ओव्यांचा असून त्याचे ५३ अध्याय आहेत व शेवटच्या अध्यायांत अध्यायवार विषयानुक्रमणिका दिली असून सप्ताहाची पद्धत सांगितली आहे. वाचक प्रायः सप्ताह करितात. कित्येक भक्त तर एका दिवसांत समग्र ग्रंथाचें पारायण करितात. ह्या ग्रंथाची पकड लोकांच्या मनावर जबरदस्त आहे. मुसलमानी रियासतीच्या ऐन भरांत नृसिंहसरस्वतींनीं चातुर्वर्ण्यघटित वैदिकधर्माचें स्वतःच्या आचरणानें व उपदेशानें संरक्षण करून हिंदु व मुसलमान, ब्राह्मण व शूद्र, गृहस्थ व संन्यासी ह्या सर्व लोकांवर आपल्या तपोनिष्ठेची व योगैश्वर्याची प्रभा पाडली व स्त्रीपुरुषांना आचारधर्माचा सोज्वल मार्ग

दाखवून दिला. त्यांनीं हजारो लोकांना दुःखमुक्त केलें, पंढरीचें माहात्म्य गाणगापुरास आणलें. नृसिंहसरस्वती हे योगमार्तंड व अध्यात्मज्ञान-सूर्य होते. त्यांनीं योगबलानें अनेक चमत्कार केल्याच्या गोष्टी गुरु-चरित्रांत आहेत. अलीकडचे भौतिक शास्त्रावरच सर्व भर देणारे पंडित या गोष्टी सत्य मानण्यास तयार होणार नाहींत, तरी त्या मिथ्या आहेत असें म्हणणेंही मोठें धाडसाचें आहे! सामान्य मनुष्याला ज्ञानेंद्रियें दाख-वितील तेवढेंच सत्य वाटतें पण ज्ञानेंद्रियांच्या व बुद्धीच्याही पलीकडचा अनुभव घेतलेल्या महात्म्यांना अशक्य काय आहे? सांप्रतच्या विद्वा-नांची आधिभौतिक शास्त्रांवरच सारी मदार असते, पण आधिभौतिक शास्त्रेंही अपूर्ण व परस्परविसंवादी आहेत. योगशास्त्रांतले व अध्यात्मां-तले प्रयोग पाश्चात्य पंडित आतांशा करूं लागले आहेत. आमचे अव-तारी पुरुष व संतमहंत या बाबतींत स्वानुभवानें बोलणारे व वागणारे आहेत. नृसिंहसरस्वतींना साक्षात् श्रीदत्तच मानतात.

## २ ग्रंथरचनाकाल.

श्रीनृसिंहसरस्वती शके १३८० मध्यें 'निजानंदीं बैसले'. गुरुचरि-त्राच्या ५१ व्या अध्यायांत पुढील ओव्या आहेतः—

**कन्यागतीं बृहस्पति । बहुधान्य संवत्सरीं ख्याती ।**
**सूर्य चाले उत्तरगती । संक्रांती कुंभ परियेसा ॥ ३६ ॥**
**शिशिर ऋतु माघमासीं । असितपक्ष प्रतिपदेसी ।**
**शुक्रवारीं पुण्यदिवशीं । श्रीगुरु बैसले निजानंदीं ॥ ३७ ॥**

माघ वद्य १ शुक्रवार, बहुधान्य संवत्सर, ह्या दिवशीं कुंभसंक्रांतीला सूर्य असून कन्याराशीला गुरु असतांना श्रीगुरु गुप्त जाले. वरील सर्व योग शके १३८० ह्या वर्षीं मिळतात. (श. १४४० मध्येंही मिळतात पण १३८० हा शक एकंदर पुढीलमागील गोष्टींसी अधिक मिळता असल्यामुळें आह्मांस अधिक ग्राह्य वाटतो.) म्हणजे नृसिंहसरस्वतींचें अवतार कार्य

शके १३८०च्या माघमासांत संपलें. त्यापूर्वी ते ५० वर्षे प्रगट होते असे मानल्यास त्यांचा चरित्रकाल शक १३३० ते १३८० हा ठरतो, अर्थात त्यांचा पूर्वावतार श्रीपादश्रीवल्लभ हा शके १३०० च्या आंतबाहेर प्रगट स्थितींत होता असें म्हटलें पाहिजे. म्हणजे शक शतक चौदावें ह्या दोन अवतारांच्या लीलाचरित्रांनीं व्यापलें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. आतां गुरुचरित्रग्रंथाचे कर्ते सरस्वतीगंगाधर यांनीं ग्रंथारंभीं आपली पूर्वज-परंपरा दिली आहे तीवरून त्यांचें उपनाम साखरे होतें व ते आपस्तंभ शाखेचे कौंडिण्यगोत्री ब्राह्मण होते असें दिसतें. नृसिंहसरस्वतींच्या शिष्यांपैकीं सायंदेव हे एक होते. सायंदेवाचे पुत्र नागनाथ, त्यांचे पुत्र देवराव, व देवरावांचे गंगाधर हे सरस्वतीगंगाधराचे जनक होत. सायंदेव, नागनाथ, देवराव, गंगाधर, सरस्वतीगंगाधर ही ग्रंथकर्त्याची पितृपरंपरा होय. सायंदेव व त्याचा पुत्र नागनाथ हे नृसिंहसरस्वतींचे समकालीन होते असें ग्रंथावरूनच दिसतें. नागदेव शके १४०० च्या सुमारास गत झाले असावें. २५ वर्षांची पिढी धरल्यास सरस्वतीगंगाधराचा जन्म शके १४५० च्या सुमारास व त्याच्या गुरुचरित्रग्रंथाची रचना शके १४८० मध्यें म्हणजे नृसिंहसरस्वतीनंतर शंभर वर्षांनीं झाली असें अनुमान काढण्यास कांहीं हरकत नसावी. नृसिंहसरस्वतींचें प्रमुख शिष्य सातः बालसरस्वती, कृष्णसरस्वती, उपेंद्र, माधवसरस्वती, सदानंद, ज्ञानज्योती व सिद्ध ( अ० १३ ). ह्यांपैकीं सिद्ध नेहमीं श्रीगुरुसेवेस सन्निध असत. त्यांनीं हें श्रीगुरुचरित्र आपल्या नामकरणी शिष्यास सांगितलें व त्याचाच विस्तृत अनुवाद पुढें सरस्वतीगंगाधरांनीं करून हा गुरुचरित्र ग्रंथ महाराष्ट्रभाषेंत शके १४८० च्या सुमारास निर्माण केला. सिद्धानें नामधार-

---

१ एका जुन्या बाडांतही 'तेराशें ऐंशि शार्की' हे सारे योग येत असून श्रीगुरु शके १३८० मध्येंच निजानंदीं बैसले असें एका श्लोकांत म्हटलें आहे, व हें 'ज्योतिर्मानायनांशे गणित करुनियां पाहतां' बरोबर आहे. रा. ना. कृ. गद्रे यांनीं गणित पाहून शक १३८० हाच मुक्रर केला आहे.

कास सांगितलेला मूळ ग्रंथ प्रथम छोटा होता व तो ५३ अध्यायांत वाढवून सरस्वतीगंगाधरांनीं मोठा केला अशी कोणा कोणाची समजूतही आहे. कदाचित् मूळ ग्रंथ सांपडलाच तर सरस्वतीगंगाधरानें पदरचा कोणता भाग त्यात घातला हें समजण्यास मार्ग होईल. मुकुंदराजाच्या विवेकसिंधूंतील कित्येक दृष्टांत, ओव्या व चरण थोड्या फरकानें गुरुचरित्रांत तसेंच घेतलेले दिसतात! यावरून आपला ग्रंथ सजविण्यासाठीं किंवा मान्यतर करण्यासाठीं त्यानें विवेकसिंधूचा आश्रय केल्याचें दाखवितां येतें. गुरुचरित्राची मूळ प्रत सांपडेल तर बरें पडेल.

## ३ श्रीपादश्रीवल्लभ व नृसिंहसरस्वती.

हे दत्ताचे दोन अवतार चवदाव्या शतकांत झाले. चौथ्या अध्यायांत अनसूयेच्या पोटीं श्रीदत्तावतार झाल्याची सुप्रसिद्ध कथा दिली आहे तेथें दत्त म्हणजे महाविष्णु असें स्पष्ट म्हटलें आहे. ‘ विष्णुमूर्ति दत्तात्रेय, ’ अर्थात् दत्ताची उपासना म्ह० विष्णूचीच उपासना होय. ‘ पिठापूर पूर्वदेशीं । होता ब्राह्मण उत्तमवंशी । आपस्तंब शाखेसी । नाम आपळराजा जाण ॥ तयाची भार्या सुमता । असे आचारपतिव्रता । आतिथि आणि अभ्यागता । पूजा करी भक्तिभावें ॥ ’ ह्या दंपतीवर प्रसन्न होऊन श्रीदत्त त्यांचे उदरीं आले. तेच श्रीपादश्रीवल्लभ होत. त्यांचें सातवे वर्षी मौंजीबंधन झालें तेव्हां त्यांनीं चार वेद मुखानें म्हटले व हा ‘ कारणिक अवतार ’ आहे असा लोकांनीं निश्चय केला. ‘ आचार व्यवहार प्रायश्चित्त । समस्तांसी आपण बोलत । वेदांतभाष्य वेदार्थ । सांगतसे द्विजवरांसी ! ’ त्यास १६ वें वर्ष लागल्यावर आपळराजानें त्याचा विवाह करण्याचें मनांत आणलें. तेव्हां श्रीपाद म्हणाले कीं आमचा विरक्तीशीं विवाह झाला असल्याकारणानें दुसऱ्या स्त्रीशीं आम्हांस विवाह कर्तव्य नाहीं. मी तपस्वीवृत्तीनें राहून उत्तरपंथाला जाणार आहे. ‘ न म्हणावें पुत्र यासी । हा अवतार पुरुष तापसी ’ असा निश्चय करून ते मातापितर स्वस्थ राहिले. अंध व पंगु अशा आपल्या

दोन भावंडांकडे अमृतदर्ष्टीनें पाहून त्यांना श्रीपादांनीं अव्यंग व ज्ञानी केले व साधुजनांना दीक्षा द्यावयास ते उत्तरपंथाला गेले. प्रथम ते काशीस व तेथून बद्रीनारायणाकडे गेले व तेथून चरणस्पर्शानें तीर्थक्षेत्रांना पावन करीत ते खालीं गोकर्णास आले. तेथून ते कुरवपुरास (कुरगड्डी-निजाम-राज्यांत ) आले. तेथें अंबिका नांवाची एक विधवा स्त्री शुचिर्भूतपणानें राहत असे. तिचा एकुलताएक पुत्र अति मूढ होता म्हणून ती जीवास कंटाळली होती. तिनें श्रीपादांस वंदन करून पुढील जन्मीं एक अलौकिक पुत्र व्हावा असा वर मागून घेतला. श्रीपाद म्हणाले ' माते ! तूं शिव-पूजा करीत जा म्हणजे तुझी मनकामना पूर्ण होईल. ' नंतर त्यांनीं एका रजकाला त्याच्या भक्तीनें प्रसन्न होऊन तूं पुढील जन्मीं म्लेंन्छांचा राजा होऊन राजविलास भोगशील असा वर दिला. ती हकीकत पुढें सांगण्यांत येईल. श्रीगुरूही अदृश्य झाले. ' आश्विन वद्य द्वादशीशी। नक्षत्र मृगराज परियेसीं । श्रीगुरु बैसले निजानंदेसी अदृश्य झाले गंगेंत ' हें श्रीपादांचें चरित्र अ० ५ व अ० ९ मध्यें सांगितलें असून मधल्या तीन अध्यायांत गोकर्ण व प्रदोप यांचें माहात्म्य सांगितलें आहे.

श्रीपादश्रीवल्लभ यांचा पुढचा अवतार जो श्रीनृसिंहसरस्वती[1] त्यांच्या लीलाचरित्रास ११ व्या अध्यायापासून प्रारंभ झाला आहे. ग्रंथसमाप्ती-पर्यंत त्यांचींच लीलाचरित्रें वर्णिलीं आहेत. श्रीपादांनीं ज्या अंबिका-नामक स्त्रीस तुला पुढील जन्मीं विश्वविख्यात पुत्र होईल असा वर दिला होता ती अंबिका मरणोत्तर वऱ्हाडांत करंजगांवीं जन्मास आली. ' जन्म जाला पुढें तियेसी । करंजनगर उत्तरदेशीं । वाजसनेय शाखेसी। विप्रकुळीं जन्मली. ' तिचें नांव अंबाभवानी असें ठेवण्यांत आलें. माधव-नामक धर्मनिष्ठ ब्राह्मणाशीं तिचें लग्न लागलें.

त्यांच्या पोटीं नृसिंहसरस्वती जन्मास आले. त्यांचें जन्मनाम शालि-ग्राम असून लौकिकनाम नरहरि किंवा नृसिंह असें होतें. ' जन्मतांच

---

१ महिपतीच्या भक्तलीलामृतांत ( अ० ४९ ) ही यांचें संक्षिप्त चरित्र दिलें आहे.

तो बाळक । ॐकार शब्द म्हणतसे ऐक '. त्याचें ज्योतिष्यांनीं ' न होती तयासी गृहिणीसुत । पूज्य होईल त्रिभुवनांत ' असें जातक वर्तविलें. मुंज होईपर्यंत त्या बाळकानें प्रणवोच्चाराशिवाय कोणताच शब्द उच्चारला नाहीं ! हें मुकें पोर संसार कसा करील व आमचे कष्ट कसे दूर करील याची अज्ञानास्तव त्याच्या आईबापास घोर चिंता पडली. कानानें हा सारें ऐकतो, तोंडावरून याला सर्व समजतेसें दिसतें, पण ॐ शिवाय हा कांहीं बोलतच नाहीं! एकदां त्यानें लोखंडाची पाहार हातीं घेतली तों तें बावनकशी सोनें ठरलें ! तेवढयानें ' हा कुळदीपक कारणिक अवतार आहे ' असें लोकमतें निश्चित झालें. मोठया थाटानें नृहरीची मुंज केली. देवदेवक, चौल, मातृभोजन सर्व कांहीं झालें. गायत्रीमंत्रोपदेश झाला तो यानें मनांतच जपला. आईनें पहिली भिक्षा घातली तेव्हां यानें तोंड उघडलें ' अग्निमीळे पुरोहितं ' ' इषेत्वा ' ' अग्न आयाहि ' इ० चार वेदांचे चार मंत्र त्यानें म्हणून दाखविले ! तेव्हां हा अवतारी जगद्गुरु आहे अशी सर्वांची खात्री पटली. ' तूं मला भिक्षा मागावयास सांगितलेस तर आतां मी भिक्षाटणास जातों ' असें श्रीगुरु म्हणाले. हा बालब्रह्मचारी खरोखरीच जावयास निघाला हें पाहून मातेनें शोक केला, व ' मुख्य आश्रम असे गृहस्थ । आचरितां होय अतिसमर्थ । संन्यास घ्यावा मग मुख्यार्थ । धर्मशास्त्र येणेंपरी ' असा त्यास लौकिक उपदेशही केला. ' अग्राह्य संन्यास बाळपणीं ' हें अंबाभवानीचें म्हणणें सामान्यतः खरें आहे, पण कृतनिश्चयी महात्मे काय मागे पाय घेतात ? ' न निश्चितार्थात् विरमंति धीराः '– आईच्या अत्याग्रहास्तव आईला आणखी दोन पुत्र होईतों ते घरीं वेदपठण करीत राहिले. आईला जुळें झाले. नंतर ते निघालेच. आईबापांचा अनावर शोक पाहून त्यांनीं आपलें दत्तरूप प्रगट करून त्यांस कृतार्थ केलें. नंतर ते काशीस गेले. तेथें त्यांनीं तीव्र तपोनुष्ठान केलें. तेथें अनेक योगी, तपस्वी, ज्ञानी व संन्यासी होते. त्यांत कृष्णसरस्वतीनामक एक अतिवृद्ध व महासमर्थ

संन्यासी होते. त्यांची ब्रह्मस्थिति पाहून श्रीगुरु प्रसन्न झाले व संन्यासाश्रमाची त्यांनीं दीक्षा त्यांजपासून घेतली. कृष्णसरस्वती हे ह्या जगद्गुरूचे गुरु झाले. नृसिंहसरस्वतींची गुरुपरंपराही १२ व्या अध्यायांत दिली आहे. ही अर्थात् संन्यासीपरंपरा आहे. ही आद्यशंकराचार्यांपासूनची आहे. विद्यारण्यस्वामीपासून नृसिंहसरस्वती १२ वे पुरुष होत.

नृसिंहसरस्वतींचीं चरित्रें पुढील अध्यायांतून बहुत वर्णिलीं आहेत. ही साक्षात् श्रीदत्तविभूति असल्यामुळें तिच्या अद्भुतरम्य लीलांनीं हजारो लोकांचा उद्धार केला आहे. भिल्लवडीस असतांना एका विद्वान् ब्राह्मणाच्या ढ मुलास वाईट वाटून भुवनेश्वरीदेवीजवळ त्यानें धरणें धरिलें असतांना श्रीगुरूंनीं त्याला बुद्धियोग देऊन कृतार्थ केलें. तेथून ते कृष्णापंचगंगासंगमीं ( नरसोबाची वाडी ) गेले व तेथें बारा वर्षें राहिले. पंचगंगा म्ह० शिवा, भद्रा, कुंभी, भोगावती व सरस्वति ह्या पांच नद्यांचा संगम. तेथें अमरेश्वरासंन्निध औदुंबरवृक्षातळीं श्रीगुरु बसत असत. एका दरिद्री ब्राह्मणाच्या दारीं घेवड्याचा वेल होता त्याचें मूळ त्यांनीं उपटून टाकलें तों त्याच्याखालीं द्रव्यनिधि सांपडला, त्यामुळें त्या ब्राह्मणाचें दारिद्र्य विच्छिन्न झालें. एका ब्रह्मराक्षसास शिरोळ येथें त्यांनीं गति दिली व त्यामुळें एका बाईचीं मुलें मरत असत तीं वांचूं लागलीं. पुढें ते गाणगापुरीं गेले. ब्रह्मसमंधाला गति देणें, विप्राचें दैन्य हरण करणें, वांझ स्त्रीला पुत्र देणें, ह्मातार्‍या व वांझ ह्मशीला दूध देणें, मृतपतिकेचा पति उठवणें, रोग्यांना आरोग्य देणें, हृदयशूळगंडमाळ-अपस्मारादि रोगांनीं पछाडलेल्या दुःखित जीवांना दुःखमुक्त करणें, कोड्याचा कोड घालविणें, दरिद्र्याकडून सहस्त्रभोजन करविणें, साठ वर्षांच्या वंध्या स्त्रीस अपत्य देणें, जागींच सर्व तीर्थयात्रांचे संभ्रम दाखविणें, एकाच वेळीं अनेक शिष्यांकडे प्रसाद घेणें, इ. अनेक चमत्कार ह्या अवतारपुरुषानें करून दाखविले ! हे सारे ह्या ग्रंथांत सविस्तर

वर्णिले आहेत. स्वतः नृसिंहसरस्वती संन्यासी होते, तथापि त्यांच्या शिष्यांत बाळकृष्णसरस्वती, उपेंद्रमाधवसरस्वती इ० कांहीं संन्यासी होते व कांहीं ' आपुले गृहीं नांदणारे ' म्ह० गृहस्थ होते. त्यांत सायंदेव, नंदीकवीश्वर, नरहरिकवीश्वर इ. होते.

## ४ गुरुकृपेनें रजकाचा राजा झाला.

नवव्या अध्यायांत रजकाची कथा दिली आहे. श्रीपाद कुरवपुरीं असतां त्या गांवीं एक रजक होता. ' नित्य श्रीपाद गंगेसी येती । विधिपूर्वक स्नान करिती । लोकवेव्हार संपादिती । त्रयमूर्ती आपण ! ' सिद्धाचे स्नानादि व्यवहार लोकानुग्रहार्थच असतात. त्या गंगातटाकीं वस्त्रें धुण्याकरितां तो रजक नित्य येत असे. आल्यावर श्रीपादांस ' दण्डप्रणाम ' ( साष्टांग नमस्कार ) तो श्रद्धेनें करीत असे. त्याची श्रद्धा पाहून ते प्रसन्न झाले व एके दिवशीं ते त्यास म्हणाले कीं, ' तुष्टलों मी तुझ्या भक्तीशी। सुखें राज्य करीं आतां ।' कांहीं दिवसांनीं नदीतटाकीं एक म्लेंच्छ–राजा जलक्रीडा करण्यास आला. वस्त्रालंकार व रत्नें, माणकें यांनीं शोभणाऱ्या स्त्रियांसह त्यानें जलक्रीडा आरंभिली. कृष्णा–वेण्याच्या दुथडी हत्ती, घोडे, सैन्य पसरलें होतें, मधुर वाद्यांचा ध्वनि सर्वत्र दुमदुमून राहिला होता. तो थाट पाहून रजकाच्या मनांत विचार आला. ' धन्य राजयाचें जिणें । ऐसें सौख्य भोगणें । स्त्रिया वस्त्रें अनेक भूषणें । कैसा भक्त ईश्वराचा !।' श्रीपादांनीं त्याची तामस राज्यभोगाची वांछा ' वळखिली.' श्रीपादांची त्या रजकावर कृपा होती. मनांतून विषयांला चित्त विटलें पाहिजे किंवा विषयलालसा भोगानें तरी निर्मूल झाली पाहिजे–त्याशिवाय मोक्ष नाहीं ! असा विचार करून त्यांनीं पुढील जन्मीं तूं म्लेंच्छवंशांत जन्मून राज्यभोग भोगशील व त्यांना विटून मला शरण येशील तेव्हां तरशील असा त्यास वर दिला ! यापुढील कथा ५० व्या अध्यायांत आली आहे. तोच रजक मरणानंतर म्लेंच्छजातींत जन्म पावला व ' वैदुरीनगरीं ' ( बेदर शहरीं )

राज्य करूं लागला. स्त्रीपुत्रांसहवर्तमान तो राज्यसुख भोगीत असतां त्याच्या पूर्वजन्मींच्या गुरुसेवेमुळें त्याची बुद्धि सात्विक झाली होती, अंतःकरणांत पुण्यवासना होत्या, दानधर्म, परोपकारांत तो आपलें पुष्कळ द्रव्य वेंचूं लागला; 'विशेष भक्ति विप्रांवरी। ती असे पूर्व-संस्कारीं। असती देवालयें भूमीवरी। उपद्रव नेदी तयासी' देवद्विजांची निंदा त्याला सहन होत नसे. याचा हा हिंदुधर्मावरील प्रेमा पाहून यवन-पुरोहित ह्म० काजी वगैरे मनांतून त्याचा राग करीत पण त्याच्या प्रबलसत्तेपुढें त्यांचें कांहीं चालत नसे. त्यांनीं एकदा त्याला एकांतीं गांठून सांगितलें कीं, 'मंदमती द्विजजाती। देखा पाषाणपूजा करिती। समस्तांतें देव म्हणती। काष्ठ वृक्ष पाषाणादिक॥ धेनूसी म्हणती देवता होय। पृथ्वी सोम अग्नि सूर्य। तीर्थयात्रा नदी तोय। समस्ता देव म्हण ताती।' आणि मुख्यतः देव 'निराकार असून त्याला साकार म्हणून' हे पूजितात! बादशहानें त्यांना उत्तर केलें कीं, 'अणुरेणुतृणकाष्ठेसीं सर्वेश्वर पूर्ण असे' हें धर्मतत्त्व मला पटलेलें आहे. तो म्हणालाः—

**समस्त सृष्टी ईश्वराची। स्थावर जंगम रचिली साची।**
**सर्वत्र देव असे साची। तर्कभेद असंख्य॥**

सर्व जातींची उत्पत्ति पंचभूतांची आहे; भांडीं निरनिराळीं असलीं तरी त्यांचें कारण जी मृत्तिका ती एकच आहे; नाना वर्णाकृतींच्या धेनूंचें दूध एकच होय; नाना अलंकार एका सुवर्णाचें असतात— 'तैसा देह भिन्न जाण। परमात्मा एकचि पूर्ण। जैसा नभीं मृगलांछन। नाना घटीं दिसतसे॥ एकचि सूत्र आणोनी। नानापरींचे ओंविती मणीं। सूत्र एकचि जाणोनी। न पाविजे भिन्नभाव।' हिंदु लोक पाषाण पूजतात म्हणून म्हणतां तर सर्वांठायीं विश्वात्मा पूर्ण भरला आहे हें तुम्हांसही मान्य आहे! मग तो मूर्तींत नाहीं काय? हिंदु लोक आत्मा-रामाची पूजा करितात. मंदबुद्धि अंतःकरणाच्या स्थिरतेसाठीं पाषाणाला नारायणाचें नांव ठेवून ते नारायणालाच भजतात. यांत त्यांचें कांहीं

चुकतें असें मला वाटत नाहीं. तुम्ही मात्र त्यांचा द्वेष करितां हें वाईट आहे ! नाना जाती आपापल्या रहाटीनें रहाटतात. कोणाची निंदा करूं नये. हें बादशहाचें विचारपूर्ण भाषण ऐकून म्लेंच्छपुरोहित निरुत्तर झाले. त्याचा 'देवद्विजांवरील विश्वास' वाढतच गेला. असो. कांहीं दिवसांनीं त्याच्या मांडीवर एक स्फोटक ( फोड ) उद्भवला. वैद्य, हकीमांचे उपाय थकले. लेपनादिकांचा उपयोग झाला नाहीं. इकडे गाणगापुरीं श्रीनृसिंहसरस्वती होते. बादशहा ( पूर्वजन्मीचा रजक ) आतां म्लेंच्छ लोकांसह येईल व लोकांना उपसर्ग होईल यासाठीं चालू सालीं ( ईश्वर संवत्सर ) त्याचा उद्धार करून पुढील वर्षी आपण गुप्त व्हावें असें त्यांनीं आपल्याशीं योजलें. 'स्फोटकाचे दुःखें राजा । अपार कष्टला सहजा । नानापरी औषधें वोजा। करितां न होय तया बरवें। '. त्यानें विप्रांस विचारलें. त्यानीं सांगितलें कीं, सत्पुरुषाच्या दृष्टिसुधारसानें रोग जाईल. हें ऐकतांच राजाला पूर्वजन्मीं आपण गुरुसेवा केली त्याचें स्मरण झालें. तो तात्काळ पापविनाशतीर्थास गेला व स्नान करून शुचिर्भूत झाला तोंच तेथें एक यति प्रगट झाले. त्यांनीं एक कथा सांगून 'भीमातीरीं गाणगाभुवन । असे तेथें परमपुरुष' त्याजकडे जाण्यास सांगितले. तेथें श्रीनृसिंहसरस्वतींचें त्यास दर्शन झाल. दर्शन होतांच 'कां रे रजका कोठें असती । बहुतां दिवसां भेटलासी' असें त्यांनीं विचारिलें. 'ऐसें वचन ऐकोनी । म्लेंच्छ झाला महाज्ञानी । पूर्वजन्म स्मरला मनीं । करी साष्टांग दंडवत । पादुकांवरी लोळे आपण । सद्गदित अंतःकरण । अंगीं रोमांच उठोन । आनंदबाष्पें रुदन करी । ' त्यानें श्रीगुरुची प्रार्थना केली, व 'चरणावेगळे मला परदेशी कां केले' म्हणून तो स्फुंदूं लागला. अंगावरचा स्फोटक तत्काळ नाहींसा झाला व राजा रोगमुक्त झाला. आतां राज्यभोग पुरेत म्हणून स्वामींच्या चरणीं लागला. श्रीगुरूनीं राजाचा उद्धार केला व दुसऱ्याच वर्षी (श.१३८०) आपण 'निजानंदीं बैसले !'

हा बादशहा अल्लाउद्दीनशहा बाहमनी असावा असा तर्क आहे. अल्लाउद्दीनशहाचा मृत्युही इ. स. १४५७ म्ह० शके १३७९ मध्येंच झाला असें इतिहासही सांगतो ! यानें इ. स. १४३४ ते १४५७ पर्यंत म्ह० २३ वर्षें राज्य केलें. याची राजधानीही बेदर होती. याच्या पूर्वीचा बादशहा वली ( इ. स. १४२२ ते १४३४ ) यानें बाहमनीशहाची राजधानी गलबुर्गा होती ती तेथून हलवून बेदरास गेली. तेव्हां गुरुचरित्रांत वर्णिलेला राजा अल्लाउद्दीनशहाच असावा, कारण त्याचा मृत्युकाळ वरील कथानकाशीं जुळतो व त्याची राजधानीही बेदर होती. अल्लाउद्दीनाच्या पायास फोड झाला होता व हकिमास तो बरा करितां येईना असें वर्णन फेरिस्तानेंही केलें आहे व तो इ. स. १४५७ मध्यें मेला असेंही म्हटलें आहे.

---

## ५ सतीचा करुणरसमय विलाप.

ग्रंथकाराच्या स्त्रीविषयक भावना उदात्त आहेत. पवित्र व पतिव्रता-स्त्रियांचा त्यानें ठिकठिकाणीं गौरव केला आहे. ह्या संबंधानें ३० ते ३२ हे तीन अध्याय पहाण्यासारखे आहेत. एक तरुण सम वयाचें जोडपें होतें. ' दोघें सुंदर सुलक्षण । एकावरी एकाचा प्राण । न विसंबति एक क्षण । अतिप्रेम परियेसा । ' असें कांहीं दिवस चाललें असतां पतीला अन्नद्वेष झाला. प्रेमामुळें त्याच्या भार्येनेंही अन्न कमी केलें. पतीचें औषधही ती घेऊं लागली. पतीचें दुखणेंच जणुं तिनें आपल्यावर घेतलें ! तीन वर्षांनीं पतीला क्षय झाला, पत्नीनें त्याची शुश्रूषा अहोरात्र केली. ' दुर्गंधी झाला देह त्याचा । जवळी न ये वैद्य साचा । सुमनोभाव पतिव्रतेचा । न विसंबे क्षणभरी. ' पती जितकें अन्न घेई तितकेंच ती घेई । त्याचें औषधही ती त्याच प्रमाणांत घेत असें ! नानारसें औषधें झालीं, जपतप अनुष्ठानादि दैवी उपाय झाले. ' मनुष्य प्रयत्न नव्हे आतां ' असें वैद्यांनीं निदान केलें. दोघांचे आईबाप संपन्न

होते. त्यांचा व भार्येचा परमार्थबोध करून समजूत घालण्याचा त्या तरुणपतीनें पुष्कळ प्रयत्न केला, शेवटीं स्थानांतर करण्याचें ठरलें. उभयतां पतिपत्नी गाणगापुरास नृसिंहसरस्वतींकडे आले. पतीला तिनें डोलींत आणले. तेथें येतांच त्रिदोष होऊन पतीचा प्राण गेला !

आकांत करी ते नारी । लोळतसे धरणीवरी ।
भोंसकोनि घ्यावया घेतां सुरी । वारिती मग जनलोक ॥ ७८ ॥
आफळी शिर भूमीसी । हाणी ऊर पाषाणेसीं ।
केश मोकळे आक्रोशी । प्रलापितसे ते नारी ॥ ७९ ॥
" उष्णकाळीं तापोनि नरु । ठाकोनि जाय छायातरु ।
वृक्षचि पडे घात थोरु । त्यापरी झालें मज ॥ ८२ ॥
तृषेकरूनि पीडित । जाय मनुष्य गंगेंत ।
संधीं सुसरी करी घात । त्याचिपरी झालें मज ॥ ८३ ॥
व्याघ्रभयें पळे धेनु । जाय आधार ह्मणोनु ।
तेथें वधीतसे यवनु । तयापरी झाले मज ॥ ८४ ॥
ऐसी मी पापीण दैवहीन । आपुल्या पतीचा घेतला प्राण ।
मातापितयांसी त्यजून । घेऊन आल्यें विदेशीं ॥ ८५ ॥
बाळपणीं गौरीसी । पूजा केली शंकरासी ।
विवाह होता परियेसीं । मंगळागौरी पूजिली ॥ ९१ ॥
चुडे कंकणाचे आशेनी । पूजा केली म्यां भवानी ।
सांगती मातें सुवासिनी । तीं तीं व्रतें केली म्यां ॥ ९२ ॥
केवीं राहूं आतां आपण । पति माझा होता प्राण ।
लोकांसारिखा नव्हे जाण । प्राणेश्वर परियेसा " ॥ ९६ ॥
आलिंगोनि प्रेतासीं । रुदन करी बहुवसीं ।
आठवी आपुल्या पूर्वदिवसीं । पूर्वस्नेह तये वेळीं ॥ ९८ ॥
' कधी नव्हे पृथक्शयन । वामहस्त उसेविण ।
आतां फुटलें अंतःकरण । केवीं वाचूं प्राणेश्वरा ॥ १११ ॥
तव प्रेम होतें भरलें । मातापितयांतें विसरल्यें ।
त्यांच्या गृहीं नाहीं गेल्ये । बोलावणीं नित्य येती ॥ ११५ ॥

**जोंवरी होतासी तूं छत्र । तंव सर्वांठायीं मी पवित्र ।**
**मानिती सकळ इष्टमित्र । आतां निंदा करितील ॥ ११७ ॥**
**सासूश्वशुरापाशीं जाण । माझें मुख पाहतां मरण ।**
**गृह जाहलें वो अरण्य । तुह्मांवीण प्राणेश्वरा ॥ ११८ ॥**

हा सारा शोकावर्त करुणरसपूर्ण आहे. आतां मला 'बालविधवा' ह्मणतील, 'केशवपन केल्यावर मी कोणाला तोंड दाखवूं ?' इ० भाग हृदय फाडणारा आहे. ती सती शोकमग्न असतांच तेथें 'भस्मांकित जटाधारी । रुद्राक्ष भूपणें अळंकारी । त्रिशूळ धरिला असे करीं ।' असें स्वामी अकस्मात् पातले ! त्यांनीं तिला नेहमीचा वेदांताचा उपदेश केला व 'विचार पाहे पुढां आपुला । कोणेपरीं मार्ग भला । संसारसागर पाहिजे तरला । तैसा मार्ग पाहें बाळे ' असें सांगितलें. (गु०च० अ० ३०)

---

## ६ स्त्रीवर्गास उपदेश.

एकतिसाव्या अध्यायांत 'पति असता कवण धर्म । अथवा मेलिया काय कर्म ।' हे उभयधर्म सविस्तर सांगितले आहेत. पतिव्रतेचें हें आख्यान सांगतांना अगस्तिऋषीची भार्या लोपामुद्रा हिची कथा स्कंदपुराणांतील काशीखंडाच्या आधारें कथन केली आहे. विंध्यपर्वताच्या 'दक्षिण दिशा भूमीसी । अंधार पडला परियेसीं ॥ '-दक्षिणेंत अज्ञानाचा अंधार पडला होता म्हणून आर्यांची श्रेष्ठ संस्कृति दक्षिणेंत प्रथम अगस्तींनीं आणली ही गोष्ट प्राचीन इतिहासांतही प्रसिद्ध आहे. त्याची स्त्री लोपामुद्रा हिज-बरोबर आर्यस्त्रियांची नीतिही दक्षिणेंत पसरली. ह्या पतिव्रताधर्मांतील बहुत गोष्टी आमच्या स्त्रियांच्या रहाणींत आजही दिसत आहेत. 'पुरुष जेवितां प्रसाद जाण । मुख्य भोजन स्त्रियांसी ॥ ' 'पुरुष देखोन उभें राहणें । आज्ञेवीण बैसों नेणे । ' 'पतीची सेवा निरंतरीं । मनीं भाविजे हाचि हरी ॥ ' सडासंमार्जन करून घर शुद्ध व मंगल ठेवावें; पतीच्या आज्ञेवांचून व्रतदानधर्म न करावा, अतिथिसत्कार मनोभावें करावा,

'देवउपकरणीं उजळोनी । गंधाक्षतादि करूनी ॥' देवकार्यांत पतीला साह्य करावें; पतीच्या खालोखाल अतिथि व धेनु यांना मानावें; पुरुष संतोषी असतां स्त्रीनें दुश्चित नसावें; हळदी कुंकुम काजळ कंठ सूत्र हीं 'पुरुषआयुष्यवर्धनार्थ सेवावी । (पुरुष शब्द पति ह्या अर्थी वापरला आहे); सासू श्वशुर नणंद दीरभावें यांना सोडून वेगळा संसार थाटूं नये; वडिलांची मर्यादा पाळावी; पतीसवें त्याच्या चित्ताला उद्वेग होईल असा विवाद करूं नये; 'जरी असे अभाग्य पुरुष । नपुंसक जरी असे देख । असे व्याधिष्ट अविवेक । तरी देवासमान मानावा ।'; पतीला आवडतील तशींच लेणींलुगडीं ल्यावीत, मिळेल त्यांत मानसीं संतुष्ट असावें; पतिनिंदा करूं नये व ऐकूं नये; शेजारी व इष्ट सोयरे यांजकडे प्रसंगावांचून जाऊं नये; वडील माणसें व पति यांपुढें जोराजोरानें व क्रोधानें बोलूं नये; पति बाहेरून थकून भागून आला कीं सन्मुख जाऊन 'विंझणा वारिजे श्रमहार;' 'काय देती मातापिता । नेदी इष्टवर्ग बंधु भ्राता । इहपराची जोडी देता । पुरुष नारीचा देव जाण ॥' अशी बळकट श्रद्धा ठेवून पतिप्रेम जोडावें; गुरुदेव तीर्थ सर्व कांहीं आपला पति आहे अशा निष्ठेनें पतीला भजावें; विधवादर्शन अशुभ मानतात पण माता विधवा असेल तर पुत्रानें तरी तिला मंगल मानावें; पतिव्रतेच्या तेजापुढें देवही निष्प्रभ होतात; ती पतीसह आनंदानें नांदत आहे तें गृहधर्म स्वर्गतुल्य होय; गंगास्नानाहून पतिव्रतादर्शन पुण्यप्रद होय. तात्पर्यः—

**ज्याचे घरीं पतिव्रता । दैवें आगळा तो तत्वता ।**
**करावें सुकृत जन्मशाता । तरीच लाभे ऐसी सती ॥ १२४ ॥**
**चतुर्विध पुरुषार्थ देखा । स्त्रियेच्या संगतीं लाधे लोकां ।**
**पतिव्रता सती अधिका । पुण्यानुसार लाभे जना॥१२५॥(अ.३१)**

पुढील अध्यायांत 'विधवा स्त्रीचे धर्म' सांगितले आहेत. धैर्य असेल तर सहगमन करावें, तथापि 'असतां आपण गरोदरी । सहगमन करूं नये ।' शिवायः—

**स्तनपानी अकतां कुमारू । तिणें कारितां पाप थोरू ।**
**पुरुष मेला असेल दुरु । सहगमन करूं नये ॥ ७ ॥**
**तिणें असावें विधवापणें । विधीपूर्वक आचरणें ॥**
**सहगमनासमानें । असे पुण्य परियेसा ॥ ८ ॥**
**विधवापणाचा आचारू । कारितां असे पुण्य थोरू ।**
**निवर्तला असतां भ्रतारू । केशवपन करावें ॥ ९ ॥**

विधवापणीं एक वेळ भोजन करावें, तीर्थयात्रा उपासव्रत करून देवाला भजावें व दानधर्मांत व परोपकारांत आयुष्य सारावें. अन्नोदकदान सर्वांत श्रेष्ठ आहे हें पतीच्या नांवानें करावें. श्वेत वस्त्र नेसावें. पुत्र असल्यास ‘ पुत्राचे बोलें वागावें ’ विधवा भक्तिपूर्वक निर्मळ आचरणानें व परोपकारव्रत पाळून वागेल तर तिला ‘ सहगमनाचें फळ असें. ’ धर्मशील सती विधवापणाच्या धर्मानें वागेल तर आपलाच काय पण पतीचाही उद्धार करील.

ज्या तरुणीला नृसिंहसरस्वतींनीं स्त्रीधर्मोपदेश केला तिच्या पतीला त्यांनीं उठविले व पुढें उभयतांचा संसार सुखमय झाला. ( अ० ३२ ) सीमंतिनीची कथाही मोठी मनोहर आहे ( अ० ३५ ).

---

## ६ आचारधर्म.

आचारधर्मांतही कांहीं कांहीं फार सुंदर बोध केला आहे:—

**ब्राह्ममुहूर्तीं उठोनि । श्रीगुरुस्मरण करोनी ।**
**मग ध्याव्या मूर्ती तिन्ही । ब्रह्माविष्णुमहेश्वर ॥ १७६ ॥**
**दंतधावन करोनि ऐसे । काष्ठ टाकावें नैऋत्य दिशे ।**
**चूळ भरोनी द्वादश । द्विराचमन करावें ॥ १७७ ॥**
**मग करावें प्रातःस्नान । तेणें होय सर्व साधन ।**
**तेजोबल आयुष्यवर्धन । प्रातःस्नान केलिया ॥ १७८ ॥**
**प्रज्ञा वाढे दुःस्वप्ननाश । सकळ दैवतें होती वश ।**
**सौभाग्यसुख होती हर्ष । प्रातःस्नान केलिया ॥ १७९ ॥**

**प्रातःस्नान करावयासी । शीतोदक उत्तम परियेसीं ।**
**अशक्तता असेल देहासी । उष्णोदकें करावें ॥ १८९ ॥**

‘ नदीस्नान प्रवाहमुखीं ’ सर्वोत्कृष्ट होय. प्रातःस्नानानंतर संध्यावंदन, देवपूजा, पंचमहायज्ञ हें सर्व यथाशास्त्र करावें. ‘ रंगमालिका घालोनी । निर्मळ असावें देवताभुवनीं । मग बैसोनि शुभासनीं । देवपूजा करावी ’ ( अ० ३७–१२ ). पूजेला ‘ आपण पेरिलीं कुसुमें उत्तम, ’ क्रय करून घेणें हा गौण भाग ! ‘ संस्कृत अन्न व्हावया काजा। वैश्वदेव करावा ’ गोग्रास, बलिहरण करावें. अन्नदान अंत्यजांपर्यंत सर्वांस करावें. ‘ न विचारावें गोत्रकुळ । अन्न घालावें तात्काळ. ’ शयनागारीं समागमाचे वेळीं ‘ कोप नसावा उभयतांसी । संतोषरूप असावें !’ ( अ० ३७ )

असो गुरुचरित्र ग्रंथाची व त्यानें वर्णिलेल्या विभूतींची ओळख येथवर करून दिली आहे. आतां ह्या संप्रदायाचें वैशिष्टय सांगून नृसिंहसरस्वतींच्या मागोमाग झालेले दत्तभक्त जे जनार्दनस्वामी व त्यांचे शिष्य एकनाथ यांच्या दत्तभक्तीचें वर्णन करूं, व पुढील प्रकरणांत श्रीदत्ताचे एकांतिक भक्त जे दासोपंत त्यांचें व त्यांच्या वाङ्मयाचें स्वरूप दाखवूं. येथें एकनाथांचा जनार्दनस्वामींशीं जो संबंध आला तेवढयापुरतें वर्णन करण्यांत येईल. त्यांच्या चरित्राचा विचार पुढें होणारच आहे.

---

## ७ दत्तसंप्रदायाचें वैशिष्टय.

ह्या दत्तसंप्रदायाचा एक विशेष हा आहे कीं ह्यांत शिव आणि विष्णु ह्या उपासना एकरूप आहेत. दत्त म्ह० महाविष्णु असें गुरुचरित्रात व दासोपंतांच्या पदांत स्पष्ट म्हटलें आहे. त्यामुळें वारकरी संप्रदायाशीं तो मिळून आहे. तसेंच गुरुचरित्रांत शिवोपासनेबद्दल अनेक अध्याय आहेत तेव्हां शिवोपासकांनाही तो अनुकूल आहे. शिव, विष्णु, दत्त, जगदंबा, गणेश, खंडेराव हीं नांवें व यांचीं रूपें उपासकांच्या

आवडीप्रमाणें भिन्न दिसलीं तरी तीं सारीं एकाच परमात्मस्वरूपाचीं आहेत ही बुद्धि ह्या सर्व संप्रदायांत रूढ असल्यामुळें त्यांच्यात खटके उडण्याचा लेशमात्र प्रसंग नाहीं, व यांत आत्मज्ञानाशींही विरोध नाहीं. दुसरें असें कीं नृसिंहसरस्वति, जनार्दनस्वामी, एकनाथ, दासोपंत व अलीकडचे माणिकप्रभु व अक्कलकोटचे स्वामी हे सारे मुसलमानी राज्यांतच हिऱ्यांप्रमाणें चमकले व हिंदुमुसलमानातलें वैमनस्य यांच्या प्रभावामुळें पुष्कळच कमी झालें. यांची दोन्ही समाजांवर चांगली छाप पडली. नाथाना दत्त मलंगवेषांत भेटले ही गोष्ट प्रसिद्ध आहे. नाथांचा हिंदु-तुर्क-संवाद हा हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचाच एक उत्तम प्रयत्न आहे. नाथांनीं हिंदु व मुसलमान ह्या दोन्ही समाजांतील दांभिक व लबाड लोकांवर सारख्याच समबुद्धीनें कोरडे ओढले आहेत. तिसरी महत्वाची गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी ही आहे कीं दत्तोपासना महाराष्ट्राच्या बाहेर फारशी नाहीं. काठेवाडांतील गिरनार व नेपाळांतील दत्तस्थान हीं प्रसिद्ध आहेतच, पण महाराष्ट्रांतील माहूर, गाणगापूर, औदुंबर, नरसोबाची वाडी हीं चारही स्थानें आजमित्तीपर्यंत दत्तभक्तीचीं जाज्वल्य केंद्रें आहेत व गुरुवारचीं भजनमंडळें मुंबईसारख्या शहरांतून वाढत्या प्रमाणांत स्थापन होत आहेत. गाणगापूर व माहूर हीं स्थानें निजामच्या राज्यांत आहेत. गाणगापूर भीमानदीच्या तीरीं आहे. तेथें गांवाच्या मध्यभागीं नृसिंहसरस्वतींचा मठ आहे व दोन मैलांवर भीमाअमरजा संगम असून जवळ भस्माचा मोठा डोंगर आहे. यावरून फार प्राचीन काळीं ती यज्ञभूमि असावी असें वाटतें. मठांत नृसिंहसरस्वतींनीं स्थापन केलेली चिंतामणीची वालुकामय मूर्ति आहे. त्यांनीं ठेवलेल्या निर्गुणपादुकांची थाटांत पूजाअर्चा नित्य होत असते. पादुकांत दत्तांची स्वारी असल्यामुळें त्यांचें तेथें अतिशय महत्व आहे. मार्गशीर्ष शुद्ध १४ दिवशीं दत्तजन्माचा उत्सव होतो. माघ शुद्ध १ पासून श्रीनृसिंहसरस्वतींचा मुख्य उत्सव चार दिवस होतो. प्रतिपदेच्या दिवशीं ‘ श्रीशैल्य मल्लिकार्जुनी जातों ’ असें सांगून ते गुप्त झाले

असें गुरुचरित्रांत म्हटलें आहे. हें देवस्थान कडकडित आहे. भूतपिशाचादि बाधा झालेले व कुष्टानें पछाडलेले लोक येथें येतात. येथें सेवेकरी नेहमीं येत असतात व स्नानध्यानादि करून गुरुचरित्राचे पाठ करितात. नरसोबाची वाडी कृष्णातीरीं आहे. तेथें घाटावर दत्तमंदिर आहे. तेथें नृसिंहसरस्वतींनीं बारा वर्षें वास केला होता. येथें शनिवार मुख्य मानतात. येथें अश्विन वद्य १२ ही गुरुद्वादशी, मार्गशीर्ष पौर्णिमा ही दत्तजयंती, व माघ वद्य ५ हे दिवस उत्सवाचे मुख्य आहेत. येथें रात्रीं धुपारती झाल्यावर धुपाटण्यावर धूप टाकला कीं पिशाच्चें झाडाच्या अंगांत येऊन गति पावतात. हा चमत्कार आम्हीं स्वतः पाहिला आहे. औदुंबर कृष्णातीरींच आहे. श्रीदत्तोपासनेवर अलीकडे पनवेलचे रा. सदाशिवराव फडके वकील यांनीं विस्तृत ग्रंथ लिहिला आहे तो जिज्ञासूंनीं अवश्य पहावा. यांत दत्तोपासनेचें रहस्य सांगितलें असून नामांकित दत्तभक्तांचीं चरित्रें दिलीं आहेत व शेवटीं दत्तसंबंधी वाङ्मय दिलें आहे. ग्रंथ उत्कृष्ट आहे. असो. आपण आतां जनार्दनस्वामी व नाथ यांच्याकडे वळूं.

---

## ८ जनार्दनस्वामी ( शके १४२६ ते १४९७ )

जनार्दनस्वामी हे मूळचे चाळीसगांवचे देशपांडे. हे ऋग्वेदी आश्वलायनसूत्री देशस्थ ब्राह्मण. यांचा जन्म शके १४२६ फाल्गुन वद्य ६ या दिवशीं झाला. हे पूर्वऋणानुबंधानें यवनांच्या सेवेंत पडले, ते वाढत देवगड उर्फ दौलताबाद तर्फेचे मुख्य अधिकारी व यवन पातशाहाचे विश्वासु मुत्सद्दी झाले. हे मोठे शूर, करारी स्वभावाचे, फार टापटिपीचे व तेजस्वी पुरुष होते. आपल्या कामांत फार वाकबगार असल्यामुळें बादशाहीमध्यें यांचें चांगलें वजन असे. तथापि यांची कीर्ति मुख्यतः सत्पुरुष या नात्यानेंच विशेष पसरली होती व त्या तशा काळांतही यांच्या स्वधर्मनिष्ठेचा दुंदुभि चोहोंकडे दुमदुमून राहिला होता. यांना

श्रीदत्ताची उपासना होती व श्रीदत्ताच्या सगुणरूपाचें साक्षात् दर्शन होत असे. पहाटे उठल्यापासून तों मध्यान्हकालापर्यंत स्नानसंध्या, समाधि व दत्तसेवा यांत ते निमग्न असत. यांचा दुपारचा वेळ कचेरीचें काम पाहण्यांत जाई. पुनः सायंसंध्या वगैरे आटपून रात्रीं हे **ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांचें निरूपण करीत.** यांच्या समाधीची जागा एकांतस्थळीं नियमित झाली असून तिकडे मनुष्य फिरकावयाचा नाहीं असा बंदोबस्त होता. हे जसे दयाळू व न्यायी होते तसा यांचा सर्वांना वचकही असे. यांच्यासाठीं पातशाही हुकुमावरून देवगडावर दर गुरुवारीं कचेऱ्यांना सुटी होती. योग्यांना सुद्धां दुःसाध्य असा सेवाधर्म हे चालवीत असून स्वधर्माचरणापासून लवमात्र च्युत झाले नव्हते. प्रपंच व परमार्थ दोन्ही योग हे उत्तम चालवीत असत. श्रीदत्ताच्या[1] सगुणसाक्षात्कारामुळें त्यांच्या ठिकाणीं समता, शांति व अनासक्ति या नांदत होत्या. यांची अंगकांतिही दिपविणारी होती. 'बाहेरी कर्में क्षाळला। भीतरीं ज्ञानें उजळला।' असा हा भक्तिज्ञानवैराग्याचा पुतळा हिंदु मुसलमानांना सारखाच पूज्य वाटे. यांचें नित्य भजनपूजन व आत्मचर्चा यांच्या दिव्य परिमळानें 'देवगड' चा परिसर पुण्यपावन होऊन गेला. एका कवीनें

---

१ जनार्दनस्वामींना साक्षात् श्रीदत्ताचा अनुग्रह होता असें नाथांच्या अनेक ठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून स्पष्ट होतें. त्यांना गुरुचरित्रांत वर्णिलेल्या नृसिंहसरस्वतींचा उपदेश होता असें कोणी म्हणतात तें पण खरें नाहीं. नृसिंहसरस्वती शके १३८० मध्यें 'निजानंदी बैसले' व जनार्दनस्वामींचा जन्म शके १४२६ मधला आहे. तसेंच नाथांच्या गाथ्यांत जनार्दनस्वामींचीं म्हणून जीं पदें व अभंग दिले आहेत तेही यांचे नाहींत. कोणातरी जनार्दनाचे आहेत. त्या अभंगावरून अभंगकर्ता जनार्दन कर्माप्रतीचा ठरत आहे. अलीकडे असेंच एक 'जनार्दनस्वामीचे ताटीचे अभंग' म्हणून प्रकरण छापलें आहे तेंही बनावट आहे. जनार्दनस्वामींनीं स्वतः कांहीं लिहिल्याचें दिसत नाहीं. नाथांनीं जनार्दनस्वामींविषयीं जे उद्गार काढले आहेत तेवढेंच विश्वसनीय आहेत.

पुढें 'श्रीमद्देवगिरी जनार्दनपुरी वैकुंठलोकापरी' असें वर्णन केलें आहे. जनार्दनस्वामींसारख्या पूर्ण पुरुषानें देवगडाहून वीसच कोसांवर असलेल्या आमच्या पैठणकर बालभागवतास आपल्या अचिंत्यशक्तीनें आपल्याकडे आकर्षून घेतलें व त्यावर कृपेची पाखर घालून त्याला जगदुद्धार करण्यास समर्थ केलें.

---

## ९ जनार्दनस्वामी व एकनाथ.

एकनाथमहाराजांच्या ठिकाणीं दोन परंपरा एकवटलेल्या होत्या. एक दत्तपरंपरा व दुसरी भागवतपरंपरा. नाथांचें घराणें पूर्वीपासून पंढरीच्या विठ्ठलोपासकांचें, अर्थात् त्यांचा कुळदेव विठ्ठल; पण नाथांचे गुरु जनार्दनस्वामी हे दत्तोपासक असल्यामुळें त्यांना पूर्ववयांत दत्ताची उपासना मिळाली होती. तेव्हां गुरूची उपासना दत्ताची व घराण्याची उपासना विठ्ठलाची. दोन्ही परंपरेंत नांवाशिवाय कांहीं एक भेद नाहीं. दत्त तेच विठ्ठल व तेच श्रीगुरुजनार्दनस्वामी अशा निष्ठेनें नाथांनीं निःस्सीम गुरुभक्ति दाखविली, घराण्याची विठ्ठलभक्ति पुढें चालविली व भागवतधर्मांत ते मिळून गेले, यामुळें त्यांच्या घराण्यांत विठ्ठलउपासना चालू राहून ते वारकरीमंडळांत ज्ञानेश्वरांच्या बरोबरीनें मान्यता पावले.

भागवताच्या मंगलाचरणांत श्रीदत्तवंदन करितांना नाथ म्हणतातः— 'आतां वंदूं दत्तात्रेया । जो कां आचार्यांचा आचार्या । तेणें प्रवर्तविलें ग्रंथकार्या । अर्थावावया निजबोध ॥१-१४१॥ '—गुरूचे गुरु जे श्रीदत्त त्यांनीं हा भागवतग्रंथ लिहिण्यास मला स्फूर्ति दिली, त्यांचा हेतु हा कीं त्यांच्या स्वरुपाचा जनांस यथार्थ बोध व्हावा. पुढें एकदां त्यांनीं म्हटलें आहे कीं 'माझे निजगुरूचाही निजगुरु । श्रीदत्त परम गुरु । तो भिक्षुगीतें साचारु । योग्या योगेश्वरु । तुष्टला ॥ तेणें तोखलेनि अद्भुतें । आदरें आश्वासूनि मातें । अभय देऊनि निजहस्तें । पूर्ण ग्रंथार्थें डुल्लतु ॥' ( अ० २३-१०००।१००१ ). नाथांच्या भागवताची पहिली पंचाध्यायी

भागवतधर्माच्या निरूपणास दिली असून पुढें ७ ते ९ हे तीन अध्याय यदुअवधूत संवादरूपानें दत्तांनीं २४ गुरु कां व कसे केले या गोष्टीचे वर्णनास दिले आहेत. आरंभीं अवधूताचें स्वरूपवर्णन दिलें आहे तें फार मोहक आहे. 'निजतेजें प्रकाशवंतु' असे श्रीदत्त यदूकडे एकदा आले व त्यांचें अमिततेज व अखंड आनंदाकारता पाहून यदूनें विचारिलें कीं तूं निराश्रमी असून निःशंक व निर्भयपणें सर्वत्र संचार करितोस—'ब्रह्मरस तूं प्यालासी। ब्रह्मानंदें मातलासी' तर ही लोकोत्तर स्थिति तुला कशानें प्राप्त झाली? यावर श्रीदत्तांनीं २४ गुरु केल्याची कथा त्यास सांगितली. मूळ भागवतांत 'अवधूत' असें पद आहे पण 'तो अवधूत जाण दत्तात्रेय' असें नाथांनीं म्हटलें असून श्रीदत्तांनीं साक्षात् उपदेश तिघांनाच केला व त्यांत हा यदु पहिला, सहस्रार्जुनयदु हा दुसरा व तिसरा कलियुगांत जनार्दन असें सांगितलें आहे. श्रीदत्तांनीं जनार्दनस्वामीवर अनुग्रह केला, त्यास स्वरूपानुभव देऊन कृतार्थ केलें व अकर्तात्मबोधाचें रहस्य शिकविलें.

या प्रसंगाची हकीकत खुद्द नाथ आपल्या भागवतांत सहजस्फूर्तीनें बोलून गेले आहेत! ते म्हणतात:—

**गुरुप्राप्तिलागीं सर्वथा। थोर जनार्दनासी चिंता।**
**विसरला तिन्ही अवस्था। सद्गुरु चिंतितां चिंतनीं॥ ४३१॥**
**देवो भावाचा भोक्ता। दृढ जाणोनि अवस्था।**
**येणें जाले श्रीदत्ता। तेणें हातु माथां ठेविला॥ ४३२॥**
**हातु ठेवितांच तत्काळ। बोधु आकळिला सकळ।**
**मिथ्या प्रपंचाचें मूळ। स्वरूप केवळ स्वबोधें॥ ४३३॥**
**कर्म करूनि अकर्ता। तोचि अकर्तात्मबोधु जाला देता।**
**देहीं असोनि विदेहता। तेंही तत्त्वता आकळिली॥ ४३४॥**
**गृहाश्रमू न सांडितां। कर्मरेखा नोलांडितां।**
**निजव्यापारीं वर्ततां। बोधु सर्वथा न मैळे॥ ४३५॥**

**तो बोधु आकळितां मना । मन मुकलें मनपणा ।**
**अवस्था नावरेची जनार्दना । मूर्छापन्न पडियेला ॥ ४३६ ॥**
**त्यासी सावध करूनि तत्त्वता । म्हणे प्रेमा राहे सत्त्वावस्था ।**
**तोही गिळोनि सर्वथा । होयीं वर्तता निजबोधें ॥ ४३७ ॥**
**पूजाविधी करोनियां । जंव जनार्दनु लागला पायां ।**
**तंव अदृश्य जाला दत्तात्रेया । योगमायेचेनि योगें ॥ ४३८ ॥**

सद्गुरुप्राप्तीचा जेव्हां जनार्दनस्वामींस इतका ध्यास लागला कीं, जागृति, स्वप्न, सुषुप्ति, ह्या तीनही अवस्थांत त्यावांचून दुसरें कांहींच त्यांस सुचेना, तेव्हां भावाचे भोक्ते जे श्रीदत्तदेव ते साक्षात् प्रगट झाले व त्यांनीं त्यांच्या मस्तकीं हस्त ठेवला. श्रीदत्तांचा हस्त मस्तकीं पडतांच त्यांस स्वरूपसाक्षात्कार होऊन ‘ कर्म करून अकर्ता ’ अशा प्रकारचा अकर्तात्मबोध झाला म्हणजे देहींच विदेहता प्रगटली. हा दृश्य प्रपंच नाशवंत असून अविनाशी स्वरूप तेवढें सत्य आहे हा बोध त्यांचे हृदयीं पूर्ण ठसला. उन्मनींतलें हेंच सुख अखंड भोगावें अशी जनार्दनाची उत्कटता पाहून श्रीदत्त म्हणाले कीं ‘ हें सात्विक प्रेम जिरवून तुला प्रपंचांतच अकर्तात्मबोधानें राहतां आलें पाहिजे ’ ते म्हणाले कीं, गृहाश्रम न सोडितां व कर्ममर्यादा न उल्लंघितां देहींच विदेहता प्राप्त होणें, भागा आलेले प्रपंचव्यवसाय करीत असतांना आत्मनुसंधान न सुटणें, वर्णाश्रमधर्माप्रमाणें संसारांत वागत असतांना कर्तृत्वाहंकाराचा वाराही अंगीं न वाजणें यालाच **अकर्तात्मबोध** म्हणतात. हें रहस्य श्रीदत्तापासून जनार्दनस्वामींस मिळालें व तेंच त्यांनीं एकनाथास दिलें. **श्रीदत्त स्वतः ‘ अनाश्रमी ’ असून त्यांनीं शिष्यास आश्रमधर्मानें वागण्याचा उपदेश केला यांत एक वर्म आहे.** कलियुगांत अनाश्रमी राहणें दुर्घट आहे म्हणून संसारांत राहून मुक्तीचा सुखसोहळा भोगावा यांत स्वहित व परहित दोन्ही साधतात असा श्रीदत्तांचा उपदेश आहे. गीता-

भागवतांचें हेंच सार आहे व ज्ञानेश्वरनाथादि सत्पुरुषांनीं हेंच महाराष्ट्रास शिकविलें आहे.

तात्पर्य गृहस्थाश्रम न सांडतां व कर्ममर्यादा न ओलांडतां भागा आलेला व्यवसाय करीत असतां आत्मानुसंधान न मोडण्याची युक्ति त्यांस साधली व त्याबरोबर मन मनपणास मुकून मूर्च्छा आली, तेव्हां श्रीदत्तांनीं त्यांस सावध केलें व तो सात्त्विकपणाचा उमाळा गिळून परमानंदाच्या निजबोधानें सहजपणांत राहण्यास शिकविलें. नंतर श्रीदत्तांची पूजा करून जनार्दनस्वामी पायां लागले तों योगमायाबळानें दत्तमहाराज गुप्त झाले. ( भाग० अ० ९ ओवी ४३०–४३८ )

जनार्दनस्वामींनीं रचिलेला ‘ जानकीस्वयंवर ’ नांवाचा एक ओवीबद्ध ग्रंथ असून तो बीडास पाटांगणाकडे शोध केल्यास मिळण्याचा संभव आहे असें ऐकण्यांत आहे.

---

## १० नाथांचा गुरुगृहवास व दत्तकृपा.

नाथांना गुरुगृहीं वास एकंदर बारा वर्षें घडला. त्यांत सहा वर्षे ते साक्षात् गुरूच्या सेवेंत राहिले व पुढील सहा वर्षे गुर्वाज्ञेनें त्यांनीं अनुष्ठान केलें. श्रीगुरूंनीं काय शिकविलें व शिष्य काय शिकला या गुरुशिष्यांच्या एकांतांतील गोष्टी बाहेरच्या जगास काय कळणार ? ज्ञानेश्वरी व मूळ भागवत गुरुमुखानें सेवा करीत असतांना नाथांस ऐकावयास मिळालें व त्यांचें श्रद्धाबळ व प्रज्ञाबळ दोन्ही तीव्र असल्यामुळें त्यांनीं ते दोन्ही सुंदर ग्रंथ समरसतेनें ऐकले व ऐकून पचविले. सहा वर्षांच्या शेवटीं पुढील दोन गोष्टी घडल्या.

एका गुरुवारीं जनार्दनस्वामी समाधींत निमग्न असतांना देवगडावर अकस्मात् परचक्राची धाड आली. सर्व गडावर एकच हलकल्लोळ उडाला. सेवकजन स्वामींकडे वर्दी पोंचविण्यास आले तेव्हां एकनाथ समाधिस्थानाच्या द्वारीं श्रीगुरुचिंतन करीत बसलेले त्यांस आढळले.

नाथांनीं पळाचाही विलंब न लावतां जनार्दनस्वामींचा लढाईच्या वेळचा सर्व पोशाख अंगावर चढविला व शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन, कंबरेला तरवार लटकवून व अश्वारूढ होऊन ते बाहेर पडले. स्वामींचा समाधि-भंगही होऊं नये आणि त्यांचें काम तर बिनबोभाट व चोख व्हावें म्हणून एकनाथांनीं ही हिकमत लढविली ! रणवाद्यें वाजूं लागलीं. शस्त्रास्त्रांचा खणखणाट उडाला व चार घटका घनघोर रणकंदन होऊन शत्रु नामोहरम झाले व अपजय पदरीं बांधून पळून गेले. ह्या प्रसंगीं जनार्दनवेषधारी एकनाथांनीं शौर्याची इतकी शिकस्त केली कीं, सर्वांनीं तोंडांत बोटेंच घातलीं ! गडावर जिकडे तिकडे जनार्दनस्वामींची स्तुति होऊं लागली, ती ऐकून ' गुरुशिष्यांचा अंतर्बाह्य पूर्ण अभेद आहे ' हें लक्षण कृतीनें दाखविणारे एकनाथ समाधान पावले. गुरूंचा पोषाख जेथल्या तेथें ठेवून नाथ मुकाट्यानें आपल्या सेवाकार्याला लागले. जनार्दनस्वामी समाधींतून व्युत्थानावर आले तेव्हां त्यांस सारी हकीकत समजली. नाथांनीं आपल्या तोंडांतून एक अक्षरही काढलें नाहीं. शत्रुसैन्याचा चार घटकांत फडशा पाडणारा आमचा हा वैष्णववीर आपल्या प्रतापाचें भानही न ठेवतां श्रीगुरुसमोर विनयानें उभा राहिला तेव्हा गुरूला केवढी धन्यता वाटली असेल ! वेगळेपणा टाकून गुरुकार्यांत निरहंकारपणानें दक्ष असणारे शिष्य विरळ ! नाथांची एकाग्रता विलक्षण होती. ते व्यवहारांतही मोठे दक्ष होते. संतासारखा बिनचूक व्यवहार पंतांनाही साधत नाहीं. संत पंत असतात, पंत मात्र संत असतील वा नसतील ! नाथांची योग्यता जाणून जनार्दनस्वामींनीं कांहीं काळ हिशेबाचें काम त्यांजवर सोंपविलें. हें कामही गुरुसेवा या बुद्धीनेंच नाथ करूं लागले. एके दिवशीं हिशेबांत अडक्याची चूक पडली. ती शोधून काढण्यासाठीं नाथांनीं रात्रीचा दिवस केला ! दिव्याला भरण घातलें व ती चूक शोधीत बसले. तीन प्रहर रात्र उलटून गेली तरी ताळा पडेना. नाथांनीं याचा शीण मानला नाहीं, व अंगही आडवें केलें नाहीं.

काम लहान असो वा मोठें असो, अंगावर घेतलें किंवा येऊन पडलें कीं तें मोठया आस्थेनें करायचें, कर्तव्यासाठीं कर्तव्य करायचें हा थोरांचा स्वभावच असतो. कांहीं वेळानें नाथांना अडक्याची चूक सांपडली तेव्हां हर्षनिर्भर होऊन त्यांनीं टाळी पिटली! जनार्दनस्वामींनीं नाथांच्या खोलींत सहज डोकावून पाहिलें. 'तुला एवढा कसला आनंद झाला आहे?' असें विचारिलें. नाथांनीं सारी हकीकत सांगितली. यावर जनार्दनस्वामी म्हणाले 'वेड्या! अडक्याची चूक सांपडली तर तुला एवढा आनंद झाला आहे, मग संसाराची जी मोठी चूक तुझ्या हातून झाली आहे ती सांपडल्यास तुला केवढा आनंद होईल बरें?' ही मोठी चूकही शोधून काढण्यास हा शिष्य योग्य आहे अशी खूण पटून स्वामींनीं त्याचें ऊर्जित करावयाचें योजलें. अरुणोदय हा सूर्योदयाचें पूर्वचिन्ह आहे.

गुरुमाउलीनें ह्या आपल्या प्रियतम वत्साला आत्मज्ञानामृत पाजिलें व शेवटीं दत्तदर्शन व दत्तानुग्रह यांची जोड करून दिली.' हा महाभागवत जन्मास आला असून हा सहस्त्रावधि जीवांचा उद्धार करील' असा दत्तवर मिळाल्यावर जनार्दनस्वामींनीं नाथांस अनुष्ठानास बसविलें. देवगडावरच वायव्यदिशेस शूलभंजन उर्फ सुलभ पर्वतावर एक रमणीय व एकांतस्थान नाथांस नेमून दिलें व श्रीकृष्णाची उपासना दिली. नाथ त्या रमणीय पर्वतावर गेले व ते मार्कंडेय ऋषींचें पुरातन तपोवन व तेथील सूर्यकुंड पाहून आनंदित झाले. त्यांनीं आपली तपश्चर्येची जागा स्वच्छ करून घेतली व आसन स्थिर केलें. गुरुदर्शित मार्गानें जाऊन सहा वर्षें त्यांनीं उपास्याच्या आराधनेंत आनंदानें काढलीं. ध्यानधारणा समाधि सर्व अभ्यास केला. 'समं काय शिरोग्रीवं' इ० प्रकारें गीतेंत सांगितल्याप्रमाणें त्यांनीं भगवत्प्राप्त्यर्थ अभ्यासयोग केला. त्या गडावर ह्याप्रमाणें नाथांची तीव्र तपश्चर्या चालली होती. एके दिवशीं नाथ समाधिस्त असतांना एक भला मोठा काळसर्प त्यांच्या अंगावर धावून आला

व त्यानें त्यांच्या पोटाला विळखा घातला ! पण आश्चर्य हें कीं, साम्यस्थितीचा अनुभव घेणाऱ्या नाथांच्या अंगस्पर्शामुळें त्याची दंश करण्याची क्रूरबुद्धि मावळली व तोच नाथांच्या मस्तकावर फडा उभारून आनंदानें डोलूं लागला ! चित्तशुद्ध पुरुषाला सर्प, विंचू, व्याघ्र, व सिंह सुद्धां पीडा करूं इच्छित नाहींत. जो आपणांत विश्व पाहतो व विश्वांत आपण भरून राहतो त्या समविषमभावशून्य पुरुषाला कोणापासून भय आहे ? भय सारें दुजेपणाच्या पोटीं आहे. तो दुजेपणाच जे गिळून बसतात ते जगांत निर्भय आहेत. समाधिव्युत्थानानंतर नाथांनीं त्या सर्पास दूध प्यावयास दिलें. नाथ तेथें केवळ दुग्धाहार करून तपश्चर्या करीत. एक गवळी तेथें नेमानें त्यास दूध देत असे. नाथांनीं वरील प्रसंगावर एक अभंग केला आहे.

**आह्मां डंखूं आला काळ । तवं तो काळाचि जाला कृपाळ ॥ १ ॥**
**भली ओळख झाली आतां । चित्त मीनलें अच्युता ॥ २ ॥**
**देहीचा फिटला संदेहो । तवं तो काळाचि जाला बावो ॥ ३ ॥**
**एका जनार्दना भेटी । येणें जाणें खुंटली गोठी ॥ ४ ॥**

गुर्वाज्ञेनें नाथ यानंतर तीर्थयात्रेस बाहेर पडले. कांहीं यात्रा त्यांनीं गुरुसंगतींत केली. गोदातीरीं चंद्रभटाच्या आश्रमांत असतां गुर्वाज्ञेनें त्यांनीं 'चतुःश्लोकी भागवत'—आपला पहिला ग्रंथ—गुरु सन्मुख लिहिलें. तीर्थयात्रा संपवून आल्यावर गुरूच्या आज्ञेनें त्यांनीं गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला.

---

## ११ नाथांचे दत्तावरील अभंग.

'दत्तमानसपूजा' व 'दत्तनाममहिमा' यावर नाथांचे ६०-६२ अभंग आहेत. त्यांतील एका अभंगांत 'एकाएकीं एका काशीवासा गेला । स्वलीला स्वयें श्रीदत्त प्रगटला ॥ मंडपामाझारीं निजनामगजरीं । दत्त प्रगटला कीर्तनामाझारी' याप्रमाणें त्यांनीं दत्तभेटीचा एक प्रसंग

वर्णिला आहे, व त्यांतच दत्तवचनानें मी प्रपंचपरमार्थ एकरूपतेनें चालवितो असें म्हटलें आहे. दत्तध्यानाचा अभंगः—

**दत्त वसे औदुंबरीं । त्रिशूल डमरू जटाधारी ॥ १ ॥**
**कामधेनु आणि श्वान । उभे शोभती समान ॥ २ ॥**
**काखेमाजी शोभे झोळी । अर्धचंद्र वसे भाळीं ॥ ३ ॥**
**हातीं कमंडलु दंड । दत्तमूर्ती तो अखंड ॥ ४ ॥**
**अंगीं चर्चिली विभूती । हृदयीं वसे क्षमा शांती ॥ ५ ॥**
**एका जनार्दनी दत्त । रात्रंदिनी आठवीत ॥ ६ ॥**

आनंदानें मी दत्त डोळां पाहू गेलों तों चराचर दत्तरूप दिसलें. 'मीचि जनार्दन मीचि एका । दत्तस्वरूपीं मीचि देखा' हा अनुभव आला. नाथांचे दत्तमानसपूजेचे १५ अभंग आहेत ते दत्तभक्तांनी व सर्वांनींच पाठांत ठेवावेत. त्यांतील कांहीं बहारीचे चरण सांगतोंः—

**केलें आवाहन । जेथें नोहे विसर्जन ॥ १ ॥**
**भरला ओतप्रोत । स्वामी माझा देवदत्त ॥ २ ॥......**
**चोहों देहांचीं क्रिया । अर्घ्य दिलें दत्तात्रेया ॥ १ ॥**
**जें जें कर्म धर्म । शुद्ध सबळ अनुक्रम ॥ २ ॥**
**इंद्रिय क्रियाजात । कांहीं उचित अनुचित ॥ ३ ॥**
**आत्मा माझा देव दत्त । एका जनार्दनीं स्वस्थ ॥ ४ ॥**
**संचित क्रियमाण । केलें सर्वांचें आचमन ॥ १ ॥**
**प्रारब्धशेष उरलें यथा । तेथें ध्याऊं सद्गुरुनाथा ॥ २ ॥**
**झालें सकळ मंगळ । एका जनार्दनीं फळ ॥ ३ ॥**
**ज्ञानदीपिका उजळली । नाहीं चिंतेची काजळी ॥ १ ॥**
**ओवाळिला देवदत्त । प्रेमें आनंदभरित ॥ २ ॥**
**भेदाभेद मावळले । सर्व विकार गळाले ॥ ३ ॥......**
**एका मिळवी जनार्दन । तेजीं मिळाला आपण ॥ ४ ॥**

नाथांनीं श्रीदत्तजन्मावर एक छोटेसें प्रकरण लिहिलें आहे त्याचा विचार पुढें लीलाविनोदपरकाव्यपरामर्षाचे वेळीं घेऊं.

---

## १२ अवधूताचे चोवीस गुरु.

यादवांचा पूर्वज यदु यानें एकदा एक अवधूत येतांना पाहिला. तो अवधूत निजतेजानें प्रकाशवंत, निर्भय, निःशंक, असा असून ब्रह्मानंदानें डुलत होता. यदूनें त्याचा सत्कार केला व हा एवढा परमानंद तुला कोठून कसा मिळाला असें विचारिलें. अवधूतानें सांगितलें कीं निजानंद मला बाहेरून मिळाला नाहीं, आनंदसागर मी स्वतःच आहे, आपला उद्धार आपणच करून घेतला पाहिजे हें माझें माझ्याशींच ठरलें व प्रत्येक वस्तुपासून एकेक गुण घेत मी निजानंदरूप झालों. मी एकंदर चोवीस गुरु केले, किंबहुना जगच गुरुस्वरूप भासलें. ' जो जो जयाचा घेतला गुण । तो तो गुरु म्यां केला जाण । गुरूसी आलें अपारपण । जग संपूर्ण गुरु दिसे. ' मी कोणी एखादा महर्षि पाहून त्याला शरण गेलों असें नाहीं, तर सकलसृष्टीच गुरुरूप आहे असा मी मनासी निश्चय केला. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, चंद्र, सूर्य यांच्यापासून मी कांहीं गुण शिकलों, यांचीं कांहीं तत्त्वें मी ग्रहण केलीं. कांहीं गुण पशुपक्ष्यांपासून घेतले. कपोत, मीन, हरिण, गज, सर्प, पतंग, टिटवी यांपासून व एका कुमारीपासूनही कांहीं गुण घेतले. मधुकर, पिंगळा वेश्या, मध हरण करणारा मधुहा, ऊर्णनाभि, भिंगुरटी, अर्भक, अजगर, सिंधु, गज यांपासून मी कांहीं गुण घेतले. संसार तरून जाण्यास मुख्य सद्बुद्धिच पाहिजे. मी आपल्या ' बुद्धीनें अंगिकारिले गुणा । निजधैर्यें धारिली धारणा ' कांहीं गुरु गुणग्रहणार्थ केले व कांहीं दोषत्यागार्थ केले म्हणजे कोणापासून काय टाकायचा बोध घ्यावा हें मी स्वबुद्धीनेंच निश्चित केलें. याप्रमाणें दोषांतून गुणच घ्यायचें ठरविल्यामुळें जगच गुरुरूप आहे व जगांतील प्रत्येक वस्तुपासून कितीतरी शिकण्यासारखें आहे हें कळून आल्यामुळें जगापासून मला माझा निजानंद मिळाला व मी स्वतः आनंदस्वरूप आहे असा अनुभव माझ्या ठिकाणीं सिद्ध झाला.

आतां स्वानंदानें पृथ्वीवर अटण करावें हाच माझा व्यवसाय आहे! यदूनें विचारल्यावरून त्या अवधूतानें ह्म० दत्तानें आपण चोवीस गुरु कसे केलें व कोणापासून काय शिकलों तें सविस्तर सांगितलें. ही सारी कथा एकादशस्कंधांत अध्याय ७।८।९ मध्यें सांगितली असून नाथांनीं यावर मनोरम भाष्य केलें आहे. ही स्वावलंबनानें आत्मोद्धार कसा करून घ्यावा हें शिकविणारी कथा अत्यंत बोधप्रद असून वाचकांनीं मुळांतच[1] पहावी. हा हजारबाराशे ओव्यांचा सारांशही येथें सांगणें अशक्य आहे.



१ त्याचा सारांश 'भक्तिमाणिमाला' ह्या माझ्या ग्रंथांत (पृ० १७७ ते १९५) पहावा.

# ५ दासोपंत व त्यांचा अफाट कवितासमुद्र



## १ दासोपंत ( शके १४७३ ते १५३७ )

बेदरच्या बहामनीशाहींत नारायणपेठ नामक गांवीं गाल्वगोत्री दिगंबरपंत देशपांडे यांना पार्वतीबाईच्या पोटीं शके १४७३ भाद्रपद वद्य ८ रोजीं एक पुत्ररत्न झालें तेंच आपले दासोपंत होत. हे दत्ताचे एकांतिक भक्त होते. हे नाथापेक्षां वयानें लहान पण त्यांचे समकालीनच होत. हे जोगाईच्या आंब्यास राहिले. तेथें त्यांचे वंशज आहेत. त्यांचीं दोन घरें ( मठ ) असून एकाला थोरलें देवघर व एकाला धाकटें देवघर अशा संज्ञा आहेत. दासोपंतांचें एक चरित्र महाराष्ट्रकवींत छापलें गेलें आहे पण तें अत्यंत अविश्वसनीय व बनावट आहे इतकेंच येथें लिहितों ! एकच दंतकथा प्रसिद्ध आहे तेवढी सांगून आपण त्यांच्या ग्रंथमहार्णवांत प्रवेश करूं. एकदा दुष्काळाचें साल आलें असतांना दिगंबरपंतांकडून बादशाहाची रसद वेळेवर पोंचली गेली नाहीं, तेव्हां बादशहाची त्यांजवर नाराजी होऊन त्यानें त्यांचा मुलगा दासोपंत यास धरून ओलीस म्हणून ठेवलें ! ' एक महिन्यांत रसद न आली तर याला बाटवून मुसलमान करूं ' अशी धमकीही मिळाली ! तेव्हां दासोपंतांचें वय १७।१८ वर्षांचें असेल. दासोपंताला दत्तभक्तीचें वळण बापापासूनच लागलें होतें. त्यांनीं त्या संकटकाळीं दत्ताचे सतत ध्यानभजन केलें व दत्तानें रसीदीची व्यवस्था लावून दासोपंताची महासंकटांतून मुक्तता केली. त्यावेळेपासून दासोपंताची दत्तावर दृढभक्ति बसली. त्यांच्या उपासनेंतील दत्तमूर्ति अजून अंबाजोगाईस आहे. कोणाचीही ताबेदारी न करितां ते घरींच जन्मभर राहिले व त्यांनीं आयुष्यभर लेखन व्यवसाय फार प्रचंड प्रमाणावर केला. याशिवाय त्यांनीं शंभर ग्रंथ लिहिले आहेत. बृहद्ग्रंथप्रसविता

म्हणून मराठी वाङ्मयांत तरी ते अद्वितीय आहेत. रोज एका दवूची शाई त्यांना लागत असे. त्यांची सारी कविता २।३ लाखांवर असेल! दासोपंताचे कांहीं संस्कृत ग्रंथही उपलब्ध आहेत. एवढया मोठया पंडितानें मराठीच्या कैवारानें मराठी भाषेंत सुंदर आणि तीही अवाढव्य रचना केली हें मराठी भाषेचें मोठें भाग्य होय. जोगाईच्या आंब्यास नृसिंहतीर्थाजवळ दासोपंतांची समाधि आहे. नाथांनंतर १६ वर्षांनीं ह्म० माघ वद्य ६ शके १५२७ ह्या दिवशीं त्यांनीं समाधि घेतली.

---

## २ दासोपंतांची काव्यसंपत्ति.

दासोपंतांच्या कवितेची एक यादी शंकरराव देव यानीं प्रसिद्द केली आहे. ती त्यांनीं आंबा जोगाईस जाऊन दासोपंतांच्या देवघरांतलीं दप्तरें पाहून केली आहे. ती यादी येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| १ गीतार्णव | १५ दत्तात्रयसहस्त्रनामस्तोत्र |
| २ गीतार्णवबोध | ,, दशनामस्तोत्र |
| ३ अवधूतराज | ,, षोडशनामस्तोत्र |
| ४ ग्रंथराज | ,, शतनामस्तोत्र |
| ५ प्रबोधोदय ( पूर्वार्ध व उत्तरार्ध ) | ,, द्वादशनामस्तोत्र |
| ६ स्थूलगीता | १६ सिद्धदत्तात्रयस्तोत्र |
| ७ वाक्यवृत्ति | १७ षड्गुरु यंत्र |
| ८ पंचीकरण | १८ षोडशदल यंत्र |
| ९ पदार्णव | १९ अत्रिपंचक प्रधानयंत्र |
| १० दत्तात्रय माहात्म्य ( संस्कृत ) | २० आगमनिगम |
| ११ गीताभाष्य | २१ वेदपादाख्यस्तोत्र |
| १२ सार्थगीता | २२ शिवस्तोत्र |
| १३ अवधूतगीता | २३ गुरुस्तोत्र |
| १४ अनुगीता | २४ षोडशस्तोत्र |

| | |
|---|---|
| २५ सीतज्वर निवारणस्तोत्र | ३६ मंत्रपूजा |
| २६ भक्तिराजकवच | ३७ नामामृतस्तोत्र |
| २७ वज्रपंजरकवच | ३८ गीतस्तोत्र |
| २८ सहस्त्रनामटीका | ३९ प्रबंधस्तोत्र |
| २९ दत्तात्रयनामावळी | ४० गीतप्रबंधस्तोत्र |
| ३० दश, द्वादश व शत नामावलि | ४१ सिद्धमालामंत्रस्तोत्र |
| ३१ मंगलमूर्तिपूजा | ४२ उपकालस्तोत्र |
| ३२ वाचकी पूजा | ४३ षोडशअवतारस्तोत्र |
| ३३ महापूजा | ४४ षोडशअवतारप्रादुर्भावस्तोत्र |
| ३४ मानसिकपूजा | ४५ षोडशअवतारध्यानस्तोत्र |
| ३५ वेदोक्तपूजा | ४६ दशोपनिषद्भाष्य ( संस्कृत ) |

## ३ गीतार्णवाचें वैशिष्टय.

'दासोपंतीं केला गीतार्णव मानवा सवा लाख' ह्या मोरोपंतांच्या आर्यार्धावरूनही गीतार्णवाच्या ओंव्या सव्वा लाख आहेत अशी प्रसिद्धि असल्याचें दिसून येते. गीतेला अर्णव ह्म० समुद्र म्हटलें आहे यावरून-ही प्रस्तुत ग्रंथाच्या अफाटपणाची कल्पना येते. एवढा प्रचंड ग्रंथ मराठी भाषेंत तर दुसरा नाहींच, पण जगाच्या वाङ्मयांतही असेल किंवा नाहीं याची शंका वाटते. मराठींत कांहीं ग्रंथ अर्ध्यापाऊण लाखापर्यंत गेले आहेत पण लाखाच्या पुढें उडी मारलेला असा दुसरा ग्रंथ नाहीं. रा. भावे यांनीं 'महाराष्ट्रकवींत' अध्याय १।२।१२ व तेरावा अर्धवट एवढा गीतार्णवाचा भाग छापला आहे व माझ्या हयातींत हा संपूर्ण ग्रंथ छापून पुरा होईल अशी मला उमेद नाहीं असें म्हटलें आहे ! याच्या पहिल्या अध्यायाच्या ओंव्या ३१२३ असून दुसऱ्या अध्यायाच्या ओंव्या ५६५५ आहेत ! बारावा अध्याय त्या मानानें लहान आहे. त्याच्या साऱ्या ९९७ ओंव्या आहेत. तेराव्या अध्यायाच्या १२ व्या श्लोकापर्यंत ३२७०

ओव्या छापल्या आहेत. म्हणजे सव्वा लाख ओवींपैकीं सुमारे १३ हजार ओवी छापली गेली आहे. असा हा समुद्रप्राय ग्रंथ समग्र प्रसिद्ध झाल्यावर सामान्य वाचकांस दुस्तर वाटण्यासारखाच आहे. पण हा ग्रंथ असा अफाट असला तरी अगदी सुबोध, शुद्ध मराठींत लिहिलेला व चटकदार आहे. पाण्याच्या ओघाबरोबर फूल जसें सर्कन् वाहून जातें त्याप्रमाणें वाचक एकदा वाचायला लागला कीं ग्रंथाच्या ओघाबरोबर सहजरीत्या वाहावला जातो. ग्रंथकार अत्यंत विद्वान् व वेदांतवेत्ते होते यांत शंका नाहीं पण त्यांनीं गीतेचा विषयही शास्त्रीय परिपाटी बाजूला ठेऊन निव्वळ मराठी माणसाला वाचतां वाचतां सहज समजावा इतका सुबोध केला आहे. वेदांताचे पारिभाषिक शब्द अवश्य तेथेंच घेतले आहेत. बाकी सारा ग्रंथ सुंदर मराठींत ‘ लिहितां लिहितां ’ लिहिला आहे. ह्या ग्रंथाचा हा विशेष खरोखरीच मोहक आहे. नाथांच्या वेळचा कोणताच ग्रंथ इतका बाळबोध नाहीं, इतकेंच काय पण मुक्तेश्वर, रामदास, श्रीधर, महिपति यांच्या ओवीबद्ध ग्रंथापेक्षांही हा अधिक सुबोध आहे. ग्रंथकारानें जुन्या टीकाग्रंथांचा किंवा प्राचीन मराठी ग्रंथांचा अवजडपणा आपल्या ग्रंथांत येऊं न देतां किंवा श्रोते अगर वाचक काय म्हणतील याचाही विचार मनांत न आणतां स्वतःच्याच मनोविनोदार्थ मोकळ्या भावानें हा लिहिला आहे. आणि त्यानें म्हटलेंही आहे:—

“ प्रेम अंकुरलें हृदयीं । तयानें माझां देहीं । पैसु न पुरे, मग पायीं ठेविलें तें ॥ तैसें माझिये बुद्धीतें । तुवा स्पर्शिलें स्वमतें । आतां तुज अर्थीनें तीतें । लोपतांचि नये ॥ पृथ्वीचां ठायीं हारपलें । तें जीवनें वटबीज स्पर्शिलें । आतां तें हारपे कें? पहिलें । आपण नव्हे ॥ पालवा पुढें पालव । घेऊंचि लागले धांव । मग आपुली मर्यादा तंव । झाड विस्तारलें ! ॥ तैसें हें माझें ज्ञान । विषयभूमिके होतें लीन । तेथें तुझी कृपाजीवन । पावलें तें ॥ भगवद्गीता हे सन्मयी । अपारु पैसु ईचां ठायीं । जेथ अंकुरलया नाहीं । संकट ज्ञाना ॥ आरंभिलें ग्रंथकथन । श्रीभगव-

द्गीतेचें व्याख्यान। यथामति विवरण। प्राकृतावाणी ॥ तरि सज्जना साधूतें। प्रार्थीन मी आदरें बहुतें। स्वामी अवधान देईजो येथें। कृपा करूनि ॥ हें प्राकृत आरुप बोलणें। नव्हे विषयो तुम्हांकारणें। परंतु गीतेचेनि येणें। संबंधें आइकावें ॥ स्वमति चालिला अर्थु। न कळतु गीताभावार्थु। तथापि न चुके परमार्थु। ह्मणोनि आइकावें ॥ ग्रंथु केला अव्युत्पन्नें। परमार्थी न मिळे बोलणें। तथापि आत्मान्वयें वचनें। ध्यावीं तुह्मी ॥ इतुकेंही बोलणें जाईल। तुमचें चित्त न मनील। तरी माझें काये चालैल। केलें आतां ॥ समर्थें उपेक्षा केली। तो काये भीड धरी बोलीं? । आतां जोडलां करकमळीं। नमस्कारु तया! ॥ मीचि मातें श्रोता। मीचि मातें वक्ता। मननरूपें हे गीता। विचारितु असे ॥ श्री अवधूताचेनि स्मरणें। बोधला अर्थु स्वानुसंधानें। तो आत्मा बुद्धी बोधणें। आपुलिया मना ॥ ऐसा विचारु करितां। मीचि श्रोता आणि मीचि वक्ता। आरंभीत असे गीता। म्हणे दिगंबरानुचरु ॥ न पाहे श्रोतयांचें वदन। न करी भाष्याधारें विवरण। स्वस्वानुभवें हें मनन। म्हणोनि संपादीं ॥ आइकेल तेणें आइकावें। मानेल तेणें घ्यावें। नावडे तेणें नेघावें। दोहीं श्रवणीं ॥ स्वसांप्रदायिक जे योगी। यया मननाचे विभागी। टीका हे तयांचि जोगी। तेहीं आइकावी ॥ स्वानुभवचि येथिचें प्रमाण। स्वानुभव हेंचि साधन। अन्यत्र शास्त्रश्रवण। तैसें नव्हे ॥ प्राकृत म्हणोनि दूषिती। तेचि यया ज्ञाना वंचिती। भाषाचि केवळ भजती। ते मूर्ख कीं ना ॥"

---

## ४ नाथ व दासोपंत

हा पहिलाच उतारा जरा मोठा झाला आहे पण एवढा प्रचंड ग्रंथ लिहिणाराची मनोभूमिका काय होती हें वाचकांस नीट कळावें म्हणून घेतला आहे. श्रोत्यावाचकांविषयीं एवढी बेपरवाईची वृत्ति प्रस्तुत काल-खंडांत दुसऱ्या कोणीही कवीनें प्रगट केली नाहीं! कवीचे 'स्वसांप्रदा-

यिक योगी ' जे कांहीं असतील त्याशिवाय इतर श्रोत्यांची कवीनें परवा बाळगली नाहीं. ' न पाहें श्रोतयाचें वदन । न करीं भाष्याधारें विवरण ' याचा अर्थ असा कीं कवीच्या सांप्रदायिकांचा जो गट होता त्याशिवाय इतर सामान्य जनसमुदायांत तो प्रिय नसावा. 'जनीं जनार्दन' पाहणाऱ्या व ' सर्वांभूतीं भगवद्भाव ' ठेवणाऱ्या एकनाथमहाराजांची भूमिका याहून कितीतरी वेगळी आहे ! आपले किंवा आपल्या ग्रंथाचे ' निंदक वंदक ' दोन्ही श्रीगुरुसमान मानतों असें म्हणणारे नाथ सर्व लोकप्रिय झाले व दासोपंतांच्या ह्या थोड्याश्या एकलकोंडया मनोवृत्तीमुळें ते व त्यांचे ग्रंथ मागे पडले यांत नवल नाहीं. तीस वर्षांपूर्वी नाथ व दासोपंत यांच्या संबंधाची एक आख्यायिका आम्ही पैठणास ऐकली होती. दासोपंत तीव्र अनुष्ठान करून दत्तसाक्षात्कारास पात्र झाले होते. त्यांच्या ध्याना-बरोबर दत्त साक्षात् प्रगट होत ! दासोपंतांचे ते खेळगडीच होते. नाथांच्या यशाचा हे थोडासा हेवा करीत, म्हणून दत्तांनीं यास शाप दिला व यांचे ग्रंथ मागे पडले असें म्हणतात ! निळोबारायांचा नाथावर एक अभंग आहे त्यांत " दासोपंताचा अभिमान । गेला होताची दर्शन ॥ दत्तात्रेय चोपदार । तेथें उभे काठीकर " असे चरण आहेत. नाथांच्या द्वारीं चोपदाराच्या वेषांत श्रीदत्त उभे राहिलेले पाहिले तेव्हांच त्यांचा अभिमान जाऊन ते नाथांशीं प्रेमभावानें वागूं लागले. ' नमो एकनाथ पंत संत साधु भलारे ' ॥ हें पद दासोपंतांनीं नाथावर केलें असून त्यांत ' दत्तात्रय धरुनि दार । रक्षि होऊनि चोपदार । चमत्कार हाचि फार । दासोपंत चोजविलारे ॥ ३ ॥ नमो० ॥ ' असें एक कडवें आहे. ही आख्यायिका खरी खोटी कशीही असो, दासोपंताच्या व्यक्तित्वावर थोडा प्रकाश पाडणारी आहे असें वाटतें. तुसडेपणा हा एक प्रकृति-स्वभाव आहे त्यामुळें दासोपंतांच्या थोर योग्यतेला कमीपणा येत नाहीं. सव्वालाख ओव्यांचा ग्रंथ लिहावयास जी निष्ठा, जोमदारपणा, भाषाप्रभुत्व, आत्मनिष्ठा, इ० श्रेष्ठ गुण लागतात ते दासोपंतांत होते यांत संशय

नाहीं. त्यांची एकनिष्ठ दत्तभक्ति अवर्णनीय आहे. परिपूर्ण वृक्षाला पानामागें पान फुटत जाऊन तो पर्णफुलांनीं डवरतो तशा त्यांच्या सहजवाणीमुळें व ओव्यामागें ओव्या स्फुरत गेल्यामुळें व त्या तशाच ग्रंथांत एकापुढें एक पडत गेल्यामुळें एवढा अवाढव्य ग्रंथ निर्माण झाला हा पराक्रम काहीं लहानसहान नाहीं, फार मोठा आहे. त्यांच्या वाणीचा थोडक्यांत अधिक परिचय करून घेऊं.

---

## ५ गीतार्णवाचा परिचय.

'क्षेत्र व क्षेत्रज्ञ' ह्या दोन पदांचा अर्थबोध पूर्ण व्हावा म्हणून त्यांनीं ९०० ओव्या लिहिल्या आहेत ! दुसऱ्या अध्यायांत संस्कृतमराठीचा विषय सांगतांना त्यानीं एक अतिशय मौजेची स्वतंत्रबुद्धीनें रचलेली गोष्ट सांगितली आहे तिच्या १२४३ ओव्या आहेत ( ओवी २२०० ते ३४४३ पहा ), आणि हें सारें आख्यान ' वेदवादरताः ' ह्या शब्दावरून त्यांना स्फुरलेलें आहे ! समग्र ग्रंथ वाचावयास मिळाला तर त्यांत काय काय मौजेच्या गोष्टी निघतील कोणी सांगावें ? तूर्त गीतार्णवाच्या तळाशीं तीं रत्नें पडलेलीं आहेत, तीं तरी वेंचून काढणारा पाणबुड्या कधीं निर्माण होईल तो होवो. हा सारा गीतार्णव जोगाईच्या आंब्यास दासोपंतांच्या वंशजांच्या घरीं आहे. त्याची दुसरी प्रत करून घेणारा ह्या ४०० वर्षांत कोणी बहाद्दर निघाला नसेल असें वाटतें !

ह्या गीतार्णवांत किंवा पदांत दासोपंत हें नांव कोठेंही नाहीं. ' दिगंबरानुचरू ' ' दिगंबरु ' किंवा ' दास ' हें नांव आढळतें. ' दासा' चेंच 'लोकांनीं दासोपंत ' बनविलें.

' माधवः पांडवश्चैव ' ह्या पदावर ' गीता ही केवळ ब्रह्मकथा ' आहे असें सांगून कवीनें कौरवपांडवावर रूपक बसविलें आहे. शुद्ध जीवात्मा तो अर्जुन, त्याचा सारथी कृष्ण हा परमात्मा, ' सकळ इंद्रिय नियामकु । मनोबुद्धीचा चालकु । सारथी द्वारकानायकु । अर्जुनातें, '

शुद्ध विद्या ते कुंती, स्वात्मधर्म तो युधिष्ठिर, भीम ह्म० भेदनिवारक अभ्यास, निरभिमान तो नकुळ, ज्ञानभाव तो सहदेव, श्वेतहय म्ह० शुद्ध सत्वगुण, इ० हें रूपक सर्व सेनापतींपर्यंत पोंचवलें आहे! 'आक्षेप शिष्याचे आणि परिहार गुरूचे। शंख कृष्ण-अर्जुनांचे ऐसे स्फुरले!' 'सेनयोरुभयोर्मध्यें'– याचा अर्थ 'आपुलें सैन्य सांडावें। आणि ययां-माजी न रिघावें। दोहींतें जाणत राहावें। मध्यप्रदेशीं॥ तुरीये ऐसी टेंकुली। रथु नेई तिये जवळी'– पहिल्या अध्यायाच्या शेवटच्या सुंदर ओव्या पहाः—

**दिगंबरानुचरु म्हणे। हें गुरुमाहिमा श्रीकृष्णें।**
**आतां ऐसिया अर्जुनाकारणें। सारथी सद्गुरु॥ २२॥**
**उतरूनि मोहाची भावना। पोषूनि योगाची वासना।**
**ज्ञानें आणील अधिष्ठाना। कर्मक्रमेंचि॥ २३॥**
**कर्मचि अकर्म दावील। योगुचि ज्ञानमयु स्थापील।**
**गुणाचि ब्रह्म करील। अर्जुनाचे॥ २५॥**
**प्रपंचु तोचि परमार्थु। करावया गुरु समर्थु।**
**आतां पुरेल मनोरथु। अर्जुनाचा॥ २६॥**
**कांहीं सांडणें ना घेणें। जैसें तैसेंचि मुक्त होणें।**
**सद्गुरुप्रसादाचें येसणें। महिमान आहे॥ २८॥**
**गुणसहित गुणातीतता। कर्मसहित निष्कर्मता।**
**अवलंबसहित मुक्तता। निरंतर॥ ३१३०॥**

'शरीराणि जीर्णानि' यावरच्या व्याख्यानांत 'उपनेत्र योजिले कांचेचे जे' असा एक चरण आहे. **अंतःकरणपंचकः**– 'निर्विकल्प प्रथम स्फुरण। जाणावें तें **अंतःकरण**। संकल्पात्मक **मन**। पांडुपुत्रा॥ निश्चयात्मक **बुद्धि** बा रे। अनुसंधानात्मक **चित्त** स्फुरे। अहंतव्य **अहं-कारें**। एवं वृत्तिपंचक हें॥

**दोन प्रकारचे अभ्यासकः**— एक शास्त्राध्ययनानें कृतकृत्य होऊन

जाणारे व दुसरे जन्मभर शास्त्रें व ग्रंथ वाचीत असतांही असमाधानी राहणारे विद्वान् ! ‘ शास्त्रवादाचि संपादितां । बहुसाल श्रवण करितां । जाण नये सर्वज्ञता । तें अंग वेगळेंचि ’ एखाद्याची बुद्धि असून तो पूर्वसंस्कारी असला तर ‘ दोचि उत्तरीं होय कृतकृत्य ’–तो अधिक वाचायची किंवा ऐकायची इच्छा करीत नाहीं, ‘ मग करावें तेंचि मनें । लाग करूं ’–तो ऐकलेलें आचरणांत आणण्याच्या मार्गाला लागतो व लवकरच आत्मसमाधान पावून मुक्त होतो. दुसरा जो आहे तो राजसबुद्धीचा असून संस्कारभावविहीन असतो. तो सारखे ग्रंथच वाचीत सुटतो, हें शास्त्र पाहिलें आतां दुसऱ्याचा अभ्यास कर, तें शास्त्र पाहिलें आतां तिसऱ्या शास्त्राचा छंद धर, असा जन्मभर नानाविध शास्त्रांच्याच नादीं राहतो पण वर्म चुकून केवळ वादी व बोलका विद्वान् होतो ! पहिला श्रद्धाविश्वासाच्या बळावर लौकर कृतार्थ होतो पण हा संशयी व तार्किक होऊन वाया जातो ! ‘ हें शास्त्र आधी श्रुत । पैल तें आइकों अश्रुत । तेंही आइके परी निश्चित । तेणेंही नव्हे ! ॥ ऐसीं सकळ शास्त्रें पाहे । तवं परस्परां त्या विरोधु आहे । तेण बुद्धि मोहित होये । श्रोतयांची ॥ कवण सत्य मानावें ? । कवण असत्य तें सांडावें ? । काय पा आतां करावें । ऐसें होय ॥ ऐसा आजन्मु तो जिज्ञासु । आइकावयाचाचि करी सोसु । परंतु अंतीं एकेंही विश्वासु । नुपजे तया ॥ ’ त्याच्या ठिकाणीं बहुश्रुतपणा येतो पण ‘ चित्तातें नव्हे एकनिष्ठता ’ यामुळें तो शब्दपंडित होतो, पण निश्चयाचें ज्ञान त्यापाशीं नसल्यामुळें शांतिसमाधान प्राप्त होत नाहीं. शास्त्राध्ययनानें आत्मज्ञानाची शांति मिळाली पाहिजे, म्हणजे शब्दजात अभ्यासिलेलें अपाप विसरतें.

**जवंवरीं न विसरिजे । तवं विश्रांति न पाविजे ॥**
**यालागीं श्रुत सहजें । सांडशील तूं ॥**
**वेदशास्त्रपुराण । जाणावया जे कारण ।**
**तें कळल्या–विस्मरण । ययांचें आवडे ॥**

**ऐसा श्रुतअर्थी निर्वेदु । पुढती न इच्छिसी शब्दु ।**
**आंगें आंग परमानंदु । जालासि ह्मणोनी ॥**

‘ अर्थ पावोनि करणें । करणी तैसी ’– वागण्यासाठी ज्ञान आहे; बहुश्रुतपणानें लोक भुलविण्यासाठी नव्हे. ‘ आपणपया जाणणें व जाणोनि तन्मय होणें ’ हें शास्त्राध्ययनाचें फळ मिळालें पाहिजे.(अ०२)

**एक दृष्टांतः**—‘ सुंदर आणि तरुणी । अभर्तृका होये कामिनी । वरि अन्यही पोपकु कव्हणी । धर्णी न वर्ते ॥ तीतें जो तो दृष्टी । अभिलाषूं लागे किरीटी ! ’ हा दृष्टांत देहवंताला सर्व विपय एकदम् ग्रासूं पाहतात हें कळावें म्हणून दिला आहे ‘ श्रोत्र म्हणे आईकेन, रसना म्हणे रस चाखेन, ’ याचप्रमाणें नयन, त्वचा, वाचा, पाय, क्षुधा, तृषा इ० सारेच देहावर उठतात.

**स्त्रीसौंदर्यः**—ह्या तेरा हजार वेदांतप्रतिपादनाच्या ओव्यांत एकेच ठिकाणीं कवीनें स्त्रीसौंदर्याचें मोहकवर्णन केलें आहे ! ह्या वर्णनांत अश्लीलता नाहीं पण तें अशा ग्रंथांत नसतें तर बरें होतें. तथापि वर्णनात्मक उतारा म्हणून पुढें देतोंः—

“ मग रसविषयाचि पाठीं । आठवे चांपेगोरटी । पोडशवरुपीं, मुष्टी–माजु सामावे ॥ सौभाग्यवती सुशीला । नेसली आर्थी सोनेसळा । ललाटीं मळिवटु शोभला । कुंकुमाचा ॥ दंत्तपक्तीची झळाळ । करि सुरंग रंगलें तांवूल । चिरीव नयन विशाळ । रेखा काजळाची ॥ चंद्र लोपले वदनीं । तानवडे भंवरिया श्रवणीं । नासापुटीं सुपाणी । मोतीं झळके ॥ सुरंग रंगले अधरोष्ठ । हनुवटी पाहतां नागर । हास्यवदना सुकुसार ध्यानीं प्रकटे ॥ कबरीभार पृष्ठीं । सुमन खोपा वीरगुंठी । चंदन चर्चिलें कंठीं । पातळ जिया ॥ कुचस्थानीं सुकुमारता । विश्रांति जेथें मन्मथा । कंचुकी अनुपम्य पाहतां । पांगुळे मन ॥ भुजादंड सरळ । करतळ पुष्ट सकोमळ । शब्द होती केवळ । कंकणांचे ॥ कदलीगर्भाची मृदुता । जानुद्वयातें सुकुमारता । चंपकपुष्पाची बरळता । काय तेथें ॥ ”

गीतेच्या १३ व्या अध्यायांतील ज्ञानलक्षणांपैकीं एक ‘ अरतिर्जन-संसदि ’ ह्म० जनसंमर्दांत मिसळण्याविषयीं अप्रीति असें एक लक्षण आहे. अज्ञान्याचें लक्षण याच्या उलट आहे. कसें तें पहाः —

सांडोनि आपुला बोधु । जया पाहिजे जनवादु। गोष्टी क्रीडा विनोदु । नागरिकांसि ॥ २८५६ ॥ एकांतीं बैसलिया न गमे । मग लोकव्यापारीं मन भ्रमे । जनसभेमाजी रमे । जयाचें चित्त ॥ ५७ ॥ तो ज्ञाता ना भक्तजनु । मुर्ख पामरु अज्ञानु । बहुभाषीही सुजाणु । म्हणों नये ॥५८॥ जनवादीं उपजे प्रीति । जनसभे होय रति । अधिकता जनाचिया उक्तीं । संतोषु वाटे ॥ ६१ ॥ लोकांचे आचारविचार । प्रतिघरिंचे समाचार । स्त्रिया पुरुषांचे आहार । वाखाणणें ॥ ६२ ॥ हा भला हा दुर्जनु । ऐसा मी ऐसा आनु । सांगणें ऐकणें सीणु । परावियाचा ॥ ६३ ॥ राजनीति राजवार्ता । गतमृत—व्यवस्था । प्रिय वाटे चित्ता । तैं सर्वनाशु ॥ ६४ ॥ देशनगरें देशपाळ । लोकगृहें लोकपाळ । यांचें वर्तमान समूळ । सांगणें ऐकणें ॥ ६५ ॥ अथवा पुराण कथा जीर्णा । वंशावळींची धारणा । तें उपयुक्त नव्हे आपणां । परी योगभ्रंश करी ॥ २८६६ ॥

सांप्रतकाळच्या बहुतेक लोकांना हें वर्णन किती उत्तम प्रकारें लागू पडत आहे ! वर्तमानपत्रें वाचणें ऐकणें, त्यांतील विषयांवरील चर्चा व वादविवाद, चारदोन दिवसांनीं भरणाऱ्या सभा, क्लब्स्, नाटकें, सिनेमा यांत दिवसांचें दिवस जातात ! आपण कोण हा विचार करायला मात्र वेळ नाहीं ! एकांताची गोडीच ठाऊक नाहीं. साऱ्या पृथ्वींतल्या साऱ्या विषयांच्या उठाठेवी साऱ्यांनीं सर्वकाळ करीत रहायचें—याचें नांव विद्वत्ता !

धनमानानें मत्त असलेल्या श्रीमंतांच्या किंवा मोठ्या ऑफीसरच्या दारीं अनाहूत आश्रयार्थ जाऊन विद्वान् लोक आपली अप्रतिष्ठा कशी करून घेतात त्याचें एक सुंदर चित्र पहाः—

असो वेदशास्त्रसंपन्न । कव्हणी येक ब्राह्मणु । न प्रार्थितां आपणु । काय करी ॥ १७९७ ॥ धनवंतु ऐसा पाहे । मग तयाचिया गृहा जाये।

तंत्र तयाचा आंगीं आहे । कैसी योग्यता ! ॥ ९८ ॥ संध्याहीनु स्नानहीनु । नीचसेवकु पराधीनु । आचारु नाहीं अज्ञु । बोलों नेणे ! ॥९९॥ नीचयातीची वाचा जाण । न बोले मृदु वचन । आणि अभिमान असाधारण । तें पा कैसे ? ॥ १८०० ॥ रोगें फुगलें शरीर । तें पुष्ट नव्हे साचार । मरणमूळचि थोर । हातपाय ते ॥ १ ॥ तैसें असद्व्यापारें मातलें । असद्रसें पुष्ट जालें । संसाररोगें भूतलें । नुचले जयाचें तया ॥ २ ॥ ऐशाप्रति धनुःपाणी । जाऊनियां तो ज्ञानी । आपुला अभिमानु सांडुनी । अपेक्षी मानातें ॥ ३ ॥ न पुसतां सांगे अभिधान । स्वमुखें महत्व आपण । नेदिता बैसकारु आसन । उंचीं बैसे ४ प्रसंगु बोलाचा न देखोनी । आपणूचि काढी दाटूनी । स्वयोग्य वचनीवचनीं । प्रकट करी ॥ ५ ॥ मानु नेदितांही तेणें । आपणु तयापासाव इच्छिणें । युक्तीं बुद्धीं प्रेत्नें । क्रोधें तऱ्ही ॥ ८ ॥ रिताचि होये परी न भरे। अवघें बोलणें सरे । मग आज्ञेवीणचि बा रे । लागे उठूं ॥ १० ॥ इ० इ०

---

## ६ शुध्द मराठीचा एक नमुना

दासोपंताच्या शुद्ध मराठीचा एक छोटासा नमुना ह्मणून एक उतारा देतों:—

'कनिष्ठ शाखा वळंवला अश्वत्थाची' आणि कांहीं कालानें कांहीं लोक त्या वृक्षाखालीं येऊन बसले आणि वर पाहतातंतों राक्षसाची स्वारी ! तेव्हां ते भयभीत झाले:—

**अवचट देखिला नयनीं । जैसा ठसावला होता मनीं ।**
**दचकु गेला अंतःकरणीं । भूलि आली ॥ ३०७८ ॥**
**श्रवणीं बैसली टाळी । शरीर पडले भूमंडळीं ।**
**गात्रें कांपती, हृदयउखळीं । कांडिती प्राण ॥ ७९ ॥**
**नयनीं पडली झांपडी । कढती सर्वांगींच्या नाडी ।**
**रसनेची जाली घडी । शब्दु हारपला ॥ ८० ॥**

बोबडी पडली वाचेतें । शब्द नाठवती वचनातें ॥
शक्तिहीन करचरणांतें । शरीर नुचले ॥ ८१ ॥
उठतांचि वळे वेंगडी । चालतां पायां पडे अढी ।
हृदयाऐसें सुरवाडी । सांडिलें मनें ॥ ८२ ॥
बुद्धि न स्फुरे भयाकारें । दिवसांचि जालें आंधारें ।
पूर्व पश्चिम साक्षात्कारें । दिशा न कळे ॥ ८३ ॥
ग्रामाची सोये चुकली । अवाट वाटेपरी भासली ।
विसरोनि धांवे चाली । गडबडांचि लागले ॥ ८४ ॥
आंगाचा करूनि गाडा । पैलवरी गेले गडबडा ।
मग उठिले मागापुढां । पाहत पाहत ॥ ८५ ॥
हळु हळु पाऊल टाकती । धांव घेती शंकती ।
सांचल होऊं नेदिती । शरीराचा ॥ ८६ ॥
येक बैठेचि व्याकुळ । विसरले आपुलें स्थूळ ।
मुखें द्रवे लाळ । ऐसें जालें ॥ ९३ ॥
येकांचीं मेटें वळलीं । मुखातें कोरडी पडली ।
खापराऐसी जाली । निबर जिव्हा ॥ ९४ ॥
उठती बैसती धांवती । जाती, घराबाहेरि येती ।
कोठेंचि नाहीं विश्रांती । ऐसें जाले ॥ ३०९५ ॥

---

## ७ दासोपंती सुभाषितें.

गीतार्णवांतील कांहीं सुभाषितरूप ओव्या पुढें देतों:—

(१) चिंता:— चिंता पुरुषातें बंधन । चिंता जीतांचि मरण ।
चिंता सुखाचें छेदन । दुःखदाती ॥
चिंता हृदयीचा अंधकारु । चिंता हा कृष्णाविखारु ।
चिंता नाशी तोचि गुरु । संसारत्राता ॥
आगीवीण चिंता जाळी । सुखांशु अवघा गिळी ।
चिंतेऐसें भूमंडळीं । दुष्ट नाहीं ॥

(२) पुरुषार्थः— पुरुषार्थें जिणें गोड । पुरुषार्थेंचि मरण वाड ।
पुरुषार्थु नाहीं तैं उघड । मुख न दावावें ! ॥
(३) मोक्षः— धर्मार्थकाम हीं सकळ । संसारपोषकत्वें विफळ ।
येके मोक्षेवीण टवाळ । काय करावीं ? ॥
(४) धर्मः— धर्मु लक्ष्मीचें कारण। धर्मु लक्ष्मीचें रक्षण ।
धर्महीनाचें धन । व्यर्थ होये ।
(५) त्रिगुणस्फुरणः- प्रपंचस्फुरण-रजाचें । विवेकस्फुरण-सत्वाचें ।
केवळ विस्मरण-तमाचें । स्वरूप जाणावें ॥
(६) भक्त व ज्ञानीः-भूमीचें आणि आकाशीचें। जळ सागरीं मिने साचे।
तैं उभयत्व सरितांचें । सागरुचि होये ॥ १४५ ॥
तैसे भक्त आणि ज्ञानी । मिनल्या माझ्या स्थानीं ।
सारिखेचि धनुःपाणी ! । ऐसें जाणावे ॥अ०१३-१४६॥
(७) ज्ञानीः— उपजलें अथवा मेलें । आलें कां केवळ गेलें ।
तेणें चित्त न डोले । तोचि ज्ञानी ॥ (अ० १३)
(८) भक्तियोगः-स्मरणीं कीर्तनीं ध्यानीं । एकनिष्ठता माझ्या भजनीं ।
तो अनन्यभक्तियोगो ह्मणौनी । तूतें सांगितला ॥

---

## ८ ग्रंथराज हा दासबोधाचा पूर्वावतार.

समर्थसंप्रदायांत दासबोधाला ग्रंथराज ह्मणतात, पण दासबोधाच्या अगोदर एक शतक झालेला व दासबोधाचा केवळ पूर्वावतार असा हा दासोपंतांचा 'ग्रंथराज' मराठींतल्या अध्यात्मग्रंथातला एक उच्च प्रतीचा ग्रंथ आहे. दासबोधासारखाच हा अगदीं स्वतंत्र ग्रंथ असून दासबोधांतलेच विषय (राजकारण व सावधानपण सोडून) यांत त्याच पद्धतीनें प्रतिपादिले आहेत. याचीं आठ प्रकरणें असून ओवीसंख्या १२०० वर आहे. ओवीही दासबोधासारखी सुटसुटीत आहे. समर्थांच्या वाचनांत हा ग्रंथ खास आला होता. समर्थांचे आवडते शब्द 'प्रतीति' व 'प्रबोध' हे प्रथम यांत आले आहेत व वारंवार आले आहेत. सम

र्थांनीं प्रतीति व प्रबोध या दोन शब्दांना ‘ प्रयत्न ’ याची जोड दिली आहे व तोच त्यांचा विशेष आहे. दासबोधाच्या तिसऱ्या दशकांतल्य पहिल्या पांच प्रकरणांत समर्थांनीं संसाराचें जें चित्र रेखाटलें आहे तें प्रस्तुत ग्रंथाच्या तिसऱ्याच प्रकरणावरून सुचलें असलें पाहिजे. समर्थांचें वर्णन अधिक विस्तृत, अधिक बारकाव्यांचें व अधिक ठसठसित आहे, तथापि त्यांची मूळ स्फूर्ति दासोपंतापासून आहे.

ह्या ग्रंथराजाच्या पहिल्याच पांच प्रकरणांत गुरुलक्षणें, असच्छिष्य व सच्छिष्य यांचीं लक्षणें आलीं आहेत. त्यांचाच उठावदार विस्तार दासबोधाच्या पांचव्या दशकांत झालेला उघड दिसतो ! ‘ रोकडा ब्रह्म साक्षात्कारु। करु जाणे तो सद्गुरु। मोक्षाचा नाहीं उधारु। जयाप्रती ’ ( १–३३ ) ‘ ग्रंथावरूनी ज्ञान होय। तरी का सेवावे गुरूचे पाय ’। (२–९७) याच कल्पना याच शब्दांत दासबोधांत व्यक्त झाल्या आहेत. शास्त्रप्रतीती, गुरुप्रतीती, आत्मप्रतीती ही त्रिविध प्रतीती दोन्ही ग्रंथांत आहे. ‘ शुद्ध–शबल’ हा विचार दोहींत आहे. अध्यात्माची महती दोन्ही ग्रंथांत आहे. स्थूल देह– लिंगशरीर.– पंचीकरण, अष्टदेहनिरसन, हे विषय वेदांतशास्त्रांत सर्वत्रच आहेत, पण त्याचें दासबोधांतील विवेचन दासोपंतांच्या ह्या ग्रंथराजाला अगदीं धरून आहे. दोन्ही ग्रंथ गुरुशिष्यसंवादरूपानें सांगितले आहेत. दोन्ही ग्रंथ नीट पाहिले म्हणजे दासोपंतांच्या ‘ ग्रंथराजाची ’ दासबोध ही एक ‘ सुधारून वाढविलेली आवृत्ति आहे ’ हें कोणासही कबूल करावें लागेल. असें आहे तरी दोन्ही ग्रंथांचें विशिष्टत्व आहेच. दासबोधांत कांहीं विषयांचें निरूपण अतिशय खुलासेवार व उठावदार रीतीनें केलें असून त्यांतील व्यावहारिक बोधाचीं व कर्तृत्वतेचीं सर्व प्रकरणें समर्थांचीं स्वतंत्र आहेत. दासबोधाचें निरीक्षण पुढील खंडांत होणारच आहे. दासोपंतांनीं संसाराचें साधें चित्र कसें काढलें आहे तें पाहूं. पुरुष वयांत आला, देहांत काम संचारला, स्त्रीची वासना झाली, मग ‘आश्रमधर्मावांचून न घडे। वैदिक

धर्मसाधन' असें म्हणत व 'काय करावें हो! यावांचून मोक्षाचा साधारण उपायच दुसरा नाहीं' असें ढोंग करीत बायको मिळविली; नंतर पुत्राची वासना झाली. कन्या झाली पण चित्ताला विश्रांति नाहीं. तीर्थव्रतपालन करितां करितां व देवांचे उंबरठे झिजवतां झिजवितां पुत्र झाला, तेव्हां 'कृतकृत्यता मानिली!' मनीं आनंद झालाः—

**थोर स्नेहें वाढविती। देखोनी क्रीडाप्रवृत्ती।**
**हर्षवंतें होती। दोघेही जणें॥ ६६॥**
**मुखींचा ग्रासु काढूनि। घालिती त्यांचा वदनीं।**
**प्राणाते वोवाळिती प्राणी। आशावंतें॥ ६७॥**

मुलगा मोठा झाला, उपनयन केलें, विवाह केला, मग 'इच्छा उपजली वित्ताची। कल्पना अर्थसाधनाची!'

**स्त्री बोले अवधारा। तुम्ही जावें देशाउरा।**
**दिवसां दोंचौंचा चारा। जंव असे घरीं॥ ७५॥**
**घरचीं बोलती कठिण। न वटे तें सुखाचें अन्न।**
**मग मुहूर्तमात्र पाहोन। बाहेरीचि घालिती॥ ७८॥**

मग 'विदेशा चालिला। येकटाचि.' प्रवासच तो! शीत उष्ण आंगीं साहे, भूक तहान मारी, भूमीवरी शयन—कष्ट सुरू झाले! गांवोंगांवीं भटकला.

**विद्याबळें वादबळें। शरीरबळें कौटिल्यबळें।**
**जेणें आंगें द्रव्य मिळे। हरे परावें॥ ८५॥**

पुष्कळ पापें केलीं, जीवावर बेतलें, नीचसेवा अंगीकारली, उदीम क्रयविक्रय केले, स्नानसंध्या व धर्मकर्माला वेळ नाहीं, खोटें जिव्हाग्रीं बैसलें, कुडावांकुडा व्यापार केला, चोऱ्या लांच सारें केलें!

**करूं नये तें करितां। करावें तें न करितां।**
**पापराशी अनंतां। संचित जालें॥ ९५॥**

मग स्त्रीपुत्रांच्या भेटीची खंत लागली, मिळालें तें द्रव्य घेऊन स्वार होऊन घरीं आला.

**देखोनि तयालागोनी । आनंदु केला स्वजनीं ।**
**ययातेंही अंतःकरणीं । जाला संतोषु ॥ ९९ ॥**
**सात पांच दिवस क्रमले । भेटीचें आरत गेलें ।**

पुनः 'स्त्री म्हणे मुहूर्त पाहावें' आजच नक्षत्रवार चांगलें आहे— 'गृहस्थु घातला बाहेरी!'

**वावडी उडे अंबरीं । सूत्र ते धारकाचां करीं ।**
**तैसी वासना ठेवूनि घरीं । तयांप्रती ॥ १०८ ॥**
**पुरुष विदेशा जाये । वासनाबद्ध पुढती ये ।**
**ऐसियापरी तारुण्य जाये । पावे वार्धक्य ॥ १०९ ॥**

मग 'जाणें येणें खुंटलें'; पुत्र प्रबुद्ध झाले होते. त्यांनीं व्यवहारिक आवरिलें!

**बाह्य सामर्थ्य पुत्राचें । आश्रमीं सर्व सुनेचें ।**
**वचन मातापित्यांचें । तें चालेचिना ॥ १११ ॥**
**दिवसेंदिवस उदासीन । बोलती बोल कठिण ।**
**कोठें जावें निघोन । शरीरें क्षीणें ? ॥ ११२ ॥**
**नित्यकलहो भांडण । मग तीं न घालिती अन्न ।**
**एवं आश्रमाबाहेर लोटून । घातलीं दोघें ॥ ११३ ॥**

बाहेर भिक्षा मागत चाललीं तंव 'ते स्त्रीतें आलें मरण' याच्या देहांतही रोग आले, लोकांनीं बाहेर घातला, अरण्यांत गेला, 'श्वानजंबुकीं तोडिला! जीतुचि तो!

असें हें संसाराचें एक चित्र उभें करून कवीनें यावर वैराग्याचें व्याख्यान केलें आहे. 'जन्मोनि तेणें काय केलें! पाहिजे कीं विचारिलें!' हें वर्णन दासबोधातील वर्णनाशीं पूर्ण जुळतें।

**शरीर आपुलें मानावें । तरी तें सर्वथा नव्हे ।**
**बहुतांचें हें स्वभावें । होय ह्मणौनि ॥ १३८ ॥**
**शुक्लारक्ताचें रचिलें । ह्मणौनि मातापितरांचें जालें ।**
**तंव आणिकांचें देखिलें । तथ सामर्थ्य ॥ १३९ ॥**

'शरीर कां स्त्रीपुत्रांचें, कां जंबुकश्वानादिकाचें कां काळाचें ! आपुलें सर्वथा नव्हे.' इ० इ०

**तात्पर्यः—गुरु मानूनि सर्वेश्वरु । सेवावा कृपासागरु ।**
**वैराग्यें शुद्धसत्वें श्रीसद्गुरु । प्रेमें आराधावा ! ॥ १९२ ॥**

---

## ९ सुंदर बोध.

साहव्या प्रकरणांत पंचीकरण सांगून अद्वैत निश्चय सांगितला. पुढें साधनयोग सांगून ८ व्यांत जीवन्मुक्तदशेचें वर्णन केलें आहे. हीं दोनीं प्रकरणें उत्तम आहेत. मुमुक्षु साधकांच्या अतिशय उपयोगाचें प्रकरण ह्मणजे सातवेंच होय. ज्ञान सांगितलें, त्यानें समाधान झालें पण 'योगीं मन स्थिर न बैसे' याला काय उपाय करावा तें येथें उत्तर दिलें आहे.

**बहुसाल शास्त्रश्रवण । आणि वक्तृत्वाची शक्ति गहन ।**
**स्वाधीन न करितां मन । व्यर्थचि तें ॥ ७-८ ॥**
**मन मानी ते समाधि । मन करी ते योगसिद्धि ।**
**ह्मणोनि मनाचि तें आधीं । आपुलें करावें ॥ १२ ॥**

मनोजयाचा दृढ अभ्यास केला तरच प्राप्तज्ञानाचा उपयोग ! 'कव्हणी येकु क्षेत्रविशेषु' पाहून एकांतस्थान पहावें.

**निगृह करूनि येक स्थान । तेथे प्रतिष्ठावें आसन ।**
**मृदुसुखदमान । पवित्र रोगहर ॥ १६ ॥**
**बैसोनि आपण येकांतीं । बाह्यप्रपंचीं चित्तवृत्ति ।**

चित्तवृत्ति न आवरली तर त्याचा उपयोग नाहीं. अपार शिष्य मेळवणें, परिग्रह व ख्याति वाढवणें, हा कांहीं ज्ञान पचवायचा मार्ग नाहीं. 'शब्द-वादीं लागे मन । मग ते गोडी धरी आपण । काढितां सहसा तेथून । न धरी परती' याप्रमाणें बहुतेक शाब्दिक ज्ञानी वाया जातात. सभा, वाद, परिग्रह हीं मोठीं विघ्नें आहेत. एकांत गांठला, निष्परिग्रह व निःसंग

झाला, एकांतांत स्थिर आसनावर बसून प्रहर प्रहर रमूं लागला तरच उपयोग. शरीर निरोगी व मन असंग या दोन गोष्टी अत्यवश्य आहेत.

**ह्मणौनि परिग्रहो सांडी । वासनेतें दंडी ।**
**आलि वृत्ति मोडी । तोचि साधकु ॥ २१ ॥**
**मृदु कठिन न मनणें । पडलें शीतोष्ण साहणें ।**
**देहप्रीति सांडणें । केवळ जे ॥ ३७ ॥**
**रूपदर्शन अरिष्ट । नव्हे तें योगातें इष्ट ।**
**यालागीं लावावें कपाट । दोहीं नयनीं ॥ ३८ ॥**
**जवं जवं अदेखणें बाहेरी । तवं तवं देखणें होय अंतरीं ।**
**यालागीं रूपदर्शनवैरी । सांडावें तें ॥ ३९ ॥**
**रसनेचां ठाईं आलुकेपण । जया पुरुषालागून ।**
**तया योगु नाहीं जाण । बरवयापरी ॥ ४० ॥**

रसनाजय अत्यवश्य आहे. अभ्यासीं ‘ सर्व भोगु सांडावा गा. ’ कामक्रोधादि विकारांचा वाराही चित्तास न लागावा. अशुद्ध पात्रीं दूध घातलें तर तें नासतें, म्हणून ‘ गुणवृत्ति न जिंकवे । तेणें योगाचें नाम नेघावें. ’ योगयुक्ति स्वाधीन करावी. अतिशय कोणताच नसावा. ‘ अत्यंत नेघावें अन्न । न करावें अत्यंत उपोशन ’ त्याप्रमाणेंच ‘अत्यंत निद्रा ना जागृति. ’ अवरोधदुःखानें मन योगाला विसरतें म्हणून सुखाला मन झोंबेल एवढेंच आहारविहरण असावें. हें सर्व सांभाळून सिद्धासन, स्वस्तिकासन किंवा पद्मासन—कोणतें तरी एक आसन सिद्ध करावें. ‘ मान माज आणि शिर । दंडापरी धरावें शरीर, ’ व मग ‘ सम करूनि प्राणापान । नासाग्रीं ठेवावें लोचन ’

**सोडूनि शरीरसंगातें । ठेवोनि निरावलंबी मनातें ।**
**देहावलंबन अभावातें । पाववूनियां ॥ ६९ ॥**

मग ‘ ज्ञानरूपत्वें राहिजे । आपुल्या ठाईं. ’ जाणणें नेणणें, लय विक्षेप, आठव विसर, हें जाऊन

**सच्चिदानंदीं निमग्नता । मनातें तन्मयावस्था ।**
**केवळ जाली असतां । तैसेंचि असावें ॥ ७६ ॥**

ह्या पुढचा अनुभव ज्याचा त्यानेंच घ्यायचा आहे. ' अभेदावस्था ते समाधि. ' गीतेंत हाच ध्यानयोग सांगितला आहे. नाथांनीं देवगडावर, तुकोबांनीं भंडाऱ्यावर, समर्थांनीं टाकळीच्या वनांत हाच योग साधला. नुस्त्या शब्दज्ञानानें कोणीच कृतार्थ होत नाहीं.

**सहजेसहजीं स्वानंदु । सहजेसहजीं पूर्णबोधु ।**
**सहजीं भेदु ना अभेदु । ऐसे सहज होय ॥ १४७ ॥**

तेथें करणें ना न करणें, घेणें ना सांडणें—' सहजस्थिति असणें । ऐसी निष्ठा ' प्राप्त होतें. मग—

**देहनिर्वाहार्थ व्यापारीं । वर्ततां मन अंतरीं ।**
**ठेऊनि दृष्टी बाहेरी । धरावी मुद्रा ॥ १७१ ॥**
**ध्यान चालतां बोलतां । भोजनादि व्यवहार करितां ।**
**विश्रांतिलागीं निजतां । तेणेंचि प्रकारें ॥ १७२ ॥**

आठव्या प्रकरणांत **संप्रज्ञात** समाधीचें लक्षण सांगतांना ' नाहीं देहाचें विस्मरण । आणि देहात्मबुद्धीचें दहन हें तव जालें असे ' असें म्हटलें आहे. ' देहीं असोनि नव्हे देही । विदेही तो. '

**तो न करूनि सर्व करी । करूनि कांहीं तो न करी ।**
**व्यवहारु तो व्यवहारापरी । न मनिजे तयाचा ॥ ८-३४ ॥**
**कर्मेसी जाणें अकर्म । अकर्म तें मानी कर्म ।**
**एवं प्रपंचु अवघा ब्रह्म । ऐसें देखे ॥ ३६ ॥**
**आपण आपणा जाणावें । गुणांचा कर्मीं न लिंपावें ।**
**आपण आघवें होआवें । इतुलेंचि ज्ञान ॥ ६९ ॥**

ज्या उपासनेच्या किंवा ध्याननिष्ठेच्या योगानें ही सहजावस्था प्राप्त झाली त्याच उपास्याचे गुणानुवादानें तो ब्रह्मानंद भोगीत राहणें हेंच मग उरतें. दासोपंतांनीं हेंच केलें व तुकोबांनीं हेंच केलें. सर्वांचें उपास्य एकच. दासोपंत त्याला दत्त म्हणतात व तुकोबा विठ्ठल म्हणतात इतुकेंच. आपण आतां दासोपंतांच्या संगतींत तो उपास्यप्रेमाचा आनंद भोगूं.

---

## १० दासोपंतांच्या पदांची मधुरता.

दासोपंतांच्या अफाट कवितासागरांतलीं रत्नें म्हणजे त्यांची अतीव मनोहर पदें होत. त्यांचें हृदय त्यांच्या पदांत व्यक्त झालें आहे. त्यांच्या निर्मल अंतरंगाचें प्रतिबिंब त्यांच्या पदांत स्पष्ट पडलें आहे. त्यांचीं सारीं सोळाशें पदें छापलीं आहेत. अभंग, आणि पदें हें मराठींतील अगदीं स्वतंत्र व अव्वल दर्जाचें वाङ्मय आहे. अभंगांत व पदांत कवीच्या मनांत उचंबळणाऱ्या भावना अनिरुद्धपणें प्रगट होतात व त्या वाचकांच्याही मनाला आंदोलित करितात. त्यांत कृत्रिमपणाचा लवलेश नसतो, मोठ्या ग्रंथाच्या मागें कांहींतरी लौकिक बंधनें असतात, त्याला लोकाभिरुचीकडे थोडेसें पाहावें लागतें. येथें लोकबंध सहज विसरले जातात. 'आपणचि खेळे आपणांशीं' हा येथला थाट असतो. हीं निर्मळ भावगीतें कानामनाला वेड लावतात. मोठाले ग्रंथ म्हणजे सभेंतलीं भाषणें होत व हें अभंगपदात्मक वाङ्मय म्हणजे प्रायः कवीचा एकांतांतला आत्मविलास होय! देवाभक्तांच्या एकांतांत, प्रेमांत, रुसव्याफुगव्यांत, आत्मरंगांत स्फुरलेलीं हीं कोमल भावनांचीं सुमनें दिव्य प्रेमानें दरवळलेलीं असतात. त्यांचा परिमळ भोगणारा वाचकही तशाच योग्यतेचा असावा लागतो. अंतरंगांतून बाहेर आलेला वाग्रंग अंतरंग पुरुषालाच पूर्णत्वें भोगायला मिळतो. असो. आपण दासोपंतांच्या संगतींत अंतरंगप्रेमसुखाचा आस्वाद घेऊं. मला दासोपंतांच्या ह्या पदसंग्रहानें पंधरा दिवस अगदी मोहून टाकलें होतें! रोज मध्यरात्रीं दोन दोन तास या संगतींत राहिल्यामुळें कांहीं संसारप्रसंगानें आलेला मनस्ताप शमला व भक्तिसुखाचे गोड गोड अनुभव यानें दिले. संसारदुःख विसरविण्याचें व स्वसुखानुभव देण्याचें अद्भुत सामर्थ्य संतांच्या शब्दांत असतें यांत शंकाच नाहीं. दासोपंतांनींच आपल्या एका पदांत शब्दशक्तीचें मोठें स्फूर्तिदायक वर्णन केलें आहे. ते म्हणतातः—

**शब्दें जेणें पर्वत द्रवती, शशिसूर्य गति विसरती रे, ।**
**शब्दें थरथरिली मेदिनी जाले तन्मय लोक तीन्ही ।**

**शब्दें पावकु तोहि निवाला । अकालीं घनु वर्षला, ॥**
**सप्तसागर मिळे क्षिती शब्दु आइकोनि येकत्व होती ।**
**दिगंबरा ! तो मूर्खांप्रती शब्दु न चले, कुंठली माझी मती !**

शब्दानें दगडाला पाझर फुटतो, चंद्रसूर्य आपली गति विसरतात, शब्दानें सारी पृथ्वी—सारा लोकसमुदाय थरथरतो ह्म० हादरला जातो व त्रिविधजन तन्मय होतात. हें शब्दाचें सामर्थ्य जगाच्या इतिहासांत अनुभवसिद्ध आहे. शब्दमाहात्म्यामुळें राष्ट्रांत मोठाल्या क्रांत्या होतात, पृथ्वीचा नकाशा बदलतो, दुष्टाचे सुष्ट होतात. शब्द काय एक करीत नाहीं ? शब्द निःशब्दाला नेऊन भिडवतो. शब्द ही प्रचंड शक्ति आहे. शब्दानें पाषाणाचे देव होतात, जडांत चैतन्य प्रगट होतें.: पाषाणमूर्ति बोलूं चालूं लागते, प्रतिमेच्या एकांतिक भक्तीनें विश्व चैतन्यमय प्रतीतीला येते, देहांत देव प्रगटतो, देह ब्रह्मरूप होतो ! परावाणीला चेतवणारी शक्ति वैखरीला नाचवूं लागली कीं मुखांतून अमृतस्राव होतो. तो ज्याचा त्याला तर तारतोच, पण कागदावर उमटलेलें हे शब्द दीर्घकालानंतरही हजारो हृदयांना चैतन्यस्फूर्ति देतात !

भक्ताच्या जिवंत वाणीनें मूर्तींत अमूर्त परमात्मा आविर्भूत होतो व अमूर्त ब्रह्मचैतन्य सर्व मूर्तिमय होऊन सर्वत्र प्रतीतीला येते. मूर्त अमूर्त, सगुण निर्गुण, दृश्य अदृश्य, हें सारें एकरस झाल्यावरही उपासकाला ज्या उपासनेच्या द्वारें ही पूर्णस्थिति प्राप्त होते त्या उपास्याविषयींचें त्याचें प्रेम वाढतच असतें—ही भक्तीची एक मौज आहे ' मुक्तातें क्षुधा उरली ' हें नेणत्यांना नवल वाटेल पण ' दिगंबर अव्यय ' असून मुक्तांच्याही प्रेमाचा विषय होतो !

**शिवु थोर कीं विष्णू ? शक्ति कीं कमळासनु ?**
**मूढमतींचा वितर्कु जनु न मनी तात्त्विकू ।**
**सत्यद्रष्टा आणिकू दुसरा नाहीं तया ॥ १ ॥**
**' नान्योस्ति द्रष्टा ' हें वचन, । ' तत्किं केन पश्येत् ' ह्मणौन ॥**

**वाक्य वैदिक जाण प्रमाण येथें ।**
**दिगंबराचें हें बोलणें आलें अनुभवखुणे ॥ २ ॥**

---

## ११ सगुणप्रेम.

केवल परब्रह्म अनुभवाला आल्यावरही सगुणप्रेम शिल्लकच राहतें !

**सुंदरु आणि सावळा भाळीं टिळकु पीवळा ।**
**पांघुरला सोनेसळा कंठीं माळा सुमनाची ॥ १ ॥ ध्रु० ॥**
**ऐसा कै येसी सांग पा ! कमळनयना बापा ! ॥ छ ॥**
**किरीटकुंडलांची झळाळ लोपे दिनकराचें मंडळ ।**
**बोलतां शब्द मृदु मंजुळ दशनीं कीळ फांकती ॥ २ ॥**
**स्वभक्तजनीं प्रपूजिला पुडती तेहींचि परिवारला ।**
**परब्रम्ह गुणपूतळा अतिकृपाळा ! दिगंबरा ! ॥ ३ ॥**

ज्या सगुणध्यानानें निर्गुणबोध परिपूर्ण झाला त्या सगुणाविषयींचें गोड प्रेम मागें राहणें हें भक्ताच्याच कृतज्ञ हृदयाला समजतें. सगुणाची गोडी अवीट आहे. अतींद्रिय परमात्मा सेंद्रिय जीवांना भक्तिबळानें आकळला तरी सगुण भक्तिप्रेम हा त्यांचा जिव्हाळा कायम असतो. अद्वैतांत भक्ति कशी होते हें भक्तच जाणतात. आतुरभक्ताची भेटीची तळमळ कशी गोड असते !

( १ ) **सगुणें निर्गुण ध्यान, सगुणें येणें वो ज्ञान ।**
**सगुणावांचूनि मातें प्रीयुचि नाहीं ॥ १ ॥ ध्रु० ॥**
**भक्तजन जाणती याची खूण ॥ छ ॥**
**सगुणें व्यापीले जन सगुणीं वेधलें मन ।**
**सगुणीं भजतां सख्ये ! आयासु नाहीं ॥ २ ॥**

( २ ) **आठवसी प्रतिक्षणीं प्रीति भरली सगुणीं ।**
**आनु मातें उपदेशु नावडे मनीं बापा ॥ १ ॥**
**येईं रे येईं रे देवा । घेउनि जाईं रे ॥ छ ॥**
**ज्ञानज्ञेयाविचारणा ते मी न करीं कल्पना ।**
**दिगंबरा ! तुझें रूप रूपलें मना ॥ २ ॥**

---

## १२ दर्शनाची तळमळ.

( ३ ) निढळावरि बाहे, वाटुली मी पाहे,
न दिसे वो अवधूतु आता मोकलीन धाये,
अश्रुपात न धरती ! सखिये ! सांवरूं किती ?
येई दिगंबरा ! माझया माहेरा ! तुजविण प्राण सांडिल शरीर ॥
( ४ ) वाट पाहतां वेळु जाहाला वो बाइये !
श्रीदत्तु गुंतला कोठें ? अजुनि कां नये ॥ १ ॥
तो माझा प्राणु ! आत्मा ! सखिये !
मन हें न धरे माये ! काये करूं ? ॥ ध्रु० ॥
उपाये करितां सर्व विपरीत जाहालें !
दिगंबरें अवृत्तीं अंतर भरलें ॥ २ ॥
( ५ ) श्रीदत्तु सावळा चैतन्यपुतळा मी कैं देखयीन डोळां वो ।
कासे सोनेसळा तिळक पिवळा चंदनाची उटी वरि माळा वो॥१
जीवाचें जीवन जीवें वोवाळीन, अखंड लागलें त्याचें ध्यान वो।
माझे पंचप्राण श्रीदत्त निधान न स्मरे आणिक तेणेंवीण वो॥२॥
बाहिवटे कंकणें मुद्रिकाचें लेणें अगंद कानकें विभूषणें वो ।
दिगंबरें येणें कमळनयनें हरिलीं साधूंचीं निजमनें वो ॥ ३ ॥
( ६ ) तुह्मी जा जा वो झडकरुनी त्यासी येई जा घेऊनी ।
मन त्याचा गुणीं आसक्त जालें ।
हा वो मनाचें निजमन माये ! प्राणाचें ही प्राण ।
दिगंबराचे चरण कै देखईन ॥
( ७ ) चालतां बोलतां तुझें रूप ध्यायीन, तें श्रीमुख ध्यायीन ।
सुंदर सावळें तें मी दृष्टीं पाहीन ॥
गर्जेन आनंदें नाम तुझें गाइन गुण गीतीं गाइन ।
प्रेमाचें भरतें हृदयीं नित्य लाहीन ॥
श्रीपादकमळें देवा ! दृष्टीं पाहिन तें मी ध्यानीं ध्याईन ।
होउनि भ्रमरु तेथें रुंजि करीन॥
( ८ ) ऐसा मीं कै पाहिन येतां मजलागुन ।
हृदयीं आलिंगिन प्राणु वोवाळिन माझें योगधन ॥ १ ॥ ध्रु० ॥

पायां लागइन । येतां मजलागुन ॥ छ ॥
' नाभि ' वचनीं गर्जेतु उचलूंनि दक्षिणहस्तु ।
ह्मणे मी आलों रे समर्थु दिगंबरु श्रीअवधूतु ॥ २ ॥
( ९ ) आळविसी तरी येईन, बोल ह्मणसील तरी बोलैन ।
हात उचलिसी तरी मागैन, पाये दाविसी तरी लागैन ॥१॥ध्रु०॥
नातरि उगलाचि असैन पासीं, नव्हे इतुलेनि मी परदेसी ॥ छ॥
(१०) ' नाभी ' म्हणौनि सत्वरु उचलूंनि दक्षिण करु ।
येतां कं मी पाहिन माये ! अवधूतु, धरिन पाये ।

गुरू चूकलें खिरांरां दशदिशा धांवे सैरा ।
तैसें तुजविण माझें मन श्रमलेंही करी भ्रमण ।
कवळिन दोहीं बाहीं, ऐसी आवडी होतसे देहीं ।
दत्ता ! निरास करिसी काह्या ? परमात्मया ! योगिराया ॥
मोक्षावरि उरलें कर्म सद्गुरु तुमचें नाम ।
दिगंबरा ! तुझें नाम मोक्षाहूनि प्रिय परम ।
(११) अवो ! प्रीतिवादाचें बोलणें, क्षोभु धरिला याचेनि मनें ।
न पाहे, न बोले वचनें, रुसला नेणे अवधूत ! ॥ १ ॥
अरे ! तूं माझा जीउ प्राणू ! बा होतासि अति कठिणू ।
कवणाप्रति सांगणें सीणू ? हृदयीं बाण कडतरे ॥ २ ॥
देवा ! तुज न साहे बोलणें, न साहे दृष्टीचें पाहाणें ।
न साहे गुणिक स्तवणें । वेगळेपणें रुसलासी ? ॥ ३ ॥
आठउ विसरु वेंचला, भेदभावो विलया गेला, ।
दिगंबरू आत्मा प्रकटला, आनंदु जाला मज माये ॥ ४ ॥

दासोपंतांच्या हृदयांत श्रीदत्तदिगंबरभक्तीचा जिव्हाळा कसा कोमळ होता, त्याच्या भेटीविषयीं ते कसे तळमळत, हें आपण त्यांच्याच पाठीशीं उभे राहून ऐकूं ह्मणजे त्यांच्या प्रेमरसाचा आस्वाद आपणांसही घेतां येईल !:—

(१२) बहु दिवस क्रमले सखये ! मी काये करूं ?
भेटी नये अवधूतु, याचे पाय धरूं ॥ १ ॥ ध्रु० ॥

भेटीचें आरत माझें परिपूर्ण करा ।
मन माझें उतावीळ पाहिन माहियेरा ॥ छ ॥
वाट पाहतां कुंठली गति, मति, आठवण ।
दिगंबराचें भेटणें मनीं मारूनि मन ॥ २ ॥
(१३) मन जाये वो ! जेथ हें तेथवरी तोचि आहे ।
दिगंबरु आत्मा तेथ मन मरोनि जाये ॥
(१४) मन हें सुमन वाइलें ईश्वरीं अगुण-गुण-जळधरीं दत्तात्रयीं॥ १ ॥ध्रु०
केविं पाहों मन आपुलें ? लवण मिने सागरीं तेवि जालें ॥ छ ॥
दिगंबरा !तुतें मी माजें पाहतां मन सगुण निवडितां निवडेचिना२
(१५) जातयां येतयां मी पुसन वाट्ळी,दूरदेशीं दत्तुमाये माझी माउली ध्रु
कई जाइन माहेरा आपुल्या ? साजणी! कमळनयनरूप आठवे मनीं ॥छ॥
कवळीन रूप दोहीं बाहीं साखिये ! दिगंबरीं भेटि के होइल?गोरिये ॥२॥
(१६) देहावरी न ये वो साखिये ! मन माझें वेधलें बाइये ।
मुमुक्षु जयालागोनी श्रमती, मुक्त जेथें आनंदु भोगिती ।
भक्तजन सगुण भजती, दिगंबरु पाहाती पूजिती ।
(१७) बोलवितां न बोलसी ऐसें म्या वो काये केलें ? ॥ ध्रु० ॥
तुझें मन कां वो धरावें ? तें मन कैसें वो धरावें ? ।
प्राण देयीन, तुजविण न सवे माये ! ॥ १ ॥
कंठ दाटला, नयनीं जळपूरू वाहे ।
दिगंबरे ! तूतें कळवळ कैसी न ये ? ॥ २ ॥

---

## १२ प्रेम दे मज प्रेम दे.

दत्तापाशी एकच मागणें– तुझें प्रेम दे !: —

( १ ) प्रेम दे ! मज प्रेम दे ! सर्वसुखमय प्रेम दे ।
परमानंदानंदकंदा ! सर्वदा मज प्रेम दे ॥
आत्मया तुज जाणतां मज योगसाधन कासया ?
पूर्णब्रह्म पुराण तूं, तरि भेदु के परमात्मया ? ॥
सगुण निर्गुण भाग न करीं–नावडे मज ते क्रिया ।
दिगंबरा ! तव नित्य सेवन आवडे मना माझिया ॥

( २ ) वाट पाहतां लाजिरवाणें, कांहीं घेणें ना मागणें ।
दत्ता नाम अमृतसार, तेणें प्रेमें पूर्ण शरीर ।
बहु जन्मांचें साधन प्रेम सांपडलें निधान ।
दिगंबरा ! प्रेमामृतें आम्हां उठवीं भजनपंथें ॥

हें दिव्य प्रेम बाह्य साधनांनीं प्राप्त होणारें नाहीं, त्याला अनन्यताच पाहिजे.

( १ ) कर्मयोगाचीं काहणी मातें न रुचे अंतःकरणी ।
मी वो रंगली आनंदें अवधूतें परमानंदें ।
यज्ञदानतप सुव्रत श्रमकराचि माने समस्त ।
दत्तनाम घ्या घ्या घ्यारे प्रेमअमृतसार दुसरें ।
दिगंबराचें स्मरण न चुके येणेंसीं आन ।

( २ ) माझा विषयो न पुरे स्मरणें, न पुरे ब्रम्हज्ञानें रे ।
ध्यानयोगें कारण नाहीं, काये करूं साधनें रे ।
मोक्षु तोही न धरे मनस, तपसु थोरु न मने रे
अवधूता ! तुझी भेटी दुर्लभ, असइन सान्निधानें रे ॥ १॥ ध्रु० ॥

( ३ ) जपुतपु तीर्थाटण माझें हेंचि ब्रह्मज्ञान ।
रे अवधूता ! तुझें ध्यान माझें सकळ साधन ॥

---

## १३ कृतार्थता.

श्रीदिगंबराच्या उपासनेनें व उपासनाजनित आत्मज्ञानानें मी कृतार्थ जालों असें दासोपंतांनीं आपल्या पदांत अनेकवार सांगितलें आहे. ह्यांतील आत्मानुभवाच्या खुणा स्पष्ट आहेत. ' कवण सुकृत ! दैव कवण वो बाइये ! ' असे आनंदोद्गार दत्तभेटीनंतर कवीनें काढले आहेत.

( १ ) जाणिवेची खूण मातें जाणवली माये ।
आत्मा अवधूत माझा मोचि मातें पाहे ॥
हातिचें सुटोनि होतें बहुत काळ गेलें ।
आजि सुदिनु, माझें मज सांपडलें ॥

( २ ) उभा ना बैठा ठायीं, ठायाचें भानाचि नाहीं ।
जवावें कैसें काई ? दिगंबरा ! वृत्तिविलयीं ॥
हातीं राहिली स्मरणीं चाळावे कैसे मणी ? ।
डोळे उघडुनि काय पाहावें ? डोळे झांकुनि कवणा घ्यावें ? ।
दिगंबरु आत्मा जीवें जाणिलें असतां बरवें ॥

( ३ ) जीव ईश्वर हे कल्पना माझी, वृत्तीच्या विलयीं नीमाली सहजीं।
दिगंबर वृत्तिरहित जालों जीवें ईश्वरेसीं सहित ठेलों ॥

( ४ ) पडलें मनस भ्रांती, न ये रूपव्यक्ती,
बुडाली भेदमती, आटली अहंकृती,
माझी संवित्ती-कैसी हे तुझी रीती ? ॥ १ ॥ ध्रु० ॥
देहादि न दिसे भान निरालंबस्थान,
मीतूंपणा ग्रसन, सेवटीं कळली खूण.
कळलेनिवीण ! दिगंबरा तूं चिद्धन ॥ २ ॥

( ५ ) त्रिपुटीविलयें मी मातें जंव पाहें ।
देवत्वाचें चिन्ह तेथें अवघें भरलें आहे ! ॥ १ ॥
भक्तीं देवो नाहीं मग तो भक्त कायी ? ।
दिगंबर ब्रह्म स्फुरे दोहींचा विलयीं ॥ २ ॥

माझा हा स्वानंद ‘ सांगतां ही पडे विसरू, म्हणून बोलतां न ये ! ’ अशा प्रकारचा आहे. माझें ‘ हृदय आनंदाचें स्थान अथवा नंदनवन ” बनलें आहे. ज्ञान आणि भक्ति यांचें परमस्वरूप एकच आहे.

( ६ ) मनत्व नुरलें ठायीं; पाहणें पुढती कायी ?
स्वरूपें चिन्मयता; पाहाणया पैसु नाहीं ॥ १ ॥
ऐसे डोळस अंध जाले, पाहों वीसरले ॥ छ ॥
पाहणें न पाहणें, जाणणें नेणणें,
दिगंबरीं वावो ! स्थिती सहज असणें ॥ २ ॥

( ७ ) लक्ष ठेवितां चरणीं माझी मति पारुषली;
रूपीं निमाली चेतना, गुणवृत्ति हारपली ॥ १ ॥
परब्रम्ह हें निर्गुण-गुणमय व्यक्त जालें ।

दिगंबर निर्धारितां द्वैताद्वैत गेलें ॥ २ ॥
देवपणेसी पारिखें भक्तपण काय करूं ! ॥ ध्रु० ॥
(८) पाहतां स्वरूपें तुज मज भेदु नाहीं ।
सत्येसी दुसरें सांग-सांग कांहीं ! ॥ १ ॥
दिगंबरु बोले-' देईन मी देवपण ।
वर्म तूं आमुचें ह्मणें बोल येथून ! ' ॥ २ ॥
(९) प्रसन्न जालासि तरि काये देसी ?
क्षोभलासि देवा ! तरि काये नेसी ? ॥ १ ॥ ध्रु० ॥
आत्मता गुंतलों रे दत्ता ! मीपणा मुकलों रे ॥ छ ॥
दिगंबरा ! तुवां भेदुचि हरिला विश्वासलों तुझिया बोला रे ! ॥
(१०) शब्द निःशब्द कुंठले, जेथें वेद परतले,
दत्तनाम त येकलें नित्य घेईन वो ।
गुण करितां श्रवण रूपीं मिसळलें मन ।
तें मी स्व प सगुण कई लाहीन वो ॥ १ ॥
तो माझें जीवनधन वो बाइये ! तो माझें जीवनधन ॥ ध्रु० ॥
योगमताचा विस्तारू, ज्ञानगुणें जळधरू
भाग्यें जोडला ईश्वर गुरु बाइये ! वो ।
तेणें द्वैत निमालें, माझें मीपण पारूषलें
रूप अरूपीं वेंचलें गोरिये ! वो ॥ २ ॥
नेणे अवस्थेची खूण, माझें वेंचलें मीपण
तत्वीं जालें समाधान जाण सखिये वो ।
दिगंबरीं आदरु, ठेला सकल विस्तारु
अहंमतीचा विसरू-पार गेलिये वो ! ॥ ३ ॥
(११) कवणें काय मानावें ? कवणें काय जाणावें ?
आतां इतुलें हें प्रलपन-हेंही कैचें ? ।
सर्व प्रकाश हें जेणें, तें पै कासेन जाणणें ?
डोळां डोळे न पाहणें ऐसें न घडे जेवि ! ॥
श्रवणीं देखिलें रूप नयनीं न धरवे
नयन पावला खूण ते श्रवणीं नायकवे ! ।

## १४ उपदेश.

आपलें पोट भरल्यावर उरलेलें अन्न इतरांस वाटणें हा मनुष्यधर्मच आहे. दासोपंतांनीं स्वतः कृतकृत्य झाल्यावर जनांस बोध केला आहे तोही प्रेमळपणानें सुबोध व सहज आचरणीय असाच आहे. आपण त्यांच्याच मुखानें तो ऐकूं. बाहेरच्या खटाटोपी करितां पण अंतःशुद्ध होऊन दत्ताला कां भजत नाहींस ?

( १ ) **कासया सेविसी वन ? कां लाविसी लोचन ?**
**तुझें तुतें जंव ज्ञान प्रगट नाहीं ! ।**
**कासया आसन ध्यान एकांत सेवन ?**
**जरीं मी तें कवण ऐसें न कळे ! ॥ १ ॥**
**कासया सेविसी गुरु ? वाहसी पुस्तकभारु ?**
**तुझा असाक्षात्कारु तुज जै असे ! ॥ छ ॥**
**कासया बोलसी खुणा ? कासया धरिसी मौना ?**
**कासया धरिसी नाना विकार देहीं ? ।**
**कासया दंडिसी काया ? न तुटे संसारु माया !**
**दिगंबरा येका तया शरण जाई ॥ २ ॥**
**अवस्थांचें स्फुरे भान तंव कैचें ब्रह्मज्ञान ?**
**निर्विकल्प समाधान बोलतां नये ! ।**
**जाणणें ना नेणणें, विसरु ना स्फुरणें**
**सहजें सहजपणें समाधि असे ? ॥**

( २ ) **मन** आधी स्वाधीन करा मग परमार्थ पुढें !

**माळा, कमंडलु, गोमुखें, आसन-मुद्रा लाऊनि काये ?**
**न्यास, अंगचार, नानामुद्रा, मंत्र-विक्षेपु खाये ।**
**येक मनस चंचल असतां करितां योगुचि नोहे ॥ धृ० ॥**
**मने उजळली बुद्धी । मानी मग ते समाधी ।**
**ऐसें मन तें आधी । हातीं घेइजे ॥**
**मनें गुणनिरसन । मनें स्वरूपदर्शन ।**
**दिगंबराचें सेवन मनेवांचूनि नसे ! ॥**

( ३ ) वरवर मुंडण केलें पण ' कामक्रोध मद मत्सर हृदयीं भरले ' तत्वपदार्थशोधन करितां वादास उठला, पण—

**शांति येकि नाहीं-काइसा संन्यासु रे ।**
**जाणपण वाया गेलें रे ॥ ध्रु० ॥**
**आश्रमाभिमानें तरला कवणु ? मनसें हरावीं जनांचीं रे ! ॥**

भेदाचें भान गेलें याहून संन्यास कोणता ? शांतिमय दिगंबराला भजा. ' जनांचीं मनें हरावीं ' तरच तें ज्ञान, तरच संन्यास खरा !

**दिगंबरेविण चुकले प्राणिये, नकळे तत्व निर्वाण !**
**( ४ ) हृदयीं कौटिल्य, संतापु सर्वदा, कासया चाळिसी मणी ?**
**ग्रामजल्पीं मन नित्य रंगलें, उठतीं तरंग ध्यानीं ।**
**आसनाचा बंधू, गोमुखें गवाळीं मांडूंचि दाविजे जनीं !**
**मन पिसाळलें दशादिशा भ्रमे-आइके वार्ता कानीं ॥ १ ॥ ध्रु०॥**
**ऐसें चूकलें रे चूकले रे, दंभ विस्तारिती जन ।**
**सद्गुरुवांचूनि वर्मचि न कळे, कायिसें योगसाधन ॥ छ ॥**

' दिगंबराला ' विसरून ' मानवांचीं मुखें पाहती प्राणिये पण त्यांना लाभ कोणता ? मोक्ष ना संसारू मध्योंचि भ्रमतां हे—ऐसी जनभूलि रे ! जनभूलि रे !

**शांति नावडे तोंडाळा, नाइकवे परगुण खळा, ।**
**चोरा न साहे चंद्रमा, कुष्टिया आंगीं उपमा, ।**
**अभक्तास गुणमाहिमा, पापी तो भजे कर्मा, ।**
**दिगंबरा ! तुझें ज्ञान विष विषयिकांलागुन ।**
**बोललें कित्ती बोलावें मुंडलें कित्ती मुंडावे ! ।**

(५) 'जनुचि अवघा बुडतसे' ह्मणून मला जनांचा कळवळा येतो. माझ्याविषयीं ह्मणाल तर—

**दिगंबरें मज दिधला हातु । तेणें परपार पावलों पंथु ।**
**देखावा तरि आत्माचि, आइकावा तरि तोचि**
**केवळ प्रवृत्ति मनाची तेथेंचि करावी ।**

**योगसेवया निदध्यासन करावें नित्यात्मचिंतन ॥**
**एवं मन बुद्धि करणगण तेथेंचि अर्पावें ॥**

करणगण ह्म० इंद्रियसमुदाय. आत्मचिंतनाव्यतिरिक्त सारें मृग-जळ होय.

**च्यार्‍ही वेद मुखोद्गत, आणि तेतुलेंही सार्थ ।**
**येर शास्त्रवाद समस्त करतळामळक ! ।**
**पुराणकथेचा सागरु, चौदा विद्यांचा सुरतरु,**
**तया येकूचि साक्षात्कारु आपला नाथीं ।**
**तेणें करूनि सकळ वायां गेलें तें पाल्हाळ ।**
**जन मोहूनि केवळ असे फळ कांहीं ? ॥**

( ६ ) तुझें सुखनिधान तुझ्या जवळच असून व्यर्थ कां भ्रमतोस ?

**माजिघरीं विसरोनि ठेवा गांवोगांवा धांवसी ! ॥ धृ० ॥**
**बंधूचि नसतां मूळीं मोक्षु मागतोसि देवाजवळि ।**
**देवो तो स्वर्गीं ना पाताळीं महीमंडळीं तुजविण ॥**

तुला माझा अनुभव सांगतों कीं ' शास्त्रजनित ज्ञान न करी स्वरूप-दर्शन ! ' मग तें कशानें होतें ?

**आपआपणा पाहीं, खुणा जाणोनि उगलाचि राहीं**
**दिगंबरेंविण शास्त्राचें जाळ श्रमकर होय देहीं ।**

शाब्दिकांना आत्मतत्व गोचर नाहीं ' पण भक्त प्रेमळ त्यांचें निवे अंतर । तें रूप नयनीं निवळे निरंतर । '

**प्रेमहीना काइसी भक्ती ? अभिमानें घातली माती !**
**दंभू तो सर्वदा चित्तीं दिने दिनु आगळा भ्रांती ।**
**ऐसा आत्मा तो देखावा, आइकावा, मननीं भजावा, ।**
**जयाकारणें भजिजे गुरु, नित्य-अनित्य-वस्तु विचारु ।**
**आराधावा दिगंबरु, जयाहुनि नाहीं परु प्रियतरु ।**

आत्मशुद्धीचें सोवळें कधी विटाळत नाहीं ! विटाळ देहसंबंधाला !

**दिगंबरेसीं येकत्व जालें । विश्वाचें दुरित पळालें ।**

---

# ६ देशाची सामाजिक व धार्मिक दुरवस्था.



## १ लोकांची दुस्थिति.

जाधवकालीन स्वराज्याचा अस्त व शिवकालीन स्वराज्याचा उदय ह्या दोन स्वराज्यांच्या मधल्या परतंत्रतेच्या काळांत महाराष्ट्राची राजकीय दुःस्थिति कशी झाली होती हें आपण दुसऱ्या प्रकरणांत पाहिलें. आतां या प्रकरणांत सामाजिक व धार्मिक अवनति कशी झाली होती हें पहावयाचें आहे. व्यक्तीचें काय किंवा राष्ट्राचें काय आरोग्य बिघडलें कीं त्याचे परिणाम सर्व गात्रांवर दिसतात. राष्ट्राचें आरोग्य मुख्यतः त्याच्या स्वातंत्र्यावर अवलंबून असतें. अर्थात् स्वातंत्र्यनाशाइतकी राष्ट्राला दुसरी महत्तम आपत्ति नाहीं. एक मुसलमानांची राजसत्ता महाराष्ट्रावर स्थापित झाली तर राजकीयदृष्ट्या तशीच सामाजिक व धार्मिकदृष्ट्याही राष्ट्राची अवनति किती झाली, याचें शब्दचित्र आपणांस साधुसंतांच्या ग्रंथांतच पहावयास मिळतें. परकीय व परधर्मीय राजसत्तेमुळें हिंदु संस्कृतीला मोठाच धक्का बसला. क्षत्रियांनीं तलवार टाकून आऊत किंवा नागडी हातीं घेतली, किंवा त्यांतीलच विशेष वळवळीचे महत्त्वाकांक्षी लोक मुसलमानांच्या नौकरींत शिरले. ब्राम्हणांना स्वराज्यकाळीं क्षत्रियांचा आश्रय होता तो सुटला व वैश्य आणि शूद्र यांचे कृषिगोरक्ष्य वाणिज्यादि व्यवसाय हे देशभर नित्य चालणाऱ्या बंडाव्यामुळें, लुटालुटी व जाळपोळ यांमुळें नीट चालेनासे झाले. सख्खी आई मेल्यावर तिचीं पोरें पोरकीं होऊन सावत्र आईच्या राजवटींत त्यांचे जे हाल होतात तेच चारी वर्णांच्या लोकांचे हाल होऊं लागले. अंगचें पौरुष दाखविण्यास जागा राहिली नाहीं. जाधवांच्या राज्यांत ज्यांनीं मर्दुमकीचीं

कामें केलीं ते मराठे वीर व ब्राह्मण मुत्सद्दी यवनांच्या नौकरींत शिरून त्यांतच मोठेपणा शोधूं लागले ! गिरिकपाटीं कंदरीं राहून पुंडपाळेगार-पणा करावा अगर पातशाहींत सरदाऱ्या व कारभार करून त्यांतच महत्त्व मानून राहावें यापेक्षां ब्राह्मणक्षत्रियांच्या हातीं कांहीं राहिलें नाहीं. दैन्य, दारिद्र्य, दुष्काळ, अवृष्टि व अतिवृष्टि यांचीही त्यांतच भर पडत गेली. पराक्रमाला जागा न राहिल्यामुळें लोकांच्या चित्तवृत्ति संकुचित व स्वार्थी झाल्या. व्यापक धर्मशीलपणाची उदार दृष्टि जाऊन 'देह तोचि देव भोजन ते भक्ति' अशी पाखांडें माजलीं. आचारधर्म लोपले. नास्तिक-पण बोकाळलें. देवाधर्माच्या उच्च कल्पना जाऊन चित्तवृत्ति मलिन, स्वार्थी, एकलकोंडया झाल्या. भक्तिभाव आटला, ज्ञानविचार नाहींसा झाला. राष्ट्र तेजोहीन झालें. यामुळें सामाजिक व धार्मिक बाबतींत राष्ट्राची अवनति झाली.

हें वर्णन आम्ही आमच्या पदरचें करीत नाहीं. तत्कालीन संतकवींच्या वचनांचें त्याला आधार आहेत. भरतखंडांत वर्णधर्मी ( हिंदु ) व वर्ण-बाह्य ( मुसलमानादि ) असे दोन मोठे भेद झाले असें त्र्यंबक कवीनें सप्तशृंगीच्या उंचीवरून वर्णन केलें आहे. ब्राह्मण कर्मभ्रष्ट झाल्यामुळें यवन त्यांचा तेजोभंग कसा करितात हें गुरुचरित्राच्या आधारें दाख-विण्यांत येणार आहे. नोकरींत शिरलेले ब्राह्मण कसे नीतिभ्रष्ट होतात व त्यांची शेवटीं कशी दुर्दशा होते 'हे महालिंगदासांनीं' (मागें पृ० ८०-८१त ) वर्णिलें आहेच. सर्व जातींत सोंगेढोंगें कशीं बोकाळलीं व भोळ्या-भाबड्यांच्या अज्ञानाचा फायदा घेणारे लबाड, स्वार्थांध व पतित लोक, बोवा, महाराज व गुरु या नांवानें परमार्थाचा कसे बाजार पसरूं लागले हे एकनाथांनीं निर्भीडपणानें सांगितलें असून शुद्ध अध्यात्मज्ञानभक्ती-शिवाय तरणोपाय नाहीं असा स्पष्ट मार्ग दाखविला आहे. तुकोबारायां-नींही निर्दंभवाणीनें दंभस्फोट केला आहे व अभाविक, नास्तिक, तर्कटी लोकांपासूनही समाजाचा कसा घात होत असतो हें नाथतुकोबांनीं

स्पष्ट दाखविलें आहे. तुकयाबंधु व समर्थ यांनीं समाजस्थितीचें वर्णन केलें आहे तें याच प्रकारचें आहे पण विस्तारभयास्तव त्यांच्या विचारांचा येथें प्रपंच केला नाहीं. समाजाकडे साधुसंतांची दृष्टि नव्हती असें एकांगी मत अलीकडे निघालें आहे त्याचा निरास येथें सहजच होतो. गुरु, महाराज व बोवा यांना पंचविषय खाईंत पाडून कसें अधोगतीला नेतात हे इशाऱ्यादाखल नाथांनीं 'चिरंजीवपदांत' फार बहारीनें सांगितलें आहे. शेवटीं प्रसंगानुसार स्त्रियांना उपदेश करावा कीं नाहीं व कोणी करावा हें नाथ व रामीरामदास यांच्या अभिप्रायांसह खुलासेवार सांगितलें आहे.

---

## २ वर्णधर्मी आणि वर्णबाह्य.

( १ ) नाथांचे समकालीन नाशीककडचे संतकवि **त्र्यंबकराय** यांनीं आपल्या 'बालबोध' ग्रंथांत ( रचनाकाल शक १४९४–१५०२) त्यावेळीं भरतखंडांत चार पंथ झाले होते म्हणून सांगितलें आहे. हिंदुस्थान हा वेदधर्मीय हिंदूंचा देश, पण त्यांत यवनांचें राज्य झाल्यामुळें त्याचे एकपणाचा बिघाड होऊन एकाचे चार प्रकार झाले! एक मोठा संघ वेदधर्मीयांचा. वर्णाचार पाळणाऱ्या, वेदधर्माला मानणाऱ्या व वेदविहित कर्मानें चालणाऱ्यांचा '**वर्णपंथ**'. त्र्यंबकराज म्हणतात कीं 'कास्मिरापासुन कावरु। मध्यें पाहाटु हीमांधरु। तेथुनु गंगासागरु। जगन्नाथु ॥ त्यापासुनु श्वेतबंधु। तेथुनु हरिग्रामु प्रसिध्दु। द्वारकेपासुनि सिंधु–। संगमवरी ॥ सिंधु–संगमापासुनु। पुन्हा काश्मीरभुवनु' हा सारा अफाट हिंदुस्थानदेश वर्णाचार मानणाऱ्या वेदधर्मीयांचा देश. काश्मीरापासून कावेरी नदीपर्यंत, मध्यें हिमाचल, तेथून गंगासागराला मिळेतोपर्यंत म्ह० जगन्नाथपुरीपर्यंतचा प्रदेश, तेथून श्वेतबंध रामेश्वरापर्यंतचा पूर्वकिनाऱ्यालगतचा सर्व भाग, रामेश्वरापासून हरिग्राम जी द्वारका तेथपर्यंतचा पश्चिमभाग व द्वारकेपासून तो सिंधु पश्चिमसमुद्राला मिळते तेथपर्यंतचा

भूभाग व तेथून पुन्हा काश्मीरभुवन—तात्पर्य दक्षिणोत्तर व पूर्वपश्चिम सारा हिंदुस्थानदेश ही 'सृष्टींतली कर्मभूमि' होय. ही 'योजनें सार्ध सोळा शतें' आहे, मध्यरेखेवर साडे पांचशें गांवें आहेत. ह्या हिंदुस्थानदेशांत—'यामध्यें चौवर्णाचें आचरण। हा वर्णपंथु कर्मभुवन। वेदशास्त्रपुराण याचिमध्यें'—आतां दुसरा यवनांचा '**भेदपंथ.**' 'पश्चिमाब्धि वायव्यदेशीं। वेदकर्म निंद्य यासी। हा भेदुपंथु-भेदासी। आधार भक्ति॥ ये पंथीं सर्वा येकंकारु। ध्याति येकुचि ईश्वरु। ऐसा वर्णरहितु। साचारु भेदपंथु' हा पंथ वेद व वर्णाचार यांस मानीत नाहीं. एकंकार करणारा, एकच ईश्वर मानणारा, असा हा वर्णरहित पंथ आहे. 'वर्णाचारापरीस। यवनाचार बहुवस' म्ह० वर्णाचार पाळणारांपेक्षां आजकाल यवनाचारांचा बडेजाव जास्त झाला आहे असें त्र्यंबकराय म्हणतात! तिसरा **निर्वाणपंथ** व चौथा **अभेदपंथ.** निर्वाणपंथांत पश्चाचार अधिक असून चौथ्या अभेदपंथांत अनाचार फार बोकाळले आहेत! निर्वाणपंथ म्ह० बहुधा बौध्दादि पाखांडमतवादीयांचा व अनाचारपंथ शाक्तादिकांचा असावा! ह्या चारी पंथांत 'सत्यर्थ व समर्थ' असा पंथ म्हणजे 'जेथें वेदशास्त्रांचा जिव्हाळा' आहे तो '**देवपंथ**' होय. पुढें समर्थांनीं मंदिरें व देवमूर्ति यांचा उच्छेद करणारांना 'देवद्रोही' व वर्णाश्रमाप्रमाणें चालणाऱ्यांना 'देवदास' म्हटलें आहे. त्र्यंबकराय, समर्थ इ० संत आपला देवपंथ आहे असें मानीत हें उघड आहे.

---

## ३ कर्मभ्रष्ट ब्राह्मण व ब्राह्मणांचा तेजोभंग

वर्णाश्रमधर्म व विशेषतः ब्राह्मण स्त्रीपुरुषांचे आचार स्पष्टपणें सांगणाऱ्या '**गुरुचरित्र**' ग्रंथांत (श. १४८०) म्हटलें आहे कीं 'वर्णानां ब्राह्मणो गुरुः' अशी ज्यांची ख्याती व 'ब्राह्मणो मम दैवतम्' असे ज्यांविषयीं स्वतः भगवान् अभिमानानें सांगतात ते ब्राह्मण वेदविक्रय

करितात, यवनांनाही वेदमंत्र ऐकवतात व आपलीं षट्कर्मे सोडून अज्ञानांच्याच मार्गानें जातात हा कलिमहिमा आहे! राजसत्तेच्या प्रभावामुळें आपल्या लोकपूज्य स्थानापासून ते घरंगळले आहेत. **गुरुचरित्रकार** म्हणतातः—

**या भरतखंडांत । पूर्वीं होतें पुण्य बहुत ।**
**वर्णाश्रमधर्म आचरत । होते लोक परियेसा ॥ २२१ ॥**
**या कलियुगाभीतरीं । कर्म सांडिलें द्विजवरीं ।**
**लोपले वेद निर्धारीं । गुप्त जाहलें क्षितीसी ॥ २२२ ॥**
**कर्मभ्रष्ट झाले द्विज । म्लेंच्छां सांगती वेदबीज ।**
**सत्व गेलें सहज । मंदमती जाले ब्राह्मण ॥ २२३ ॥**
**पूर्वीं होतें महत्व । ब्राह्मणांसी देवत्व ।**
**वेदबळें नित्यत्व । भूसुर म्हणती त्या काजा ॥ २२४ ॥**

पूर्वी ब्राह्मणांना राजेमहाराजेही पूज्य मानीत होते, पण आतां तेच ब्राह्मण 'वेदमार्ग त्यजोनि सुरसी । अज्ञानमार्गे राहटती.' ते हीनयार्तीपुढें पोटासाठीं वेद ह्मणूं लागले आहेत. 'आपुली आपण स्तुति करिती । जयपत्रें दाखविती!' ब्राह्मण तपोनुष्ठान करायचें सोडून राजसत्तेचा आश्रय करूं लागले, वेदविद्या परधर्मीय यवनांस सांगूं लागले व वादविवादांत सांपडून अहंकारारूढ बनून अजिंक्यपत्रें घेत चालले म्हणजे कसे अधःपाताला जातात याचें उदाहरण येथेंच गुरुचरित्रकारांनीं दिलें आहे. 'विदुरा' नामक नगरींत एक 'यवन राजा' राज्य करीत होता. तो 'महाक्रूर ब्रह्मद्वेषी । सदा करी जीवहिंसी । चर्चा करवी ब्राह्मणांसी । वेद म्हणवी आपणापुढें.' धनलाभ व मानसन्मान यांची लालूच त्या राजानें दाखवितांच दोन विप्र त्याला खूष करण्यास पुढें आले! 'आम्ही पशुहत्या करितों म्हणून तुम्ही आम्हांस दोष देतां मग तुम्ही यज्ञांत पशु कां मारितां' असा त्या म्लेंच्छ राजाचा आडवणुकीचा प्रश्न होता. हे दोन विप्र त्या राजास अनुकूल झाले व राजा पाठीशीं आहे या कल्पनेवर मदोन्मत्त होऊन ते जेथें तेथें वेदमार्गी

ब्राह्मणांस उघड आव्हान देऊन सभेंत चर्चा करून अजिंक्यपत्रें मागत सुटले ! राजसत्तेचा पाठिंबा आहे अशा बळावर ते मदांध विप्र स्वजातीयांचा धिक्कार करीत ‘ हारीपत्र ’ मागत गांवोगांव हिंडत चालले. खरे ब्राह्मण वादास उभे ठाकतना. शेवटीं महामुनी त्रिविक्रमभारती यांनीं त्यांस गाणगापुरीं श्रीनृसिंहसरस्वतींकडे नेले व त्या स्वानुभवभास्करापुढें हे काजवे हतप्रभ झाले. श्रीगुरूंनीं वेदविद्येचा आत्मोद्धारार्थ उपयोग करा, वादार्थ करूं नका, म्हणून सांगून पाहिलें; पण ते हट्टी ब्राह्मण ऐकेनात. तेव्हां त्यांनीं ‘ अभिमंत्रोनि विभूती ’ एका मातंगाकडून वेद म्हणविले त्यावेळीं त्यांचा नक्षा उतरला व ते शरण आले ! तो मातंगही ‘ तव दर्शनसुधारसीं । आपण झालों ज्ञानरासी । अभिमंत्रोनि आम्हांसी । विप्रांमध्यें मेळवावे ’ असा त्यांच्या मागे लागला तेव्हां जाति जन्मसिद्ध आहेत असें सांगून श्रीगुरूंनी त्याचें समाधान केलें ! तात्पर्य, कांहीं ब्राह्मण पाठीशी घालून ब्राह्मणजातीचा तेजोभंग करावा असा यवन राजानें केलेला मनसबा तपस्वी ( विद्वान् नव्हे ! ) ब्राह्मणालाच हाणून पाडावा लागावा. समाजांत फूट पाडण्यास, समाज फोडण्यास, म्लेंच्छ राजे नेहमींच उत्सुक असतात व कांहीं धनलोभी त्यांच्या कुटिल नीतीला वशही होतात ! तपस्वी पुण्यात्मा मात्र त्या दोघांनाही दाबूं शकतो. ( अ० २६ ते २८ )

---

## ४ कलियुगाचें प्राबल्य.

कलियुगांत धर्माची ग्लानि झाली असून अधर्माचें प्राबल्य झालें आहे; लोकांत अधर्म, अनीति, खोटेपणा, दंभ, दुराचार, अनाचार फार बोकाळले आहेत, अशा प्रकारचें वर्णन अनेक पुराणांत व बहुधा प्रत्येक संतकवीच्या ग्रंथांत केलेलें आपणांस आढळतें ! अशा स्थितींतच अनेक पंथ, पाखांडें, मतमतांतरांचें गलबले यांची भर पडून अडाणी लोकांना आडमार्गाला नेणारे अनेक दांभिक व लबाड लोकही आपा-

पली तुंबडी भरून घेण्यास पुढें सरसावतात. ही स्थिति थोड्याफार प्रमाणांत सर्वकाळीं सर्व समाजांत आढळून येते. लबाड व दांभिक लोकांचें जेव्हां प्रस्थ माजतें तेव्हां सत्यनिष्ठ व धार्मिक लोक नसतात असें नाहीं किंवा धर्मजागृतीच्या काळीं अधार्मिक लोक नसतात असें नाहीं. सृष्टिरचनेचा सारा खेळ त्रिगुणात्मक आहे. (सृष्टि झाली तेव्हांच सत्व, रज व तम हे तीन गुण उत्पन्न झाले. ह्या तीन गुणांच्या मिश्रणानें दैवी व असुरी प्रवृत्तींचे लोक नेहमींच जन्मत असतात. मनुष्यस्वभाव हा त्रिगुणांचा कर्दम आहे.) सृष्टींतच सत्य व असत्य यांचें मिश्रण आहे. दिवस आणि रात्र, शुक्लपक्ष व कृष्णपक्ष, राजहंस व बगळा, गाय व गाढव, कोकिळा व कावळा, आंबा व कारलें त्याचप्रमाणें मनुष्यसमाजांत सज्जन व दुर्जन, भाविक व टवाळ, साव व चोर, खरें व खोटें हें सारें द्वैविध्य अनादि चालत आलें आहे! राम–रावण, कृष्ण–कंस, तुकाराम–मंबाजी इत्यादि जोड्या हेंच दाखवीत असतात. भल्याबुऱ्यांचा मिळून मनुष्यसमाज आहे, व सर्वदा असाच असतो. समाज केव्हांच स्थिर नसतो, तो आंदोलनशील असतो. एकदा इकडे तर एकदा तिकडे असा तो झोके खात असतो. रामकालींच रावण ( रजोगुण ), कुंभकर्ण ( तमोगुण ) बिभीषण ( सत्वगुण ) व राम ( गुणातीत ) असे प्रकार होते. रामराज्याभिषेकानंतर कांहीं काल रामराज्य झालें तरी पुन्हा रजतमांचें प्राबल्य होऊन शिशुपालकंसादि निर्माण झाले म्हणून कृष्णावतार झाला! रामराज्यानंतर समाज तसाच सत्वस्थ राहिला असता तर कृष्णावताराचें प्रयोजनच उरलें नसतें! हें जाणूनच गीतेनें 'यदायदाहि धर्मस्य' व 'परित्राणाय साधूनां' हें सांगून ठेवलें आहे. सृष्टीचा ओघ खालीं जायचा आहे, इंद्रियें बहिर्मुख केलीं आहेत, विषयप्रवृत्ति ही नैसर्गिक आहे, तथापि लोककल्याणार्थ मधून मधून अवतारी पुरुष, संतमहंत, योगी, ज्ञानी, व सत्कवि हे उत्पन्न होतात व यावच्छक्य समाजस्थैर्य सांभाळायचा उद्योग करि-

तात. नाथांच्या वेळीं पूर्वापार चाललेल्या या लोकस्थितीला परधर्मी परकीय लोकांच्या साम्राज्यसत्तेमुळें अधिकच अनिष्ट वळण लागलें होतें व त्यामुळें धर्माची ग्लानि होऊन दंभ, असत्य, दुराचार फार प्रमाणावर वाढले होते.

---

## ५ सोंगेंढोंगें व बुवाबाजी !

ढोंगेंसोंगें सर्व लोकांत व सर्व जातींत माजलीं व नाथांनीं 'जोहारांत' व 'अभंगांत' तीं दाखविलीं आहेत. 'चारी युगांमाजी कलियुग हें उत्तम' आहे. यांत हरिभजन व नामस्मरण करून असावें म्हणजे जडजीवही तरतात. 'द्वारी असावें तुळशीवृंदावन। करावें अतिर्थाचें पूजन। संतांसी रिघावें शरण। हें लक्षण भक्तांचें कीं जी मायबाप !' **ब्राह्मण** स्नान-संध्या वेदपठण करून स्वधर्मानें राहील तर नाहीं कां होणार? पण अशौच कर्म जारणमारण यांत तो गुंग ! 'परस्त्रीनें चित्त गोंविलें' आणि वर ब्राह्मणपणाचा अभिमान ! परद्रव्य व परान्न यांकडे लक्ष ठेवणारे **संन्यासी !** कामादि सहा वैरी चित्तांत तसेच ठेवून हे शरीर-विडंबन मात्र करितात; 'सहांचा करावा न्यास। तया म्हणिजे संन्यास.' **जोगी** ह्म० अंगाला राख लावून भटकणारे, खरोखर 'ते भोगी ना त्यागी ना योगी !' शिवोपासना करायचें सोडून **जंगम** 'पोटासाठीं भिक्षा मागती। शंख वाजविती भं भं भं भं !' **फकीर** 'अल्ला अल्ला म्हणतां जन्म गेला' तरी नसते दोष काढीत 'हाय दोष हाय दोष' म्हणतच फिरतात ! अंतरी शुद्ध भाव न ठेवतां 'महानुभाव' कसा होतो? **मानभावांत** 'गुरु शिष्य म्हणती। झोळीस झोळी लाविती। गडबड-गुंडा झाला म्हणती। नसोनि काळेपणा अंगा लाविती। कृष्ण कृष्ण म्हणती !' **कीर्तनकारां**कडे पहावें तों ते विद्वान्-'लोकां अर्थ दाविती। भाळेभोळे भोंदिती। आपण वर्म नेणती। कीर्तनाचें' 'परद्रव्य पर-

नारींसी । स्पर्श न करावा निश्चयेसी ' असा लोकांना उपदेश करून आपण तेंच करीत असतात ! अडाणी लोक 'निंब नारळ उद सामान। मेंढरें कोंबडें मारिती जाण । वेताळ महिषासुर पूजन । नग्न होऊनि करिती कीं ! ' **वैष्णव** पंथांत शिरल्यावरही कांहीं आघात आले कीं ' कुळधर्म सांडिले वडिलांचे । म्हणून दुःख पावलों ' असें वांटून पुन्हां ' भंडार लाविती । भरितरोडगे करिती । येळ कोट येळ कोट म्हणती. ' चतुर्मास नित्यनेमानें कीर्तन ऐकून व ' गीता ज्ञानेश्वरी मनन ' करूनही अश्विन मासाचें नवरात्र आलें कीं हे शक्तिपूजनाच्या मागें ! ह्या लोकांना एकनिष्ठ भाव म्हणजे काय तें ठाऊक नाहीं. संसारांत शुभाशुभ प्रसंग आले तरी ते प्रारब्धभोग म्हणून भोगावे व निष्ठेचा भाव ठेवावा म्हणजे परमात्मा कृपा करितो. सोंगाढोंगाच्या मागें लागू नका, एकनिष्ठेनें परमेश्वरास भजा. भूतपति जो परमात्मा—जो सृष्टीचा एकच एक सूत्रधार आहे त्याला भजायचें सोडून भूतांच्या मागें लागूं नका ! ' वीर झोटिंग नरसिंग वेडा । वेताळाचा पूजिती खोडा । शेंदूर माखोनियां धोंडा। शेळी बोकड जीव बळी देती ! ' मेंढरें बोकड मारून परत ते आपणच खातात ! ' मेल्या मनुष्यांसी पूजिती । खोड सुपल्या पाळणे बांधिती । गळ टोंचून बगाडे घेती. ' नारळ फोडून खोबरें एक-मेकांस वाटती व ' नुस्ती नरोटी देवापुढें ठेविती ! ' **देवऋषी** आणून त्याजकडून चुलींतला अंगारा लावतात व निंब नारळ उतारा करितात. खापराचें भदाडें त्यावर पांढरा चुना लावून दिवस मावळल्यावर तिकट-ण्यावर ठेवतात ! किती प्रकार सांगावे ?

' वृश्चिकाअंगी विष थोडें । ऐसा वादालागीं चढे ' असेच **विद्वान्** फार ! पंडितांनीं पंडितांची हेळणा करावी हें काय विद्येचें फळ ! आत्म-ज्ञान शब्दांनीं जरा कळलें कीं ' भलत्यासवें वाद ' करावा. ' स्नान-संध्या शौचाचार । स्वधर्म नावडे साचार ' आणि विभूति, माळा, अग्नि-होत्र देवतार्चनांचा बाजार ! दशग्रंथ पठण केले तरी वेदविधिप्रमाणें

आचार पाहिजे. सर्व ब्रह्म तोंडानें म्हणायचें, मग वादाला जागा कोठें राहिली ? ' **न करा सुरापान । कन्या गो-विक्रय जाण** ' ही वेदाची आज्ञा. पराची निंदा करूं नये, परापवाद न करावा, हें वेदाचें सांगणें. प्रबोधशक्तीनें सिद्धी वश केल्या तरी संतांना शरण जाऊन नामाचें वर्म ओळखण्यास चुकला तर तो आंधळाच नव्हे तर काय ? **पुराणिक** पाहिले तरी ' हिंडे दारोदारीं म्हणवी पुराणिक । पोटासाठीं देख सोंग करी ' अशाच वर्गातले फार. वेदशास्त्रपुराणें पहायला नको, खोल अभ्यास करायला नको, स्वतः उपासना नाहीं, नामाची आवड नाहीं, आचाराला ठाव नाहीं, तोंडांत अमंगळ शब्द, बाजारीं बसून ज्ञान-गोष्टी ! अशांच्या उपदेशाचा लोकांवर काय परिणाम व्हायचा आहे ? ' एकाजनार्दनीं अनुभवावांचुनी । कोरडी ती कहाणी शब्दज्ञान. ' **योग**साधनांतले कित्येक लोक फजीत पावतात. कारण ' योगाचा योग एकाभावें पांडुरंगाचें भजन हें होय ! ' हें वर्म त्यांस ठाऊक नाहीं. **यात्रेचें वेड**-' तीर्थी जाती उदंड । त्याचें पाठीमागें तोंड '-लक्ष सारें घरीं ! वासना घरीं आणि तिकडे गंगेंत बुडया ! ' ' नमस्कार करितां देवासीं । मन पायपोसापासीं ! ' मनाचीं पापें धुतलीं नाहींत तर तीर्थ-स्नानाचा उपयोग काय ? शांति, क्षमा, दया हे गुण अंगीं आणले नाहींत तर तीर्थक्षेत्रांच्या फेऱ्या करण्यांत लाभ नाहीं. ' आम्ही **मुक्त** म्हणती विचरती मही ' पण मनाला अटक नाहीं, भूतद्रोह सुटला नाहीं, तर तो मुक्तपणा कसचा ? ' कासया जाशी वनांतरीं । कामक्रोध भरले अंतरीं ' संकल्पाचा त्याग हा खरा **संन्यास**. ' तो न करितां, षड्रिपूंचा नाश न करितां, नुसतें मुंडण म्हणजे कायाविडंबन होय ! ' नारायण ' करी पोटासाठीं ! पंचाग्निसाधन व धूम्रपान यांनीं काय देव जोडतो ? ' जीवाचें जीवन जनींजनार्दन । नांदतो संपूर्ण सर्व देहीं ' हें विसरून बापुडीं सोंगा-ढोंगांत कां शिरतात कोण जाणे ! मठ पर्णकुटी, आश्रम बांधून राहणारे **विरक्त** यांना बहुधा मी एक विरक्त व जग अपवित्र असाच गर्व असतो.

' चित्त—वित्तावरी । भक्ति लोकाचारी । देव अभ्यंतरीं । केवीं भेटे ? ॥ ' अंतरशुद्धि हा मुख्य परमार्थ आहे. ' मुखीं वसे ब्रह्मज्ञान । चित्तीं चिंती धनमान ॥ स्त्रीसंगीं सदा सक्त । वदनीं गोष्टी परमार्थ ' असाच प्रकार **परमार्थी** म्हणविणाऱ्यांत फार करून दिसतो. त्यापेक्षा ' गृहस्थचि बरा ! ' भोळ्या भाविकांना भोंदून ' आम्हां गुरु करा ' म्हणून मागे लागणारे **गोसावी** व **भोंदु गुरु** कितीतरी दिसतात ! शिष्यांचा मेळा, भांगेचा घोटाळा, ' अंगासी राख ढुंगासी लंगोटी ! ' देहाच्या सेवेसाठीं शिष्यांस राबविणें, ब्रह्मविद्येचा पसारा, लोभ अनाचार—असे गुरु घरोघरीं आहेत. हीच ढोंगें मानभाव, फकीर, पोटासाठीं झालेले संत, फडकरी, पुजारी, कथेकरी वगैरे अनेक प्रकारच्या लोकांत फार बोकाळलीं आहेत. कीर्तन किती पवित्र व उपकारक, ' पण द्रव्याचिये आशे । कथा करणें सायासें. ' ' द्रव्य घेवोनीयां कथा जे करिती । उभयता जाती नरकामध्यें. ' विषयलोभासाठी बकापरी ध्यान, परस्त्री देखोन विव्हळ, द्रव्य जोडे तें ध्यान !

**' एका जनार्दनीं नैराश्य भजन । ते प्राणी उत्तम कलियुगीं ! '**

कलियुगांत अनेक दैवतें व ' नारळ आणि शेंदूर यांचा भडिमार ! ' लटिकादेव व लटिकेभक्त सारेच लटके ! ' तेलरांधा मागती मलिदा वरती काजळ कुंकू, ' असे देवही फजीतखोर झाले आहेत ! जवळी हृदयीं देव असतां ' देव तोडला, मोडला, फुटला ' असे म्हणण्याची या लोकांना लाज कशी वाटत नाहीं ! ' बळेंचि मेंढरें बोकड मारिती । सुकी रोटी तया म्हणती ॥ बळेंचि आणताती अंगा । नाचताती शिमगा सोंगा. ' पशूंच्या दावणी मारून सुरापाणी देतात ! अविचारी भगत देवाकारणें पशुघात करितात. ' जीत जीवां करूनि वध । देवा दाविती नैवेद्य ! ' सदा अमंगळ नैवेद्य खाणारी मेसाबाई इ० क्षुद्र देवता कोणीकडे व आमची दीनांची आई विठाबाई कोणीकडे ! पंढरीचा देव सोज्जळ दीनवत्सल आहे. त्याला भजा व उद्धरून जा. देवाला नवस करून पुत्र मागतात पण अनुभव असा येतो कीं ' कुळीं झाला बाळ

बुडवणा ! ’ मूढ लोक भूतांची पूजा करितात व भूतपति परमात्मा-त्याला ओळखीत नाहींत. ‘ घेती मांसाचें अवदान। देवपण तेथें कैचें ?’ अंतरींबाहेरी सर्वत्र खरा देव भरला असतांना ‘ संपुष्टाभीतरीं म्हणती देव.’ देव स्वतःसिद्ध आहे, घडण्यामोडण्यांतला नाहीं, पण काय करावें ? ‘ भजन चाललें उफराटें । कवण जाणे खरें खोटें ! ’ ‘ सर्वात्मक भरला देवो । तेथें न ठेविती भावो ।। सर्वाठायीं व्यापक हरी । कोण द्वेषी कोण वैरी ? ’ खरोखर पाहतां ‘ जिकडे पाहे तिकडे देव ’ आहे, ‘ जळीं स्थळीं पाषाणीं भरला । रिता ठाव कोठें उरला ? ’ पण यथार्थ देव जाणून त्याला भजलें पाहिजे ना ? असो. जन अज्ञान, त्यास काय म्हणावें ! पण लोकांच्या उद्धाराचा बाणा बाळगणारे व साधु म्हणविणारे, बोवा, महाराज इ० पदव्यांनीं स्वतःला विभूषित करणार तरी धड पाहिजेत ना ? पण संतांचा वेष घेणारे भोंदू जिकडे तिकडे बोकाळले आहेत !:—

**टिळा टोपी घालुनि माळा म्हणती आम्ही संत ।**
**परस्त्री देखोनीयां चंचळ झालें चित्त ॥**
**जगालागीं ज्ञान सांगती म्हणती आम्ही साधू ।**
**पोटीं दया धर्म नाहीं ते जाणावे भोंदू ॥**

अशा भोंदू साधूंचा व लबाड गुरूंचा सर्वत्र सुकाळ झाला आहे !

---

## ६ अभाविक म्ह० नास्तिक व तर्कटी.

समाजस्वास्थ्याला कोणापासून अतिशय धोका असेल तर तो नास्तिकांपासून होय, म्हणून नास्तिक हा अत्यंत भयंकर माणूस समजावा असा इषारा शें दीडशें वर्षांपूर्वी फ्रान्सदेशांत जी प्रचंड क्रान्ति झाली त्यावेळीं एडमंड बर्क ह्या तत्त्ववेत्त्यानें पाश्चात्त्य राष्ट्रांस दिला होता ! त्याकडे कोणी लक्ष दिलें नाहीं व तीं राष्ट्रें अनवस्थेच्या खोल गर्तांत जाऊन पडलीं आहेत. आपणांस त्यांचा येथें विचार करावयाचा नाहीं.

नास्तिकपणा मनुष्यांत किंवा राष्ट्रांत बोकाळला कीं व्यक्तीचा व राष्ट्राचा गाडा खिळखिळा होऊन जातो असा इतिहासाचा अनुभव आहे. अभाविकपणा, तर्कटीपणा, अविश्वास, श्रद्धेचा अभाव, परंपरेविषयीं अनादर किंवा तिरस्कार इत्यादि दुर्गुण तेव्हां आतांप्रमाणेंच वाढले होते. नाथांनीं अभाविकाला ' टवाळ ' म्हटलें आहे. ' **भाविक** ' विरुद्ध ' **टवाळ** ' ! ते म्हणतात ' भाविका देव आहे जवळ । टवाळा निराळा भास भासे. ' अभाविकांना भाव, भावना, भक्ति, प्रेम यांची ओळख नसते. त्यांत जे विशेष बुद्धिवान् व विद्वान् असतात ते तर्कटी बनतात व स्वतःच्या बुद्धीचें व मताचें वाजवीहून अधिक बंड माजवितात ! मनुष्यप्राण्याला ईश्वरानें बुद्धि दिली आहे तिचा त्यानें उपयोग करावाच, पण त्यानें हृदयही दिलें आहे; बुद्धिविकासाप्रमाणें हृदयवृत्तींच्या किंवा भावनांच्या विकासाकडेही त्यानें लक्ष पुरविलें पाहिजे. काम, राग, द्वेष, मत्सर, इ० असद्भावनांचें निर्मूलन करून भक्तिप्रेम, परोपकार, निष्काम सेवा इ० सद्भावनांचा विकास करण्यांत व्यक्तीचें व राष्ट्राचें कल्याण असतें. असद्भ ... लोकांत कशा बळावल्या होत्या याचें नाथांनीं केलेलें वर्णन आपण पाहिलच आहे. त्यांचीं कांटेरी झुडपें उपटून टाकून त्याच भूमीवर नाथतुकोबांसारखे सत्पुरुष भावनेचीं नंदनवनें उभारीत असतात. संतांचीं चरित्रें व ग्रंथ सद्भावाच्या संगोपनाला साह्यभूत होतात. दांभिक, लबाड, स्वार्थांध, पातकी लोकांप्रमाणेंच अभाविकांचाही संतांनीं समाचार घेतला आहे. गीतेनें आसुरी दोषांत ' दंभो दर्पोभिमानश्च क्रोधः पारुष्यमेवच ' यांची प्रामुख्यानें गणना केली असून ' संशयात्मा विनश्यति ' ' श्रद्धावान् लभते ज्ञानम् ' ' भक्तिमान् यः स मे प्रियः ' इत्यादि सूत्रेंही सांगितलीं आहेत. अभाविक हा देव मानीत नाहीं, शास्त्र मानीत नाहीं, वडिलांचे सदाचार पाळीत नाहींत, देवधर्मगोब्राह्मणांविषयीं कुतर्क लढवीत असतो. त्याचो स्वतःवरही श्रद्धा नसते ! ' वेदा म्हणे तो अप्रमाण ' व

" ब्रह्मज्ञान तुच्छ मानी. ' प्रेमोल्हासानें भजन करणारांना तो ' वेडा खुळा ' समजतो व साधुसंतांना ' भ्रमिष्ट ' मानतो ! त्याला ' अनुतापवैराग्य हे भ्रम ' वाटतात. कोठेंच भाव नाहीं यामुळें त्याला ' संसार ना देव ' दोन्हीं नाहींत. ' न मानी स्वयातीचा आचार । सदा करी अनाचार. ' त्याला विधिनिषेधपापपुण्य याची तमा नसते. तो स्वतःच्या तर्काला व अनुमानाला मात्र सिद्धांतवत् मानतो. बिनबुडाचा हा संशयात्मा चेंडूसारखा तर्कवितर्कांत सदा लोळत असतो. ' पुराणश्रवणीं मानी कंटाळा । नट नाट्य खेळां पाहों जाय ' त्याला एकादशी सोमवार कांहीं नसते, ( शनवार बुधवारचीं नाटकें सेनेमा मात्र सोडीत नाहीं ! ) भाव, श्रद्धा भक्ति, प्रेम, निष्ठा यांमुळें अंतरात्म्याला जें सुख प्राप्त होतें तें मात्र या तार्किकाच्या कपाळीं नसतें. त्याचा प्रपंच उदास, परमार्थ कोरडा व व्यवहार रुक्ष होतो ! त्यानें तत्त्वज्ञानाचे मोठमोठे ग्रंथ वाचले तरी पालथ्या घागरीवर पाणी या न्यायानें त्याच्या हृदयांत ज्ञानामृत उतरतच नाहीं ! अभाविकाचें संदेह, कुतर्क, संशय, दोषदृष्टि, अभिमान, द्वेषमत्सरादि भेदभाव यांच्या भोंवऱ्यांतून सदा भ्रमणें चुकत नाहीं. भाविक भक्तिप्रेमानंद लुटीत असतात आणि तार्किक सदा सुतक्यासारखे दूर ! त्याचें गाणें म्हणजे मोलाचें रडणें ! गज आणि गाढव, चंदन आणि वेळू, कापूर आणि माती असें अंतर ( नाथ म्हणतात. ) **भाविक** आणि **अभाविक** यांच्यांत असतें ! ' कथा कीर्तन नेणे । सदा बोलणें वाचाळ. ' तो आपण बुडतोच पण संगतीच्या लोकांनाही बुडवितो. अभाविक ' प्रत्यक्ष देव देहीं असोनि ' नाहीं म्हणतो आणि ' भाविक तया देहींच पाहती. ' ' पाहे तिकडे देव आहे । दिशा व्यापूनि भरला पाहे. ' अभाविक कधीं हरिकीर्तनाला जातच नाहीं आणि गेलाच तर तेथील व्यक्तींचे वा व्यवस्थेचें दोष तेवढे टिपून घेतो यामुळें तो थित्या भक्तिसुखाला अंतरतो. ' धारोष्ण परी ज्वरिताचें मुख ' असा अभाविक विद्वान् व बुद्धिमान् पण अभागी असतो !

**ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा । प्रेमें पितो घोटा घटघटां ॥ १ ॥**
**हातें मोऱ्या उपसी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कंटाळतो ॥ २ ॥**
**गाईस देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ ३ ॥**
**एका जनार्दनी ऐसे झाले प्राणी । जन्मोनीयां जनीं व्यर्थ गेले ॥ ४ ॥**

'घोटा पितो' याच्याऐवजीं 'चहाकॉफीपान' 'मोऱ्या उपसी' याचा अर्थ देवधर्माच्या व संतसज्जनांच्या टवाळ्यानिंदा, घोड्याच्या ऐवजीं मोटारीची चाकरी किंवा बूटपॉलिसचें काम—असें समजावें म्हणजे सध्याच्या भाषेंत अभंग नीट समजेल! जो वेदशास्त्र व सदाचाररूप धर्म मानीत नाहीं तो 'स्वहिता नाडला' असें पूर्ण समजावें. अभाविकाच्या अंगीं इतर कांहीं व्यवहारिक गुण असले तरी— 'कस्तुरी उत्तम परी शेजार हिंगाचा'—त्याच्यावर सद्बोध ठसत नाहीं.

---

## ७ आत्मानुभवावांचून सर्व विद्या व कला फोल आहेत.

आहार, निद्रा, भय, मैथुन यांत पशुपक्ष्यादि सर्व जंतु सर्वकाळ रमलेले आहेतच; मनुष्यदेहीं ज्ञान हा० आत्मज्ञान अधिक आहे तें न साधतां जो मरेल त्याचा जन्म कुत्र्यामांजऱ्यासारखाच व्यर्थ आहे हें म्हणणें देहाभिमानास्तव कोणास कठोर वाटलें तरी निःसंशय खरेंच आहे. 'परमार्थ साधूं भोगाअंतीं' म्हणजे शरीर थकलें, म्हातारपण आलें, (पेन्शन घेतलें) म्हणजे परमार्थाला लागूं असें कोणी म्हणेल तर नाथ विचारतात कीं देहाची निश्चिती कशाच्या आधारावर तूं मानून राहिला आहेस? मृत्यु हा गुणदोष, देशविदेश, वय, जात, गोत, पराक्रम, कांहीं विचारीत नाहीं. जन्मला तेव्हांच मृत्यूनें याला ग्रासलें आहे साप बेडुकातें गिळी। बेडुक माशातें कवळी। तैशीं मृत्यमुखीं पडलीं। विषयभुलीं झोंबती! येथें ज्यानें आळस केला तो नागवलाच. म्हणून—

**छेदोनियां आळसासी । दवडूनियां निद्रेसी ।**
**आत्मचिंतन अहर्निशीं । अविश्रमेसी साधावें ॥ ३४० ॥**

पण जिकडे पाहावें तिकडे जाणते नेणते, विद्वान् अविद्वान्, सारेच प्रपंचांत मस्त असून विषयासक्त झालेले दिसतात! पश्वादि योनींत विषयभोग आहेतच, त्यांतच मनुष्यें रत झालीं तर नरदेह प्राप्त होऊन काय हित साधलें? 'विषयांसी प्रारब्धें भेटी' होईल तेवढयांत समाधान पावून मनुष्यानें आपला प्रयत्न-पुरुषार्थ-परमार्थलाभासाठीं वेंचायला नको काय? अपरोक्षज्ञानावांचून सारी खटपट वांछ आहे. 'जेवीं मदिरापानीं मर्कट। उडे उद्भट तडतडा' तसीं माणसें केवळ उदरार्थ आयुष्य दवडीत आहेत! 'ब्रह्मज्ञानेवीण शास्त्रज्ञ। तें अंधारींचे खद्योत जाण!' शब्दपंडित म्हणजे अंधारांतले काजवे! त्यांचा प्रकाश अज्ञानांधकारांतच पडतो. मनीं विषयांचा अभिलाष धरून वेदादिकांचेंहीं अध्ययन करणारे विद्वान् म्हणजे 'वर्षाकाळींचे दुर्दर'च होत. विषयांसाठीं मौन ह्मणजे बकध्यान, व विषयबुद्धीचें गायन ह्मणजे खराचें भुंकणें होय! विषय पोटांत धरून केलेले उद्योग म्हणजे पिंडाला पाहून कावळ्यांनीं केलेला कलकलाट होय!

**पोट भरावया भांड। सैरा वाजविती तोंड।**
**तैसे विषयांलागीं वितंड। शास्त्र पाखांड बोलती॥ ३५५॥**
**हृदयीं धरुनि जीविका चांग। करिती अग्निहोत्र याग।**
**जेविं वेश्या विकोनि अंग। चालवी सांग संवसारा॥ ३५७॥**

सांगायचा मुद्दा हाच आहे कीं नरदेहीं येऊन चौथा मोक्षरूप पुरुषार्थ साधला तरच याचें सार्थक आहे. पंडित, संन्यासी, अग्निहोत्री वैदिक हे समाजाला पूज्य खरे, पण त्यांची घसरगुंडी झाली आहे! (नाथभागवत अ० ९ ओवी ३२५ ते ३७०)

वेदशास्त्रार्थ पढून पंडित झाला, चारी वेद वाचेंत सांठवले; 'संहिता, पद, क्रम स्वरयुक्त। अरण ब्राह्मण सूत्र, निरुक्त' हे सारे पठण केले; आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, उपवेद सर्व पाहिले; काव्य, नाटकें, व्याकरण, सांख्यशास्त्र, पातंजलयोग, तर्क झ. न्यायशास्त्र, यज्ञान्त कर्म-

मीमांसा यांचा अभ्यास केला; वेदान्तवाचस्पति होऊन वार्तिकान्त शास्त्र पाहिलें; ' शिल्पशास्त्रीं अतिनिपुण । सूपशास्त्रामाजी प्रवीण । रत्नपरीक्षा-लक्षण । जाणे आपण वाजिवाद ' ( अश्वशास्त्र ) हीं शास्त्रें अभ्यासिलीं; मंत्रशास्त्रांत निष्णात झाला; शैवी, वैष्णवी, सौर, शाक्त इ० दीक्षा जाणल्या; कोकशास्त्र, संगीतशास्त्र, निघंटु ( शब्दकोश, ) रसशास्त्र, ज्योतिष, इतिहासपुराणें इत्यादि सर्व कांहीं नीट अभ्यासिले; वक्तृत्व, कवित्व, प्रबंधलेखन किंवा चर्चावाद यांत चतुर झाला—

**जेवीं तळहातींचा आंवळा । तेवीं ब्रह्मज्ञान बोले प्रांजळा ।**
**परी अपरोक्षसाक्षात्कारीं आंधळा । नेणे जिव्हाळा तेथींचा ! ॥ ५२५ ॥**
**मोराअंगीं अतिडोळसें । अंगभरी भरलीं पिसें ।**
**एके दृष्टीवीण आंधळें जैसें । तैसें झालें विद्वांसा ! ॥ ५२६ ॥**

अनेक शास्त्रांचें अध्ययन केलें व ब्रह्मज्ञान सांगण्यांतही प्रवीण झाला तरी अनुभवावांचून, प्रत्ययावांचून, अंगीं प्रतीति आल्यावांचून, ह्या सगळ्या शब्दज्ञानाचा व चातुर्याचा कांहीं उपयोग नाहीं. मोराच्या पिसांवरील डोळे दिसतात सुंदर—पण त्याना दृष्टि नाहीं ! तसें आत्मदर्शना-वांचून विविधज्ञान फोल आहे ! हें ज्ञान लोकांला सांगायला किंवा प्रतिष्ठा मिरवायला ठीक असेल, पण त्याचा आत्मलाभाच्या दृष्टीनें कांहीं उपयोग नाहीं, व समाजोन्नतीलाही तें उपयोगी पडत नाहीं.

**सांगे आन करी आन । तेथें कैंचें ब्रह्मज्ञान ? ।**
**जेथें वसे धन मान । तेथें आत्मज्ञान असेना ॥ ५३३ ॥**

विद्या विकून द्रव्य मिळवावें, लोकांत प्रतिष्ठा मिरवावी, विषयभोग भोगायला सांपडावेत, अशी वासना पोटांत आहे तोंपर्यंत आत्मज्ञानाचा लाभ कधींही होणार नाहीं. गाईच्या स्तनापाशीं राहणारे गोचिड दूध सोडून रक्त पितात किंवा कमलपरागाला टाकून बेडूक चिखल खातात तशी शब्दपंडितांची गोष्ट आहे ! एकेका श्लोकाचे दहा दहा अर्थ सांगतां आले किंवा ब्रह्मज्ञानाच्या मोठमोठ्या गोष्टी लोकांना सांगून त्यांचें मन

रिझवतां आलें तरी जोंपर्यंत देहाभिमान पूर्ण नष्ट झाला नाहीं, विषयलालसा निमाली नाहीं, धनमानाची चाड संपूर्ण गेली नाहीं, तोंपर्यंत या ज्ञानाचा लोकांना व स्वतःला उपयोग नाहीं! ज्यानें स्वतः ब्रह्मानंद चाखला नाहीं तो त्याची गोडी दुसऱ्यांस कशी लावणार! निर्दैवाच्या हातीं सोनें पडलें तर त्याची माती होते तशी विषयलंपट, स्वार्थी पुरुषाची विद्या म्हणजे ती वास्तविक अविद्याच होय! ज्यानें इंद्रियें जिंकलीं नाहींत, ज्याचा स्वार्थ परमार्थपदवीला पोंचला नाहीं, त्याला ज्ञानाचा आनंद मिळायचा नाहीं, व त्याच्या ज्ञानाचा लोकांना कांहीं एक उपयोग नाहीं. 'वेदशास्त्रसंपन्न झाला। त्यावरी पोट भरूं लागला। तरी तो उदमी थोर झाला। थित्या मुकला मुदलासी!' (नाथभागवत अ० ११ ओंवी ५१० ते ५५५). नाथांच्या वेळच्या शास्त्रीपंडितांचें हें वर्णन आजकालच्या इंग्रजीपंडितांनाही अक्षरशः लागू पडतें! त्यावेळचे पैठणचे विद्वान् आजकालच्या पुणें-मुंबईच्या विद्वानापेक्षां कमी योग्यतेचे होते असें म्हणतां येणार नाहीं! नाथांसारखा पुरुष तेव्हां व आतांही दुर्मिळच होय.

---

## ८ ब्रह्मज्ञानाचें तें वर्म चुकलें रे!

'नोहे ब्रह्मज्ञान लेंकुरांचा खेळ'—ब्रह्मज्ञान हा कांहीं मुलांचा खेळ नाहीं, 'कोटिमाजीं एक ब्रह्मज्ञानी' माणसें कांहीं कांहीं साधनें करितात व त्या साधनालाच ब्रह्मज्ञान समजून त्यांतच गुरफटून राहतात, व खरें वर्म दूरच राहतें. हा गोंधळ साऱ्या जगभर चालला आहे. वैदिक व अवैदिक सारेच एका माळेचे मणि आहेत. बौद्धरूपासाठीं क्षपणक होतात, नग्न फिरतात, काळींनिळीं फडकीं घेतात, किताबा त्रिकाळ पढून पश्चिमेकडेस तोंड करून मोठ्यानें ओरडतात, पण 'तें वर्म चुकलें रे तें वर्म चुकलें रे!' आमचे वैदिक लोकही वर्म चुकून गौणालाच मुख्य मानतात व म्हणून 'आत्मज्ञानेवीण न सुटे बंधन। तोंवरी नाहीं निजमुक्ति' हें पुरें समजत नाहींत! वर्म ओळखून कोणीही आपल्या धर्म-

पंथानें चालेल तर तो धन्यच आहे, पण असे कृतार्थ पुरुष वैदिक धर्मांत काय किंवा अन्यपंथीयांत काय विरळच असतात! "वायां शिणती साधकजन। साधन तितुकें ज्ञानघन। साध्य साधन मानितां भिन्न। निजात्मपूर्ण नव्हती॥ साधनीं साधूं आत्मयासी। ऐसें म्हणती परम पिसीं। आत्मा प्रकाशी साधनांसी। तो केविं त्यांसी आकळे?" ह्या दोन ओव्यांत नाथांनीं फार मोठा व अत्यंत महत्वाचा सिद्धांत सांगितला आहे. परमात्मवस्तु स्वतःसिद्ध आहे, ती साधनांनीं प्राप्त होणारी नाहीं, आत्मा साधनांचा प्रकाशक आहे—प्रकाश्य नव्हे—किंबहुना साध्य-साधनातीत स्वयमेव स्वप्रभ आहे, साध्यसाधनांना आपल्या पोटांत घेणारा आहे,—म्हणून साध्यसाधनांत भेद न मानतां आपल्या आत्म-ज्ञानाच्या बैठकीवरून कोणीही आपल्या धर्ममताप्रमाणें किंवा आचार-धर्माप्रमाणें वागावें असा वरील वचनांचा भावार्थ आहे. बौद्ध, जैन, मुसलमान, हिंदु कोणीही असो—त्यानें आत्मा एकच आहे व तोच खरा देवाधिदेव आहे हें 'पूर्णपणें' जाणून घ्यावें, आपापल्या पंथाचा किंवा आचारधर्माचा दुरभिमान सोडून पुन्हा आपापल्या मताप्रमाणें किंवा आचारधर्माप्रमाणें चालावें व साधनसाध्या( आत्मवस्तु )हून भिन्न नाहीं इतक्या निष्ठेनें व आत्मप्रेमानें आपापल्या साधनाचें अनुष्ठान करावें असें नाथांचें वरील वचनांत सांगणें आहे व तें कोणत्याही पंथांतील विवेकी मनुष्यास पटलें पाहिजे इतकें सरळ व स्पष्ट आहे. आत्मरूपाशीं तन्मय होऊन आपापलीं धर्मकर्में करावींत. वेदाचा परम सिद्धांतः—

**वेद वदे ब्रह्म एक। स्वानुभवें तैसेंचि देख॥**
**वेद वदे सर्वांठायीं। एकावांचुनि दुजें नाहीं॥**

हाच आहे, पण देहबुद्धीच्या अभिमानानें व अविचारानें हें वर्म विसरून वैदिकलोक वेदांतील कर्मकांडालाच मुख्य समजतात. नाथ विचारतात कीं, 'वेदवचनें सुतक पावे' मग काय 'ब्रह्म म्हणतां ब्रह्म नव्हे?' वेदानें सुतक पाळा (उदाहरणार्थ) इ० कर्माचाराच्या गोष्टी सांगितल्या त्या मात्र

मानायच्या आणि विश्व ब्रह्मरूप आहे हें सांगितलेलें मात्र मानायचें नाहीं किंवा तूं प्रत्यक्ष ब्रम्ह आहेस ह्या वेदवचनानें आपल्या ब्रम्हरूपतेचा प्रत्यय न घेतां देहाभिमानानें कुंथत बसायचें हें काय योग्य आहे ? वेदपठणाचें काय हेंच फळ ? ' मी ब्रम्ह आहे ' ह्या उंचीवर जाऊन मुक्त व्हायला वेद सांगतात ! वेद मुख्यत्वेंकरून ' एकावांचुनि दुजें नाहीं ' व त्या एकाशी तूं समरस होऊन आपली मुक्तता भोग असें सांगतात, हें प्रथम नीट समजून व उमजून घे आणि मग खुशाल आपल्या वर्णाश्रम-धर्माचें आचरण करीत रहा, स्वैर वागूं नकोस, अशी वेदाची शिकवण आहे. हें वर्म चुकून लोक साधनांतच गुरफटून राहतात व ' थितें आत्म-सुख ' गमावतात याचें नाथांना नवल वाटलें ! जटा वाढविल्या, रुद्राक्ष-भस्म किंवा माळामुद्रा यांचा थाट माजविला, वेदपठण किंवा शास्त्राध्य-यन केलें, पुराणें ऐकलीं व सांगितलीं, तीर्थाटणें किंवा यज्ञयाग केले, गुरुमंत्रतंत्र जाणलें, हें सर्व कांहीं केलें पण ' आत्मज्ञानेवीण न तुटे बंधन ' हें उमगलें नाहीं तर हे सारे कष्ट व्यर्थच नाहींत काय ? जप-तपादि निष्ठापूर्वक नित्यनेमानें केलें तरी आत्मज्ञानावांचून सर्व फोल होय ! एकवीस सहस्र सहाशें वेळां ' अजपाजप ' केला ' पण हें सारेंचि मारुत– ' हा सारा वायूचा खेळ आहे–हें आत्मज्ञान नव्हे ! ' पंचक पंचकांचा पसारा पांचांचा '– पंचीकरण समजलें तरी ब्रह्मज्ञान दूरच ! ' एक अधिष्ठान खोंचुनी स्वाधिष्ठाना येती मणिपुरीं घेताति झटें । चंद्रसूर्य कळा ह्मणती बारा सोळा करिती पवनासी उफराटे । सतरावियेचें क्षीर सेवुनी शरीर कळिकाळवचनीं ताठे '– हें उत्तम योगी असतील पण ब्रह्मज्ञानी नव्हत! त्रिकाळ स्नान करून कर्मकांड यथासांग केलें; चारी वेद, पूर्ण आचार, होमहवन, पूजा, ब्रह्मयज्ञ, उपवासपारणादि सर्व कांहीं केलें तरी आत्म-ज्ञान नसेल तर ' तें वर्म चुकले रे तें वर्म चुकले रे ! ' विष्णूच्या उद-रांत ब्रह्माण्ड साठवलें आहे असें समजून तुळशीवृंदावन, हरिपूजन, एका-दशीव्रत इ० आचरणारे वैष्णव, किंवा शिवापरतें दैवत नाहीं म्हणून

विभूतिरुद्राक्ष आचारलिंगें कठीं धारणारे शैव—आत्म्याचें एकत्व न जाणतां—हरिहरभेदाचे वाद घालीत राहिले तर त्यांना काय आत्मज्ञानी ह्मणायचें आहे ? असेच शाक्त, असेच इतरपंथीय लोक. ब्रह्मज्ञान झालें तरी लेशमात्र ज्ञानाभिमान जवळ असेल तें खरें ब्रह्मज्ञान नव्हे. तात्पर्य ब्रह्मज्ञानावांचून सर्व कर्मे निरर्थक आहेत; याचा अर्थ सर्वकर्मे व आचार-विचार त्याज्य आहेत असें नव्हे. ते अवश्य पाहिजेत. प्रत्येकानें आपापल्या धर्ममतानुसार किंवा संप्रदायपरंपरेनें आलेल्या कर्माचाराप्रमाणें अवश्य वागलें पाहिजे, पण आत्मज्ञानाचा डोळा उघडा ठेवून व निरभिमान होऊन हें केलें पाहिजे. ब्रम्हज्ञान हें ' सुलभ नव्हे जीवा सुलभ नव्हे देवा ' मग हें कोणाला व कसें प्राप्त व्हावें. ' एकाजनार्दनी श्रीगुरुवांचून । ब्रम्हज्ञान—खूण न कळेचि ! '

---

## ९ तुकोबाराय व वर्णाश्रम.

**तुकोबारायांनीही**— समाजस्थितीचें चित्र अगदी नाथांसारखेंच काढलें आहे. वर्णाश्रमधर्माचें रक्षण झालें पाहिजे, संकर हा नाशकारक आहे असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें आहे. सारेच संत—मग ते कोणत्याही जातीचे असोत—वर्णाश्रमधर्माचे संरक्षक आहेत; संतच काय पण पंतही वर्णधर्म मानणारे आहेत. वेदविहित कर्मे ज्यानें त्यानें आपल्या वर्णाप्रमाणें केलीं पाहिजेत, जातिधर्माप्रमाणें वागून सर्वांना उद्धाराचा मार्ग सुकर होतो, असेंच हिंदुस्थानांत सर्व जातींचें जातिवंत पुरुष मानीत आले आहेत ! परदेशीय व परधर्मीय राजसत्तेच्या वरवंट्याखाली सारेच चिरडले जात असले तरी हिंदुमात्र रक्तशुद्धि व संस्कारशुद्धि संभाळण्यासाठी तळमळत असतो. 'स्वधर्मे निधनं श्रेयः ' याचा अर्थ कितीही लवचीक केला तरी तो सारा हिंदु माणसाच्या अंगीं मुरलेला आहे. तुकोबा सांगतातः—

**( १ ) अभक्ष्य भक्षिती विटाळ । कोणी न धरी कोणाचा ॥**
**( २ ) याती अठरा चारी वर्ण । कर्दम करूनि विटाळले ॥**

**( ३ ) चारी वर्ण अठरा याती । भोजन करिती एके पंक्तीं ! ॥**

**( ४ ) वर्णधर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥**

संकराविषयीं तुकोबांनीं असंदिग्धशब्दांनीं तिटकारा व्यक्त केला आहे. संत जातीकडे पाहत नाहींत, ते गुणांकडे पाहतात. जातीचा अभिमान व द्वेष दोन्ही टाकून ' अवगुणीं द्वेष गुणीं पूजा म्ह० गुणाचा आदर व अवगुणांचा द्वेष करायला ते शिकवितात. वर्ण व जाति ईश्वरनिर्मित व जन्मसिद्ध आहेत असा सर्वजातीय संतांचा निश्चय आहे. चांडाळाचाही गुण घ्यावा व ब्राह्मणाचाही दोष त्याज्य मानावा, म्हणून नाथांनीं व तुकोबांनीं ब्राम्हणांतही जे दोष, पातकें, दंभ व लबाड्या त्यांना आढळल्या त्यांचा कडक शब्दांनीं निषेधच केला, किंबहुना जेथें जेथें त्यांना दंभ, खोटेपणा व पापिष्टपणा दिसला तेथें तेथें त्यांनीं–जन सुधारावे म्हणून– तडाखे मारण्यास कमी केलें नाहीं. पाखांडी, दुराचारी, दांभिक, नास्तिक, टवाळ धर्मलंडांचा त्यांनीं खरपूस समाचार घेतला आहे.

**( १ ) थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार ।**
**सांडूनिया द्विजवर । दावलपीर स्मरताती ॥...**

**( २ ) राहिले वर्णाश्रमधर्म । अन्योन्य विचरती कर्म ।**
**म्हणवितां रामराम । महाश्रम मानिती ॥...**

**( ३ ) धनाढ्य देखोनि अनामिक । तया मानिती आवश्यक ।**
**अपमानिती वेदपाठक । सात्विक शास्त्रज्ञ संपन्न ! ॥...**

**( ४ ) मद्यपानाची सुराणी । नवनीता न पुसे कोणी ।**
**केळवती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥...**

**( ५ ) गीता लोपली गायत्री । भरले चमत्कार मंत्रीं ।**
**अश्वाचीये परी । कुमारी विकिती वेदवक्ते ॥...**

**( ६ ) कैसें विनाशकाळाचे कौतुक । राजे जाले प्रजांचे अंतक ।**
**पितापुत्र सहोदर एका एक । शत्रुघातें वर्तती ।...**

**( ७ ) तपव्रत करितांलागती सायास ।**
**पाळितां पिंडास गोड वाटे ॥**

**( ८ ) सोडिले आचार । द्विज चहाड झाले चोर ॥**
**टिळे लपविती पातडी । लेती विजारा कातडी ॥**
**नीचाचे चाकर । चुकलियां खाती मार ॥**
**राजा प्रजा पीडी । क्षेत्रीं दुश्चितासी जोडी ॥**
**वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥**
**तुका ह्मणे देवा । काय निद्रा केली धांवा ॥**

अशा धर्मविन्मुख लोकांना ताळ्यावर आणायला स्वधर्मीय राजसत्तेचें पाठबळच पाहिजे. स्वधर्मरक्षणासाठीं स्वराज्य पाहिजे.

**काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडुनी पुढती लावूं वाटे ॥**

'भूतांचें पाळण' व 'कंटकांचें निर्दळण' ह्या दोन्ही गोष्टी जेथें एकवटतात त्यालाच दया म्हणतात! कंटक म्ह० परकीयच नव्हेत, तर समाजांतले उन्मार्गवर्ती लोकही कंटकांतच मोडतात! लोकांची राजकीय व सामाजिक दुरवस्था पाहून तुकोबांना हळहळ वाटे. 'न घडे यावरी न धरवे धीर। पीडितां राष्ट्र देखोनि जग!' परकीय राजसत्तेनें व घरांतल्या नष्ट भुंग्यांनीं समाज पोखरला जात आहे अशा वेळीं स्वधर्मरक्षक राजा असावा अशी तुकोबांची सात्विक लोककल्याणकारी इच्छा फलद्रूप होण्याचा समयही लौकरच आला!

**वेदविहित तुम्ही आइका हो कर्म । बोलतों तीं वर्म संतांपुढें ॥**
**चारी वर्ण जाले एकाचिये अंगीं । पापपुण्यभागीं विभागिले ॥**

पुरुषसूक्तांत सांगितल्याप्रमाणें एका विराटपुरुषाच्या देहापासून चारही वर्णांची उत्पत्ति झाली हें खरें पण ते पापपुण्यात्मक गुणकर्मांच्या योगानें विभागले गेले. 'आंबे, बोरी, वड, बाभूळ, चंदन हे वृक्ष गुणागुणीं भिन्न आहेत तरी अग्नींत टाकल्यावर एकरूप होतात, त्याप्रमाणें मन उन्मन झाल्यावर म्ह० पूर्णतेच्या ठायीं वर्ण भिन्नाभिन्न नाहींत; तथापि देहभाव आहेत तोंवर वेदशास्त्राच्या आज्ञेप्रमाणेंच मनुष्यानें चालले पाहिजे. पूर्णपुरुष मात्र वर्णाश्रमधर्माच्या व जातपातादि भेदभावाच्या पलीकडे आहे; पण अपूर्ण अर्थात् सर्व सामान्यलोकांना वेद-

शास्त्रादिकांचे नियम म्ह० वर्णाश्रम पाळलेच पाहिजेत. ब्राह्मण हे सर्व वर्णांचे गुरु आहेत अशीच तुकोबांची शिकवण आहे.

**दुधाळ गाढवी जरी जाली पाहे । पावेल ते काय धेनुसरी ॥ १ ॥**
**कागांचियां गळां पुष्पांचिया माळा । हंसाची तो कळा काय जाणे॥२॥**
**मर्कटें आंघोळी लावियेले दिवे । ब्राह्मणाचे लीळे वर्तू नेणें ॥ ३ ॥**
**जरी तो ब्राह्मण जाला कर्मभ्रष्ट । तुका म्हणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥ ४ ॥**

मन उन्मन होऊन सकल बंधातीत होईतोंपर्यंत वेदशास्त्रमर्यादा ( अर्थात् वर्णाश्रमाचे नियम ) मनुष्यानें पाळले पाहिजेत. भक्त सर्वश्रेष्ठ म्हणून सांगितले तरी वर्णसंकर करावा व जातींचा कर्दम करावा या विचाराला तुकोबांच्या ग्रंथांत आधार नाहीं !

---

## १० तुकोबांनीं केलेला दंभस्फोट.

नाथांप्रमाणेंच तुकोबांनींही समाजस्थितीचें चित्र आपल्या अभंगांतून स्पष्टपणें रेखाटलें आहे. ‘ वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसि उत्तम लोक’—मन उन्मन झालें नाहीं, अद्वैताचा साक्षात् अनुभव आला नाहीं, तोंवर वेदविधिप्रमाणेंच वागलें पाहिजे. त्यांनीं समाजांतील सोंगेंढोंगें, लबाडया, दांभिकपणा, यांवर चांगलेच कोरडे ओढले आहेत. **कवि:**— ‘ कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशल हे भांड बहु झाले ! ’ ‘ ठावा नाहीं पंढरीराव ’ आणि उगाच हे कवि देवाच्या गोष्टी परोक्षपणें सांगतात ! यांच्या कवित्वाची कोरडी बडबड चालली आहे. ‘ घरोघरीं जाले कवि । नेणे प्रसादाची चवी ’—‘ उष्टया पत्रावळी गोळा करून हे आपलें कवित्व जगापुढें मिरवितात, पण शेवटीं लटिक्यांची फजीतीच होते.’ प्रसाद चिवडून ते दुसऱ्याचे उष्टे विचार व कल्पना घेऊन कांहीं तरी शब्द जोडतात. अखेर ‘ सोन्याशेजारीं तों लाखेची जतन ’ हें उघडकीस येतेंच. ‘ मोडुनि संतांचीं वचनें । करिती आपणां भूषणें ’ असे हे चोर कवि ! हे प्रासादिक कविवचनांना आपलीं ठिगळें जोडून तीं शालजोड्या म्हणून

मिरवणारे ठककवि यांचा तुकोबांनीं धिक्कार केला आहे व आपले अभंग चोरून ते स्वतःच्या नांवानें खपविणारे ' सालोमालो ' यांचें चौर्य उघडकीस आणलें आहे. **पुराणिकः**—' कांदे खातात व ' शूद्रीसंग ' करितात आणि वर आपण सोवळे म्हणून डौल मिरवतात ! खिस्तीचा म्ह० देण्याघेण्याचा व्यवहार करणारे ब्राह्मणब्रुव ' चांडाळांच्या ' दारोदार हिंडतात, फार काय पण ' अंत्यजांची खिचडी घेताती मागून ! ' किती तरी ब्राह्मण असे आहेतः ' उत्तम कुळीं जन्म पण क्रिया अमंगळ ' हे धर्मठक किती प्रकारांनीं गरीबगुरीबांना व बायाबापड्यांना लुबाडतात. ' अवघे पोटासाठीं ढोंग । तेथें कैचा पांडुरंग ! ' उघड अथवा प्रछिन्न वासनांचे हे किंकरः—' वासनेची बुंथी । तेथे कैची ब्रह्मस्थिति !' **विद्वान्** ' विद्या अल्प परी गर्वशिरोमणि ! ' ताठ्यानें वागत असून हे ' साधूचे देहाचा मानिती विटाळ '—साधूच्या पायींही लवायचे नाहींत. मी काय कमी आहे हा ताठरपणा—' तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं. ' मायेचा मैंद म्ह० मायाजाळ पसरून भोळ्याभाबड्यांना फसविणारा ठक. त्याचेपाशीं देव कुठचा ? **संत** आणि **गुरु** हे तर विश्वाचे खरे उद्धारक ! ' सद्गुरुवांचूनी सांपडेना सोय ' व संतांवाचून देवाची ओळख पटत नाहीं हे सिद्धांत अबाधित आहेत; पण संत व गुरु यांचे वेष घेऊन तादृश्य योग्यता अंगीं नसतां लोकांना पोटासाठीं ठकवणारे **दांभिक** हे मात्र त्याज्य होत.

**घालुनियां मध्यवर्ती । दाटून उपदेश देती ॥ १ ॥**
**ऐसे पोटभरे संत । तयां कैचा भगवंत ॥ २ ॥**
**रांडापोरांतें गोविती । वर्षासन ते लाविती ॥ २ ॥**
**मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन अभिमान ॥**

टिळा, टोपी, माळा, मुद्रा, कौपीन, दंडकमंडलू, इ० बाह्य वेषांलाच जग भुलतें. गुरुपणाचा तर धंदाच झाला आहे. गुरुमार्गांत शिरले कीं ' यातिकूळ नाहीं म्हणून ' हे दांभिक स्वेच्छाचरण शिकवितात, पवि-

त्राचा राग करितात व ' मानिती आत्मिक अनामिका ' - अतिशूद्रांना सगेसोयरे मानतात ! ' नसता करूनि होम खाती एके ठायी '-सहभोजनें करितात व ' ब्रह्मीं भेद नाहीं ' म्हणून सांगतात ! ' नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणे। उपदेशून घेणें द्रव्य कांहीं '-शिष्यांचा भोंवतीं मेळा, परस्त्री, मद्यपान-मोकाट वागणें ! ' देखोवेखीं करिती गुरु । नाहीं ठाउका विचारु. ' शिष्यसंप्रदाय म्ह० अंधळ्यांची माळच ती ! ' भूतीं नारायण खरा । आप तैसाची दुसरा ' हें मनीं बाळगून स्वतः तरून जावें. असेच हरिदास, पुराणिक, साधक, शास्त्रज्ञ, पंडित, वादी, कर्मठ, संन्यासी, बैरागी व गोसावी, देवऋषी, जपी, तपी, नाथपंथी, मानभावी, भिक्षेकरी, वितंडवादी, शाक्त, जंगम, भक्तिस्तोम माजविणारे इ० बहुरूपी बहुरंगी-ब्राह्मण आणि शूद्र, पुरुष आणि स्त्री, संसारी आणि साधुवेष घेणारे-जेथें जेथें दांभिकपणा, पोटभरूपणा, विषयलंपटता तुकोबारायांस आढळून आली तेथें तेथें कठोर प्रहार करायला त्यांनीं कमी केलें नाहीं ! (बाह्यवेषांवर किंवा जातिविशेषांवर त्यांचा कटाक्ष मुळींच नव्हता तर खोटेपणावर होता, आणि कोणाही संताला व लोकहितेच्छूला खोटें नष्ट व्हावें व खरें प्रगटावें असेंच वाटत असतें.) अभेदाचें पाठांतर । अति विषयीं पडिभर ' म्ह० अद्वैतवचनें तोंडपाठ आणि विषयाकार चित्त असें पाहिलें कीं ' काय करोनि पठण । केली अहंता जतन- ' वर्म दूर राहिलें- ' चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप. ' पोटीं विषयांचा थारा आहे तोंवर हरीला शरण जाऊन नामभजनानें त्याला प्रसन्न करावें, लोकांना उपदेश करायच्या भरीस पडूं नये ! ' जटा राख विटंबना । धीर नाहीं क्षमा मना '- धैर्यानें मन आवरतां येत नाहीं, दुसऱ्याविषयीं दयाक्षमा नाहीं, तोंवर लांब जटा, विभूतिलेपन, रुद्राक्षाच्या अगर तुळशीच्या माळा इ० भूषणें दूषणास्पद आहेत. विषयीं लंपट असून ' माया ब्रह्माच्या ' गोष्टी पोटासाठी सांगणारे ' धर्मठक ', तसेच ' नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ती । पाठांतरें होती वाचाळ ते ' असे तर्कत्रंत व श्रद्धाशून्य वादी

देवाचा अनुभव नसून ‘ शिकल्या बोलाचे सांगताती वाद ’ असे पंडित, ‘ जयासी नावडे हरिनामकीर्तन । आणिक नर्तन वैष्णवांचे ’ असे मिथ्या गर्वानें फुगलेले नामधारी संत, ‘ निंदिती कदान्न इच्छिती देवान्न ’ असे मिष्टान्नासाठीं व मानासाठीं हपापलेले संन्यासी, ‘ भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ’ हें विसरुन ‘ जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडे ’ असे धंदेवाले भिक्षेकरी, ‘धाई अंतरीच्या सुखें’ असा आत्मानंद भोगायचे सोडून विधिनिषेधाच्या गप्पा मारणारे वितंडवादी,— अशा लबाडांनीं हें जग भरलें आहे !

**अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥**
**वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयता कुळयाती ॥ २ ॥**

देवाचा अंतरंग उपासक, जिव्हाळ्याचा भक्त, सदाचारी व निर्लोभ विद्वान् यांचें प्रेम तुकोबांच्या हृदयांत सर्वकाळ असे, मग तो कोणत्याही जातीचा कां असेना. याच्या उलट ब्राह्मणकुळांत जन्मूनही तो दंभ, खोटेपणा व दुराचार यांत रत असेल तर तो त्यांना त्याज्य असे. तात्पर्य तुकोबांनीं कोणत्याही जातीची व साधनांची निंदा केली नसून दांभिकपणाची व खोट्याची निंदा केली आहे. आचारविचारांत खोटेपणा चहूंकडे भरलेला पाहून तो जावा व जन खऱ्या भक्तीच्या मार्गाला लागावे ह्मणूनच त्यांनीं हातीं चाबूक घेतला !

**परद्रव्य परनारी । अभिलाषूनि नाक धरी १**
**जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर २**
**सोवळ्याची स्फीती । क्रोधें विटाळला चित्तीं ३**
**तुका म्हणे सोंग । दावी बाहेरील रंग ४**

आह्मी हिऱ्याचे पारखी आहोंत, गारा वेंचणारे नव्होंत, पण जगांत ‘ सत्य गेलें भोळ्यावारी । अविद्येची चाले थोरी ’ असेंच चालत असतें ! खऱ्याखोट्याचा लोक विचार करीत नाहींत व ‘ वंदिलें वंदावें निंदिलें निंदावें । एक गेले जावें त्याचि वाटा ’ असा गतानुगतिकत्वाचा प्रकार चालला आहे. तुकोबा ह्मणतात कीं आह्मी देवावांचून कोणाचीही आस

बाळगत नाहीं व जग आह्मांला देवरूप आहे तरी लोकांच्या कल्याणाचा कळवळा येऊन आम्हीं हें बोलत आहोंत.

**शब्दज्ञानानें** मत्त झालेल्या पंडितांना तुकोबा सांगतात कीं 'कथनी पठणी करूनि काय। वांचुनि रहणी वायां जाय!' आचरणांत उतरेल तेवढेंच ज्ञान खरें. 'तुका म्हणे धणी (तृप्ती)। नव्हे जेविल्यावांचुनी!' पंडितांना अभिमानच बाधतो. 'अभिमानाचें तोंड काळें। दावी बळें अंधार!' पांडित्याचा धिक्कार नाहीं पण त्याला अभिमानाची काजळी येते ती झाडलीच पाहिजे!

**अंगीं भरला ताठा। नये वळणी जैसा खुंटा ॥ १ ॥**
**कैसें न कळे या डेंगा। हित आदळलें अंगा ॥ २ ॥**
**शब्दज्ञानी येऊं नेदी दृष्टीपुढें। छळवादी कुडे अभक्त ते ॥ १ ॥**
**जळो ते जाणीव जळो त्यांचें दंभ। जळो त्यांचें तोंड दुर्जनांचे ॥२॥**
**सांगें छंदें कांहीं। देव जोडे ऐसें नाहीं ॥ १ ॥**
**सारा अवघे गाबाळ। डोळ्याआडील पडळ ॥**
**शुद्ध भावाविण। जो जो केला तो तो शीण ॥ ३ ॥**
**तुका म्हणे कळे। परी होताती आंधळे ॥ ४ ॥**
**नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ती। पाठांतरें होती वाचाळ ते ॥**
**माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी। तेथें कैंची उरी देहभावा ॥**

अहंकाराचा त्याग याचेंच नांव **संन्यास.** तो न करितां नुस्तें भगवें घेतलें तर तो श्वानाचा सहजवेष आहे! 'वाढवूनि जटा फिरे दाही दिशा'— तरी ती जंबुकांची सहजस्थिति आहे! 'कोरोनीयां भूमी करिती मधीं वास। तरी उंदरास काय वाणी?' बाह्यवेषानें कांहीं स्वहित होत नाहीं. शरीर सोवळें पाहिजे पण आधी मन सोवळें झालें पाहिजे. 'काय बा करिसी सोवळें ओवळें। मन नाहीं निर्मळ वाउगेंची!'

कांहीं लोक जात्या खळ, अभाविक, ताठर व तर्कटी असतात, त्यांच्या चित्ताला द्रव नसतो, त्यांना जन्मभर उपदेश केला तरी 'पालथे घागरीं घातलें जीवन' याप्रमाणें तो फुकट जातो. खळांना 'नेदावी सलगी।

न करावा संग । करी चित्ता भंग वेळेवेळां ' त्यांच्या मुखानें श्रवणही करूं नये—कांकीं त्यांचें ' अहंकारें मन विटाळलें ' असतें व दुधाच्या घागरींत मद्याचा बुंद पडला कीं तें दूध जसें अशुद्ध होतें तसा खळमुखीचा उपदेशही परिणाम करीत नाहीं ! तथापि खळांचेही उपकार आहेत ! ' करिती पातकांची धुनी । मोल न घेतां साबणीं ' आणि खळ ' नेघे मोल धुतो फुका ' ह्मणून रजकापेक्षाही श्रेष्ठ आहे. शिवाय खऱ्याखोट्याची पारख जगाला खळदुर्जनांमुळेंच होते. ' वाइटानें भलें । हीनें दावीलें चांगलें ' विषामुळें अमृत, काळिमेमुळें ज्योती, रात्रीमुळें दिवस, गारेमुळें हिरा जसा मोलाला चढतो तसे नष्ट जगांत असतात ह्मणून सुष्ट ओळखतां येतात ! विश्वाच्या पूर्णतेला त्यांचीही अवश्यकता असते म्हणून देवानें खळदुर्जन, संतनिंदक व अभाविकतर्कटी उत्पन्न केले आहेत. नासक्या आंब्याच्या संसर्गानें आढींचे आंबे बिघडूं नयेत एवढयाच साठीं संत त्यांचा निषेध करितात, पण त्यांचाही उद्धार करण्याची शक्ति व कारुणिकता त्यांच्या ठायीं असते. प्रसंगानुसार मृदु, कठोर उपायांनीं व उपदेशानीं ते खळांनाही ताळ्यावर आणतात.

**गाढवाचे घोडे । करूं आह्मी दृष्टीपुढें ॥ १ ॥**
**तुका म्हणे खळ । करूं समर्थीं निर्मळ ॥ ४ ॥**

असो. ' निंदावें हें जग । ऐसा आला आम्हां भाग '—पण याला काय करावें ? गोडीनें हे लोक ऐकत नाहींत व ' मुखीं देतां घांस । पळविती तोंडें—' तेव्हां जरा हिसका द्यावा लागतो. रोग्याची माया करून चालत नाहीं. ' बुडतां हे जन न देखवे डोळां— ' म्हणून त्यांच्याच हितासाठीं कधी कधी कडु औषध द्यावें लागतें. यांच्यापासून आम्ही अर्थाची इच्छा करीत नाहीं. यांना 'चिंता मनीं पाय विठोबाचे' एवढेंच आम्हांला सांगायचें आहे. भूतीं भगवंत हा तो जाणतों संकेत 'जनीं जनार्दन भरला आहे ' हें आम्ही जाणतों. आम्ही जनांची निंदा करीत नाहीं, दुष्टस्वभावाची व

दोषांची निंदा करितो, जनांच्या हितासाठी कळवळ्यानें आम्ही त्यांच्या दोषांचा स्फोट करितों:—

**जग तरी आम्हां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥ १ ॥**
**येतो हिताचा कळवळा । पडती हातीं ह्मणोनि काळा ॥ २ ॥**

---

## ११ प्रापंचिकांची कानउघाडणी.

स्त्रीलंपट व धर्मलंड संसारिकांचीही तुकोबांनीं कानउघाडणी चांगलीच केली आहे:—

**तुका म्हणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ॥ ९ ॥**

बाइल्या पुरुषाचें जिणें व्यर्थ होय. त्याला 'परलोक मान नाहीं दोन्ही' ह्म० प्रपंचांत किंवा परमार्थांत त्याच्याहातून कांहींच पुरुषार्थ होणार नाहीं. हिंदुसमाज फार प्राचीनकालापासून अविभक्त कुटुंबपद्धतीला मान देणारा आहे. आईबाप, बहीणभाऊ, दीरजावा, नणदा, पहीपाहुणे, व अतिथि यांनीं घर गोकुळासारखें गजबजलेलें असणें हें आपण संसारांतील मोठें भाग्य मानतों. घरांतला कर्ता पुरुष बाइल्या निघाला कीं तो घराण्याची इभ्रत, डौल, बस घालवितो, परंपरा मोडतो, वडिलांची रीत नष्ट होते, कुळधर्म कुळपरंपरेला धक्का बसतो व हें अनिष्ट ह्मणून तुकोबासारखे समाजनायक बाइलेपणाचा धिक्कार करितात! 'मिय्या बिब्बीचा'चा तुटपुंजा संसार बहुधा धर्महीन होतो.

**बाइल सवासीण आई । आपण पितरांचे ठायीं ॥ १ ॥**
**थोर वेंच झाला नष्टा । अवध्या अपसव्य चेष्टा ॥ २ ॥**

लाडकीला श्रम होतील म्हणून देवधर्म, श्राद्धपक्ष सर्वांना कांट देऊन हा धर्मलंड बनतो. श्राद्धपक्ष आले कीं बायको आईच्या ठिकाणीं व हा बापाच्या ठिकाणीं होऊन दोघे यथेच्छ मिष्टान्नावर ताव मारतात! या नष्टाचा खर्च होतो! श्राद्धपक्षांतच आपण अपसव्य करितों, पण याच्या सर्वच चेष्टा अपसव्य, डाव्या, धर्महीन, त्याज्य असतात. देवलंड, धर्मलंड, संतनिंदक पोटभरू अशांचा तुकोबांनीं धिक्कार केला आहे.

पर्वकाळीं भटजोशी घरीं आला तर त्याला विन्मुख जाऊं देणें, एकादशीस यथेच्छ जेवणें, ब्राह्मणाला खांडही न देतां राजद्वारीं मात्र नटूनसजून जाणें, कीर्तन डावलून सोंगट्या ( बुदबुळे, ब्रिज ! ) कौतुकानें खेळणें, संतांची हेळणा–निंदा करणें व ते भेटतां कुचरपणानें अंग चोरणें, गाईची सेवा न करितां घोड्याची चाकरी करणें, द्वारीं तुळशीवृंदावन नसणें, देवाची पूजा व अतिथिसत्कार न करितां पोट भरणें, दाराशीं भिकारी अन्नासाठीं ओरडत असतां त्याला गोळाभर अन्न न घालणें, कन्याविक्रय करणें, ( शनिवारीं, बुधवारीं ) 'नटाचीं तोंडें खेळ व नाच' पाहायला बायकामुलांसह धांवणें, बाइलेला कथेला जाण्यास प्रतिबंध करणें इ० धर्मलंडपणाच्या कृत्यांचाही तुकोबांनीं खरपूस समाचार घेतला आहे. ! 'द्विजां नमस्कारितां मनीं नाहीं भाव' आणि परधर्मीयांसी वागतांना मात्र 'तुर्कांचे दासीचा लेक जैसा' असा त्याचा बूटपुसा चोंबडा प्राणी ! 'पर्वकाळीं धर्म न करी' आणि 'खर्ची राजद्वारीं द्रव्यराशी !' असे प्राणी नाथतुकोबांच्या वेळीं व आतांही आहेत !

---

## १२ नाथांचें चिरंजीवपद.

नाथांचें हें ४२ ओव्यांचें छोटेसें प्रकरण अत्यंत लोकप्रिय आहे, व तें साधकांना सावध करण्याच्या कामीं फार उपकारक आहे. गुरुत्वाचा अधिकार अंगीं येण्यापूर्वीं किंबहुना शिष्यत्वही पुरतेसें कळण्यापूर्वींच 'महाराज, गुरु, बोवा' बनून लोकांच्या श्रद्धेचा किंवा भोळेपणाचा फायदा घेणारे स्वार्थांध लोक समाजांत नेहमीच पुष्कळ आढळतात. फसणाऱ्या लोकांत बायांचा भरणा ज्यास्त असतो. 'गुरुत्वाचा' वेष घेणाऱ्यांत नाथांच्या वेळीं पुरुषच असत, आतां हा 'धंदा' किफायतशीर वाटूं लागल्यामुळें त्यांत बायाही सामील होऊं लागल्या आहेत ! किती स्त्रीपुरुष यांच्या नादीं लागून फसले आहेत व फसत आहेत ! जे पहिल्यापासूनच दांभिकपणानें लोकांना फसविण्याचा धंदा करितात त्यांना समाजानें किंवा

स्वधर्माच्या राजसत्तेनें चांगलेंच वठणीवर आणलें पाहिजे; पण जे सात्वि-कपणानें परमार्थाच्या मार्गाला लागतात, पण दुर्बळ इंद्रियें अनावर झाल्या-मुळें अधःपाताच्या खोल खड्यांत जाऊन पडतात, त्यांना सावधगिरीचा इषारा देण्यासाठीं नाथांनीं हें ' चिरंजीव पद ' लिहिलें आहे. हें साधकांनीं आत्मश्रेयासाठीं आपल्या हृत्पटलावर कोरून ठेवलें पाहिजे.

' चिरंजीव पद ' ह्मणजे अविनाश ब्रह्मपद. हें पावावयास तीव्र अनु-ताप व प्रखर वैराग्य पाहिजे हें या प्रकरणांत मुख्यतः सांगितलें आहे. मरणाचें नित्य स्मरण ठेवून देहसुखाविषयीं वितृष्ण असणें व नरदेह प्राप्त झाला असून ' मी तो विषय स्वार्थी लाविला व थिता परमार्थ हातचा दवडला ' या विषयीं दुःख व तळमळ वाटणें याचें नांव **अनुताप**. असा चित्तांत खरा अनुताप झाला कीं वैराग्य सहज प्राप्त होतें.—

वेदविधि व सत्कर्मसदाचार यांचा त्याग करून कर्मधर्मीं भ्रष्टाकार माजवणें म्हणजे नियतकर्मांचा त्याग करणें हा अपवित्र **तामसत्याग** होय. आपली पूज्यता वाढावी यासाठीं सत्संग सोडून आपल्याच देहाची प्रतिष्ठा वाढविणें व शिष्यशाखा वाढवून व मठादि प्रपंच थाटून महंती माजवणें हा **राजसत्याग** होय; ' त्याग केला पूज्यतेकारणें । सत्संग सांडूनि पूजा घेणें । शिष्यममता धरोनि राहणें । हें वैराग्य राजस ! हें तामस व राजस वैराग्य अनर्थकारक आहे. यानें देव जोडत नाहीं. आतां शुद्ध **सात्विक वैराग्य** कसें असतें तें ऐका. चिरंजीवपद पावावयास हें शुद्ध वैराग्य पाहिजे आहे. ' भोगेच्छा विषयींक। ते तो सांडी सकळीक, । प्रारब्धें प्राप्त होतां देख । तेथोनि निष्टंक मन काढी–हा **सात्विकत्याग** होय. विषय् संसारिकाला बाधतात इतकेंच नव्हे तर साधकालाही बाधतात. संसार सोडून हा परमार्थी बनला कीं विषयही सोंवळे होऊन याला गांठायला येतात! कसें तें पहा! विषय पांचः–शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध. पहिला विषय शब्द. ज्यानें परमार्थ धरिला त्याला **जनमान** ह० प्रतिष्ठा

हा मोठा अनर्थ आहे. विरागी पुरुष पाहून लोक त्याची स्तुति करितात, त्याचा सन्मान करून पूजा करितात:—

**त्याचें वैराग्य कोमळ कंटक । नेट न धरीच निष्टंक ।**
**देखोनि मानस्तुति अलोलिक । भुलला देख पै तेथें ॥ १४ ॥**
**जनस्तुति लागे मधुर । म्हणती 'उद्धरावया हा हरीचा अवतार ।**
**आम्हांलागीं जाहला स्थिर' । तेणें तो धरी शब्दगोडी ! ॥ १५ ॥**

'हा आमच्या उद्धारासाठीं हरिच अवतरला आहे, केव्हांच हे महाराज हिमाचलावर गेले असते पण आमच्यासाठीं येथें राहिले आहेत' इत्यादि प्रकारची शिष्यांची स्तुति ऐकून हा त्या स्तुतिपर शब्दाला भुलतो व कोंवळ्या कांट्यासारखें याचें कोमळ वैराग्य त्या स्तुतीच्या भाराखालीं पार दडपून जातें! हा पहिला शब्दविषयच फार कठिण आहे, येथें याचें वैराग्य मऊ झालें कीं हा अनुक्रमानें स्पर्श, रूप, रस, गंध, या विषयांनीं आक्रमिला जातो. कित्येक याला मृदु आसनें देतात; सुंदर पलंग, उंची वस्त्रेंपात्रें व देवाला उचित असे उपचार देतात; नरनारी शुश्रूषा करितात; हातपाय मस्तक रगडतात; मग हा त्या मृदुस्पर्शाला भुलतो; देहकष्ट याला नकोसे वाटतात. याप्रमाणें स्पर्शविषय याला बाधक होतो. याच न्यायानें जन गोडगोड खाऊं घालतात, याला आवडेल तें पुरवितात, सुमनहार, चंदनाच्या उट्या, केशरविलेपन, मधुरगायन, इ० रूप, रस, गंध हे विषयही त्याला बुडवितात, पण हा सावध राहत नाहीं. याला पूजकांची ममता लागते. खरा विरक्त कसा असतो?

**तो विरक्त कसा म्हणाल । जो मानलें सांडी स्थळ ।**
**सत्संगीं राहे निश्चळ । न करी तळमळ मानाची ॥ २६ ॥**
**मांडीना स्वतंत्र फड । म्हणे अंगा येईल अहंता वाड ।**
**धरूनि जीविकेची चाड । न बोले गोड मनधरणी ॥ २७ ॥**
**नावडे लौकिकपरवडी । नावडती लेणीं लुगडीं ।**
**नावडे परान्नगोडी । द्रव्यजोडी नावडे ॥ २९ ॥**
**नावडे स्त्रियांत बैसणें । नावडे स्त्रियांचें पाहणें ।**

**नावडे स्त्रियांचें रगडणें । त्यांचें बोलणें नावडे ॥ ३० ॥**
**नको नको स्त्रियांचा सांगात । नको नको स्त्रियांचा एकांत ।**
**नको नको स्त्रियांचा परमार्थ । करिती आघात पुरुषांसी ॥ ३१ ॥**

साधक गृहस्थाश्रमी असेल तर त्यानें स्त्रीसंग सोडून कोठें जावें म्हणून शंका काढाल तर नाथ सांगतातः—

**स्वस्त्रियेवांचोनी । नातळावी अन्य कामिनी ।**
**कोणे स्त्रियेसी सन्निधवाणी । आश्रयो क्षणी न द्यावा ॥ ३३ ॥**
**स्वस्त्रीसही कार्यापुरतें । पाचारावें स्पर्शावें निरुतें ।**
**परी आसक्त होवोनियां तेथें । सर्वथा चित्तें नसावें ॥ ३४ ॥**

साधकानें एकांत सेवावा किंवा निःसंगाचा संग करावा, पण प्रमदासंगीं राहूं नये. नाथ सांगतातः—

**नरनारी शुश्रूषा करिती । भक्तिममता उपजाविती ।**
**परी शुद्ध जो परमार्थी । तो स्त्रियांचे संगतीं न बैसे ॥ ३५ ॥**
**अखंड एकांतीं बैसणें । प्रमदासंगें न राहणें ।**
**जो निःसंग निरभिमानें । त्यापै बैसणें सर्वदा ॥ ३६ ॥**

कुटुंबाच्या निर्वाहासाठीं अयाचित्त वृत्तीनें राहून कांहीं न मिळेल तर कोरान्न भिक्षा मागावी. सारांश **बायका, पैका व प्रतिष्ठा हे परमार्थाच्या मार्गांतले तीन प्रचंड खळगे आहेत,** हें जाणून विरक्त पुरुषानें फार सावधपणानें राहावें. हें शुद्ध वैराग्य अंगीं नसेल तर 'कृष्णप्राप्ती कैंची त्यासीं?' तात्पर्य—

**साधावया वैराग्य-ज्ञान । मनुष्यदेहीं करावा प्रयत्न ।**
**सांगे एका जनार्दन । आणीक यत्न असेना ॥ ४२ ॥**

---

## १३ स्त्रियांस उपदेश करावा कीं नाहीं !

गुरूनें स्त्रियांस उपदेश करावा कीं नाहीं याविषयींचा निर्णय नाथांनीं भागवताच्या २९ व्या अध्यायांत ओवी (५६३ ते ५९०) सांगितला आहे. साधारणतः स्त्रीपुरुषांचें एकत्र राहणें, एकत्र शिकणें,

एकत्र वागणें, याच्या विरुद्ध आपला समाज पहिल्यापासूनच आहे आणि तें पाश्चात्यांची मोकळी राहणी व आमच्याकडेस शाळा कॉलेजांतून शिक्षण घेणाऱ्या तरुणतरुणींच्या गोष्टी यांच्या परिमाणांकडे लक्ष देत योग्य आहे असेंच वाटतें. मुलींसाठीं वेगळ्या शिक्षणसंस्था काढण्याची प्रवृत्ति होत आहे हा त्याबाबतच्या अनुभवाचाच परिणाम आहे! प्रभातफेऱ्यांचा अनुभव मुंबई वगैरे ठिकाणीं ताजाच आहे! नाथ म्हणतात कीं स्त्रीचें वदन पाहतांच पुरुष काममोहित होतो व ती प्रमादांत पाडते म्हणून तिला प्रमदाही म्हणतात. म्हणून स्त्रियांची संगति, त्यांच्यांशीं एकांतांत गोष्टी, त्यांचा निकट सहवास या गोष्टींचा परमार्थ्यानें त्यागच केला पाहिजे हें उघड आहे. 'स्त्रीसंगीं तडफडूनि जाण। वैराग्यासी ये मरण!' म्हणून वैराग्यज्ञानाच्या मार्गें लागणाऱ्या साधकानें तरी स्त्रीचा सहवास व स्त्रियांना उपदेश यांचा सर्वथा त्यागच केला पाहिजे. 'तेथ कायसा उपदेश जाण। आली नागवण परमार्था.' सर्वच स्त्रिया व सर्वच पुरुष वाईट आहेत असें नाहीं, पण 'स्वभावें सात्विक वनिता। गोष्टी सांगों आली परमार्था' तरी तिच्या आप्तेष्टांच्याही मनांत विकल्प उभा राहतो, मग इतरांची काय कथा? 'प्रमदासंगीं ब्रह्मज्ञान। सर्वथा जाण वाढेना' ही खूण साधकानें ध्यानांत धरावी. 'उपदेशीं स्त्रिया जर त्याज्य आहेत तर पूर्वी थोरथोरांनीं स्त्रियांना उपदेश केला तो कसा?' अशी कोणी शंका काढील व याज्ञवल्क्यानें आपली स्त्री मैत्रेयी इला, नारदानें प्रल्हादमाता कयाधूला, कपिलमहामुनीनें माता देवहूतीला, शंकरानें पार्वतीला ब्रह्मज्ञानोपदेश केला या गोष्टी उदाहरणांदाखल देईल; तर नाथ सांगतात कीं स्वस्त्रीला ब्रह्मोपदेश करण्याचा पतीला अधिकारच आहे—त्यांत कोणताही अपवाद येऊं शकत नाहीं. आतां इतर गुरूंनीं शिष्यिणीला उपदेश करण्याचा प्रश्न नाजुक आहे. अधिकारिणी स्त्री असेल व गुरु अधिकारी व जितेंद्रिय असतील तरच उपदेश द्यायला हरकत नाहीं. उपदेश कोणी करावा?

**स्त्रीपुरुष अवलोकन। जयाचे दृष्टीं समसमान।**
**ऐसा अनुभवी जो परिपूर्ण। तोचि स्त्रियांसी जाण उपदेशी**

वैराग्य, परमार्थ, ज्ञान यांच्या आड येणाऱ्या स्त्रीसंगतीची वर निंदा केली पण ती सर्व स्त्रीजातीची निंदा आहे असें कोणी समजूं नये. ज्या विषयावस्था सोडून परमार्थाला उद्यत झाल्या आहेत, वैराग्यशील आहेत 'अतिथि आणि पतिपुत्रांसी। भोजनीं समता नित्य जिशी। धनलोभ नाहीं मानसीं। परमार्थी तिसी अधिकारु' आहे. थोडक्यांतः—

**सद्गुरु प्राप्तीची अतिआर्त। काया वाचा वित्त जीवित।**
**कुरवंडी करूनि सांडित। परमार्थी सद्भावें॥ ५८६॥**
**यापरी निजपरमार्थी। सद्भावें जे विनटे वनिता।**
**तिसी उद्धवा हें उपदेशिता। दोष सर्वथा असेना॥ ५८७॥**

ब्रह्मज्ञानानें स्त्रीशूद्रादि सर्वांचाच उद्धार होतो, मग गुरूनें नाहीं तर आर्तांचा उद्धार तरी कोणी करायचा? सावधानता पाहिजे हा मुद्दा.

श्रीसमर्थाचे वडिलबंधु रामी रामदास उर्फ श्रेष्ठ यांनीं 'सुगमोपाय' व 'भक्तिरहस्य' ह्या आपल्या दोन्ही ग्रंथांत ह्या विषयासंबधानें आपला अभिप्राय असंदिग्ध शब्दांनीं व्यक्त केला आहे. भक्तिरहस्य ग्रंथांत (शक १५९१) ते ह्मणतातः—

**स्त्रियांमाजी घोळों लागला। त्याचे जितेंद्रियतेचा कळस झाला!।**
**केवळ वैश्वानर आणि नारद भ्रंशला। कळीचे मानव ते किती?॥३५॥**
**चित्रींची कामिनी सादर अवलोकी। तो प्रत्यक्ष पीडे उभयलोकीं।**
**ह्मणोनि प्रत्यक्षेचा सहवास साधकीं। करूं नये करूं नये करूं नये॥३६॥**
**जया स्त्रीसमाज आवडे। तया ज्ञानावरी वीज कां न पडे।**
**ते ब्रह्मभ्रमें जाले वेडे। उभयलोकीं अतिनिंद्य॥ ३७॥ (प्रक० ७)**

ह्मणून साधकानें 'परस्त्रियांसी संसर्ग' बिलकूल करूं नये. स्त्रीसमाजांत उठणें बसणें, त्यांच्याशीं सलगी करणें, व त्यांच्याशीं भाषणादि प्रसंग करणें, हे ज्याला आवडते त्याच्यापाशीं ब्रह्मज्ञान तर नाहींच, उलट भ्रम आहे

म्हणून समजावें. म्हणून स्त्रियांशीं सहवासाचा लघळपणा करणें; चित्रींची कामिनी ( स्त्रियांचे फोटो ) सादर पाहणें हें साधकानें सर्वस्वी टाळलेंच पाहिजे. सुगमोपायांत ते म्हणतात कीं ' चित्रींची कामिनीही पाहों नये–' ' तेथें एकांत करणें हें काय । अनुग्रह कीं अधोगति ? ' स्त्रियांवर अनुग्रह उर्फ उपदेश करायला जाणें हें अधोगतीचेंच लक्षण आहे ! कोणी ' उच्छृंखळ ' म्हणतील कीं आम्ही स्त्रीपुरुषभेद जाणत नाहीं तर श्रेष्ठ विचारतात कीं तुम्ही कळींचे दुर्बळ लोक वासिष्ठपराशरांहून अधिक समर्थ व जितेंद्रिय आहांत काय ? हा अपभ्रंशाचा म्हणजे पतनाचा मार्ग आहे ! पतिव्रता स्त्रिया आपल्या पातिव्रत्यधर्मानेंच उद्धरून जातात, त्यांना पति हाच गुरु आहे. ' भर्ता देव गुरु भर्ता ' हें सतीचें लक्षण आहे. तिनें दुसरा गुरु करणें म्हणजे खोड्यांत पडणें आहे ! पूर्वापार आत्मज्ञानी आहेत व सुशील स्त्रियाही आहेत पण ' परस्त्रीप्रबोध–परंपरा' ही कोणी कानांनीं ऐकली ही नसेल ! श्रेष्ठ म्हणतात कीं क्वचित् एखाद्या ' जितेंद्रिय साधु पुरुषानें ' अनाथ व विरक्त विधवा स्त्रीला रामभजनाच्या मार्गाला लावलेंच तर श्रीराम क्षमा करितो ! रामभजनानें गतभर्तृका तरल्याचे पुराणांतरीं आम्ही ऐकतों, पण सभर्तृका स्त्रिया आणि त्या पतिसेवेखेरीज अन्य मार्गानें तरल्या असें कोठेंच ऐकलें नाहीं. तात्पर्य, परस्त्रीला उपदेश करूं नये. ( सुगमोपाय प्रकरण २ ).

' सांडूनि पतिईश्वरु । आणिक महानुभाव करी गुरु ' तिला मुक्तेश्वरांनीं तर सौरी म्हटलें आहे !

स्त्रियांना परमार्थ सांगूं नये किंवा त्या परमार्थाच्या अधिकारी नाहींत असें कोणीच म्हणत नाहीं. ज्ञानेश्वरांची बहिण मुक्ताबाई व नामदेवांची शिष्यीण जनाबाई या मुक्तकोटींतल्या स्त्रिया विश्ववंद्य झाल्या आहेत. तुकोबांची शिष्यीण बहिणाबाई, व समर्थांच्या शिष्यिणी आक्का व वेणुबाई

---

१ तुकोबांनींहीं म्हटलें आहे:—

यांही धन्य झाल्या आहेत. स्त्रीपुरुषभेद ज्यांच्या वृत्तींतून साफ गेला आहे असे पुरुष किंवा स्त्रिया अपवादभूत आहेत. स्त्रीपुरुषांचा सहवास सामान्यतःपरस्परांच्या अधोगतीस कारण होतो म्हणून अजितेंद्रिय स्त्रीपुरुषांनीं सावध रहावें, घसरगुंडीनें आत्मनाश करून घेऊं नये एवढाच मुद्दा आहे.

**स्त्रियांचा हा संग नको नारायणा। काष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या॥१॥**
**नाठवे हा देव न घडे भजन। लांचावलें मन आवरेना ॥ २ ॥**
**दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें। लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ ३॥**
**तुका म्हणे जरी अग्नि झाला साधु। तरी पावे बाधूं संघट्टणें ॥ ४ ॥**



# ७ एकनाथांचें चरित्र व चारित्र्य.

## १ पैठण.

पैठण उर्फ प्रतिष्ठान हें गांव फार प्राचीन कालापासून संस्कृतविद्येचें आगर म्हणून प्रसिद्ध आहे. पंढरपुरास जसें दक्षिण द्वारावती ह्म० दाक्षिणेंतील द्वारका म्हणत, त्याप्रमाणेंच पैठणास दक्षिणकाशी म्हणत. पंढरपूर हें धर्मपीठ तर पैठण हें विद्यापीठ म्हणून महाराष्ट्रास मान्य असे व आहे. ज्ञानेश्वरादि भावंडांना आळंदीच्या ब्राह्मणांनीं प्रायश्चित्तार्थ काढून आणण्यासाठीं पैठणास पाठविले होते. पैठण हे दोन हजार वर्षांपूर्वी शालिवाहनांची व नंतर आंध्रांची राजधानी म्हणूनही इतिहासांत गाजलेलें आहे. देशपांडे, घाटपांडे, वऱ्हाडपांडे, कुळकर्णी इ० प्राचीन घराण्यांतून अनेक विद्वान्, कर्ते पुरुष, संत व कवि निर्माण झाले आहेत. पैठणच्या अशाच एका घराण्यांत गोविंदभट्ट, रामेश्वरभट्ट, नारायणभट्ट, कमलाकरभट्ट व गागाभट्ट हे पांच अतिविद्वान् पुरुष उत्पन्न झाले. रामेश्वरभट्ट यांजकडे भरतखंडांतून हजारो विद्यार्थी वेदशास्त्रपठणासाठी येत. हे उत्तरवयांत काशीक्षेत्रीं जाऊन राहिले. तेथें त्यांस शके १४३६ मध्यें नारायणभट्ट नांवाचा पुत्र झाला. नारायणभट्टाच्या अगाधविद्वत्तेमुळें उत्तरेकडेस महाराष्ट्रीय पंडितांविषयीं लोकांत अत्यंत आदर उत्पन्न झाला. यवनांनीं नामशेष केलेलें काशीविश्वेश्वराचें मंदिर ह्या पुरुषाच्या कर्तबगारीमुळें पुन्हां बांधलें गेलें. नारायणभट्टाचा पणतु कमलाकरभट्ट यांनीं ‘ निर्णयसिंधु ’ नामक धर्मशास्त्रावरील विख्यात ग्रंथ रचिला. शिवछत्रपतीस राज्याभिषेक करणारे गागाभट्ट प्रसिद्धच आहेत. ह्या भट्ट घराण्याला काशीक्षेत्रीं अद्याप अग्रपूजेचा मान आहे. ह्या भट्ट घराण्यासारखीं अनेक घराणीं पैठणांतून भरतखंडावर विद्येचा प्रभाव पाडणारीं अशीं सर्वत्र पसरलीं आहेत.

पैठण हें वेदशास्त्रपुराणांचें माहेरघर म्हणून प्रसिद्ध होतेंच, पण तें एकनाथांच्या वेळेपासून अध्यात्मज्ञानभक्तींचें माहेर म्हणून महाराष्ट्रांत मान्यता पावलें आहे. आज चारशें वर्षें पैठण हें 'नाथांचें पैठण' म्हणूनच जगास माहीत झालें आहे. विठ्ठलाची जशी पंढरी तसे नाथांचें पैठण. आळंदीस तरी ज्ञानेश्वरांची आळंदी म्हणून नाथांनींच महती प्रथम दिलेली आहे. त्यांनीं आदरिल्यापासूनच ज्ञानेश्वरी व आळंदी लोकप्रियतेस पात्र झालीं आहेत. पैठणास नाथांचे पणजे भानुदास हे भक्त म्हणून गाजलेले होतेच. त्यांच्याच घराण्यांत एकनाथांचा अवतार झाला. ह्या एकाच घराण्यांत भानुदास, एकनाथ, नाथांचे नातु कविवर्य मुक्तेश्वर व नाथांचे पणतु शिवरामस्वामी हे लोकप्रसिद्ध चार थोर पुरुष प्रगट झाले. पैठणास शिवदिन केसरी, कृष्णदयार्णव व अमृतराय हे तीन सत्कवि मागाहून झाले. नाथांच्या वेळेपासून आजपर्यंत पैठणास झालेल्या १०० सत्पुरुषांची एक यादी मला पैठणास मिळाली आहे. त्या यादींत सर्व जातींचे संत आहेत. त्यांतील सरस्वती मामी, रामानंद साळी, शिवलिंगअय्या लिंगाईत, बिरजागीर गोसावी, भीमाबाई परदेशी, मौलाना, गोदडशा व सिदडशा इ. नांवें चिंतनीय आहेत ! तेथें नाथांचे जामात चिंतोपंत व शिष्य दंडवतस्वामी आणि गावबा यांच्या समाधि आहेत. पैठणचे सिंहासनाधीश्वर नाथ हे महाराष्ट्राच्या अंतःकरणावर आपलें प्रेमसाम्राज्य गाजवीत आहेत. लौकिक राज्यें येतात व जातात, पण महात्म्यांचें जनमनावरचें साम्राज्य अबाधित चालतें. "भूतदया रक्षून भजनभाग्यें भाग्यवंत व्हा व श्रुतिसंमत सदाचार पाळून ईश्वरानुग्रह मिळवा असें श्रीएकनाथचक्रवर्तीचें अनुशासन आहे व नाथ स्वानंदसुखाच्या सिंहासनावर अधिष्ठित आहेत' असें कृष्णदयार्णव यांनीं म्हटलें आहे. पैठणास जाण्यास दौलताबादेहून एक व नगरहून एक असे दोन मार्ग आहेत. तेथें शालिवाहनाचा एक अति प्राचीन वाडा व जाधवकालीन इमारतींच्या जागीं मुसलमानांनीं बांधलेले दर्गे व मशीदी आहेत.

---

## २ ग्रंथकार व साधु.

मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत नाथांचें स्थान अत्युच्च व अढळ आहेच; पण शांति, क्षमा, औदार्य, समता व भूतदया इ० दैवी गुणांनीं त्यांचें चरित्र उज्ज्वल झाल्यामुळें त्यांना जनतेच्या हृदयांत अक्षय्य प्रेमाची जागा मिळाली आहे. आद्य शंकराचार्य जसे संन्यासाश्रमाचें भूषण आहेत तसे एकनाथ हे गृहस्थाश्रमाचें मंडण आहेत. संन्यासाश्रमाला पहिल्यापासून पूज्यत्व प्राप्त झालें आहेच, पण गृहस्थाश्रमाला नाथांनीं पूज्यता प्राप्त करून दिली आहे. नाथांचा संसार चार आश्रमांना व सर्व वर्णांना पुण्यपूज्य झाला आहे. नाथांचें चरित्र आधीं प्रिय, मग त्यांचे ग्रंथ प्रिय. कांहीं ग्रंथकार निर्गुण ब्रह्मासारखे असतात म्हणजे त्यांचे ग्रंथ श्रेष्ठ पदवीला पोंचले असले व लोकांत मान्य झाले असले तरी त्यांचें व्यक्तित्व समाजाला अज्ञात असतें ! त्यांच्या बुद्धीचें वैभव त्यांच्या ग्रंथांत काय दिसेल तेवढेंच. त्यांचें व्यक्तित्व केव्हांच कालाच्या पोटांत नाहींसें झालेलें असतें. केवळ ग्रंथामुळें त्यांचीं नांवें लोकांना ज्ञात असतात. नाथ, तुकोबा, समर्थ यांचें व्यक्तिवैशिष्ट्य प्रथम डोळ्यांपुढें येतें, नंतर आपण त्यांच्या ग्रंथांकडे वळतों. त्यांच्या सगुणमूर्तीचें, त्यांच्या लीलांचें, त्यांच्या प्रकृतिविशेषांचें व अद्‌भुतरम्य चारित्र्याचें, त्यांच्या तपाचें व परोपकाराचें, त्यांच्या संचारानें पवित्र झालेल्या स्थलादिकांचें दिव्य चित्र प्रथम मनावर उमटतें, त्यांच्याविषयींच्या प्रेमादरानें आपलें हृदय आधीं भरून येतें आणि मग आपण त्यांचे ग्रंथांकडे वळतों ! पहिल्या वर्गाचे ग्रंथकार जगाच्या ज्ञानांत भर टाकीत असतील पण हे साधुशील महापुरुष अधिक प्रभावशाली असतात. त्यांच्या हयातींतच ते जनांच्या हृदयांत अधिष्ठित होतात. पेढा आंत बाहेर गोड, तसें त्यांचें चारित्र अंतर्बाह्य मनोहर असतें. ते मरूनही जिवंत असतात किंबहुना ते कधीं मरतच नाहींत ! ते विश्वाच्या हृदयांत सदैव नांदत असल्यामुळें अजरामर असतात. त्यांचें उज्ज्वल चरित्र त्यांच्या नांवांतच सांठवलें असल्यामुळें त्यांच्या नामचिंतनानेंही लोक कृतार्थ होतात. त्यांच्या नांवाचे महामंत्र

लाखो लोकांच्या अंतरांत व जिव्हेवर सतत नाचत असतात. ते देहांत असून देहातीत व गुणांत असून गुणातीत असतात. देश, काल, परि-स्थिति यांच्या मर्यादेंत राहूनही या मर्यादा त्यांना बांधूं शकत नाहींत. एखाद्या विशिष्ट देशांत, गांवांत, जातींत ते जन्माला आल्यामुळें त्या त्या मर्यादेंत त्यांना वागावें लागतें ( व लोकसंग्रहासाठीं ते तसे वागतातही ) तरी तुकोबांनीं म्हटल्याप्रमाणें 'देशकालवस्तुभेद मावळला। आत्म निर्वाळला विश्वाकार' या कोटीला पोंचलेले हे महात्मे अद्वयानंदाच्या महासागरांत अंतर्यामित्वानें सर्वकाळ पोंहलेले असतात. नाथ या कोटींतले महापुरुष होते. त्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं आज चार शतकानंतरही दोन दोन लाख लोक जमून 'भानुदास एकनाथ', 'जनार्दन एकनाथ' अशा नामगजरांनीं दशदिशा दणाणून सोडतात. नाथ आज आपल्यांत वावरत आहेत अशा अंतःस्फूर्तीनेंच लोक वागतात म्हणून नाथ अज-रामर आहेत. तो नाथांचा वाडा, ती नाथांच्या पूजेंतली कृष्णमूर्ति, तो नाथद्वारींचा रांजण, तो पुण्यगोदावरीचा परिसर, 'स्वकरें चंदन घांसी गंगेचें पाणि कावडी भरितो' असा तो 'श्रीखंडया,' अखंड अन्नदान व ज्ञानदान यांनीं पावन झालेले ते सभामंडप, एकशेआठ वेळ अंगावर थुंकल्यामुळें तितकीं गंगेचीं स्नानें करून आलेल्या नाथांच्या अद्‌भुत शांतीनें वितळून पायावर लोळण घेणाऱ्या यवनाची ती देवडी, नाथांच्या कीर्तनश्रवणानें अनुतापानें शुद्ध होऊन सन्मार्गाला लागलेल्या नाथांच्या 'पिंगला वेश्येची' ती माडी, पितरांसाठीं केलेल्या श्राद्धान्नानें संतृप्त केलेला तो महारांचा महारवाडा, गंगेच्या कावडींतलें तीर्थोदक तोंडात घालून वांचविलेला तो गाढव, चोरांना हातांतील उरलेली आंगठी देऊन आग्र-हानें भोजनास ठेवून घेतलेला तो प्रसंग, कर्मठांच्या संतोषासाठीं घेतलेलीं प्रायश्चित्तें, कर्मठ शास्त्रीपंडितांपासून तो महारमांगापर्यंत सर्वांच्या उद्धा-रार्थ अहर्निश केलेले उद्योग,—या नाथांच्या अलौकिक भूताराधनयज्ञा-मुळें दीड हजार वर्षें विद्यापीठ म्हणून गाजलेल्या पैठणास नाथांनीं स्वगुणांनीं धर्मपीठाच्या योग्यतेस चढविलें आहे !

## ३ एकनाथ व तुळशीदास.

नाथांचें पणजे भानुदास यांची ओळख आपणांस पूर्वीच झाली आहे 'धन्य निजभाग्याची लीला। आलों वैष्णवकुलां जन्मोनी' याचें नाथांस समाधान वाटे! 'मी जन्मलों धन्य वंशीं। म्हणोनी हरिभक्ति आह्मांसी। संतसोइरे निजसुखासी। वंश कृष्णासी निरविला' असें नाथांनीं रुक्मिणी-स्वयंवरांत म्हटलें आहे. शके १४५४ ला यमुनेच्या तीरीं तुळसीदासांचा जन्म झाला व त्याच्या आंतबाहेर इकडे गोदावरीच्या तीरीं एकनाथ जन्मले. नाथांचा भागवतग्रंथ काशीक्षेत्रीं श. १४९६ मध्यें निर्माण झाला व याच वर्षीं अयोध्येंत तुळसीदासांच्या रामायणास प्रारंभ झाला! ह्या महा-वैष्णवांच्या गंगेच्या तीरावर गांठीभेटी झाल्या असतील. दोघेही 'अभुक्त' मूळनक्षत्रावर जन्मले व दोघांचेही आईबाप एका वर्षांतच आटोपले! 'जननीजनक त्यजों जनमी' असें तुळसीदास ह्मणतात व 'मुळीच्या मुळीं एका जन्मला' असें नाथ ह्मणतात! नाथांचा पुढील अभंग गाथ्यांत नाहीं पण मला पैठणांत ३० वर्षांपूर्वीं एका जुन्या वाडांत नाथांच्या वाडयांतच मिळाला. अभंग गमतीचा आहे:—

**मुळीच्या मूळीं एका जन्मला। मायबापें थोर धाक घेतला॥ १॥**
**कैसें मूळनक्षत्र आलें कपाळा। स्वयें लागलों दोहींच्या निर्मूळा॥२॥**
**शांती करितां अवघ्यांची झाली शांती। मूळीं लागोनीयां लाविली ख्याती**
**एका जनार्दनी मूळीच्या गोष्टी। मायेसगट सकळा बापाचे घोटी॥४॥**

ह्या अभंगांत साध्या गोष्टीबरोबर नाथांनी अध्यात्मही सांगितलें आहे. मायबापांचा जन्मतःच ग्रास करून एकनाथ उर्वरित राहिला! माय प्रकृति व बाप पुरुष ह्या दोघांनाही गिळून राहिलेला जो 'एकीएक' पर-मात्मा तोच एकनाथ होय! एकनाथ हा 'मूळमायेचें मूळ' जें परब्रह्म येथें जन्मला. तेंच तो! मुळीं लागून म्हणजे आत्मस्वरूप होऊन! मूळ नक्षत्रीं जन्मलेलें मूल अशुभ समजतात व आईबापांच्या दृष्टीनें तें खरेंच आहे, तथापि एकनाथ व तुळसीदास यांच्यासारखीं लोकोत्तर मुलें मूळाला जाऊन भिडलीं व ह्मणूनच तीं जगाला शुभदायक झालीं!

नाथ सात वर्षांचे झाले तेव्हां त्यांची मुंज झाली. श्रद्धापूर्वक स्नानसंध्या करून त्यांनीं सूर्यास नमस्कार घालावे. देवधर्म ह्याविषयीं प्रेमादर, सत्याची आवड, स्वभावाचा मोकळेपणा, भजनप्रेमामुळें तहानभूकेचेंही विस्मरण, प्रिय व मधुर भाषण, नम्रता व दुसऱ्यावर उपकार करण्याची बुद्धि हे सद्‌गुण नाथांच्या ठिकाणीं सहज उद्‌भूत झाले होते व ते त्यांच्या वयाबरोबर वाढतच गेले. निरभिमानिता व शांति त्यांच्या अंगीं बालपणापासून प्रगट दिसत. भानुदासांच्या पवित्र कुळाचा हा एकुलता एक तंतु अवशिष्ट राहिलेला ह्मणून पैठणचे लोक त्यावर फार प्रेम करीत. एकनाथ उपजत भक्त होते. 'जन्मोनी' ह्म० जन्मापासूनच हरिसेवा त्यास प्रिय होती. 'जन्मोनी संसारीं झालों त्याचा दास। माझा तो विश्वास पांडुरंगीं' असें त्यांनीं एका अभंगांत ह्मटलें आहे. भागवतांतही (अ. १४) 'निज-भाग्याची परमजोडी। महासुखाची आवडी गाढी। सकळ गोडियांची गोडी। भक्ति रोकडी हरीची'—ती आपणांस उपजत लाभल्याचें नाथ सांगतात. नाथांचा विद्याभ्यास पैठणास घरींच झाला, पण त्यांना अध्यात्म-ज्ञानाची जोड जनार्दनस्वामींपासून झाली. ते १२ व्या वर्षी देवगडास जाऊन जनार्दनस्वामींच्या संगतींत राहिले व कृतार्थ झाले. जनार्दन-स्वामींच्या चरित्रांत आपण हें सर्व पाहिलें आहे.

---

## ४ नाथांचा गृहस्थाश्रम.

गुर्वाज्ञेनें नाथांनीं गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला. त्यांना भार्या अत्यंत अनुरूप मिळाली. नाथांच्या संसाराला अगदी पाहिजे अशी धर्मपत्नी मिळाली. मनामिळाऊ, गृहकार्यांत दक्ष, उदार मनाची, दयाळु, धर्मकार्यांत पुढें पाय अशी भार्या सती जोडीला मिळाली तरच संसार ब्रह्मरूप होतो. आबाल-वृद्धांशीं उदार प्रेमानें वागण्यांत व भूतदयेच्या सर्व कार्यांत तिचें पाऊल नाथांच्याही पुढें असे! ती कष्टाळु व दयाळु माउली सर्वांच्या धन्यवादांस पात्र झाली. दाराशी आलेला अतिथी तिनें केव्हांहि विन्मुख धाडला

नाहीं. रात्रीं अपरात्रीं चूल पेटवून क्षुधितांस जेऊं घालण्यास ती केव्हाही कंटाळली नाहीं. देवानें अन्नवस्त्राला उणें पाडलें नाहीं हें जितकें नाथांच्या तितकेंच गिरिजाबाईच्याही पुण्याईचें फळ होय. नाथांचें घर शांतिसुखाचें आगर झालें. संसारश्रांत जीवांच्या विश्रांतीचें तें स्थान झालें. गिरिजाबाई नाथांच्या श्रेष्ठ भूमिकेशीं समरसता पावली. हा लक्ष्मीनारायणाचा जोडा एकचित्तानें, उदार प्रेमानें, प्रपंचपरमार्थ एकमय करून आनंदानें नांदत असतांना पाहून लोकांस मोठें समाधान वाटे. नाथांचा गृहस्थाश्रम जगाला कित्ता देण्यासारखा अपूर्व झाला. मनासारखी सुंदर व अनन्य पत्नी; कोणापुढें हात पसरावयाला नको व कोणी हात पसरायला आला तर त्याला विन्मुख धाडायला नको इतकी अनायासें निरंतर घरीं नांदणारी संपत्ति; स्वगृहे ' अनृणी व अप्रवासी ' राहून पांचपन्नास माणसें पंक्तीला घेऊन जेवण्याइतकी अनुकूलता; मुलेंबाळें व व्याहीजांवई यांची व येणाऱ्याजाणाऱ्या अतिथींची शुश्रूषा; लौकिकांत भलाई व घरांत नित्य शांतिसमाधानाचें साम्राज्य; यापैकीं एखादीही गोष्ट प्रपंचांत जुळली तरी आपण तें भाग्याचें लक्षण आहे असें मानतों; मग या सर्व गोष्टींची अनुकूलता असून स्वधर्म आणि भूतदया यांच्या प्रेरणेनुसार वागतां येणें व संसार ब्रह्मरूपतेनें भोगणें याही गोष्टींची जोड मिळाल्यास त्या भाग्याला काय पार आहे ? नाथांना गृहस्थाश्रमांत हें सर्व साधलें. वैष्णवांच्या कुळांत जन्म, बालपणीं लौकिकविद्येचा लाभ व बारा वर्षें जनार्दनस्वामींसारख्या सत्पुरुषांचा सहवास घडून अलौकिक अशा ब्रह्मविद्येचाही लाभ, व थोडेसें तीर्थाटण याप्रमाणें कृतविद्य झाल्यावर गृहस्थाश्रमाचा स्वीकार असा नाथांच्या संसाराचा आरंभच गोड झाला.

नाशवंत संसारांत राहून त्यांनीं अविनाशीपद जोडलें व त्याचें सुख जगाला वांटून दिलें. कांहीं साधु ( ज्ञानेश्वररामदासांसारखे ) संसारांत न पडतां मोकळेच राहिले, कांहींनीं ( तुकोबासारख्यांनीं ) संसार करूनही देव जोडला पण लौकिकदृष्टीनें तरी त्यांच्या संसाराचा फजीतवाडा

झाला. नाथ संसारीं राहून ब्रह्मविद्वरिष्ठांच्या कोटींत गेले. मला वाटतें कलियुगांतच काय पण चारही युगांत नाथांच्या ब्रह्मरूप झालेल्या गृहस्थाश्रमाला तोड नाहीं. लोकांनीं त्यांना धन्यवाद दिले व देत आहेत. अशा सर्व दृष्टींनीं नाथांचा गृहस्थाश्रम अपूर्व झाला यांत संदेह नाहीं.

---

## ५ कीर्तनें व प्रवचनें.

**कीर्तन** आणि **प्रवचन** हें लोकशिक्षणाचें व लोकोद्धाराचें महाद्वार आहे. गिरिजाबाईच्या संसारसुखाची मांड उत्कृष्ट झाली तेव्हां नाथांनीं स्वगृहीं परोपकारार्थ कीर्तनप्रवचनांची पाणपोई सुरू केली. ज्ञानेश्वरी, भागवत, रामायण इ. ग्रंथांवर त्यांनीं नित्य पुराण सांगावें व प्रहररात्र उलटल्यावर कीर्तनास उभें ठाकावें. कीर्तन व नामस्मरण यावर नाथांचे शेकडों अभंग आहेत. कीर्तनानें आबालवृद्धांच्या चित्तवृत्ति प्रसन्न होतात. योगयागादि तपसाधनें 'कीर्तनें पोरटीं केलीं' असून 'कलियुगीं नामस्मरणें। जड उद्धरणें कीर्तनीं' हा कीर्तनाचा प्रताप आहे. 'सबाह्य अभ्यंतरीं। देव प्रगटे चराचरीं। दुजें देखावया संसारीं। सर्वथा उरी उरेना' ( भागवत अ. ५ ) रामजन्म, कृष्णाष्टमी, महाशिवरात्र, एकादश्या, आषाढी-कार्तिकीच्या वाऱ्या अशा पर्वविशेषीं कीर्तनाला विशेषच रंग चढत असे. संसारांत राहून अन्नदान व ज्ञानदान हीं दोन महाव्रतें नाथांनीं जन्मभर निरपेक्षप्रमानें पाळलीं. 'सगुणचरित्रें परमपवित्रें हरिचीं वर्णावीं' ह्या लोकप्रिय पदांत त्यांनीं ह्मटलें आहे—

**संतसंगें अंतरंगें नाम बोलावें ।**
**कीर्तनरंगीं देवासन्निध सुखेंचि डोलावें ॥ २ ॥**

भक्तिज्ञानाविरहित गोष्टी कीर्तनांत आणूं नयेत, हरीची मूर्ति श्रोत्या-वक्त्यांच्या अंतरीं ठसेल असेंच प्रतिपादन करावें.

**अद्वय भजनें अखंड स्मरणें वाजवि करताळी ।**
**एका जनार्दनीं मुक्ति होय तात्काळीं ॥ ५ ॥**

---

## ६ काशी व पंढरी.

नाथभागवताचा रचनाकाल शके १४९२ ते शके १४९५ चा कार्तिक असा साडेतीन वर्षांचा दिसतो. शके १४९२ च्या पूर्वार्धांत पैठणास पंचाध्यायी झाली. ह्या पंचाध्यायीची एक प्रत त्यांच्या कोणी शिष्यानें काशीक्षेत्रीं नेली. तेथें मणिकर्णिकेच्या घाटावर तो ती नित्यनेमानें वाचीत असतां तेथील कोणी अधिकारी संन्याशानें तिच्या वाचनाला प्रतिबंध केला. 'श्रीमद्भागवतासारखा सर्ववंद्य ग्रंथ आणि तो मराठी भाषेंत! अब्रह्मण्यम्!' असें वरील संन्याशास व तेथील कांहीं शास्त्रीपंडितांस वाटलें म्हणून त्यांनीं नाथांस काशीस बोलावून नेलें. तेथें शास्त्रीपंडितांनीं बसून नाथांच्या पंचाध्यायीचें परीक्षण केलें, तेव्हां ग्रंथार्थ अगदीं बिनचूक असून ग्रंथ महाप्रासादिक आहे असें सर्वानुमतें ठरलें. नाथांना काशीस राहून एकादश पूर्ण करावा अशी सर्वांनीं विनंति केली. नाथांनीं भागवताचे अध्याय लिहावेत आणि त्यावर मणिकर्णिकेच्या घाटावर पंचमुद्रापीठांत ह्य. श्रीदत्तपादुकांसमोर त्यावर पुराण सांगावें असा नित्यक्रम सुरू झाला. मध्यंतरीं त्यांनीं आपलें रुक्मिणीस्वयंवर लिहिलें. त्याचा रचनाकाल त्यांनीं शके १४९३ रामनवमी असा दिला आहे. इकडे नाथभागवत चालूच होतें. त्याचा समाप्तिकाल त्यांनीं शके १४९५ कार्तिक असा दिला आहे. म्हणजे नाथांचा वास काशीस शके १४९२ च्या कार्तिकापासून तों १४९५ च्या कार्तिकापर्यंत होता. काशीस भागवत-ग्रंथावर पुराण चाले व रात्रौ कीर्तन चाले. काशीच्या लोकांस नाथांनीं आपल्या उज्ज्वल चारित्र्यानें व प्रासादिक वाणीनें अगदीं मोहून टाकलें.

नाथांच्या भागवताचा काशीक्षेत्रीं मोठा जयजयकार झाला. नाथांचे भागवत व रुक्मिणीस्वयंवर हे दोन्ही ग्रंथ 'वाराणशी मुक्तिक्षेत्रीं। मणिकर्णिका महातीरीं' समाप्त झाल्याचें नाथांनींच स्वतः लिहिलें आहे, यावरून तीन साडेतीन वर्षें नाथांचें काशीस राहणें झालें. हें उघड दिसतें. भागवतसमाप्तीनंतर नाथभागवताची अस्सल प्रत पालखींत ठेवून

तिची काशीभर थाटांत मोठी मिरवणूक निघाली. घाटावर मोठी समाराधना झाली. नाथांचा काशीक्षेत्रभर मोठा जयजयकार झाला.

पुत्र हरिशास्त्री यांचा रुसवा काढून टाकून त्यांना परत पैठणास नेण्यासाठीं म्हणून नाथांना वृद्धपणीं म्ह० शके १५१० च्या सुमारास पुन्हा एकदा काशीस जावें लागलें.

नाथांच्या घराण्यांत पंढरीची वारी भानुदासांच्या पूर्वीपासूनचीच होती. नाथ पंढरीस निघाले कीं त्यांच्याबरोबर हजारों लोक निघायचे. नाथांचे पंढरी, विठ्ठल, संत व नामस्मरण यावर हजारो अभंग आहेत. येथें २ च देतों.

( १ )

**उदंड क्षेत्रांची पाहिली रचना । पंढरी ते जाणा भूवैकुंठ ॥ १ ॥**
**तीर्थ आणि देव संतसमागम । ऐसें सर्वोत्तम कोठें नाहीं ॥२॥**
**पंढरीसारिखें तीर्थ महीवरी । न देखों चराचरीं त्रैलोक्यांत ॥३**
**एकाजनार्दनीं सुखाची विश्रांती । पाहतां विठ्ठलमूर्ति लाभ बहू ॥ ४ ॥**

( २ )

**आवडीनें भावें हरिनाम गावें । सप्रेम नाचावें कीर्तनरंगीं ॥ १ ॥**
**तरती तरती तरती संसार । आणिक विचार दुजा नाहीं ॥ २ ॥**
**एकाजनार्दनीं भावाचें माहेर । तरिजे संसार क्षणमात्रें ॥ ३ ॥**

पंढरीच्या वारीचा प्रघात ज्ञानेश्वरनामदेवांच्या पूर्वीपासून महाराष्ट्रांत रूढ होता. त्यांच्या वेळीं विठ्ठलभक्तीनें सारा देश कसा दुमदुमून जात असे हें आपण पहिल्या खंडांत पाहिलें आहे. त्यानंतर **नाथाएवढा** अधिकारी व लोकप्रिय महंत वारकऱ्यांस कोणी मिळाला नव्हता. नाथांपासून पंढरीच्या व आळंदीच्या यात्रेस अतिशय तेज आलें. तिचा प्रघात अधिक लोकांत पसरत गेला. नाथांच्या पाठोपाठ तुकोबाराय आल्यामुळें पंढरीच्या यात्रेची लोकप्रियता बेसुमार वाढली. नाथांचा काशीक्षेत्रीं शास्त्रीपंडितांनीं जयजयकार केला व पंढरीस वारकऱ्यांचे तर ते कंठमणिच झाले. काशीच्या विद्वानांस त्यांनीं भक्तिसुख चाखविलें

व पंढरीच्या वारकऱ्यांस त्यांनीं वर्णाश्रमाच्या योग्य मर्यादेंत ठेऊन त्यांचा उद्धार केला. जाणत्यानेणत्यांना त्यांनीं अद्वैतभक्तीला लावलें.

---

## ७ ज्ञानेश्वर व नाथ.

ज्ञानेश्वरी नाथांचा अत्यंत आवडता ग्रंथ. बाळपणीं गुरुसेवेंत असतांन गुरुमुखानें त्यांना ज्ञानेश्वरी ऐकावयास मिळाली. प्रौढपणीं त्यांनीं ज्ञानेश्वरीवर पुराणें व प्रवचनें सांगितलीं, कीर्तनांतही ते ज्ञानेश्वरांच्या सुधामधुरवाणीचा पुरस्कार करीत. प्रौढवयांत ज्ञानेश्वरीची एक अपूर्वसेवा त्यांच्या हातून व्हावयाची होती व त्यासाठीं ज्ञानेश्वरांनींच एक मौजेचा प्रसंग घडवून आणला.

एके दिवशीं नाथांचा घसा सुजून दुखूं लागला. औषधोपचार झाले पण सूज उतरेना. तिसरे दिवशीं ज्ञानेश्वरमहाराजांनीं स्वप्नदृष्टांत देऊन त्यांस सांगितलें कीं, ' माझ्या मानेस अजानवृक्षाच्या मूळीचा गळफांस बसला आहे येवढा येऊन तूं काढ म्हणजे तुझा घसा बरा होईल. ' नाथ बरोबर मोठा समुदाय घेऊन आळंदीस गेले. तेथें तेव्हां अगदी बस्ती नव्हती. गर्द झाडी होती. मंडळीस दूर अंतरावर बसवून एकटे नाथ त्या घोर वनांत शिरले व त्यांनीं समाधिस्थान शोधून काढलें. मस्तकाला मुळी लागल्याचें मिष करून श्रीज्ञानेश्वरांनीं नाथांस दर्शन दिलें. हें नाथांनीं अभंगांत स्पष्ट सांगितलें आहे. नाथ समाधीच्या बाहेर आल्यावर पुढें लोकांनीं चुनेगच्चीनें त्याचें द्वार बुजवून टाकलें. श. ( १५०५ ).

' ज्ञानेश्वरएकनाथांचा संबंध अगदीं निकटचा आहे. त्या दोघांत जरी कालानें तीनशें वर्षांचें अंतर आहे तरी सर्वच बाबतींत ते सर्वस्वी एकरूप आहेत. संस्कृत भाषेच्या प्रासादात अडकून पडलेलें ज्ञानभांडार दोघांनींही उघड्या मैदानावर आणून आब्राह्मणचांडाळ सर्व लोकांकडून लुटविलें आहे; ज्ञानभक्तीचे दरवाजे सर्वांसाठीं सताड उघडे ठेवले आहेत; दोघां-

चेही ग्रंथ निस्सीम गुरुभक्तीनें ओथंबलेले आहेत; दोघांच्या ग्रंथांची विचारसरणी एक, उपमारूपकादि अलंकारांची धाटणी एक, भाषासरणी बव्हंशी एक, कृष्णभक्ति एक, शब्दरचना व वाक्यरचनाही एकाच विशिष्ट प्रकारची! दोघांत इतकें पूर्ण ऐक्य आहे कीं, 'ज्ञानाचा एका' अशी म्हणच पडून गेली आहे. नाथांचें ज्ञानेश्वरस्तुतिपर अनेक अभंग आहेत. नाथ म्हणतात कीं ज्ञानेश्वरांकडून आलेला 'उच्छिष्ट कवळ' मी सेवन केला व तेंच ज्ञान लोकांस देत आहे. नाथांनीं ज्ञानेश्वरीच्या जुन्या प्रती शोधून एक उत्कृष्ट प्रत लोकांच्या हातीं दिली. नाथांच्या वेळेपासून आळंदीच्या यात्रेचा प्रघात पडला. नंतर लौकरच आंबेकर देशपांडे यांनीं श्रीज्ञानेश्वरांचें मंदिर बांधलें. पुढें तुकोबांनीं आळंदीची महिन्याची वारी पत्करली. आळंदीच्या वारीस नाथांनीं चालना दिली व तुकोबांनीं ती चालविली.

---

## ८ नाथांची गुरुभक्ति

नाथांच्या चारित्रांत आणि वाङ्मयांत त्यांची निःसीम गुरुभक्ति ही अत्यंत महत्त्वाची बाब आहे. त्यांनीं कायावाचामनें व जीवेंप्राणें गुरुसेवा अपूर्व केली व या सेवेचें फळही त्यांना अपूर्वच मिळालें. ज्ञानेश्वरांची गुरुभक्ति नाथांसारखीच अत्यंत जिव्हाळ्याची होती पण त्यांना गुरुसंगति अल्पकाळ लाभली. नामदेवांना संतांच्या आग्रहावरून विसोबाखेचराचा अनुग्रह घ्यावा लागला व तुकोबांनीं 'मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश' आणि तोही त्यांना 'आवडीचा रामकृष्णहरी हा मंत्र' गुरूंनीं सांगितला यापेक्षां कांहीं अधिक सहवास झाला असें दिसत नाहीं. सद्गुरुकृपेवांचून परमात्मा जोडत नाहीं असा श्रुतिशास्त्रांचा सिद्धांत आहे व राम आणि कृष्ण या भगवदवतारांपासून तो विवेकानंदरामतीर्थांपर्यंत अनुभवानें तो खराच ठरला आहे. नाथांना वयाच्या १२ व्या वर्षी जनार्दनस्वामींचा संगलाभ झाला व यानंतर ३५-४० वर्षेपर्यंत त्यांचे गुर

हयात होते ! गुरुसहवासाचा पूर्ण आनंद त्यांना भोगायला मिळाला. ज्ञानेश्वरांना गुरुसहवासाचें व गुरुसेवेचें सुख दीर्घकाल भोगतां आलें नाहीं तें पोटभर भोगतां यावें म्हणून त्यांनींच नाथांचा अवतार घेऊन आपली मनीषा तृप्त करून घेतली ! गुरुमुळें देव जोडला असें नसून गुरुरूपानेंच देव प्रत्यक्ष झाला अशी नाथांची बुद्धि होती. वेद तो आह्मां जनार्दन, शास्त्र जनार्दन, पुराण जनार्दन, योग जनार्दन, तप जनार्दन, कर्मधर्म सर्व कांहीं जनार्दन आहे असें नाथ कां म्हणतात व गुरुसेवेंत परमपुरुषार्थ कां मानतात हें निःस्सीम गुरुभक्ताशिवाय यथार्थ कोण जाणूं शकेल ? ‘ गुरूचें नाममात्र तेंचि आमुचे वेदशास्त्र ’ नाथांनीं ‘ वेदांत सिद्धांत पाहणें ते आटी । जनार्दनभेटी निरसली ’ असें म्हटलें आहे. गुरुसेवा, गुरुकृपा व गुरुभक्ति यांवर त्यांचे शेंकडों अभंग पदें वगैरे असून सर्व ग्रंथात त्यांनीं गुरुगौरव अत्यंत प्रेमपूर्वक केलें आहे. ‘मनोभाव जाणुनि माझा । सगुणरूप धरिलें वोजा–’ परब्रह्मच आह्मा हितासाठीं जनार्दनरूपानें प्रगट झालें आहे. स्वामींनीं ‘ दाविला देहातीत देव मज ’ ‘ दाखविलें ब्रम्हभुवन ’ ‘ मज अंगींचि ब्रह्म केलें ’ इ० इ०

**( १ ) सेवेसी आवडी । आराम नाहीं अर्धघडी ॥ १ ॥**
**नित्य करितां गुरुसेवा । प्रेमपाडिभर होत जीवा ॥ २ ॥**
**आळस येवोंचि सरला । आराणुकेचा ठाव गेला ॥ ३ ॥**
**तहान विसरली जीवन । भूक विसरली मिष्टान्न ॥ ४ ॥**
**ऐसें सेवे गुंतलें मन । शरण एका जनार्दन ॥ ५ ॥**

**( २ ) दृष्टी देखे परब्रह्म । श्रवणीं ऐके परब्रह्म ॥ १ ॥**
**रसना सेवी ब्रह्मरस । सदाआनंदें उल्हास ॥ २ ॥**
**गुरुकृपेचें हें वर्म । जग देखे परब्रह्म ॥ ३ ॥**
**एकाजनार्दनीं चराचर । अवघें झालें परात्पर ॥ ४ ॥**

सद्गुरुवीण ब्रह्मज्ञान ’ ही गोष्टच होणें नाहीं. डोळा देखणा खरा पण सूर्याच्या साह्यावांचून तो सिद्धवस्तुही पाहूं शकत नाहीं; नाव तारतें हें खास पण तारक–कर्णधार अवश्य पाहिजे; चांगला पाऊस पडून भूमि

मृदु झाली व बीजांनीं कणिंगही भरली पण जाणत्यानें पेरणी केली तरच पिकाची आशा; अवचित रत्न सांपडलें तरी रत्नपारख्याला दाखवूनच खऱ्याखोट्याची पारख करून घ्यावी लागते! हे चार दृष्टांत देऊन नाथ सांगतात कीं श्रद्धेनें श्रीगुरूला शरण जाऊनच त्यांजकडून निजसुखानुभव घेतां येतो. 'जो शब्दज्ञानें पारंगतु। ब्रह्मानंदें सदा डुल्लतु। शिष्यप्रबोधनीं समर्थु। यथोचितु निजभावें–' शब्दशास्त्रांत निष्णात आहे, अनुभवी आहे, व ज्याची प्रबोधशक्ति उत्तम आहे तोच गुरु शिष्यास कृतार्थ करण्यास समर्थ होतो. 'आपल्या योगक्षेमाचें सांकडें। स्वप्नींही न घाली शिष्याकडे' असा तो निर्लोभ असतो.

**देहीं असोनि नाहीं अहंकृती। गेहीं असोनि नाहीं गृहासक्ति।**
**शेखीं लोकांमाजी लौकिकस्थिती। सुखें वर्तती लोकांसारिखे॥ ३०८**
**ऐसिया पूर्णप्रतीती। आचरोनि दावी हरिभक्ती।**
**हरि भजावा सर्वाभूतीं। हेंच शिष्यांप्रती उपदेशी॥ ३१०॥ ( भा. )**

गुरूला कल्पतरु म्हणावें तर कल्पतरु फक्त कल्पिलेलेंच दान देतो, पण गुरु निर्विकल्पाचेंही ज्ञान देतो आणि तेंही पुन्हां निर्लोभत्वें! चिंतामणि चिंतावें तें देतो पण गुरु चिंता निवारून चिंता करणारें चित्तच चैतन्यस्वरूप करितो! गुरु आणि ब्रह्म समान आहेत, पण हेंही बोलणें लंगडेंच पडतें, कां कीं गुरुवचनामुळें ब्रह्माचें ब्रह्मपण प्रतीतीला येतें नाहींतर ब्रह्म शाब्दिकांच्या शब्दांतच राहिलें असतें! गुरूहून पूज्य कांहींच नाहीं, तात्पर्य: 'चालतें बोलतें ब्रह्म पूर्ण। सद्गुरुचरण साधका' ( अ० १२ ओवी ४७८ ते ४९४ ) गुरुसेवेचें मर्म पुढेंच ( ओवी ४९५–५९० ) सांगितलें आहे.

नाथ स्वानुभव सांगतात कीं देव माझ्या गुरुभक्तीला भाळला, माझ्या चित्तांत घुसून माझें अहोरात्र खेळणें होऊन राहिला आहे! (अ०१४)

**उपेक्षुनियां निजमुक्ती। एकाजनार्दनीं पढिये भक्ती।**
**त्याचेनि प्रसादें भगवत्प्राप्ती। झाले अहोरात्रीं खेळणें॥ ५४४॥**

**तो जरी भगवत्प्राप्ती नेघे । तरी ते द्वाढूनि घर रिघे ।**
**ऐसे गुरुभक्तीचेनि योगें । देवो सर्वांगें भूलला ॥ ५४५ ॥**

मोक्षाचीही उपेक्षा करून मी भक्तिसुखच प्रिय मानलें. ' सद्गुरुकृपा हातीं चढे । तेथें भक्तीचें भांडार उघडे । तेव्हां कळिकाळ पळे पुढें । कायसें बापुडे भवभय ? ' ( भाग० अ० २ – ४८४ ).

ज्ञानेश्वरीचीं तशींच नाथभागवताचीं मंगलाचरणें गुरुभक्तीनें ओतप्रोत भरलेलीं आहेत. येथें दिग्दर्शन मात्र करितों. तिसऱ्या व पंधराव्या अध्यायांत गुरुचरणाचें वंदन, सद्गुरु **ज्योतिषी** ( अ०८ ), सद्गुरु **अमरपति** ( अ० ९ ), सद्गुरु **धन्वंतरी** ( अ० १० ), सद्गुरु **सच्चिद्घन** ( अ० ११ ), सद्गुरु **वसंत** ( अ० १२ ) सद्गुरु **हंस** ( अ० १३ ), सद्गुरु **क्षीरसागर** ( अ० १४ ), सद्गुरु **महामेरु** ( अ० १७ ), सद्गुरु **चित्समुद्र** ( अ० २० ) सद्गुरु **खांबसूत्री** ( अ० २२ ), सद्गुरु **विश्वरूप** ( अ० २३ ), सद्गुरु **गुणातीत** ( अ० २४ ). हीं सारींच मंगलाचरणें अत्यंत बहारीचीं आहेत. हीं सारीं रूपकें व्यापक, पूर्ण व गोड आहेत. हीं गुरुगौरवाच्या, कविकल्पनेच्या व भाषासौंदर्याच्या अशा तिहेरी दृष्टीनें पाहिलें तरी अत्यंत बहारीचींच वाटतात.

---

## ९ निंदकछलकांविषयीं बुध्दिसाम्य.

नाथांच्या कीर्तनपुराणांचा लोकांच्या मनांवर उत्तम परिणाम होऊन पैठणास परमार्थचर्चा व नामस्मरण यांत लोक इतके गढून गेले कीं सकाम व्रतादिकांकडे त्यांचें दुर्लक्ष होऊन कित्येकांचे पोटावर पाय आले ! खऱ्याच्या तेज्यापुढें खोटें फिकें पडतें व अस्सलापुढें नक्कल हिणकस ठरतें, त्याप्रमाणें आंतबाहेर एकरूप अशा ह्या भागवतापुढें पैठणचे वैदिक, पंडित, हरिदास, संन्यासी, भिक्षुक व सर्व विद्वान् निस्तेज झाले व त्यांपैकीं कांहीं त्यांचा द्वेष करूं लागले. द्वेषाचा परि-

णाम निंदेत व निंदेचा छळांत झाला. हा देववाणीचा उपमर्द करून प्राकृतांत ग्रंथ करितो, कर्मठपणाचा उच्छेद करून लोक नामस्मरणानेंच गुंग करून वेडे करितो, सकामव्रतादिकांचा उपहास करून निष्काम प्रेमाचेंच स्तोम माजवितो, ह्याच्यामुळें वेदशास्त्रांपेक्षां भक्तिमार्गाचेंच बंड माजत चाललें आहे, याच्या उपदेशानें 'प्रपंचरीती सांडिली बहुतीं। विचरती आत्मस्थिती। आमच्या गोष्टी न मानिती। लोकीं प्रवृत्ति बुडाली' असा प्रकार झाला आहे, हा हीनवर्णांना व अंत्यजांना जवळ करितो व त्यामुळें ब्राम्हणांची शोभा रहात नाहीं, हा ब्रम्हज्ञान चव्हाटयावर सर्वांस सारखें देत असल्यामुळें ब्राम्हणांचें व गुरूंचें महत्त्व कमी होतें, इत्यादि आक्षेप नाथांवर होते. नाथांचें सत्यज्ञान ज्यांच्या जीविकेच्या आड येत असे ते त्यांचा द्वेष करूं लागले, तथापि खोटयाची त्यांनीं भीड धरिली नाहीं व खरें सांगायला ते भ्याले नाहींत. नाथ ब्राम्हणभक्त, पण नास्तिक, दुराचारी, ढोंगी असे जे कोणी ब्राम्हण होते त्यांची त्यांनीं गय केली नाहीं. हरिभक्ति व सदाचार या गुणांनाच नाथांच्या दरबारीं मान असे. हरिभक्त महार त्यांना नास्तिक ब्राम्हणापेक्षां अधिक प्रिय असे. ब्राम्हण म्हणूनच ब्राम्हणाला कवटाळणें किंवा हेटाळणें आणि महार म्हणूनच महाराला जवळ किंवा दूर करणें हे दोन्ही अहंकार त्यांना शिवले नाहींत! देहभावाला गिळून बसणारे जे उच्चकोटीचे महात्मे असतात ते जाति-भावनेच्या पलीकडे असतात. लोक आपल्याविषयीं काय तर्क काढतात याविषयीं नाथानीं भागवतांत मौजेनें (अ० ३१) सांगितलें आहेः—

**एका जनार्दनाचा वृत्तांत। एक म्हणती 'भक्तियुक्त'।**
**एक म्हणती 'जीवन्मुक्त'। 'प्रपंची' निश्चित मानिती एक**
**"अहो! हा एकाजनार्दन। नाहीं आसन, न देखे ध्यान,।**
**नेम मुद्रा माळा जाण। उपासनालक्षण या नाहीं! ॥ ५०७ ॥**
**कोण मंत्र असे यासी?। काय उपदेशी शिष्यांशीं?॥**
**मंत्र न दे कोणासी। भुललीं भाविकें त्यासी या भावार्थें ॥५०८**
**नुसत्या हरिनामाचा घोष। लावूनि भुलविले येणें लोक"।—**

**ऐसे नानाविकल्प । जनार्दन देख उपजवी स्वयें ! ॥ ५०९ ॥**

नाथांची अक्षोभ्य समता, क्षमाशीलता व शांति अलौकिक होती. अपकाऱ्यांवरही उपकार करणाऱ्या नाथांसारख्या महात्म्याचें छलक किंवा निंदक तरी काय वांकडें करणार ? निंदकछलकांनाही तुच्छ न करितां त्यांच्या उद्धाराचीच नाथांनीं चिंता वाहिली ! कर्मठांनीं वेळोवेळीं दिलेलीं प्रायश्चित्तें त्यांनीं समाधानानें घेतलीं, व निंदकांनाही गौरवून म्ह० त्यांना गुरुत्व देऊन त्यांच्या कल्याणार्थ ते झटले ! निंदक, छलक हे राहुकेतुप्रमाणें प्रत्येक थोर पुरुषाच्या मागे लागतात असा जगाचा इतिहास आहे. प्रत्येक थोर व्यक्तीला आपल्या थोरपणाबद्दल निंदारूपी कर जगाला द्यावा लागतोच असें ॲडिसननें म्हटलें आहे, व निंदकरूपी कुत्रीं कितीही भुंकलीं तरी तीं माझ्या यशोमंदिराचा एक चिराही उखडूं शकणार नाहींत असा जॉन्सनचा विश्वास होता; पण ह्या लौकिक ग्रंथाकारांपेक्षां ' निंदा म्हणजे परमामृत ' मानणाऱ्या व निंदकालाही गुरु म्हणून आवडून घेणाऱ्या नाथासारख्या महापुरुषाची भूमिका किती तरी उंचीची आहे ! ' येथ कोणाची करावी निंदा । कोणाच्या करावे गुणानुवादा । मीचि विश्व हें आलें बोधा । स्तुतिनिंदा निमाली '

भागवतांत ( अ० ३१ ) त्यांनीं म्हटलें आहे:—

**या ग्रंथा आदर करिती । अथवा जे कां उपेक्षिती ।**
**केवळ जे कोणी निंदिती । तेही आम्हां ब्रम्हमूर्ति सद्गुरुरूपें ॥५१९॥**
**हेंही शिकविलें जनार्दनें । ' सर्वभूतीं मजचि पाहणें ।**
**प्रकृतिगुणांचीं लक्षणें । सर्वथा आपणें न मानावीं ' ॥ ५२० ॥**
**शिष्याचे क्षोभ न साहवती । निंदकांची निंदा न जिरे चित्तीं ।**
**तें तो कोरडाचि परमार्थी । क्षोभें निश्चितीं नागवला ! ॥ ५२१ ॥**
**एवं पराचे प्रकृतिगुण । पाहतां सर्वथा क्षोभे मन ।**
**ते न पाहावे आपण । सर्वभूतीं चैतन्य पहावें ॥ ५२९ ॥**
**येणेंचि निर्धारें गुरु तो गुरु । आम्हां शिष्य तोही संवादगुरु ।**
**निंदक तो परमगुरु । निपराध सद्गुरु जनार्दनकृपा ॥ ५२३ ॥**

हिमनगराजांपुढें छोटया टेकड्या, त्याप्रमाणें नाथांपुढें प्राकृत ग्रंथकार व कवि ठेंगु दिसतात! 'अमानी मानदो मान्यो लोकस्वामी त्रिलोकधृक्' अशी विष्णुसहस्रनामांत एक पंक्ति आहे. स्वतः मानाची इच्छा नाहीं पण दुसऱ्याला मान देण्यांत तत्पर, तोच मान्यता पावतो, तोच लोकांचा 'नाथ' होतो, व त्रैलोक्यधारण त्याच्याच योगानें होतें.

## पद.

**निंदक कामाचा कामाचा । गडी आत्मारामाचा ॥ निंदक० ॥ ध्रु० ॥**
**निंदक आमुची गंगा । आमुचीं पातकें नेते भंगा ॥ निंदक० ॥ १ ॥**
**निंदक आमुचा सखा । आमुचीं वस्त्रें धुतो फुका ॥ निंदक० ॥ २ ॥**
**निंदक आमुची काशी । आमुचीं पातकें अवघीं नाशी ॥ निंदक० ॥ ३ ॥**
**निंदक आमुचा गुरु । एका जनार्दनी थोरु ॥ निंदक० ॥ ४ ॥**

सर्वभूतांसीं निर्वैर असलेले नाथ निंदकछलकांनाही गुरुतुल्य मानतात यांत त्यांची अलोट थोरवी दिसून येते. भावार्थरामायणांतही ( बालकांड अ० ४ ) ते म्हणतातः—

**ग्रंथ निंदिती अथवा वंदिती । ते दोघे आम्हां ब्रम्हमूर्ती ।**
**हे श्रीजनार्दनाची युक्ती । उपदेश एकांतीं निजगुह्यार्थ ॥ १७ ॥**
**कथा निंदिती वंदिती जनीं । ते माउली माझे दोनी ।**
**निंदक ते सखी जननी । मजलागूनी कृपाळू ॥ २१ ॥**

निंदक जननीपेक्षाही कृपाळु आहेत, कां कीं ती बाह्यमळ वरवर काढते पण निंदक अंतर्बाह्य सारा मळ आणि तो पुन्हा स्वमुखानें काढून टाकतात! 'यालागीं निंदकाचि तत्वता । साह्य सखा परमात्मा,' फार काय सांगावें? 'निंदा म्हणजे परमामृत' आहे. जो निंदा निर्द्वंद्व साहतो तो धन्य होय. 'जेथें निंदा सुखरूप समाये । त्याचे मस्तकीं वंदू पाये.'

## १० नाथांची ‘ निजशांति. ’

नाथांची ‘ निजशांति ’ अलौकिक होती. नाथांच्या शांतीच्या गोष्टी महाराष्ट्रभर प्रसिद्ध आहेत. उन्मत्त गजाला मारणारे किंवा सिंहाला धरणीवर पाडणारे वीर आहेत, पण ‘ कोप परम अपकारी । कोणी त्यावरी कोपेना ! ’ ‘ क्रोध एकला एक । चहूं पुरुषार्थघातक ’ हें काय कोणाला माहीत नाहीं ? ‘ क्रोध येतांच मानसीं । स्वधर्मकर्मा क्रोध ग्रासी । ’ क्रोधिष्ठ मनुष्य क्रोधाच्या भरांत स्वधर्म, कर्तव्यकर्म, आपली योग्यता, अर्थ, स्वार्थ, परमार्थ सर्वांना क्षणाधांत विसरतो. बंधुबंधु, नवराबायको, बापलेक, शेजारीपाजारी–क्रोधाच्या वावटळींत सांपडून आंधळे होतात व जन्माचे वैरी बनतात ! असा अनेक अपकार करणारा हा क्रोधशत्रु जो जिंकील तोच खरा वीर होय ( सुंदरकांड अ० ३७. ) अनेक जळसंभार घेऊन सरिता सागराला मिळते तरी सागर तिळभर डहुळत नाहीं; ‘ तैसा आलिया नाना ऊर्मी । ज्यासी गजबज नाहीं मनोधर्मी । ’ तोच खरा शांत होय. नाथांचा अवतारच संसाराच्या कचाट्यांत राहून मनुष्य परमशांत कसा राहूं शकतो हा आदर्श जगाला दाखविण्यासाठीं होता. ‘ जेवीं का नागवेलीची वेली । आधाराविण न वचे वेंगली । तैसी संतबळें शांति वाढली । मंडपा चढली चिन्मात्र. ’ ( एक० भाग० ११–९४६ ).

---

## ११. नाथांच्या साधुत्वाच्या गोष्टी.

नाथांच्या साधुत्वाच्या अनेक गोष्टी आहेत. त्यांपैकीं ठळक अशा १५–१६ गोष्टी मी आपल्या ‘ एकनाथचरित्रांत ’ दिल्या आहेत. ‘ सर्वाभूतीं भगवद्भाव ’ हें भागवतधर्माचें परम रहस्य नाथांच्या रहणींत पूर्णपणें उतरलें. ज्ञान सर्वांनाच कळतें पण ज्यांना कळून वळतें ते साधु. स्त्री, शूद्र आणि भाळेभोळे ह्म० अज्ञान व दुर्बळ लोक यांच्या उद्धाराची नाथांनीं अतिशय काळजी वाहिली. खरा लोकसंग्रह त्यांनीं

केला. ‘ अभेदभक्ति वैराग्यज्ञान । स्वयें आचरोनि आपण । देखीं लावावे इतर जन । लोकसंग्रह या नांव ’ ( भाग २९-८ ते १० ). वर्णाश्रमधर्म न सोडतां भूतदयेच्या ऊर्मी आचरणांत आणतांना त्यांना कर्मठांकडून थोडाफार छळ सोसावा लागला, पण त्यांनाही त्यांनीं गौरवून घेतले. वाटेंत एका देवडीवर एक यवन बसे. नाथांनीं स्नान करून यावें, व यानें त्यांच्या अंगावर चूळ टाकावी, नाथांनीं पुन्हां स्नानास जावें असा प्रकार १०८ वेळ झाला ! ‘ याच्या कृपेनें आपणांस गंगाबाईचीं इतकीं स्नानें घडलीं ’ असें शांतिब्रह्म नाथ उद्गारले ! नाथांची शांति भंग पावली नाहीं. अखेर तो बेताल यवन मनांत लाजला, त्याची माणुसकी जागृत झाली, व त्यानें नाथांच्या पायांवर लोटांगण घातलें ! एक दरिद्री ब्राह्मण द्रव्याच्या आशेनें पैठणास आला. कुटाळवंड्यावरील चार कुटाळांनीं त्याला सांगितलें कीं ‘ तूं एकनाथाला राग आण म्हणजे तुला ६०० रुपये देऊं ! ब्राह्मण नाथांच्या वाड्यांत ८ दिवस सत्कार घेत राहिला. नाथांना राग आणणें त्या ब्राह्मणास दुष्कर वाटलें. त्यानें शेवटीं गिरिजाबाई तूप वाढायला आल्या व ओणव्या झाल्या तेव्हां त्यांच्या पाठीवर टुण्दिशीं उडी मारली ! त्यासरसे नाथ गिरिजाबाईस म्हणाले: ‘ हं सांभाळ हो ! ब्राह्मण पडेल बिडेल एखादा ! ’ त्या धन्य सतीनें उत्तर केलें: ‘ आहे मला हरीला पाठीवर घेऊन काम करण्याची संवय ! मी ह्या माझ्या मोठ्या बाळाला अगदीं पाडायची नाहीं ! ’ तो ब्राह्मण गर्भगळित होऊन नाथांच्या पायां पडला. नाथांच्या वाड्यांत एकदां चोर शिरले. त्यांनीं बरेंचसें सामान ह्म० सोनेंनाणें, कापडचोपड, भांडींकुंडीं लांबविलीं ! नाथ देवघरांतून पहात होते. शेवटीं ते बाहेर आले व आपल्या हातांतील आंगठी त्यांच्या हातावर टाकली व हीही घेऊन जा म्हणाले ! पहांट झाली आहे तरी जेवून जा असा नाथानीं आग्रह केला, गिरिजाबाईनीं वाढले, चोरांचे शेवटीं साव झाले ! एक वेश्या त्यांच्या वाडयांत नित्य पुराणश्रवणास येत असे. भागवतांतलें

पिंगलेचें आख्यान ऐकून ती अनुताप पावली. नाथांच्या कृपेनें तिला पुण्यमार्ग लागला. धंदा सोडून ती ईश्वरचरणीं लागली व उद्धरून गेली. काशीची कावड घेऊन नाथ रामेश्वरास गेले. बरोबर शिष्यमंडळी होती. नाथ नामरंगांत रंगून सर्वांच्या पुढें चालले होते. वाळवंटांत एक गाढव गडबडा लोळतांना त्यांच्या दृष्टीस पडलें. त्याच्या पाठीला खांडकें पडलीं असून तापलेल्या वाळूच्या संसर्गानें त्याचा जीव घाबरला होता. त्याला उठवत नव्हतें. नाथांनीं करुणेनें त्याच्या तोंडांत कावडींतलें गंगोदक घातलें. गाढव हुषारी येऊन चालूं लागलें. नाथ आनंदानें म्हणाले : 'माझा रामेश्वर मला येथेंच भेटला !' तुरुंगांतून आजाराला कंटाळून पळून आलेल्या एका महाराला नाथांनीं आश्रय दिला. त्यास पथ्यपाणी देऊन तीन महिने सांभाळले. बरा झाल्यावर तो घरीं गेला. रात्रीं कीर्तनाच्या गर्दींत एक वडारी नाथांच्या वाडयांत घुसला व कोणी पाहत नाहीं असें पाहून नाथांच्या शयनागारांत त्यांच्या पलंगावर जाऊन तो फार मऊ लागल्यामुळें टेंकला व झोपीं गेला ! कीर्तन संपल्यावर नाथांनीं हें पाहिलें व त्याच्या अंगावर शालजोडी घातली. बारा तास स्वस्थ निजल्यावर तो जागा झाला व घाबरला. नाथांनीं प्रेमळ वाणीनें त्याला जेवायला घातलें व वस्त्रपात्र देऊन घरीं पाठविलें. त्याला नाथांची धन्यता वाटली. पितरांसाठीं केलेलें श्राद्धान्न महारांना वाढणें; लाळशेंबडांनीं भरलेलें व तापलेल्या वाळवंटांत तळपणारें महाराचें पोर उचलून घेऊन त्याला स्नान घालून महारवाडयांत जाऊन त्याच्या आईबापांच्या स्वाधीन करणें; पैसा हाच देव मानून अहोरात्र द्रव्यसंपादनांत मग्न असणाऱ्या एका वाण्याच्या दुकानावर जाऊन प्रत्यहीं त्याला विष्णुसहस्रनामाचा एक श्लोक शिकवून त्याच्या वाणीला नामगोडी इतकी लावणें कीं त्यानें मरणसमयीं विष्णुसहस्रनाम म्हणत असतां आनंदानें प्राण सोडणें; अशीं नाथांचीं लोकोत्तर आचरणें नित्य घडत. सुधार-

कांनीं, ग्रामोद्धारकांनीं, सनातन्यांनीं जुन्या नव्या सर्व कार्यकर्त्यांनीं नाथांच्या रहणीपासून कितीतरी बोध घेण्यासारखा आहे !

---

## १२. श्रीखंड्या व नाथदारीचा रांजण !

प्रत्येक थोर पुरुषाच्या चरित्रांतली एखादी इतकी अद्‌भुतरम्य कथा सर्वमान्य असते कीं तिच्याभोंवतीं त्यांचे सारे गुण जणूं केंद्रीभूत झालेले असतात. ती एकच कथा त्याची कीर्ति अजरामर करिते. आचार्यांच्या प्रस्थानत्रयीची एकही ओळ न वाचलेल्या मनुष्यालाही आचार्यांनीं मंडनमिश्राशीं वाद करून त्याला जिंकलें व चारी दिशांना दिग्विजयनिदर्शक असे चार मठ स्थापिले ही एकच गोष्ट माहीत असते किंवा 'आचार्य' हें नांव उच्चारताच त्यांचा 'दिग्विजय' त्याच्या डोळ्यांपुढें येतो ! रेड्याकडून वेद बोलवून पैठणच्या पंडितांना पायाशीं आणणारा, व जड भिंत अद्वैतयोगबलानें चालवून १४०० वर्षें जगणाऱ्या योगी चांगदेवाला निष्प्रभ करणारा—एवढा सारा अर्थच 'ज्ञानेश्वर' ह्या नांवांत कोंदलेला असतो. सोळाव्या वर्षी ज्ञानेश्वरीसारखा लोकोत्तर ग्रंथ निर्माण करणें हा चमत्कार वरील चमत्कारांपुढें कमीच गणला जातो ! देवानें नामदेवाच्या हातचें दूध पिणें, जनाबाईचीं लुगडीं धुणें, दामाजीसाठीं विठ्यामहाराचें रूप घेणें, नरसीमेहत्याची हुंडी पटविणें, चोखामेळ्याचीं ढोरें ओढणें, तुकोबांच्या कीर्तनांत मेलेलें मूल उठवणें व तुकोबांचें सदेह वैकुंठास जाणें इत्यादि कथा त्या त्या भक्तांच्या गुणोत्कर्षाच्या निदर्शक म्हणून सर्वत्र गायिल्या जातात. ह्या कथा भोळ्याभाविकांच्या कल्पना म्हणून वाऱ्यावर सोडून देण्यांत स्वारस्य नाहीं; त्यांच्या मूळाशीं जें कांहीं गूढ तत्त्व असतें तें शोधून काढण्यांत जाणत्यांनीं आपल्या बुद्धीचा उपयोग केला पाहिजे. ह्या सर्व कथा खऱ्याच आहेत असें भाविक सांगणार व ह्या कल्पना आहेत असें

तार्किक म्हणणार ! त्यांचा अर्थ ज्यानें त्यानें आपल्या मगदुराप्रमाणें घ्यावा व समाधान पावावें !

नाथांची भगवद्भक्ति पाहून भगवान् प्रसन्न झाले व त्यांच्या भक्ति-रिणाचें उतराई होण्यासाठीं श्रीखंडयाच्या वेषानें त्यांनीं त्यांच्या घरीं राहून बारा वर्षें सेवा केली ही गोष्ट नाथचरित्रांत अशीच अद्भुतरम्य आहे व अद्यापि श्रीखंडया गोदावरीच्या कावडी भरून जो रांजण भरी तो रांजण नाथद्वारांत खडा आहे ! ही गोष्ट नाथांचे समकालीन दासो-पंत व नाथांचे नातु मुक्तेश्वर यांनींही सांगितली आहे व मुक्तेश्वरानें तर 'श्रीखंडयाख्यान' ९४ ओव्यांत सविस्तर वर्णिलें आहे. नाथचरित्रकार केशव व महिपति यांनींही हें आख्यान विस्तृतरीतीनें गायिलें आहे, कृष्णदयार्णवांनीं हरिवरदाग्रंथांत ही गोष्ट सांगितली आहे, बहुतेक संतकवींनीं ह्या कथेचा उल्लेख केला आहे, आणि ह्या सर्व शब्दप्रमाणांवर स्वतःचे मोर्तब म्हणून खुद्द नाथांचे या प्रसंगावर अभंगही आहेत ! देव सर्वांच्या हृदयांत नांदत असून सर्वांचीं सर्वच कामें नित्य करीत असतो, पण त्याला कोणी ओळखीतच नाहीं ! आणि देव नाथांच्या घरीं सेवक म्हणून राबले यांत अविश्वसनीय असें काय आहे ? कोणाच्याही संसारांत एखादीदुसरी अनुकूल गोष्ट दिसली तरी ही देवाची कृपा असें आपण म्हणतों; मग जेथें सर्वच गोष्टी सर्वकाळ अनुकूल होत्या तेथें देव प्रत्यक्ष राबत आहे असें लोकांस मनःपूर्वक वाटल्यास त्यांत त्यांची काय चूक आहे ? वैष्णवकुळीं जन्म, उपजतभक्तीचा अंकुर, जनार्दनस्वामी-सारख्या सिद्धपुरुषाची कृपा व समागम, गिरिजाबाईसारखी सद्गुणी, उदार व धर्मानुकूल पत्नी, हरिशास्त्र्यासारखा विद्वान् व धर्मिष्ठ मुलगा, मुक्तेश्वरासारखा जगविख्यात होणारा नातु; घरीं अखंड अन्नदान व ज्ञानदानाचीं सत्रें; संपत्ति, संतति, आरोग्य, भक्तिज्ञानवैराग्य, भूतदया व परोपकार आणि शांति व क्षांति यांची सहजसुलभ प्राप्ति इतक्या गोष्टी जेथें नांदत होत्या त्या नाथांच्या घरीं देव सांपडणार नाहीं तर दुसरा कोठें

सांपडेल ? बुद्धीच्या रांजणांत सर्व भले पुरुष आपापल्या मगदुराप्रमाणें जप, तप, ज्ञान, दान, नामस्मरण, तीर्थाटन इत्यादि साधनांच्या घागरी ओतीत असतात; पण सर्वांवर भगवत्प्रसादाची घागर पडल्या-शिवाय तो रांजण उचंबळून वाहत नाहीं यांत केवढें वर्म आहे बरें !

---

## १३ नाथांचें निर्याण व पैठणची षष्ठी.

वृद्धापकाळ आला. नाथांचे पूर्वींचे छलक होते ते कांहीं निमाले व उरले ते नाथांची अपूर्व शांति, त्यांची भगवद्भक्ति, लोकोपकारता व सर्वतोमुख झालेली कीर्ति पाहून जागच्याजागीं थिजले ! हरिशास्त्रीही त्यांच्या मतानें वागूं लागला. ' निर्वैरः सर्वभूतेषु ' ही नाथांची स्थिति सर्वांच्या अनुभवास आली. सहस्रकरापुढें नक्षत्रें फिकीं पडतात तसे पैठणचे शास्त्रीपंडित नाथांपुढें नम्र झाले. शके १५२१ च्या फाल्गुनांत नाथांनीं आपण लौकरच देह ठेवणार असें जाहीर केलें. संसारपाश त्यांना केव्हांच नव्हता: ' स्वजनधनस्त्रीपुत्रांसी । नांदोनि तो नातळे त्यांसी । स्वप्नघरवात जागृता जैसी । तैसा साधूसी संसारू ' ( भाग० २६–३४६ ) हें त्यांचेंच यथार्थ वर्णन आहे. नाथांच्या दर्शनास अफाट यात्रा येऊं लागली. फाल्गुनवद्य षष्ठीचा दिवस उगवला. गुरुपूजा व अन्नसंतर्पण झालें. तिसरां प्रहरां गोदेच्या पात्रांत नाथांचें शेवटचें कीर्तन झालें. ललित झालें. लोक तल्लीन झाले. आरती झाली. खिरापत वांटली गेली. नाथ गंगेंत उतरले ! त्यांनीं स्नान केलें. काया-वाचामनानें कोणत्याही इंद्रियानें कोणत्याही अवस्थेंत कांहीं अकार्य केलेलें नसल्यामुळें चित्त प्रसन्न व गुरुभक्तिप्रेमानें भरलेलें होतें. जन्ममरण ज्या वासनात्मक सूक्ष्मदेहाला लागलेलें असतें तो वासनात्मक देह केव्हांच भस्म झाला होता. नाथ स्नान उरकून बाहेर आले. पाटावर बसले व त्यांनीं गुरुस्मरण करीत परमानंदांत देह ठेवला. 'अनायासेन मरणं विना दैन्येन जीवनम् ! ' त्यांच्या आयुष्याचा प्रत्येक क्षण गुरुचिंतनांत व

परोपकारांत गेला. त्यांनीं पैठणांत हरि पिकवला व भूलोकाला वैकुंठ बनविलें. चंदनाच्या लाकडांत देह भस्म झाला पण त्यांचा अंतरात्मा विश्व भरून भूतांतर्यामीं उरला.

नाथांच्या समाधीचा काळ शके १५३१ हा पूर्वी समजला जात असे. शके १८२४ सालीं पैठणास कांहीं जुनीं बाडें चाळीत असतांना मला नाथांचा समाधि-शक नक्की ठरवितां आला व त्याप्रमाणें मीं 'केसरीं'त एक पत्र लिहून तो जाहीर केला. त्या वेळेपासून सर्व शोधकांनीं तो मान्य केला आहे. **नाथ शके १५२१ विकारीनाम संवत्सरीं फाल्गुन वद्य ६ रविवारीं रवि मीनगृहीं असतांना समाधिस्थ झाले.** पैठणास नाथांच्या समाधिमंदिरावर केशवकृत पुढील श्लोक कोरलेला आहेः—

**शालीवाहन पंधरा शतशकीं एकागळे विंशती ।**
**वर्षानाम विकारि मास बरवा फाल्गून वद्याप्रती ।**
**षष्ठी वासर भानु या शुभदिनीं निर्याणस्वच्छंदता ।**
**पावे श्रीगुरु एकनाथचि महा स्वानंदसाम्राज्यता ॥**

असेच श्लोक कृष्णदयार्णव व नाथांचा नातु राघव यांच्या बाडांतून मला आढळले.

नाथचरित्रांत षष्ठीचें माहात्म्य अतिशय आहे, त्याचें कारण असें आहे कीं, फाल्गुन वद्य ६ ह्या तिथीस पांच महत्त्वाच्या गोष्टी झाल्या आहेत. केशव व महिपति यांनीं आपापल्या नाथचरित्रांत या गोष्टी दिल्या आहेतः १ जनार्दनस्वामींचा जन्म, २ जनार्दनस्वामींस दत्तदर्शन, ३ जनार्दनस्वामींचा नाथांवर अनुग्रह, ४ जनार्दनस्वामींचा देहत्याग व ५ नाथांचा देहत्याग हे पांचही प्रसंग फाल्गुन वद्य ६ ह्याच एका तिथीस घडले व त्यामुळें ही पंचपर्वश्रेणी भावार्थी लोकांत विख्यात होऊन बसली! पैठणास षष्ठीचा जो उत्सव होतो तो नाथांच्या निर्याणानंतर त्यांची पुण्यतीथ म्हणून सुरू झाला असें कोणास वाटण्याचा संभव आहे, तथापि खरा प्रकार तसा नसून षष्ठीचा उत्सव

नाथांनीं गुरूची पुण्यतिथ म्हणून स्वतः सुरू केला व गुरुस्वरूपांत नाथ समरस होऊन मिळून गेल्याची लोकांस खूण पटावी म्हणूनच कीं काय कोण जाणे त्याच तिथीस त्यांनीं आपल्या पुण्यदेहाचें विसर्जन केलें!

## १४ नाथांचा वंशवेल.

नाथांस गिरिजाबाईपासून तीन अपत्यें झालीं. दोन मुलीं व एक मुलगा. प्रथममुलीचें नांव त्यांनीं गोदा ठेवलें. ती पैठणचेच राहणारे चिंतामणी ऊर्फ विश्वंभर मुद्गल ह्या विद्वान् सुशील तरुणास दिली होती. गोदेचें सासरचें नांव गंगा होतें, व नाथ तिला आवडीनें लीला म्हणत. मुलाचें नांव हरि. त्याच्या पाठीवर दुसरी मुलगी झाली तिचें नांव गंगा ठेवलें होते, पण तिला सासरीं गोदा हें नाव प्राप्त झालें. हरीचा व्रतबंध होऊन पैठणासच विद्वान् शास्त्रीपंडितांपाशीं अध्ययन होऊन त्यास **हरिशास्त्री** ही पदवी मिळाली. तो अल्पवयांतच विद्वन्मान्य झाला, पण नाथांचें त्याचें नीट पटेना. तो संस्कृतभाषेचा अत्यंत अभिमानी असून अतिशय कर्मठ होता. नाथ भागवतधर्मी उदारवृत्तीचे सत्पुरुष. त्यांचें वागणें हरिशास्त्र्याला मनापासून आवडत नव्हतें. नाथ कर्मनिष्ठ होते पण कर्मठ नव्हते. हरिशास्त्र्याला संस्कृतभाषेचा अभिमान तर 'देवासी नाहीं वाचाभिमान। संस्कृत प्राकृत त्या समान। ज्या वाणी जालें ब्रह्मकथन। त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे' असा नाथांचा अभिप्राय! प्राकृत लोकांच्या उद्धारार्थ प्राकृतभाषेंत ग्रंथ करून प्राकृतभाषेंतच व्याख्याननिरुपणादि केलें पाहिजे असें नाथांचें म्हणणें होतें पण हें हरिशास्त्र्यांस पटत नव्हतें. नाथांना संस्कृतमध्यें ग्रंथरचना करितां आलीं असती पण लोकांच्या कळवळ्यानें त्यांनीं प्राकृतभाषा हातीं धरली. त्यांचें मराठी भाषाप्रेम अनुपम होतें. दुसरें, हरिशास्त्र्यांचा कर्मठपणावर भर फार; नाथ आचारविचारांविषयीं जागरूक होते तरी यज्ञयाग, जपतप इ. केवळ कर्मांच्या गोष्टींपेक्षां शुद्धाचरण, भगवद्भक्ति व भूतदया यांलाच ते

मुख्य मानीत. कर्म स्वयमेव मोक्षाला कारण नसून चित्तशुद्धि करण्यापुरतेंच त्याचें महत्त्व आहे असें त्यांचें मत त्यांच्या भागवतांतही जागोजाग व्यक्त झालें आहे व त्यांनीं पूर्वमीमांसकांवर व. कर्मठांवर कठोर टीकाही केली आहे. 'भजन चालिलें उफराटें' ह्या अभंगांतः—

**अग्निहोत्राचा सुकाळ । वडापिंपळाशीं काळ ॥ २ ॥**
**तिन्ही देव पिंपळांत । अग्निहोत्रीं केला घात ॥ ३ ॥**
**म्हणती सोमयाग करा । मुख धरूनि मेंढा मारा ॥ ४ ॥**

याप्रमाणें अग्निहोत्री व सोमयागी यांच्यावर गहजब केला आहे. 'सर्वांभूतीं भगवद्भाव' ठेवून वागा असें त्यांचें मुख्य सांगणें आहे. यज्ञांत पशुहिंसा करूं नये, या बाबतींत वेदाचीं रोचक वचनें कोणतीं व वेदाचा अभिप्राय काय, याचा खुलासा त्यांनीं भागवताच्या २१ व्या अध्यायांत केला आहेच. असो. हरिशास्त्र्यांचें मत तेंच पैठणांतील बहुतेक शास्त्रीपंडितांचें मत होतें. हरिशास्त्री अभिमानानें रुसून काशीस गेले, पण पुढें नाथांची योग्यता जाणून त्यांना शरण आले व त्यांनीं नाथांचीं परंपराही चालविली. नागपूर प्रांतांत मोहप्पा नांवाचें एक गांव मधुगंगातीरीं आहे. तेथें सच्चिदानंदस्वामींचें एक पांचसहा हजारांचें देवस्थान आहे. तेथें स्वामींचीं परंपरा मला कागदोपत्रीं सांपडली तीः श्रीदत्त—जनार्दन—एकनाथ—हरिशास्त्री यांजपासून आलेली आहे. नाथांची पहिली कन्या गोदा इचा पुत्र प्रख्यात कविसम्राट् **मुक्तेश्वर** होय. मुक्तेश्वराविषयीं व त्याच्या कवितेविषयीं समग्र विवरण पुढें एका प्रकरणांत येणारच आहे.

**शिवरामस्वामी** हा नाथांचा नातु—मुलीचा मुलगा—असें राजवाडे यांनीं म्हटलें आहे तें बरोबर नाहीं, तो नाथांच्या नातीचा मुलगा म्हणजे पणतु होय. गीताचंद्रिकेच्या उपसंहारांत शिवरामस्वामींनीं 'बाप नारायण माय लक्ष्मी ' असें सांगून तिच्या ( लक्ष्मीच्या ) रूपानें ' गोदा आपण जाली कन्यकारूप ' असें म्हटलें आहे. आपली ' लक्ष्मीविराजित एकनाथपरंपरा ' आहे असें त्यांनीं मोठ्या अभिमानानें सांगितलें आहे.

एकादशस्कंदावरील टीकेंत पुढील श्लोक आहेत ते या बाबतींत निःसंदेहता देणारे आहेतः—

**एकादशाचा निज दावुनी दिवा । नेला स्वधामासि त्रिलोक आघवा ।**
**तो नातिचें वाक्य अगत्य मानुनी । श्लोकोक्ति बोले शिवराम होवुनी ॥**
**मायेचा जो पाहतां आजि आजा । तो हा येका जाहला बाप माझा ।**
**आंगें येथें पालटी नांवरूपा । श्लोकीं श्लोकें दाखवी अर्थदीपा ॥**

'एकनाथानीं एकादशस्कंदावर अनुपम टीका करून जो प्रदीप उजळला त्याच्या प्रकाशानें त्रैलोक्याचे जीव निजधामाला नेले ह्म० मुक्त केले. नात लक्ष्मी हिनें 'तुझ्या सारखा कुलदीपक पुत्र माझ्या पोटीं यावा' अशी विनंती केली तेव्हां 'बरें तर मीच तुझा पुत्र होईन' असें तिला वचन दिलें होतें तें स्मरून नाथांनींच शिवरामरूपानें प्रगट होऊन हे श्लोक प्रगट केले आहेत, अर्थात् त्यांच्या प्रसादाचीच ही वाणी आहे' असें सांगण्याचा शिवरामस्वामींचा हेतु आहे. आपल्या लोकविश्रुत पणजाविषयीं उत्कट प्रेमादर अनेक ठिकाणीं त्यांनीं व्यक्त केला आहे. 'श्रीएकनाथ दिवटा त्रिजगीं उदेला' असें त्यांनीं एका श्लोकांत म्हटलें आहे. या दिवटयानेंच एकादशाचा प्रदीप लावला आहे. अष्टावक्रगीतेवरील टीकेंत शिवरामस्वामी म्हणतातः—

**श्रीनाथदेवो वदवी सुवाचा । दयाळ राजा शिवरामजीचा ॥**

नाथ हे त्यांचें दैवतच होतें यांत नवल नाहीं. शिवरामस्वामींची कविता अफाट आहे. त्यांचें 'वेदांतपर भूपाळीपंचक' मात्र आमच्या 'भक्तिमार्गप्रदीपानें' दोनलक्ष महाराष्ट्रीय कुटुंबांत नेऊन पोंचविलें आहे! निजामच्या राज्यांत कल्याणी म्हणून एक इतिहासप्रसिद्ध प्राचीन शहर आहे, तेथें शिवरामस्वामींच्या मठांत त्याचे ग्रंथ व्यवस्थेनें ठेवलेले आहेत. हे ग्रंथच शंभरावर आहेत! त्यांची आणखी किती तरी कविता उपलब्ध होण्यासारखी आहे व होत आहे. शिवरामस्वामींचे जनक तेच त्यांचे गुरु पूर्णानंद होत. पूर्णानंदांचे पूर्वाश्रमींचें नांव नारायण.

नारायणाची स्त्री लक्ष्मी ही नाथांच्या दुसऱ्या मुलीची मुलगी, अर्थात् नारायण हे नाथांचे नातजावई व शिवराम हे पणतु होत. याप्रमाणें नाथांच्या तिन्ही अपत्यांची संक्षिप्त हकीकत आहे. हरिशास्त्री नाथांच्या लौकिकाला अनुरूपच निघाला. पहिल्या मुलीचा मुलगा मुक्तेश्वर हा जगविख्यात कवीश्वर झाला, व दुसऱ्या मुलीचा नातु शिवरामस्वामी हाही नाथांना शोभण्यासारखा निघाला. नाथांच्या घराण्यांत भानुदास महाराज, पुढे त्यांचे पणतु एकनाथमहाराज, व नाथांचे (मुलींच्या बाजूनें का होईना) नातु मुक्तेश्वर व पणतु शिवरामस्वामी असे चार लोकमान्य उत्तम पुरुष निर्माण झाले. खरोखर हा वंश परमधन्य होय. सातआठ पिढयांत अशीं चार पुरुषरत्नें जगाला देणारें नाथांच्या घराण्यासारखें पुण्यपावन घराणें महाराष्ट्राच्या इतिहासांत तरी दुसरें नाहीं ! हरिशास्त्र्याला प्रऱ्हाद, मेघश्याम व राघव असे तीन पुत्र होते. नाथांचा वंशविस्तार पुढें चांगला चालला व आज त्यांचा औरस वंश पैठणास विद्यमान आहे. ह्या घराण्याचा सारा वंशवेल येथें देण्याचें कारण नाहीं. नाथांच्या घराण्याला मोठी जहागीर आहे. नाथांचे निपणतु रामचंद्रबोवा यांचे चिरंजीव छय्याबोवा यांनीं नाथसंस्थानास पहिली देणगी मिळविली. छय्याबोवा हे अप्रतिम गवई होते. त्यांनीं दीपराग म्हटला कीं खरोखरच दीप लागत अशी त्यांची तिकडे अद्यापही कीर्ति आहे. त्यांनीं या गुणावर इनामें मिळविलीं. पुढें त्यांचे चुलतबंधु काशीनाथ जगन्नाथ, छय्याबोवांचे नातु रामचंद व पणतु काशीनाथ यानींही अनेक गावें जहागीर मिळविलीं. नाथांचे निपणतु रघुनाथ केशव यांच्या पत्नी जानकीबाई यांनीं दर आषाढीस पैठणाहून पंढरीस पालखी नेण्याचा क्रम सुरू केला. त्यांचे शाखेस पालखीवाले असें म्हणतात. भाऊबंदकीचे तंटे चालूच आहेत ! आपणांस नाथांकडेच पहावयाचें आहे.

---

## १५. नाथांची अमोल कामगिरी

शास्त्रीपंडितांनीं व कर्मठ ब्राह्मणांनीं गजबजलेल्या पैठणसारख्या पुरातन क्षेत्रांत राहून नाथांनीं भागवतधर्माचा व तत्प्रसारार्थ लोकभाषेचा ह्मणजे मराठी भाषेचा पुरस्कार केला ही नाथांची कामगिरी अत्यंत महत्त्वाची आहे. पैठणच्या संस्कृतींत राहून प्राकृताचा पुढाकार घेणें नाथांच्या वेळीं अतिशय कठिण होतें. बहुजनसमाजाची बोली मराठी, विद्वानांची भाषा संस्कृत व राजभाषा फारशी अशा तीन भाषांच्या कचाट्यांत महाराष्ट्रसमाज त्यावेळीं सांपडला होता ! संस्कृतभाषा ही आपल्या धर्माची व संस्कृतीची जननी. तिचा योग्य तो बोज ठेवून व फारशीभाषेचा राजकारणांत व व्यवहारांत प्रवेश आधींच झालेला असल्यामुळें तिला आपल्या संस्कृतीवर व भाषेवर कुरघोडी करितां न येईल इतक्या बेतानें तिचा आदर करून मराठीचें मराठीपण वाढीला लागेल अशा धोरणानें नाथांनीं मराठी भाषेचा पुरस्कार केला. तीनशें वर्षांपूर्वी ज्ञानेश्वरांनीं नेवासें येथें आपल्या मंडळांत बसून गीतेवर 'देशीकार लेणें' चढविलें व त्यांनीं आणि नामदेवादि संतांनीं पंढरपूरच्या वाळवंटांत वैष्णवांच्या मेळ्यांत अभंगरचना केली. तो काळ गेला. यवनांचें परचक्र आलें व त्यांचा अंमल सर्वभर सुरू झाला. ज्ञानेश्वरी ग्रंथ व भागवतसंप्रदाय मागें पडल्यासारखे झाले, तेव्हां नाथांनीं ज्ञानेश्वरीग्रंथाला हातीं धरलें व त्यानें प्रतिपादिलेल्या अद्वैतभक्तीचा संप्रदाय जोमानें पुढें चालविला. ज्ञानेश्वरी 'ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध' होता तो 'अत्यादरें शोधून' त्यांनीं त्याची 'अतिशुद्ध प्रत' तयार केली व ती लोकांच्या हातीं दिली. ही नाथांची कामगिरीही महत्त्वाची आहेच पण त्यांनीं एवढेंच काम केलें असतें तर ते फार तर 'संशोधक' म्हणून प्रसिद्ध असते, पण त्यानीं ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करून तिच्यावर प्रवचनें करण्याचा प्रघात सुरू केला आणि स्वतः अफाट ग्रंथरचना करून भागवतासारखा ज्ञानेश्वरीच्या तोलाचा ग्रंथ निर्माण केला. नाथभागवत

हा ग्रंथ समजायला सोपा, अत्यंत प्रेमळ व ज्ञानभक्तीचाच पुरस्कार करणारा आहे. ह्या ग्रंथाशिवाय भावार्थरामायण व १०।१२ स्फुट प्रकरणें आणि कीर्तनप्रसंगीं अभंग रचून त्यांनीं भागवतधर्माचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर केला. पूर्वीं वेदांत संस्कृतभाषेंतच होता, तो ज्ञानेश्वरांनीं मराठींत आणला व नाथांनीं तो अठरापगड जातींच्या घरींदारीं पसरला. एका पंडितानें म्हटलें आहे कीं वेदांत हा ज्ञानेश्वरांबरोबर अंतराळीं मेघांत राहून राज्य करीत होता, तो एकनाथांबरोबर पृथ्वीवर मानवलोकीं येऊन माणसांत चालूं बोलूं लागला! वेदांताचे व भागवतधर्माचे आचारविचार नाथांनीं ब्राह्मणांपासून तों अगदी खालच्या थरांपर्यंत सर्व लोकांत पसरले. अद्वैतवेदांतावर भक्तीचीं लेणीं चढवून तो खरोखरीचा लोकधर्म केला. कर्मठांच्या नगरींत राहून त्यानीं कर्मठतेचें तोंड ठेंचलें व कर्मठांचें तोंड उदार अशा भक्तिपंथाकडे वळविलें. या कामीं त्यांना थोडा फार छळही सोसावा लागला, पण तो त्यांनीं आपल्या लोकोत्तर शांतीनें व धीरगंभीरतेनें सोसून पचनीं पाडला. माझा छळ करा पण भक्तिपंथ स्वीकारा, माझी निंदा करा पण हरीचे गुणानुवाद गा, संस्कृतभाषेचा आदर करा पण सर्व लोकांच्या कल्याणार्थ मराठी भाषेचा अंगीकार करा, असें त्यांनीं कर्मठादिकांस सांगितलें व आपल्या आध्यात्मिक तेजानें, उत्कट भक्तिबलानें व उदार रहणीनें सारा समाज आपल्या मागें खेंचून घेतला. संस्कृत न जाणणारा जो बहुजनसमाज त्यांत ते मिळून मिसळून वागले व त्यांना समजेल, उमजेल व पचेल अशा साध्या, सोप्या व प्रेमळ भाषेंत त्यांनीं ज्ञानभक्तीचा उपदेश करून दांभिकांपासून सावध राहण्याचा वारंवार इषारा दिला. ब्रह्मज्ञान त्यांनीं सर्वांची मिराशी केली. त्यानीं बोलभाषेला बोधभाषेच्या योग्यतेस चढविलें. तात्पर्य, ग्रंथरचना, प्रवचनें, कीर्तनें व उपदेश इ. सर्व साधनें हातीं धरून त्यांनीं महाराष्ट्र चेतविला. त्यांनीं एवढ्या मोठ्या प्रमाणावर लोकजागृतीचें काम केलें कीं त्याला दुसरी तोड नाहीं. ज्ञानेश्वरादि

पूर्वकालीन व रामदासतुकारामादि उत्तरकालीन सर्व संतकवींपेक्षांही नाथांची कामगिरी अधिक व्यापकस्वरूपाची व भरीव झाली आहे, आणि ही त्यांनीं प्रपंचांत राहून केली हें विशेष आहे. ज्ञानेश्वर व रामदास यांना बायकापोरांचे पाश नव्हते, नामदेवतुकाराम यांच्या प्रपंचाचा लोकदृष्टीनें थोडासा फजितवाडा झाला, पण नाथांनीं गृहस्थाश्रमाचा सोज्वळ आदर्श जगापुढें ठेवून भूतदया व सर्वांभूतीं भगवद्भाव हे आचरणांत प्रत्यक्ष दाखवून वरीलसारखी धर्माची व भाषेची भव्य कामगिरी केली. ज्ञानेश्वरांची परंपरा त्यांनीं चालवून त्या परंपरेला माध्यान्हीच्या सूर्याचें तेज दिलें. रामदास व तुकाराम यांच्या ग्रंथावर नाथांच्या वाणीचीच पूर्ण छाप पडली आहे. अर्थात् त्यांच्या धर्मवाङ्मयसेवेचें बरेंचसें श्रेय नाथांकडेच जात आहे! हें ध्यानांत आणलें आणि बऱ्याचशा संतकवींच्या परंपरा नाथांपासून सुरू झाल्या आहेत हें पाहिलें म्हणजे महाराष्ट्रावर दुसऱ्या कोणत्याही एका व्यक्तीपेक्षां नाथांचेच उपकार जास्त झाले आहेत व एकनाथ हे महाराष्ट्राचे खरोखरीच '**एक नाथ**' आहेत असें स्पष्ट म्हणावें लागतें.

## १६. नाथांची लोकमान्यता.

नाथांच्या हयातींत लाखो लोकांचीं शिरें नाथांच्या पायांवर लवलीं व आज त्यांच्या देहावसानास साडेतीनशें वर्षे होत आलीं तरी षष्ठीच्या दिवशीं दोन दोन लाख लोक त्यांचा नामघोष करीत आनंदानें गात नाचत पैठणास जात असतात. त्यांच्या वाड्यांत रोज जितके यात्रेकरू येतील तितक्यांस भोजन दिलें जातें. त्यांचा अन्नदानाचा महिमा पैठणास अद्याप टिकून आहे. नाथांच्या समाधीवर हजारों लोकांनीं चवऱ्या ढाळल्या. राजेरजवाड्यांनीं अर्पण केलेल्या जहागिरींत निजाम सरकार, भोसले, पवार, गायकवाड, शिंदे, होळकर, या सर्वांनीं इनामें दिलेलीं आहेत. त्याचप्रमाणें अनेक संतांनीं, कवींनीं व अलीकडील समाजसुधारकांनींही आपापल्यापरीनें सुमनगुच्छ त्यांच्या पायांवर भक्तिपूर्वक

वाहिले आहेत. नाथांचे नातु मुक्तेश्वर व पणतु शिवरामस्वामी यांनीं नाथांचे गुणगौरव केलें आहेच. दासोपंत, तुकोबाराय, निळोबा, कृष्णदयार्णव, श्रीधरस्वामी, देवदास, अमृतराय, आत्माराम रामदासी, एकेश्वर अवधूत, मोरोपंत व त्यांचे पुतणे बाळाजीपंत पराडकर, तुका विप्र इत्यादि संतांनीं व कवींनीं नाथांचे गुणानुवाद गायिले आहेत. केशव व महिपति यांनीं तर त्यांचीं सविस्तर चरित्रेंच लिहिलीं आहेत. अर्वाचीन काळांत आमच्या एकनाथचरित्राशिवाय सहस्रबुद्धे, राजारामशास्त्री भागवत, आजगांवकर यांचीं नाथचरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. रंगनाथ, उद्धवचिद्धन, रमावल्लभदास, सिद्धचैतन्य, मुकुंद, जयरामसुत वगैरेंच्या संतमालिकांतून नाथांचें प्रेमभरानें वर्णन केलेलेंच आहे. अर्वाचीन काळीं पदवीधरांचे मुकुटमणि व समाजसुधारक माधवराव रानडे यांनीं नाथांच्या भागवतधर्मावर दिलेलीं ८।१० व्याख्यानेंही प्रसिद्ध आहेत. **रानडे** म्हणतात “ भागवतधर्म एकनाथांच्या प्राकृत ग्रंथांत जसा स्पष्ट आहे तसा तो कोठेंच नाहीं. एकनाथांच्या ग्रंथांत भागवतधर्म तर दिसलाच पण चरित्रांतही दिसला. भागवतधर्म चरित्रांत दाखविणें हें एकनाथांचें विशेष भाग्य होतें. तुमची आमची कशी गति होईल – ‘ भाळींभोळीं कशी तरतील ’ हा विचार त्यांच्या मनांत होता. आम्ही लंगडीं व थोटीं माणसें! आम्ही शास्त्राध्ययन करावें तर पोटामागची काळजी सुटत नाहीं. अशी कोटयवधि प्रजा. आम्हांला योगमार्ग नको, ज्ञानमार्ग नको, कर्ममार्गही नको. इंद्रियनिग्रह होत नाहीं. आम्हांला सुलभ मार्ग पाहिजे व तो एकनाथांच्या चरित्रांत ज्यास्त आहे. आम्हांला भक्तिमार्ग उत्तम. देवच काय तो एक आपला श्रेयस्कर. वर्णाश्रमादि प्रकार प्रासंगिक किंवा सहजगत्या आलेल्यांपैकीं आहेत म्हणून त्यांचा अभिमान धरूं नये. निरहंकृति राहून भक्ति करावी. भक्तीच्या ठायीं प्रीति, मुक्ति, वैराग्य सर्व कांहीं आहे. भक्त कसा असावा व देव कोणास म्हणावें हें भागवतांत त्यांनीं सांगितलें आहे. हें नाथांचें भागवत वाचलें असतां मनाला शांति वाटून कृतार्थता वाटेल. ”

---

# ८ साधुसंत व प्रपंचपरमार्थविवेक.



प्रपंच आणि परमार्थ, प्रवृत्ति आणि निवृत्ति, विषय आणि वैराग्य याविषयीं सामान्य लोकांच्याच काय पण विद्वानांच्याही कल्पना मोठ्या विलक्षण असतात ! प्रपंच, प्रवृत्ति व विषय हे एकीकडे आणि परमार्थ, निवृत्ति व वैराग्य हे दुसरीकडे—असे हे रात्र आणि दिवस यासारखे अगदी एकमेकांच्या विरुद्ध असून त्यांचा अहिनकुलांसारखा शत्रुत्वाचा संबंध आहे अशी बहुतेकांची कल्पना असते ! स्त्री ही पुरुषाच्या मार्गां-तील धोंड आहे कां पुरुषाला पुरुषार्थ साधायला मदत करणारी देवी आहे अशासारखा एक शुष्क वाद अलीकडे कांहीं विद्वानांनीं उकरून काढला आहे! द्रव्य हें अनर्थावह आहे कां अत्यंत उपयुक्त वस्तु आहे, परमार्थ्यांनीं द्रव्यसंग्रह करावा कीं न करावा, हाही असाच एक वादाचा विषय आहे! विषयांचा निपटून त्याग करणें म्हणजे संन्यास घेणें धर्मसंमत आहे कां यावज्जीव कर्मकचाटींत राहणें उचित आहे हाही एक वादाचा विषय होऊन राहिला आहे ! समजून वागणें एकीकडेच राहिलें. विद्वान् वादां-तच चूर !

मौज अशी आहे कीं या दोन्ही बाजू खऱ्या आहेत व तशाच खोट्याही आहेत ! वक्ता बलवान् असला तर तो आपली बाजू आवेशानें पुढें मांडतो. वस्तुतः कोणत्याही विषयाचा आग्रह अनर्थावह असतो. विवेकी मनुष्य निराग्रही असतो. आधीं वरील वादविषयक शब्दांचे अर्थ, त्यांच्या मर्यादा व त्यांचे विनियोग हे भिन्नभिन्न पुरुषांच्या भिन्नभिन्न परि-स्थितींत भिन्नभिन्न प्रकारचे असतात, यामुळें सर्वांची एकवाक्यता होणें अशक्य वाटतें. उदाहरणार्थ तुकाराम, रामदास व एकनाथ या तिघांच्या परिस्थितींत व स्वभावांत भिन्नपणा असल्यामुळें ते भिन्नार्थ बोलले आहेत

व तिघांचेही अनुभव खरेच आहेत ! प्रपंच व परमार्थ हे दोन्ही संपादीन असें म्हणणें म्हणजे दोन्ही डगरींवर हात ठेवण्यासारखे व्यर्थ आहे, त्यानें एकही धड साधणार नाहीं–असे तुकोबा स्वतःच्या अनुभवानें बोलले तें खरेंच आहे व प्रपंच ब्रह्मरूप आहे असें नाथ बोलले तेंही खोटें नाहीं ! जो तो आपला अनुभव बोलत आहे. जिजाबाई ही तुकोबांच्या प्रपंचपरमार्थाला अनुकूल नव्हती व गिरिजाबाई ही नाथांच्या संसारालाही अनुकूल होती म्हणून दोघांचे प्रपंचविषयक अनुभव वेगवेगळे झाले. परमार्थ मात्र सर्वांचा एकच आहे. पैठणास अमृतराय व शिवदिनकेसरी हे दोघे शेजारींशेजारीं राहत. ‘ प्रपंच परमार्थासी विरोध’ हें रायजींचें पद आहे व ‘ प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो ज्यानें केला। तो नर भला भला ’ हें शिवदिनकेसरींचें पद आहे ! दोघांचेंही म्हणणें त्यांच्या त्यांच्या अनुभवाप्रमाणें बरोबर आहे ! ‘ तुका म्हणे धन आम्हां गोमांसासमान ’ अशी तुकोबांनीं वैराग्याच्या लहरीबरोबर शपथ घेतली ! हें वैराग्य खरेंच आहे आणि ‘अर्थे परमार्थासी साधावें’ हें नाथांचें म्हणणें काय परमार्थमूलक नाहीं ? असो. या प्रकरणांत तुकोबा, समर्थ व नाथ ह्या तीन महापुरुषांचे प्रपंचविषयक विचार पुढें देण्याचें मी योजलें आहे. ह्यासंबंधानें शास्त्रविचार व अनुभव नाथांनीं व्यवस्थेशीरपणें सांगितले असल्यामुळें त्यांचा जरा प्रशस्तपणें विचार केला आहे. द्रव्यापासून अनर्थ व द्रव्याचा यथार्थ विनियोग; गृहस्थाश्रमाचे नियम, निर्बंध व महत्त्व; प्रपंचपरमार्थाची एकरूपता; ‘ब्रह्म सत्यं जगन्मिथा’ याचा खरा अर्थ; हे चार महत्वाचे विषय नाथांच्या प्रौढवाणीनें सविस्तर निरूपिले असून शेवटीं ‘ साधूंच्या व मुक्तांच्या लक्षणांत नाथांचें आत्मचरित्र ’ विशद केलें आहे व त्यांच्या प्रपंचब्रह्मरूपतेचें रहस्य प्रगट केलें आहे. हें प्रकरण अशा तऱ्हेनें मागील प्रकरणाची पूर्तताच करीत आहे. त्यानंतर आपण नाथांच्या वाङ्मयपसाऱ्याकडे वळूं.

## २ प्रपंच आणि तुकोबाराय.

तुकोबारायांना प्रपंचाचे आघात फार सोसावे लागले. पहिली व आवडती बायको अन्नावांचून गेली, वडील बंधु सावजी संसार तुकोबांच्या अंगावर टाकून निघून गेला, दुष्काळामुळें संसाराची वाताहात झाली, धाकटा बंधु कान्होबा विभक्त झाला, आईबाप व पहिलें पोर गेलें, आणि दुसरी व कर्कशा बाईल त्यांना पुरून उरली! बायकोचें सुख नाहीं, पैशाचें सुख नाहीं, तेव्हां 'सुख पाहतां जवापाडें। दुःख पर्वताएवढें' असा त्यांना अनुभव आला. तुकोबांची परिस्थिती अत्यंत बिकट झाली. त्यांनीं आपलीं खतपत्रें इंद्रायणीला अर्पण केलीं व व्यवहाराचा संबंध तोडला. 'तुका म्हणे धन। आम्हां गोमांसासमान' ह्या त्यांच्या कठोर प्रतिज्ञेप्रमाणें ते आजन्म वागले व त्यामुळें अर्थातच त्यांचा लोकव्यवहाराशीं प्रत्यक्ष संबंध तुटला. ते दृढतम वैराग्य धारण करून देवप्राप्तीच्या मार्गाला लागले आणि त्यांनीं देव जोडला. 'संसाराअंगीं अवघींच व्यसनें। आम्ही ह्या कीर्तनें शुद्ध झालों.' प्रपंच आणि परमार्थ दोन्हीं साधत नाहींत असा त्यांचा अनुभव आहेः—

**प्रपंचपरमार्थ संपादीन दोन्ही। एकही निदानीं न घडे त्यासी॥ १॥**
**दोन्ही पेंवावरी ठेवूं जातां हात। शेवटीं अपघात शरीराचा॥ २॥**
**तुका म्हणे तया दोहींकडे धका। शेवटीं तो नरकामाजी पडे॥ ३॥**

प्रपंचाचा त्याग केल्यावांचून परमार्थ साधणें शक्यच नाहीं असा निश्चय त्यांनीं अनेक अभंगांत व्यक्त केला आहे.

**हो कां पुत्रपत्नीबंधु। यांचा तोडावा संबंधु॥ १॥**
**कळों आलें खट्याळसें। शिवों नये लिंपों दोषें॥ २॥**

**धनवंतालागीं। सर्व मान्यता हे जगीं॥ १॥**
**मातापिता बंधुजन। सर्व मानिती वचन॥ २॥**
**जंव चाले मोठा धंदा। तंव बहीण ह्मणे दादा॥ ३॥**
**सदा श्रृंगारभूषणें। कांता लवे बहुमानें॥ ४॥**
**तुका म्हणे धन। भाग्य अशाश्वत जाण॥ ५॥**

' संसारसंभ्रमें परमार्थ जोडे ' हें अशक्य आहे, ढेंकणांच्या बाजेवर सुख मिळेल ही कल्पनाच खोटी आहे, ' प्रियापुत्रधन हीं दुःखाला पात्र करितात ह्मणून तीं शत्रूसारखीं लेखावींत ! ' ' आशा लागे पाठी व ती आशा विषयसंगानें गोंवून फाशीं पाडते व मनुष्य पूर्णपणें नाडला जातो. तात्पर्य संसारत्यागावांचून परमार्थ साधणें शक्यच नाहीं. त्याग हवा, त्यागावांचून भोग चुकत नाहीं असें तुकोबाचें सांगणें आहे.

ह्या संसारांत सुख नाहीं किंवा असलेंच तर तें अत्यल्प व भासमान आहे आणि तेंही परापेक्ष व नाशवंत आहे असें ज्याला पटलें म्हणजे विवेकानें व वैराग्यानें ज्याची मनोवासना संसाराला पराङ्मुख झाली किंवा विटली तो शाश्वतसुख कोठें मिळेल हें पाहायला लागतो व हाच त्याच्या परमार्थाचा मूळारंभ होय. बायका, पैका व प्रतिष्ठा ह्या विषयींच्या वासनेला संसार, प्रपंच किंवा प्रवृत्ति म्हणतात व ह्या वासनेपासून सुटून शाश्वतसुखाच्या मार्गें लागलेल्या मनोभावनेला परमार्थ किंवा निवृत्ति म्हणतात. प्रवृत्ति-निवृत्तींचा झगडा तुकोबांच्या पूर्ववयांत झालेला दिसतो. शेवटीं निवृत्तीचा जय झाल्यामुळें ते परमार्थांत पूर्ण रंगलेः—

प्रपंचाकडे मी पाठ फिरविली पण तुमच्या आशाममता गेल्या नाहींत तोंपर्यंत तुम्ही प्रपंचाविषयीं उदास होऊं नका असें तुकोबांनीं 'विराण्या'-वरील अभंगांत स्पष्ट सांगितलें आहे ! हे विराण्याचे अभंग २५ असून फार मौजेचे पण स्वानुभवाचे आहेत. ह्या अभंगांत तुकोबांनीं आपल्यावर स्त्रीचें रूपक केलें असून ' प्रपंचभ्रताराचा त्याग करून मी परपुरुषाशीं रत झाले, लौकिकांत व्यभिचारिणी म्हणवून घेतलें, आतां परपुरुषाशीं ( पुरुषोत्तमाशीं-परब्रह्माशी ) चार दिवस हांसून खेळून आनंदानें विहार करूं ' असें ह्मटलें आहे ! विहारकरणारी ह्मणून विहरिणी-विराणी!

तुकोबा म्हणतातः ' आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा '-प्रपंच नवऱ्याच्या संगतींत कोणत्याच वासना पुऱ्या झाल्या नाहींत, ' ह्मणोनि व्यभिचारा टेकलियें ' म्हणून मी परपुरुषाशीं रत झाले आहे. व्यभिचार सोपा नाहीं

देह एकाचा व चित्त दुसऱ्याजवळ याचें नांव व्यभिचार. देह प्रपंचाचा व चित्त देवापायीं याला त्यांनीं व्यभिचार ह्मटलें आहे.

**सांडूनि लौकिक जालिये उदास ! नाहीं भय आस जीवित्वाची !**
**ह्याचि नेम आतां न फिरे माघारी । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥ १ ॥**
**घरोघरीं जालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥ २ ॥**
**बळियाचा अंगसंग जाला आतां । नाहीं भय चिंता तुका म्हणे ॥ ३ ॥**

मी आतां 'देवपिशी' झाले, तुम्ही बायांनो ! (प्रापंचिक जीवांनो!) प्रपंचपिशा आहांत. तुमचें आमचें मेतकूट आतां जमायचें नाहीं !

**सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातलें अनंता चित्त माजें ॥**

क्षणभर वाईट सोसलें पण आतां 'साधलें अवीट निजसुख !'

**मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयांनो ॥**
**सांगतों तें तुम्ही आइकावें कानीं । आमुचे नाचणीं नाचूं नका ॥ १ ॥**
**जोंवरी या तुह्मां मागिलांची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥ २ ॥**
**तुका म्हणे काय वायाविण धिंद । पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥ ३ ॥**
**परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावें शीस ॥ १ ॥**
**संवसारा आगी आपुलेनि हातें । लावुनि मागुतें पाहूं नये ॥ २ ॥**
**तुका म्हणे व्हावे तयापरी धीट । पतंग हा नीट दीपासोई ॥ ३ ॥**

तुम्ही सासुरवासिनी आहांत, संसारांत रमलेल्या आहांत, धड ना संसार ना परमार्थ अशी दुहेरी फजीती करून घेऊं नका ! 'मागिलांची आस' आहे तोंपर्यंत प्रपंचाविषयीं उदास होऊं नका.

तात्पर्य, परमार्थाचें सुख ज्याला पाहिजे त्यानें प्रपंचावर तुळशीपत्र ठेवलें पाहिजे. हें ज्याला पूर्णपणें साधत नसेल त्यानें प्रपंच नीटनेटका करावा व त्यांतच शक्य तितका परमार्थ जोडावा. शेवटीं लोकांना आपल्यासारखें कठोर वैराग्यानें संसारांत वागतां येणार नाहीं म्हणून लोकांच्या भूमिकेवर उतरून तुकोबा मधल्या मार्गाचा उपदेश करितातः—

( १ )

**जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेंच करी ॥ १ ॥**
**उत्तमाचि गति तो एक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ॥ ध्रु० ॥**
**परउपकारी नेणे परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ २ ॥**
**भूतदया गाई पशूंचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ३ ॥**
**शांतिरूपें नोहे कोणाचा वाईट । वाढवी महत्व वडिलांचें ॥ ४ ॥**
**तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥ ५ ॥**

( २ )

**स्वामिकाज गुरुभक्ति । पितृवचन सेवा पती ॥ १ ॥**
**हेचि विष्णूची महापूजा । अनुभव नाहीं दुजा ॥ ध्रु० ॥**
**सत्य बोले मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥ २ ॥**
**निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥ ३ ॥**

स्वामिकाज म्ह० मारुतिरायासारखें स्वामिकार्यार्थ आयुष्य वेंचणें, गुरुभक्ति म्ह० एकनाथाप्रमाणें सद्गुरूची भक्ति करणें, पितृवचन म्ह० राम किंवा पुंडलीक यांच्याप्रमाणें मात्यापित्यांचे सेवेंत व आज्ञेंत आयुष्याचें सार्थक मानणें व स्त्रियांनीं सीतासावित्रीप्रमाणें पतिसेवा हाच परमधर्म मानणें–' हेचि विष्णूची महापूजा ' आहे, परमात्मा यानेंच प्रसन्न होतो.

**वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसि उत्तमलोक ॥ १ ॥**

' अवघ्या दशा येणें साधती ' ह्या अभंगांत तुकोबा म्हणतातः––

**नलगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म ।**
**आणिक न करावे श्रम । पुरे एक नाम विठोबाचें ॥**

कुळधर्म, कुळाचार, व वर्णाश्रमधर्म हे सोडूं नयेत व देवाचें नांव घ्यावें म्हणजे सर्व कार्य होतें. ' कुळधर्मैं ज्ञान कुळधर्मैं साधन ' ह्या अभंगांत तुकोबा म्हणतात की कुळधर्मकुळाचार श्रद्धापूर्वक पाळल्यानें गति, भक्ति, विश्रांति, परोपकार, दान, दया, धर्म, सर्व कांहीं साध्य होतें. 'तुका ह्मणे कुळधर्म दावी देवीं देव । यथाविध भाव जरी होय.'

**पराविया नारी माउलीसमान । मानिलिया धन काय वेंचे ? ॥ १ ॥**

**न करितां परनिंदा परद्रव्यअभिलाष । काय तुमचे यास वेंचे सांगा॥२॥**

परनिंदा, परद्रव्याभिलाप यांचा त्याग, सत्य भाषण, संतवचनीं विश्वास व नामस्मरण—‘ तुका म्हणे देव जोडे याजसाठीं. ’

---

## ३ प्रपंच आणि समर्थ.

रामदासस्वामी यांचीही विचारसरणी बहुतेक अशीच आहे. प्रपंच मिथ्या आहे, नाशवंत आहे, हें हजार ठिकाणीं त्यांनीं सांगितलें असून प्रपंच सुटत नाहीं म्हणून तो केला पाहिजे आणि करायचा तर नीटनेटका केला पाहिजे असें त्यांच्या शिकवणीचें सार आहे. प्रपंचाचें विस्तृत रूप त्यांनीं दासबोधाच्या **तिसऱ्या दशकांत** वर्णिलें आहे. ‘ जन्म दुःखाचा अंकुर । जन्म शोकाचा सागर ’ ‘ संसार हाचि दुःखमूळ । लागती दुःखाचे इंगळ ’ ‘ संसार म्हणिजे महापूर । माजी जळचरें अपार ’ इत्यादि प्रकारें त्यांनीं संसाराचें दुःखरूपत्व वर्णिलें आहे व तें स्पष्ट करण्यासाठीं गर्भवासाच्या यातायातीपासून तों जरामरणाच्या यातायातीपर्यंत त्रिविध तापांसह सामान्य संसाराचें हुबेहूब चित्र उभें केलें आहे. ‘ कैची माता कैचा पिता । कैची बहीण कैची भ्राता । कैचीं सुहृदें कैची वनिता । पुत्रकळत्रादिक ॥ कैचा प्रपंच कैचें कुळ । कासया होतोसी व्याकुळ ’ याप्रमाणें वैराग्योद्बोधक वर्णन करून १० व्या समासांत भक्तीचें सामर्थ्य अतिशय गोड वाणीनें प्रतिपादिलें आहे.

**सांडूनि राम आनंदघन । ज्याचे मनीं विषयचिंतन ।**
**त्यासी कैचें समाधान । लोलंगतासी ॥ ३–१०–६२ ॥**
**जयास वाटे सुखचि असावें । तेणें रघुनाथभजनीं लागावें ।**
**स्वजन सकळही त्यागावे । दुःखमूळ जे ॥ ६३ ॥**

समर्थांनीं रामभजनाचा धोपट मार्ग नवविधाभक्ति हा चौथ्या दशकांत श्रीभागवतवचनाधारें विस्तृतपणें सांगितला आहे. ‘ देवाच्या सख्यत्वासाठीं आपलें सौख्य सोडून द्यावें ’ इतकेंच काय पण ‘ जिवलगांसी

तुटी ' पडल्याचीही खंत मानूं नये असें त्यांनीं सख्यभक्तीच्या समासांत ( द० ४ स० ८ ) म्हटलें आहे. जुन्या दासबोधांत त्यांनीं प्रपंच हा परमार्थाला विरोधी असल्यामुळें व अशाश्वत दुःखरूप असल्यामुळेंच आम्ही याचा त्याग केला आहे—' जरी हा प्रपंच शाश्वत जाणतों। तरी आम्हीं यासीच धरितों। हा अशाश्वत म्हणोनि रडतों। तुम्हांभोंवतें ' ( समास ११–५९ ) असें स्पष्ट म्हटलें आहे.

असा समर्थांचा स्वतःपुरता निश्चय असला तरी प्रपंच सोडा म्हणून कोणी सोडीत नाहीं किंबहुना तो शेंकडा शंभर लोकांना सुटणेंही अशक्य आहे हें चांगलें माहीत असल्यामुळें त्यांनीं तुकोबासारखाच लोकांस मध्यम मार्ग उपदेशिला आहे:—

**प्रपंच करावा नेमक। पाहावा परमार्थविवेक।**
**जेणें करितां उभय लोक। संतुष्ट होती ॥ दास० १२–३–२॥**

बाराव्या दशकांत तर समर्थांनीं ' प्रपंच करावा नेटका ' म्हणून सांगितलें आहे. वारकरीसंतांनीं जग मिथ्या आहे असें सांगून लोक पंगु व नेभळे बनविले पण समर्थांनीं पहा संसार नेटका करायला सांगितला आहे म्हणून या समासाकडे अर्वाचीन समर्थभक्त बोट दाखवीत असतात ! पण ते हा समास नीट पाहतील व समर्थांच्या एकंदर शिकवणीचें रहस्य समजून घेतील तर तुकोबांपेक्षां समर्थांची कांहीं वेगळी दृष्टि होती असें दिसणार नाहीं ! ' प्रपंचीं जो सावधान। तोचि परमार्थ करील जाण ' असें समर्थांनीं म्हटलें आहे, तसेंच ' जयाचें ऐहिक धड नाहीं। तयाचें परत्र पुससी कायी ? ' असें ज्ञानोबारायांनींही म्हटलें आहे !

' प्रपंच सांडून परमार्थ केला। तरी अन्न मिळेना खायाला। मग तया करंट्याला परमार्थ कैचा ? ' असें म्हणून समर्थ लगेच पुढील ओवींत बजावतात कीं ' परमार्थ सांडून प्रपंच करिसी। तरी तूं यमयातना भोगिसी. ' साहेबाच्या (धण्याच्या, मालकाच्या) कामाला आला नाहीं आणि सुखानें सुस्तावून घरींच राहिला तर धणी सेवकाला खर-

पूस चोप दिल्याशिवाय राहत नाहीं हें आपण प्रत्यक्ष पाहतों, तसेंच खरा साहेब जो परमात्मा त्याचा संतोष जोडला नाहीं तर यमदूतांच्या हातचा मार खावा लागतो. ह्मणून 'प्रपंचपरमार्थी जो सावध तोच धन्य' होय. 'संसारीं असतांच मुक्त। तोच जाणावा संयुक्त।' जो निजात्मतत्वीं सावध आहे, आत्मानुसंधान अखंड ठेवून जो सवधानपणें उभयत्र वागतो, तोच पुरुष धन्य होय असें समर्थांचें सांगणें आहे. 'ह्मणोनी सावधपणें। प्रपंचपरमार्थ साधणें.' समर्थांच्या स्फुट प्रकरणांत 'व्यर्थ संसार जातसे' असें एक व 'धन्य संसार होतसे' असें एक अशीं दोन प्रकरणें आहेत तीं पहावींत. संसार करायचा तर तो रडकेपणानें कुंथून करूं नये. संसारांत सदा चिणचिण, सदा फुणफुण, सदा रड असा संसार व्यर्थ आहे. आतां संसारांत असून नित्यानित्यविवेक आहे, अंतर्निष्ठ उपासनेचा रंग आहे, नीतिन्यायाचें चालणें आहे, अन्नोदकवस्त्रदानानें व मधुरवाणीनें प्राणिमात्रांस संतुष्ट करणें आहे, देवाब्राह्मणांविषयीं आदर आहे, 'उपकार समस्तां लोकां' तोही आहे, नित्य देवाचा उत्सव घरीं आहे, सत्य कदाकाळीं सोडीत नाहीं, नित्य नेमस्त बोलणेंचालणें आहे, 'पराचे जीवींचें जाणून' सर्वांभूतीं सप्रेम वागणें आहे. हें सर्व आहे, तेणें 'धन्य संसार होतसे.' रडक्यांचा रडका संसार कसा असतो पहा. **करंट्याच्या संसाराचें** हें वर्णनः—

**नसे आंथराया नसे पांघराया। नसे धाम ना दृढ छाया निजाया।**
**नसे अन्न खाया नसे रम्य जाया। वृथा शीण संसार कर्ती रडाया॥१॥**
**नसे द्रव्य कांहीं घरीं धान्य नाहीं। बहु वेष्टिला कामक्रोधादि देहीं।**
**पराधीनता वेळ नाहीं मराया। वृथा शीण संसार कर्ती रडाया॥ २॥**
**मनासारिखा मित्र तोहि मिळेना। परत्रीक तें ज्ञान पोटीं वसेना।**
**सदा कोप आरोप संतप्त काया। वृथा शीण संसार कर्ती रडाया॥३॥**

याच्या उलट **भाग्यवंताच्या संसाराचें** मनोरम चित्र पहाः—

**मनासारिखी सुंदरा ते अनन्या। मनासारिखे पुत्र जामात कन्या।**
**सदा सर्वदा बोलती रम्य वाचा। जनीं जाणिजे योग हा सुकृताचा॥**

**भलीं मायबापें भले मित्रबंधु । भलें सोइरे राखिती स्नेहवादु ।**
**मुलें लेंकुरें येक मेळा सुखाचा । जगीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥३॥**
**धनें धान्य पात्रें अलंकार चीरें । विसोरे घरें सुंदरें रम्य सारें ।**
**देहे चालतो सर्व आरोग्य ज्याचा । जगीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥६॥**
**मनासारिखे चिंतितां देव पावे । मनासारिखे भक्त भावें मिळावे ।**
**मनासारिखा संग साधूजनाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥९॥**

समर्थांनीं स्वतःचा प्रपंच सोडला पण राष्ट्राचा प्रपंच कसा सावरला याचें विवरण तिसऱ्या खंडांत सविस्तर व्हावयाचें आहे. आतां आपण एकनाथांकडे वळूं. नाथांचा संसार आद्यंत सुखमय झाला.

---

## ४ द्रव्यापासून अनर्थ व द्रव्याचा विनियोग.

अर्वाचीनांचे साधुसंतांविषयीं त्याचें ग्रंथ न पाहिल्यामुळें जे अनेक गैरसमज झाले आहेत त्यांपैकींच द्रव्य व त्याचा विनियोग यासंबंधीं एक आहे. प्रपंचाला द्रव्याची आवश्यकता आहे ही गोष्ट सर्वसंमत आहे. न्यायनीतीनें द्रव्य जोडावें व स्वधर्मानुसार त्याचा विनियोग करावा, तथापि द्रव्यापासून प्रत्यक्ष व्यवहारांत केवढाले अनर्थ घडतात व द्रव्यलोभ आत्महिताच्या कसा आड येतो हें ओळखून असावें असा संतांचा आशय आहे. द्रव्याची भरमसाट निंदा व अतिरिक्त स्तुति हीं दोन्हीं टोंकें सोडून द्रव्याचा उपयोग प्रपंचांत किती आहे व त्याला किंमत किती द्यावी हें यथार्थ जाणलें पाहिजे. कनक व कांता यांचा मोह मनुष्यमात्राला सहज आहे. ‘लग्न कर व पैसे मिळव’ हें कांहीं कोणाला शिकवावें लागत नाहीं ! ह्या दोन्ही जीवसुलभ वृत्तींना आळा घालून त्या कह्यांत ठेव, त्यांच्या लोभमोहानें वाहत जाऊं नकोस, एवढाच इषारा संतसज्जन देत असतात. द्रव्याचा अभिलाष, त्यासाठीं चाललेल्या नाना खटपटी व लटपटी व द्रव्यदारेच्या चिंतनांतच आयुष्याचा नाश व श्रेष्ठकार्याची विस्मृति शेंकडा नव्याण्णव लोकांच्या चरित्रांत

नित्यशः दिसत असतांना द्रव्याच्या अनर्थांपासून सावध होण्यासाठीं जर त्यांनीं जरा कडकपणानें शिकविलें तर त्यांची लोककल्याणेच्छा ध्यानांत आणून त्यांचे उपकारच मानिले पाहिजेत. आपल्यासभोंवार ज्या गोष्टी नित्यशः दिसतात, न्यायकोर्टें व सर्वदेशांचे इतिहास पाहिले असतांना पदोपदीं जे अनर्थ झालेले आढळतात, ते मनांत आणूनच त्यांनीं अर्थाच्या अनर्थांपासून सावध रहा असें सांगितलें आहे. साधुसंतही बहुतेक संसारीच होते तेव्हां त्यांना द्रव्याची किंमत कळत नव्हती असें म्हणतां यावयाचें नाहीं. "द्रव्य नसतां उपायें शिणवी। जाल्या संरक्षणीं आधी लावी। रात्रिदिवस हृद्रोग जीवीं। अविश्वासें नांदवी धनलोभु ॥ द्रव्य सहसा न मिळे पाहीं। मिळे तरी अनीतिउपायीं। यालागीं द्रव्याच्या ठायीं। सुख नाहीं त्रिशुद्धी ॥ प्रपंचाचे सुहृद समस्त। जंव स्वार्थ तंव होती आप्त। स्वार्थविरोधें ते अनाप्त। होवोनि घात सुहृदां करिती" हें नाथांचें म्हणणें खरें नाहीं असें कोण म्हणेल? द्रव्यापाशीं आधिव्याधी, द्रव्यापाशीं दुष्टबुद्धि, द्रव्यापाशीं लोभ व क्रोध, द्रव्यापाशीं सकळ पाप, द्रव्यापाशीं नानाविकल्प—हें काय खोटें आहे? साक्षात् द्रव्य जड आहे, त्याच्यापाशीं पापही नाहीं व पुण्यही नाहीं; पण द्रव्याच्या लोभामुळें, अतिहव्यासामुळें दुनियेंत प्रतिक्षणीं कितीतरी पापें घडत असतात! द्रव्य वाईट नाहीं—द्रव्याचा लोभ वाईट आहे! द्रव्य गोमटें नाहीं व वोखटेंही नाहीं द्रव्याचा उपयोग जो आपण करितो त्यावरून त्याला जनानिंदेचे आघात सोसावे लागतात! ( भाग. अ० ३ ओवी २४५ ते २५८ ).

नाथांनीं भागवतांत ( अ० २३ ) कृपणाचें चरित्र सांगतांना द्रव्यापासून कोणते अनर्थ होतात व द्रव्याचा सद्व्यय कसा करावा हें दोनशे ओव्यांत सविस्तर सांगितलें आहे. दायाद म्ह० भाऊबंद, राजा, चोर आग व रोग ह्या पांच कारणांमुळें द्रव्याचा नाश होत असतो. धनाचा लोभ हा दुर्धर आहे व तो विवेकी व ज्ञाते असले तरी त्यांनाही निंदास्पद करितो! गुण, औदार्य, यश, सौजन्य, स्नेह यासारख्या श्रेष्ठ गुणांची धन-

लोभ माती करितो. द्रव्यप्राप्तीसाठीं मनुष्य जे कष्ट करितो ते तो ईश्वरप्राप्तीसाठीं करील तर काय बहार होईल ! ‘ द्रव्यार्जनीं वसे प्रयास। द्रव्यरक्षणीं चिंतेचा वास । द्रव्यव्ययीं वळसा त्रास । भ्रमाचा रहिवास धनापाशीं ! ’ धनापासून स्तेय म्ह० चोरी, हिंसा, असत्य, दंभ, काम, क्रोध गर्व, मद, भेदभाव, वैर, अविश्वास, स्पर्धा व स्त्रीद्यूतमद्यपान हीं तीन व्यसनें असे पंधरा अनर्थ ओढवतात ! न्यायकोर्टाचे खटले पाहिले तर ह्या प्रकारचे अनर्थ जगभर नित्यशः घडतांना दिसतात ! सर्व देशांचे इतिहास ह्या अनर्थांनीं गडगच्च भरलेले आहेत. बापलेक, भाऊभाऊ, पतिपत्नी, बहिणभावंडें, नवराबायको, मित्रमित्र यांच्या खटल्यांनीं कोर्टाचे कित्येक टन कागद व इतिहासाचीं कितीं प्रकरणें काळीकुट्ट झालेलीं आहेत व होत आहेत! द्रव्यासाठीं हिंसा घडतात, खोटेनाटे प्रकार होतात, भेदभाव प्रगट होऊन वैमनस्यें माजतात, ‘ क्रियविक्रयीं धनलोभ जाण । मिथ्या बोलती साधारण ’ इतकेंच काय पण मोठमोठे पंडितसुद्धा काय काय प्रकार करितात ! परमार्थीही ‘ धन जोडावयाकारणें । टिळे माळा मुद्रा धारणें ’ इ० दांभिकपणाचीं सोंगें संपादितात. गुरु व शिक्षक ‘ देखोनि धनवंत थोरू । त्याचे उपदेशीं अत्यादरू ’ दाखवितात; ‘ गुरुसी द्यावें तनमनधन ’ असें सांगून शिष्यांला लुबाडून मोठाल्या इस्टेटी करणारे गुरु काय थोडे आहेत ! राजेरजवाडे, व्यापारी हे तर राहोतच, पण अग्निहोत्री, वेदपाठक, याज्ञिक हे कोणीही द्रव्यलोभांतून सुटत नाहींत ! धनमदानें ‘ उघडा डोळा होय अंधू ! कानीं नायके शब्दबोधू ’ असे किती तरी ताठर बनतात. ‘ पितापुत्रांमाजी विरोधू । पाडितो हा द्रव्यसंबंधू । वैरी करी सखे बंधू । तो हा प्रसिध्दु धनलोभु ’ असे औरंगझेब प्रत्येक गांवांतून सांपडतात ! ‘ स्त्री द्यूत आणि मद्यपान । या तिहींतें वाढवी धन । हे तीन अनर्थ दारुण । धनवंता पूर्ण आदळती. ’ जगांतले हे अर्थाचे अनर्थ पाहून एखादा विवेकी पुरुष त्यास मनापासून विटतो. ‘ जेवीं बोळ हुंगेना माशी । ढेकुण न ये तेला-

पाशीं। वोळंबा ( वाळवी ) न लगे अग्नीसी। तेवीं तो अर्थासी नातळे!"

ही एक बाजू झाली. अर्थविषयाला दुसरीही बाजू आहे! अर्थापासून अनर्थ ओढवतात हें जसें खरें तसे अर्थापासून प्रपंचच काय पण परमार्थही साधतां येतो हेंही खरें आहे! पृथ्वीनें सूर्याकडे तोंड केलें कीं दिवसाच्या प्रकाशानें ती धवलित होते व रात्रीं अंधकारानें ग्रासली जाते, त्याप्रमाणें मनुष्याची बुद्धी ईश्वरसन्मुख झाली कीं धर्मनीतिन्यायाच्या प्रकाशानें ती धवल होते व अविद्येच्या रात्रीं मागें सांगितलेलीं पंधराच काय पण पंधरा हजार भूतें पुढें नाचायला लागतात! द्रव्यापासून अनर्थ होणें किंवा परमार्थ साधणें हें कर्त्याच्या बुद्धीवर अवलंबून आहे, तरी द्रव्य ह्या पदार्थाच्या सांन्निध्यानें लोभमोहादि विकार बळावतात हें कांहीं खोटें नाहीं! द्रव्याची निंदा म्ह० द्रव्यलोभाची निंदा आहे, द्रव्याची नाहीं. स्त्रीची निंदा ही स्त्रीविषयक विषयवासनेची निंदा आहे, स्त्रीची नाहीं हें कोणीही विसरूं नये.

**अर्थ** जर अनर्थाचें कारण आहे तर त्याचा काय सर्वथैव त्यागच केला पाहिजे? दैवानें संपत्ति घरीं आली किंवा असली तर ती काय उकिरड्यावर किंवा खड्डयांत नेऊन ओतावी कां जलप्रवाहांत सोडून द्यावी? अर्थत्याग कसा करावा? नाथ सांगतातः—

'दैवें जोडिलियां धन। करावे पंचमहायज्ञ.' देव, ऋषि, पितर, भूतें व ज्ञातिबांधव यांच्या सेवेंत व संतोषांत संपत्तीचा व्यय करावा म्हणजे त्यागाचेंच फळ मिळतें. देवयज्ञ, ब्रह्मयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ व मनुष्ययज्ञ असें पांच यज्ञ करायला आपल्या धर्मशास्त्रानें याच हेतूनें सांगितलें आहे. हे पांच यज्ञ समंजसपणानें करावें, नुस्ती कवाईत करूं नये. उदाहरणार्थ पितृयज्ञ म्हणजे केवळ श्राद्धपक्षादि नव्हे! 'ज्याचे सेवेनें सुखी पितर। तेंचि पितृतर्पण साचार.' आईबाप जिवंत असतांना अवज्ञाहेळणा करणें आणि ते मेल्यावर रोज तर्पण करून ताम्हणभर पाणी सोडणें हें खरें पितृतर्पण नव्हे. 'जित्यां पितरां त्रिकाळीं

नमन । कदा न करावें हेळण.' पितरांची आज्ञा पाळावी, त्यांची प्राणांतींही अवज्ञा न करावी, त्यास गौरवून यथारुचि अन्नवस्त्र द्यावें–' पिता स्वयमेव नारायण । माता प्रत्यक्ष लक्ष्मी आपण । ' अशा विमलभावनेनें त्यांसी वागावें–आणि त्यांचा काल झाल्यावर पितृतर्पण गयावर्जनादि सर्व यथाशास्त्र करावें याला संपूर्ण पितृतर्पण म्हणतात. हा पितृयज्ञ होय. द्रव्याचा सद्व्यय करण्याचा हा एक मार्ग होय. असेच ऋपितर्पण किंवा ब्राह्मणपूजन करावें. श्रद्धासन्मानानें त्यांचें चरणतीर्थ घ्यावें, अन्नवस्त्रादि यथोचित द्यावें. भूतयज्ञ असा करावाः—

**बंधु स्वगोत्र स्वजन । त्यांची दरिद्रपीडा दारुण ।**
**निरसावी देऊन धन । हा मुख्य धर्म जाण श्रेष्ठत्वें ॥ ३८८ ॥**

आपल्या बायकापोरांना उपाशी ठेवून किंवा स्वतःच्या जीवाला आत्यंतिक क्लेश देऊन मात्र दानधर्म करीत सुटूं नयेः—

**कुटुंब पीडूनी आपण । अन्यत्र द्यावें अन्नधन ।**
**तोचि अधर्म परिपूर्ण । शुद्धपुण्य तें नव्हे ॥ ३८९ ॥**
**कुटुंबेसी यथोचित । सुखी करुनि समस्त ।**
**याहूनि उरला जो अर्थ । तो श्रेयार्थ वेंचावा ॥ ३९० ॥**
**कुटुंब सुखी करी आपण । स्वेच्छा दे दीनभोजन ।**
**परी कदर्थवी जो निजप्राण । तोही दारुण अधर्म ॥ ३९३ ॥**

अतिथीला अन्न द्यावें, विन्मुख जाऊं देऊं नये, अन्नदान सर्व दानांत श्रेष्ठ आहे. पंक्तींत पंक्तीप्रपंच अगदीं करूं नये. सर्व भूतांना सुखी करण्यांत द्रव्य वेंचावेंः—

**धनाचा सद्व्ययो खरा । द्यावें अनाथ प्रेतसंस्कारा ।**
**अर्पावें दीनांच्या उद्धारा । धाडावें घरा अयाचितांच्या ॥ ३९६ ॥**
**अंध पंगु मुके दीन । यांसी संरक्षी जो आपण ।**
**त्याचेंचि सार्थक धन । शुद्ध पुण्य तयाचें ॥ ३९७ ॥**

साधुसज्जनांच्या अडचणींत त्यांना आपण होऊन साह्य करावें, ' दुर्बळ भगवद्भक्त ' असेल तर त्यासी अवश्य धनधान्य देऊन सुखी

करावें. स्वधर्मानें जोडलेल्या धनाचा याप्रमाणें सद्व्यय करावा. शेवटीं श्रीगुरुसेवेलागीं संपत्तीचा विनियोग निष्कपटवृत्तीनें करावा. याप्रमाणें धनाचा सद्व्यय करून भाग्यवंतांनी ' अर्थे परमार्थासी ' साधावें. तात्पर्यः—

**जेणें वित्त जीवितें साचार । भूतदया परोपकार ।**
**करूनियां विवेकी नर । भवाब्धिपरपार पावले ॥ ४१४ ॥**

अर्थाचा असा सद्व्यय केला म्हणजे अर्थाला अनर्थ कोणी म्हणणार नाहीं.

---

## ५ गृहस्थाश्रमाचे निर्बंध, नियम व महत्व.

विषयभोग म्ह० मैथुन, मांसभक्षण व सुरापान. याविषयीं जीव नेहमी सतृष्ण असतात पण त्यांना मर्यादेंत ठेवून निवृत्तिकडे न्यावे हें वेदाचें पूर्ण मनोगत आहे. कापसाला आग लागली कीं तो विझवितां विझत नाहीं, वानर चण्यांच्या किंवा मासा आमिषाच्या लोभाला गुंतून मृत्युमुखीं पडतो, किंवा ' दूध मिळालियां मांजर । न म्हणे अंत्यंज-द्विज घर ' त्याप्रमाणें विषयभोगाविषयीं उन्मत्त झालेले नर सेव्यासेव्यविचार करीत नाहींत. विषयवासनेमुळें योनिसंकर घडेल व प्राणी नरकाला जातील ते न जावेत म्हणून वेदानें वर्णाश्रमविभाग केले. ' भलती स्त्री भलता नर । मैथुनीं होय वर्णसंकर । तो चुकवावया प्रकार । विवाह निर्धार नेमिला वेदें ! ' तो निर्धार असाः- ' धर्मपत्नीपाणिग्रहण । विवाह नेमिला सवर्ण '—आपल्या वर्णाच्या व आपल्या वेदाच्या कन्येचें पाणिग्रहण करावें, आपल्याहून इतर वर्णाची व इतर वेदाची मुलगी करूं नये.

**कन्या सवेद सवर्ण । जिसी नाहीं रजोदर्शन ।**
**तेही पित्यापाशी याचून । करावें लग्न विधानोक्त ॥ २२४ ॥**
**धर्म अर्थ कामाचरण । अन्यत्र न करावें आपण ।**
**ऐसी वाहूनियां आण । पाणिग्रहण वेदोक्त ॥ २२५ ॥**

स्वस्त्रीशिवाय इतर स्त्रिया मायबहिणी मानाव्या. स्वस्त्रीशींही दिवा

मैथुन वर्ज्य केलें आहे, अहोरात्र नाहीं, प्रजार्थ ऋतुकाळीं गमन करणारे व वेदनियम पाळणारे गृहस्थ ब्रह्मचारीच होत. असाच निर्बंध वेदानें मांसाहारावर घातला आहे. सुरापानाची तर सर्वांना सर्वकाळीं बंदीच केली आहे. मांसाचा फक्त यज्ञावशेष व तोही अत्यल्प घ्यावा. वेदाचा कल भोगाकडे नाहीं, त्यागाकडे आहे. ' शनैः शनैः विषयांसी त्यागवी वेद ' ( एक. भागवत अ० ५ ओवी २०८–२४० ).

**करोनियां समावर्तन । व्रतबंधाचें विसर्जन ।**
**गुरुआज्ञा घेऊनि जाण । पाणिग्रहण करावें ॥ ३९३ ॥**
**भार्या पर्णावी सवर्ण । इतर वर्जिजे तिन्ही वर्ण ।**
**स्ववेदशाखेचे वर्ण । सगोत्रपण चुकवूनी ॥ ३९४ ॥ ( अ० १७ )**

मातापित्यांना व वडिल माणसांना आल्हाद होईल असा श्लाघ्य संबंध करावा. वधूचें वय वरापेक्षां अधिक नसावें, बरोबरीचें नसावें, तर वधू ५।७ वर्षांनीं धाकटी असावी. वधू आठ वर्षांपेक्षा लहान नसावी. वधूचें पाणिग्रहण केल्यावर ' शास्त्रअविरुद्ध ' अशा आश्रमधर्मानें रहावें.

**स्त्री-पुरुषांची चित्तवृत्ती । अनुकूल वर्ते धर्मप्रवृत्ती ।**
**तरीच परलोक साधिती । इतरां प्राप्ती ते नाहीं ॥ ( भाग० ७–६१२)**
**अतिथि आणि पतिपुत्रांसी । भोजनीं समता नित्य जिसीं ।**
**धनलोभ नाहीं मानसीं । परमार्थी तिसी अधिकारु ॥ (२९–५८४ )**
**अन्नवस्त्र दान मान । पोटींच्या कळवळ्यानें जाण ।**
**करावे भूतीं प्रियाचरण । हा स्वधर्म जाण सर्वांचा ॥ (१७–२६० )**

अतिथिपूजन हें गृहस्थाश्रमाचें (अ० १७) पहिलें मोठें कर्तव्य आहेः—

**अतिथि आलिया देख । प्राणांतींही नव्हे पराङ्मुख ।**
**नाठवे भूकतहान । समयीं आवश्यक दे अन्न ॥ ४२७ ॥**
**तेंही अत्यादरेसी जाण । देऊनि अत्यंत सन्मान ।**
**यथानुशक्त्या देतां अन्न । जनार्दन संतोषे ॥ ४२८ ॥**
**सांडूनियां अभिमान । सर्व जीवांसी सदा लीन ।**
**या नांव महद्धर्म जाण । शुद्ध लक्षण हें धर्माचें ॥ ४२९ ॥**

**मजमाजी रंगली चित्तवृत्ती । यालागीं विसरला गृहासक्ती ।**
**त्यासी गृहाश्रमीं माझी प्राप्ती । सुखसंपत्ती निजबोधू ॥ ४३१ ॥**

नाथ म्हणतात कीं ' भूतप्रियहितकारी । ऐसा जो पुरुष संसारीं । मी भगवंत त्याच्या घरीं । सर्वहित करी सर्वदा ' ( १७-२६२ ) आणि म्हणूनच देव श्रीखंड्याच्या वेषानें नाथांच्या घरीं राबायला आले ! स्त्री-पुत्रादि देहीं आत्मारामच पाहत असतां रतिसुखही ब्रह्मसुखच होतें !— ' इया प्रतीतीं प्रिया आलिंगिती । तेणें आलिंगे चिदात्मशक्ति । देवें जालिया संतती । तेथेंही प्रतीती निजात्मता ! ' विषयांत राहून निर्विषय स्थितीनें राहण्याची हातोटी गुरुकृपेनें साधली तर विषयही नारायणरूप होतात व मुलेंबाळें होऊनही ब्रह्मचर्यास भंग होत नाहीं. संसारांत राहून ब्रह्माचा आनंद भोगतां आला, परिग्रहांत निष्परिग्रहत्वानें वागतां आलें, ' मी आणि मम ' हें चित्सुखानें भरलें कीं संसार ब्रह्माहून वेगळा कोठें राहील ? देहात्मबुद्धि ह्मणजेच संसार. आत्मबुद्धीनें संसार आत्मरूपच होतो!

**माझें मीपण पाहतां । समूळ हारपली ममता ।**
**हें माझें म्हणावयापुरता । ठाव रिता नुरेचि ॥ ३३४ ॥**
**माझ्या मीपणाबाहिरें । जें ममतास्पद दुजें उरे ।**
**तें तेथ पूर्णममता स्फुरे । तें म्यां चिन्मयें घोटिलें ॥ ३३५ ॥**
**तेथ मीपणें मी माझें । नुरेचि तूंपणेसी दुजें ।**
**ऐसें परब्रह्माचेनि निजें । झालें सहजें निर्मम ॥३३६॥** (अ०२६)

अशा बैठकीवरचा पुरुष आत्मस्वरूपाबाहेर संसार पाहतच नाहीं त्याला संसारभय कोठचें व संसार सत्य कां मिथ्या या वाटाघाटींतच तो पडतो कशाला ? देहाला थोर पदवी आली तरी तो श्लाघत नाहीं व हीन पदवी आली तरी कुंथत नाहीं.

**छाया विष्टेवरी पडे । कां पालखीमाजी चढे ।**
**तेणें पुरुषा सुखदुःख न जोडे । मुक्तासी तेणें पाडें देहभोग ॥**
**स्वजनधनस्त्रीपुत्रांसी । नांदोनि तो नातळे त्यांसी ।**
**स्वप्न घरवात जागृत जैसी । तैसा साधूसी संसारू ॥ ३४६ ॥**

साधु संसारी दिसतात पण संसारी नसतात, अथवा संसारी दिसले व असले तरी त्यांच्या आत्मस्थितीला भंग कोठें आहे ?

' या परी जीवन्मुक्त। इंद्रियकर्मी क्रियायुक्त। देहगेहीं नित्य वर्तत। देहगेहातीत निष्कर्मधर्म. ' या बोधाच्या स्थितींत असतांना बायकामुलें घरांत नांदत आहेत, माझें-तुझें हे सर्व व्यवहार हातून घडत आहेत, पण ' पद्मपत्रमिवांभसा ' असा हा अंतरंगांत असंग असतो.

---

## ६ संसार कोणाला आहे व कसा आहे ?

संतांनीं संसार केला कीं नाहीं ? संसाराचें स्वरूप काय ? प्रपंच व परमार्थ यांचा संबंध कोणता ? जीवन्मुक्ताचा प्रपंच कसा असतो ?

संसाराचें यथार्थ रूप जाणून घ्यावें, भ्रमानें संसार करूं नये, निर्भ्रम होऊन अकर्तात्मबोधानें संसार करावा म्हणजे तो सुखाचा होतो अशी नाथांची शिकवण आहे. हा मृत्युलोक ' अनित्य व असुख ' आहे, येथें आल्यावर परमात्म्याला ओळखावें व संसारपाश असंगशस्त्रानें छेदावेत असें गीतेंत भगवंतांनींच सांगितलें आहे व त्याचाच उपदेश संतांनीं करून लोकांस भक्तिमार्गास लावलें आहे, संसार सत्य आहे शाश्वत आहे व सुखरूप आहे असें कोणी ह्मणत नाहीं व असा अनुभवही नाहीं ! संसार ब्रह्मरूप भावला तर मात्र सुखरूप आहे.

प्रवाहपतित कर्मे केलीं पाहिजेत, तीं कोणाही देहवंताला सुटत नाहींत, ह्मणून संग व फलाशा सोडून कर्मे कर तीं मला-भगवंताला-अर्पण करून कर्मबंधांपासून मुक्त हो असें गीता दुंदुभिरवानें सांगत आहे व हेंच साधुसंत सांगत असतात. ' तत्त्वज्ञानाच्या सांगताती गोष्टी। परी संसारें हिंपुटी होती मूढ ' ' अंधाचे सांगाती मिळालेती अंध । सुख आणि बोध काय तेथें ? ' सोमलविषाचें रसायनानें संजीवनीअमृत तयार होतें, तसें गुरुभजनानें व ईश्वरध्यानानें संसार ब्रह्मरुप करून भोगतां येतो अशी नाथासारख्यांची पुरुषार्थाची वाणी आहे !

**तापत्रयें तापली भवार्णवीं पीडिलीं । तया विठ्ठलवल्ली प्रकाशली ॥**
**एका जनार्दनी कायावाचामन । करीं समर्पण देवापाशीं ॥**

जाणते नेणते सर्वच ( आसक्तीमुळें ) संसारांत गुंगतात व ‘ व्यर्थ कुंथाकुंथी ’ करीत असतात ! ‘ संसारीं गुंतती । बळें माझें माझें ह्मणती । चिखलीं रुतती । आणि धांवा धांवा ह्मणती ! ’ यांत पुरुषार्थ कोणता ?

यासाठीं ‘ राहे अलिप्त संसारीं । अंतरीं धरूनियां हरी ’ धनमान-स्त्रीपुत्रबळावर देवाला आटवीत नाहींस पण अंतकाळीं यांपैकीं कोणीही उपयोगीं पडावयाचे नाहीं हें आधींच जाणून अंतरीं सावध हो. ‘ सुख-रूप असतां म्हणे माझें माझें । संकट देखोनीया घाली देवावरी ओझें । असा बहुतेक लोकांचा दंडक दिसतो पण हे काळाची उडी पडण्यापूर्वी सावध होतील तर हरिसुखाचा निर्मर्याद आनंद यांना भोगतां येईल.त्या स्वानंदाबाहेर संसार कोठें राहील ?

“ संसार आहे कोणाला ? अविनाशी प्रकृतिपर परमात्म्याला असणें शक्य नाहींच–सूर्य मृगजळाच्या डोहीं बुडे, खद्योततेजें सूर्य जळे, वागुलाभेणें काळ पळे, मुंगीच्या पांखवळें आकाश उडे, थिल्लरांत मेरु बुडे–ह्या अशक्य गोष्टी एक वेळ घडल्या तरी आत्मा भवबंधांत पडत नाहीं ! मग भवभय काय देहाला आहे ? दगडाचें पोट दुखेल, कोरडें काष्ठ भुकेनें चरफडेल, डोंगराला हागवण लागेल, कोळशानें अंधार गोरा होईल–हें जसें अशक्य तसा देहाला भवबंध बाधणें अशक्य आहे ! ” तर मग हा संसार कोणाला आहे ? ना आत्म्याला ना देहाला ! हा उद्धवाचा प्रश्न आहे. यावर भगवान् उत्तर देतात:—

स्थूळ, कृश, श्याम, गौर हे **देहा**चे धर्म, काणा, मुका, बहिरा हे इंद्रियांचे धर्म, क्षुधातृषा हे **प्राणा**चे धर्म, कामक्रोधलोभ हे **मना**चे धर्म–सत्वगुणाची जागृति, रजोगुणाची स्वप्नस्फूर्ति, तमोगुणाची सुषुप्ति असे ज्याचे त्याचे धर्म अंगावर बळेंच ओढून घेऊन, देहाचे जन्ममृत्यु माझे म्हणणारा, अन्न खाणारा प्राण असून मी जेवलों, मी उपाशी, मी

पापी, मी पुण्यवान्, स्वर्गनरकभोक्ता मी, बद्धमुक्त मी असे दुसऱ्याचे धर्मकर्म बळेच आपल्यावर ओढून घेणारा हा जीवात्मा संसार माझा म्हणून उगाच कुंथत बसतो ! तो वस्तुतः सर्वसाक्षी चिदात्मा आहे. आपलें निजरूप विसरून मिथ्या देहादिकांसी तादात्म्य पावणारा हा जीवात्माच ह्या खटाटोपाला कारणीभूत आहे ! संसार खराच असता तर ब्रह्मज्ञानानेंही याचा निरास झाला नसता ! हा मिथ्या आहे, भ्रमरूप आहे, कल्पनामय आहे, म्हणून याचें निराकरण करितां येतें. संकल्प याचें मूळ आहे व विषयध्यानानें हा वाढत जातो. 'विषयध्यासें भव-बंधन ' दृढतर होत जातें. ' विषयसेवनें भवबंधन । जीवासी झालें दृढ-पूर्ण ' जीवन्मुक्त पुरुषास आत्मजागृति असते म्हणून त्यांना संसार नाहीं. देहाला मी म्हणणें हा संसार. आत्मरूपीं स्थिर राहणें हा मोक्ष. ( अ० २८ ओवी १२२ ते १७५ ) संसार हा पदार्थच नाहीं, मग तो सत्य कां मिथ्या—काय कसें म्हणावें ! संसार मनःकल्पित आहे ! कल्पना, मन, अहंकार, भ्रम, अज्ञान, जीव ही सारी कल्पना ! ब्रह्मवस्तु मात्र सत्य आहे.

**चित्रीं जळ आणि हुताशन । अंत्यज आणि ब्राह्मण ।**
**व्याघ्र आणि हरिण । भासतांही जाण भिंतीचि भासे ! ॥ ८१ ॥**
**तेवीं हा प्रपंच द्वैतयुक्त । भासतां भासे वस्तु अद्वैत ।**
**शुभाशुभ कैंचे तेथ । ब्रह्म सदोदित परिपूर्ण ॥ ८२ ॥**

जळ आणि वन्हि इ. चित्रें भींतीवर भासतात, तसा हा सद्वैत प्रपंच अद्वैत वस्तूवर भासतो. वस्तु सत्य, प्रपंच मिथ्या आहे. केळीचा दिंड (खुंट) उकलायला जावें तों एकेक पदर निघतो तो आंत पोकळच-सारे पदर काढून टाकले कीं आंत कांहीं नाहीं, त्याप्रमाणें देहादिकांचा विचार करितां सारे मिथ्या असून एक परमात्मा तेवढा सत्य आहे ! जळांत प्रतिबिंब पाहवें तेव्हां तेवढयापुरतें दिसतें, प्रतिबिंबाला मी म्हणणें हाच देहाभिमान ! आपल्याच शब्दांचा पडसाद निघतो, तेथें कांहीं नाहीं.

**निश्चळ दोराचें निजरूप । भ्रमें भासला प्रचंड सर्प ।**
**तो मिथ्या-परी भयकंप । महा खटाटोप उपजवी ॥ ८९ ॥**
**यापरी असंत देहादिक । देहाभिमानें जीवासी देख ।**
**जन्ममरणावर्तं अनेक । आकल्प दुःख भोगवी ॥ ९० ॥**

आत्मा देहाहून भिन्न असून मिथ्या देहाभिमान हाच प्रपंचाचें मूळ आहे. ऊसच बीजांत विरूढतो, व ऊसच कांडोकांडीं वाढतो, तसा प्रपंच वस्तुयोगानें वाढत असतो. कांडांत ऊस, लेण्यांत सोनें, तिळाच्या पुतळींत तीळ—तसा चराचर विश्व भासतें तो प्रत्यक्ष परमात्माच आहे.

**तेवीं उत्पत्ति स्थिति निदान । प्रपंचासी होता जाण ।**
**तेथ आदि मध्य अवसान । वस्तु परिपूर्ण संचली ॥ ९७ ॥**
**एवं सृज्य आणि स्रजिता । पाल्य आणि पाळिता ।**
**संहार आणि संहर्ता । मी एकात्मता भगवंत ॥ ९९ ॥**

प्रपंच ब्रह्मावर भासतो पण ब्रह्म मात्र प्रपंच नव्हे ! मृगजळांत काय सूर्य भिजतो ? आकाश सुनीळ भासतें पण तेथें काय नीळिमा आहे ? आपल्या सामर्थ्यानें तम दवडून सूर्य भूतमात्रास भेटतो, त्याप्रमाणें ज्ञाता जगाचे गुणदोषादि भेद दवडून सर्वांशीं सम वागतो ! प्रत्यक्ष, अनुमान, निगम व स्वानुभव या चारही प्रमाणांनीं प्रपंच आद्यंतवंत व मिथ्या आहे हें जाणून ज्ञाता असंगपणानें राहतो.

---

## ७ ब्रह्म सत्यं जगत् मिथ्या—याचा खरा अर्थ.

( १ ) ब्रह्म सत्य आहे व जग मिथ्या आहे या वचनाचा अर्थबोध नीट न झाल्यामुळें कांहींचा त्याविषयीं गैरसमज होतो. हा उच्च विचार कित्येकांस अज्ञानास्तव कळत नाहीं. सत्य ह्मणजे त्रिकालाबाधित. पूर्वी, आतां, व पुढें जी वस्तु टिकणारी ह्म० शाश्वत, अविनाशी आहे तिलाच सत्य म्हणतात. याच्या उलट आतां आहे—पुढें नाहीं—तिला मिथ्या ह्मणतात. मिथ्या ह्मणजे नाशवंत, सर्वकाळ न टिकणारी. जग मिथ्या आहे,

ह्म० जगाला उत्पत्ति, स्थिति, लय आहे. जगाचें किंवा प्रपंचाचें मिथ्यात्व चार प्रमाणांनीं सिद्ध होतें. ' एक अद्वैत ब्रह्म पाहीं । दुसरें आणिक कांहीं नाहीं ' अर्थात् ' एकमेवाद्वितीयं ब्रह्म ', ' नेह नानास्ति किंचन ' इ० श्रुतिवाक्यें प्रसिद्धच आहेत. तस्मात् श्रुतिवचन हें पहिलें प्रमाण. प्रत्यक्षानुभव हें दुसरें प्रमाण. देहादिकांचें नश्वरपण प्रसिद्धच आहे नामरूपें नाशवंत आहेत हें सर्वांस प्रतीत आहेच. तिसरें प्रमाण ऐतिह्य. मार्कंडेयासारख्यांनीं कल्पांतीं सृष्टिक्षय झालेला पाहिला आहे. महाजन हें सांगत आले आहेत. चौथें प्रमाण अनुमान. दोर दोरपणानें सत्य आहे पण त्यावर काष्ठाचा, सर्पाचा, मोत्याच्या हाराचा, किंवा जळधारेचा असे अनेक आरोप होऊं शकतात-' दोर दोरपणें साचार । भ्रमे भासे नानाकार । काष्ठ सर्प कीं मोत्याचा हार । ना हे जळधार जळाची ॥ ' त्याप्रमाणें चिद्घन वस्तु एक सत्य आहे, पण तिच्यावर हें शून्य आहे कीं सगुण आहे इ० नानाविध मतें उत्पन्न होतात, तें ' नाहीं ' ह्मणण्यापासून तों तें ' नानाविध ' आहे असें म्हणण्यापर्यंत अनेक मतवाद उत्पन्न होतात. हे सारे कल्पनेंतले वाद निर्विकल्प वस्तूच्या अधिष्ठानावर होतात. वस्तु सत्य आहे, साऱ्या कल्पना मिथ्या आहेत. सर्व प्रमाणांवरून श्रुतिसिद्धांतच खरा ठरतो. तंतूवेगळा पट नाहीं, ' तेवीं ब्रह्मावेगळा पाहीं । प्रपंचू नाहीं सर्वथा. ' ब्रह्म मात्र सत्य आहे. अलंकारापूर्वीं, अलंकारकालीं व अलंकारनाशीं सुवर्ण मात्र सत्य आहे. तीन्ही काळीं जें अविनाशपणें असतें तें सत्य. त्याच्या आधारें जग भासतें व तें ' जगा सबाह्य भरलें असे । जग प्रकाशे ज्याचेनि ' तात्पर्य ब्रह्म सत्य असून जग मिथ्या आहे हेंच खरें ! ( अ० १९ ओवी १९० ते २०६ ).

(२) **उत्पत्ति आदीं प्रपंच नसे । अंतीं कांहीं उरला न दिसे ।**
**मध्यें जो कांहीं आभासे । तो मायावशें मिथ्याभूत ॥ ८७ ॥**
**प्रपंचाआदीं परब्रह्म । अंतीं तेंचि उरे निरुपम ।**
**मध्यें स्थितीकाळीं तेंचि ब्रह्म । मिथ्या भवभ्रम भ्रांतासी ॥८८॥**

उत्पत्तिपूर्वी सृष्टि नव्हती, लयानंतर तिचा मागमूसही उरणार नाहीं, मध्यें जो कांहीं आभास होतो तो मायावशें मिथ्या आहे. ( येथें सृष्टि, प्रपंच, जग हे तीनही शब्द एका अर्थानेंच वापरले आहेत ). सृष्टीच्या पूर्वी परब्रह्म होतें, सृष्टिलयानंतरही तें निरुपम परब्रह्म राहणार आहे, तस्मात् मध्यें सृष्टिकालीं जें जें दिसतें तें तें परब्रह्मच होय ! भ्रांत पुरुषाला मात्र सृष्टि मिथ्या असून सत्य आहे असा भ्रम होतो ! याचा स्पष्टार्थ असा आहे कीं सृष्टीच्या पूर्वी व सृष्टिलयानंतर असणारें परब्रह्मच सृष्टिरूपानें प्रगट आहे म्हणजेच त्रिकालीं एक परब्रह्म सत्य असून सृष्टि अशी काहीं नाहींच-याचाच अर्थ सृष्टि मिथ्या आहे ! सृष्टि म्हणून जिला म्हणतात ती सृष्टि नसून तें परब्रह्म सृष्टिरूपानें व्यक्तदशेस आलें आहे ! सूर्योदयापूर्वी किंवा सूर्यास्तानंतर मृगजळ नाहीं, मध्यें जें मृगजळ म्हणून भासतें त्यांत जळाचा बिंदुही नाहीं ! आधीं दोर, अंतीं दोर, मध्यें सर्पपणानें भासणारा सर्प नसून तो दोरच आहे, अर्थात् तेथेंही दोर सत्य असून सर्प मिथ्या आहे ! 'ब्रह्म सत्य जग मिथ्या' याचा अर्थ हा आहे ! उद्धवा ! तें अविनाशी ब्रह्म तूं आहेस, अर्थात् जन्ममरण किंवा बंधमोक्ष याचा तुझ्याशीं कांहीं संबंध नाहीं. 'निर्गुण निःसंग निर्विकार । अज अव्यय अक्षर । ब्रह्म अनंत अपरंपार । तें तूं साचार उद्धवा' (अ० १९ ओवी ८७ ते ९३)

( ३ ) 'ब्रह्म पूर्वी एकाकी एक । तें केवीं जालें अनेक ?'-एकाचे अनेक कसे झाले, ब्रह्मीं माया कशी झाली, ह्याच्या स्पष्टीकरणांत 'जगदाकारें ब्रह्मच प्रगट' आहे असें नाथांनीं म्हटलें आहे. 'प्रपंचू ब्रह्मत्वेंचि उठी'-प्रपंच ब्रह्मरूपानेंच प्रकटला आहे, प्रपंच ब्रह्मस्वरूप आहे, तो ब्रह्माहून वेगळा नाहीं. आकाशावर नीलिमा भासते तशी 'ब्रह्मीं माया संपूर्ण नांदे' गोकुळाष्टमीच्या रात्रीं पूजेसाठीं आपण मृत्तिकेचीं गोकुळें करितों व त्यांना अनेक नांवें देऊन पूजितों, पण ती असते सारी मृत्तिका ! त्याप्रमाणें पृथिव्यादि पंचभूतात्मक सारें विश्व हें ब्रह्मच आहे. घृताच्या कणिका काय घृताहून वेगळ्या आहेत ? त्याप्रमाणें एकाच ब्रह्मावर जी नानानाम-

रूपांनीं भासते तिलाच माया म्हणतात. माया वेगळी अशी नाहींच. " गुण, भूतें, विषय, करणें। जीव भोक्ता सुखदुःखपणें। ज्ञानक्रिया कर्माचरणें। हें सर्वही जाणणें पूर्ण ब्रह्म ॥ साखरेचे फणस प्रबळ। तेथें कांटे त्वचा बीजगोळ। अवघी साकराचि केवळ। तेवीं ब्रह्मचि सकळ जगदाकारें॥ "– सुवर्ण आणि अलंकार किंवा तंतु आणि पट अथवा भिंत व त्यावर काढलेलें चित्र याप्रमाणें ब्रह्म आणि सृष्टि एकरूपच आहेत. ब्रह्मच क्रियाशक्तीनें महत्तत्त्व बनतें. अहंब्रह्म ही पूर्ण स्फूर्ति, तीच देहाहंबुद्धी धारण करिते तेव्हां तिलाच जीव ह्मणतात. त्रिगुण, पंचभूतें, पंचविषय, पंचेंद्रियें, सुखदुःखभोक्ता जीव, त्याची ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति आणि कर्माचरण—हें सर्व परब्रह्मच आहे. साखरेचा मोठा फणस केला तर त्यावरचे कांटे, त्वचा, बीज सारी साखरच; त्याप्रमाणें विविध नामरूपांनीं नटलेलें हें विश्व शुद्ध ब्रम्हच आहे. वस्त्र आणून त्याची बाहुली बनविली म्हणून तिचें सूत्रत्व कोठें जातें ? त्याप्रमाणें विश्वप्रपंच म्हणजे केवळ परब्रह्म. सिद्धांत हा आहे कीं ' जगदाकारें ब्रह्म निश्चित. ' ( भागवत अ० ३ ओवी ६९० ते ७०७ ).

तात्पर्य, एका परब्रह्माव्यतिरिक्त दुसरी वस्तूच नाहीं, जग म्हणून जें भासतें तें ब्रह्मरूप असल्यामुळें जग ही कल्पनाच असत्य आहे—या अर्थानें जग मिथ्या आहे !

' विश्वं विष्णुः ' म्हणजेच विष्णुमय जग. हा बोध ज्याला पूर्णपणें ठसला त्या मुक्ताचीं किंवा साधूचीं लक्षणें काय आहेत, तीं त्याच्या रहवरून कशी प्रतीत होतात हें आपण आतां पाहूं. ह्या लक्षणांत नाथांचे आत्मचरित्रच प्रतीत होतें. हें वर्णन कोणाही खऱ्या संताला लागू पडणारें आहे.

---

## ८ साधूंच्या व मुक्तांच्या लक्षणांत नाथांचें आत्मचरित्र.

( १ ) उद्धवाचा प्रश्नः ' तुला जे मानले ' म्ह० मान्य झाले किंवा

आवडले अशा साधूंचीं लक्षणें सांग म्ह० आम्हांला कोणत्या लक्षणांचा अभ्यास करायला पाहिजे हें समजेल.

भगवंतांनीं ह्या प्रश्नाचें जें उत्तर पांच श्लोकांत दिलें त्याचें निरूपण नाथांनीं ३५० ओव्यांत बहारीनें केलें आहे! नाथांनीं येथें मूळ श्लोकांतील पदांचें व्याख्यान केलें कां स्वतःचेंच चरित्र कथन केलें हें एक श्रीकृष्णनाथच जाणोत! त्या लक्षणांतील कांहीं लक्षणें आपण पाहूं.

(१) **जेणें आपणासी होय दुःख। तें परासी न करी निःशेख।**
**जेणें आपणिया होय सुख। तें करी आवश्यक प्राणिमात्रां॥८३४॥**

सर्व भूतांच्या ठायीं साधूची कृपा सारखीच असते. साधु आपला जीव इतरांच्या जीवांत घालून आपल्यासारखेंच सर्व जीवांवर प्रेम करीत असतो, आत्मवत् सर्व भूतांना पाहतो. आपल्याला ज्यापासून दुःख अगर सुख तें तें दुसऱ्याला तसेंच असतें हें जाणून तो सर्वांशीं वागतो. भारत–वनपर्वांत एके ठिकाणीं 'न तत् परस्य संदद्यात् प्रतिकूलं यदात्मनः। एष संक्षेपतो धर्मः' असें धर्मलक्षण केलें आहे. खिस्ताच्या दहा आज्ञांत Do unto others as you would be done by अशी एक आज्ञा आहे तीच वरील ओवींत नाथांनीं स्पष्टपणें सांगितली आहे.

(२) साधूचा दुसरा गुण अद्रोहता. 'भूतीं भगवंत देखतां। द्रोहाची वार्ता निमाली.' व्याघ्रसर्प अथवा छलकनिंदक, उपद्रव देऊं लागले तरी साधूच्या मनीं त्यांचा द्वेष नसतो. तो त्यांतही देवच पाहतो.

**देहास आलिया आपदा। तेणें सोपवून प्रारब्धा।**
**द्वेष येऊं नेदी कदा। नातळे क्रोधा निजबोधें॥८३९॥**

(३) **शांति सकळ वैभवेसीं। अखंड असे संतांपाशीं।**
**यालागीं सहनशीलता तयासी। अहर्निशी अनिवार॥८४३॥**
**निंदा असूयादि दोष समस्त। निजात्मबोधें प्रक्षाळित।**
**अत्यंत पवित्र केलें चित्त। अनिंदित निजबोधें॥८५५॥**
**नानाकार नानानाम। अवघें जग असें विषम।**
**साधूसी चिद्रूपें सर्व सम। न देखे विषम निजबोधें॥८६१॥**

( ४ ) साधूंना **द्वैतभाव** नाहीं अर्थात् भयही नाहीं; तो निर्भय असतातः–

**नटिया एकचि एकला । गायव्याघ्रांचें सोंग अवगला ।**
**भीतरील खेळिया जैं वोळखिला । तैं फिटला भवभ्रमू ॥ ८६६ ॥**

गाय आणि व्याघ्र यांचीं सोंगें आणणारा नट एकच आहे हें ओळखल्यावर भय कोठें राहील ? तसा अनंतरूपांत अनंतवेषांत नटलेला खेळिया एक परमात्मा आहे हें ओळखल्यावर द्वैत व भय उरत नाहीं.

( ५ ) **परोपकार** हा साधूचा सहजस्वभाव असतो. दृष्टांतः—

**पत्र पुष्प छाया फळ । त्वचा काष्ठ समूळ ।**
**वृक्ष सर्वांगें सफळ । सर्वांसी केवळ उपकारी ॥ ८६९ ॥**
**हो कां उगवोनि अंबरीं । जेवीं जगाचें आंधारें निवारी ।**
**विश्वाचा ताप दूर करी । नि निजकरीं सर्वांतें ॥ ८७३ ॥**

**( ६ ) काउळें चंद्रासी हेळसिती । चकोर चंद्रामृत सेविती ।**
**तेवीं दुष्ट साधूतें धिक्कारिती । भावार्थी पावती निजलाभू॥८७६॥**

( ७ ) साधु स्वानंदभोगांत नित्य मग्न असल्यामुळें विषयकाम पार विसरतो. कसा ? ‘ रंकू पालखिये बैसला । तो पूर्वील वाहना विसरला ’–पालखी मिळाल्यावर बैलगाडीची आठवण कोण करील ? त्याची अंतरवृत्ति ( मन ) उपशम पावली तेव्हां बाह्येंद्रियें सहजच स्ववश झालीं-उदाहरण–‘ जेवीं लेंकी शिकवण देतां । सून सर्वथा चळीं कांपे ! ’ त्याचें ‘अंतर जडलें आत्मस्थिती’ । तेव्हां ‘ बाह्य रंगलें मद्भक्तीं ’–अंतरीं आत्मबोधाचें सुख, बाहेर उपासनेचा रंग. अंतर्बाह्य रंगलेला !

( ८ ) साधु अंतरीचा फार कोवळा व बाहेरही मृदु असतोः–‘ पिंजल्या कापसाचा गोळा ’ जसें कोणाचें कपाळ फोडीत नाहीं किंवा ‘ जैसें गंगाजळ । गाईव्याघ्रांसीं करी शीतळ ’ तसा साधु सर्वांशी मृदुमंजुळ असतो. संत व असंत, पापी व पुण्यवंत–सर्वांस साधु सम ब्रह्मभावानें पाहतो.

**( ९ ) परदारा आणि परधन । सर्वथा नातळे जयाचें मन ।**
**गंगादि तीर्थें त्याचें जाण । चरणस्पर्शन वांछिती ॥ ८९४ ॥**

( १० ) नागवल्लीची वेल जशी आधार पाहते तशी ‘ शांति ’ संत-बळावरच वाढते व चिन्मात्रमंडपावर वेंघते ! ‘ आलिया नाना उर्मी । गजबज नाहीं मनोधर्मी–’ असे संतच !

**( ११ ) चहूं आश्रमाहूनि उत्तम । आपुला जो निजाश्रम ।**
**तेथें स्थिरावोनि मनोधर्म । वर्णाश्रम चालवी ॥९५३ ॥**

साधु निःसीम भक्त असतो. सरिता सागराला तसा तो हरीला अनन्य शरण असतो, हरीचें वैभव वाढवितो. स्वतः मान इच्छीत नाहीं, मान्यांचा मान ठेवतो. ‘ मज रिघोनियां शरण । जो वांछी महिमा सन्मान । तो गुळांतील पाषाण । केवळ जाण गुळद्गड्डू ! ’ तो वरपंग, खरा भक्त नव्हे. ‘ वरिवरी दावी माझें भजन । हृदयीं विषयअभिलाषण ’—पण जाऊं दे त्या अभक्तांच्या कथा ! वर्णाश्रमधर्माप्रमाणें चालून साधु माझें निष्काम भजन जगाला शिकवीत असतात. त्रैलोक्यसाम्राज्यवैभवावर थुंकून जो देवाला अनन्य शरण रिघाला तो मानापमानाच्या क्षुद्र कल्पनांत कशाला सांपडेल ?

( १२ ) अद्वैत श्रवणमननानें भगवद्रूपता पावलेला साधु सर्वप्रिय होतो.

**श्रुति–गुरुवाक्यनिरूपण । ऐकतां अद्वैतश्रवण ।**
**युक्तिप्रयुक्ति पर्यालोचन । मनन गुण या नांव ॥ ९७० ॥**
**अग्निकापुरां भेटी होतां । तो अग्नीचि होय वस्तुता ।**
**माझें स्वरूपीं मन ठेवितां । मन चित्स्वरूपता पावलें ॥ ९७१ ॥**

मन चिदंशाचें मनन करितां करितां चिन्मय झालें. मन स्वरूपाकार झालें नाहीं तोंवर तें मोठमोठयांना टकवितें, म्हणून साधु सावधान असतात.

( १३ ) साधूची गंभीरता व समता ढळत नाहीं. वर्षाकाळीं सरितांचे लोट मिळाले तरी समुद्र उचंबळत नाहीं किंवा उष्णकाळीं ते आले नाहींत म्हणून आटत नाहीं अथवा दिवसारात्रीं सूर्याला प्रकाशांत चढउतार ठाऊक नसतो किंवा विजेच्या कल्लोळांनीं गगनांत खळबळ उडत नाहीं, त्याप्रमाणें ‘ जाहलियां समृद्धिधन । साधूचें उल्हासेना मन ।

सकळ जाऊनि जाल्या निर्धन । दीनवदन हो नेणे. ' आल्या गेल्या उर्मींत साधु निश्चळ असतो.

( १४ ) साधूचें सात्त्विक धैर्य अचाट असतें. स्वयंवरांत शत्रूंना पराभवून वीरपुरुष नोवरीला घेऊन जातो व तिला जन्मांत दुसऱ्यांकडे जाऊं देत नाहीं, किंवा पारधी जाळ्यांत मृगाला पकडून ठेवतो व त्याला पुन्हा परत वनांत जाऊं देत नाहीं, त्याप्रमाणें विषयांपासून साधु मनबुद्धयादिकांना आवरून आत्मप्रवण करितो पण त्यांना विषयांकडे परत फिरकूं देत नाहीं ! गजांतलक्ष्मी प्राप्त झाली किंवा प्रळयकाळाच्या कडकडाटांत महाभूतांची आटाटी झाली तरी एकवार आत्मप्रवण केलेलीं देहेंद्रियें पुन्हां विषयांच्या वाऱ्यालाही टेकूं देत नाहीं हें साधूचें प्रचंड धैर्य होय !

( १५ ) साधू स्वानंदामृत अखंड सेवन करीत असल्यामुळें षड्विकारांची त्याला बाधा होत नाहीं. ' स्वानंदें तृप्त झाला । यालागीं क्षुधेसी मुकला । जगाचें जीवनीं निवाला । तृषा विसरला निःशेष ' याप्रमाणें क्षुधा व तृष्णा हे प्राणधर्म त्याच्या आधीन असतात. निजात्मसुख नित्य भोगीत असल्यामुळें तो दुःखशोकमोहांच्या पार गेलेला असतो. देहाचें भान नसल्यामुळें तो काळाचें प्राशन करून व ' मरणाला मरण आणून ' मुक्तावस्था भोगतो. ह्याप्रमाणें क्षुधा, तृषा, दुःखशोक, जन्ममरण ह्या षड्विकारांपासून साधु देहांत असतांनाच मुक्त होतो.

( १६ ) ' ब्रह्मादि मशकवेरी । सर्वांतें वंदी शिरीं ! ' देहात्मबुद्धि त्याचे ठायीं नसल्यामुळें तो चिन्मय असतो व म्हणून कोणत्याही योनीचा किंवा जातीचा त्याला हर्षविषाद वाटत नाहीं. साखरेचीं निंबोळीं केलीं तर तीं कडू थोडींच होतात ? त्याचप्रमाणें चिन्मयत्वामुळें अत्यंजादि योनी प्राप्त झाल्या तरी तो समाधानी असतो व वर्तनानें व उपदेशानें तो जगास स्वात्मसुखच देतो.

**( १७ ) दयार्णवें द्रवली दृष्टी । तनुमनधन वेंचूनि गांठी ।**
**अनाथांवरी करुणा मोठी । उद्धरी संकटीं दीनातें ॥१०४७॥**

( १८ ) 'जीवें प्राणें भक्तीसी विकिला' असल्यामुळें साधु हा स्वधर्मकर्माचार सोडीत नाहीं तरी तो कर्माचा गुलाम नसतो. जो 'माझेनि भजनप्रेमें जाण। विसरला कर्माची आठवण' तो कर्मकचाटांत कसा सांपडणार? रात्र संपल्यावर ग्रहनक्षत्रें अपाप मावळतात त्याप्रमाणें प्रेमभक्तीचा सूर्योदय झाला कीं अविद्येची रात्र संपते व तीबरोबरच कर्माकर्म व धर्माधर्म याविषयींच्या त्याच्या साऱ्या कल्पना अस्तंगत होतात.

साधूचीं लक्षणें अनंत आहेत. तीं सर्व कोण वर्णू शकेल?

बहुतेक जीव बद्ध, थोडे मुमुक्षु, मुक्त तर सुतरां विरळ! मुक्ताचीं लक्षणें एवढयासाठीं सांगायचीं कीं तीं पाहून साधकांनीं सावध व्हावें. 'मुक्ताचीं लक्षणें निर्धारितां। लाभे आपली निजमुक्तता.' आसन, शयन, भोजन, दर्शन, स्पर्शन, अटण, मज्जन इ० ज्या क्रिया स्थूल देहाकडून घडत असतात त्या क्रियांतही मुक्त ओळखतां येतो. सामान्य जीवाच्या सर्व क्रिया देहाभिमानानें होतात व म्हणून त्यांत कर्तेपणाचा फुंज असतो. मुक्ताच्या सर्वक्रियांत ( वैदिक, लौकिक व दैहिक क्रियांत ) कर्तेपणाचा अभिमान नसतो व त्याकरितां त्याच्या आत्मस्वरूपाची बैठक लवही ढळत नाहीं.' तो जरी त्रैलोक्य हिंडिनला। तरी ठायीहूनि नाहीं चळला.' तो चित्स्वरूपीं नित्य सोवळा असल्यामुळें वोवळा कधींच होत नाहीं. स्वरूपनिमग्नतेमुळें तो इतका शुद्ध असतो कीं त्याच्या चरणस्पर्शानें तीर्थांना पावनता येते. 'डोळेनि दर्पणु प्रकाशे। त्यामाजि डोळेनि डोळा दिसे' आरशांत प्रतिबिंबित झालेला डोळा आपल्या डोळ्यांनींच आपण पाहतो, त्याचप्रमाणें मुक्तपुरुष हें दृश्य जग स्वरूपाकारच पाहतो! दृश्य, द्रष्टा व दर्शन ही त्रिपुटी हारपते व तो सर्वांगांनीं द्रष्टा होतो. त्याचें देखणें असें असतें. आतां त्याचें पाहणें पहा. 'बोलांतें जो बोलविता। तोचि श्रवणामाजीं श्रोता' याप्रमाणें श्रोता वक्ता आपण होऊन तो शब्दांत निःशब्दता अनुभवितो. पाहतेपण व पाहणें सोडून तो पाहणारा असतो,

**जो जो श्रवणीं पडे शब्दू। तो तो होत जाय निःशब्दू।**

**यापरी श्रवणीं परमानंदू । स्वानंदबोधू मुक्ताचा ॥ २९६ ॥**
**परिसतां उपनिषद । का लौकिकादि नाना शब्द ।**
**मुक्ताचा पालटेना बोध । श्रवणीं स्वानंद कोंदला ॥ २९९ ॥**

याप्रमाणें मुक्ताच्या शब्दांत निःशब्द परब्रह्म कोंदलेलें असते, त्याचें दृश्य व दर्शन द्रष्टेपणानें त्याला प्रतीत होतें. 'घ्राणां येतांचि सुगंधु । मुक्तासी नोहे विषयबोधू । गंधमिसें स्वानंदकंद । परमानंदू उल्लासे '–घ्राणांत सुवास शिरतांना सुवासांत परेश प्रगटतो. आपल्या नित्यतृप्ततेमुळें भोजनांतही ' ताट अन्न आणि आपण । हें न देखे तो भिन्नपण '–विविध रसमिषानें तो स्वानंदच सेवीत असतो. तात्पर्य, सकळ गोडींची मूळ गोडी जी परमात्मवस्तु तेथें त्याची आवडी बसल्यामुळें सर्वपदार्थांच्या व विषयांच्या सेवनांत तो आत्मगोडीच घेत असतो. सोन्याचे अलंकार सोन्याच्या पेटींत ठेवले, मग ते झांकिले असें म्हटलें तरी उघडेच असतात, तसा तो सर्व द्वंद्वांत परब्रह्मता भोगतो.

**सुरसकथा सांगे वाडेकोडें । अथवा लौकिक बोलणें घडे ।**
**परी त्याची समाधिमुद्रा न खंडे । मौन न मोडे बोलतां ॥३३०॥**
**स्त्रीपुरुषें अबोला चालती । तो अबोला कीं अतिप्रीति ?**

तसें बोलण्यानें त्याचें मन भंगत नाहीं व मौनानें तो बोलत असतो ! मी चतुर बोलका आहे किंवा लोकांना कांहीं सांगत रंजवीत आहे याचें त्याला भानच नसतें.

**एवं तो सगळा मजभीतरीं । मी तया आंतबाहेरी ।**
**ऐसेनि अभिन्नपणें करी । सुखें संसारीं नांदतू ॥ ३४८ ॥**

' करीं पडलिया शस्त्र ' तो युद्धही करितो पण तेथें ' मी कर्ता हा अहंकार ' नसतो, स्तुतीची अपेक्षा नसते, फळांची वांछा नसते.

**पुढें वोढवलें अवचितें । तरी खेळों जाणे द्यूतकर्मातें ।**
**परी हारी जैत नाठवे चित्तें । निजस्वभावें खेळतु ॥ ३५४ ॥**

खेळांत आपण हरलों कां जिंकलों हेंही त्याला कळत नाहीं. तो

प्रारब्धवशानें संसारांत पडलेला असलेला तरी ‘ मूळीं आत्मा आत्मीं ’ असा स्त्रीपुरुषभाव नाहीं अशी त्याची बैठक असतेः—

**नट नाटकु अवगला । पुरुष स्त्रीवेषें दिसों आला ।**
**स्त्रीपुरुषभावो संपादिला । तेवीं हा जाहला गृहस्थ ॥ ३६८ ॥**

‘ अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी ’ तसा मुक्ताचा संसार असतो, दैवें अंगना भोगनही त्याचा अकर्तात्मभाव चळत नाहीं. ‘लोलुप्य’ ह्म० आसक्ति नाहीं. संतती झाली तरी आत्मस्थिति मोडत नाहीं.

**स्वयें जनकु स्वयें जननी । स्वयें क्रीडे पुत्रपणीं ।**
**आपणावांचूनि जनीं वनीं । आणिक कोणी देखेना ॥ ३७४ ॥**
**एवं स्त्रीपुत्रसंतती । जेवीं आकाशीं मेघपक्ती ।**
**काळें येती काळें जाती । तैशी स्थिति मुक्ताची ॥ ३७५ ॥**

मुक्ताच्याजवळ धन असलें किंवा आलें तरी त्याला धनलोभ नसतो. राजहंसापाशी शेण किंवा व्याघ्राशीं मिष्टान्न तसा तो धनाविषयीं निष्काम असतो.

**ज्यासी धनलोभाची आस्था । त्यासी कल्पांतीं न घडे मुक्तता ।**
**तैसी स्त्रीकामियां सर्वथा । नव्हे परमार्थता निजबोधू ॥ ३८० ॥**

**मुक्तासी तेथ आसक्ती । सर्वदा नाहीं सर्वार्थीं ।**
**शेष प्रारब्धाचे स्थिती । कर्में निफजती निरपेक्षें ॥ ३९० ॥**
**आपुली छाया विष्टेवरी पडे । अथवा पालखीमाजीं चढे ।**
**तो भोगू आपणियां न घडे । तैसेंचि देह कोरडें मुक्तासी ॥३९८**

चित्रीची संपत्ति तसे ज्ञाते पुरुष विषय मिथ्यात्वें देखतात व त्यांची वांछा ठेवीत नाहींत. ते देहकर्मांच्या ठायीं गगनासारखे अलिप्त व असंग असतात. आकाश जळांत बुडालेलें दिसलें तरी तें कोरडें असतें तसा मुक्त संसर्गांत असला तरी असंग असतो.

तो संसारकर्म करीत असला तरी अनासक्तियोगामुळें संसारदोषानें लिंपत नाहीं. घृत, मद्य व जळ यांत बिंबला तरी सूर्य अलिप्त असतो, त्याप्रमाणें मुक्त हा त्रिगुणसंगें वर्तला तरी त्रिगुणानीं, बाल्यतारुण्यादि दशांनीं किंवा शुभाशुभकर्मांनीं बांधला जात नाहीं.

**आश्रमधर्मीं असतां । नित्यादि कर्में आचरितां ।**

**मुक्तासी नाहीं कर्मबद्धता । अकर्तात्मता निजबोधें ॥ ४१८ ॥**

जळांत प्रतिबिंबला तरी सूर्य ओला होत नाहीं ' तैसा स्त्रीसंगें प्रजा व्याला । नाहीं मुकला ब्रह्मचर्या ! ' त्याला देहींगेहीं आसक्ति नसते. मुक्त हा विवेकवैराग्यसंपन्न असतो. विवेकावांचून वैराग्य आंधळें आहे व वैराग्यावांचून विवेक पांगळा आहे, म्हणून मुक्ताच्या ठिकाणीं विवेक आणि वैराग्य दोन्ही परिपूर्ण असतात. मुक्ताला अविद्याजन्य गुणसंग नसल्यामुळें सुखदुःख, पापपुण्य, स्तुतिनिंदा इत्यादि त्याला स्पर्शत नाहींत. ' पूजितां कां गांजितां । त्याची डंडळेना समता ' उंच नीच, साधु असाधु दोन्ही तो निजबोधानें ब्रह्मरूप पाहतो. ' कोणाची करावी निंदा । कोणाच्या करावे गुणानुवादा । मीचि विश्व हें आलें बोधा । स्तुतिनिंदा निमाली '. तो कोणाची स्तुतिनिंदा करीत नाहीं व कोणी केली असतां त्याचें चित्त विकार पावत नाहीं.

**हेतु ठेवूनि गुणागुणीं । स्तुतिनिंदेचीं बोलणीं ।**
**सांडोनियां जाला मौनी । परी मौनाभिमानीं हेतु नाहीं ॥४८८॥**
**मनें ध्यावें चैतन्यघन । तंव चैतन्यचि जालें मन ।**
**सहजेंचि खुंटलें ध्यान । हें मुख्य लक्षण मुक्ताचें ॥ ४९४ ॥**

चित्त चैतन्यीं हारपल्यामुळें मुक्त जडमूढपिशाचवत् वागतांना कधीं कधीं आढळतात. ' मुक्त मुक्तपणाची पदवी । सर्वथा जगामाजी लपवी ' म्हणून मुक्त ओळखतां येणें कठिण आहे. आपली मुक्तता कोणी मिरवायला पाहील तर तो लोभी व दांभिक आहे म्हणून समजावें. मुक्तावांचून मुक्ताला कोणी ओळखावे ? वेदशास्त्राध्ययनानें, व्युत्पत्तिबळानें किंवा मुक्तलक्षणांची एकादी पोथी घेऊन कोणी मुक्त हुडकायला जाईल तर त्याला मुक्तपुरुष आढळणार नाहीं. ' मुक्ताचीं लक्षणें मुक्तचि जाणे ! ' एवढें खरें कीं जो मुक्ताला यथार्थ जाणेल तो मुक्तच होईल ! मुक्ताचीं लक्षणें हीं साधकाचीं साधनें होत. ( अ० ११ ओवी २६० ते ५१० )

---

# ९ अध्यात्मप्रकरणें, आख्यानें व संतचरित्रें

## १ नाथांची ग्रंथसंपत्ति.

नाथांच्या बुद्धीची व्यापकता व हृदयाची विशालता जशी त्यांच्या लहानमोठया अध्यात्मपर ग्रंथांत प्रगट झाली आहे तशीच ती त्यांच्या कथापर व चरित्रपर ग्रंथांतही प्रगट झाली आहे. चतुःश्लोकी भागवत ( ओवी १०३६ ) हा त्याचा पहिला ग्रंथ आहे. यानंतर वेळोवेळीं त्यांनीं हस्तामलक ( ओवी ६७४ ), शुकाष्टक ( ओवी ४४७ ), स्वात्मसुख ( ओवी ५१० ), आनंदलहरी ( ओवी १५४ ), गीतासार, आनंदानुभव इत्यादि ८।१० ग्रंथ अध्यात्मावर लिहिले असून त्यांची एकंदर ओवीसंख्या चार हजारांपर्यंत भरेल. त्यांच्या अध्यात्माचा किंवा भक्तिज्ञानाचा मुख्य ग्रंथ त्यांची एकादशीवरील टीका उर्फ नाथभागवत हाच आहे. याची संख्या २० हजार आहे. हा ग्रंथ त्यांच्या कीर्तिमंदिराचा मुख्य स्तंभ आहे. ह्या ग्रंथाच्या साम्यतेस येईल असा एकच ग्रंथ मराठीत आहे आणि तो म्हणजे ज्ञानेश्वरी हा होय आहे. भागवतधर्माचे मुख्य ग्रंथ दोन. गीता आणि भागवत; पण गीता ह्म० ज्ञानेश्वरी व भागवत ह्म० नाथभागवत असा वारकरीमंडळांत विश्वास आहे. वरील अध्यात्मग्रंथाशिवाय नाथांनीं कथापरांनाही संतोषविलें आहे. त्यांचा भावार्थरामायण हा ४० हजार ओव्यांचा प्रचंड ग्रंथ आहे, पण त्यांपैकीं सुमारें २५ हजार ओव्या खुद्द नाथांच्या आहेत. मराठी भाषेंत विस्तृत रामचरित्र असें हें नाथांचेंच आहे. त्यांचा रुक्मिणीस्वयंवर हा १६०० ओव्यांचा ग्रंथ अत्युत्कृट आहे व अत्यंत लोकप्रियही आहे. रामायणांत त्यांनीं प्रसंगानें आख्यानें गायिलीं आहेतच, पण भागवतांतही कथारचनाचातुरी त्यांनीं अनेक ठिकाणीं व्यक्त केली आहे. दत्ताच्या २४

गुरूंच्या कथांपैकीं कपोतकपोर्तीचें आख्यान, पिंगलेचें आख्यान, कुमारीचें आख्यान हीं फार सरस आहेत. २३ व्या अध्यायांतील कदर्यूचें ह्म० कृपणाचें आख्यान तर त्यांनीं फारच मनोहररीतीनें वर्णिलें आहे. त्यांच्या कवितेंत दहावीस छोटीं पौराणिक आख्यानेंही आहेत, त्यांत हळदुली, कृष्णदान व दत्तजन्म ह्या कथा विशेष ध्यानांत घेण्यासारख्या आहेत. ह्या कथांत हास्यविनोद भरपूर आहे, स्वभावचित्रें मनोरम आहेत. ही नाथांची लीलाविनोदपर काव्यें सर्वांसच प्रिय होणारीं आहेत. ह्याशिवाय प्राचीन व अर्वाचीन भक्तांचीं चरित्रें नाथांनीं सुबोध प्रेमळ वाणीनें गायिलीं आहेत तींही पाहिलीं पाहिजेत. ध्रुव, प्रल्हाद, उपमन्यु व सुदाम यांचीं नाथरचित काव्यें इतकीं साधीं, सुंदर व बोधप्रद आहेत कीं- हीं चारच चरित्रें स्वतंत्र पुस्तकरूपानें कोणी प्रसिद्ध केलीं तर मुलांमुलींच्या शिक्षणास त्यांचा फार उपयोग होईल. ज्ञानेश्वर, नामदेव, चोखामेळा इ० संतांचीं चरित्रें नाथांनींच प्रथम गायिलेलीं दिसतात. नाथांचा ' जिवाजीपंत व आत्मारामपंत ' यांच्यांतील पत्रव्यवहार हा गद्यांत असून मोठा बोधप्रद आहे. याशिवाय नाथांचीं बहारीचीं पदें व प्रेमळ अभंग वारकऱ्यांच्या व सर्व पारमार्थिकांच्या परिचयाचीं आहे. त्यांच्या अभंगाचा गाथा तुकोबांच्या गाथ्याएवढाच असून त्यांचीं भारुडें तर अलौकिक आहेत. ही नाथांची काव्यसंपत्ति महाराष्ट्राच्या वारसाची असून त्यांतील बहुतेक कविता महाराष्ट्रांत अत्यंत लोकप्रिय आहे. जनता भक्तिज्ञानप्रवीण व्हावी, तिला आत्मकल्याणाचा मार्ग- ' सर्वांभूतीं भगवद्भाव '-हा सांपडावा व संसार करीत असतांना जीवानें परमात्मसुख भोगावें या मोहरेवर नाथांनीं हें सारें वाङ्मय निर्माण केलें आहे. नाथांच्या बुद्धीचें सर्वगामित्व अनन्यसाधारण आहे. मराठी वाङ्मयांत त्यांच्या तोडीला बसवायला दुसरा ग्रंथकार नाहीं. आपण प्रथम नाथांच्या अध्यात्मप्रकरणांची ओळख करून घेऊन मग क्रमानें पुढें जाऊं.

---

## २ चतुःश्लोकी भागवत.

हें मूळभागवताच्या दुसऱ्या स्कंधाच्या नवव्या अध्यायांत आहे. मूळांत ४५ श्लोक आहेत व नाथांनीं त्यांच्या स्पष्टीकरणार्थ हजारावर ओव्या लिहिल्या आहेत. हें प्रकरण नाथांनीं 'गोदावरीच्या उत्तरतीरीं। चौ योजनीं चंद्रगिरी। तळीं चंद्रावती नगरी' तेथें चंद्रनामक ब्राह्मणाच्या घरीं वस्तीस असतांना लिहिलें. श्रीगुरुजनार्दनांच्या समागमांत त्यांचेबरोबर नाथ सहज फिरत फिरत तेथें आले. चंद्रब्राह्मणाच्या घरीं त्याच्या तोंडून चतुःश्लोकी भागवताची वाखाणणी ऐकून जनार्दनस्वामींनीं नाथांस आज्ञा केली कीं हें गुह्यज्ञान देशभाषेंत सांग. 'तै माझी मध्यम अवस्था। नेणे संस्कृत पदपदार्था' पण गुर्वाज्ञेचें सामर्थ्य एवढें मोठें आहे कीं मला ग्रंथरचना म्हणजे काय हें अगदीं माहीत नसतांना ग्रंथाचा निदिध्यास इतर कर्मे करितांनाही लागला व स्नानसंध्यादि नित्यकर्म करीत असतांना ग्रंथाचें गुह्य ज्ञान प्रत्यक्ष झालें. 'गुरु-आज्ञा अत्यंत लाठी। ग्रंथार्थ खेळे माझे दृष्टीं.' जागृति, स्वप्न, सुषुप्ति साऱ्या अवस्था ग्रंथार्थमय झाल्या. श्रीगुरु व इतर संत यांच्यासमोर ह्या ग्रंथाचा भावार्थ सांगण्यासाठीं मी बसलों तों काय चमत्कार सांगावा? 'शब्दापुढें ज्ञान धांवे। ओवीपुढें अर्थ पावे। जें जें जीवीं विवंचावें। तें तें आधवें ग्रंथार्थ होय!'

**माझे वांकुडेतिकुडे आर्ष बोल। त्यामाजी ब्रह्मज्ञान सखोल।**
**नित्य नवी प्रेमाची वोल। हे कृपा केवळ संतांची॥**

नाहीं तर 'श्रीभागवत आणि भाषा मऱ्हाटे। हें बोलणें नवल वाटे। पूर्वीं नाहीं ऐकिलें कोठें' म्हणून मी हें सांगण्यांत मोठा धिटावाच केला आहे. पण श्रीगुरु व संत यांनीं कोडकौतुक करून हा माझा 'प्राकृतही गोड मानिला ग्रंथ!' मी आधीं संस्कृत नीट जाणत नाहीं, कळाकुसरी मला माहीत नाहींत, पण येथें 'वाच्यवाचक जनार्दन' आहे. कायावाचामन, प्राण, बुद्धि, प्रतिभा सर्व माझा जनार्दन आहे. ह्या

ग्रंथांत जे ‘ प्रेमरहस्य ज्ञानगोडी ’ आहे ती माझे गुरूची आहे, मजकडे त्याचें कांहीं नाहीं. श्रीगुरूंनीं माझें मीपण नेलें, आपण मला बोलविलें, मला निमित्तमात्र केलें,व ग्रंथावर माझें नांव घातलें—‘प्रेम आथिलें ज्ञानार्थ-रसें ! ’ वस्त्र आणि घडीपदर एकच, पण घडीपदरानें वस्त्राला शोभा येते, त्याप्रमाणें ‘ गुरु ब्रह्म एकचि घडे । परी गुरुदास्यें ब्रह्म आतुडे । गुरुवाक्यें निजनिवाडें । ब्रह्मासी जोडे प्रतिष्ठा पै ! पदोपदीं माझी गुरु-माय मला सांभाळीत आहे, कडिये घेऊन चोज पुरवीत आहे. मी तिच्या बळावर निर्भय आहे. तिनें चित्प्रकाश माझ्यापुढें दिवटा उभा केला आहे ! निजानुभवाच्या ताटांत ती स्वानंदाचे घांस माझ्या तोंडांत घालीत आहे. माझ्या गुरूला अनेक पुत्र आहेत, पण त्यांची कृपा माझ्यावर अधिक आहे—त्यांनीं ‘ पुत्रापरिस विशेष देख । शिष्यासी निजसुख स्वानंद’ दिला आहे ! ह्या संतांचीही मजवर मोठी कृपा आहे— ‘ मी संतांचे लडिवाळ बोबड । माझे मराठीचें कोड ’ चौगुण करिती ! श्रीसंतांलागीं मी ही ‘ मराठी घोंगडी ’ केली आहे. मूळ संस्कृत ग्रंथ ही शालजोडी खरी पण गोदातीरीं थंडी फार व महाराष्ट्रीयांना घोंगडीची आवड म्हणून नाथांनीं आपल्या ग्रंथाला घोंगडीची उपमा दिली असावी ! असो. नाथांनीं ह्या सर्व गोष्टी ग्रंथाच्या उपसंहारांत सांगितल्या आहेत. त्यावरून जनार्दनस्वामींच्या आज्ञेनें त्यांच्या सन्मुख गोदातीरीं चंद्रावती नगरींत नाथांनीं हा आपला पहिला ग्रंथ रचिला हें स्पष्ट आहे.

ब्रह्मदेवाला आदिनारायणानें सृष्टि निर्माण करण्याची आज्ञा केली. हें कार्य आपल्या हातून कसें पार पडतें याची त्यास चिंता पडली तेव्हां उद-कांतून ‘ तप तप ’ म्ह० तप कर असा ध्वनि निघाला. त्यानें दशेंद्रियें व मन आवरून कठोर तपश्चर्या केली. भगवान् प्रसन्न झाले, त्यांनीं त्याला आपलें दर्शन दिलें व चार श्लोकांत आपलें गुह्यज्ञान सांगितलें. त्यावर नाथांनीं हें अत्यंत रमणीय भाष्य केलें आहे. हें चतुःश्लोकी भागवत ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ‘ पावोनि चतुःश्लोकींचें ज्ञान । ब्रह्मा झाला

ज्ञानसंपन्न । करितां सृष्टीचें सर्जन । तिळभरी अभिमान बाधीना ॥ त्या ज्ञानाची रसाळ कथा । मऱ्हाठिया सांगेन आतां । '

' भगवद्देह चैतन्यघन । तेथें वसेना देहाभिमान ' म्हणून सामान्य जीवापासून ब्रह्मदेवापर्यंत जो ' निःशेष निरभिमान ' आहे तो भगवद्रूपच समजावा. देवाची कृपा पाहिजे तर चित्तीं अनुताप हवा, अनुतापानें विवेकवैराग्य येतें व वैराग्यानें ज्ञानाची प्राप्ति होतें. ' विवेकावीण वैराग्य आंधळें । वैराग्यावीण विवेक पांगुळें ' म्हणून दोन्ही पाहिजेत. ह्या सर्वांस तप पाहिजे. ' तप हें परमनिधान । साधकाचें निजसाधन । ब्रह्मप्राप्तीचें दिव्यांजन '—पण तप म्हणजे तरी काय ? स्नान, दान, शास्त्राध्ययन, योग, याग या सर्वांपेक्षां तप श्रेष्ठ आहे. ' हृदयीं हरी चिंतणें चिद्रूप ' हें खरें तप होय. अखंड चिंतन, स्वरूपाचें अनुसंधान, हें तप होय. ' कीटकी भयें ध्याता भृंगीसी । तद्रूपता बाणली तिसी । मा जे जीवेंभावें भजती हरीसी ' ते हरिरूप कसे होणार नाहींत ? तप म्हणजे आत्मचिंतन म्हणजेच हरिभजन. ' सर्वांभूतीं वासुदेव ' हें नित्य अनुभविलें पाहिजे. ' हरिचरणसेवेपरता । ठाव नाहीं परमार्था. ' असो. ब्रह्मदेवानें असें निग्रहाचें तप केलें. भगवान् प्रसन्न झाले त्यांनीं त्याला दर्शन दिलें. भगवान् सिंहासनावर आरूढ झाले आहेत, त्यांच्या सभोवार चार, सोळा, पांच अशा शक्ति उभ्या आहेत ( चार म्ह० प्रकृति, पुरुष, महत्तत्व व अहंकार; सोळा म्ह० पंचभूतें व अकरा इंद्रियें; पांच म्ह० पांच सूक्ष्म भूतें ), सकल ऐश्वर्यांनीं ते परिवेष्टित आहेत. ' चतुर्भुज घनसांवळा । मकरकुंडलें कौस्तुभ गळां । वैजयन्ती वक्षःस्थळा । आपाद वनमाळा रुळत '. भगवन्मूर्ति चतुर्भुज दिसत होती, भक्तावर प्रसाद करण्यास समुत्सुक होती, दृष्टि अत्यंत मोहक होती, मुखावर मृदुहास्य विराजत होतें, नेत्र आरक्त होते, मस्तकावर किरीट व कानांत कुंडलें चमकत होतीं, पीतांवर परिधान केला होता, वक्षःस्थलावर लक्ष्मीचें चिन्ह होतें—ब्रह्मदेवानें प्रभूला प्रेमाश्रुप्लुत लोचनांनीं पाहिलें व वंदन केलें. भगवान् म्हणालेः

" मी तुझ्या तपानें प्रसन्न झालों आहे. ' तपो मे हृदयं साक्षात् आत्माऽहं तपसो ऽनघ ' तप ही साक्षात् माझी अंतरंगशक्ति आहे. ' वीर्यं मे दुश्चरं तपः '—तप ही माझी अमोघशक्ति आहे. आतां मी तुला माझें परम गुह्यज्ञान सांगतों. हें चित्तात मुरलें असतांना सृष्टिरचनेसारखें प्रचंड कार्य करीत असतांनाही तुला कर्मबंध लागणार नाहीं. मुक्तावस्थेचें हें सुख भोगीत असतांनाही सृष्टिव्यापार तुला करितां येतील.

आतां ह्या चतुःश्लोकीच्या पहिल्या मुख्य श्लोकाचें नाथ विवरण कसें करितात तेवढेंच पाहूं.

**मीच एक असूळविसूळ । मीच एक सकळासकळ ।**
**मीच एक सूक्ष्म स्थूळ । तें स्वरूप प्रांजळ परमेष्ठी ॥ ४४१ ॥**
**सृष्टिपूर्वीं मी निजस्वरूप । शुद्ध ब्रह्म निर्विकल्प ।**
**स्वानंदकंदस्वरूप । पूर्णत्वें अमूप मीचि स्वयें ॥ ४४२ ॥**

उंसाचीं कांडीं पेरण्यापूर्वीं, तोंडानें रस चाखण्यापूर्वीं, जशी उंसाची गोडी स्वयंभू आहे; बोल वाचेंत येण्यापूर्वीं, शब्दांनीं बोलण्यापूर्वीं, जसा शब्दार्थ आहे; दृश्याची दृष्टीशीं गांठ पडण्यापूर्वीं जसा देखणेपणा आहे; निशाण उपजण्यापूर्वीं किंवा घाव घालण्यापूर्वीं जसा नाद आहे; रतिरमणसंबंधापूर्वीं जसा आनंद आहे; किंवा घटमठादि आकार होण्यापूर्वीं जसें गगन आहे ( नाथराय म्हणतात ) ' तेविं मी चिदंबर सृष्टिपूर्वीं ' आहे.

**पूर्वीं म्हणावयाचें लक्षण । नव्हता सदसत्कारण ।**
**मी परमानंदें परिपूर्ण । या नांव जाण सृष्टिपूर्वीं ॥ ४५० ॥**
**सत् म्हणजे सूक्ष्म मूळ । असत् म्हणजे नश्वर स्थूळ ।**
**या अतीत मी निर्मळ । आहे प्रांजळ सृष्टिपूर्वीं ॥ ४५१ ॥**

आतां ही सृष्टिही मीच कसा आहें हें सांगतातः—

**गोडी तेचि साखर देख । तेविं चिदात्मा तेचि हे लोक ।**
**जगासी मज वेगळिक । अणुमात्र देख असेना ॥ ४५७ ॥**

सोनेंच अलंकारपणाला येतें, ततूवेगळा पट नसतो, मृत्तिकेहून घट भिन्न नाहीं, त्याप्रमाणें स्थूलसूक्ष्मसंसार प्रगट झाला असतांही माझ्या

चिद्रूपसत्तेला खंड पडत नाहीं. वट आणि वटाच्या पारंब्या, तसा जग व मी परमात्मा; आणि संसारप्रळयानंतरही मीच कसा आहे तें पहा. कूर्म आपले अवयव प्रकट करितो किंवा लपवितो तरी दोन्ही अवस्थेंत कूर्मच आहे, तसा जगदाकार प्रकट झाला असतां किंवा लोपला असतां एक मी परमात्माच आहे. तात्पर्य, सृष्टीच्या आदिमध्यावसानी एका नारायणावांचून दुसरें कांहींही नाहीं, एक चैतन्यमूर्ति मात्र आहे.

**तेविं नामरूपसंबंध । जाऊनि भूतभौतिकभेद ।**
**अंतीं उरे मी परमानंद । स्वानंदकंद निजरूपें ॥ ४७९ ॥**
**ज्याचें नांव म्हणिजे लुगडें । तें पाहों जातां सूतचि उघडें ।**
**तेविं जग पाहतां घडफुडें । अति चोखडें चिद्रूप माझें ॥ ४८० ॥**
**यालागीं सृष्टिआदि मीच असे । सृष्टिरूपीं मीचि भासे ।**
**अंतीं सृष्टिचेनि नाशें । म्यां उरिजे अविनाशें सच्चिदानंदें ॥ ४८१ ॥**

---

## ३ हस्तामलक.

एक होता ब्राह्मण. ब्राह्मण होता इतकें म्हटलें म्हणजे तो दरिद्री होता हें सांगणें नकोच ! दरिद्र्याला अपत्यें फार असायचींच आणि 'ज्यासी बहुसाल अपत्यें । तो अखंड भोगी आपत्तीतें' हें सहजच आलें ! 'शोकसंतापकारक । घरोघरीं पुत्र देख', पण 'जे पितरांतें तारिती । पूर्वजांतें उद्धरिती' असे सुपुत्र दुर्लभ ! त्या ब्राह्मणाला एक पुत्र झाला. तो उपजत महाज्ञानी होता. किंबहुना तळहातावरच्या आवळयासारखें त्याला ज्ञान प्रत्यक्ष होतें ह्मणून कीं कोण जाणे त्याला हस्तामलक म्हणतः 'जेवीं शुक्तिकेमाजी रत्न । कां लोहामाजीं गुप्तधन । तेवीं त्याचे हृदयींचें ज्ञान । इतर जन नेणती.' कोहंभावें रुदन, सोहंभावें हास्यवदन, पण दोन्ही सांडून तो अखंड मौनच धरी. त्याला रडणें माहीत नव्हतें. जन्म झाल्याबरोबर मुलें एकदां टाहो फोडतात, पण त्यानें टाहो फोडलाच नाहीं ! हें अलौकिक बाळ असें लोक म्हणूं लागलें. प्रेत म्हणावें तर प्राण आहे,

अंध म्हणावें तर पाहतें आहे ! ‘तेज अंगीं न समाये । देखतां तहान भूक जाये ’ असलें विलक्षण मूल ! आईनें बळेंच मुखांत थान दिलें तरी तें चोखत नसे, मग ‘ स्वानंदें नित्य तृप्त ’ होतें कीं कोण जाणे ! आई उदास झाली, ‘अहंममता’ यापाशीं नाहीं म्हणून बापानें उपेक्षा केली. बापानें मुंज केली पण गायत्रीमंत्रही तो म्हणेना, मग ‘ अंगीं लागेल ब्राह्मणपण । मज चारी वर्ण विटाळू ’ असा त्याच मनाचा भाव होता कीं कसें कोणी सांगावें ? बापानें घरांतून त्याला काढून दिला, आई जेवायला घालीत नाहीं याचीही त्याला खंत नव्हती. एकदा आद्य श्रीशंकराचार्य विद्वानांचीं आमंत्रणें टाकून नेमके त्याच्या घरीं आले. दृष्टादृष्ट झाली, खूण पटली ! त्याच्या परमानंदाच्या गोष्टी ऐकाव्या म्हणून आचार्यांनीं प्रश्न केला.

**तूं कैचा ? कोणाचा ? कोठील ? कोण ? । काय नाम ? कोण वर्ण ? ।**
**तुझें कोठूनि आगमन ? । पुढारें गमन तुज कोठें ? ॥ ५६ ॥**

हा आचार्यांचा प्रश्न ऐकतांच ‘ देखोनि पूर्णिमा पूर्णचंद्र । भरतेनि खवळे सागर ’ तशी त्याच्या ज्ञानसागराला पूर्ण भरती आली. ‘ नाहं मनुष्यो नच देवयक्षो । न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रः । न ब्रह्मचारी न गृही वनस्थो। भिक्षुर्नचाहं निजबोधरूपः ’ असें त्यानें उत्तर केलें. श्रीशंकराचार्यांचें हें १४ श्लोकांचें हें स्तोत्र संस्कृतज्ञांस माहीत आहेच. ‘ दोन्ही श्लोक पूर्व प्रश्न । बारा श्लोक गुह्यज्ञान ’ अशा ह्या मूळ १४ संस्कृत श्लोकांवर नाथांनीं हे ६७४ ओव्यांचें भाष्य केलें आहे. याला भाषांतर कोण म्हणेल ? नाथांच्या ‘ हृदयींचें गुह्य ज्ञान ’ ह्या मिषानें प्रगट झालें आहे. आचार्यांनीं तें ‘अबोलणें लेंकरूं ’ आईबापांपासून मागून घेतलें, त्याचें उपनयन केलें व त्याची पूर्ण निवृत्तिस्थिति पाहून त्याला संन्यास दिला. नाथांचें ह्या प्रकरणावरील भाष्य पारमार्थिकांना अत्यंत प्रिय होईल असेंच आहे. त्यांनीं ग्रंथाच्या शेवटीं शंकराचार्यपरंपरा दिली आहे.

तो हस्तामलक आपल्या देहातीत स्वरूपाचें लक्षण सांगतांना म्हणाला कीं मी मनुष्य नव्हे, देव नव्हे, यक्ष नव्हे, ब्राह्मणादि वर्ण किंवा ब्रह्मच-

र्यादि आश्रम याच्याशीं माझा कांहीं संबंध नाहीं, मी केवल निजस्वरूप आहे; मी पूर्ण परब्रह्म आहे: 'शुद्धबुद्ध नित्यमुक्त। चिन्मात्रैक सदोदित। निजानंदें आनंदभरित। तो मी येथ निजबोधू ॥ ८० ॥' पुढील बारा श्लोकांचा चतुर्थ चरण किंवा या गीताचें पालुपद 'स नित्योपलब्धिः स्वरूपोऽहमात्मा' हें आहे. याच्या स्पष्टीकरणाचे पुढील सारे श्लोक आहेत. मन, बुद्धि, चित्त व अहंकार हें चित्तचतुष्टय, कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें यांच्या पलीकडचा व यांना चेतविणारा मी आत्माराम आहे. 'रवि निजांगें लोक समस्त। उठवूनि स्वयें उठवीत। त्या लोकव्यवहारा अलिप्त। स्वयें भासत साक्षित्वें'– सूर्यासारखा मी अलिप्त आहे. मी सूर्याचा सूर्य आहे, आकाशासारखा व्यापक आहे. 'नभ इंद्रियें क्रिया कर्म। त्यांचें मूळ मुख्यत्वें भ्रम। मी तंव केवळ आत्माराम। स्वानंदें परमपरिपूर्ण!' दूध, तूप, गंगाजळ यांत किंवा मूत्र, मद्य, थिल्लर यात सूर्य प्रतिबिंबिला तरी सूर्य स्वच्छ आहे, तसा मी निर्मल आहे. स्वरूप व मी एकच आहेंत. माझा धर्मकर्मांसीं कांहीं संबंध नाहीं. 'ब्रह्मीं कर्म नुरे स्वभावतां!' कापूर आणि अग्नि एकत्र नांदत नाहींत म्हणून ब्रह्मकर्म 'समुच्चयवाद' अज्ञानांतला आहे. आत्मा एक तर तो अनेकबुद्धींचा प्रकाशक कसा? अशी कोणी शंका काढील तर नाथांचें त्यावर उत्तर असें आहे:– सूर्य एक असून तमाचा निरास करितो, कमळांना प्रफुल्लित करितो, नक्षत्रतारांना लुप्त करितो, सूर्यकांताला प्रकाशित करतो, चक्रवाकांना एकत्रित करितो–हें सर्व करितो, पण हे करीत असून असंग, अलिप्त असतो! 'तेवीं सुबुद्धि, दुर्बुद्धि, विषयी,। निंदक, वादक, आग्रही,। विवेकी, विरक्त, निर्विषयी–' या सर्वांच्या बुद्धींना एक आत्मा प्रकाशक असून तो निर्लेप आहे!

जीव आणि शिव दोन्ही आभासात्मक असून त्यांना पुण्यपाप, सुखदुःख यांचा लेप नाहीं, मग यांच्याहून कोटिगुणें वरिष्ठ असा परमात्मा विश्वाच्या कोणत्या कर्माशीं लिप्त होईल? विश्व आणि विश्वात्मा मिळून

मीच परमात्मा आहे. ' जेवीं साखर आणि गोडी। दो नावीं गोडीचि चोखडी। तेवीं विश्व विश्वात्मा निरवडी। चित्सदा रोकडी एकत्वें नांदे. '

**जग भासे जें सकळ। तो जगदात्माचि निखळ।**
**ऐसा निश्चयो ज्याचा प्रबळ। मुक्त केवळ तो एकू॥ ५१७॥**
**जो स्वदेहो देखे ब्रह्मभूत। प्रपंचु देखे परमार्थ।**
**जो विषयसेवनीं समाधिस्थ। तो स्वयें अतीत बंधमोक्षांसी॥ ५२२॥**

वस्तुतः बंध आणि मोक्ष या दोन्ही कल्पनाच—आकाश ' सर्व पदार्थी व्याप्त ' असून अलिप्त व निर्मळ आहे तसेंच ब्रह्मही आहे.

**आकाश न माखे काजळें। आत्मा न माखे मोहमेळें।**
**आकाश न जळे अग्निज्वाळें। आत्मा क्रोधानळें संतापेना॥ ५४५॥**
**आकाश न भिजे पाउसें। आत्मा न माखे विषयरसें।**
**नभ शून्यत्वें व्यापक असे। आत्मा चिदंशें स्वानंदपूर्ण॥ ५४६॥**

आकाश भोग्यशून्यत्वामुळें असंग तर आत्मा भोगभोक्ता असून असंग, आकाश कोटयवधि नक्षत्रें माथां घेऊन असंग तर आत्मा प्रपंच प्रकाशून असंग. पण आकाश आणि ब्रह्म यांत महदंतर आहे:—

**( १ ) आकाशाची अभावें भेटी। स्वानंदपुष्टी आत्मत्वीं।**
**( २ ) आकाश पंचभूतांमधी। आत्मा पंचभूतां निरवधि ( शेवट )।**
**( ३ ) आकाशाला प्रळयीं अंत आहे, आत्मा प्रलयातीत आहे,**
**( ४ ) आत्मा आत्मत्वें अवघा एक। तेथ कैचें व्याप्यव्यापक ?**

जग भ्रममूळ असल्यामुळें जगांतलें अज्ञान व ज्ञानही मिथ्या आहे. तें स्वतःसिद्ध आत्म्याला बंधक होऊं शकत नाहीं. तात्पर्यः—

**जें ज्ञानाज्ञानातीत निर्मळ। जें द्वैताद्वैतातीत निश्चळ।**
**जें जीवशिवातीत केवळ। ते मी प्रांजळ परब्रह्म॥ ५६५॥**
**वस्तु असत् ना नव्हे सत्। अचिद् ना नव्हे चिद्।**
**आनंदु ना निरानंद। परमानंदस्वरूपें॥ ६०३॥**
**गोड मऊ आणि शुभ्र। त्रिविध नांवीं एक साखर।**
**तेवीं सच्चिदानंद साचार। वस्तु एकाकार एकत्वें॥ ६०४॥**

हाच सर्व संतांचा अनुभव आहे. नाथांनीं हस्तामलकाचा हस्त धरून त्याच्या मुखानें आपला अनुभव ' हस्तामलकवत् ' स्पष्ट केला आहे.

---

## ४ शुकाष्टक.

' निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ' असा ज्याचा चतुर्थ चरण आहे असें एक अष्टक प्रसिद्ध आहे. त्यावर नाथांची ही टीका आहे. ' धालेपणाचे ढेकर । जेवीं देती जेवणार । तेवीं आनंदाचे उद्गार । अनिर्वाच्य वदवी ' हें श्रीशुकाविषयीं नाथांनीं म्हटलें आहे. ' स्वात्मोदधिपूर्ण चंद्र, ज्ञानियांचा नरेंद्र, श्रीशुकयोगींद्र ' यांनीं हस्तामलकाप्रमाणेंच आत्मसंतुष्टीचे उद्गार यांत काढलेले आहेत. श्रीगुरुस्मरणानें मौन पडे अभंग मग ' गोडीचा बोध । वैखरी स्रवे ' किंवा ' चंद्रें स्पर्शिलियां चंद्रकांत । जेवीं चंद्रामृत स्रवत ' त्याप्रमाणें ' पूर्णत्वाचा पूर्णार्थ वैखरी वदे ' असें नाथांनीं नमनांत म्हटल्याप्रमाणें हें ' शुकमुखींचें अष्टक ' त्यांच्या स्वानंदाच्या गोडीसहित मराठी भाषेंत रूपांतर पावलें आहे. ' अखंडीं भेदू कैसा ? । अभेदाचा कवण टसा ? ' असा प्रस्ताव करून नाथ सांगतात कीं आपलेपणाच्या विसरांत जीव अखंडाचे ठायीं भ्रम पावून भेदभाव कल्पनेनें उभारतो. सारे भेद अविद्याकारित आहेत व विद्या भेदांचा निरास करिते. ' जेव्हां भेदुचि नाहीं । तेव्हा अभेद तें काई ? । परी चिन्मात्र जें कांहीं । उभयातीत ' तें ज्याचें स्वरूप आहे अशा गुणातीताला विधिनिषेधाची भीति नाहीं; तो शास्त्रमर्यादेच्या पलीकडे गेला. ' ऐसा अद्वय एकला । एकपणें संचला ' तो पापपुण्यादिकांच्या पार गेला. त्याला मायेची भीड नाहीं. ' जैसी रूपाची छाया । वेगळी नव्हे ज्याची तया । तैसी असोनि माया । स्पर्शली नाहीं ॥ गळाली संदेहवृत्ती । जाली निःसंदेह प्राप्ती । मग वोतली देहस्थिती । अक्षररसें '—ब्रह्मरसाची मूसच ती ! वेद ब्रह्माला ' नेति नेति ' म्हणतात—याचा अर्थ वेदाला परब्रह्म कळलें नाहीं असा कोणी करितात तो

योग्य नाहीं. ' वेद काय नेणोनि परतला ? । जाणोनि न संगवे बोला ' वेदाला परमात्मरूप कळलें नाहीं असें नाहीं तर तें त्याला शब्दांनीं सांगतां येत नाहीं ! एक दृष्टांतः ' अबळा पुसे युवतीसी । कांतसुख सांगे मजपासी । ते म्हणे शब्दें न ये व्यक्तीसी । भोगिल्याविणें.' दुसरा दृष्टांतः साखरेची गोडी सांगतां येत नाहीं. गोडी साखर खाल्ल्यावांचून कळत नसते. तसी ब्रह्मरसाची गोडी तो अनुभविल्याशिवाय कळायची नाहीं. असा स्वप्रकाश आत्मा—त्याच्यापाशीं त्रिगुण कोठचें व विधिनिषेध कोठचें ? आत्मस्वरूप झालेल्या महात्म्यालाही गुणांचा व विधिनिषेधांचा संबंध नसतो. ' ऐसिये निस्त्रैगुणमार्गीं । विचरतां जो राजयोगी । तयासी विधिनिषेध जगीं । वस्तुत्वावेगळा कैचा ? ॥ तो अद्वयानंदाचा केवळ । बोधीव नित्य निर्मळ । जाहला तो अढळ । आनंदरूप ॥ २३८ ॥ '

---

## ५ स्वात्मसुख.

स्वात्मसुखाच्या प्रारंभींच ' एकपणीं अनेक । कीं अनेकीं दावीं एक । नकळे कैसें कवतुक । दुजेनवीण ॥ पहातां रूपाचा दुकाळ । नामाचा विटाळ । तेथें स्तवनाचा गोंधळ । रिघेल कोठें ? ' अशा सद्गुरुरायाला ' ॐनमोजी ' करून ' आतां गुरुशिष्य दोन्ही । आणोनि एकपणीं । रिगालों जी स्तवनीं । स्तवावया ' अशा उंचीवरून ' स्वरूपस्थिति ' वर्णावयास नाथ लागले आहेत; तरी तेथेंही ' जें आत्मसिद्धीवर उठी । सद्गुरुभजन ' त्या ' अद्वैतभजनाचें चोखडेपण ' कांहीं सुटलें नाहीं ! ' ब्रह्म ब्रह्मत्व ज्याचेनि बोलें ' त्या श्रीगुरूचें भजन ' सायुज्यतेचा माथां ' कसें चढणार नाहीं ? म्हणून पुढे सद्गुरुकृपेचें वर्णन केलें आहे. ' जेथ दुजें ना एक ' तेथें गुरुसेवेचें सुख कोणतें असें कोणी विचारील तर सांगतात कीं लग्नांतला वरपणाचा सोहळा लग्नसमारंभ संपतांच थांबला तरी भोगलेपण पुनःपुनः समारंभावांचूनही वराला भोगतां येतें कीं नाहीं ? रणभूमीवर शौर्य गाजविलेल्या विजयी वीराला

नंतरही विजयश्रीची कीर्ति रणावांचूनही भोगतां येतें कीं नाहीं ? पति-संगांत प्राप्त झालेला गर्भारपणा 'नित्यसंगावीण' स्त्रीला मिरवितां येतो ना ? 'तैसी गुरुभक्तिभावना । आतळों नेदी मना । परी अखंड भजना । भजतचि असे !' सतरावींचें अमृतपान करणाराच हीं गुरु-खुण जाणूं शकेल. स्तनपान करण्याचें वय संपल्यावर मातेची आमरण सेवा करणें इष्ट कीं आईला दवडून देणें उचित ? देव प्रसन्न होईतों पूजावा आणि मग काय नेऊन विकावा ? रणांत झुंजतो तोंवर हत्ती आणि रण संपतांच तो काय कोल्हा होतो ? इंद्रियातीत असलेलें स्वरूपसुख इंद्रियांनाही भोगायला देणारा श्रीगुरु त्याचें उतराई कसें व्हावें ? सिद्धांत हा कीं 'सद्गुरु तोचि ब्रह्ममूर्ति । भावार्थें करितां अन्यन्यभक्ति । शिष्या स्वात्मसुखाची प्राप्ति । होय निश्चितीं तत्काळ ॥ ४२० ॥'. भावार्थ पाहिजे. 'भावार्थ नै परमार्थु । पाषाणीं पाविजे ! भावार्थ असला कीं भ्रांति फिटे, विकल्प तुटे व देव भेटे 'भाविलां टायीं' यापुढें भावार्थाचें गौरव उत्कृष्ट केलें आहे तें मूळांत पहावें. ( ओवी ४३० त ४४७ ) भावार्थानें बोध आकळतो, भावार्थानेंच तीर्थव्रतजपादि सुफळ होतात. 'भावो तोंचि जयवृत्ती । भावो तोंचि ब्रह्म-प्राप्ती । भावो तैचि ख्याती । परमार्थाची !' शेवटीं शेवटीं तर नाथांचें वक्तृत्व खरोखरीच शिगेला चढलें आहे. 'हे जीवाआंतुली गोडी । अनिर्वाच्य चोखडी । ते लाविली कवित्ववाढी। वाचेच्या आळां ॥५०४॥ तेथ जनार्दन कृपाघन । वर्षताहे स्वानंदजीवन । तेणें एकाकी कविता-वन। सफळित सदा ॥ ५०५ ॥'

## ६ आनंदलहरी.

हें सुमार १५० ओव्यांचें छोटें प्रकरण खरोखरीच अत्यंत रसभरित आहे. त्याच्या नांवाप्रमाणें त्यांत आनंदाच्या लहरीच उसळल्या आहेत.

**निजस्वरूप पाहतां दृष्टी । निजानंद न समाये सृष्टीं ।**

**तुटल्या जन्ममरणाच्या गांठी। निर्भय पोटीं मी जालों ॥ ६ ॥**
**बंधमुक्तीची आटाआटी। संचरली होती माझे पोटीं।**
**होतां तुझी कृपादृष्टी। उठाउठी पळाली ॥ ७ ॥**

देवा! तूं आनंदरूप असून सर्व देहांत भरला आहेस! बंधमोक्ष, स्वर्गनरक, सगुणनिर्गुण, पंचभूतांची सृष्टि इ० सर्व भाषा आतां मावळली. आतां भ्रांति निमाली, कल्पना विरोन गेली, वृत्ती तुझ्यारूपीं बुडाली! ज्ञान आणि अज्ञान दोन्ही निरसून तुवां ' निजमुखातें मेळविलें ! ' आतां देहाच्या माथां जी संचिताची रेखा आहे ती देह परभारें भोगीत राहील आणि गुरुभक्त ' राहोनी आनंदाभीतरीं । साक्षित्वें व्यवहारीं वर्तत. ' वृक्षाचें छेदन झाल्यावर आर्द्रता कांहीं तत्काळ जात नाहीं, कांहीं वेळानें ती जाऊन शुष्क काष्ठ बनते; पत्रपुष्पफळासहित वृक्ष वाळून गेल्यावर अग्निसंगें भस्म होतो; त्याप्रमाणें सद्गुरुकृपा ही विवेकाचे घाव घालून देहवृक्ष पाडून टाकिते, मग अनुभवानें संचिताची आर्द्रता जाऊन जीव हा मुक्त होतो. मग जळांतील पद्मपत्राप्रमाणें अलिप्त राहून मुक्त व्यवहारांत वागत असतो. असे मुक्त ' निरसूनि देहाचा देहभाव । सुखें स्वानुभव भोगिती. ' अमृताच्या सागरांत क्रीडा करणाऱ्याला भवभ्रम कोठला व जन्ममरण कोठलें? त्याला ब्रह्मपदीं ठाव मिळाल्यानें काळही त्याला विसरून जातो. अशा गुरुभक्ताला बद्धता कोठची?

**जै पतंग भक्षी वडवानळासी। दर्दुरीं गिळिजे शेषासी।**
**जै खद्योतें गिळिजे रविबिंबासी। तै गुरुभक्तासी बद्धता ! ॥ ३९**

नाथांच्या घरीं दृष्टांताला काय तोटा? कावळ्यानें गरुडाशीं युद्ध करावें, मुंगीनें सागर शोषावा, मुर्कुटानें ब्रह्मांड गिळावें, चित्रांतील अग्नीनें महावनें दग्ध करावींत, रज्जुसर्पाच्या दंशानें कृतांत मरावा, मक्षिकेच्या धडकेनें महागिरी पडावा, प्रेताच्या धाकानें महाकाळ घाबरावा, वांझेच्या मुलानें रणांगणावर इंद्राला जिकावें किंवा कासवीच्या दुधानें कुंभकर्णाला अजीर्ण व्हावें—

**हेंही ईश्वरइच्छा घडे । परी गुरुभक्तासी बद्धता न घडे ।**
**जन्ममरणाचें फिटलें कोडें । तुटलें बिरडें मायेचें ॥ ४४ ॥**

मायेनें भूतमात्राला ग्रासलें आहे पण ती 'शिव विरंची नारायण। आणि साधुसंत योगीजन' यांच्यासमोर येत नाहीं कां कीं हे तिचें मिथ्यात्व ओळखून आहेत! 'जेथें अज्ञानाचा सुकाळ। तेथें मायेचा गोंधळ!' माया म्ह० क्रियाशक्ति–तिला चालविणारा सूत्रधार परमात्मा आहे हें यथार्थ जाणणें म्हणजेच मुक्त होणें आहे! जीवन्मुक्ताला आपणासगट त्रिभुवन मुक्तच आहे. 'तो सच्चिदानंदडोहीं क्रीडतु' असा आहे म्हणून संत आणि भगवंत भिन्न नाहींत. असे आत्मज्ञानी गुरुभक्त 'स्वरूपीं होऊनियां रत। सुख भोगिती स्वानंदें.' बद्धमुक्तसंबंध देहाकडे नाहीं. देह बोलूनचालून जड. त्याला चालविणारें मन, आणि मनाच्या आधीन आहेत इंद्रियें; पापपुण्यादि कल्पना मन उभवितें. गुरु भजनानें मनाचें मनपण विसरून जातें म्हणून गुरुभक्त अखंड स्वानंदसुख भोगतात. 'येर बापुडे जन!' गुरुभक्तिविहीनांना हें सुख काय आहे हें ठाऊकच नाहीं. 'अनंत जन्माचीं पुण्यें फळती। तरीच प्राप्त सद्गुरुभजन!'

**श्रोतीं न मानावा खेद । म्यां आपुल्या मनासी केला बोध ।**
**भावें भजावा आनंदकंद । मोक्षाचें पद पावावया ॥ ९२ ॥**

प्रपंचाचें सुख मुख्य धरुन हे जीव वागतात म्हणून त्यांची कींव येते. प्रपंचांत सुख असतें तर भर्तृहरीसारख्यांनीं राज्यत्याग कां केला असतां? भवसिंधूच्या डोहांत काळानें गळ टाकला आहे व तो जीवरूप माशांना खात आहे हें प्रत्यक्ष दिसत असतांना जीव अंध राहतात यास काय म्हणावें! म्हणून वारंवार सांगणें हेंच आहे कीं 'जेणें मृत्यूचें मूळ तुटे। जन्ममरणाचें खत फाटे। पापपुण्याची वाटी खुंटे। धरणें उठे काळाचें' असा सद्गुरुभजन हाच एक उपाय आहे.

**सद्गुरुकृपेंवीण । पावले मोक्षाचें सदन ।**

**भूतभविष्यवर्तमान । ऐकिलें नाहीं जनीं कोठें ॥ ११८ ॥**

नामदेवाला भगवान् प्रत्यक्ष होते, पण ' पंढरीनाथाचें निर्गुणरूप पहावया ' त्यांच्याच आज्ञेनें ते विसोबा खेचराकडे गले तेव्हांच नामदेव आत्मसाक्षात्कार पावले व निजसुखाच्या घरांत त्यांचा प्रवेश झाला. सद्‌गुरुकृपेनें:—

**याचि देहीं याच डोळां । भोगिजे मुक्तीचा सोहळा ।**

स्वरूपाचा आनंद मी जनार्दनकृपेनेंच भोगीत आहे. स्वरूपाचा जिव्हाळा–' तो म्यां देखिला जनार्दन । देखितांचि गेला भवभ्रम । सुख जालें अनुपम्य घन । पावलों सदन मोक्षाचें ''॥ १२७॥ श्रीगुरूचा हात मस्तकावर पडतांच ' न मोडितां सृष्टीचा वेव्हारू ' सर्व शून्य होऊन विश्व तेजोमय झालें. त्या तेजाचें वर्णन कसें करावें ? ' त्यावीण दुजें देखावें । तरी सांगावें साक्षित्वें ! ' स्वरूप निराकार आहे मग हा विश्वविस्तार कोठून झाला असें कोणी विचारील तर त्याला उत्तर असें आहे कीं सूक्ष्मबीजापासून प्रचंड वृक्ष होतो, म्हणजे तो बीजांत असतो. त्वचा, काष्टें, फळें, पत्र हीं बीजांत होतींच, फक्त प्रगट झालीं एवढेंच. बीजामाजीं वृक्ष संचला होता तोच सगुणत्वें विस्तारला ! तशींच हीं अनंतब्रह्मांडें बीजरूपानें स्वरूपांतच होतीं व म्हणून तीं प्रगट झालीं. तात्पर्य–' बीजें व्यापिलें वृक्षासी। तैसें निर्गुणें व्यापिलें सगुणासी ! ' सुवर्ण अलंकारांना व्यापून असतें तसें स्वरूप सर्वांना व्यापून आहे, म्हणजे सर्वभर स्वरूपच आहे–स्वरूपाव्यतिरिक्त कांहींच नाहीं ! ' त्यातें मौन्येंचि पाहिज । रसनेवीण गोडी घेईजे। भोगेवीण सुख भोगिजे। पद पाविजे गुरुखुणें ॥ १४८ ॥ म्हणून ' सकळां साष्टांग नमन, तुम्ही जावें सद्‌गुरूसी शरण । चुकवावें जन्ममरण। पावावें सुख मोक्षाचें ॥ १५१ ॥

अध्यात्मप्रकरणांचा विचार झाला, आतां आपण कथाभागाकडे वळूं.

## ७ रुक्मिणीस्वयंवर.

नाथांचें सर्वांत मोठें व सर्वांत लोकप्रिय असें आख्यान म्हणजे त्यांचें ' रुक्मिणीस्वयंवर ' हें होय. महानुभावकवींनीं व श्रीधरस्वामी, विठ्ठल, मोरोपंत, काशिकवि, सामराज, वीरेश्वर इ० कवींनीं रुक्मिणी-स्वयंवराची कथा आपापल्या परीनें गायिली आहे. मराठींत शेंपन्नास कवींनीं ही कथा गायिली आहे.

राजपुतान्यांतही आपल्या इकडल्या पुराणिकांसारखे कथाभट आहेत. ते हिंदी उर्फ राजस्थानी भाषेंत ' रुक्मिणीमंगला 'वर गांवोगांव पुराणें सांगतात. मंगलाचीं पद्यें फार गोड असून तीं ते तालसुरावर गातात. तीं मथुरावृंदावन, ग्वाल्हेर वगैरे भागांत आम्ही ऐकलींही आहेत. मराठींत सामराजाचें आख्यान काव्यदृष्टीनें सुंदर आहे, तथापि नाथांच्या रुक्मिणीस्वयंवराची बरोबरी दुसऱ्या कोणाही कवीचें आख्यान करूं शकत नाहीं. कित्येक तरुणी अनुरूपवरप्राप्तीच्या इच्छेनें हा ग्रंथ नित्य तुलसी-सन्निध बसून वाचीत. अजूनही पुष्कळ कुलवधू हा नाथांचा ग्रंथ श्री-गोपालकृष्णाच्या मूर्तीजवळ बसून वाचीत असतात. परमात्म्याचा त्याच्या चिच्छक्तीशीं जो संयोग तो येथें वर्णिला आहे. नाथांनीं रुक्मिणी व कृष्ण यांच्या लग्नांत जीवशिवांचें लग्न लावून कथापरांप्रमाणें ज्ञान-परांनाही आनंदविलें आहे ! देशस्थ ब्राह्मणांच्या व सामान्यतः देशावरील अनेक जातींच्या घराण्यांत नाथांच्या काळीं ज्या प्रकारचे विवाहसमारंभ होत व अद्याप होतात त्या सर्व प्रकारांचें व रीतीभातींचें, नाथांनीं मोठ्या प्रौढ व सभ्य पण विनोदपर व चित्ताल्हादक अशा दिव्यवाणीनें बहारीचें वर्णन केलें आहे. ही मंगलकृष्णकथा आहे म्हणून भाविक रमतो, जीवशिवैक्यप्रतिपादक अध्यात्मग्रंथ आहे म्हणून ज्ञानी रमतो व सुंदर विवाहवर्णन आहे म्हणून रसिक रमतो.

वर्णनाचा ओघ गंगौघाप्रमाणें गंभीर, सहज व आल्हादप्रद आहे. ' अनुभवकसवटी । कथा चालली मराठी ' इ० स्वानुभवाच्या व

अध्यात्मविचाराच्या स्फूर्तीबरोबर ही कथागंगा जी वेगानें लोटली ती श्रीकृष्णाच्या शुद्धस्वरूपाला जाऊन लगटली. नाथ म्हणतातः "मुखीं जनार्दनचि वक्ता । जनार्दनचि झाला श्रोता ।.जनार्दनचि ग्रंथ लिहिता। सत्य सर्वथा हे वाणी."

नाथांचा प्रस्तुत ग्रंथ श० १४९३ मध्यें रामजयन्तीस काशीक्षेत्रीं मनकर्णिकेच्या तीरीं निर्माण झाला. याचे १८ प्रसंग असून ओवीसंख्या १६०० वर आहे.

सात प्रसंगांत श्रीकृष्णस्वरूप, रुक्मीकृत कृष्णनिंदा, रुक्मिणीची कृष्णप्रीति, सुदेवप्रेषण, द्वारकावर्णन, कृष्णकृत ब्राह्मणसत्कार, रुक्मिणीपत्रिका, विवाहाची तयारी, रुक्मिणीची उत्कंठा, कृष्णागमन, अंबालयांतलें रुक्मिणीहरण इत्यादि प्रकार वर्णिले आहेत. पुढील चार प्रसंगांत बळरामप्रमुख यादवांनीं शत्रूंना कसें चोपून काढलें याचें वर्णन असून १२ व्या प्रसंगांत श्रीकृष्णानें रुक्मीचा पराभव करून त्याचे पांच पाट काढून त्याला सोडून दिल्याची कथा आहे. प्रसंग १३ मध्यें बळरामानें रुक्मिणीची समजूत पाडल्याचें वर्णन असून पुढील पांच प्रसंगांत खास विवाहसमारंभाचें विस्तृत वर्णन आहे. ठोकळ मानानें पाहतां पहिल्या ७ प्रसंगांत रुक्मिणीहरण, पुढील ६ प्रसंगांत युद्धवर्णन व शेवटील ५ प्रसंगांत विवाहसमारंभ असे याचे मुख्य तीन भाग आहेत. भागवत-दशम (अ० ५२-५४) याचा ग्रंथाला आधार आहे पण वर्णनें अगदीं स्वतंत्र आहेत.

सदर ग्रंथाचें सविस्तर विवरण मी आपल्या 'श्रीएकनाथचरित्र' ह्या ग्रंथांत केलें असल्यामुळें या ठिकाणीं त्याचा विस्तर करणें उचित होणार नाहीं. चार दोन सुंदर स्थलांचें दिग्दर्शन मात्र करितों.

(१) वसुदेवाला त्याच्या तपःप्रभावानें जसा कृष्णासारखा अलौकिक पुत्र झाला त्याप्रमाणें इकडे विदर्भदेशीचा राजा भीमक यालाही भाग्ययोगानें रुक्मिणीसारखी चतुर व लावण्यगुणखाणी अशी कन्या

झाली. 'कनकासवें जैशी कांती। कीं सूर्यासवें जैसी दीप्ति' तैसी ही कृष्ण-शक्ति जन्मास आली. ह्या कथेंत प्रथमपासून अध्यामतंतु कसा आहे तें पहाः—

**जैसा मूर्तिमंत विवेक। तैसा जाण राजा भीमक।**
**सत्त्वाथिला अतिधार्मिक। निष्कलंक शोभत॥**
**श्रद्धापत्नी शुद्धमती। जाली गर्भातें धरिती।**
**तेथें जन्मली कृष्णशक्ती। चिच्छक्ती रुक्मिणी॥**
**पांचां विषयांचे शेवटीं। सुबुद्धि उपजे जेविं गोमटी।**
**तैसी पांचाहूनि धाकुटी। जाहली गोरटी रुक्मिणी॥**
**जेंहूनि जन्मली कुशीं। तेंहूनि आवडे रायासी।**
**अमान्य करूनि पांचांसी। तेचि एकी पढियंती॥**

श्रीकृष्णाच्या रूपगुणांचें वर्णन ऐकून रुक्मिणीच्या 'हृदयीं आविर्भवली मूर्ती। बाह्यस्फूर्ती मावळली.' इतकेंच नव्हे तर 'आंग जाः रोमांचित। कंठीं बाष्प पै दाटत। शरीर चळचळां कांपत। पडे मूर्च्छित धरणीये.' तिची ती अवस्था पाहून 'कृष्णार्पण हे करावी' असी भीमकराजानें मनीं खूण बांधली व शुद्धमतीनें या गोष्टीला आपली संमति दिली, पण बंधु रुक्मी आड आला.

(२) **विकल्प रुक्मिया कृष्णद्वेषी। वचन न मानेचि त्यासी।**
**'काय म्हणावें वडिलांसी। गोवळियांसी सोयरिक !॥ २०॥**
**कृष्ण अगुणाचा अरूप। कन्या सगुण स्वरूप।**
**दोहींसी घटिताचा विकल्प। शून्य संकल्प सोयरिके॥ २१॥**
**वचन ऐका ! जी प्रबल। चैद्यदेशींचा भूपाळ।**
**महाअभिमानी शिशुपाळ। सोयरा केवळ तो आह्मां'॥ २२॥**

रुक्मी कृष्णाची निंदा म्हणून करायला गेला तों त्याची तीच महत्तम स्तुति झाली ! अहं—कंसमामाला मारणारा, दोन आईबापांचा, अकुळी, चित्तचोर, भक्तपरतंत्र, सदा संसारीं लपणारा, मत्स्यकूर्मवराहादि विचित्र-रूपें धारण करणारा, बळीच्या द्वारीं राबणारा, 'आपणासकट सकळांचा घात' करणारा, असा हा कृष्ण ज्याला जीवाचा (जीवपणाचा) अंत करून घ्यावयाचा असेल त्यानेंच स्वीकारावा ! किती अप्रतिम 'व्याजस्तुति!'

( ३ ) रुखवतप्रसंगीं भावार्थांच्या ताटांत स्वानंदरस भरून शुद्ध-मतीनें वाढला तेव्हां ' जे जे धाले कृष्णपंक्तीं। सुधा पुढती त्या न लगे '

**कृष्णपंक्ती नाहीं उणें। जेवितां जेविते जाणती खुणे।**
**रुचिलेपणें वाढिती जाणें। सावधपणें शुद्धमती॥ १३४॥**
**पाहिले वाढिले नवजणीं। पूर्ण करिती चौघीजणी।**
**एकाजनार्दन भोजनीं। अतृप्त कोणा राहों नेदी॥ १३५॥**
**कृष्णपंक्ती जे जेविले। ते सर्वेचि संसारा आंचवले।**
**कृष्णरंगें सुरंग जाले। विडे घेतले सकळिकीं॥**

✓ ( ४ ) कृष्ण आपलें वऱ्हाड बरोबर घेऊन वाजतगाजत वधूगृहीं यावयास निघाले, तेव्हां पुढें ' ममतेच्या हवाया जळत होत्या '; ' अति-लोभाच्या चिचुंद्र्या ' पेटवून दूर भिरकावल्या जात होत्या; क्रोधाचे भुइ-नळे, कामाचे हातनळे, अहंकाराचे बाण यांनीं जनमनरंजन होत होतें. मधूनमधून निजतेजाच्या चंद्रज्योति उजळत होत्या, भ्याडांच्या पाठीं अधिक लागून त्यांना आपल्या झोंपड्या पहायला लावणारा महामोहाचा मत्त हत्ती पुढें डौलानें चालविला होता! चतुर्विध मुक्ति हातीं कलश घेऊन महाद्वारीं उभ्या होत्या. श्रद्धा, शांति व विरक्ति ह्या दासी कृष्णाच्या अंगावरच्या वस्त्रांची इच्छा करीत अंतर्गृहाच्या दारांत उभ्या होत्या. ऋग्वेदादि चौघे बंदीजन कृष्ण सर्वांच्या दृष्टीस पडावा म्हणून विवे-काची वेताटी ( छडी ) हातीं घेऊन दृश्य-गलबला मागें लोटीत होते! अहं-सोहं सोडून वैष्णव वीर पुढें नाचत होते. कृष्णाचे भक्त, ज्ञानी-योगी, अनुभवी असे सोयरे कोणी सलोकतेच्या वारूवर, कोणी समीप-तेच्या अश्वावर, कोणी सरूपतेच्या कुंजावर बसून मागेंपुढें चालत होते. कृष्णाबरोबर दयासुभद्रा सुखासनावर आरूढ होऊन मिरवत होती. ह्या मिरवणुकींत सर्वांचे डोळे कृष्णदर्शनाचें परमसुख भोगीत होते.

**दृष्टी जडली कृष्णरूपासी। परतोनि नये दृश्यापाशीं।**
**पारणें होतसे डोळियांसि। कृष्णसुखाशीं भोगिती॥ ७९॥**
**कृष्ण देखोनि धाले नेत्र। देताति तृप्तीचे ढेंकर।**

**तरी भुकेले अपार। वारंवार हरि पाहती ॥ ८० ॥**

(५) द्वारकाप्रवेशप्रसंगीं वेश्या व संन्यासी यांचे एकमेकांस गर्दींत धक्के लागल्यावर त्यांचा मजेचा संवाद दिला आहे. (प्रसग १८)

**वेश्या आणि संन्याशी। मंडपघसणी होतसे कैशी।**
**कोप आला श्रीपादासी। दंडें वेश्येसी ठोकती ॥ २६ ॥**
**येरी विसरली देहासी। वृत्ती लागली कृष्णस्वरूपाशीं।**
**रागें लाता हाणोनि तिशीं। 'विटाळ आम्हांसी कां केला'॥२७**
**येरी हांसोनि कपाळ पिटी। 'अजून क्रोध न सांडी पोटीं।**
**विटंबिली दंडकासोटी। आत्मदृष्टी तुम्हां नाहीं ॥ २८ ॥**
**मी उत्तम पैल हीन। विषमभेदाचें अज्ञान।**
**सर्वांभूतीं समसमान। निजात्मज्ञान तुम्हां नाहीं ॥ २९ ॥**
**शेंडी सांडिली उपडोनि। वासना वाढविली चौगुणी।**
**श्रीकृष्ण देखिलिया नयनीं। विटाळ मानी तो निजांध!'॥३०॥**

वेश्येच्या भाषणाचा सारांश हाच कीं. 'मी कृष्णरूपीं तल्लीन झाल्यामुळें जसे तुम्ही मला दिसला नाहींत, तशी तुमची तल्लीनता झाली असती तर मीही तुम्हांला दिसले नसते! कृष्णदर्शनाबरोबर भेदज्ञान मावळलें पाहिजे. क्रोधादि विकारांचा न्यास झाला नाहीं तर दंडकासोटीपुरता संन्यास म्हणजे संन्यासधर्माची ती विटंबना होय!'

---

## ८ एका कृपणाचा पश्चात्ताप!

मालवदेशांत अवंतीनगरीमध्यें (उज्जयिनींत) एक ब्राह्मण कृषिवाणिज्य (शेतीव्यापार) करून जीविका (निर्वाह) करीत असे. त्याजपाशीं धनधान्यसंमृद्धि यथास्थित होती. पण तो अत्यंत कृपण होता. स्वतःही पोटाला कदन्न खाणारा तो नष्ट स्त्रीपुत्रसेवकांना चांगलें अन्न कोठून देणार? 'न करी नित्यनैमित्त। स्वप्नीं नेणे धर्मकृत्य। देव ब्राह्मण अतिथि तेथ। सदा जात पराङ्‌मुख.' धनलोभानें तो पतितांचेंही अन्न स्वीकारीत असे! असा तो कर्मनष्ट होताः 'अतिवंचक महाशठ। केवळ नष्ट धनलोभी' होता. वानराच्या गालांतले चणे काढून घेण्याइतकें त्याच्या संग्रहांतले पैसे बाहेर

काढणें कठिण होतें ! ' घरींचा भात वेंचेल कांहीं । यालागीं वैश्वदेव करणें नाहीं ! कोणी अन्नार्थी आलाच तर कठोर शब्दानें त्याला असा ताडन करी कीं याचें घरचें अन्नोदक नको असें वाटून त्यानें होऊन दुसरीकडे जावें ! ' भिकारीं सांडिलें त्याचें द्वार । अतिथी डावलिलें निरंतर । पाहुणा दूर पाहे बिढार । निराशी पितर सर्वदा ! ' उंदीर व कावळेही तें घर सोडून गेले, चिडियां ( चिमण्यांना ) त्याच्या दारीं एक दाणा मिळायचा नाहीं ! ' पोटा ना खाय जो आपण । तेथ कथा कोण इतरांची ? ' भूक लागल्यास तो चणेही खायचा नाहीं, मग ' कायसी सेवकांची गोठी । कावली पोटीं स्त्रीपुत्रें !' ऋतुकाळीं फळें पुष्कळ यायचीं पण त्यांची दृष्टभेट याला बाजारांत व्हायची ! बाळपणीं काय आईचें दूध प्यायला असेल तवढेंच, पुढें ' दूधाचि वर्जिलें । व्रत धरिलें धन-लोभें ! रसनेला रसाची स्वाभाविक आवड असायची पण त्याची रसना रसावांचून रुक्ष झाली. वस्त्रें मळकीं, स्वप्नींही विड्याचें पान ठाऊक नाहीं. ' सणवार दिवाळीदसरा । तैं जुने जोंधळे धाडी घरा ! ' असा हा कदर्यु होता !

**अन्नआच्छादनेंवीण । कुटुंबेसहित आपण ।**
**जो कदर्थवी निजप्राण । कदर्यू पूर्ण त्या नांव ॥ १०५ ॥**

त्या कृपणाची स्त्री, पुत्र, आप्त, इष्ट, सेवक सारे त्याच्या विरुद्ध झाले. सखे बंधु द्रव्यविभाग मागूं लागले तेव्हां घरांत कलह सुरू झाले. हा माहेरसण व बोळवण नीट करीत नसे म्हणून त्याच्या कन्याही त्यावर चर-कडून त्याला मनांतल्या मनांत दारूण शाप देत असे ! ज्याच्या द्रव्याला ' नाहीं धर्माचें संरक्षण । तें काळेंचि होय क्षीण ' हा अनुभव त्याला पुढें आला. आप्त ते अनाप्त झाले. मित्र शत्रु झाले.

ठेव्यापाशीं भूत किंवा समंध त्याच्या रक्षणार्थ असतें तशीच याचीही गोष्ट झाली ! शरीरभोग नाहीं तेव्हां इहलोक शून्य झाला, स्वधर्मकर्म किंवा पंचमहायज्ञ नाहीं तेव्हां परलोकही अंतरला ! दायाद, चोर, राजा

अग्नि व रोग हे पांचही त्याच्या द्रव्यनाशास कारण झाले. जेथें दानधर्म नाहीं, पितरांचा व देवांचा मान नाहीं, जेथें सर्वजनद्रोह आहे तेथें द्रव्यक्षय!

स्त्रीपुत्रांनीं हातीं लागलें तें द्रव्य लांबविलें, गोत्रजांनीं बलात्कारानें आपला वांटा नेला, चोरांनीं भांडार लुटलें, अग्नीनें कोठारें जाळून टाकलीं, उभ्या पिकाला कीड लागली, व्यापारधंदा जागच्या जागीं बुडाला, विश्वासु नोकरांनीं खतपत्रें पळविलीं, समुद्रांत तारूं बुडून याचा माल गेला, भागीदारीवर घाला पडला, ठकांनीं याच्या हातीं मुलाम्याचीं नाणीं देऊन ऐवज नेला, परचक्र येऊन त्यांनीं खणती लावून घर फोडलें व तळघरांतले द्रव्य कावडी लावून नेले, पेवांत पाणी शिरलें, अशा प्रकारें दोन वर्षांत सारी संपत्ति नाहींशीं झाली! 'गेलें शेत निमाली कुळवाडी! घर पाडिलें परचक्रधाडीं। धन नासलें, नाहीं कवडी। अधर्माचे जोडी हे दशा!' दान नाहीं, भोग नाहीं तेथें द्रव्याचा नाश! त्या कृपणाची पुढें फार दशा उडाली, लोकनिंदा झाली, रांडापोरें थुंकूं लागलीं, कोणी भीक घालीना! 'हा काळमुखा होता धनलोभें भुलला। भला नागविला ईश्वरें' असे लोक म्हणत.

**कांटा रुतल्या भुजंगकपाळीं। पुच्छ तुटल्या सांपसुरळी।**
**हो कां जळावेगळी मासोळी। तैसा तळमळी अतिदुःखें॥१४८**
**मनें आठवितांचि धन। हृदयीं चाललें स्फुंदन।**
**अश्रुधारा स्रवती नयन। मूर्च्छापन्न क्षणक्षणा॥ १४९॥**

त्याची बायकापोरेंही त्याला सोडून गेलीं. 'बाप धनलोभाचें कवतिक। नाहीं इहलोक ना परलोक। तिथें अंतरलें मोक्षसुख। भोगवी नरक अनिवार' त्याला तीव्र अनुताप झाला. त्याचे डोळे उघडले. तो वैराग्यसंपन्न होऊन भिक्षु झाला.

तो मनाशीं म्हणाला 'आजवर मी खरोखरीचा अभागी होतों, आतां हरीनें डोळ्यांत अंजन घातल्यामुळें मला स्वच्छ दिसूं लागलें! 'मज तुष्टला श्रीरंग। विवेकवैराग्य पावलों!' संचितधन हरीनें हिरोनि नेलें ही त्याची मजवर पूर्ण कृपा झाली. जें धनरूपानें अज्ञान सांचलें होतें

तो डोळ्यांतला केर गेला, देह वृद्ध झाला पण मन वृद्ध झालें नाहीं, त्या मनाचेंच साह्य घेऊन मी आतां कळिकाळाचे दांत पाडीन व मरणाला मरण आणीन. आतां 'ज्ञानदीप उजळला!' 'नमन स्त्रीपुत्रादि धनांसी। नमन स्वयातिस्वजनांसी। नमन देहाभिमानासी। संबंध आम्हां तुह्मांसी असेना!' तो खडखडीत जागा झाला. देहाभिमानासी घटस्फोट करून तो संन्यासी झाला. कदर्यूचा भिक्षु झाला! त्यानें कामक्रोधासगट अहंकाराची पूर्णाहुती वैराग्यानळांत टाकली व मोकळा झाला. मग तो परमानंदें परिपूर्ण होऊन पृथ्वीवर निःसंगपणें विचरूं लागला ( भाग० अ० २३ ).

---

## ९ कांहीं आख्यानें.

नाथांनीं १८।२० पौराणिक कथानकें थांवत्या-सोप्या अभंगादि वृत्तांत वर्णिलीं आहेतः ( १ ) **दशावतारः** अंबऋषीसाठीं विष्णूनें दहा अवतार घेतले त्या मत्स्यकूर्मादि दशावतारांच्या कथा अतिसंक्षेपानें सुचविल्या आहेत.ह्या अभंगांत एक महत्त्वाची गोष्ट आहे. 'नववा' अवतार बौद्धमतस्थापक गौतमबुद्धाचा असें कोणी म्हणतात, पण तें नाथांना मान्य नाहींसें स्पष्ट आहे.नवव्या अवतारीं विष्णु बौद्ध होऊन पंढरीस विटेवर येऊन उभे राहिले असें ते म्हणतातः 'लोक देखोनि उन्मत्त दाराधनीं आसक्त। न बोले बौद्धरूप ठेविले जघनीं हात॥'-'तो हा महाराज भीवरेचे तटीं। उभा जगजेठी विटेवरी' 'येऊनियां पंढरपुरा। धरिला विटेवरी थारा' दोन अभंगांत राम व कृष्ण यांचें साम्य दाखविलें आहे:—"एकें ताटिका मारिली। एकें पूतना शोषिली॥ एकें अहल्या उद्धरिली। एकें कुब्जा पावन केली॥ एक हिंडे वनोवनीं। एक हिंडे वृंदावनीं॥ एकें रावण मर्दिला। एकें शिशुपाळ वधिला॥ एकें बिभीषणा पाळिले। एकें अर्जुना सांभाळिलें॥ एकें वानर मेळविले। एकें गोपाळ सवंगडे॥ एका शोभे धनुष्यबाण। एका काठीकांबळी पूर्ण। ऐसे दोघे ते समर्थ। एका

जनार्दनी शरणागत ॥" ( २ ) **एकादशीमाहात्म्य** ( ३ ) **रुक्मांगदाची कथा** ( ४ ) **तुळसीमाहात्म्यः**—वैष्णवांचें मुख्य व्रत एकादशी. तें अंबरीष व रुक्मांगद यांनीं आचरिलें. हे दोन्ही सूर्यवंशीचे राजे व महावैष्णव. एकादशीचे दिवशीं 'बरवें करावें हरिपूजन । शृंगारावें देवसदन । आठहि प्रहर हरिकीर्तन । जागरण करावें उल्हासें' एकादशीस भोजन, तांबूलसेवन व स्त्रीसंग हे वर्ज्य आहेत. नाथतुकोबांनीं यांचा सारख्याच तीव्र शब्दांनीं निषेध केला आहे. 'सर्वांमाजी सार व्रत एकादशी.' रुक्मांगदानें 'राष्ट्रामाजी रूढ केली एकादशी । दया सर्वांभूतीं समानाचि' म्हणून त्याला विमान आलें. हरिजागरणीं 'भाळे भोळे भक्त वेडेवांकुडे गाती' तरी त्यांच्या सद्भावाकडे पाहून देव प्रसन्न होतो. 'एका जनार्दनी अनुतापावांचून । न घडे नामस्मरण काळत्रयीं.' 'अष्टही प्रहर हरिकथा करी । वाचे विठ्ठल हरी वदोनियां ॥ टाळ मृदंग वाजती गजरें । विठ्ठल प्रेमभरें नाचतुसे.' एकादशीचे व्रत तीन दिवसाचें असतें. रुक्मांगदाला एकादशीचा अंबरीषाला द्वादशीव्रताचा, प्रल्हादाचा हरिनामाचा, असा प्रत्येकाला एकेक व्रताचा छंद होता हें सांगून नाथ म्हणतात कीं कोठेंतरी एकविध छंद धरा, एकनिष्ठपणें भक्ति करा, म्हणजे त्याचा परमानंद तुम्हांलाही मिळेल. विष्णूला तुळस प्रिय म्हणून 'तुळसीकाष्ठाची माळ गळा घाळावी निर्मळ ॥ द्वारीं घालुनि वृंदावन । वरी तुळसीबीजारोपण ॥ जोडोनियां पाणी । वंदा तुळसी निशिदिनी ॥' देवाला तुळसीपान प्रिय म्हणून एकतरी पान देवाला वाहिल्यावांचून अन्नग्रहण करूं नये. वैष्णव सांप्रदिकांना हीं तीनही प्रकरणें आवडतील.

ह्याशिवाय हनूमज्जन्म, संदीपनकथा, रामरावणांची व सीतामंदोदरींची एकात्मता, शिवपार्वतीविवाह, गंगागौरीकलह इ० बारीकसारीक प्रकरणें ८।१० आहेत. सारीं आख्यानें सुबोध व सरळ असून आबालवृद्धांना पौराणिक कथांचा लीलेनें परिचय करून देणारीं आहेत.

---

## १० लीलाविनोदपर काव्यें.

१ **हळदुली**— कृष्ण आणि रुक्मिणी यांच्या विवाहप्रसंगीं वधूवरांनीं परस्परांच्या अंगाला हळद लावली हा साधा प्रसंग घेऊन त्यावर नाथांनीं ११० अभंगपाद रचले आहेत. हळदुली अध्यात्मरंगानें तर रंगलेली आहेच पण त्यांत मौजेचा विनोदही आहे. कृष्णपरमात्मा आणि रुक्मिणी—त्याची चिच्छक्ति—दोघेही सुजाण, रसिक व परस्परप्रेमानें आकर्षिलेलीं वधुवरें.

**उटिलीं वधू वरें हळदुली स्वानंदें । लाज मध्येंमध्यें परमप्रीती ।**
**नोवरी शाहणी आपल्या निजगुणीं । वश्य चक्रपाणी करुनि ठेली ॥**

अशा त्या गोड प्रसंगीं 'बारा सोळा' करवल्या, वेल्हाळा 'उन्मनी', 'नवजणी' वऱ्हाडणी, शांति नांवाची एक वृद्धा—ही मंडळी तो आनंद भोगायला हजर होती. वृद्धा प्रथम पुढें झाली. तिनें रुक्मिणीला 'जया दीपमेळीं नाहीं धूमकाजळीं' अशा दीपज्योतीनें कृष्णाला ओवाळण्यास सांगितलें तेव्हां रुक्मिणी मनीं आनंदली व तिनें चिद्रत्नांचे दीप लावून कृष्णाला लज्जाविनयान्वित होऊन प्रेमानें ओवाळलें! कृष्ण एकदम् प्रकाशरूप झाला, तेव्हां 'त्या प्रकाशावेगळी न निवडे ते बाळी । निजभावें वोवाळी प्राणनाथा.' यानंतर नांव घेऊन पाय माग असें वृद्धेनें सुचविलें. 'जेथें रूपाचा दुकाळू । नामाचा विटाळू' तेथें मी यांचें नांव तरी काय घेऊं असा रुक्मिणीस पेंच पडला! 'नामाची हे गोडी नाहीं ठावी यासीं' अशा (नामरूपातीत) वल्लभाचें नांव तरी कसें घ्यावें! असें मनांत येऊन रुक्मिणी लाजली. शेवटीं कृष्ण हा 'गो (इंद्रिया) अतीत' आहे असें मनांत आणून 'गोपाळा! पाय द्या' असें ती ह्मणाली. रुक्मिणीनें कृष्णाचें नांव घेतलें याचा आनंद वाटून सर्वांनीं 'टाळी पिटली' व मग रोडोळी (थट्टा) सुरू झाली. आंतल्या खुणा जाणून वधूवर संतोषले. कृष्णानें पाय पुढें केले तेव्हां कृष्ण श्यामल (काळा) म्हणून त्याला 'उटूनी सोज्वळा (गोरा) करूं पाहे' अशी रुक्मिणीच्या मैत्रिणींनीं तिची चेष्टा केली व त्या हसूं लागल्या.

कृष्ण मूळचा निर्मळ–' कृष्णाअंगीं लागे ( जडे ) तें मागुती न निघे ' कृष्णचरण हातीं घेऊन रुक्मिणी हळद लावूं लागली तेव्हां कृष्णनखीं तिला अनेक देवदेवता दिसूं लागल्या, व कृष्णाची थोरवी मनांत येऊन ' बाष्प दाटे कंठीं । स्वेदेली गोरटी ' अशी तिची अवस्था झाली. कांचोळीचें बिरडें सोडण्याची वेळ आली तेव्हां कृष्णानें नुस्तें दृष्टीनें पाहिलें तों हें साधें बिरडेंच काय पण द्वैताचें समूळ बिरडें (गांठ) फिटलें !

**कृष्णदृष्टीपुढें फिटे संसारबिरडें । मग हें केवढें नवल त्यासी ? ॥**

कृष्णाला नांव घेण्याचा आग्रह झाला तेव्हां ' नामा हे रूपाची गुणमयी गुणाची–' हिचें नांव घ्यायची मला लाज कसली असे तो म्हणाला ! त्यानें रुक्मिणीचीं अष्टांगें उटिलीं तेव्हां ती ' कृष्णकरयोगें ( स्पर्शानें ) सबाह्य निवाली ' म्ह० सुखमय झाली. ब्रह्मादिकांचा ईश रुक्मिणीच्या भक्तीला भुलून तिचा सेवक झाला. ' जैसा जयो भावो तैसा तया देवो ' वडिलांच्या प्रेमाग्रहास्तव रुक्मिणीनें कृष्णचरणीं मस्तक ठेविलें. तेव्हां ती ' कृष्णचरणीं जडलीं ' तिला उठवेना ! '

**अहंसोहं गांठी सुटल्या चरणभेटी । आनंदाची सृष्टी हेलावतु ॥**
**सेव्यसेवकभावो नाठवे विवाहो । देवी आणि देवो येक झाली ! ॥**

हा हळदुलीचा छोटासा प्रसंग नाथांनीं ' रुक्मिणीस्वयंवरांत ' ही ( प्रसंग १६ ) वर्णिला आहे. तेथें ते म्हणतात कीं लग्नाच्या दुसऱ्या दिवशींच हा हळदीचा समारंभ झाला. ' मूळ पाठविलें सकळां । दोहीं बाहीं बारा सोळा । करवली सुभद्रा वेल्हाळा । चाले सुढाळा उन्मनी ! ' ह्या स्त्रिया हळद लावण्याच्या समयीं ' ढवळे गाती स्वानंदें ' आनंदानें ढवळे किंवा धवलें ( यशोगीतें, मंगलगीतें ) गात होत्या. ढवळे गाण्याचा प्रघात पूर्वापार आहे ( पहिला खंड–पृ० ४४६ ). बिरडें सोडायच्या वेळीं कृष्णाच्या मेव्हण्यांनीं थट्टेचा अतिप्रसंग केला. मेहुणे म्हणती ' हा जगजेठी । जाणे बिरडियाची हातवटी । अभ्यास केला यमुनेतटीं । दाटोदाटी गौळणीसी । ' यावर यादववीर खवळले व ते उसळून म्हणाले

' कां रुक्मिणीहरणाच्या वेळीं महावीराचें बिरडें ( वेढा ) एकट्या कृष्णानें फेडून शत्रूंची रग जिरविली व रुक्मीचे पांच पाट काढले तो प्रसंग विसरलांत काय? तसा युद्धाचा दणका पुन्हा पाहिजे काय?' मग मेहुणे गप्प बसले. कृष्णसख्यांनींही ' भीमकी सुकुमार गोमटी। कृष्णा! इसीं हळूच उटीं। कठिणहस्त तूं जगजेठी। मल्ल मुष्टीं मर्दिले ' असा प्रेमळ विनोद केला. कृष्णाला नांव घ्यायला सांगितले तेव्हां ' नामरूपाची व्यवस्था। रुक्मिणीच जाणे तत्त्वता ' असे ते बोलले, यावर ' आग्रह न करावा गोपाळा। नामरूपा तूंचि जिव्हाळा ' असें उत्तर मिळालें! यांतील वर्म वेदांतवेत्ते उत्तम जाणतील. रुक्मिणीनें पाय मागितला व कृष्णानें तो दिला. तेव्हां ' अबला सांगती वडिला। येणें अभिमान सांडिला। कृष्ण बाईलेआधीन जाला। तिच्या बोलांमाजी वर्ते।' असा विनोद झाला. कृष्ण रुक्मिणीच्या भक्तीला भुलला, तो दासाचें दास्य करण्यांत सुख मानणारा आहे हें वर्म जाणत्यांनीं ओळखलें. असो. रुक्मिणीस्वयंवराच्या ओव्यांतही हा हळदीचा प्रसंग मोठ्या सहृदयपणें वर्णिला आहे. ह्या प्रसंगांत नाथांनीं अध्यात्म, भक्ति व विनोद हे तीनही रस चांगले साधले आहेत.

✓ २ **कृष्णदान**:— रुक्मिणीच्या कथेंत गंभीरविनोद आहे, पण सत्यभामेच्या ' कृष्णदान ' प्रकरणांत हास्यविनोद भरपूर आहे. दोघींचें कृष्णावर प्रेम होतें, पण एक कृष्णाचें भगवद्रूप यथार्थ जाणणारी होती व दुसरी त्याच्या ऐश्वर्यावर व विलासपरतेवर भाळलेली होती. दोघींच्या योग्यतेंतलें हें तारतम्य जाणून नाथांनीं दोघींचीं स्वभावचित्रें चातुर्यानें रेखाटलीं आहेत. सत्यभामेच्या कथेला ' एक विचित्र विनोद कथा ' असेंच नाथांनींच नांव दिलें आहे.

एकदा सत्यभामेच्या महालीं नारदमुनि आले. सत्यभामेनें नारदांचें स्वागत केलें, पूजन केलें, व जन्मोजन्मीं कृष्णच पति मिळावा यासाठीं एखादें व्रतदान करायला सांगा अशी त्यास विनंति केली! ' कृष्ण सर्वांगीं

सुंदर। लावण्यगुणरत्नाकर । सत्यभामा म्हणे हा वर। जन्मोजन्मीं पावावा.' नारदांनीं मनांत विचार केला कीं रुक्मिणीसारखी 'कृष्ण-स्वरूपीं ही मीनली नाहीं' म्हणून विषयबुद्धीनें ही जन्मजन्मांतराचा सोस करीत आहे, तर हिची थोडी गंमत करूं! रुक्मिणीची योग्यता इला कळेल तर हिचा गर्व झडेल असा कांहीं मजेचा विनोद करूं. नारदच ते! पडले विनोदाचार्य! मी कोणते व्रत किंवा दान करूं असें भामेनें नारदास विचारिलें. 'जरी कृष्ण दानासी देसी। तरी हा जन्मोजन्मीं पावसी' असा त्यानें तिला सल्ला दिला. तिनें कृष्णास विचारलें. कृष्ण मनांत हांसले व म्हणाले कीं, 'खरेंच तुझ्यासारखें मजवर रुक्मिणीचेंही प्रेम नाहीं. धन्य तुझा प्रेमा!' कृष्णाची संमति मिळवून सत्यभामेनें 'कृष्णदान' घेण्यासाठीं ब्राम्हण बोलाविले, पण कोणी कृष्णदान घेण्यास तयार होईना. 'येणें हिरोनि परात्पर नोवरी। घातलीं निजमंदिरीं। अहं-मामाजीतें मारी। अकर्मे करी हा कृष्ण!' आणखी असें कीं 'आम्हीं भिक्षुक ब्राम्हण, याला रोज मिष्टान्नें व पीतांबर पाहिजेत. आम्हीं रोज कोठून पुरवावेत!' शेवटीं सत्यभामेनें नारदाला गळ घातली व त्यालाच कृष्णदान करण्याचें ठरविलें. 'नारद म्हणे भलें आतां। व्रतेंतपेंवीण कृष्ण ये हाता। कवण सरे मागुता। कर्मकरंटा कर्मिष्ठु!' आतां स्वामीचा सेवक व सेवकाचा स्वामी होईल! भामेनें कृष्णाचें सालंकृत दान केलें. 'प्रतिगृह्यताम्–प्रतिगृण्हामि' इ० भिक्षुकांचे मंत्रविधि झाले. नारदाच्या स्वाधीन कृष्ण होतांच नारदानें आपल्या पादुका, ब्रम्हवीणा, देवपूजेचें साहित्य सर्व कांहीं कृष्णाला उचलण्यास आज्ञा केली! पुढें नारद, मागें गोविंद, असे ते द्वारकेच्या बाहेर चालले! कृष्णानें नारदाचे पाय धुतले व तें चरणोदक प्रेमानें घेतलें! द्वारकेचे लोक म्हणूं लागले कीं 'नीच सेवकाची गती। सेवा घेतो कृष्णाहातीं। बाइलेच्या भिडा श्रीपती। नार-दाहातीं सांपडला!' नारदानेंही पण माणुसपण सोडलें! ही कृष्णदानाची कथा हां हां म्हणतां द्वारकेभर झाली व साऱ्या कृष्णपत्न्या सत्यभामेच्या

महालीं जमून ' तुला एकटीला कृष्णाचें दान करायचा अधिकार कोणी दिला? ' असें म्हणून तिला सगळ्यांनीं सळो कां पळो करून सोडले. ' न लाजसी चित्तीं निर्लज्जे! ' म्हणून तिची फजिती मांडली. कालिंदी, जांबवती इ० अष्टनायका, बहिण सुभद्रा, आई देवकी, सारी द्वारका लोटली. स्त्रियांचीं तीं भाषणें! नाथांनीं भाषणेंही समुचित वठविलीं आहेत. सवतींनीं उसनेंपासनें सगळें बोलून घेतलें: ' चैतन्यघन कृष्णाला पुनर्जन्म कल्पिणारी तूं ग कोण? ' सत्यभामा लज्जित झाली व तिनें पाहिलें कीं या साऱ्या सवतीमत्सरानें पोटीं जळत होत्या त्या आज मज-वर प्रसंग येतांच उलटल्या आहेत! देवकीही जेव्हां म्हणाली कीं, ' म्यां नवमास वाहिला उदरीं। आणि दानासी तूं स्वामिनी! ' तेव्हां तिचें मुख म्लान झालें. ' थितें अंतरलें कृष्णसुख। सत्यभामा अधो-मुख। मर मर करिती सकळ लोक। तेणें दुःख दुणावें! ' बलरामदादाही नारदावर उसळले व हा मैद कृष्णाला कपटानें घेऊन चालला आहे असें म्हणाले व लगेच त्यांनीं सुभट पाठवून कृष्णासगट नारदाला द्वारकेस परत आणले! नारदानें कृष्णाची स्तुतिगर्भ निंदा केली ती ऐकून कृष्ण हांसले! ते सारा खेळ मौजेनें पाहात होते! वसुदेवादि-कांनीं नारदाचे चरण धरिले व आमचा कृष्ण आम्हांला परत द्या अशी त्याची विनवणी केली. नारद म्हणाले: ' आमुच्या चालीं कृष्णासी चालणें। आमच्या कर्मकर्तव्यपणें। आमुच्या गुणें होय होय सगुणें। धर्मसंरक्षण श्रीकृष्ण॥ पाहतां श्रीकृष्णाचे मुख। फिकें समाधिसुख '... बाबारे! पुरें कर तुझा वेदांत, आमचा कृष्ण आम्हांला पाहिजे, हवें तर भारंभार सोनें घे! नारद कबूल झाला! पहिल्यानें सत्यभामेनें आपले सगळे दागिने कृष्णाच्या उलट पारड्यांत घातले, तिनें आपली सगळी संपत्ति घातली, तरी कृष्णाचें पारडें जडच! मग सगळ्या राण्यांनीं व द्वारकेंतल्या सर्व स्त्रीपुरुषांनीं द्वारकेची सगळी अफाट संपत्ति पारड्यांत घातली तरी

' नुचलें श्रीकृष्णाचें पारडें ! ' नारदानें अखेर भीमकीस बोलावण्यास सांगितलें. ती आली. ' समूळ सपर्वत धरा (पृथ्वी)। न पुरे कृष्णाचिया भारा ' हें तिला ठाऊक होतें. तिनें सर्व सुवर्णभारावर आपलें भक्तिभावाचें एक तुळसीपत्र ठेविलें तों ' भावार्थाचें बळ गाढें। उचललें कृष्णाचें पारडें ! ' तात्पर्य, ' भावार्था विकला देव । अर्थासी या नाहीं संदेह । जयासी जैसा भाव । तैसा देव तयासी ! ' रुक्मिणीची सर्वत्र वाहवा झाली. मूढ स्त्रिया सर्व संभारांतून आपापले दागिने शोधीतच परस्परांत भांडत राहिल्या ! सत्यभामेसगट सर्वांचे गर्वहरण झालें. ही सारी कथा अत्यंत मनोहर विनोदपर व बोधप्रद आहे.

(३) **श्रीदत्तजन्माख्यानः**— लक्ष्मी, पार्वती व सावित्री ( हरिहरब्रह्मा यांच्या स्त्रिया ) यांना आपल्यापेक्षां अधिक योग्यतेची पतिव्रता मनुष्यलोकांत कोणी असणेंच शक्य नाहीं असा गर्व वाटत होता ! नारदानें ' धन्य अनसूया पतिव्रता। तुह्मां तिघींहूनि समर्था ' असें म्हटलें तेव्हां तिचें सत्व पाहण्यासाठीं त्यांनीं आपापल्या पतीस तिजकडे पाठविले व तिची फजिती करण्यासाठीं ' नग्न भोजन मागा ' असें त्यांस शिकवून ठेवलें ! तिघेही माध्यान्हीं अत्र्याश्रमांत आले. त्यांचा सत्कार झाला. आम्हीं मागूं तें आम्हांस दे असें ते म्हणाले. ' देव म्हणती होऊनि नग्न। आम्हांसी घालावें भोजन ' त्या महासतीनें ' ठेवूनि तिघांचे मस्तकीं कर । तंव ते तिघे झाले कुमर। मग नग्न होऊनि सत्वर । करवी स्तन्यपान तयांतें ! ' तिनें त्यांना नंतर पाळण्यांत घातले व ती आपल्या घरकामाला लागली. आपले पति परत कां येत नाहींत अशी लक्ष्मी, पार्वती व सावित्री यांस चिंता पडली; तेव्हां ते अनुसूयेचें पाळण्यांत बाळें होऊन पडले आहेत असें त्यांस समजलें ! आम्ही आपले पति सोडवून आणूं अशा अभिमानानें त्या अनसूयेच्या आश्रमांत आल्या, व त्यांनीं आपले पति मागितले तेव्हां तिनें तीं बाळें आणून त्यांच्यापुढें ठेविलीं. त्या चकित झाल्या, व ह्मणाल्याः ' सर्वही सामर्थ्य

वेंचलें। धैर्य अभिमान गळाले। मग लोटांगण घातले। चरण वंदिले सतींचे ॥ अनसूया थोर तूं पतिव्रता। धन्य धन्य तुझी सामर्थ्यता। आम्ही लीन जाहलों पाहतां। नको निष्ठुरता करूं माये!' अनसूयेनें तिन्हीं बाळकांचें मस्तकांस स्पर्श करितांच ते हरिहरब्रह्मारूपानें तत्सन्मुख उभे राहिले. तिघांनीं अनसूयेची स्तुति केली. तिनें उलट त्यांची प्रार्थना केली कीं आज सहा महिने तुमचा मला लळा लागला आहे तरी तुह्मी तिघेही एकरूपानें माझे घरीं बाळ म्हणूनच नांदावें. 'मग देवत्रयाची मूर्ति। करकमळीं जाली शीघ्रगती। दत्तात्रेय ऐसी ख्याति। तिहीं लोकांप्रती विशेष.' पार्वती वगैरे तिघी स्त्रिया आपापले पति घेऊन गेल्या व अनसूयेला तिन्ही देवांचें सामर्थ्य एकवटलेलीं दत्तमूर्ति बाळरूपानें मिळाली! देवादिकांहूनही अधिक सामर्थ्य मनुष्यदेहांत तपोबलानें संपादितां येतें हें या कथेचें तात्पर्य आहे!

---

## ११ प्राचीन व अर्वाचीन भक्तांचीं चरित्रें.

( १ ) **ध्रुव** ( २ ) **प्रल्हाद** ( ३ ) **उपमन्यु** व ( ४ ) **सुदामा** ह्या चार भागवती भक्तांच्या कथा मराठींत नाथांनींच प्रथम सुबोध व प्रेमळ वाणीनें गायिल्या आहेत. त्या अभंगात्मक असून सगळे अभंग ६१ आहेत.

(१) **ध्रुवः**—सूर्यवंशांत उत्तानपाद नामक एक राजा झाला. 'भूतांचा मत्सर नाहीं तेथें द्वेष। चारी धर्म निर्दोष चालताती ॥ प्रजेचें समाधान अपत्याचे परी। ऐसा राज्य करी न्यायनीती ॥' असा तो उत्तम राजा होता. त्याला 'वडील धाकुली ऐशा दोन जाया' होत्या. धाकुली नावडती, तिच्या पोटीं ध्रुव जन्मला. 'पंचवर्षांचा बाळ खेळे नाना खेळ। मेळवोनी मेळ सवंगडियांचा ॥' विटीदांडू चेंडू इ० खेळ खेळत असतांना त्याच्या 'मुखीं' 'नामछंद' होता. सहज खेळतां खेळतां तो एकदां राजवाड्यांत

आला. राजानें मोहानें त्याला अंकावर घेतलें. वडील राणी आली. तिनें सापत्नभावानें ' पदें तया लोटी अंकावरुनी. ' तो रडत रडत आपल्या आईकडे आला. आईनें समजाविलें; ' आपलिया दैवीं देवें जें लिहिलें । भोगणें प्राप्त जालें आपणासीं ॥ एकाजनार्दनीं देवावीण शीण । निवारील कोण दुजा बापा. ' तो देव कोठें आहे असें त्यानें आईला विचारिलें. आईनें उत्तर केलें ' देव कोंदलासे सबाह्य अभ्यंतरीं. ' हा उपदेश मानून व आईला प्रणिपात करून ध्रुव घराबाहेर पडला. ' जाउनी निरंजनीं तप आरंभिलें. ' वैष्णवांचा राव नारद तेथें प्राप्त झाला, त्यानें ' ॐ नमो भगवते वासुदेवाय ' हा मंत्र त्याला दिला. मस्तकावर हात ठेवून नारद गेला. ' मंत्र हृदयभुवनीं प्रकाशला. ' उच्चार करितां त्याला त्रिभुवन ठेंगणें झालें. ' आठवे गोविंद माधव अच्युत. ' कनवाळु देव भक्ताच्या धांवण्या धांवला, त्यानें ध्रुवबाळाला सद्गदित होऊन पोटीं कुरवाळलें व ' वर माग ' ह्मणाला. ' नुठवी दुजी आई ' असा वर त्यानें मागितला ! देवानें ' अढळ ते पदीं स्थापियेला बाळ । जाहला जय जयकार तये वेळीं ! देव असा अनाथांचा नाथ आहे. ' एकाजनार्दनीं भक्ताचा अंकित । हांकेसरसा त्वरित उडी घाली. !

**न पाहेचि यातीकुळाचा विचार । धांवे सर्वेश्वर नामासाठीं ॥ १ ॥**
**आपुलेंचि नाम आपण वाढवी । भक्तपणा मिरवी आपणचि ॥ २ ॥**
**स्वयें अवतार आपणचि घेत । एका जनार्दनीं मात ऐका त्याची ॥३॥**

कठोपनिषदांत श्रेयः व प्रेयः ह्म० मोक्षमार्ग व विषयसुखाचा मार्ग असे दोन मार्ग सांगितले आहेत, त्यांत आत्यंतिक कल्याण ह्म० ध्रुवपद हें श्रेयोमार्गानें जाण्यानेंच प्राप्त होतें असें सांगितलें आहे. ध्रुव सुनीतीच्या ( श्रेयः ) पोटीं जन्म घेतो व सुरुचि ( प्रेयः ) त्याला आधी छळते. वरील कथेचा मेळ या श्रुतिवाक्याशीं बसतो.

( २ ) **प्रल्हादः**–हा दैत्य हिरण्यकश्यपूचे पोटीं जन्मला. ' सदा वाचे नारायण । छंद आन नाहीं दुजा ' यामुळें बापानें त्यासी वैराकार

मांडला. त्यानें त्याला चार मुलांसारखा विद्याभ्यास करायला सांगितलें. पण तो 'सकळ विद्यांचें जीवन। मनीं धरी नारायण.' पोर वाया चाललें!

'काय शिकलास बाळ!'—'नारायणावांचून मी कांहीं जाणत नाहीं!'

तो देहात्मबुद्धि म्ह० देहाला आत्मा मानणारा असुर. त्याला हें खपलें नाहीं. तो संतप्त झाला! प्रल्हादाच्या आईनें सांगितलें कीं 'बाळ! वडिलांचें ऐकावें.' प्रल्हादाचें एकच उत्तर—

**सर्वविद्यांचा जो धनी। मोक्षदानीं चिंतीतों।**
**मज आणिकांचें नाहीं काम। माझा सखा पुरुषोत्तम॥ १॥**
**नानापरी दूत मारिती निष्ठुर। शस्त्रांचें दुस्तर घाय हाणिती।**
**अग्नींत घालिती पाणिये बुडविती। ढकलोनि देती पर्वतशिखरीं॥**
**विषादि पाजिती पुरीं ढकलिती। परि निर्भय तो चित्तीं घेत नाम॥४॥**
**एका जनार्दनीं रक्षी नारायण। कोण करी विघ्न तया भक्ता॥ ५॥**

'सांग सांग तुझा देव कोठें आहे तो?

**'जळीं' स्थळीं काष्ठीं भरला। व्यापुनी राहिला दिशाद्रुम'॥**

हिरण्यकश्यपूनें खांबावर लाथ मारिली तों 'स्तंभीं नरहरी प्रगटला' व त्यानें—मांडीवर दैत्याला आडवे घेतले. 'हृदयीं विदारिला हस्तनखीं.' भक्तांचें रक्षण केलें.

**"स्तंभ फोडीत कटकट। दाढा व्यंकट विकट।**
**उद्भट वीर विकट। नर केसरी॥ १॥**
**जिव्हा लळलळीत लटलट। घुरघुरीत कंठ।**
**श्वासें नासापुढें उतट। पिंगट जटाजूट दाट॥ २॥**
**वाण सणसणाट। वज्र दणदणाट। नखें तिखें तिखट बोट।**
**रागें फोडी पोट रे॥ ३॥**
**हात तट सुभट भट। नेत्र गरगराट। चंद्र सूर्य गरगराट रे॥ ४॥**
**शब्द कटकट। साधनीं कष्ट फुकट।**
**एकाजनार्दनीं नामें वैकुंठपीठ रे॥ ५॥**

ह्या वीररसान्वित पद्यावरून समर्थांना वीरभाटीव अश्वधाट्या रचाव-
याची स्फूर्ति झाली असेल काय ?

( ३ ) **बाळमित्र सुदामा—** दोघे बाळमित्र सांदीपनीगुरूच्या घरीं विद्याभ्यासार्थ होते. 'बाळपणीं खेळले खेळ। विद्या सकळ गुरुगृहीं'. पुढें दैवगतीनें कृष्ण द्वारकेचे राजे झाले, त्यांच्या पायाशीं लक्ष्मी आली व सुदामा दरिद्रीच राहिला. दुष्काळ आला, 'न मिळे कोणाला धान्यकण' सुदामा दैन्यवाणा झाला. कन्यापुत्र उपवासी मरूं लागले. वस्तीला कोणी ठाव देईना, 'दुर्बळ म्हणोनि उपहासिती.' त्याच्या स्त्रीनें सुचविलें कीं तुमचा बाळमित्र द्वारकाधीश आहे, त्याला भेटावें म्हणजे दारिद्य जाईल. 'देव द्विज गुरु या तिघांचें दरुशन। रिक्त हस्तें जाण न घ्यावें' असा विचार करून त्यानें शेजारणीकडून तीन मुठी पोहे घेतले व एका चिंधींत ते बांधून ती पुरचुंडी बरोबर घेतली व सुदामा कृष्णभेटीस निघाला. निघतांना शकून चांगले झाले. राजद्वारीं आला. 'मी कृष्णाचा बंधु आहे' म्हणून यानें सांगितलें, पण याचा दरिद्री वेष पाहून द्वारपाळ उपहासानें हंसू लागले ! श्रीकृष्णाला कळतांच 'उठोनि सत्वर धांवे आलिंगना। वैकुंठीचा राणा लवलाहें.' श्रीकृष्णानें त्याला सिंहासनावर आणून बसविलें, त्याचा पूजासत्कार केला, वस्त्रालंकार देऊन क्षेम विचारलें. त्याच्या मुख्य अष्ट नायिकांची मांदी ( समुदाय ) मिळाली. त्यांनीं त्याला अभ्यंगस्नान घातलें. कृष्णपंक्तीचें सुग्रास भोजन झालें. 'वहिनीनें आम्हां काय धाडियेले' असें कृष्णानें विचारलें. पोहे दृष्टीस पडतांच एक मूठ देवानें तोंडांत घातली. हा उदारांचा राणा याला मोबदल्यांत त्रैलोक्याचें राज्य देईल हें भीमकीनें जाणलें—'म्हणोनी विनोदें धरीतसे हात। मुखीं एक ग्रास घालितांची'॥ आम्हांसी तों कांहीं प्रसाद जी द्यावा। खूण ती केशवा कळली मनीं.' इकडे एक महिन्यांत देवानें द्वारकेसारखीच सुदामपुरी निर्मिली व सुदामदेवास स्वगृहीं जाण्याची अनुज्ञा दिली. 'पूर्ववत् प्रेमा असो द्यावा' असें प्रेमानें विनवून निरोप दिला. रुक्मिणीनें सुदाम-

देवाचीं पहिलीं जीर्ण वस्त्रें आणून त्याच्यापुढें टाकली ! तीं परिधान करून व तेथले वस्त्रालंकार तेथेंच ठेवून सुदामजी परतले ! 'आम्हांसी तों पूर्ण दरिद्र भोगणें । तेथें नारायणें काय कीजे ' असा विचार करीत व 'काय प्रारब्धासी करील कृष्ण ' असें म्हणत सुदामजी स्वग्रामीं आले. तों तेथें त्यांना काय दिसलें ? दुसरी द्वारका ! सुदामपुरींचे प्रधान व सेवक दूत सामोरे आले व समारंभानें त्यांनीं सुदामजीस नेऊन राज्यावर बसविलें. 'तुष्टला नारायण दिल्ही सुवर्णनगरी । द्वारकेसम पुरी पोह्यांसाठीं ! ' भक्ताचे मनोरथ पुरविणारा वैकुंठनाथ—त्यानें 'राज्यार्धाश केला अंकिचन. ' ह्या भक्तकथांचे उल्लेख ज्ञानेश्वरकालीन संतांच्या अभंगांत व खुद्द ज्ञानेश्वरींत आहेत पण नाथांनीं त्या संक्षेपानें सोप्या भाषेनें वर्णिल्या आहेत.

मराठी भाषेंत संतचरित्रकार म्हणून गाजलेले दोन पुरुषः एक उद्धवचिद्घन व दुसरे महिपति. या दोघांच्याही पूर्वी नाथांनीं संतचरित्रें गाण्याचा प्रकार सुरु केला. नामदेवांनीं ज्ञानेश्वरांचें चरित्र 'आदि ' आणि 'समाधि ' ह्या प्रकरणांत पूर्वी लिहिलें होतें हें खरें, पण अनेक संतांच्या चरित्रांत प्रसिद्ध असलेल्या गोष्टी मिळवून अगर संकलित करून त्या गाण्याचा प्रघात नाथांनीं पाडला व पुढच्यांस उदाहरण घालून दिलें असें म्हणण्यास हरकत नाहीं ! नाथ स्वतः भागवतधर्मी, पंढरीच्या विठ्ठलाचे उपासक व वारकऱ्यांचे अग्रणी असल्यामुळें त्यांनीं पूर्वी होऊन गेलेल्या संतांचें सप्रेमभरित गुणानुवाद गायिले आहेत. निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव, मुक्ताबाई, नामदेव, गोराकुंभार, सांवतामाळी, चोखामेळा व दामाजीपंत ह्या नवरत्नांची चरित्रमाळ त्यांनीं गुंफिली आहे व त्या माळेंत सुमारें २०० वर अभंगपुष्पें आहेत. ह्या नावांच्या चरित्रांची, अभंगवाणीची व कार्याची ओळख पहिल्या खंडांत आपण करून घेतलीच आहे. ह्या पूर्वजसंतांचें रिण नाथांनीं पूज्यबुद्धीनें व विनयप्रेमानें फेडलें. चारच अभंग पहा.

(१) कैवल्याचा पुतळा। प्रगटला भूतळा। चैतन्याचा जिव्हाळा। ज्ञानोबा माझा ॥१॥ ज्ञानियांचा शिरोमणी। वंद्य जो कां पूज्यस्थानीं। सकळांसीं शिरोमणी। ज्ञानोबा माझा ॥ २ ॥ चालविली जडभिंती। हारली चांगयाची भ्रांती। मोक्षमार्गाचा सांगाती। ज्ञानोबा माझा ॥ ३ ॥ रेड्यामुखीं वेद बोलविला। गर्व द्विजांचा हरिला। शांतिबिंब प्रगटला। ज्ञानोबा माझा ॥४॥ गुरुसेवेलागीं जाण। शरण एकाजनार्दन। चैतन्याचें जीवन। ज्ञानोबा माझा ॥ ५ ॥

(२) धन्य धन्य नामदेव। सर्व वैष्णवांचा राव ॥ १ ॥
प्रत्यक्ष दाविली प्रचीत। वाळुवंटीं परीस सत्य ॥ २ ॥
कवित्व केलें शतकोटी। तारिले जीव कल्पकोटी ॥ ३ ॥
देव जेवीं सवें। ऐसी ज्याची देवा सवे ॥ ४ ॥
धन्य धन्य नामदेवा। एकाजनार्दनी चरणीं ठेवा ॥ ५ ॥

(३) खुर्पूं लागे सावत्यासी। न पाहे यातीसी कारण ॥ १ ॥
घडी मडकें कुंभाराचें। चोखा मेळ्याचीं ढोरें वोढी ॥ २ ॥
सजन कसायाचें विकी मांस। दामाजीचा दास स्वयें होत ॥३॥
एकाजनार्दनीं जनीसंगें। दळूं कांडूं लागे आपण ॥ ४ ॥

(४) चोखयाची भक्ति ऐसी। प्रेमें आवड देवासी ॥ १ ॥
ढोरें वोढी त्याचे घरीं। नीच काम सर्व करी ॥ २ ॥
ऐसी आवड भक्ताची देखा। देव भुलले तया सुखा ॥ ३ ॥
नीच याती न मनीं कांहीं। एकाजनार्दनी भुलला पाही ॥ ४ ॥

नववें भक्तरत्न ‘ दामाजीपंत ’ यांच्याविषयीं अन्यत्र लिहिलेंच आहे.

---

## १२ जिवाजीपंत व आत्मारामपंत यांचा पत्रव्यवहार (गद्य).

(१) आशीर्वादपत्रः—“ चिरंजीव जिवाजीपंत ठाणेदार, वास्तव्य देहपूर, यांसी आत्मारामपंत यांचा आशीर्वाद, पत्र लिहिणें कारण जे तुम्हांस देहगांवची सनद शंभर वर्षांची देऊन पाठविले। कलम तपसील

गांवची आबादी ( संमृद्धी ) करावी. १ कामक्रोध हे रयत त्यांचें ऐकूं नये. २ आशामनशा ( मनीषा ) यांची संगत धरूं नये. ३ सदा स्वधर्मे वागणूक ठेवणें. ४ शांतिक्षमादया असों देणें. ५ ज्ञानवैराग्य-भजनपूजनीं आदर ठेवणें. ६ । हीं कलमें कबूल होऊन तुम्हांस रवाना केलें । तुम्ही तों तें विसरून सदरीचे कलमांस न अनुसरून वाईट वागणुकीचा रस्ता काढला तो तुम्हांस परिणामीं बाधक होईल । सावध राहणें । एकाजनार्दनी शरण हें आशीर्वादपत्र ॥ "

( २ ) **अर्जदास्तः**— अर्जदास्त ( विनंतिपत्र ) अर्जदार बंदगी बंदेनवाज ( बंदगी म्ह० सेवा, सेवेसी ) बंदेनवाज ( नवाज = स्वामी, पोशिंदा ) आलेकम् सलाम ( अरबी- तुम्हांस सुखशांति लाभो ) । कायापुरीकर जिवाजीपंत सुभेदार । बुधाजीपंत फडणीस । परगणे शरीराबाद । सरकारची रजा घेऊन निघालों तों स्वार होऊन किल्ले कायापूर येथें येऊन दाखल जालों ! दरोबस्त अंमलदार सरकार कामास वाकब ( माहितगार, तत्पर ) नव्हते । ऐसियास कायापुरांतील उखडे रुजू झाले ( उखडून गेलेले, उधळलेले कामगार कामावर परत आले ) सरकारचे पुढारी लोकः दंभाजी शेटे, कामाजीराव महाजन, मनाजीराव देशमुख, ममताई देशमुखीण, रसनाई पाटलीण, केसाजीपंत कुळकर्णी, जराजीराव देशपांडे-हे फार हरामजादे आहेत. कचेरींत जोम धरून बसतात । सरकारचें काम सुरूं होऊं देत नाहींत । **दंभाजी शेटे** यांनीं संतबाजारांतील भावाचा बिघाड केला. आयुष्यधान्याचें माप शुद्ध भरीत नाहींत । बालपणांत क्रीडा, तारुण्यांत स्त्रीसंग, वृद्धपणीं चिंता याप्रमाणें माया चालू केली । भस्म, रुद्राक्षमाळा, पादुका, जटावल्कलें, कंथा, दंडकमंडलु, यांचा मात्र सुकाळ केला पण त्यायोगें खरा परमार्थ बुडाला व देहाभिमान वाढविला । कामाजीराव महाजन याणें आपलें पांच बंधु ( पंचबाण ) सरकारी रिसाल्यावर ( पलटणीवर ) ठेविले. त्यांतील भ्रम, हट्ट, द्वेष, अधैर्य, साहस, अविवेक, असत्य, कौटिल्य, परोत्कर्षा-

सहनत्व हे बार्गीर हाताखालीं घेऊन तपस्वीव्रती नागविले. विवेकाचें ठाणें उठविलें. योग, तप, जप, ध्यान, अष्टौसमाधि, चतुर्विधपुरुषार्थ कायापुरींतून बाहेर घालविले । व्यभिचाराचा गोंधळ फार केला । मनाजीराव देशमुख आपले मतें परस्पर कारभार करितात त्यायोगें प्रजा आपापला धर्म विसरल्या । ममताईनें संपूर्ण परगणा जर्जर केला सर्व लोक मायाजाळांत गुंतविले । रसनाई पाटलीण इणें खाण्यावर नजर दिली आहे । केसोपंत काळे कुळकर्णी, जराजीराव देशपांडे यांनीं आपल्या जातींत फितुर केला, काळ्याचे पांढरे झाले आणि पांढरीचा वसूल करविला !... ... ... ... नवज्वर चोपदार हुजूर न्यावयाची उतावीळ करितो । हुजूर यावे तर परगणे मजकूराचा कांहीं वसूल झाला नाहीं । यमाजीपंत पुरसीस( विचारणा )करितील या धास्तीनें उगाच बसलों । आम्हांस तर सरकारच्या पायांवेगळा आश्रय नाहीं हजार अन्यायी । याजवर बुधाजीपंताचा अर्ज कीं, रयत बिघडल्यामुळें या त्रासानें जीवाजीपंत निघून जाण्याचे बेतात आहेत त्यास सरकारनें ब्रह्मपुरींत रहावयास जागा द्यावी । बंदगी रोशन ( सेवेसी श्रुत ) होय ! एका जनार्दनी अर्जदास्त ।

( ३ ) **अर्जाचा जाब** ( उत्तर ):— क्षत्रियकुलवतंस श्रीअयोध्याधीश राजाराम छत्रपति अनंतब्रह्मांडनिवासी राजे श्रीजीवाजीपंत सेखदार मौजे देहगांव तालुके अष्टपुरी मामले पांचाळेश्वर यासी आज्ञापत्र । मौजे मजकूरचा वाका ( हकीकत ) लिहून कळविला । तेथें लिहिलें कीं मनाजीराव देशमुख पुंडपाळेगार मिळून गांव मारतात, वसाहत होऊं देत नाहींत, ब्रह्मपुरीचा मार्ग चालू देत नाहींत । तरी मनाजी देशमुख याजला तंबीब ( शिक्षा, तसदी ) पोंचवावयास सरकारांतून सुभे रवाना झाले । बितपशील ( सविस्तर ) कलमः आत्मा विवेक, प्रधान स्वानुभव, सैन्याधिपति प्रबोध, आदिकरून रवाना केले आहेत । हे पुंडपाळेगार ठार मारतील ब्रह्मपुरीचा मार्ग चालू लागेल । तुम्ही खातरजमा ( खात्री, समा

धान ) राखून साहेबकामास रुजू ( तत्पर ) राहणें । निजानंदीं रंगून राहणें । एकाजनार्दनी शरण बहुत काय लिहिणें । जाबचिठ्ठी ( Memo ).

( ४ ) **कौल** (आश्वासन, अभयवचन):—' हा कौल सावध ऐका । तत्वमासि धन्याचा शिक्का । सांडोनि अवघा धोका । दुःखशोकासहित ॥'— दीनानाथ पतीतपावन अशा धन्याचा हा कौल आहे–' पतित पापी अवघे यावे । सुखें नांदावे स्वानंदेसीं ' म्हणून हा कौल पुण्यवंत व पापी सर्वांसच दिला जात आहे ! संचिताक्रियमाण, पापपुण्य, आरंभापासून आजतागाईतचें सर्व माफ केलें आहे ! ' कलियुग देखोन अवघीं भ्यालीं हें पाहून संतांनीं जीवांस धीर दिलाच आहे. ' यमनियम विधिनिषेध । हा तुम्हांसी न लगे बाध । नामकीर्तनीं अगाध । सुखें स्वानंद भोगावा ॥ ९ ॥ विवेकाचा नांगर धरा । ठकेल ( साधेल ) तितका कुणबावा करा । लहानथोर वाहवा ( वहिवाट ) बरा । कौल मस्तकीं धरूनी ॥ चारी वर्ण चारी आश्रम । याच देहीं उत्तम मध्यम । हृदयीं धरूनियां प्रेम । नामस्मरण करा ॥ साळी माळी तेली तांबोळी । बारा बलौते तराळ ( चूल सारवून भांडीं घासणारे नौकर ) कोळी । चांभार कुंभार सर्वकाळीं । नामावळि गर्जा रे ॥ स्त्रिया शूद्र बाळमती । अवघे नाम धरूनि चित्तीं । हा कौल दिला श्रीगुरुमूर्ती । यशकीर्ति संपादा ॥ शिक्का धरूनियां शिरीं । यमासी ठेवा धाब्यावरी । तुह्मावरी करितां गहजोरी ( जुलूम ) । त्यासी शासन होईल ॥ एका जनार्दनीं नामधार । त्यासीच आनंद निर्विकार । संतीं केला जयजयकार । कौलविचार जाणोनी ॥ "

---

# १० उपासना– देव, भक्त आणि नाम.

## १. देव निर्गुण आहे, सगुण आहे व मूर्तींतही आहे.

परमात्मा निर्गुणसगुण ह्म० उभयरूप आहे व त्याला अधिकारपरत्वें भजावें हा भागवतधर्माचा दंडक आहे. सामान्य जीवांना निर्गुणबोध नसतो, त्यांना प्रतिमापूजनाशिवाय मार्गच नाहीं. मन, बुद्धि व इंद्रियें यांना अगोचर असा देव सामान्य जीवांना आकळावा कसा? त्यांला देवाचें प्रतीकच समोर पाहिजे असतें. पांढरेपणाची कल्पना द्यायची असतांना पांढरें दूध, पांढरें फूल, पांढरा चुना, अशी कांहींतरी पांढरी वस्तु त्यांना दाखवावी लागते. वेदांत तरी सूर्य, चंद्र, वरुण, उषा, इंद्र इत्यादि मूर्तीवरूनच अमूर्ताच्या कल्पनेकडे धांव घेतलेली आहे. मूर्त आणि अमूर्त, व्यापक आणि व्याप्य, दोनीरूपानें एकच देव नटलेला आहे हें ज्ञान उपासनेच्या मार्गानेंच चांगलें होतें. सगुणाच्या निर्मळ व निश्चळ उपासनेनें निर्गुणबोध होतो. निर्गुणबोध व सगुणप्रेम दोनी पूर्णभक्ताला एककालीं अनुभवायला मिळतात. देवाची मूर्ति 'सुरेख सगुण' पाहून तिला भजावें अथवा ज्ञानदृष्टीनें पाहायचा अधिकार असेल तर 'निरसूनि रूपनामगुण। ध्यानीं ठसावे निजनिर्गुण' ह्म० निर्गुण ध्यानांत आणावें (अ. ३–३५१) अथवा 'सगुणमूर्ति नातुडे ध्यानीं। तरी भजावें प्रतिमेच्या स्थानीं' (अ. ३–५६९) याप्रमाणें यथारुचि व यथाधिकार देवाच्या सगुणमूर्तीला अथवा निर्गुणस्वरूपाला भजावें असें भागवतांत नाथांनीं स्पष्ट म्हटलें आहे. भागवतधर्मानें याप्रमाणें लहान-थोरांस उपासनेचा मार्ग दाखवून दिला आहे. अ० २१ मध्यें:—

**अंतरीं भोगी चैतन्यघन। बाहेरी उघाडितां नयन।**
**आनंदविग्रही श्रीकृष्ण। मूर्ति संपूर्ण सन्मुख ॥ ५२० ॥**

**म्हणे ' श्रीकृष्ण चैतन्यघन । चैतन्यविग्रही श्रीकृष्ण ।**
**सगुणनिर्गुणरूपें जाण । ब्रह्म परिपूर्ण श्रीकृष्ण ॥ ५२१ ॥**
**बाप भाग्य उद्धवाचें । सगुण निर्गुण या दोहींचें ।**
**सुख भोगितसे साचें । हें श्रीकृष्णकृपेचें महिमान ॥ ५२२ ॥**
**( एक० भाग० अ० २१ )**

निर्गुणप्राप्तींत संतोष मानणारा शिष्य भेटला तर गुरु त्याला निजात्मप्राप्ती जोडून देतात, व सगुणप्रेम पाहिजे तर तेंही देतात व उभयस्वरूपांचा आनंद भोगायची उत्कंठा असली तर तेंही पण देतात. उद्धवाला ही उत्कंठा होती. 'श्रीकृष्णकृपेस्तव जाण। फिटलें उद्धवाचें दुर्बळपण । सगुणनिर्गुण एक कृष्ण । हे खूण संपूर्ण बाणली' तात्पर्य भगवान् स्वतः सांगतात— ( एक० भागवत२५-३० )

**माझें स्वरूप निजनिर्गुण । अथवा वैकुंठींचें सगुण ।**
**दोन्ही एकचि निश्चयें जाण । सगुणनिर्गुण समसाम्य ॥**

सकाळ, संध्याकाळ व मध्यान्ह ह्या तीनही काळीं आकाश अलिप्त असतें, त्याप्रमाणें सृष्टीचे उत्पत्तिस्थितिरुप होत जात असून परब्रह्म ह्याहून अलिप्त आहे. ' जागृतीचें जाणपण । स्वप्नाचें मिथ्याभान । सुषुप्तीचा साक्षी पूर्ण । तो नारायण निश्चित ॥ एवं परमात्मा परंज्योती । आत्मा हृदयस्थ त्रिजगतीं ।' असें अधिकारी शिष्याला सद्गुरु सांगतात. 'परमात्मा ब्रह्ममूर्ती पूर्ण । तुझें हृदयीं नांदे आपण । ज्याचेनि मनबुद्धि प्राण । इंद्रियें जाण वर्तती ॥ नयनें तेणें तेजें देखणे । रसना तेणें स्वादें चाखों जाणें । श्रवण तेणें अवधानें । शब्दज्ञानें प्रबोधिती ॥ ' अहंकाराचा अहंभाव, मनाचें मन्तव्य, बुद्धीचें बोद्धव्य तें एक परब्रह्म आहे. मनबुद्धिवाचा त्याची कल्पना करूं शकत नाहींत, म्हणून त्याला निर्विकल्प ह्मणतात; तो मनबुद्धिवाचेला अगम्य आहे. 'थिल्लरा-आंतौता । बिंबोनि वेगळा नव्हे सविता । तेविं मनबुद्धिइंद्रियापरता । जाण तत्वता परमात्मा '

**जो जगाचे नयनाचा नयन। जो जगाच्या घ्राणाचें घ्राण।**
**जो जगाच्या श्रवणाचे श्रवण। रसनेची जाण रसना जो॥ ४-५१॥**
**ज्याचेनि प्राणें जाण। जगाचा चळे प्राण।**
**बळ तेज क्रियाचरण। जगासी संपूर्ण ज्याचेनी॥ ४-५४॥**
**ज्याच्या लीलाशक्ति अपरिमित। ऐशा अनंतशक्ति ज्याच्या नखांत।**

पर्जन्याच्या धारा, पृथ्वीचे दूर्वांकुर किंवा वाळवंटांतील वाळूचे कण कदाचित् कोणी मोजूं शकेल पण या परमात्म्याचे अनंत गुण, अनंत लीला, अनंत अवतार यांची गणना कोण करूं शकेल? तो निर्गुण आहे याचा अर्थ त्याचे गुण अनंत आहेत; तो अरूप व अनाम आहे म्हणजे त्याचीं रूपें अनंत, नामें अनंत आहेत; मग त्याच्याच एखाद्या रूपगुणाच्या ठिकाणीं—त्याला जाणून—रममाण होणें यापेक्षां जीवाला अधिक काय करितां येणार आहे? तोच निर्गुण व तोच सगुण, तोच नामरूपातीत व तोच नामरूपांत असें गीताभागवतांनीं त्याला वानिलें आहे. (एक. भाग. अ. ४)

सगुण आणि निर्गुण। उभयरूपें मीचि जाण। जैसें सुवर्ण आणि कंकण। तैसे अभिन्न जाण मद्रूपें' (अ० ११-११३८) असें आहे तरी सगुणभजन सुलभ आहे, ह्याविषयीं ११ व्या अध्यायातील ४६ व्या श्लोकावर टीका करितांना नाथांनीं फार गोड लिहिलें आहे. ते म्हणतात 'विघुरलें तें तूप होये। थिजलें त्यापरीस गोड आहे' पातळ तूप व घट्ट तूप दोन्ही एकच, तथापि कणी पडलेल्या घट्ट तुपाचे गोळे खायला अधिक गोड लागतात. त्याप्रमाणें निर्गुणसगुण एक असलें तरी सगुणभजन अधिक गोड आहे.

**निर्गुणाचा बोध कठिण। मनबुद्धिवाचे अगम्य जाण।**
**शास्त्रांसी न कळे ऊणखूण। वेदीं मौन धरियेलें॥ १४६०॥**
**तैसी सगुणमूर्ति नव्हे जाण। सुलभ आणि सुलक्षण।**
**देखतां जाय भूकतहान। निवताहे मन सप्रेमें॥ १४६२॥**

सच्चिदानंद परमात्माच लीलेनें सगुण झाला आहे. साखरेचीच खडी-

साखर होतें, पण खडीसाखर खायला अधिक गोड लागते ! सोन्याची लगड नववधूच्या गळ्यांत बांधली तर ती गोड दिसेल कां त्याच सोन्याचे अलंकार करून ते तिच्या अंगप्रत्यंगांवर चढविले तर ती गोड दिसेल? तसे निर्गुणनिराकार परमात्मा रामकृष्णादि सगुणरूपानें प्रत्यक्ष झाला म्हणजे धैर्य, शौर्य, औदार्य, प्रेम, वात्सल्य, दयालुता इत्यादि गुणालंकृत त्याची मूर्ति भजकाला किती तरी अधिक रम्य वाटून चित्ताची एकाग्रता त्याचे ठायीं होतें! 'घवघवीत घनसावळा। मुकुट कुंडलें मेखळा। कंठीं कौस्तुक वनमाळा। सोनसळा झळकत' अशा सगुण मूर्तीच्या डोळ्यांतलें तेज पाहून 'चिन्मात्रीच्या देखणेपणा' पेक्षाही अधिक आनंद होत नाहीं काय? नारायणाच्या अंगप्रत्यंगीं श्रुतिप्रतिपादित निर्गुणाचे गुण सर्व पाहून घ्यावेत. 'माझिये मूर्तीचेनि दर्शनें। होत डोळियां पारणें'–माझ्या दर्शनानें विषयवासना निवृत्त होतात, जन्ममरणाचा विसर पडतो, संसारही ब्रह्मरूप होतो.

**दीपकळिका हातीं चढे। तैं घरभरी प्रकाशु सांपडे।**
**माझी मूर्ति जैं ध्यानीं जडे। तैं चैतन्य आतुडे अवघेंचि ॥ १४९९ ॥**

अंधाऱ्या रात्रीं हातांत दिवा घेतला कीं घरभर हिंडाल तेथें प्रकाशच सांपडतो, त्याप्रमाणें ध्यानांत भगवन्मूर्ति एकदा भरली कीं सर्वत्र चैतन्यस्वरूप परमात्माच भरून राहिला आहे असा अनुभव येतो. 'ईशावास्यमिदं सर्वं' 'सर्वं खल्विदं ब्रह्म' ह्या श्रुतिवचनांचा अनुभव तेव्हांच येईल कीं ज्यावेळीं आपल्या हृदयांत ध्यानबलानें परमेश्वर प्रगट होईल !

**सर्वांगसुंदर श्यामवर्ण। ज्येष्ठ वरिष्ठ गंभीर गहन।**
**सुमुख आणि सुप्रसन्न। मूर्तीचें ध्यान करावें ॥ ८३ ॥**
**अंगप्रत्यंगीं ध्यानयुक्त। जडोनि ठेलें जें चित्त।**
**तें आवरूनि समस्त। चिंतावें निश्चित हास्यवदन ॥ ८४ ॥**

संपूर्ण मूर्ति नखशिखांत न्याहाळावी व मग मुखावरील हास्याचें किंवा चरणांचें ध्यान करावें. भागवतांत हे दोन्ही प्रकार सांगितले

आहेत, पण तुकोबादि बहुतेक भक्तांचें ध्यान चरणांचेंच होतें असें त्याच्या उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. ध्यानानें तन्मयता झाली कीं मीतूं-पणाचा भास निःशेष जाऊन अद्वयानंदाचें निजसुखच सर्वत्र कोंदाटतें.

**सकळा योगांचें योगगव्हर । वेदांत निजभांडार ।**
**सकळ सिद्धींचें परमसार । भक्ति साचार हरीची ॥९०॥(भाग०अ०१४)**

भगवंताचीं पूजास्थानें ११ आहेत. सूर्य, अग्नि, गायित्री, ब्राह्मण, वैष्णव, पंचभूतें इ०. दहावें पूजास्थान **अंतरात्मा:** 'हृदयीं भावूनि चैतन्यघन । स्वयें तद्रूप होवोनि जाण । मग जे भोग भोगी आपण । ते ब्रह्मार्पण सहजचि.' **सर्वभूतीं भगवद्भाव** हें अकरावें पूजास्थान: आपल्या अंतर्यामीं नांदणारा परमात्माच सर्व भूतांच्या हृदयांत नांदत आहे अशा श्रद्धेनें वागणें ही अखेरची पूजा होय. भूतांत उंच नीच न पाहणें व सर्व भूतांच्या ठायीं साम्य बुद्धि ठेवणें ही महापूजा होय. (अ० ११ ओवी १३२६ ते १४५५).

संपूर्ण भगवत्पूजाविधि भागवताच्या २७ व्या अध्यायांत सांगितला आहे. सर्व वर्णांना व जातींना पूजा करण्याचा अधिकार आहे. 'आपुले हृदयींचा चिद्घन । मूर्तीमाजीं कीजे आवाहन । पूजांतीं करूनि विसर्जन । हृदयीं जाण ठेवावा' 'देव होऊनि देव पूजिजे' किंवा 'शिवो भूत्वा शिवं यजेत्' 'पूज्यपूजक नाहीं दुजा' हें वर्म ध्यानीं धरून पूजा करावी. नाथांचें या अध्यायावरील विवरण उत्कृष्ट व सविस्तर आहे तें मूळांत पहावें. 'मीचि देवो मीचि भक्त । पूजाउपचार मी समस्त । मीचि मातें पूजितू । हे इत्यंभूत उपासना' (अ० २१-४९५).

पूजाध्यानासाठीं भगवन्मूर्ति नीट, ठसठसीत व अति सुरेख करावी. ती कृश नसावी, अधोमुख नसावी, रडकी दुर्मुख नसावी, मोदळी (लठ्ठ) व बुदगुली (ठेंगणी) नसावी. 'मूर्ति साजिरी सुनयन । सम सपोस सुप्रसन्न । अंगीं प्रत्यंगीं नव्हे न्यून । सुचिन्ह सुलक्षण सायुध' अशी असावी. सपोस म्ह० पुष्ट पण लठ्ठ नव्हे. 'पाहतां निवे तन मन ।

देखतां जाय भूक तहान । घवघवीत प्रसन्न वदन । कृपालक्षण सुकुमार ॥ जे देखतांचि जीवीं जडे । अतिशयें सर्वांसी आवडे । पाहों जातां निजनिवाडें । पूर चढे प्रेमाचा ॥ ईषत् दिसे हास्यवदन । अतिशयेसी सुप्रसन्न । ' ( भाग० अ० ११ ओवी १२८३ ते ९० ).

' माझ्या भक्तांची प्रतिमेवर भक्ति म्हणून मला त्यांच्या प्रेमासाठीं प्रतिमेंत प्रगट व्हावें लागतें. ' माझ्या प्रतिमांची भेटी । पाहो धांवे उठाउठी । पूजा करावया पोटीं । आवडी मोठी उल्हासें ' ( अ० ११ ओवी ११८७ ते ११९० ). मूर्तीमध्यें देव प्रगटतो असा नाथांनीं आपला अनुभवही सांगितला आहे. ' आतांही प्रत्यक्ष प्रमाण । दासाचेनि वचनें जाण । पाषाणप्रतिमे देवो आपण । आनंदघन प्रगटे पै ' ( अ० ७ ).

जाणत्यानेणत्यांना प्रतिमापूजनावांचून दुसरें कोणतें साधन आहे ? उपनिषदें व गीताभागवत कांहीं खेडोपाडीं लोकांच्या हातीं पडत नाहींत, मग खेडयांतले अडाणी लोकांत जे उपासनेचे प्रकार आहेत त्यांच्याकडे तुच्छबुद्धीनें न पाहतां, व त्यांची हेटाळणी न करितां, त्यांत आत्मभावानें मिळून जाणें व युक्तिप्रयुक्तीनें त्यांच्यांत व त्यांच्या उपासनादि प्रकारांत आत्मचैतन्य ओतून त्यांचा उद्धार करणें हेंच खऱ्या लोकनायकाचें काम नाहीं काय ? तें नाथांनीं उत्कृष्ट केलें आहे.

प्रत्येक देवतेचा उपासक आपल्या उपास्यदेवतेच्या ठिकाणीं मुख्य परमात्म्याचेच गुण आरोपित करीत असतो व यामुळें कोणत्याही नांवानें व रूपानें भजले तरी एकाच मुख्य देवाला सारी पूजा पोंचते. ' अनेकीं सदा एकदेवासि पाहे ' हा न्याय सर्वमान्य असल्यामुळें उपास्यें अनेक भासलीं तरी मूळांत सर्व एकच आहेत. त्यामुळें उपासकांत तीव्र मतभेद फारसे उत्पन्न न होतां सर्व सनातनी हिंदु एकत्र गुण्यागोविंदानें नांदत आहेत. आम्ही निर्गुणाला मानतों व सगुणालाही मानतों, द्वैत खरें व अद्वैतही खरें; आम्ही एकेश्वरमताचे आहोंत व

अनेक देवांनाही मानणारे आहोंत; मूर्तिपूजा आम्ही मानतों आणि मानीतही नाहीं; या विरुद्ध भासणाऱ्या गोष्टींची एकवाक्यता ज्याला करितां येतें त्यालाच हिंदुधर्माचें खरें रहस्य कळलें असें म्हटलें पाहिजे! अशा समन्वयदृष्टीनें सर्व संतांनीं आपल्या देवधर्माकडे पाहिलें आहे व म्हणून मूर्तिपूजेंतही त्यांना ब्रह्मसुख भोगतां आलें. दगडांत देव नाहीं असें त्यांनीं म्हटलें आहे, पण उपास्यमूर्तींच्या भजनपूजनांत त्यांना ब्रह्मानंदही मिळाला आहे. परमात्मा हृदयस्थ आहे, सर्व भूतांत आहे, सर्वव्यापी आहे, अवघें ब्रह्मरूप आहे, असें ज्यांना अनुभवानें कळलें तेच पुन्हां विचारतात कीं देव सर्वव्यापी आहे तर तो मूर्तींत कसा नाहीं? सर्वव्यापी देव मूर्तींत मात्र प्रगट व्हायला भितो असें कसें होईल? तस्मात् पंचभूतापलीकडचा देव पंचभूतांतही आहे म्हणून त्याच्या सगुणरूपाचें प्रेम त्याच्या मूर्तींत अनुभवणें काय वावगें आहे? नामातीत देव नामानें आकळतो, तसा रूपातीत देव एखाद्या रूपाच्या भजनानें प्रतीत कां न व्हावा? देव नामरूपाला आल्यामुळें जगाला सोपा झाला आहे. अव्यक्त, अचिंत्य, अनाम, अरूप, अगुण देव ज्यांना ज्ञानध्यानबळानें आकळेल त्यांनीं तो तसा आकळावा, पण ज्यांना वेदोपनिषदें कळत नाहींत, संस्कृत येत नाहीं व बुद्धीचें बळ नाहीं, मनानें पूजा करितां येत नाहीं व चिंतन साध्य नाहीं त्यांनीं तो तसा 'वरिष्ठांचा' देवच अमुक नामरूपांत आम्ही पाहणार व पूजणार असा प्रेमाग्रह धरिल्यास काय बिघडतें? अरूप रूपाला येऊनच सृष्टि झाली आहे, मग उलट रूपांत अरूप पाहणें यांत चुकतें कोठें? रूप-अरूप, नाम-अनाम, गुण-अगुण यांना व्यापून राहणारा एक देवच आम्हीं जाणते-नेणते आपापल्या अधिकाराप्रमाणें, भावनेप्रमाणें, कल्पनेप्रमाणें भजत असतों.

---

## २ उपासनाप्रेम.

श्रीकृष्ण हे भागवतधर्माचें मुख्य दैवत आहे. ज्ञानेश्वरनाथतुकोबादि सर्व वारकरीसंतांनीं श्रीकृष्णाचीच उपासना वाढविली. सगुणोपासनेनें आरंभ करून सगुणनिर्गुण एक किंबहुना सगुणनिर्गुणातीत परब्रह्म हें एकीएक उपास्य आहे व तेंच सर्वत्र भरून उरलें असून आपणासगट तेंच एक सत्य आहे या अनुभवाला पोंचायचें असतें. सायुज्यता 'मुक्ति' किंवा नाथांच्या प्रेममय भाषेंत बोलायचें म्हणजे 'मुक्तीवरील भक्ति' हें साध्य साधेतोंपर्यंत जीव साधकदशेंतच असतो, मग महाप्रळयांबुनिधींत नदनद्या मिळून जातात त्याप्रमाणें उपास्यउपासक, गुरुशिष्य किंवा देवभक्त शेवटीं एकरस होतात! उपासनेनें हेंच साधायचें असतें, व यास सच्छास्त्रश्रवण, गुरुसेवा, सत्संग, नामस्मरण ह्या साधनांचा साधकास अवलंब करावा लागतो. पुढें पुढें हीं साधनेंच साध्यरूप होऊन जातात. उपासना (उप + आसन) म्हणजे परमात्म्याच्या संगतींत, चिंतनांत, अनुसंधानांत अखंड असणें. देव, संत व नाम ही त्रयी भागवतसंप्रदायांत महत्त्वाची आहे व कोणाही संताची गाथा पाहिली तरी या त्रयीवरच प्रत्येकाचे अभंग आहेत. नाथांच्या अभंगाच्या गाथेंत या तिघांवर तीन हजारांवर अभंग आहेत. त्यांचे कृष्णचरित्रावर म्हणजे बाललीलेवर लहान मोठे ३०० अभंग आहेत. कृष्ण म्हणजेच विठ्ठल. विठ्ठल व पंढरी यावर ४००, नामस्मरणावर ७८ शें व संतमाहात्म्यावर ५१६ शें अभंग आहेत. म्हणजे उपासनेच्या 'देव, भक्त आणि नाम' या तीन मुख्यांगांवर दोन हजारपर्यंत अभंग आहेत. कित्येक पदें आहेत. याशिवाय अनेक भारूडें आहेत. आरत्या आहेत. आत्मस्थिति व ब्रह्मज्ञान यांवर ५०० अभंग आहेत. शिवाय त्यांच्या भागवतांत व रामायणांत नाम व संत यावर अनेक ठिकाणीं नाथांनीं आपले विचार प्रगट केले आहेत. त्या सर्वांचें ह्या प्रकरणांत अतिसंक्षेपरूप दाखविण्याचें योजिलें आहे. पहिल्या खंडाच्या ४ थ्या प्रकरणांत मूळ

भागवताचें व विशेषतः दशमाचें म्ह० कृष्णचरित्राचें स्वरूप दाखविलेंच आहे, म्हणून येथें त्याविषयीं विशेष विवेचन न करितां नाथांच्या वाणीनें कृष्णस्वरूपाचें व कृष्णचरिताचें मनोहर गायन आपण ऐकूं. नाथांचे कांहीं अभंग, बरींचशीं पदें, विशेषतः त्यांच्या गौळणी, कांहीं आरत्या आजही वारकरीमंडळांत मोठया प्रेमानें गाइल्या जात आहेत. नाथांची सर्वच कविता अध्यात्मतंतूनें विणलेली असते हें विसरूं नये.

---

## ३ श्रीकृष्णावतार

' श्रावण वद्य अष्टमीसी । रोहिणी नक्षत्र ते दिवशीं । बुधवार परियेसी । कृष्णमूर्ति प्रगटली.' अर्वाचीन ज्योतिर्विदांनींही श्रीकृष्णजन्माचा हाच काल दिला आहे. चिंतामणराव वैद्यांनीं शकपूर्व ३२६३ व्या वर्षी श्रावण वद्य ८ स रोहिणी नक्षत्रावर मध्यरात्रीं श्रीकृष्णाचा जन्म झाल्याचें सिद्ध केलें असून त्या दिवशीं बुधवार होता असें गणितावरून काढलें आहे. नाथांनींही बुधवार होता असेंच म्हटलें आहे ! पंढरपुरास बुधवार हा विठोबाचा दिवस मानतात व कोणीही वारकरी बुधवारीं पंढरीहून आपल्या गांवीं जायला निघत नाहीं. पंढरपूर हें भक्तभाविकांचें माहेर आहे व यावरूनच मुली माहेरहून बुधवारीं सासरीं जात नाहींत हा प्रघात पडला असला पाहिजे. यासंबंधीं ' जाशील बुधीं तर येशील कधीं 'ही म्हणही प्रसिद्ध आहे. पंढरपूरचा संप्रदाय पाडणाऱ्या मूळ प्रवर्तकांस श्रीकृष्णजन्माचा दिवस बुधवार होता हें माहीत होतें असें यावरून दिसतें ! असो श्रीकृष्णाचा अवतार होऊन आज श. ३२६३ + १८५७ = ५१२० वर्षें झालीं ! श्रीकृष्णास आया दोन व बापही दोन. ' देवकिये उदरीं वाहिला । यशोदे सायासें पाळिला ' असें ज्ञानोबारायांनीं म्हटलें आहे. वसुदेवास बायका दोन, एक रोहिणी व दुसरी देवकी. देवकी ही मथुरेचा राजा उग्रसेन याचा भाऊ देवक त्याची मुलगी म्ह० कंसाची चुलत बहीण. रोहिणीच्या पोटीं बलराम

जन्मले व देवकीच्या उदरीं कृष्ण आले. कंसानें आपला बाप उग्रसेन यास कैदेंत टाकून व वसुदेवास मथुरेस त्याच्याच वाड्यांत नजरकैदेंत ठेवून मथुरेचें राज्य बळकावलें होतें. ज्या जागीं श्रीकृष्ण जन्मले ती जागा मथुरेस अद्याप पाहण्यांत येतें. तेथें आतां वसुदेवदेवकीच्या मूर्ति एका मंदिरांत बसविलेल्या आहेत. मथुरा ही यमुनेच्या कांठींच वसलेली असून गोकुळ, मथुरा, वृंदावन, गोवर्धन हीं सर्व स्थानें रमणीय आहेत. ह्या साऱ्या ८० मैलांच्या पुण्यभूमीस व्रजभूमि म्हणतात. एरव्हीं अफाट वाहणारी यमुना ह्या व्रजभूमीपुरती शांत व गंभीर आहे ! ही सर्व भूमि रामकृष्णांच्या बाललीलांनीं पावन झालेली आहे. बलराम श्रीकृष्णाहून सहाच महिन्यांनीं वडील होते. ते गोकुळांत नंदगृहीं अगदीं प्रथम-पासून एकत्र वाढले व परस्परांचें बंधुप्रेम अपरंपार होतें. श्रीकृष्णांनीं कंसचाणूरादिकांस आपल्या वयाच्या १८ व्या वर्षी मारिले व उग्रसेनास मथुरेच्या राज्यावर बसवून आपण यादवांसह पश्चिमेस समुद्रतीरीं गेले, तिकडे द्वारकानगरी वसविली व २५ व्या वर्षी रुक्मिणीशीं विवाह केला. बळराम गोरे होते. ते नीलवर्णाचें वस्त्र वेष्टीत व वयांत आल्या-वर त्यांनीं नांगर ( हल ) हातीं वाहिला म्हणून त्यांस हलधर म्हणत. कृष्ण श्यामसुंदर असून पीतवस्त्र नेसत. श्रीकृष्णांनीं पौगंडदशेंत आल्यावर कंसास मारिले. सात वर्षांपर्यंत बाल्य, चौदा वर्षांपर्यंत कौमार्य व एकवीस वर्षांपर्यंतच्या दशेला पौंगडदशा म्हणतात. पहिल्या १८ वर्षांच्या कालांतील कृष्णचरित्राचाच निदिध्यास भरतखंडांतील साऱ्या कृष्णभक्तांस असतो. भारतीयुद्धाचे वेळीं श्रीकृष्णांचें वय ८३ होतें व त्यांचें निर्याण भागवताच्या मतें १२५ व्या वर्षी, व ज्योतिष्यांच्या मतें १२० व्या वर्षी झालें. भक्तांच्या मतें भगवान् श्रीकृष्ण हे 'आल्या-गेल्यांतले' नसून अखंड एकाकार आहेतच. 'कृष्णें देह नेला ना त्यागिला । तो लीलाविग्रहें संचला । निजभक्तध्यानीं प्रतिष्ठिला । स्वयें निजधामा गेला निजात्मयोगें' ( एकनाथी भागवत अ० ३१-१५५ ).

## ४ कृष्णाच्या बाललीला.

कंसाच्या बंदिशाळेंत असतांना देवकीला डोहळे लागले. ‘ मेळवूनि लेंकुरें खेळ खेळावा साकार ’ ‘ उचलावा महागिरी ’ ‘ जळीं रिघून भवसर्प ( कालिया ) नाथावा ’ ‘ कंसादिक वीर । त्यांचा करावा संहार ’ अशा प्रकारचे हे डोहळे होते; ‘ एका जनार्दनीं डोहळे संपूर्ण । पुरवी नारायण वासनेचे. ’ देवकी गर्भाचा विचार करूं लागली तों ‘ सबाह्य अंतरीं । व्यापक श्रीकृष्ण ’ तिला दिसूं लागला. ‘ चित्प्रकाशासी डोहळे । सद्रूप सोहळे । आनंद कल्लोळें । गर्भु वाढे ! ’ ‘ स्वस्वरूपस्थिति । सुखरूप प्रसूती ’ झाली. हा आठवा पुत्र कसा वांचेल याची देवकीला चिंता लागली. ‘ तंव न दुखतांच पोट । वेण न लागतां उद्भट । कृष्ण जाला प्रगट । स्वयें अयोनिया. ’ तें निजतेजें तेजाळ असें बाळ पाहून ती ‘ मोहें आच्छादूं जाय त्यासी । तंव प्रकाशू तियेसी आवरेना. ’ हें तान्हें गोकुळीं न्या असें तिनें वसुदेवास सांगितलें. वसुदेव म्हणाला कीं ‘ परब्रह्म आमचे घरीं आले असतांना आतां ( अहं ) कंसाचें भय कोण बाळगणार ? ’ वसुदेव भगवंताचें स्वरूप पाहतच राहिला. ‘ कमळवदन हरी । कमळनेत्रधारी । लीळाकमळें करीं । झेलीतसे ॥ करकमळीं कमळा । सेवीं चरणकमळा– ’ असा तो सगुणनिर्गुण हरि पाहून वसुदेवाचें देहभान हरपलें. पण देवकीनें त्याला भानावर आणलें. ती म्हणाली ‘ मज मायेची बुद्धि ऐसी । म्यां आच्छादिलें श्रीकृष्णासी ’ वसुदेवानें उत्तर केलें ‘ मूढे ! कृष्णरूपच सर्वभर आहे, येथें माया कोठची ? ’ असा तो प्रकृतिपुरुषांचा संवाद झाला. देवकीनें या अयोनिसंभव बाळाला आधीं गोकुळांत न्या, मला कंसाचें भय वाटतें, असा तगादा लावला. ‘ कृष्ण न्यावा गोकुळा । पायीं स्नेहाच्या शृंखळा. ’ वसुदेव कृष्णास घेऊन चालले तो रक्षणाइतें ( पहारेकरी ) होते ते कृष्णाची अंगशोभा टकमक पाहतच राहिले ! ‘ तीरा आणिला श्रीकृष्ण । हरिखें यमुना जाली पूर्ण । चढे स्वानंदजीवन । चरणवंदनार्थ ! ’ कृष्णास

घेऊन वसुदेव यमुनेंतून माझ्या कृष्णाचें रक्षण करा अशी कुलदेवतांची प्रार्थना करीत चालला! 'हातीचा कृष्ण विसरून । देवदेवतां होतो दीन । मोहममतेचें महिमान । ऐसें आहे!' नंदाच्या स्वाधीन कृष्णास करून वसुदेव परत मथुरेच्या बंदिशाळेंत आला. कृष्णाला मागें सांडून येतांच पंचमहाभूतें त्याच्या पाठीस लागलीं व (अहं) कंसाच्या बंधनांत तो पुन्हां अडकला! कृष्ण हातीचा गेला व मायेनें आरोळी फोडली तेव्हां कंसादि असुर दचकले. 'परासी मारितां जाण। मारित्या मारी मरण' हें कंसाच्या अनुभवास यायचें होतें. 'वधतां देवकीचीं बाळें । माझें पाप मज फळलें' असें वाटून 'आसनीं भोजनीं शयनीं । भय कृष्ण देखे नयनीं' असा त्याला कृष्णाचा निदध्यास लागला!

**गोकुळींच्या जना ध्यान । वाचे म्हणती कृष्ण कृष्ण ।**
**जेवितां बैसतां ध्यान । कृष्णमय सर्व ॥ १ ॥**
**देतां घेतां वदनीं कृष्ण । आन नाहीं कांहीं मन ।**
**वाचा वाच्य वाचक कृष्ण । जीवभावें सर्वदा ॥ ३ ॥**
**कृष्णरूपीं वेधली वृत्ती । नाहीं देहाची पालट स्थिती ।**
**एका जनार्दनीं देखती । जागृती स्वप्नीं कृष्णातें ॥ ४ ॥**

---

## ५ कृष्णावरचीं मनोहर पदें.

नाथांचीं कृष्णावर अनेक पदें आहेत तीं भाविक व प्रौढ स्त्रियांच्या तोंडून भाविकांच्या मेळ्यांत ऐकण्यात भक्तिभावाचा रंग समजतो. हा कृष्ण 'दावितो लाघव भोळ्या भाविकांसी । शाहणे तयांसी न संपडे ॥ एका जनार्दनी भाविकावांचून । प्राप्त नोहे जाण देव तया ॥' कृष्णाच्या अनिवार खोड्या, नानातऱ्हेचीं गोपिकांचीं गाऱ्हाणीं, कृष्णाची तरफदारी, यशोदेचें कृष्णप्रेम, गौळणींचे प्रेमळ आलाप,–

**बाळ रांगणें रांगतु । दुडदुडां पुढें पळतु । धरितां तो न कळे मातु । वेदशास्त्रीं जया ॥ १ ॥ तो बाळरूपें नंदाघरीं । खेळ खेळे नानापरी । नकळे लाघव निर्धारीं । इंद्रादिकां गे माय ॥ २ ॥ लोणी**

**चोराया घरोघरीं जाय । दधी दूध लोणी आपण खाय । सुनांचे मुखा हात पुसी । पळोन जाय । वांसुरें सोडी घरीं जाऊन । सुनांसी उठवी चिमटून । माथणी रांजण करूनि चूर्ण । पळे गे माय ॥ ४ ॥ शेजे असतां उभयता । जाय सोवळ्यांतून तत्त्वता । दाढी वेणी बांधी तत्वता । जाय परता पळोनी । ऐशा खोड्या नानापरी । नटनाटक वैकुंठ जिव्हारीं । एका जनार्दनीं नवलपरी । आगमा न कळेचि ॥ ५ ॥**

पण अशीं गाऱ्हाणीं यशोदेकडे नित्य जात तरी गौळणींची कृष्णावरील भक्ति निरुपम होती. कृष्णदर्शन म्हणजे 'डोळां भेटला सुखाचा सागरु' असेंच त्यांना वाटे. कांहींतरी निमित्त काढून उठपळ यशोदेकडे जावें, कृष्णाला पहावें, त्याशीं कांहीं हास्यविनोद करावा—याशिवाय त्यांना चैनच पडत नसे. आणि हीं गाऱ्हाणींही कौतुकानेंच त्या करीत. 'नको नको रे दूर देशीं' 'न साहवे वियोग पळभरी' 'तुझिया भेटीचें आर्त मनीं' 'येई वो श्रीरंगे कान्हाबाई । विरहाचें दुःख दाटलें हृदयीं' इत्यादि पद्यांतून त्यांनीं केलेला विरहशोकही तसाच कळवळ्याचा आहे. 'कृष्णीं गोपिका वेधल्या एका मनें । माना मुरडती प्रीतिप्रेमाचें रुसणें!'

कृष्णाच्या नृत्यानें विश्व मोहीत होत असे. 'चिमणा पीतांबर पिवळा। गळा वैजयन्ती माळा' अशा कृष्णाला नंदराणीनें नाचायला लावावें, गोपींनीं सभोंवर तें मनोहर नृत्य पाहून देहभान विसरावें, असा प्रकार नित्य होई ! पक्षी चारा विसरले, पवन मुख पसरे अंतरीं' असें तें दिव्य नृत्य ! देवगंधर्वअप्सरा त्या नृत्याला भुलत. 'वाळे घोळ घागरियांचा झणत्कार पूर्ण । आकर्णनयन सुहास्य वदन पाहुनि भुले मदन।' यशोदेला प्रेम लोटून तिनें धावून नृत्य थांबवावें ! या नृत्याच्या अभ्यासानेंच कीं काय कृष्णानें सर्वांना सळो कीं पळून सोडणाऱ्या कालियाच्या मस्तकावर नाचनाचून त्याला हैराण केलें व यमुनेच्या डोहांतून पार घालविलें, व तमोगुणी बुद्धीच्या डोहांतून अहंकारसर्पाला कसें ठेचावें हें जगाला शिकविलें ! नाथांचीं कांहीं गोड पदें पहाः—

१

यश्वदा म्हणे ग राधे । कृष्ण रडतां राहिना ॥ ध्रु० ॥
कृष्णें हट्ट घेतला कैसी । चंद्र मागे खेळायासी ।
तो नये अरे ! हातासी । कृष्ण रडतां राहिना ॥ १ ॥
आई ! तुझी साउली सरसी । मज देई खेळायासी ।
ती न ये बाळ ! हातासी । कृष्ण रडतां राहिना ॥ २ ॥
आरशांतील हें धन । तें नये हाताकारण ।
कृष्णें मांडिलें विंदान । कृष्ण रडतां राहिना ॥ ३ ॥
राधा म्हणे श्यामसुंदरा । तुम्हीं चला माझे मंदिरा ।
एका जनार्दनीं दातारा । कृष्ण रडतां राहिना ॥ ४ ॥

२

वारियानें कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले ॥
राधा पाहुनि भुलले हरी । बैल दुभे नंदाघरीं ॥ १ ॥
हरि पाहुनि भुलली चित्ता । राधा घुसळी डेरा रिता ॥ २ ॥
मन मिनलेसें मना । एका भुलला जनार्दना ॥ ३ ॥

'मनमोहन मुरलीवाला । नंदाचा आलबेला' 'मुरलि नको वाजवूं मनमोहना । मुरलि नको वाजवूं' 'मुरलिमनोहर रे माधव । मुरलि मनोहर रे' इ. मुरलीवरचीं नाथांचीं मनोहर पदें ऐकिलीं पाहिजेत. 'आवरीं आवरीं आपुला हरी' म्हणत एक गौळण यशोदाबाईकडे आली व तिनेंही आपलीं गाऱ्हाणीं यशोदेच्या कानांवर घातलीं. ह्या पदांत सुंदर अध्यात्म भरलें आहे व कृष्णाच्या खोड्याचें शुद्ध स्वरूप नाथांनीं व्यक्त केलें आहे. गौळण म्हणते, कृष्णानें काय केलें ?

कवाड भ्रांतीचें उघडलें । कुलूप मायेचें फोडिलें ।
शिंकें अविद्येचें तोडिलें । बाई तूझिया कृष्णें ॥ ३ ॥
डेरा फोडिला दंभाचा । त्रिगुण-तिवईस ठाव कैचा ? ।
प्रपंचसडा हा ताकाचा । केला तूझिया कृष्णें ॥ ५ ॥
अहंकार होता ठोंबा । उपटला घुसळखांबा ।

तोही टाकिला स्वयंभा । बाई तूझिया कृष्णें ॥ ६ ॥
संचित हें शिळें लोणी ॥ याची केली धुळदाणी ।
संकल्पविकल्प दुधाणीं । तींही फोडिलीं कृष्णें ॥ ७ ॥
प्रारब्ध हें शिळें दही । माझें खादलें गे बाई ।
क्रियमाण दूध-साई । तीही मुखीं वोतिली ॥ ८ ॥
द्वेष रांजण सगळे । स्पर्शें होती हात काळे ।
होते कामाचे जें पाळें । तेंही फोडिलें कृष्णें ॥ ९ ॥
पोर गे अचपळ आमुची । संगति धरिली या कृष्णाची ।
मिळणी मिळाली तयाची । संसाराची शुद्धि नाहीं ॥
ऐसी वार्ता श्रवणीं पडे । मग मी धांवुनि आलें पुढें ।
होतें द्वैताचें लुगडें । तेंहि फिटोनी गेलें ॥ १३ ॥
आपआपणा विसरलें । कृष्णस्वरुपीं मिळालें ।
एका जनार्दनी केलें । बाई नवल चोज ॥ १४ ॥

नाथ म्हणतात कीं लोणी चोरायचें मिष करून श्रीकृष्ण प्रेमाचें नवनीत चोरी. एका गोपीची वेणी व तिच्या पतीची शेंडी यांची गांठ बांधून त्यांनीं गयावया केल्यावर ती गांठ सोडली. या गाऱ्हाण्याचाही अर्थ भगवंतांनीं आधीं चिदचित्ग्रंथी बांधली व शरण आल्यावर ती सोडली असाच केला आहे. मनोरंजनाबरोबर बोध देण्याचा हा आनंदाचा प्रकार आहे. हा भगवान् कृष्णालाच साजणारा आहे. या कृष्णलीलांचें अनुकरण करणें हें ' येरा गाबाळांचें' काम नाहीं.

३

रडत माझें बाळ तान्हें समजावितां राहिना ॥ ध्रु० ॥
नानापरी समजाविते । मागितलें खाया देते ।
थापटूनी निजवीते । हालवीते पाळणा ॥ रडत० ॥ १ ॥
परोपरी घेतो छंद । रडतसे फुंदफुंद ।
नेत्रावाटे वाहे बिंद । याचा डोळा लागेना ॥ रडत० ॥ २ ॥
ठाव घेतो धरितो दम । सर्वांगीं आला घाम ।
एका जनार्दनीं प्रेम । यशोदेसी माइना ॥ रडत० ॥ ३ ॥

४

भिंगाचें भिंगुलें खांद्यावरी आंगुले ।
   नाचत तान्हुलें यश्वदेचें ग बाई यश्वदेचें ॥ ध्रु० ॥
कडदोरि बिंदुलीं वाघनखें साजिरीं ।
   नाचत श्रीहरी यश्वदेचा ग बाई यश्वदेचा ॥ १ ॥
पायीं घागरिया वाकया साजरिया ।
   कानीच्या बाळिया ढाळ देति ग बाई । ढाळ देती ॥ २ ॥
गोपीका भोळिया वाजविती टाळिया ।
   आमुंचा कान्हया देवराव ग बाई देवराव ॥ ३ ॥
येती गवळणी करिती बुझावणी ।
   लागति चरणीं गोविंदाच्या ग बाई (कान्होबाच्या) ॥ ४ ॥
एका जनार्दनि एकत्र शरण । ( सर्वत्र शरण )
   भावें निंबलोण उतरति ग बाई उतरती ॥ ५ ॥

५

असा कसा देवांचा देव बाई ठकडा ? ।
देव एका पायानें लंगडा ग । बाई ॥ असा० ॥ ध्रु० ॥
गवळ्याघरिं जातो दहिदुध खातो ।
करि दह्यादुधाचा रबडा ग बाई ॥ असा० ॥ १ ॥
शिंकोंचि तोडितो मडकेंचि फोडितो ।
पाडि नवनीताचा सडाचि ग बाई ॥ असा० ॥ २ ॥
वाळवंटीं जातो कीर्तन करितो ।
घेतो साधुसंतांसिं झगडा ग बाई ॥ असा० ॥ ३ ॥
एका जनार्दनिं भिक्षा वाढा बाई ।
देव एकनाथाचा बचडा ग बाई ॥ असा० ॥ ४ ॥

६

आई मज मारूं नको मज मारूं नको ।
नाहीं नाहीं म्यां खादली माती । आई मज० ॥ ध्रु० ॥

७

भुलविलें वेणुनादें । वेणु वाजविला गोविंदें ॥ १ ॥
पांगुळलें यमुनाजळ । पक्षी राहिले निश्चळ ॥ २ ॥
तृणचरें लुब्ध झालीं । पुच्छें वाहुनियां ठेलीं ॥ ३ ॥
आनंद न समाये त्रिभुवनीं । एका भुलला जनार्दनीं ॥ ४ ॥

८

(७) अधरीं धरूनी वेणू । वेणू वाजवि कोणी नेणू ॥ ध्रु० ॥
प्रातःकाळीं तो वनमाळी । घेउनि जातो धेनू ॥ अधरीं ॥ १ ॥
उभी राहुनि वाट मि पाहे । केव्हां भेटेल कान्हू ॥ अधरीं०॥२॥
एका जनार्दनीं वाजवि वेणू । मन झालें तल्लीनू ॥अधरीं० ॥ ३ ॥
(८) 'माझा कृष्ण देखिला काय । कुणि तरि सांगा हो' ॥माझा०॥
(९) 'कृष्णा धांवरे लवकरी । त्रिभुवन हरुषे भारी ॥ कृष्णा० ॥
(१०) 'चला बाई वृंदावनीं रासक्रीडा पाहूं ।
नंदाचा बाळ येणें केला नवलाऊ' ही लोकप्रिय गौळण ।

---

## ६ कृष्णरूपाची शोभा.

नाथांनीं आपल्या भागवतांतही श्रीकृष्णाचें चरित्र, रूप, गुण, लीला यांविषयीं अत्यंत सज्ञानप्रेमाचें उद्गार काढले आहेत. भगवंताचे अनेक अवतार झाले पण ह्या कृष्णावताराचा कांहीं 'नवलाव' आहे. 'उपजतांचि मायेवेगळा । वाढिन्नला स्वयें स्वलीला । बाळपणीं मुक्तीचा सोहळा । पूतनादि सकळां निजांगें अर्पी-' जन्मतःच वसुदेव देवकीपासून( मायामोहापासून ) वेगळा झालेला हा दिव्य बाळ आपल्या लीलेनेंच ( गोकुळांत ) वाढला व पूतनादिकांना त्यानें मुक्ति दिली ! बाळ असतांना मोठमोठे ( बळी ) दैत्य मारले. मायेला ( तोंडांत ) विश्वरूप दाखविलें. 'ब्रह्म आणि चोरी करी । देवो आणि व्यभिचारी । पुत्रकलत्र आणि ब्रह्मचारी । हेही परी दाखविली.' त्यानें अधर्मानें धर्म वाढाविला, अकर्मानें कर्म तारिले, 'संगेंचि सोडिला संगु । भोगें वाढ

विला योगू ' त्यागेवीण त्याग केला, भोगांत मुक्तता दाखविली ! भक्ति, भुक्ति आणि मुक्ति तिन्ही एकापंक्तींत ह्म० एका रेषेंत आणले ! ( अ० १ ओवी १८५ ते १९५ ). कृष्ण सकळ मंगळांचें मंगळ, गोपींचा रमण, मोक्षाचें तारूं–पुरुषोत्तम हें नांव त्यालाच शोभतें. ' श्रीकृष्णाचिया सौंदर्यापुढें । लक्ष्मी भुलोनि झाले वेडे ' त्रैलोक्याचें सौंदर्य त्याच्या एकामूर्तींत एकवटलें किंवा त्याच्या सौंदर्यलेशानें त्रैलोक्याला सौंदर्य प्राप्त झालें. कृष्ण म्हणजे सुखानंदाची मूस ! बळ, सौंदर्य, मोहकपणा, दया, वात्सल्य यांचें एकीएक निधान ! परब्रह्मच प्रत्यक्ष !

**चैतन्यतेजें तनु मुसावली । शांतिरसाची वोतिली ।**
**चतुर्भुजत्वें रूपा आली । तेणें दिशांची गेली कालिमा ॥**
**आधींच नेटका श्रीकृष्ण । वरी घनश्यामता बाणली पूर्ण ।**
**तेणें मुसावलें बरवेपण । लागलें ध्यान नारीनरां ॥**
**ऐसें अंगांचें बरवेपण । त्याहीवरी हास्यवदन ।**
**साजिरें राजीवलोचन । आकर्णपूर्ण आरक्त ॥**
**मस्तकींचे नीलालक । सुगंधसुमनीं गुंफिले चोख ।**
**कृष्णीं कृष्णरूप मधुक । कृष्णकेशीं देख विगुंतले ॥**

* * *

**जो सकल सौंदर्याची शोभा । जो लावण्याचा वालभा ।**
**त्याचिया अंगसंगप्रभा । आणिली शोभा जगासी ॥ २४३ ॥**
**जो हरिखा सोलीव हरिख । कीं सुखें सुखावतें परमसुख ।**
**ज्याचेनि विश्रांतीसी देख । होय आत्यंतिक विसावा ॥ २४४ ॥**
**तो अमूर्त मूर्तिधारणु । कीं सकललोकलालनु ।**
**शोभा शोभवी श्रीकृष्णु । सौभाग्य संपूर्णु साजिरा ॥ २४५ ॥**
**घृत थिजलें तेंचि विघुरलें । परी घृतपणा नाहीं मुकलें ।**
**तेवीं अमूर्त मूर्ती मुसावलें । परी तें संचलें परब्रह्म ॥ २४६ ॥**
**तयासि देखिलियाचि पुरें । देखादेखीं देखणेंचि सरे ।**
**पाहणें पाहतेनिसी माघारें । लाजोनि वोसरे सलज्ज ॥ २४७ ॥**

**अंगाचि अंगातें कैसें । विसरे आपैसें देहबुद्धीं ॥ २५३ ॥**

त्याच्या उदार कीर्तीनें जडजीव उद्धरतात. कीर्तिश्रवणानें त्रैलोक्य पावन होतें. 'श्रीकृष्णकीर्तीचें तारूं । घालितां आटे भवसागरू.' त्याची गुणनामकीर्ति कानीं पडतांच आंतील अज्ञानांधकार गजबजून बाहेर निघून जातो. 'श्रीकृष्णकीर्तिप्रतापप्रकाशें । संसार कृष्णमय दिसे.' त्याच्या दर्शनाबरोबर डोळ्यांचें पाहणें संपतें, 'तो चिंतितां तुरे चित्तवृत्ति' (अ० १ ओवी २३८ ते २७५).

**सकळ सौंदर्या अधिवासु । धरोनि मनोहर नटवेषु ।**
**लावण्यकळान्यासु । आणि जगदीशु निजांगें ! ॥ २८९ ॥**
**नवल सौंदर्या बीक उठी । सर्वांगीं गुंतल्या जनादिठी ।**
**कृष्णस्वरूपीं पडे मिठी । होत लुलुबुटी डोळियां ॥ २९० ॥**
**तो श्रीकृष्ण देखिला ज्या दिठी । ते परतोनि मागुती नुठी ।**
**अधिकाधिक घाली मिठी । देखे सकळ सृष्टि श्रीकृष्ण ॥२९३॥**

ज्या कृष्णरूपावर मोठमोठे योगी, तपस्वी, ज्ञानी, भक्त मोहून जात त्या रूपाला बापुड्या तरुण गोपी भुलून गेल्या यांत नवल तें काय? एवढें आद्वितीय सौंदर्य व मनोहरपण असून कृष्णाच्या चित्तीं विषयधर्म लेशमात्र नव्हते! तो अवाप्तसकळकाम आत्माराम प्रभु—त्याच्या ठिकाणीं क्षुद्र विषयकाम कोठचा असणार? 'चहूं आश्रमा प्रकाशकू । त्रिलोकीं कृष्ण गृहस्थ एकु । तोची ब्रह्मचारी नैष्ठिकू । आतिनेटकु संन्यासी'. श्रीकृष्ण लीलाविग्रही चित्कल्लोळ—जो त्याच्या सकलकर्मांचें स्मरण करितो तो कर्मबंधापासून मुक्त होतो. त्याच्या कामाचें (रासक्रीडा-प्रसंगाचें) स्मरण करितां संन्याशी (शुकासारखे) निष्काम होतात, व अर्वाचीन काळांतही ज्ञानेश्वर, नामदेव, मुक्ताबाई, जनाबाई, मीराबाई, नरसी मेहता, तुकाराम, गौरंगप्रभु, सूरदास यांसारखे परम विरक्त वैष्णववीर ज्याच्या गुणलीला गाऊन विश्वोद्धारसमर्थ झाले, त्याच्या लीला अत्यंत निष्काम, निष्कपट, मोकळ्यावृत्तीच्या व सकाम गोपींनाही

भक्तिप्रेमरहस्य शिकवून निष्काम करणाऱ्या होत्या याविषयीं कोणताच संशय बाळगण्याचें कारण नाहीं. कृष्ण प्रेममूर्ति होता, विकारी नव्हता.

**ऐसा निजकीर्ति उदारु । पूर्णब्रह्म सारंगधरू ।**
**लीलाविग्रही सर्वेश्वरू । पुर्णावतारु यदुवंशीं ॥ अ० १-३०९ ॥**

श्रीकृष्ण परमात्म्याचीं उदार लीलाचरित्रें गाऊन असंख्यजन उद्धरून गेले आहेत ( अ० १ ओंवी २५८ ते ३१० ).

श्रीकृष्णाचें १२ व्या वर्षाचें ' मुकुट कुंडलें मेखळा । कांसे कासिला सोनसळा । कंठीं रुळे वनमाळा । घनसावळा शोभतु,' असें तें दिव्य मनोहर रूप पाहून गोप, गोपी, गाई, वृक्ष, पाषाण सारी जडाजड-सृष्टि त्यावर मोहून गेली. ' कृष्णरूपाचें कवतुक । पाहतां नयनां लागली भूक । अंतरीं निबिड दाटलें सुख । तरी अधिकाधिक भुकेले' ( अ. ६-५८ )

श्रीकृष्ण ' जन्मापासूनि ज्ञानघन ' असल्यामुळें त्यांच्या ' संगतीनें अज्ञानजन उद्धरिले '. गोपगोपींना त्यानें आपल्या रूपगुणांनीं व मनोहर लीलांनीं वेध लावला. कृष्णाला पाहून गाई तोंडांतला चारा खायचा विसरून तटस्थ होत! वृक्ष, तृण, पाषाण सर्वच ' कृष्णसंगे तरले.' स्तनांत विष भरून कृष्णाला मारण्यासाठीं कंसानें पाठविलेली पूतनाही कृष्णसंगें उद्धरून गेली. कंसाचा मदोन्मत्त हत्ती कुवलयापीड कृष्णानें एका मुष्टीनें मुक्त केला. अरिष्ट, तृणावर्त, व्योमासुर, कंसाचा घोडा केशी, विषसर्प कालिया व कंसशिशुपालादि अनेक दुष्ट कृष्णानें सद्गतीला नेले. ' जिहीं खेळविला चक्रपाणी । ज्यांचें घरीं प्याला पाणी । ज्यांचें चोरूनि खादलें लोणी । त्याही गौळणी उद्धरिल्या. '

**गोपिका तारिल्या प्रेमाद्भुतें । गायी तारिल्या वेणुगीतें ।**
**गौळिये तारिले समस्त । श्रीकृष्णनाथें निजयोगें ॥अ० ३१-१२॥**

---

## ७ गोपांच्या खेळांतील अध्यात्म.

श्रीकृष्ण आपले सवंगडी जे गोपाळ त्यांच्याशीं यमुनेच्या तीरीं जे खेळ खेळे त्यांचेंही मर्म नाथांनीं आध्यात्मिक दृष्टया फार चांगलें सांगि-

तलें आहे. ह्या खेळांत अर्थात् नाथांच्या वेळचेही कांहीं खेळ व त्या खेळांतले पारिभाषिक शब्द आले आहेत. पण खेळांची सांगोपांग वर्णनें करण्याचा नाथांचा हेतु नसून त्या निमित्तानें अध्यात्मरंग भरण्याचाच होता हें उघड आहे. विटीदांडू, चेंडूफळी, लगोरी, : भोंवरा, सुरकांडी ( सुरपारंबी ), पटपट सांवली, लपंडाई, वावडी, एकी-बेकी, झोंबी, उमान ( उखाणे ), हमामा, हुतुतु, काला इत्यादि खेळ कृष्ण आपल्या संवगडयांबरोबर मोकळ्या मनानें व उत्साहानें खेळत. त्यांचा काल्याचा सोहळा आजही पंढरपूर वगैरे ठिकाणीं अंशतः पाहण्यास मिळतो. दळण, कांडण, पिंगा, फुगडी, टिपरी हे अर्थात् मुलींचे खेळ होत. टिपरीचा खेळ मुलगे सुद्धां खेळतात. ' वैराग्यजातें मांडुनि विवेकखुंटा थापटुनि । अनुहत**दळण** मांडुनि । त्रिगुण वैरणीं घातले ॥ येई वो कान्हाई । एकली दळितां शिणले हात लावी वहिले ॥ ' ह्या दळणांत चार देह, अद्वैतसह द्वैत, साऱ्याचें दळून बारीक पीठ केलें आहे व एकाएकी मी उरलें असें वर्णन आहे ! पंचभूतें पंचधान्यें ' जें जें देखे तें दळियेले दृश्यादृश्यासी ' स्वर्ग मृत्यु पाताळ, कर्माकर्म, धर्माधर्म, मीतूंपण सारें वैरणींत घातलें. ' स्वभावें लीळा खेळे हे जनार्दनी एका. ' **कांडण**ही असेंच. ' देह हें उखळ मन हें मुसळ । कांडिले तांदूळ विवेकाचे ॥ एका जनार्दनी कांडण कांडितां । ब्रह्मसा-युज्यता प्राप्त झाली. ' **पिंगा**— ' पिंगा बाई पिंगा ग । अवघा धांगडधिंगा ग. ' निराकाराचा साकार होऊन दशावतार झाले हा थोरला पिंगा ! ' **फुगडी** घाली मीपणाची । वेणी गुंफी त्रिगुणांची ॥ चाड नाहीं कोणाची । आण सद्गुरुचरणाची । ' मुलगे जमून ' खेळती विटी दांडू चेंडू । भोवरे लगोऱ्या उदंडू.' कान्होबा हा खेळगडी वांटून देऊन साऱ्यांना खेळायला लावतो व आपणही साऱ्यांबरोबर खेळ खेळतो, पण निराळा राहून खेळ खेळण्याची व इतरांना खेळांत गोंवण्याची युक्ति त्याला साधली आहे ! **भोंवरा**- ' वायां भ्रमें फिरसी

गरगरा । ' पण ध्यानांत ठेव कीं ' यम मारी कुच्चा फिरशिल चौऱ्यायशीच्या घरा ! ' **लपंडाई**— ' कृष्णा ! कैसी खेळू लपंडाई । अनंत लोचन तुझे पाहीं । तेथें लपावे कवण्या ठायीं ! । ' ममतेच्या पोटीं लपावे तर तेथें तुझी दृष्टि आहे व गिरिकंदरीं लपावें तर जेथें तेथें तुझाच ठसा आहे ! आतां लपावें तरी कोठें ? जगीं उघड दिसून कां झांकितोसि डोळां ! ' **एकीबेकी**— एकी म्हणतां जिंकिशी बेकी म्हणतां हारी ' ( फजीती ) ! **झोंबी**— आपण न पडतां दुजियासी पाडी । तोचि खेळिया भला रे ! **हमामा-हुंबरी**—

**हमामा घालू हमामा । हुंबरी वाजे घमामा ॥**
**हमामा घालूं नेटे रे । कान्होबाचें बळ मोठें रे ॥**
**हमामा घालू आवडी । कान्होबा तूं आमचा गडी ॥**
**हमामा घालूं सोई रे । सांभाळु शिवा दोहीं रे ॥**

दोन शिवा ( मर्यादा ) म्ह० प्रपंच परमार्थाच्या ! इहपरलोक दोन्हीं साधून खेळ खेळूं !

---

## ७ गोपाळांची अर्जी !

एकदां सर्व गोपाळांनीं श्रीकृष्णाकडे एक अर्जी केली ! ती अशीः—

**गोपाळ म्हणती कान्हा । सांभाळी आपुल्या गोधना ।**
**पळतां सैराट धांवती राना । गेल्या ठेल्या त्या तुम्ही जाणा ॥ १ ॥**

ह्या गाई फार ओढाळ आहेत, त्यांच्या मागें धांवतां धांवतां आमची पुरेवाट होते ! तुम्ही आपल्या टेकावर बसतां व येरझारा करितांना आम्हांला मात्र श्रम होतात. तुझ्या गाई आम्हांला नकोत व त्यांना तूं विसंबणार नसशील तर तुझीही संगत नको !

**तुझीं गोधनें सैराटें । दिशा पळतीं दाहीं वाटे ।**
**वळितां कष्ट होताति मोठे । ठेंचा लागूनि फुटलीं बोटें ॥ ४ ॥**

ती ' श्रवणी ' गाय पहा. ती ' साद होय तिकडे जाय ! ' ती

सांवळी ' डोळेसुटी–' ती हिरवळ पाहिली कीं श्वास सोडायची वाट न पाहतां त्याच्या मागें धांवत सुटते ! ती ' हुंगी ' गाय पहाः ' खाद घे परी न खाय तृण । इसी हिंडावया थोडकें रान.' तशीच ती ' रसाळी ' ती ' सुकुमारी ' ती ' हाताळी ' ती ' पोटफुगी ' ती ' हागी ' ह्या साऱ्या गाई अतिवोढाळ आहेत. त्या ' वळितां जाती आमुचे प्राण ' ह्या गाईंचा तो पहा प्राणनाथ ! तो तरी स्थिर असावयाचा होता ! ' तो **मन**मोहन सुंदर । कोण्हे काळीं नव्हे स्थिर । त्यासी हिंडावया–' काय सांगावें ? हें ब्रह्मांड पुरत नाहीं ! असलीं हीं गोधनें आम्हांला नकोत व तूंही नकोस ! काकुळती येऊन आम्ही विनवणी करितों कीं गाई बाहेर पळतात व माघारी येत नाहींत त्यांना मागें वळवावयाच्या कशा ? गोपाळांनीं आपल्या अर्जाच्या शेवटीं:—

**आमुची गती खुंटली आवरी तूं हरी ।**
**कोण सखा तुजवांचुनि आमुचा कैवारी ? ।**

ही गोपाळांची बंडखोरी पाहून श्रीकृष्णानें एक मोठें विंदान केलें ! गोपाळ उत्तर काय मिळतें याची वाट पहात तटस्थ उभे राहिले. श्रीकृष्ण तोंडांतून शब्द काढीनांत ! त्यांनीं जवळ असलेली मुरली हातीं घेतली, तोंडाला लावली—

**घेउनि मोहरी गाई पाचारी सकळा । नवल तें जाहलें गोपाळा ॥**
**वेउनि गाई अवघ्या जमा होती । पाहुनियां कृष्णा त्या हंबरती ॥**
**एकाजनार्दनी विश्वाचा निवासी । गाईगोपाळां वेधिलें सर्वांसी ॥**

वाचक रसिक व मार्मिक आहेत असें समजून ह्या सुंदर कवित्वाचा मी भावार्थही सांगण्याची इच्छा आवरून धरितों ! ' खेळ सोडून जायचें कारण नाहीं, आपल्या गाई आपणच वळवल्या पाहिजेत ' असें देवाच्या कृतीचें मर्म समजून गोपाळ घरोघर गेले !

**देहुडा उभा राहूनी । गाई खुणाविल्या वेणुध्वनी ॥**
**टवकारिल्या चारा विसरूनी । आल्या मुरडोनि त्वरित ॥ !**

———

## ९ काला.

यमुनेच्या तीरची वृंदावनाची मोकळी हवा, कदंबवृक्षाची प्रचंड छाया, कृष्णाचें मनोहर नृत्य व मंजुळ पावा, गाईगोपाळांच्या स्वेच्छ उड्या, मुबलक दूध, दही, लोणी व तूप, गाईचीं खिल्लारें, अपूर्व वन-शोभा, पुरुषभर उंचीचे मनमुराद गवत, वृक्षवेलींची अनुपम शोभा, कोणताही भेदभाव मनांत न येतां सवंगड्यांबरोबर दिवसभर चाललेले नानाप्रकारचे खेळ—या स्वर्गदुर्लभ सुखाचें काय वर्णन करावें ? आरोग्य-शास्त्र, नीतिशास्त्र, मानसशास्त्र, अध्यात्मशास्त्र, सकळ शास्त्रें तेथून धडे घेऊन जात ! श्रीकृष्णाच्या संगतीनें मुक्ति तर तेथें मूर्तिमंत नाचत होती. गोपाळांचें खेळ संपले कीं सर्वांनीं आपापल्या शिदोऱ्या काढाव्या, व सहवनभोजन करावें. एकमेकांच्या पानांतले पदार्थ देणे घेणें; तोंडांत बळेंच प्रेमानें घांस भरवणें—सर्वच मोकळेपणा, अत्यंत पवित्र वातावरण ! 'यमुनेचे तटीं कळंबातळवटीं । मांडियेला **काला** गोपाळांची दाटी ॥ भांकरी दहीभात लोणी । मिळोनि काला करी चक्रपाणी ' कडजा, वांकुडा, पेंधा, बोबडा हे वाढपी ! ' मुरलिस्वरें नाद भरला । तेणें स्थिर जाला पवन वेगीं ॥ ' यमुनाही शांत झाली ! मध्येंच पेंध्यानें दुपांडी नांचावें व सर्वांनीं प्रेमभरें हंसावें ! मध्यें कृष्णाला घोंगडीवर बसवून 'धांवुनि गळां पालेमाळा त्या वाहती । गजरें नाचती किती येक ॥ टिरिया मांडिया वाजविती पाय । हर्षें नाचताहे देवराय ! ' गाईंचें कृष्णा-वर प्रेम किती ! 'गाई दीनमुख करिती हरिपुढें । एका जनार्दनी तया पाहतां प्रेम चढे ' हें अपार सुख पाहून स्वर्गींचे देव लाळ घोटूं लागले !

———

## ९ गोपीप्रेम.

**करितां दळणकांडण । माझें दीर्घस्वरें गाती गुण ।**
**कीं आदरिल्या दधिमंथन । माझें चरित्रगायन त्या करिती ॥**
**करितां संडासंमार्जन । गोपिकांसी माझें ध्यान ।**
**माझेनि स्मरणें जाण । परिये देणें बाळकां ॥ १७८ ॥**
**गाईचें दोहन करितां । माझें स्मरणीं आसक्तता ।**
**एवं सर्व कर्मी वर्तता । माझ्या विसराची वार्ता विसरल्या ॥१७९॥**
**करितां गमनागमन । अखंड माझ्या ठायीं ध्यान ।**
**आसन भोजन प्राशन । करितां मद्ध्यान तयांसी ॥ १८० ॥**
**यापरी बुद्धि मदाकार । म्हणोनि विसरल्या घरदार ॥**
**विसरल्या पुत्रभ्रतार । निजव्यापार विसरल्या ॥ १८३ ॥**
**विसरल्या विषयसुख । विसरल्या द्वंद्वदुःख ।**
**विसरल्या तहानभूक । माझेनि एक निदिध्यासें ॥ १८४ ॥**
**सच्चिदानंदस्वरूपप्रभावो । नेणतां माझा निजस्वभावो ।**
**गोपिकांचा अनन्यभावो । परब्रह्म पहा वो पावल्या ॥ १९० ॥**
**जीवाआंतुलिये खुणें । मीच एक निववूं जाणे ।**
**ऐसें जाणोनि मजकारणें । जीवेंप्राणें विनटल्या ॥१९८॥** (अ० १२)

तेच भगवान् श्रीकृष्ण पंढरीस भक्तांच्या काजासाठी विटेवर उभे आहेत. 'पावन पांडुरंगक्षिती । जे का दक्षिण द्वारावती । जेथें विराजे विठ्ठलमूर्ती । नामें गर्जली पंढरी' ( भाग २९–२४५१ ).

---

## १० पंढरी आणि विठ्ठल

' अर्जुनाचे रथीं श्रमला जगजेठी । म्हणोनि कर ठेउनि कटीं उभा असे '–भारतीय युद्धानंतर श्रमविनोदार्थ श्रीकृष्ण पंढरीस आले. ' रुक्मिणी रुसली ती दिंडिरवना आली ॥ गाईगोपाळांचा मेळा । गोपाळपुरीं तो ठेविला ॥ आपण गोपवेष धरी । एकाजनार्दनीं श्रीहरी ॥ " पंढरीस विटेवर श्रीकृष्णच गोपवेषानें उभे आहेत. पंढरीस ' वेणुनाद ' आहे, ' विष्णुपद ' आहे. ' रमारमेशमस्तकीं हर'–लक्ष्मीपति विष्णुच्या

ह्म० कृष्णाच्या ह्म० विठ्ठलाच्या मस्तकीं हर ह्म० शंकर आहेत. विठ्ठलाच्या मस्तकावर शिवपिंडी आहे. पंढरीस नित्य ‘ बहुता वैष्णवांचा मेळ । गदारोळ नामाचा ’ असतो. पुंडलीकासाठीं देव येथें आले. विठ्ठल ‘ बाळरूप ’ आहे, ह्म० कृष्णाचें बाळरूप आहे. ‘ हीन दीन पातकी । होतु कां भलते यातीं’--सर्वांच्या उद्धारासाठीं भगवान् विटेवर उभे राहिले आहेत. ‘ अनुपम्य क्षेत्र अनुपम्य देव,’ येथें सर्व कांहीं अनुपम्य आहे. तीर्थक्षेत्रें अनंत आहेत परी ‘ सरी न पवती पंढरीची. ’ येथें ‘ दरुशनें चित्त निवे. ’ प्रत्येक क्षेत्र आपापल्या ठिकाणीं बळीच आहे, पण ‘ ऐसा संतसमागम । ऐसा निरुपम नाममहिमा । दिंडी टके मृदंगनाद । नाहीं भेद यातीसी ’ पंढरीसारखें कोठें आहे ? ‘ देव भक्त आणि नाम । ऐसें उत्तम नाहीं कोठें. ’ विठ्ठलदर्शनानें ‘ प्रत्यक्ष भेटे हरिहर. ’ प्रयागादि अनेक तीर्थें पाहिलीं, पण ‘ न बैसे तत्वतां मन माझें. ’ हें विश्रांतीचें स्थान ‘ मुक्त मुमुक्षूंचें माहेर ’ आहे. येथें दंडण, मुडण, कायापीडण, योगयागाची कसवटी, धूम्रपान, तीर्थविधि, इत्यादि-कोणतीच आटाटी नाहीं. ‘ मुक्ति मुक्ति येथें लोळती अंगणीं. ’ ‘ अठरावर्ण याती । भेद नाहीं येथें जाती । अवघे रंगले चिंतनीं । मुखीं नाम गाती कीर्तनीं. ’ देव, तीर्थ, क्षेत्र, नाम व संत या पांचांचा येथें मेळा आहे. ‘ स्त्रिया आदि नर बाळें । कौतुक लीले नाचती. ’ त्रिविधतापें तापलेल्यांना पंढरी ही विश्रांति आहे. ‘ दुःखाची विश्रांती सुखाचा आनंद । पहातां चिदानंद विठ्ठल देव. ’ हें भाविकांचें माहेर आहे. येथें ‘ कैवल्य उघडें ’ विटेवरी आहे. ‘ हो कां अनामिक अथवा शुद्रवर्ण । ज्ञातीसी कारण नाहीं देवा ॥ एका जनार्दनीं भलती ज्ञाती असो । परी पाडुरंग वसो हृदयामाजी ’ एवढीच येथें अपेक्षा आहे, येथें ‘ भोळेभोळे नरनारी ’ येतात, चंद्रभागेचें स्नान, पुंडलिकाचें व विठ्ठलाचें दर्शनसुख भोगतात, क्षेत्रप्रदक्षिणा करितात. ‘ घेउनि आवडी माळ बुका । वाहती फुका विठ्ठला. ’ आषाढी कार्तिकी

हे वारीचे मुख्य दिवस. पौर्णिमेस 'काला करिती गोपाळपुरीं.' धन्य पुंडलीक! त्यानें चक्रपाणीं विटेवर उभा केला.'पाहतां विटेवरी जगदीश। पुराण पुरुष व्यापक' 'भक्तांचिया काजा। उभा पंढरीचा राजा'

**मूर्ति अनुपम्य विटेवरी साजिरीं। पाउलें गोजिरीं कोवळीं तीं।**
**तेथें माझें मन वेडावलें भारी। परत माघारीं परतेना॥**
**वेधलासे जीव सुखा नाहीं पार। माहेरां माहेर पंढरी देखा॥३॥**
**एका जनार्दनीं सुखाची वसती। भाविका विश्रांति पंढरिराव ४**

हा, नाथ म्हणतात, माझा अनुभव असल्यामुळें 'उभारूनि बाह्या सकळां आश्वासन। या रे अठरावर्ण पंढरीसी' असें मी लहानथोर स्त्रीपुरुषांस गर्जून सांगत आहे.

द्वारकेहून श्रीकृष्ण गाईगोपाळांसह पंढरीस आले. 'जे जे येती ज्या ज्या भावें। ते ते तारावे कृपाळूवा' असें लोकांसाठीं पुंडलिकानें वरदान मागितलें व तें देवानें दिलें. 'भक्तद्वारीं उभाचि तिष्ठे। युगें झालीं अठ्ठावीस' 'अणुरेणुपासोनि भरूनि उरला। तो म्यां देखिला पंढरिये.' मनाचें मोहन, योगाचें निजधन, जेथें वेद उपरमला, पुराणें कुंठित झालीं, शास्त्रांची मति गुंगली, जेथें जाणते नेणते वेडावले, भुक्तिमुक्ति ज्याच्या पायीं लोळतात, तो हा विठ्ठल भक्तोद्धारासाठीं संताग्रणि पुंडलिकानें उभा केला आहे! 'ध्यातां चित्त निवे। पाहतां ठसावे। एकाजनार्दनीं सांठवे हृदयीं रूप.' सुंदर बाळपणाची बुंथी घेऊन श्रीपति उभा आहे. 'लक्ष्मी ते रुक्मिणी.' 'सुकुमार हरीचीं पाउलें। सुंदरी हरीचीं पाउलें' ध्वजवज्रांकुश ही शुभ्र चिन्हें त्या पाउलावर आहेत. त्याच्या हातीं पद्म व गदा आहेत. नाथ म्हणतात कीं 'हा आनंदाचा कंद' म्यां प्रेमें देखिला व तो सबाह्य हृदयीं भरला. 'सांवळा चतुर्भुज। कांसे पीतांबर। वैजयन्ती माळ शोभे कंठीं.' 'कोटिकंदर्प सांडा ओवाळुनी' ऐसा हा पंढरिनाथ विटेवरी कटीं कर ठेवूनि उभा राहिला आहे. 'रूप सांवळें सकुमार। कानीं कुंडलें मकराकार।

श्रीवत्सलांछन हृदयीं भूषण । एकाजनार्दन तृप्त झाला. ' डोळियांची धणी पुरली ' परी वासना राहिली चरणांजवळी. ' जें द्रौपदीनें स्मरिलें, जें अर्जुनें स्मरिलें, जेणें गजेंद्रा उद्धरिलें, जें हनुमंतें स्मरिलें तें परब्रह्म मूर्तिमंत विटेवर उभें आहे. ' प्रणवापैलीकडे, व जें वैखरियेसी कानडें:—

**न कळे तयाचें माहिमान । वेदां पडिलेसें मौन ।**
**शास्त्राचें भांडण । परस्परें खुंटलें ॥**
**नेणवे तो सोळा बारा । आणिक सहा तो आठरा ॥**
**पंचविसाची पुरा । न कळे बरा छत्तिसा ॥**

असा हा ' कानडा विठ्ठल ' म्यां डोळां पाहिला, व ' वेधियेलें मन कानडियानें माझें । एकाजनार्दनीं दुजें नाठवेचि.' कानडा ह्म० कर्नाटकप्रांतांतला, कर्नाटकी देव, असा अर्थ नव्हे. कानडा म्ह० दुर्गम, आकळण्यास कठिण.

**विठ्ठल सांवळा पाहूं चला डोळां । धरूनी बाळलीळा कटीं कर १**
**संतांचा समुदाय आरत्यांची दाटी । नामघोष सृष्टी न समाय २**

नाथांचें विठ्ठलावर जे प्रेमळ अभंग आहेत ते मूळ गाथ्यांतच पहावेत.

**नागरें गोमटें रूप तें गोजिरें । उभें ते साजिरें भीमातटीं ॥ १ ॥**
**पाहतां विश्रांती देहा होय शांती । अनुपम्य मूर्ती विठ्ठलदेव ॥ २ ॥**
**भक्ताचिया काजा राहिलासे उभा । कैवल्याचा गाभा बालमूर्ति ॥३॥**
**आनंदाचा कंद उभा परमानंद । एका जनार्दनीं छंद मज त्याचा ॥४॥**

× × ×

**ॐकारस्वरूप सद्गुरु असंग । अक्षय अभंग पांडुरंग ॥ १ ॥**
**नसे ज्याचे ठायीं द्वैताद्वैतभाव । ब्रह्म स्वयमेव पांडुरंग ॥ २ ॥**
**रविशशिदीप्ति जेणें प्रकाशती । तो हा तेजोमूर्ति पांडुरंग ॥ ३ ॥**
**गुरुराज माझा दीनांचा दयाळ । तोडी मायाजाळ पांडुरंग ॥ ४ ॥**
**पांचा भूतांची जो करितो झाडणी । तो हा ज्ञानखाणी पांडुरंग॥५॥**
**भूतळीं या नसे दुजा कोणी ऐसा । भक्तांचा कोवसा पांडुरंग ॥६॥**
**ति-कडी सांखळी त्रिगुणांची तोडी । भवांतूनी काढी पांडुरंग ॥७॥**
**परोपकारालागीं अवतार केला । आनंदाचा झेला पांडुरंग ॥ ८ ॥**

**मन हें जडलें तयाचिये पदीं । उतरी भवनदी पांडुरंग ॥ ९ ॥**
**एका जनार्दनीं देह हारपला । होऊनी राहिला पांडुरंग ॥ १० ॥**

'विटेवरी दिसे स्वानंदाचा गाभा' 'श्रीमुख साजिरें कुंडलें शोभती' इ० अनेक बहारीचे अभंग आहेत ते पंचपदीचे वेळीं म्हणण्यांत येतात; 'संतसनकादिक भक्त मिळाले आणिक,' 'वोवाळू आरती मदनगोपाळा' ह्या आरत्या; 'हरि चला मंदिरा' ही शेजारती; 'या रे नाचूं प्रेमानंदें' हें भजन; 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ती' ही दत्ताची आरती वगैरे लोकांच्या नित्याच्या भजनांत आहेत. 'अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां' ह्या अभंगानें भजनाची समाप्ति होतें. श्रीज्ञानेश्वरनामदेवांचें विठ्ठलोपासनेचें लोण नाथांनीं पुढें चालवून तुकोबारायांच्या स्वाधीन केलें, त्यांनीं तसेंच तें निळोबांच्या हातीं दिलें व अशा रीतीनें तें महाराष्ट्रभर पसरलें आहे. ह्या सर्व संतांचा मुख्य आचार व उपदेश 'सत्संगीं नामस्मरण' ह्या दोन शब्दांत आहे, आपण आतां तिकडे वळूं.

---

## ११ नामसंकीर्तन.

कलियुगांत नामसंकीर्तनभक्तीनें परमात्मा लवकर जोडतो. कीर्तन गोविंदाला अत्यंत प्रिय आहे. नामसंकीर्तनानें नारद, प्रल्हाद, अजामेळ, गणिका, गजेंद्र, द्रौपदी इ. असंख्य भक्त उद्धरले आहेत. नारद व प्रल्हाद यांचा अधिकार वेगळा व अजामेळगणिकांचा वेगळा, तथापि नामस्मरणानें लहानथोर, पापीपुण्यवान् सर्वच हरीला प्रिय होतात. नामानें संसारबंध तुटतात, आधिव्याधि हटतात, संकटनिवारण होतें. **भागवतांत** नाथ सांगतातः—

**अंतरशुद्धीचें कारण । मुख्यत्वें हरिकीर्तन ।**
**नामापरतें साधन । सर्वथा आन असेना ॥ ३५३ ॥**
**ज्यासी कीर्तनीं कथाकथनीं । चौगुण आल्हाद उपजे मनीं ।**
**तो उद्धरला सर्वसाधनीं । पवित्र अवनी त्याचेनि ॥३५७॥ (अ० ५)**

एक रामनाम सदा मुखांत राहिलें तरी पापाचे पर्वत दग्ध होतात व परमानंद प्राप्त होतो. हरिकीर्तनानें 'हृदयीं प्रगटे श्रीजनार्दन' म्हणून कीर्तनाहून थोर दुसरें साधनच नाहीं. 'शरणागतां शरण्य। सत्य जाण हरीचे चरण। यापरतें निर्भय स्थान। नाहीं आन निजभक्ता!' भगवद्भजनांचें सुख भाविकच जाणतात, अभाविक तार्किकांना तें मनानेंही जाणतां येणार नाहीं. भाविक दोषत्यागें कलीचें गुण तेवढे घेतात व आराम पावतात. नामानें मागील युगांतील यज्ञादि साधनें लाजविलीं आहेत, 'येथें गातां नाचतां आपणें। वश्य करणें परमात्मा! कीर्तनानें सर्वांचा उद्धार अनायासें होतो. कीर्तनसुखापुढें भक्त मुक्तीचीही उपेक्षा करितात. 'भावें करिती हरिकीर्तन। तेणें संतोषे जनार्दन' व जेव्हां देवभक्ताची मिठी पडते—'तेव्हां सबाह्याभ्यंतरीं। देव प्रगटे चराचरीं। दुजें देखावया संसारीं। सर्वथा उरी असेना.' असा स्वानुभवी हरिदास स्वानंदानें कीर्तन करितो तेव्हां सारे श्रोतेही सुखशांति पावतात, 'भक्त लोधले हरिभजनासी। सर्वथा मुक्तीसी न घेती.' मर्त्यलोकीं कीर्तनसुख पाहून इंद्रादिक देव 'जन्म इच्छिती कलियुगीं!' कलियुगीं जन ह्या सुखोपायानें उद्धरून जातात. जो सर्वात्मना हरीला शरण गेला तो देव, ऋषि, आप्त, जन, पितर या सर्वांच्या ऋणांतून मुक्त झाला. 'वासुदेव सर्वभूतीं' हें कीर्तनानें ज्याच्या चित्तावर ठसलें—

**तो नव्हे कर्माचा सेवक। नव्हे देवांचा पाईक।**
**नव्हे प्राकृतांचा रंक। अनन्य भाविक हरिभक्त॥ ४६८॥**

भक्त कर्माकर्मीं अलिप्त असल्यामुळें ऋणत्रयांतून मुक्त होतो. पोहण्यापेक्षां पायउतारा जसा सोपा, तसा हा भागवतधर्म इतर सर्व साधनांपेक्षां सोपा, सरस व सर्वसाध्य असा आहे. (अ.५–३४० ते ४७०)

**भावार्थरामायणांत** नाथांनीं रामनाममहिमा परोपरीनें गायिला आहे. येथें किंचित् दिग्दर्शन करितों:—

(१) नामस्मरणें चहूं पुरुषार्थांचा मार्ग सुगम होतो. 'करितां

रामनामस्मरण । जन्ममरणासी ये मरण । समूळ विरे मीतूंपण । भवबंधन बाधेना. ' मायामोहन व कर्मबंधन नामधारकास नाहीं! नामस्मरणांत ध्येय–ध्याता–ध्यान किंवा ज्ञेय–ज्ञाता–ज्ञान ही त्रिपुटी मावळून सर्व राममय होतें. अहंभाव, जीवभाव, मीपणाचा भाव सर्व मावळतात. नामघोष ऐकून काळ पळून जातो. ' श्रीरामनामगजरें । ब्रह्म स्वानंदें हुंबरे' म्ह० धेनु वत्साला पाहून जशी प्रेमानें हुंबरते, त्याप्रमाणें रामनामगजर पाहून परब्रह्म सुखावतें व नामधारकाला सहज वश होतें. ' नामें भुक्ति नामें मुक्ती । नामापाशीं ब्रह्मप्राप्ती ' हें पंडित पुराणांच्या आधारें बोलत असतील पण ही ( नाथ म्हणतात ) माझी प्रतीति आहे! ( बालकांड अ० १४ ओवी १५० ते १६० ).

( २ ) युद्धप्रसंगींही नामरंग सोडूं नये ! ' नामापाशीं विजय पूर्ण ' निश्चयें जाण हरिभक्तां ' नामचिंतनबळानें प्रळयांतही स्वरूपच्युति होत नाहीं, युद्धात सामर्थ्य येतें:—

**एका जनार्दना शरण । करितां श्रीरामस्मरण ।**
**भगवत्प्राप्ति अलोट ज्ञान । हें महिमान नामाचें ॥ १३० ॥**
**नामापाशीं भुक्तिमुक्ती । नामापाशीं यशकीर्ती ।**
**मापानाशीं विजयप्राप्ती । कर्मनिर्मुक्ती हरिनामें ॥ १३१ ॥**

फार काय सांगावें ' नामें प्रपंच ब्रह्मपूर्ण । नाम तें जाण परब्रह्म. ' ह्या अतिशय सुंदर ओव्यांत नामाचें गौरव फारच बहारीनें केलें आहे. ( अरण्यकांड अ० ६ )

( ३ ) नामस्मरण सत्संगें करावें म्ह० ' सकळ पापा होय दहन. ' ' आवडीं करितां रामगोष्टी ' किंवा ' श्रीराम देखिल्या निजदृष्टी ' सकल सृष्टि राममय होऊन जाते. ( किष्किंधाकांड अ० ८ )

( ४ ) ' मुक्तपणाच्या विलासा । वनिताअधरीं सुवर्णफांसा । पडोनि मुक्त आले नासा । रामपेरशा न भजोनी ' ह्या सुंदर ओवींत नाथांची आवडती कल्पना सुव्यक्त झाली आहे. येथें सुंदरीच्या नाकां-

तल्या नथेच्या मोत्यावर बहारीची उत्प्रेक्षा केली आहे. मुक्त ह्म० मोतीं व मुक्त म्ह० जीवन्मुक्त पुरुष. आपण मुक्त झालों आतां आपणांस रामभजनाचें कारण नाहीं अशा कारणें कोणी नामभजन सोडील तर त्यानें हें लक्ष्यांत ठेवावें कीं मुक्तमोतें मुक्तपणाच्या डौलांत वनितेच्या नाकांतल्या सुवर्णफासांत पडतात, ! मुक्तही भक्ति सोडील तर मी मुक्त ह्या अभिमानानें तो बंधनांत पडेल. म्हणून मुक्तानेंही भक्ति सोडूं नये. वरील ओवींतली नाथांची कल्पना अगदीं स्वतंत्र असून फार बहारीची आहे. ( किष्किंधा० १३-५५ ).

'एकादशी हरिजागर' करून नामघोषानें पृथ्वी पावन करणारा आपल्या कुळात कोणीतरी 'पुत्र अथवा भ्रातृपुत्र। दुहिता अथवा दौहित्र'-उत्पन्न होवो असे यमयातना भोगीत असलेले पितर इच्छितात.

**कलियुगाची थोर ख्याती। नामासाठीं लाभे मुक्ती।**
**स्त्रियादि अंत्यज ( ही ) उद्धरती। नामकीर्ति दाटुगी ॥ ६३ ॥**
**नामासी नाहीं स्नानबंधन। नामासी नाहीं विधिविधान।**
**आसनीं भोजनीं शयनीं जाण। नाम पावन हरीचें ॥ ६४ ॥**

हरिकीर्तनांत 'श्रोतेवक्ते दोघेजण। होती आनंदीं निमग्न' व श्रीरामनामानें स्वतः 'आनंदघन' होतात. रामनाम ही चित्कळा आहे व रामरंगानें चित्त रंगलें कीं संसारच राममय होऊन जातो !

**ऐसी जालिया विरक्ती। सद्गुरु तोचि ब्रह्ममूर्ती।**
**ऐसी उपजे अभेदभक्ती। सर्वांभूतीं भगवंत ॥ ८४ ॥**
**अभेद गुरुभक्तीचें ज्ञान। सर्वांभूतीं भगवद्भजन।**
**भूत-भौतिकें चैतन्यघन। ब्रह्मज्ञान या नांव ॥ ८५ ॥**

ही 'ब्रह्मस्थिति' किंवा 'सहजस्थिति' प्राप्त झाली असतांः—

**प्रपंच येथें जाला होता। हे समूळीं मिथ्या वार्ता।**
**पुढें होईल मागुता। कदा कल्पांतीं घडेना ॥ ८७ ॥**
**रामनामस्मरणासाठीं। परमानंदीं पडे मिठी।**
**ब्रह्मरूप प्रगटे सृष्टी। आनंदकोटी हरिनामें ॥ ९० ॥ ( सुंदर० )**

**अभंगांतही** नामसंकीर्तनावर नाथांनीं मुख्य भर दिला आहे. कलियुगीं नामासारखें जाणत्यानेणत्या सर्वांना उद्धारक असें दुसरें साधनच नाहीं. ‘ जीव शिव दोन्हीं विराले ज्यामाजीं ’ असें एक नामच ! ‘ अविनाशी नाम ’ आणि विठ्ठल दोन नाहींत. नाम आणि नामी यांचा अभेद आहे आणि तो नामधारक अंगीं अनुभवीत असतो. नामामृत अवीट आहे. त्याच्यासाठीं आम्ही सुखें जन्मांतरें घेऊं. ‘ तुझें नामीं अनुसरलों ’ व म्हणून आम्हीं ‘ तिन्हीं लोकीं सरते झालों.’ नाम हें खरें ‘ पतीतपावन ’ आहे, हें ‘ परमामृत ’ आहे. ‘ एका शरण जनार्दनीं । घेत नामामृत संजीवनी.’

**चार वेद सहा शास्त्र । अवघा नामाचा पसर ॥**
**अठरा पुराणांचे पोटीं । नामेंविण नाहीं गोठी ॥**

ज्याचें रूप डोळयांत, ध्यान मनांत व नाम मुखांत तोच तो आहे, यांत भेद नाहीं. नाम, नामी व नामधारक ही त्रिपुटी उरत नाहीं ही नामाची योग्यता आहे.

**घेउनि नामाचें अमृत । एका जनार्दनीं तृप्त ।**
**म्हणोनि सर्वांतें सांगत । नाम वाचें वदावें ॥**

* * *

**नाम गोड श्रीरामाचें । अमृत फिकें झालें साचें ॥ १ ॥**
**हो कां उत्तम चांडाळ । अधम खळाहूनी खळ ॥ २ ॥**
**रामनाम वदतां वाचे । पवित्रपणें तोचि साचे ॥ ३ ॥**
**एका जनार्दनीं नाम । भक्ति सायुज्य निष्काम ॥ ४ ॥**

नामापाशीं उंचनीच जातिअजाति हे कसलेच भेद नाहींत. ‘ नको जाऊं वनांतरीं । रानींवनीं आणि डोंगरीं ’ तर संसारांत खुशाल रहा, नामचिंतन सतत कर म्हणजे संसार ब्रह्मरूप होईल, वैकुंठ घरीं येईल. नामानें देवाचा वेध राहतो व वेधामाजी परमानंद ’ आहे. नाम मुखीं गातां विषयाची वार्ता । नोहेचि सर्वथा गातयासी ’ हा अनुभव आहे. ‘ निवांत बैसोनी मुखें नाम गाय ’ हा अभ्यास तर करून पहा. सकळ साधनांचें, तपांचें, ज्ञानांचें सार असें हें नामस्मरण आहे.

नामामृतापुढें । अमृत कायसें बापुडें ? ॥ १ ॥
नामें जोडे ब्रह्मज्ञान । भुक्ति मुक्ति नामें जाण ॥ २ ॥
एका जनार्दनीं सार । ब्रह्मज्ञानाचें हें घर ॥ ३ ॥
हेंचि अध्यात्मज्ञानाचें वर्म । येणें घडती कर्माकर्म ।
ब्रह्मविद्येचा आराम । येणें पावे सर्वथा ॥

*  *  *

नामधारक हो कां भलतां । त्याचे चरणीं ठेवि न माथा ॥
न ह्मणे उत्तम अधम । मुखीं जपतां रामनाम ॥
यातिकुळाचें कारण । नाहीं नाहीं नामाविण ॥
नाम जपे तोचि श्रेष्ठ । एका जनार्दनी वरिष्ठ ॥

ज्ञानेश्वराप्रमाणें नाथांचेही **'हरिपाठाचे अभंग'** प्रसिद्ध आहेत व ते लोकांच्या नित्य पाठांतही आहेत. त्यांचें केवळ दिग्दर्शन करितों.

(१) हरीचिया दासा हरी दाही दिशा । भावें जैसा तैसा हरि एक ॥१
जन्म घेणें लागे वासनेच्या संगें । तेंचि झाली अंगें हरिरूप ॥ २ ॥
हरिरूप झालें जाणणें हारपलें । नेणणें तें गेलें हरिचे ठायीं ॥ ३ ॥
हरिरूप ध्यानीं हरिरूप मनीं । एका जनार्दनीं हरि बोला॥ ४ ॥
( २ ) हरि बोला देतां हरि बोला घेतां । हांसतां खेळतां हरि बोला॥१
हरि बोला गातां हरि बोला खातां । सर्व कार्य करितां हरि बोला ॥२॥
( ३ ) यारे यारे धरूं हरिनाम तारूं । भवाचा सागरू भय नाहीं ।।३॥
साधुसंत गेले आनंदीं राहिले । हरिनामें झाले कृतकृत्य ॥ ४ ॥
एका जनार्दनीं मांडिलें दुकान । देतों मोलेवीण सर्व ' वस्तु ' ॥५॥
( ४ ) आवडीनें भावें हरिनाम घेशी । तुझी चिंता त्यासी सर्व आहे॥
नको खेद करूं कोणत्या गोष्टीचा । पति लक्ष्मीचा जाणतसे ॥ २ ॥
सकळ जीवांचा करितो सांभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ ३ ॥
जैसी स्थिती आहे तैशापरी राहे । कौतुक तूं पाहे संचिताचें ॥ ४ ॥
एका जनार्दनीं भोग प्रारब्धाचा । हरिकृपें त्याचा नाश आहे ॥ ५ ॥

---

## १२ सत्संगांची महती.

प्रापंचिकांच्या संगतींत प्रपंच्याच्या गोष्टीमात्र अहर्निश चालून प्रपंचाची प्रीति वाढते, विषयलोलुपांच्या संगतींत विषयासक्ति बळावते, राजकारणी पुरुषांच्या सहवासांत राजकारणाहून थोर कांहींच नाहीं असा मनाचा ग्रह बनून जातो, विद्यावंतांच्या संगतींत विद्याव्यसन जडतें, असा संगतीचा सर्वत्र परिणाम झालेला प्रत्यक्ष जर अनुभवास येतो, तर ज्यांना देवाचें अत्यंत प्रेम आहे अशा संतांच्या संगतींत देवाचें प्रेम कां उत्पन्न होणार नाहीं ? अवश्य होईल आणि होतेंही. ज्याला ज्याला परमार्थाची भूक लागली आहे, देव हवासा झाला आहे, त्याला सत्संगावांचून दुसरा मार्गच नाहीं. ' बहु पुण्य होय गांठीं । तरीच भेटी संतांची. ' सत्संगांत जीव रमला कीं नकळत तो संतांच्या मार्गाला लागतो व संतच होतो. ' संतचरणरज मस्तकीं पडे । देहसंदेह समूळ उडे । उघडती मुक्तीचीं कवाडें । कोंदाटे पुढें परब्रह्म. ' संत स्वतः आनंदरूप सुखस्वरूप असतात. ' संतसुखा नाहीं पार । तेणें आनंद पै थोर ' ' सुख अपार संतसंगीं । दुजें अंगीं न दिसे कोठें ' ' संतभेटीचा आनंदु । सुखसागर परमानंदु ' असा हा अनुभवच आहे. ' संतसांगात घडे । ब्रह्म सायुज्यता जोडे ॥ मुक्ति लागती चरणीं । ब्रह्मज्ञान लोटांगणीं–' मायबापाहूनही संतांचे उपकार अधिक आहेत.

**भाग्याचा उदय झाला । संतसंग मज घडला ॥ १ ॥**<br>
**तेणें आनंदाचे पूर । लोटताति निरंतर ॥ २ ॥**

**धन्य दिवस जाला । संतसमुदाय भेटला ॥ १ ॥**<br>
**कोडें फिटलें जन्माचें । सार्थक जालें पै साचें ॥ २ ॥**<br>
**आजचि दिवाळी दसरा । संतपाय आले घरा ॥ ३ ॥**<br>
**एका जनार्दनीं जाला । धन्य दिवस हा भला ॥ ४ ॥**

संत फार दयाळू असतात. शुचि–अशुचि, उत्तम–अधम, उंच–नीच इत्यादि कृत्रिम भेदभाव न ठेवितां ते सर्वांशीं समान प्रेमानें वागतात.

संतांच्या कृपेवांचून देव मिळत नाहीं. देवभक्तांचें परस्परप्रेम अपार आहे. 'मज आणिलें नामरूपा । त्यांची मजवर कृपा ह्मणून मीही संतचरण वंदितसे माथां' असें देव स्वतः ह्मणतात. 'भांबावला देव संतामागे धांवे!' म्हणून तो वैकुंठ सोडून पुंडलिकाच्या द्वारीं उभा राहिला आहे. संतावांचून देवाला कोण आहे व देवावांचून संतांना कोण आहे? संतापोटीं देव वसे । देवापोटीं संत असे ॥ ऐसा परस्परें मेळा । देव संतांचा अंकिला ॥' देव संतापाशीं प्रेमभिक्षा मागत असतो. सारांश' 'देव ते संत संत ते देव'—दोघे अभिन्नच आहेत!

**भाग्यवंत होती संत । दीन पतित तारिती ॥ १ ॥**
**उपदेश विठ्ठल मंत्र । देती सर्वत्र सारिखा ॥ २ ॥**
**स्त्रिया शूद्र अथवा बाळें । कृपाकल्लोळें एकाचि ॥ ३ ॥**
**एका जनार्दनीं शरण । पतित पावन संत होति ॥ ४ ॥**

**माझिये भक्तीच्या निजमार्गीं । रिगमू नाहीं विघ्नांलागीं ।**
**मी भक्तांच्या प्रेमभागीं । रंगलों रंगीं श्रीरंग ॥ ६७१ ॥**
**जेथ विघ्न धांवे भक्ताकडे । तेथ माझी उडी पडे ।**
**निवारीं निजभक्तांचें सांकडें । तीं लडिवाळें पै माझीं ॥ ६७६ ॥**
**भावें करितां माझी भक्ती । साधकां स्वसुखाची प्राप्ती ।**
**तेथें इच्छेसीं काम लोभ जाती । माझी सुखस्थिती मद्भक्तां ६८७**
**भक्त वर्ततां दिसती देहीं । परी ते वसती माझ्या ठायीं ।**
**मी अवघाचि त्यांच्या हृदयीं । सर्वदा पाहीं नांदत ॥ ६९० ॥**
**तूप थिजलें विघुरलें देख । तेवीं मी आणि भक्त दोनी एक ।**
**मज भक्तासी वेगळिक । कल्पांतीं देख असेना ॥ ६९३ ॥ (भाग०)**

भगवंताचें यश, भगवंताची भक्ति व भगवद्भक्ताचा समागम ह्या त्रिवेणींत स्नान केल्यावर अशुद्ध कोण राहील व संसार विघ्नें कोणाला बाधतील? पण '**माझी भक्ती आणि नामकीर्ती । यांची जननी सत्संगती**' म्हणून सत्संग एक जोडला कीं सर्व कार्य होतें!

**संत 'देवाचें देवतार्चन'**—यावर नाथांनीं १२ अभंग लिहिले आहेत.

# ११ एकनाथी भागवत.



## १ ज्ञानेश्वरी व नाथभागवत.

एकनाथी भागवत म्हणजे मूळ भागवताच्या एकादशस्कंधा नाथांची मराठी ओवीबद्ध टीका. ज्ञानेश्वरीनंतर सुमारें तीनशें वर्षांनीं तिच्याच तोलाचा हा रसाळ ग्रंथ मराठीभाषेंत निर्माण झाला. ज्ञानेश्वरांनीं गीतेवर टीका केली व नाथांनीं एकादशावर केली. गीता कृष्णार्जुन-संवादरूप आहे तर एकादश कृष्णोद्धवसंवादरूप आहे. दोन्ही ग्रंथांत प्रधान वक्ता भगवान् श्रीकृष्ण हेच आहेत, व म्हणून महाराष्ट्रांतील कृष्णभक्तिसंप्रदाय जो पंढरीचा वारकरीपंथ त्याचे हे प्रमाण ग्रंथ आहेत. हेच दोन ग्रंथ सर्व महाराष्ट्रांत प्रमुख मानले जात आहेत व त्यांची योग्यताही तशीच असामान्य आहे. स्थूलमानानें ज्ञानेश्वरी ९ हजार ओव्यांचा व नाथभागवत २० हजार ओव्यांचा ग्रंथ आहे. भागवतधर्माचे हे दोन प्रधानग्रंथ लोकप्रिय आहेत. ज्ञानेश्वर व एकनाथ आणि नामदेव, तुकाराम व निळोबाराय हे वारकरीपंथाचें पंचायतन होय. या पांचांस तो सर्वस्वी प्रमाण मानतो. या पंचकांत आचारविचारांची पूर्ण एकात्मता आहे. एकाच चकारींतून हे गेलेले आहेत. पंढरीच्या भागवत संप्रदायाचे हे पंचप्राण आहेत. ज्ञानेश्वरी बालवयांत निर्माण झाली असल्यामुळें बालभावानुरूप उल्हास, कवित्व व आनंदानुभव यांनीं ती उल्हासमय झाली आहे व नाथभागवत पन्नाशीच्या घरांत शिरलेल्या नाथासारख्या पूर्णपुरुषाची वाणी असल्यामुळें त्यांत गांभीर्य, मुरलेला ब्रम्हरस व रसाळपणा हे गुण विशेष आहेत. ज्ञानेश्वरींत गुप्त राहिलेले ज्ञानेश्वरांचे अभिप्राय नाथांनीं आपल्या भागवतांत विशद करून दाखविले आहेत. ज्ञानेश्वरीचें यथार्थ ज्ञान होण्यास नाथभागवत अवश्य

अभ्यासिलें पाहिजे. दोन्ही ग्रंथ मिळून एकच ग्रंथ आहे इतकी त्यांत एकात्मता आहे. दोन्ही ग्रंथ मराठी वाङ्मयाच्या सिंहासनावर शेजारीं-शेजारीं समान अधिकारानें विराजत आहेत. भागवतधर्माची पूर्ण ओळख नाथभागवतानें लोकांस करून दिली आहे. प्रस्तुत प्रकरणांत नाथभागवताचें यथार्थ स्वरूप वाचकांस दाखवावयाचें आहे. प्रस्तुत खंडांतला अत्यंत महत्त्वाचा लोकप्रसिद्ध व लोकप्रिय ग्रंथ हाच आहे.

---

## २ नाथ व भगवद्गीता.

ज्ञानेश्वरी टीका नाथांना अतिशय आवडली. त्यांनीं 'ज्ञानेश्वरी वाचा' म्हणून पांचसात वेळ आपल्या अभंगांतून सांगितलें आहे व मूळ गीतेवर आपला अभिप्राय ४।५ अभंगांत व्यक्त केला असून भागवतांतही एके ठिकाणीं गीतेची प्रशस्ती गायिली आहे. श्रीकृष्ण निजधामाला गेले, अर्थात् जन्ममरणपरंपरेंतले ते नव्हते, हें सांगतांना नाथांनीं सहज म्हटलें आहे कीं 'न जायते म्रियते' 'अक्षरं ब्रह्म परमं' 'क्षराक्षरातीत पुरुषोत्तम' इ. वचनें ज्याच्या मुखांतून निघालीं तो प्रकृतिपुरुषांचा बाप श्रीकृष्ण काळाच्या आधीन नाहीं हें सांगणेंच नलगे. कृष्णार्जुन ह्म० नरनारायणांची जोडी.

**बाप कृपाळु कृपानिधी । उपदेशिला युद्धसंधीं ।**
**परी लाविली जे समाधी । ते न मोडे त्रिशुद्धी कल्पांतकाळीं२७७**
**नाहीं स्थानशुद्धी चोखट । सैंघ रथांचे घडघडाट ।**
**सुटतां शस्त्रांचे कडकडाट । लाविली निर्दुष्ट परमात्मनिष्ठा २७१**

युद्ध करीत असतांना अर्जुनाची समाधि म्ह. आत्मनिष्ठा भंग पावली नाहीं हें गीतेच्या उपदेशाचें केवढें सामर्थ्य ! साक्षात् भगवंताच्या मुखानें निघालेली गीता अर्जुनालाही पूर्णत्व देती झाली नाहीं असें म्हणणें धाष्टर्य होय !

**गीता ऐके पाहे पढे । ज्यासी गीतास्मरण घडे ।**
**त्यासी पूर्णत्व स्वयें जोडे । मा उपदेशें नातुडे पूर्णत्व कैसे ? २७६**

**सारांश काढूनि वेदार्था । श्रीकृष्णें प्रगट केली गीता ।**
**तेथील अभिप्राय पाहतां । जोडे अक्षयता निजमोक्ष ॥ २७८ ॥**

पूर्णत्व, अक्षयत्व, मोक्ष देण्याचें सामर्थ्य गीतेंत आहे यांत संशयच कशाला? ज्याच्या निःश्वासें वेद जन्मले त्याच कृष्णाच्या मुखांतून गीता-जान्हवी प्रगट झाली आहे. वेदाला स्त्रीशूद्रजन दुरावले होते, वेद त्यांच्या कानाला शिवत नव्हता—

**तें वेदाचें फेडावया उणें । गीता प्रगटली श्रीकृष्णें ।**
**गीतेचेनि श्रवणें पठणें । उद्धरणें समस्तां ॥ २८२ ॥**

नाथांनीं गीतेवरील अभंगांतही ' जयाचे **अंतरीं** वसे नित्य गीता । पावन तो तत्वता ब्रह्मरूप ' असें म्हटलें असून ' गीता थोर ब्रह्मविद्या ' 'ब्रह्मविद्या गीता मोक्षाचें साधन ' अशाप्रकारें गीतेचें गौरव केलें आहे. गंगास्नानासारखें गीतापठण अंतर्बाह्य शुचित्व देतें. एक नित्यनेमाच्या गीतापठनानें सर्वसाधनांचें फळ मिळतें. गीतापठण मात्र **ऐक्यभावें** झालें पाहिजे व गीता अंतरांत वसली पाहिजे. ज्ञानेश्वरीचीं आवर्तनें करा म्हणजे गीतेचें रहस्य कळेल असें नाथ वारंवार सांगतात.

---

## ३ ग्रंथरचनेची प्रेरणा.

नाथांच्या बुद्धीचा व कीर्तीचा माध्यान्ह झाल्यावेळीं त्यांचा भागवत ग्रंथ निर्माण झाला. ' संतसज्जन एक वेळां । थोर करूनियां सोहळा । आज्ञापिलों वेळवेळां । ग्रंथ करविला प्राकृत ॥ एकांतीं आणि लोकांतीं । थोर साक्षेप केला संतीं '— याप्रमाणें संतसज्जनांच्या प्रेरणेनुसार नाथांनीं प्रस्तुत ग्रंथ रचिला. ' आम्हांसी पाहिजे ज्ञानकथा । वरी तुजसारिखा रसाळ वक्ता ' असें श्रोत्यांनीं विनविल्यावरून नाथांनीं प्रस्तुत ग्रंथास हात घातला. श्रीगुरु जनार्दनस्वामी व साक्षात् श्रीदत्तात्रय यांनींही आज्ञा करून प्रोत्साहन दिलें. श्रीदत्तांनींच ' प्रवर्तविलें ग्रंथकार्या । अर्थवावया निज-बोधू. ' त्यांच्या कृपेनें शब्द व शब्दार्थ दोन्ही गर्दी करून पुढें नाचायला

लागले. श्रीगुरूंनीं सर्वांग देखणें केलें. ते म्हणाले:— ' तुझा बोलुचि एकएकू । सोलीव विवेकाचा विवेकू । तो संतोषासी संतोषु । आत्यंतिकु उपजवी ॥ तुझेनि मुखें जें जें निघे । तें संतहृदयीं साचाचि लागे. '— श्रीगुरूंनींही असा पाठपुरावा केल्यावर मग काय कमी आहे ? ' देवो देवपणें दाटला । भक्तु भक्तपणें आटला । दोहींचाही अंतु आला । अभेदु जाला अनंतु '—अशा अद्वैतभक्तीच्या बैठकीवर प्रस्तुत ग्रंथाची रचना झाली. देव, गुरु व संत यांच्या कृपाशीर्वादाचें सिंचन झाल्यामुळें ग्रंथांत भावार्थाचा पदोपदीं उठाव होत गेला. श्रीगुरु बोलवीत असल्या-मुळें ग्रंथकर्तृत्वाचा भार किंवा अभिमान याचा मजकडे संबंध नाहीं.:—

**जनीं जनार्दनाचि एकला । तेथ एकपणें एका मिनला ।**
**तेणें एकपणाचा ग्रास केला । ऐसा झाला महाबोधू ॥ १९ ॥**
**श्रीभागवतीं संस्कृत । उपाय असतां बहुत ।**
**काय नेणों आवडलें येथ । करवी प्राकृत प्रबोधें ॥ २३ ॥**
**म्यां करणें कां न करणें । हें हिरोनि नेलें जनार्दनें ॥...२४॥(अ०२१)**

नाथाचा विनय आणि गुरुकृपाबळावर आधारलेला आत्मविश्वास ह्या दोन्ही वृत्तींचें मिश्रण त्यांच्या भागवतांत जागोजाग आढळतें. श्रीगुरूंच्या कृपेमुळें अर्थचिंतामणींची खाण उघडली व आयते अलंकार अंगावर चढले तर लेणाऱ्याचें काय जातें ? कळसूत्री बाहुलीकडून जर वाद्य वाजविलें गेलें तर तिच्या हाताला श्रम कोणते आहेत ? ' तैशीच हेही कथा । तूंचि ग्रंथु तूंचि कविता । तेथ कोणीं घ्यावी अहंता । मी कर्ता म्हणौनी ? ' ( अ० ६ ओवी १० ते १६ ). ह्याप्रमाणें ग्रंथकर्तृत्वाचा अहंकार आपल्यावर न घेतां नाथांनीं त्याचें सर्व श्रेय श्रीगुरु-जनार्दनास दिलें आहे. निरहंकाराची बैठक ग्रंथास मिळाली.

---

## ४ स्थलकालनिर्देश.

ग्रंथरचनेचे अखेरीस नाथांनीं स्थलकालनिर्देश केला आहे. ग्रंथाचा

प्रारंभ पैठणास करून तेथें पहिली पंचाध्यायी संपविली व पुढील सर्व ग्रंथ काशीक्षेत्रीं रचून तयार झाला. 'ग्रंथारंभीं प्रतिष्ठानीं। तेथ पंचाध्याय संपादूनी। इतर ग्रंथाची करणी। आनंदवनीं विस्तारिली.' आनंदवन म्हणजे काशीक्षेत्र. 'वाराणसी आनंदवन.' काशीलाच अविमुक्त व महास्मशान अशीं दुसरीं दोन नांवें आहेत. जेथें अधमोत्तम सर्व जीवांना मुक्ति मिळते, व त्या महास्मशानीं प्राण गेल्यानें पुन्हां मरणाची गांठ पडत नाहीं. काशीला 'वाराणसी' हें नांव पडण्याचें कारण नाथांनीं असें दिलें आहे कीं वरुणा आणि अशी या दोन नद्यांमध्यें ही विश्वेश्वरनगरी वसलेली आहे. 'वरुणा पातकांतें वारी। अशी महादोष संहारी। मध्यें विश्वेश्वरनगरी। वाराणसी खरी या हेतु' विश्वेश्वर तेथें आनंदानें क्रीडा करितात म्हणून तिला आनंदवन हें नामाभिधान प्राप्त झालें आहे.

**तया वाराणसी मुक्तिक्षेत्रीं। मणिकर्णिका महातीरीं।**
**पंचमुद्रा-पीठामाझारीं। एकादशावरी टीका केली॥**

ही टीका ऐकून श्रीगुरु स्वमुखानें म्हणाले कीं 'हे टीका तरी मऱ्हाठी। परी ज्ञानदानें होईल लाठी–' ही वाचून सज्ञान सुखी होतील, मुमुक्षूंना परमार्थलाभ होईल, साधक भवसिंधु तरून जातील व भाळेभोळे संसारिक यांना हरिप्राप्तीचा निश्चित व सुलभ मार्ग सांपडेल.

श्रीगुरूंनीं हें वरदान दिलेलें ऐकून नाथांस समाधान जाहलें. काशीस हा ग्रंथ विक्रम शके १६३० कार्तिक शुद्ध पौर्णिमेस वृषसंवत्सरीं सोमवारीं समाप्त जाहला. 'स्वदेशीचा शकसंवत्सर' त्याचाही उच्चार ऐका. शालिवाहन शके १४९५ श्रीमुख संवत्सर हा ग्रंथसमाप्तिकाल होय. ह्या ग्रंथांत मूळ संस्कृत श्लोक १५०० असून त्याचे अध्याय ३१ आहेत. 'हें ज्ञानगर्भ चिद्रत्न' जनार्दनकृपेनें हातीं आलें. एकादश म्हणजे एकावर एक– 'तेथ दुजेपणाचा न रिघे अंक'–तेच एकमेव परब्रह्माचें परमसुख एकादश इंद्रियांना प्राप्त करून देणारी ही टीका आहे. साधकांना येथें एकत्वाचें निजसुख मिळेल. 'जनीं जनार्दन एक' हें जो यापासून शिकेल तो भवचक्रांतून सुटेल.

## ५ भागवतधर्मपरंपरा.

नाथांनीं आपल्या भागवतांत भागवतपरंपरा दोन ठिकाणीं दिली आहे, एकदा ग्रंथारंभीं व एकदा ग्रंथाच्या उपसंहारांत. शिवाय चतुश्लोकी भागवतांतही ती दिली आहे. ती अशीः– आदिनारायणानें कल्पारंभीं ब्रह्मदेवाला तप करायला सांगितलें, व तपारंभींच त्याला भागवतधर्मरहस्याचें चार श्लोक सांगितले.

**' पावोनि चतुःश्लोकीचे ज्ञान । ब्रम्हा झाला ज्ञानसंपन ॥**
**करितां सृष्टीचें स्रजन । तिळभरी अभिमान बाधीना '**
**( चतु. भाग. ओवी २८ ).**

हें रहस्य मुरल्यावर त्याला सृष्टि उत्पन्न करण्याची योग्यता आली. ही कथा मूळ भागवताच्या २ ऱ्या स्कंधाच्या ९ व्या अध्यायांत सांगितली आहे व त्या चार श्लोकांना ' चतुःश्लोकी भागवत ' म्हणतात. ही चतुःश्लोकी थोरल्या भागवताचें बीज आहे. भागवताचे बारा स्कंध आहेत व त्याच्या ११ व्या स्कंधांत कृष्णोद्धवसंवादरूपानें भागवताचें सर्व अध्यात्मज्ञान सांगितलें आहे. भागवताचा अर्क म्हणजे एकादश स्कंध. एकनाथांनीं चतुःश्लोकी भागवतावर सुमारे हजार ओव्यांची टीका केली आहे, व शिवाय एकादश स्कंधावरही वीस हजार ओव्यांचा हा विस्तृत टीका ग्रंथ केला आहे. ब्रह्मदेवाला आदिनारायणानें जो बोध केला तो त्यानें नारदास दिला. ' तेणें नारदु निवाला । अवघा अर्थमयचि झाला । पूर्ण परमानंदें धाला । नाचों लागला निजबोधें ॥ १४७ ॥ तो ब्रह्मवीणा वाहतु । ब्रह्मपदें गीतीं गातु । तेणें ब्रम्हानंदें नाचतु । विचरे डुल्लतु भूतळीं ॥ १४८ ॥ ' वेदार्थ व पुराणें करणाऱ्या व्यासांना तो बोध नारदांपासून मिळाला. त्यानें व्यासांची संशयनिवृत्ति होऊन त्यांना समाधान प्राप्त झालें. व्यासांपासून तें भागवतार्थ ज्ञान शुकास मिळालें. व्यासांनीं भागवतग्रंथ रचून शुकास सांगितला, ' तेणें शुकही सुखावला । परमानंदें निवाला. ' भारती युद्धा-

नंतर तेंच ज्ञान सुभद्रार्जुनसुत जो परीक्षिती त्याला शुकांनीं भागवत सांगून मुक्त केलें. आदिनारायण, ब्रम्हा, व्यास, शुक अशी मूळ परंपरा आहे.

नाथांनीं भागवताच्या उपसंहारांत भागवतपरंपरेचें एक मौजेचें रूपक केलें आहे. तें म्हणतात कीं भागवतग्रंथ हें एक महाक्षेत्र ( मोठें शेत ) आहे. त्याचें पहिलें बीज ब्रह्मदेवाला मिळालें. पुढें नारदाकडे त्या शेताची मिराशी ( मालकी ) आली. त्यानें त्या शेतांत भागवतधर्मरहस्याची अद्‍भुत पेरणी केली! त्यानें दशलक्षणरूप दहा बांधारे पिकाच्या रक्षणार्थ घातले, ‘ तेणें पीक पिकलें अगाध । स्वानंदबोध निडारे. ’ तेथें शुक सोकारा ह्म० राखणदार झाला, व त्यानें हरिकथेच्या गोफणीनें पापपक्षी पार उडवून लाविले ! उद्धवानें त्या उभ्या पिकाची सवंगण ह्म० मळणी केली, एकादशस्कंधरूपी एक रास केली व कृष्णवचनरूप भरदार दाणे वेगळे काढले; नंतर नानायुक्तियुक्त प्रश्नोत्तरप्रकारानें ( कृष्णोद्धवसंवादरूप ) अविनाशी गोडी ज्यांत आहे अशी त्या दाण्यांची पक्वान्नें बनविलीं. अमृतमधुर अशीं पक्वानें एकादशस्कंधरूपानें काढून उद्धवानें जगावर अत्यंत उपकार केले आहेत. उद्धवाच्या मागल्या पंक्तीला श्रवणैकतत्पर असा **परीक्षिती** बसला व तो शुकमुखानें संपूर्ण भागवत ऐकून ‘ निजात्मतृप्ति लाधला. ’ त्यानंतर भागवतटीकाकार श्रीधर भावार्थदीपिका हातीं धरून भागवताचा पदपदार्थ स्पष्ट दाखविता झाला व स्वतः निजात्मस्थितीनें समाधान पावला. जनार्दनकृपेची माशी जो मी ( एकनाथ ) तो आपले देशभाषापदपक्ष उडवीत तेथें आला, त्याला कोणी उडवून लावलें नाहीं व तो तृप्ती होईतों जेवलाः ‘ तेथें देशभाषापदपक्षेसी । एकाजनार्दनकृपेची माशी । तृप्ति होय अवघ्यांसरिशी । निषेध तिशीं असेना ’ अथवा असेंही म्हणतां येईल कीं भावार्थदीपिकेच्या उजेडांत सरस पदार्थ पाहून जनार्दनाचें एका वेडें मांजर ‘ मी यों मी यों ’ करीत ताटापाशीं आलें व संतसज्जनांनीं कृपेनें त्याला पोटभर खाऊं घातलें ! संतांचें तें उष्टें ताट ( उच्छिष्ट ब्रह्मरस ) चाटून

मांजर पूर्ण तृप्त झालें. 'हो कां त्या समर्थांच्या ताटीं । पूर्ण ब्रह्मरसें भरली वाटी । ते मी अत्यंत प्रेमें चाटी । स्वानंदपुष्टी संतोषें'

वसुदेवानें भागवतधर्मरहस्य नारदाला विचारिलें व नवयोग्यांनीं विदेहाला जें पूर्वी सांगितलें होतें तेंच पुन्हा नारदानें वसुदेवाला ऐकविलें नवयोग्यांनीं नऊ प्रश्नांच्या उत्तरांत संपूर्ण भागवतधर्मरहस्य सांगितलें. नऊ प्रश्न असेः—'भागवतधर्म, भगवद्भक्त । माया कैसी असे नांदत । तिचा तरणोपाय येथ । केवी पावती अज्ञानी ॥ २७९ ॥ येथें कैसें असे परब्रह्म । कासया नांव म्हणिजे कर्म, अवतारचरित्रसंख्या परम । अभक्तां अधमां गति कैसी ? ॥ २८० ॥ कोणे युगीं कैसा धर्म । सांगावा जी उत्तमोत्तम' ( अ. २ ). एकादशाच्या पहिल्या पांच अध्यायांत ह्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं असल्यामुळें तिला भागवतधर्मपंचाध्यायी म्हणतात. मूळ भागवतग्रंथ भक्तिशास्त्राचा परमश्रेष्ठ ग्रंथ आहे. आपण आतां नाथ-भागवतांत हें भक्तिशास्त्र नाथांनीं कसें मनोहरवाणीनें विशद करून सांगितलें आहे तें पाहूं व परमभक्तीचा आनंद लुटूं.

---

## ६ भागवतधर्माची सुलभता व सर्वसंग्राहकता.

**भागवतधर्माची ख्याती । सप्रेम आदरितां प्रीती ।**
**तेणें तुष्टोनियां श्रीपती । दे सेवकाहातीं [1]आपणियां ॥ २९० ॥**
**इंद्रियें कोंडितां न कोंडती । विषय सांडितां न सांडती ।**
**पुढतपुढती बाधों येती । यालागीं हरिभक्ती [2]द्योतिली वेदें॥२९३॥**
**इंद्रियें कोंडावीं न लगतीं । सहज राहे विषयासक्ती ।**
**येवढें सामर्थ्य हरिभक्ती । जाण निश्चितीं नृपवर्या ॥ २९४ ॥**
**योगी इंद्रियें कोंडिती । तीं भक्त लाविती भगवद्भक्तीं ।**
**योगी विषय जे त्यागिती । ते भक्त अर्पिती भगवंतीं ॥ २९५ ॥**
**दारा सुत गृह प्राण । करावे भगवंतासी अर्पण ।**

---

१ आपणांस, निजस्वरूप. २ दाखविली.

हे भागवतधर्म पूर्ण । मुख्यत्वें भजन या नांव ॥ २९८ ॥
मनें करावें हरीचें ध्यान । श्रवणें करावें कीर्तिश्रवण ।
जिव्हेनें करावें नामस्मरण । हरिकीर्तन अहर्निशीं ॥ ३०० ॥
करीं करावें हरिपूजन । चरणीं देवालय गमन ।
घ्राणीं तुलसीआमोदग्रहण[1] । जिहीं हरिचरण पूजिलें ॥ ३०१ ॥
वाढतेनि सद्भावें जाण । चढतेनि प्रेमें पूर्ण ।
अखंड ज्यासी श्रीकृष्णभजन । त्यासी भवबंधन असेना ॥ ३०३ ॥
उभवूनियां चारी बाह्या[2] । निजात्मप्राप्तीच्या उपाया ।
' भक्त्याहमेकया ग्राह्यो ' । बोलिला लवलाह्या[3] श्रीकृष्ण॥ ३०९ ॥
न करितां नाना व्युत्पत्ती । सुगमोपायें ब्रह्मप्राप्ती ।
अबळें तारावया निश्चिती । भगवंतें निजभक्ति प्रगट केली॥३१६॥
स्त्रीशूद्रादि आघवे । घालूनियां ये नावे[4] ।
येकोचि खेपे स्वयें न्यावे । भजनभावें परतीरा ॥ ३२० ॥
भागवतधर्माचिये स्थिती । बाळीं भोळीं भवाब्धि तरती ।
सुखोपायें ब्रह्मप्राप्ती । होय निश्चिती सकळिका ॥ ३२८ ॥(अ०२)॥

---

## ७ भागवतधर्माचें स्वरूप.

भगवंतांनीं स्वमुखानें जीवांच्या उद्धारार्थ सांगितलेले धर्म ते भागवतधर्म. हरिभक्तीच्या योगानें ब्रह्मपदप्राप्ति अनायासें होते हा भागवतधर्माचा सिद्धांत आहे. योगाची किंवा कर्माची याला आडकाठी नाहीं. भागवतधर्माचरण हा आत्यंतिक कल्याणाचा सुलभ व सरळ मार्ग आहे. 'भोळे भोळे भवाब्धि तरती' याला हा एकच उपाय आहे.

( १ ) ' इंद्रियें कोंडितां न कोंडती । विषय सांडितां न सांडिती। '

---

१ हरिचरणीं वाहिलेल्या तुलसींचा वास घेणें. २ बाहू. ३ गडबडीनें, भक्तीच्या उल्हासानें. 'एकया' ह्म. अनन्यभक्तीच्या योगानेंच मी प्राप्त होतो असें श्रीकृष्ण स्वतः बोलिले आहेत. ४ भक्तीच्या नौकेंत (ज्ञाने. अ. १२–९०)

असा सर्व जीवांचा अनुभव आहे. इंद्रियें विषयांपासून जों जों आवरूं जावे तों तों तीं जास्तच भडकतात, म्हणून हरिभक्तिच श्रुतिशास्त्रांनीं सांगितली आहे. भगवद्भक्तींत चित्त रंगलें कीं 'सहज राहे विषयासक्ति' एवढें हरिभक्तीचें सामर्थ्य आहे. बायकापोरें घरदार सोडून जायला नको. हा सारा संसार हरीचा आहे हें जाणून त्याचा सेवक होऊन रहावें म्हणजे झालें. 'दारा सुत गृह प्राण । करावें भगवंतासी अर्पण' ही आत्मनिवेदन-भक्ति श्रेष्ठ आहे. इंद्रियें हरिप्रेमांत लीन करावीं म्हणजे तीं विषय अपाप विसरतात. 'मनें करावें हरीचें ध्यान । श्रवणें करावें कीर्तिश्रवण' या-प्रमाणें अकराही इंद्रियांना हरिसेवेची गोडी लावावी. 'वाढतेनि सद्भावें जाण । चढतेनि प्रेमें पूर्ण' अखंड श्रीकृष्णभजनांत तन्मय व्हावें. 'प्रेमें-वीण श्रुतिस्मृतिज्ञान । प्रेमेंवीण ध्यानपूजन । प्रेमेंवीण श्रवणकीर्तन । वृथा जाण नृपनाथा "–भक्तिप्रेमानें परमात्म्याला वश करावें म्हणजे कर्मा-कर्म, धर्माधर्म, विधिनिषेध यांची बाधा होत नाहीं. 'कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा–' 'हेतुक अथवा अहेतुक । वैदिक लौकिक स्वाभाविक । भगवंतीं अर्पे सकाळिक । या नांव देख भागवतधर्म ॥ उदकीं तरंग अति चपळ । जिकडे जाय तिकडे जळ । तैसें भक्ताचें कर्म सकळ । अर्पे तत्काळ भगवंतीं ॥' मन, बुद्धि, चित्त, अहंकृती सर्वच भगवंताला अर्पावींत. मनाच्या मागोमाग पंचज्ञानेंद्रियें व त्यांच्या मागोमाग पंचकर्में-द्रियें हीं अपाप जातात. मन हरिप्रेमोल्हालासानें भरलें कीं इंद्रियांच्या ठिकाणीं तोच प्रेमोल्हास प्रगट होतो. 'दीपू लाविजे गृहाभीतरीं । तोचि प्रकाशे गवाक्षद्वारीं । तेंवीं मनीं प्रगटला श्रीहरी । तोचि इंद्रियांतरीं भजना-नंदु॥' अशा भक्ताला संसारभय नाहीं. (अ. २–ओवी २८१ ते ३९१)

(२) भक्तीची समाधी योगाच्या समाधीहून वेगळी आहे. 'ताटस्थ्या नांव समाधी । म्हणे त्याची ठकली बुद्धी।'–ती खरी समाधी नव्हे, ती केवळ मूर्च्छा आहे. ताटस्थ्य गल कीं समाधिही गेली! अशी येते आणि जाते–समाधि आणि व्युत्थान– ती खरी समाधिच नव्हे! तीं एकदेशी

आहे! मन आणि बुद्धि जेथें ब्रह्मार्पण होतात व जी कधींही ढळत नाहीं तीच खरी समाधि होय. बुद्धि परब्रह्मस्वरूपीं रतली कीं संसार-कर्मे करितां, फार काय युद्धांत गुंतला असतांही जी भंग पावत नाहीं तीच खरी समाधि होय. 'निःशेष गेलियां देहबुद्धी। स्वरूपपणेंही फुंज न बाधी ॥' ती परम समाधी होय. मनबुद्धयादिकांचीं कर्मे-वर्णाश्रम-धर्मानुसार भागा आलेलीं सर्व कर्मे-यथान्याय होतात पण देहाभिमान उठत नाहीं, देहसंगांत राहून देहधर्म स्पर्शत नाहींत, अशी ही खरी समाधि ज्ञानभक्तीच्या योगानें प्राप्त होते. हरिस्वरूपीं अखंड समरसता यालाच भागवतधर्मांत समाधि म्हणतात. ( अ. २-४२० ते ४५० )

( ३ ) एक परब्रम्हाव्यातिरिक्त सत्यत्वानें प्रतीत होणारी दुसरी वस्तु नाहीं असा सिद्धांत आहे. 'आपुली कल्पना संपूर्ण। ते हे माया जाण' निर्विकल्प वस्तूच्या ठिकाणीं माया नाहीं. माया म्हणजे मी नाहीं अशी जी स्वमुखानें सांगते ती-आहे म्हणून आग्रह धरण्यांत अर्थ काय? 'संत म्हणो तरी नसे। नाहीं म्हणों तरी आभासे। आधीं असे पाठीं नासे। ऐसी ही नसे निजांगें' सूर्याच्या ठायीं संकल्प नसून त्याच्या प्रकाशानें सूर्यकांत उपाधिमुळें अग्नि प्रकाशमान होतो किंवा उखर जमी-नीवर मृगजळ भासतें, पण याचा सूर्याशीं कांहीं संबंध नाहीं 'तेवी शुद्धस्वरूपीं पाहीं। संकल्पमात्र कांहीं नाहीं.'। मी ब्रम्ह आहे असें मी-पणाचें जें स्फुरण त्यालाच माया म्हणतात. मी बहु व्हावें, नानात्वानें म्यां नांदावें, असें जें स्फुरण तेंच मायेचें रूप आहे, पण शुद्ध वस्तूच्या ठायीं हें कांहीं नाहीं. माया मिथ्या आहे हें दाखविण्यासाठीं नाथांनीं वंध्यापुत्राची पत्रिका, गंधर्वनगरींत मृगजळाची पाणपोई, काजव्याच्या प्रकाशावर लावलेला दिवा, बागुलबोवाची त्याच्या मरणानें होणारी विधवा, आकाशाची सुमनें,इ० मोजेचे दृष्टांत दिले आहेत. 'निजछायेचें शिर फोडा। आकाशाची त्वचा काढा' अथवा 'वांझेचे सुने पुत्र झाला 'तेथ भीष्मस्त्रिये पान्हां आला'— 'तैसें मायेचें जें बोलणें। तें

सांगतांचि लाजिरवाणें । नुपजे त्यांचें श्राध्द करणें । तैशी सांगणे महामाया ' माया ही नसतेनि रूपें रूपा आली । सत्यासत्यें गरोदर जाली । तिला असत्याचीं असंख्य पिलें जालीं। ती । वासना विषयगुणीं । गुंफली मिरवे वेणी । मीपणाच्या तरुणपणीं । मदनमोहिनी चामके । मृगजळीच्या मुक्ताफळीं । मस्तकीं बाणली जाळी । गगनाच्या चांफेकळीं । मिरवे वेल्हाळी अतिसौंदर्यें ॥ शशविषाणपादुका । लेऊनि ते चाले देखा । तिसी अहंकारसखा । अतिनेटका जेष्टपुत्र ॥ कुळविस्तारालागीं पाहीं । ममता व्याली ठायीं ठायीं । मोह उपजवूनि देहीं । घरजांवाई त्या केला ॥ संकल्पाविकल्पांची कांकणें । बांधोनि मन दिधलें आंदणें । घालोनि त्रिगुणाचें ठाणें । माया पूर्णपणें थोरावे । — अलीकडच्या भाषेंत बोलायचें तर मिथ्यामायेवर रूपकात्मक । असें हें एक सुंदर '**विडंबनकाव्य**' नाथांनीं केलें आहे ! असो. माया सत्य असती तर असा कोण मायेचा पूत आहे.– 'कवणाचेनि संतानें'–कीं जो ती तरून गेला असता ! पण अनेक जीव ब्रह्मपद पावले आहेत. यावरून तिचें मिथ्यात्व सिध्द होते. कुंभारानें असंख्य मडकीं घडलीं तरी त्यांत आकाश अनुस्यूत असतें त्याप्रमाणें ' भूतभौतिकाकारीं । समन्वयें हरी सर्वदा सर्वी ' आहे तो घ्यावा ( अ० ३ ).

भगवद्भक्ताला मायेचें भय नाहीं. माया म्हणजे स्वस्वरूपाचें अज्ञान, अज्ञान म्ह० द्वैताचें भान आणि द्वैतापाशीं भय असतें. ' मायेचें मुख्य लक्षण । स्वस्वरूपाचें आवरण । द्वैताचें स्फुरे स्फुरण । मूळमाया जाण तिचें नांव. ' ब्रह्म अद्वयत्वें परिपूर्ण आहे, अर्थात् तेथें द्वैताचें स्फुरण नाहीं व म्हणून भयही नाहीं. मायेचें म्ह० अज्ञानाचें विरोधी एक ब्रह्मज्ञान आहे आणि तें भक्तीवांचून ठरत नाहीं. शब्दज्ञान कांहीं मायानिवर्तक नाहीं. ब्रह्मज्ञानानुभव येतो तेव्हांच माया नाहींशीं होते आणि तो अनुभव अनन्यभक्तालाच होतो. भक्ति ज्ञानाची जननी आहे

आणि ज्ञान मायानिवर्तक म्ह० मोक्षदायक आहे. ज्ञानी भक्तच निर्भय असतो ( अ० २ ओवी ४५४ ते ४७४ )

( ४ ) भाळेभोळे जन कसे तरतील याचा सुगम उपाय सांगतों. हरीचीं जन्मकर्मे, लीलाचरित्रें व गुणानुवाद श्रवण करावें व श्रवणाचें सावधान चित्तानें मनन करावें. ' चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता ' माता ज्या आतुरतेनें ऐकते त्याच आतुरतेनें हरिकथा ऐकावी. श्रद्धेनें मननयुक्तश्रवण करावें व नामरंगीं रंगून जावें. जपतपयोगादिकांना असाध्य अशी तन्मयता संकीर्तनभक्तीनें होते. कीर्तनानें चित्त परमानंदांत सदा डोलत असतें, प्रपंचभान उरत नाहीं व चतुर्भुज परमात्मा रक्षणार्थ तत्पर असतो. ' चक्रें अभिमानाचा करी चेंदा। मोहममता छेदी गदा। शंखें उद्बोधी निजबोधा। निजकमळें सद निजभक्त पूजी. ' भक्ताला भवभयाची वार्ता कोठून राहणार ? नामस्मरणापुढें पापाची, भवाची, कळिकाळाची भीति उरत नाहीं. नामाची शक्ति अद्भुत आहे. ' जेवढी नामाची शक्ति। तेवढें पाप नाहीं त्रिजगतीं ! ' जागृतींत हरीची प्रीति धरली कीं स्वप्नींही तेचि स्थिति होऊन हरिभक्ति दृढ होते, अद्भुत प्रेमानें चित्त आर्द्र होतें व भक्तीच्या पेठेंत जीवशिवांची गांठ पडून एकात्मता होते. ' पदोपदीं निजसुख। कोंदाटे अधिकाधिक ' व त्या ' परमानंदानें तो नाचों उडों लागे ! '

**जो मोलें मदिरा खाये। तो मदिरानंदें नाचे गाये।**
**मा जेणें ब्रह्मानंदु सेविलाहे। तो केविं राहे आवरला ? ॥ ५७७ ॥**
**ब्रह्मउन्मादपरमानंदें। जंव जंव पाहे स्वानंदबोधें।**
**तंव तंव चराचर पूर्णानंदें। देखे स्वानंदकंदें दुमदुमित ॥ ५८० ॥**

पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, सूर्यचंद्रादि ज्योति, सर्व प्राणिमात्र, दशदिशा, वृक्षवल्ली, नद्या व समुद्र– सारें विश्व त्याला हरिमय होऊन जातें व तो सर्व प्राण्यांपुढें नम्र होऊन जातो ! अभेदभावानें तो अखिल विश्व पाहतो.

**जेवीं कांतोनियां रंध्रसळें । स्फटिकदीपगृह अंगमेळें ।**
**चितारिलीं अश्वगजदळें। तीं भासती सोज्वळें आंतुलेनि दीपें॥५८३॥**
**तेवीं सोमसूर्यादि तेजशक्ती । कां वन्हि नक्षत्रें जे लखलखिती ।**
**जननयनादि निजदीप्ती । देखे आत्मज्योति सतेज ॥ ५८४ ॥**

भोंक पाडावयाच्या सळईनें ( रंध्रसळें ) स्फटिकशिला कांतून तिचें दीपगृह केलें व तिच्यावरच एकसंधी अश्व, गज, सैन्यें इत्यादि कोरून ठेवलीं आणि आंत दिवा लावला म्हणजे आंतील तेजःपुंज दीपज्योति-प्रकाशानें तीं चित्रें प्रकाशूं लागतात; त्याप्रमाणेंच सूर्य, चंद्र, नक्षत्रें, जननयनांतील तारका हीं सारीं आत्मज्योतीच्या प्रकाशानें चमकतात असें ईश्वरभक्त जाणतो ! दुसरा दृष्टांतः—

**युक्तीं मेळवितां द्रव्यांतर । अग्नि परिभासे पुष्पाकार ।**
**तेवीं वस्तु स्वलीला साचार । रविचंद्राकार नानात्वें भासे ॥५८५॥**

अनेक पदार्थ आंत मिसळून लग्नादि मोठया सोहळयाच्या प्रसंगीं उडवावयाची दारू तयार करितात व ती उडविली कीं एकाच अग्नि-स्फुलिंगांतून नानावर्णांचीं व नाना आकृतींचीं हजारों फुलें बाहेर पडतात; त्याप्रमाणें एकच आत्मवस्तु लीलेनें रविचंद्रादिरूपानें अनंतप्रकारें भासते ! याहूनही सोपा व परिचयाचा दृष्टांत देऊन सांगतातः—

**जैशा आपुल्या आंगोळिया । गणितां दिसती वेगळालिया ।**
**परी असती लागलिया । स्वयें सगळिया अखंड अंगीं ॥ ५९१ ॥**

जशीं हाताचीं बोटें मोजूं जातां वेगवेगळीं दिसतात, पण सारीं एका अंगाला अखंड लागलेलीं असतात; त्या ' एका देहीच्या अवयवाप्रमाणें ' सारें विश्व आत्मरूप म्हणजेच हरिरूप आहे असें भक्त पहातो व ' यत्किंच भूतं प्रणमेदनन्यः '– ' गो खर चांडाळ श्वान । अति निंद्य जे हीन दीन । ते भगवद्रूप देखोनि पूर्ण । घाली लोटांगण अनन्यभावें. '

( ५ ) सर्वांभूतीं भगवद्भाव हा भागवतधर्माचा आत्मा आहे. असा हरि सर्वत्र प्रगट आहे तर तो सर्वांना सारखा कां प्रतीत होत नाहीं ? या

शंकेला नाथांचें बहारीचें उत्तर आहे तें असें कीं 'पृथ्वी गंधरूपें स्वयें असे। तो गंधु कस्तुर्यादिकीं भासे। तेवीं भगवत्सत्ता सर्वत्र असे। परी सात्विकीं दिसे अतिप्रगट ॥'– पृथ्वी गंधवती खरी पण कस्तूरींत तो गंध अधिक प्रगट भासतो, तसा परमात्मा सर्वत्र असूनही सात्विक बुद्धींतच अधिक प्रकाशमान होतो. बुद्धि सात्विक करावी म्हणजे प्रतीति येईल हा भाव !

( ६ ) भोजन करणाराला घांसाघांसागणित तुष्टि, पुष्टि व क्षुच्छांति यांचा लाभ होतो त्याप्रमाणें भक्ताला हरिप्रेम, अपरोक्षानुभव व वैराग्य यांचा एककालीं लाभ होतो व तो पराशांतिसुख भोगतो. भक्ति व विरक्ति ही, नाथ सांगतात, जावळ्या फळासारखी एकत्रच नांदतात. 'जेवीं कां भुकेलियापाशीं। ताट वाढिलें षड्रसीं। तो पुष्टि तुष्टि क्षुधा नाशाशीं। जेवीं ग्रासोग्रासीं स्वयें पावे॥' त्याप्रमाणें सद्भावानें भगवद्भक्ति करणाराला भक्ति, ज्ञान, वैराग्य या तिहींचा लाभ एकदमच होतो.

**भक्ती म्हणिजे सर्वांभूतीं। सप्रेम भजनयुक्ति।**
**प्राप्ति म्हणिजे अपरोक्षस्थिती। भगवत्स्फूर्ती अनिवार॥६१४॥**

विरक्ति म्हणजे स्त्रीपुत्रादिकांवरील अहंभाव नष्ट होणें; भक्ति म्हणजे सर्वांभूतीं सप्रेम भगवद्भाव असणें व प्राप्ति म्हणजे आत्मसाक्षात्कार, अपरोक्षानुभव हे हरिभक्ताला तीनही एकदम मिळतात.

( अ० २ ओवी ५२४ ते ६१७ ).

---

## ८ मोक्षाच्या नानासाधनांत भक्तिच श्रेष्ठ.

**उद्धवाचा प्रश्नः**— मोक्षाचीं साधनें किती ? तीं अवघींच समान कीं त्यांत कांहीं गौण व कांहीं प्रधान असा भेद आहे ? 'माझ्या स्वरूपीं ठेवूनी मन। फळाशेवीण माझें भजन' हा० निष्काम ज्ञानभक्ति हें मोक्षाचें मुख्य साधन असें देवांचें उत्तर आहे.

देव विचार करूं लागले कीं ज्ञात्यांच्या त्रिगुण प्रकृतीमुळें नानापंथ नाना मतें जगांत उत्पन्न झालीं आहेत, तथापि 'साधनांमाजीं मुख्य

भक्ति। ध्यानयोगस्थिति समाधियुक्त' ह्म० परमात्मध्यानानें तन्मयता पावणें हीच खरी भक्ति होय असेंच उद्धवास व उद्धवाच्या मिषानें जगास सांगायचा हा प्रसंग चांगला आहे.

**भगवंतांचें उत्तरः**—'प्रकृति तैशा भावना व गुण तैशा वासना' यामुळें वेदानें एकच तत्व सांगितलें असून लोकांत वेदार्थासंबंधानेंही भिन्न मतें होतात व भिन्न भिन्न शाखा किंवा शिष्यपरंपरा उभ्या राहतात. वेदज्ञांची ही गोष्ट मग इतर लोकांत वेदबाह्य पाखांडमतें उत्पन्न झालीं तर त्यांत नवल कसलें? मायामोहानें व्यात झाल्यामुळें मोक्षाचें दार चुकून साधनांच्या खटाटोपांत जाणतेही पडतात. मीमांसक कर्मानें मोक्ष होतो असें मानतात; कामशास्त्रकार कामभोगानें मोक्ष मानतात; सांख्य शमदमसत्य हेंच मोक्षमार्गाचें भांडवल मानतात; नीतिशास्त्रकार (व्यवहार-शास्त्री) हें सार्वभौमराज्यप्राप्तीलाच मोक्ष मानून सामदामादि त्याचें साधन होय असें सांगतात; कांहीं शिखासूत्रत्यागानें ह्म० संन्यासमार्गानें मोक्ष होतो असें ह्मणतात; देहात्मवादी हे तर 'स्वेच्छभोग भोगावे' यांतच मोक्ष मानतात! कोणी अश्वमेधयज्ञ, कोणी शरीरशोषणादि तप, कोणी सविधि मूर्तिउपासना, कोणी दान, कोणी व्रत, याप्रमाणें आपापल्या आवडत्या मार्गालाच मोक्षाचा निश्चित हाच मार्ग म्हणून प्रशंसित असतात! काव्यनाटकालंकारांचें भक्त काव्यरचनेनेंच मोक्ष जवळ येईल असें म्हणतात! एवं 'नानासाधनसंभ्रमें बोलती लोक!' हीं सर्व साधनें उद्धवा! अनित्य आहेत, क्षुद्रानंद देणारीं आहेत. फलाशा व देहाभिमान सोडून भगवदर्पणबुद्धीनें जें साधन केलें नसेल तें तें दुःखदायकच होणार. भगवद्भक्तीला मुख्य करून जो कोणी वरील साधनांपैकीं कांहीं करील तर तो मोक्षाच्या जवळ जाईल (अ० १४ ओवी २५ ते ८३).

सत्संगतीनें भक्तियोग मिळविणें यापेक्षा संसार तरून जाण्यास दुसरा उत्तम उपाय नाहीं. 'माझिये प्राप्तीलागूनी। भक्तिज्ञान मार्ग दोनी,' पण ज्ञान अत्यंतदुर्लभ असून भक्ति निर्विघ्नपणें देवाच्यासन्निध नेऊन सोडते.

**उपायांमाजी अति प्रांजळ । निर्विघ्न आणि नित्य निर्मळ ।**
**माझा भक्तियोग केवळ । ज्ञान तें विकळ मध्यपाती ॥ १५३० ॥**

बागेंतला मळा भिजवायला मोटेचें पाणीही चालतें व मध्यें नदीचा पाट वाहत असला तरीही चालतो. पण मोटेचें पाणी म्हणजे मोट, नाडा, बैलजाडी, आसुडानें बैलांना मागेंपुढें खेचण्याचे श्रम, व इतकें करून भिजणारी जमीन थोडी! 'तैसा नव्हे सरितेचा पाट । एक वेळ केल्या वाट । अहर्निशी घडघडाट । चालती लोट जीवनाचे.' हा सुंदर साधा दृष्टांत देऊन नाथ म्हणतात कीं मोटेचें पाणी तैसें ज्ञान, व सरितेचा अखंड वाहणारा पाट तसा भक्तिमार्ग होय ! भक्तिमार्गानें जातां हजारो लोक निर्विघ्नपणें संसार तरून भगवंताला मिळतात. तसेच वेदशास्त्राध्ययनाचे श्रम होत. कोणी कर्म, कोणी संन्यास, कोणी प्रारब्ध, कोणी मौन अशी साधनें सांगातात. 'ज्याची चढे अधिक युक्ती' तोच ज्ञाता म्हणून मानला जातो. एक म्हणती तप प्रमाण, एक म्हणती पुरश्चरण, एक म्हणती वेदाध्ययन, एक म्हणती द्यावें दान–'एक तों हें अवघेंचि मोडी, लावी आसनमुद्रेची वोढी!' म्हणजे योगाच्या कचाट्यांत घालतात. एक निश्चय नाहीं आणि अभिमान सपाटून ! ही ज्ञानमार्गाची गति. पंडितांची व्युत्पत्ति विघ्नीभूत होऊन नासून ,जाते–' माझी निजप्राप्ती तेथ नाहीं!'–' तैसी नव्हे माझी भक्ति '

**माझें करितां गुणवर्णन । कां हरिकथा नामसंकीर्तन ।**
**तेथ रिघों न शके विघ्न । गडगर्जन हरिनामें ॥ १५४४ ॥**
**जेथें हरिनामाचे पवाडे । तेथ विघ्न कैंचें बापुडें ? ।**
**पळे मद्भक्तांपुढें । उघडती कवाडें मोक्षाचीं ॥ १५४५ ॥**

माझे भक्त मोक्षाचीही आस धरीत नाहींत म्हणून अशा निष्काम भक्तांच्या भक्तीला भुलून देव सांगतात–मी त्यांच्यापाशींच राहतो. एवं मार्ग नाहीं भक्तीपरता ' हा सिद्धांत आहे.

**कोटि जन्मांची पुण्यसंपत्ती । जरी गांठीं असेल आइती ।**
**तैं जोडे माझ्या भक्तांची संगती । सत्संगें भक्ती उल्हासे ॥१५५१॥**

भक्त हे आकाश तुटून पडले तरी देवावांचून जगांत दुसरे श्रेष्ठ कांहींच मानीत नाहींत म्हणून 'संतांशीं मज भिन्नपण। कल्पांतींही नाहीं जाण' तात्पर्य '**सत्संगीं भक्तियोग**' हा सर्वोत्कृष्ट उपाय होय ( अ० ११ ओंवी १५२८ ते १५६२ ).

---

## ९ भाव, भक्ति आणि मुक्ति.

देवाचें सुख किंवा स्वात्मसुख भोगतां येण्यास भक्तिभावाचें आत्यंतिक साह्य पाहिजे. तार्किक, तर्कटी, संशयी, रूक्ष मनाला तें सुख भोगतां यावयाचें नाहीं. भावानें भक्तांची जोड होते. देवाविषयीं पूर्ण आस्तिक्य-बुद्धि, श्रद्धा, याचें नांव **भाव**, सर्वांभूतीं देव अनुभवणें म्ह० त्याला भजणें ही **भक्ति** व देवांत विश्वासकट आपण मुरून जाणें ही **मुक्ति** ! नाथांनीं अभंगांतून याचा खुलासा केला आहे. 'भावें भक्ति फळे। भावें देव मिळे। निजभावें सोहळे स्वानंदाचे.' भावाचा पाया दृढ असल्या-वांचून परमार्थाची इमारत उभीच राहायची नाहीं. 'भाव लागला भगवंतीं।' त्यालाच 'हरिरूप पवित्र जगती' होते, 'एका भावासाठीं देव धावे उठाउठी.' सुदामदेवाचे पोहे, द्रौपदीचें भाजीपान, विदुराच्या कण्या, गौळियांचें उच्छिष्ट त्यांच्या त्यांच्या भावासाठीं देवानें सेवन केलें. देव भावाचा भुकेला आहे. गोपगोपिकांना त्यांच्या भावामुळें देव कृपावंत झाला. भावासाटीं देव 'अंकितांचा अंकित' होतो. 'भाव भजनातें निपजवी। भक्त देवातें उपजवी' म्हणून 'भक्त वडिल देव धाकुला' व 'भक्त देवाचाही बाप' असें नाथ कौतुकानें म्हणतात! एका भावानें सर्व कार्य सिद्ध होतें. भावानें उपाधि तुटतात, भावानें आधिव्याधि जातात. भजन, संतसेवन, योग, याग, तप सर्व कांहीं भाव असेल तर सुफल-प्रद होते, म्हणून भावानें देवाला शरण जावें. देव पाषाणाचा आहे असें जो भावतो त्याला ती पाषाणाचीच मूर्ति आहे; पण पाषाणमूर्ति चैतन्य-घन आहे असा ज्याचा भाव आहे त्याला ती खरोखरच चैतन्यमय

आहे ! ‘ जो जया चित्तीं भाव । तया तैसा होय देव. ’ वस्त्रहरणप्रसंगीं माधव पाठीशीं आहे असा द्रौपदीचा भाव होता म्हणूनच तिच्या भावा-मुळें देव पाठीशीं उभा राहिला. देव नामदेवाच्या हातचा दुधाचा प्याला पिऊन गेला किंवा त्यानें जनाबाईचीं लुगडीं धुतलीं हें त्यांच्या त्यांच्या भावबळानें झालें. भाव आणि कल्पना यांत महदंतर आहे. कल्पना बिनबुडाची असते, ती क्षणोक्षणीं बदलते ! भावाला स्थायीपण आहे. देव भावाचा भुकेला आहे, भावाचा लंपट आहे. ‘ मुख्य आधीं पाहिजे भाव । तेणें देव कव ( उडी ) घाली.’ ‘ प्रल्हादाच्या भावासाठीं ’ देव स्तंभांतून प्रगटला. ‘ हृदयीं ठसतांचि भावो। प्रगटे देवाधिदेवो. ’ भावानें भक्ति व भक्तीनें आत्मानुभव होतो. भावावांचून सर्व साधनें फोल आहेत. ‘ एकाजनार्दनीं भाव । पाववी तो अक्षय ठाव. ’ भावा-वांचूनि देव न येचि हाता !

**भावें करा रे भजन । भावें करा नामस्मरण ॥ १ ॥**
**भावें जावें पंढरीसी । भावें नाहावें भीमरथीसी ॥ २ ॥**
**भावें करा प्रदक्षिणा । भावें करा जागरणा ॥ ३ ॥**
**भावें व्रत एकादशी । एका शरण जनार्दनासी ॥ ४ ॥**

भजनानें देव जोडतो असा भाव असेल तरच भजन केल्याचें फळ. ‘ भाव तोचि देव । भाव तोचि देव । ये अर्थी संदेह धरूं नका ’ असें नाथ स्पष्ट सांगतात. सोन्याचें रूप होतें तसी भावाचीच भक्ति होते ! भक्ति म्हणजे अखंड संलग्नता. ‘ पाउलापाउलीं चिंतावी माउली । विठाई साउली आदिअंतीं ’ हें ज्याचें अखंड म्ह० चारी देहांत व चारी अवस्थांत चिंतन आहे तोच भक्त. ‘ भक्तामाजीं देव असे। देवा-अंगीं भक्त दिसे. ’ मी देह व भक्त माझा आत्मा असें देव प्रेमानें सांगतात. ‘ भक्तासाठीं अवतार । ऐसा आहे निर्धार ’ मला ज्यांनीं नामरूपाला आणले त्या भक्ताचा उपकार मी फेडूं शकत नाहीं असें देव म्हणतात. ‘ एका जनार्दनीं निर्गुण । भक्तें सगुण मज केलें. ’ ‘ सर्वांभूतीं देवाधिदेवो हा ज्यांचा अनुभव अशा भक्तांचा मी योगक्षेम वाहतों, त्यांचें

लहानमोठें सर्व कार्य करितों असें देव भक्तमुखानें म्ह० अनुभवीयांच्या मुखानें सांगतात.

**शुद्ध करूनियां मन। नारायण चिंतावा।**
**मग उणें नाहीं कांहीं। प्रत्यक्ष पाहा अनुभव॥**

* * * * *

**भक्ताचीये काजे। देव करितां न लाजे॥**
**हा तों पहा अनुभव। उदार पंढरीचा राव॥**
**न विचारी यातीकुळ। शुचि अथवा चांडाळ॥**
**एका जनार्दनीं शरण। एका भावें निंबलोण॥**

* * *

**बाळकांचा धन्य भावो। खापरें मांडूनि म्हणती देवो॥**
**तेथही प्रगटे देवाधिदेवो। धरिल्या निःसंदेहो विश्वास॥**
**बाळकें दूध मागावयासाठीं। भावार्थें लागला देवापाठीं॥**
**कां क्षीराब्धी करूनि वाटी। उपमन्या वोठीं लाविलीं॥**
**यालागीं जेथ भावार्थ। तेथचि जोडे सुखस्वार्थ॥**
**भावार्थ तेथें परमार्थ। सांग साधेत सांपडे॥ ( भाग० अ० २४ ).**

भाव कसा वाढवावा त्याचें संवर्धन कसें करावें ? नाथ सांगतातः—

**वाचा नेमावी माझेनि नेमें। मन नेमावें ध्यानसंभ्रमें॥**
**प्राण नेमावा प्राणायामें। इंद्रियें दमनें नेमावीं॥ ॥**
**बुद्धि नेमावी आत्मविवेकें। जीव नेमावा परमात्मसुखें॥**
**इतुकेन तूं आवश्यकें। होसी कौतुकें मद्रूप॥ ॥**
**मन बुद्धि इंद्रियें प्राण। अवश्य नेमावीं गा जाण॥**
**वृत्ति करोनि सावधान। माझें भजन जो करी॥ ॥**
**भावें करितां माझी भक्ती। विषयवासना जळोनि जाती।**
**निर्विकल्प उपजे शांती। माझे भक्तिपंथीं चालतां॥ (भा०अ०१६)**

देवाचा भक्त तो कोणाचाही अंकित नाहीं. देव, ऋषि, आचार्य,पितृगण, भूतमात्र यांचें ऋण सामान्यतः मनुष्याच्या हातून फिटणें अशक्य आहे. तें अंशतः फिटावें म्हणून शास्त्रानें पंचमहायज्ञ सांगितले आहेत.

पण भगवद्भक्त हा सर्वांच्याच ऋणांतून मुक्त होतो. ( अ० ५ )

**जो विनटला हरिचरणीं । तो कोणाचा नव्हे ऋणी ॥**
**जेवीं परिसाचिये मिळणीं । लोह काळेपणीं निर्मुक्त ॥ ४६२ ॥**
**भावें करितां भगवद्भक्ती । सकळ पितर उद्धरती ॥**
**ऋषीश्वरां नित्य तृप्ती । भगवद्भक्तिस्वानंदें ॥ ४६४ ॥**
**भक्त नव्हे कर्मांचा सेवक । नव्हे देवांचा पाइक ॥**
**नव्हे प्राकृतांचा रंक । अनन्यभाविक हरिभक्त ॥ ४६८ ॥**

अभेदभाक्ति, पराभाक्ति किंवा ज्ञानोत्तरभक्ति हीच श्रेष्ठभक्ति होय. तिचें स्वरूप नाथ सांगतातः— ' मीचि मी एकला । एकपणेंचि संचला. '

**मी होऊनियां मातें । भजन स्वतःसिद्ध आइत ॥**
**तें सांडूनियां भेदातें । निजभक्त चित्तें नातळती ॥**
**नवल भावार्थाची थोरी । मद्भावें देखे नरनारी ॥**
**श्वानसूकरादि आकारीं । नमस्कारी मद्भावें ॥**
**गगन पडों पाहे कडाडें । पृथ्वी उलथावया गडगडे ॥**
**ऐसें मांडलियाही सांकडें । नाम पढे श्रीहरीचें ॥**
**अभेदभक्तीचें महिमान । तिच्या पायां लागे आत्मज्ञान ॥**
**तेथ वंद्य निंद्य समसमान । विषमींही जाण विकारेना ॥**
**स्वकर्मधर्म वर्णाचार । करितांही निजव्यवहार ।**
**ज्यासी सर्वभूतीं मदाकार । तो भक्त साचार प्रिय माझा ॥**
**ज्यासी सर्वभूतीं बुद्धि समान । तेचि भक्ति तेंचि ज्ञान ॥**
**तेंचि स्वानंदसमाधान । सत्य सज्ञान मानिती ॥ ( अ० २९ )**

* * * * *

**माझे भक्तीचिया आवडीं । अहं सोहं दोन्हीं कुडीं ।**
**तुटली अभिमानाची बेडी । विषयगोडी निमाली ॥**
**पुंजाळले दोनी नयन । सदासर्वदा सुप्रसन्न ॥**
**स्फुरेना देहाचें भान । भगवंतीं मन रंगलें ॥**
**हर्ष वोसंडतां पोटीं । अर्धोन्मीलित होय दृष्टी ॥**
**जीव शिवां पडली मिठी । ध्यानत्रिपुटी मावळली ॥**

**अविद्यायुक्त जीव मलिन । त्यांसी शुद्ध व्हावया जाण ॥**
**माझी भक्तीचि प्रमाण । हेंचि श्रीकृष्ण स्वयें सांगे ॥**
**नयनीं सुदल्या अंजन । देखे पृथ्वीगर्भीचें निधान ॥**
**तेवीं मद्भजनें लाहोनि ज्ञान । चैतन्यघन जीव होय ॥(अ०१४)**

नाथांनीं भक्तिमुक्तीचें नातें अभंगांतून मौजेचें सांगितलें आहे. सगुणोपासनेनें आत्मज्ञान होतें व ज्ञानानें भक्तीचें यथार्थ स्वरूप आकळतां येतें. ज्ञानभक्ति हा पांचवा पुरुषार्थ संतांनीं जगाला दिला आहे.

**भक्तीच्या पोटा मुक्ती पै आली । भक्तीनें मुक्तीतें वाढविलें ॥ १ ॥**
**भक्ती ते माता मुक्ती ते दुहिता । जाणोनी तत्वता भजन करीं ॥ २ ॥**

भक्ति सोडून मुक्ति मागणें ह्म० गूळ सोडून गोडीची इच्छा करण्यासारखें आहे ! भक्ती ज्यावर प्रसन्न होईल त्यालाच मुक्ति मिळेल. मुक्तिरूप कन्येचें दान करायचा अधिकार भक्तिमातेचा आहे !

**भक्तीचें उदरीं जन्मलें ज्ञान । भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान ॥ १ ॥**
**भक्ती तें मूळ ज्ञान तें फळ । वैराग्य केवळ तेथींचें फूल ॥ २ ॥**

भक्ति मूळ, वैराग्य फूल व ज्ञान हें फळ. भक्तीवांचून ज्ञान शोधणें ह्म० मूळावांचून फळाची अपेक्षा करणें आहे. ‘ भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन । भक्तिमाता तया करितसे जतन. ’ भक्तीवांचून ज्ञान टिकत नाहीं. ‘ शुद्धभाव तेथें भक्तियुक्त ज्ञान ’ व तेथेंच समाधिसमाधान सांपडतें, ब्रह्मज्ञान त्याच्या पायीं लोटांगण घालतें ! तिसरा अभंग पहा:-

**भक्ति असो मुक्ति घाला रे बाहेरी । बहुतां चाळविलें चाळायाची थोरी १**
**भक्ति ते राहो मुक्ती ते जावो । मुक्तीमाजीं भावो नाहीं नाहीं ॥ २ ॥**

मुक्ति आपल्या नादीं लावते व भक्तीची संगत सुटली कीं तोच पाखांडी होतो ! नामसंकीर्तनभक्तीला मात्र मुक्ति भिते ! भक्तीच्या पोटीं जन्मून मुक्ति जर भक्तीला ग्रासीत असेल तर त्या मातृहत्यारी मुक्तीचा आम्हांला संपर्क नको ! गुरुचरणरज सेविले असतां मुक्तीही दीन होते.

**भक्तिप्रेमावीण ज्ञान नको देवा । अभिमान नित्यनवा तयामाजी ॥१॥**
**प्रेमसुख देई प्रेमसुख देई । प्रेमेवीण नाहीं समाधान ॥ २ ॥**

भक्तिप्रेमाचें सुख अपार आहे. प्रेमावांचून ज्ञान म्हणजे तो विधवेचा शृंगार होय ! नवविधाभक्तीच्या अभंगांत नाथ म्हणतात. 'सहजस्वरूपस्थिति तया नांव भक्ति । भक्ती नवविधा भासती । ऐसी भक्ति प्रती अंगें रावे मुक्ती दास्य करी अहोराती । दासीसी अनुसरणें हे तंव लाजिरवाणें मूर्ख ते मागती मुक्ती !'

## १० देव, भक्त आणि भक्ति.

( १ ) भगवान् सांगतात की ज्याच्या चित्ताला भोगासक्तीचा लेशमात्र स्पर्श नाहीं, अशा निरपेक्ष भक्ताला मी सहज प्राप्त आहे. ' आभाळ गेलिया सविता । सहजेंचि दिसे आंतौता । तेवीं गेलिया विषयावस्था । मी स्वभावतां प्रगटाचि !' भक्त भावार्थबळानें मला स्ववश करितो. ' भक्तीं भोगतां माझें सुख । विसरले देहादि जन्मदुःख । विसरले तहानभूक । निजात्मसुख कोंदलें. ' भक्ताचीं सर्व इंद्रियें निजसुखानें भरलेलीं असल्यामुळें विषय त्याच्यापुढें उभेच रहात नाहींत.

**निष्काम निर्दंभ निर्लोभ भजन । निर्मत्सर निरभिमान ।**
**ऐसिया मद्भक्तांसी जाण । माझें सुख संपूर्ण मी देतों ॥ १०१ ॥**

माझा भक्त निजसुखसुखानें सहज शांत, दांत, कामक्रोधविहीन असतो. ' मया संतुष्टमनसः सर्वाः सुखमयाः दिशः '—' तो जउती वास पाहे । तें दिग्मंडळ सुखाचें होये । तो जेथ कां उभा राहे । तेथ सुसावलें राहे महासुख.' भक्तांना त्रैलोक्यांतल्या कोणत्याही वस्तूची वांछा नसते. ब्रह्मलोक, इंद्रलोक, सार्वभौमपद, पातालराज्य यांची त्यांना इच्छा नसते; योगसिद्धी पायांशीं लोळत आल्या तरी ते त्याकडे ढुंकूनही पाहत नाहींत; फार काय पण मोक्षाचीही ते इच्छा करीत नाहींत. मला सर्वस्वार्पण करून ते मजवेगळें कांहींच इच्छीत नाहींत. ' आधीं असावें वेगळेपणें । मग सायुज्यें एक होणें । हें मूळचि अबद्ध बोलणें । सायुज्य न घेणें मद्भक्तीं !' भक्त ' भक्तिसुखें सुखावले ' असतात. माझा ' प्रियतम आत्मा ' म्हणजे माझा भक्तच होय. जे लक्ष्मीची उपेक्षा करितात ते मला आवडतात, जे लक्ष्मी मागतात त्यांना ' ना श्री ना श्रीपति !'

**मी अवाप्तसकळकाम । परी प्रेमळांलागीं सदा सकाम ।**
**देखतां प्रेमळांचा भाव परम । मी आत्माराम उडी घाली १५७**

निरपेक्ष, मुनी ( मननशील ), शांत, निर्वैर, समदर्शी,–अशा भक्ताच्या मागेंमागें मी सदा धांवत असतो–एवढयासाठीं कीं त्यांच्या चरणरजानें मी पूनीत व्हावें !

**ऐसिया भक्तांचें दर्शन । झाल्या तरती हें नवल कोण ।**
**त्यांचें करितां नामस्मरण । उद्धरण जड जीवां ॥ १८४ ॥**

समुद्राचें पाणी खारट पण तें मेघांत चढून पृथ्वीवर पर्जन्यरूपानें पडलें कीं तें अत्यंत मधुर होतें, जगाला निववितें व दुष्काळाचें भय निवारतें ! केळीला चव नाहीं पण तिचें फळ किती गोड ! ह्या 'दोन दृष्टांतांनीं देवापेक्षां देवाचे भक्त अधिक पवित्र, अधिक जगदुपकारक आहेत हें नाथांनीं फारच बहारीनें दाखविलें आहे !

**सविता येतां प्राचीजवळी । मावळे नक्षत्रमंडळी ।**
**तेवीं भक्तीच्या प्रबोधकाळीं । झाली होळी कामादिकां ॥१९९॥**

देशकालादिकांनीं अपरिच्छिन्न असें माझें निरपेक्ष भक्तिसुख भक्तांजवळ असतें. त्या सुखाची गोडी मोक्षसुखालाही नाहीं ? हें भक्तिसुख शिळें होत नाहीं, विटत नाहीं, त्याला इंद्रियांची पराधीनता नाहीं.

**भाग्यवशें सत्संगती । आस्तिक्यभावें अनन्यस्थिती ।**
**अल्पही माझी घडल्या भक्ती । विषयनिवृत्ती तेणें होय ॥२२०॥**

'आरसा उटितां उजळे' त्याप्रमाणें माझ्या भक्तीनें विषयवृत्ति नष्ट होतात.मिठाच्या राशीवर जळाचा लोट आला कीं तो मीठ विरवून टाकतो, तशी शुद्ध भक्ति विषयवासना विरघळून टाकते ! भक्तिलेशानें पूर्व पापसंस्कार दग्ध होतात, व ब्रह्म प्रत्यक्ष प्रकाशमान होतें. हीं एकांतिक भक्ति सोपी नाहीं 'भक्त म्हणवितां वाटे गोड । परी भजनमुद्रा अति अवघड । भक्तींचें अंतर अतिगूढ । न कळे उघड श्रुतिशास्त्रा ! ' ज्ञान सांगायला सुलभ आहे पण 'भक्तिरहस्य अतिगूढ' आहे. अकृत्रिम

प्रेमाचा तो विषय आहे. कृपणाचें चित्र घरच्या ठेव्यावर असतें, गर्भसंभव झाल्यावर युवतीला त्या गर्भाचा कळवळा असतो, सदैव जांवई घरीं आल्यावर सासू सर्वस्व वेंचून त्याला जपते, बीज अधिकाधिक पेरितांना शेतकरी उल्हासतो, सगुणस्वरूप व समर्थभर्ता दूर गेल्यावर त्याच्या भेटीसाठीं कांता तळमळते—सांसारिकांच्या ओळखीचे हे दृष्टांत देऊन नाथ सांगतात कीं यावरून भक्ताच्या अंतःकरणाची कल्पना करितां येईल त्यानें करावी! संसार तरणोपायांत एकनिष्ठ भक्तिच मुख्य आहे. सांख्य—नित्यानित्यविवेक, कर्म—नित्यनैमित्तिक, स्वाध्याय—वेदाध्ययन तप—वातांबुपर्णाशन, त्याग—संन्यासग्रहण, हीं सारीं 'माझ्या भक्तीवीण बापुडीं' आहेत! नाकावांचून शोभा कोठची! शिरावांचून अवयव किंवा भर्त्यावांचून सौभाग्य काय किंमतीचे? माझी भक्ति तेच माझी प्राप्ती 'निर्विकल्प निःसंदेह। सर्वांभूतीं भगवद्भाव' हें भक्तीचें मुख्य लक्षण आहे.

भक्तांच्या चित्तांत भक्ति कशी उत्पन्न होते हा क्रम सांगतात :— 'आवडीं हरिकथा ऐकतां। नाना चरित्रें श्रवण करितां। आत्मचर्चा हृदयीं धरितां' चित्तांत पालट होऊन हरिप्रेम जडतें; मात्र भक्ति भक्तांच्या संगतींत उत्पन्न होते हें विसरूं नये. प्रेमळांच्या संगतींत प्रेम, भक्तांच्या संगतींत भक्ति वाढीस लागते. भगवंताचे गुणानुवाद करितांना व त्यांचें नाम गातांना भक्ताची वाणी सद्गदित होते, त्याचें चित्त प्रेमानें आर्द्र होतें; तो कधीं हांसतो, कधी रडतो, कधीं निर्लज्ज होऊन गातो, नाचतो, उडतो—असा भक्त त्रिभुवनाला पावन करितो.

**नयनीं सुदल्या अंजन। देखे पृथ्वीगर्भींचें निधान॥**
**तेवीं मद्भजनें लाहोनि ज्ञान। चैतन्यघन जीव होय॥ ३४७॥**

विषयांचें ध्यान करणारा विषयांत निमग्न होतो, माझें चिंतन करणारा चैतन्यघन होतो. बहुतेकांच्या अनुभवाचा एक दृष्टांत—

**स्त्री गेली असतां माहेरीं। ध्यातांचि प्रगटे जिव्हारीं॥**
**हावभाव कटाक्षेंवरी। सकाम करी पुरुषातें॥ ३५०॥**
**नसते स्त्रियेचें ध्यान करितां। प्रगट दिसे यथार्थता॥**

**मी स्वतःसिद्ध हृदयीं असतां । सहजें मद्रूपता चिंतितां मज ॥**
**यालागीं सांडूनि विषयांचें ध्यान । माझें चिंतन करावें ! ॥**
**( अ० १४ ओवी ८४-३५० )**

**भावें करितां माझी भक्ती । विषयवासना जळोनि जाती ॥**
**निर्विकल्प उपजे शांती । माझे भक्तिपंथीं चालतां ॥ ३०९ ॥**
**माझिया निजभक्तां । संसारबाधेची व्यथा ।**
**ते लाज मज भगवंता । गांजूं निजभक्तां मी नेदी ॥ ३११ ॥**

माझ्या 'भक्तांचे पायींची माती । मी हृदयीं वाहे श्रीपती । ' तात्पर्य, ' माझिये भक्तीपरतें । सुगम साधन नाहीं येथें ' ( अ० १६ ओवी ३०९ ते ३३५ ).

---

## ११ भक्तांच्या तीन पायऱ्या-उत्तम भक्त कोणता ?

( ५ ) भक्तांत तीन पायऱ्या आहेत. **प्राकृतभक्तः**— प्रतिमापूजेंत मात्र मग्न आहे, पाषाणप्रतिमा हाच देव मानतो व प्रतिमाभंग कीं देवाचा अंत झाला म्हणून रडतो तो जड किंवा प्राकृत (प्रकृति=आरंभ) भक्त होय ! तो संतसज्जनांपुढें लवत नाहीं, सामान्यांना तर मानीतच नाहीं. तात्पर्य, मूर्तीशिवाय देव कोठें पाहत नाहीं तो प्राकृतभक्त. **मध्यम भक्तः**— हा भूतमात्रीं भेद पाहतो. ' ईश्वर मानी उत्तमोत्तम । तद्भक्त मानी मध्यम । अज्ञान ते मानी अधम । द्वेषी ते परम पापी मानी ॥ ईश्वरीं प्रेम पवित्र । भक्तांसी मैत्री मात्र । अज्ञानी तो कृपापात्र । उपेक्षा निरंतर द्वेषियांची. ' आतां **उत्तम भक्त** म्हणजे भागवतोत्तम कसा असतो पहाः— उत्तम भक्तांत कांहीं सर्वसंगपरित्याग करणारे असतात, कांहीं संसारांतच गृहधर्म पाळून राहतात, कांहीं उन्मादस्थितीनें गातनाचत असतात, कांहीं मौनी असतात. त्यांच्यांत हे बाह्यभेद कांहींही दिसले तरी ' सर्वांभूतीं भगवद्भाव ' हा त्याचा निर्धार असतो. ' सर्वांभूतीं भगवंत पाही । भूतें भगवंताचें ठायीं । हें अवघें देखे जो स्वदेहीं । स्वस्वरूप

पाहीं स्वयें होय, ' तो भक्तांत श्रेष्ठ होय. घृताचे कण म्हणजे घृतच ते, तसी भूतभौतिक सृष्टि परमात्म्याहून भिन्न नाहीं असा त्याचा निर्धार असतो. तो संसारांत विषय भोगीत असला तरी त्याचे अभोक्तेपण ढळत नाहीं. तो भोगून अभोक्ता, करून अकर्ता असतो. तो विषय-स्फूर्तीनें विषय भोगीत नाहीं व विषयांना भीतही नाहीं; तो त्याग आणि भोग या दोहींहून वेगळा असतो. देह, इंद्रियें, मन, प्राण यांच्या धर्मांनीं तो आक्रमिला जात नाहीं. ' भावें करितां भगवद्भक्ति । क्षुधे-तृषेची नव्हे स्फूर्ती. ' क्षुधातृषा हे धर्म प्राणाचे, भय हा धर्म मनाचा, जन्ममरण देहाचे, भोगेच्छा बुद्धीचा व श्रम इंद्रियाचा. ह्या सर्व धर्मांचा स्पर्श भक्ताला होत नाहीं.

**निष्काम निर्लोभ निर्दंभ भजन । निर्मत्सर निराभिमान ॥**
**ऐसिया मद्भक्तासी जाण । माझें सुख संपूर्ण मी देतों ॥**
**भक्त जेउती वास पाहे । तें दिग्मंडळ सुखाचें होये ॥**
**तो जेथ कां उभा राहे । तेथ मुसावलें राहे महासुख ॥**

मोठमोठया ज्ञात्यांना सुद्धां अभिमान सुटत नाहीं, पण भगवद्भक्तीनें अभिमान निःशेष जातो, व यामुळेंच भक्त देवाला अतिप्रियकर होतो. ' भक्त जिकडे जिकडे जाये । देव निजांगें तेउता होये. ' सर्वांभूतीं भक्ताची एकात्मता होते, याला अद्वैतभजन म्हणतात. हा अभेद-भक्तच खरा भागवतोत्तम होय. त्याच्या रोमरोमीं ब्रह्मानंद भरलेला असतो. ' हरिचरणीं अपरोक्षस्थिति । तेथील क्षणार्धाची जे प्राप्ती । त्यापुढें त्रिभुवनविभवसंपत्ती । भक्त मानिती तृणप्राय. ' तात्पर्य, मोक्षापेक्षां भक्ति श्रेष्ठ होय. ( अ० २ ओवी ६३० ते ६५० ).

---

## ११ महत्त्व भक्तीला, जातीला नाहीं !

देहाचीं कर्में अदृष्टामें होतात, भक्त आपल्या माथ्यावर कर्तृत्व घेत नाहीं.

**ज्यासी नाहीं देहाभिमान । तो हातीं न धरी देहाचा वर्ण ॥**
**तैसाचि आश्रमाचा अभिमान । भक्त सज्ञान न धरी कदा ॥७११॥**

खरा संन्यास अंगीं बाणल्यावर मी परमहंस आहे असें तो म्हणत नाहीं. नटानें रंगभूमीवर राजविलास दाखविले तरी तो मी राजा आहे असें मानीत नाहीं. ‘ जाती उंच नीच असंख्य ’ आहेत, परी ‘ तो न ह्मणे हे माझीच एक. ’ गंगेच्या कांठीं अनेक गांव असतात पण हा अमुक गांव माझा असें गंगा म्हणत नाहीं, तसा ‘ जन्मकर्मवर्णाश्रम जाती । पूर्णभक्त हातीं न धरिती. ’ चारही देहांचा निरास त्यानें मनानें केलेला असतो, तेव्हां देहच मी नव्हे असें ज्यानें पूर्ण जाणले तो देहसंबंधी कोणता अहंकार बाळगील ? माझी जात उंच आहे कां नीच आहे याचा विचारच त्याला स्पर्श करीत नाहीं, तो देहातीत परमात्म्याशीं समरस झालेला असतो. जन्माच्या अभिमानानें मनुष्य कुळगोतजातींचा अभिमान डोक्यावर घेत असतो, पण मी जन्मकर्मापासून मुक्त आहे व हा सकळ परमात्मा आहे असें जो जाणतो त्याला कसलाच अहंकार शिवत नसतो. ‘ समूळ देहाभिमान झडे । तो देहींच देवासी आवडे. ’ त्याच्याबरोबर देव निरंतर असतो. ‘ देव भक्त दोहींआंतु । देवचि नांदतु स्वानंदें. ’

**एवं आपुली आपण भक्ती । करीतसे अनन्यप्रीतीं ॥**
**हेंचि निरूपण वेदांतीं । अद्वैतभक्ती या नांव ॥ ७२९ ॥** (अ०२)

त्याच्याठायीं भेदभाव मुळींच असत नाहीं; तेथें माझें तुझें, मी उत्तम तो हीन, असला दुजेपणा कोठून असणार ? अग्नीला जें स्पर्शलें तें आग्निरूप झालें, त्याप्रमाणें अभेदभक्त जें जें पाहतो तें तें आत्मस्वरूपच होतें. ‘ डावे हातीच्या पदार्था । उजवे हातीं स्वयें देतां । तेथ कोण देता कोण घेता । तेवीं एकात्मता सर्वभूतीं ’

**आपणासकट सर्व देहीं । भक्तां भगवंतावांचूनि नाहीं ।**
**यालागीं शांती त्याचे ठायीं । स्वानंदें पाहीं निःशंक नांदे ॥७४०॥**

जन्माभिमान, कर्माभिमान, ज्ञानाभिमान इ० सारे अभिमान शेवटीं नरकाला नेणारे आहेत ( अ० ५ ):—

**हो कां वर्णांमाजी अग्रणी । जो विमुख हरिचरणीं ॥**
**त्याहूनि श्वपच श्रेष्ठ मानी । जो भगवद्भजनीं प्रेमळ ॥**

भक्तांनीं "अचक्षूसी दिधले डोळे । अश्रोत्रा श्रवण दिधले । मज अमुखा तिहीं मुख केलें । त्यांचेनि बोलें मी बोलका ॥ मज नामरूप तिहीं करणें । मज पवित्रता त्यांचेनि गुणें । मज वैकुंठीचें ठाणें । भक्तीं अचळपणें दीधलें " उपनिषदांनीं ' अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम् ' (कठ३ ) न तत्र चक्षुर्गच्छति नवाग्गच्छति नो मनो ' ( केन० ) इत्यादि प्रकारें माझें निर्गुणनिराकारत्व वर्णन केलें आहे पण संतांनीं व भक्तांनीं मला नांवरूप देऊन माझे गुणानुवाद गाणें ह्यांत मोक्षावरील भक्तिसुख मानलें आहे ! नामस्मरणानें वाल्हा कोळी होता तो रामायण गाणारा वाल्मीकि झाला. ' भक्त माझेनि सनाथ । माझेनि जाले कृतकृत्य । माझेनि आनंदें सदा तृप्त । वोसंडत निजबोधें. ' भक्त या भक्तिपंथाचा (अद्वैतभक्तीचा ) जगांत डांगोरा पिटतात ! भक्तिभावार्थानें ते इतके निर्दंभ मला भजतात कीं मग मी त्यांची जातकुळीही पाहत नाहीं.

**भक्त ज्ञाती जरी जाला श्वपाक । तरी आवश्यक मज पूज्य॥२८९॥**
**केवळ जीं अपवित्रें । रिसें आणि वानरें ॥**
**त्यां पूजिलीं गौळियांचीं पोरें । ताकपिरें रानटें ॥ २९० ॥**
**जो जातीनें नीचत्वा गेला । परी भक्तिभावें उंचावला ।**
**तो मद्रूपता पावला । पूज्य झाला तिहीं लोकीं॥ २९१ ॥**
**विदुर दासीपुत्र तत्त्वता । भावें पढिया भगवंता ॥**
**भावो प्रमाण परमार्था । जात्यभिमानता सरेना ! ॥ २९५ ॥**
**भलता हो भलते जाती । ज्यासी माझी भावार्थें भक्ती ॥**
**तोचि जाण पा पवित्रमूर्ती । माझी प्राप्ती मद्भजनें ॥ २९७ ॥**

व्युत्पत्तीनें मी जोडत नाहीं, ' जळो त्या द्विजाची पवित्रता । जो

माझ्या भजनपथा विन्मुख '. ' विप्रात् द्विषड्गुणयुतात् ' ह्या श्लोकांत भक्तिविन्मुख ब्राह्मणापेक्षां चांडालभक्तही मला अत्यंत प्रिय आहे असें मी स्पष्ट सांगतों ! माझ्या भक्तिवीण कर्मधर्म म्हणजे भ्रम होय. सत्यवाद व दयाधर्म एवढे थोर गुण पण माझ्या भक्तीवीण त्यांना शोभा नाहीं ! भक्तिवीण विद्या ती अविद्या होय.

**चंदनभार वाहे खर । परी तो नेणे सुवासाचें सार ॥**
**माझेनि भक्तीवीण विद्याशास्त्र । केवळ भारवाहक ॥ ३०३ ॥**

तात्पर्य भक्तीवीण केलेले तपादि सत्कर्मही वृथा होय ! ( अ० १४ )

अंगावर रोमांच थरारत नाहींत, अंतःकरणाला भक्तिप्रेमाचे पाझर फुटत नाहींत, नेत्रांतून आनंदाश्रूंच्या धारा वाहत नाहींत, अशा भक्तिसुखांत जीव डुबला नाहीं तर ती भक्ति कसची ? व भक्तीवांचून चित्तशुद्धि होऊन निर्विषयः मन व्हावें कसें ? म्हणून माझे भक्त नाम गात नाचत असतात व सात्विक अष्टभाव त्यांचे ठायीं सहज प्रगट होतात. ' नयनीं आनंदजीवन । हृदयीं स्वानंद परिपूर्ण ' असे भक्त देहभान विसरून भगवंतीं रंगतात. विदुर, हनुमंत, बिभीषण, प्रल्हाद इत्यादि अनन्यभक्तांच्या जातीची विचारपूस करण्याचें कारणच नाहीं. ' बंधुस्नेहानें मन कळवळणें ' हीच वैष्णवाची पूजा होय. ' जाती उत्तम असून भक्तिहीन ' आहे तो वैष्णव नव्हे, कोणत्याही जातीचा असून अनन्यभक्त आहे तर तो वैष्णव खरा.

**' वैष्णवी मानी जाति प्रमाण । शालिग्राम मानी पाषाण ।**
**गुरूसी मानी मानुसपण । तो पापिष्ठ जाण सर्वथा '– (१४४०):–**
**जाणीव शाहणीव ज्ञातेपण । सांडूनि जातीचा अभिमान ॥**
**जो मज होय अनन्य शरण । वैष्णव जाण तो माझा ॥ १४०१ ॥**

वैष्णव विष्णूसी अनन्य असतात, आपणही तसेंच अनन्य व्हावें म्हणजे वैष्णवांसी आपलें सख्य सहजच घडतें. ( अ० ११ ओवी १३९५ ते १४०८ ).

नाथांच्या अभंगांतही वरीलसारखेच विचार व्यक्त झाले आहेत. इतर संतांसारखेच जातिभेदासंबंधानें नाथांचे उद्गार आहेत. जातिभेदाचें कर्मठ ब्राह्मणांप्रमाणें ते बंडही माजवीत नाहींत व सारे जातिभेद मोडून संकर करावा अशा सुधारकी मताचेही ते नाहींत! परमार्थांत सर्वांभूतीं भगवद्भाव पाहणें व सर्वांशीं आत्मभावानें वागणें हें मुख्य आहे; बाकीचे सहभोजन, सहपान, रोटीबेटीव्यवहार इ० अलीकडे उपस्थित झालेल्या प्रश्नांची विशेषशी चर्चा संतांनीं केलेली नाहीं. ते आपल्या काळच्या आचारविचारांना सोडून वागत असें म्हणायला कांहीं एक आधार नाहीं. नव्याजुन्यांनीं त्यांना आपापल्याकडे खुशाल ओढावें! नाथ आपल्या ब्रह्मस्थितीच्या हद्दींवरून बोलतातः—

**( १ ) कैचें आह्मां यातिकूल। कैचे आम्ही धर्मशीळ १**
**तुझे नामीं अनुसरलों। तिहीं लोकीं सरते झालों २**
**कैची क्रिया कैचें कर्म। कैचे वर्णाश्रमधर्म ३**
**एका जनार्दनीं यातीकुळ। अवघा व्यापक विठ्ठल ४**
**( २ ) उंचनीच वर्ण याती। रामनामें सर्वां मुक्ती ॥**
**( ३ ) नामधारक हो कां भलता। त्याचे चरणीं ठेविन माथा १**
**नाम जपे तोचि श्रेष्ठ। एका जनार्दनी वरिष्ठ ॥**
**( ४ ) शुद्ध यातीकुळ अथवा चांडाळ।**
**स्त्री अथवा बाळ हो कां नीच ॥**
**एका जनार्दनी नाहीं यातीचें कारण।**
**वाचे उच्चारण तोचि शुद्ध ॥**
**( ५ ) देव भुकेला चिंतनाचा। न पाहे याती हीन उंचाचा।**
**काय अधिकार शबरीचा। फळें काय प्रिय तीं ?॥**
**( ६ ) उंच नीच नाहीं नामाचिया पुढें। जातीचें तें गाढें नाहीं काम१**
**अनामिकाहुनी असोत चांडाळ। परी नामाचा उच्चार मुखीं वसो**
**यवनादि नीच असोत भलते। परी नाम सर्वदा मुखीं वसो ३**

ब्राह्मणांविषयीं नाथांचा पूज्यभाव अनेक ठिकाणीं व्यक्त झाला आहे.

विशेषतः भागवतांत ( अ० ११ ओंवी १३५३ ते १३९३ ) पहा.

---

## १२ देवाचें भक्तप्रेम.

( १ ) भक्ताचें देवावर प्रेम असतें हें जाणणें तितकें कठिण नाहीं, पण उलट देवाचेंही भक्तावर तसेंच प्रेम असतें हें पटणें अनुभवीयांशिवाय कठिण आहे ! ' विघ्न धांवे भक्ताकडे । तेथ माझी उडी पडे । ' मी भक्तांचें सांकडें निवारतों कां कीं भक्त माझा लडिवाळ आहे. मी प्रल्हादाला सर्व संकटांतून सोडविलें, हातीं सुदर्शन घेऊन गजेंद्राला मोकळें केलें, दरबारांत द्रौपदीला वस्त्रें पुरविलीं, गोपाळांचें रक्षण करण्यासाठीं मी दावाग्नि गिळिलाः—

**ऐसा मी भक्तसाहकारी । नित्य असतां शिरावरी ।**
**भक्तांसी विघ्न कोण करी । मी श्रीहरि रक्षिता ॥**
**भक्त वर्ततां दिसती देहीं । परी ते वर्तती माझ्या ठायीं ।**
**मी अवघाचि त्यांच्या हृदयीं । सर्वदा पाहीं नांदत ॥**
**मी देव तो एक भक्त । हेही बाहेरसवडी मात ।**
**विचारतां आंतवटा अर्थ । मी आणि भक्त एकची ॥** (अ० २८)

( २ ) भक्ताला माझें वेड असतें तसें मलाही त्याचें वेड आहे. ' तान्हयालागीं माता । तैसी भक्ताची मला चिंता ' असते. ' मी शरीर भक्त माझा आत्मा ' असा त्याचा माझा संबंध आहे. माझ्याशीं एकरस झालेला ज्ञानीभक्त भक्तिसुख घेटतां यावें म्हणून जेव्हां माझें भजनपूजन करितो तेव्हां भाविक सात्त्विक व दीन जनांची त्यावर भक्ति बसून उद्धरतात ! चारी मुक्ति व चारी पुरुषार्थ यांपेक्षां ज्ञानोत्तरभक्तीचा पंचमपुरुषार्थ कांहीं निरुपम आहे !

**आम्ही प्रेमाचे पाहुणे । भावार्थाचे आंदणें ॥**
**त्यां अनन्याची सेवा करणें । जीवें प्राणें सर्वस्वें ॥**
**कोण भक्ति केली गोपाळीं । काय तीं सोवळीं कीं ओवळीं ॥**
**त्यांचे उच्छिष्ट कवळ मी गिळीं । प्रेमसमेळीं डुल्लत ॥ ॥**

**मी काय अन्नासी दुकाळलों । तो यज्ञपत्न्यांसी मागों गेलों ॥**
**मी भावार्थाचा भुकेलों । प्रेमाच्या पावलों पाहुणेरा ॥**

मी प्रेमळांलागीं सकाम आहे. प्रेम तेथें देव आहे. ( अ० २४ )

---

## १३ मनोजयाचा उपाय–भक्तिच !

( १ ) आधीं कृपण अत्यंत असून पुढें अनुतापानें विरक्त झालेल्या एका भिक्षूची बोधप्रद कथा २३ व्या अध्यायांत सांगितली आहे. त्या भिक्षूची योग्यता लोकांस न कळल्यामुळें त्यांनीं त्याचा अनन्वित छळ केला. अशावेळीं आपल्या सुखदुःखाला कारण दुसरें कोणी नसून केवळ आपलें मनच कारण आहे असें त्यानें 'भिक्षुगीत' गायिलें त्यांत म्हटलें आहे. तो म्हणतो माझ्या सुखदुःखाला कारण हे जन नाहींत, देवता नाहींत, आत्मा नाहीं, ग्रह नाहींत, कर्म नाहीं, काळ नाहीं, तर केवळ मन आहे ! माझ्या सुखदुःखाला कारण **जन** नाहींत, कारण जन हे पांचभौतिक असून माझाही देह तसाच पांचभौतिक आहे अर्थात् जनांत व माझ्यांत सहज ऐक्य आहे–द्वैत नाहीं; **देवता** नाहींत कारण देवता मनःकल्पित आहेत; **आत्मा** नाहीं कारण आत्म्याचे ठायीं द्वैतभावच नाहीं; जन्मकाळीचे **ग्रह** नाहींत कारण एक तर ग्रहांचा ग्रह मन आहे व दुसरें असें कीं ग्रह हे प्रतिकूल झाले तर चार दिवस पीडा देतात, फार तर देहांतापर्यंत त्यांचें प्राबल्य असतें; पण मन हें जन्मजन्मांतरीं सोडीत नसून अनंत जन्म पीडा देत असतें; **कर्म** नाहीं कारण बंधापासून सोडविणारेंही कर्मच आहे; **देह** नाहीं त्यां कीं सुखदुःख देहाला कळत नाहींत व आत्म्याशीही त्यांचा संबंध नाहीं तर केवळ मनाशीं आहे ! आणि **काळ**ही नाहीं कारण मनःसंकल्पा-पर काळाचीही सत्ता चालत नाहीं ! आपण अजरामर असून मला जन्म-मरण आहे हें मनानें घेतलें आहे. 'निःशंकपणें साचार । ज्याचें मन म्हणे मी अमर । त्याचें काळ वर्जी घर । काळ दुर्धर मनःशंका !' याप्रमाणें

विचार करावा. ‘ मनःकल्पित संसार जाण । मनें कल्पिलें जन्ममरण । संसारचक्रीं आवर्तन । मनास्तव जाण पुनः पुनः ’ सुखदुःखें भोगविणारें एक मन आहे. मन त्रिगुणवृत्ति उत्पन्न करिते, त्रिभुवन उभवून संसारभुवनांत स्वयें नांदतें, आत्मा चिद्रूप निर्गुण असून त्याला जीवपणास आणतें व गुणपाशांत पाडतें असें बलिष्ठ आहे ! ‘ मनाचा बालत्कार ऐसा । निर्गुण पाडी गुणाच्या फांसा । लावूनि जीवपणाचा झांसा ( निद्रा ) । संसारवळसा आवर्तीं ’ शुद्धस्वरूपाला देहाच्या उपाधींत गुंगवून जीवपणाला ह्म० मीपणाला आणणारें एक मन आहे ! दान, स्वधर्म, यमनियम, वेदाध्ययन, कर्में, व्रतें इ० सर्व साधनांनीं साधायचें काय तर मनोनिग्रह ! आत्मा निरुपाधिक स्वयंसिद्ध आहेच, त्याची प्राप्ति हीं साधनें काय करून देणार ? अविद्यात्मक मन वश करणें हेंच वरील साधनांचें फळ होय ! ‘ परोहि योगो मनसः समाधिः ’ मन निश्चळ, स्वरूपस्थित होणें याला वास्तविक समाधि म्हणतात. मन देवांना छळतें, इंद्रियांना विषयाकडे खेंचतें. ‘ देवा दुर्जय जें मन । त्यासी आवरी इतर कोण ? । शस्त्रें न तुटे मन, मनासी जाळूं न शके दहन, मनातें शून्य करूं न शके गगन ! मन काळालाही आटोपणारें नाहीं ! मन अनंत ब्रह्मांडें घडी मोडी ! मन बळियांत बळी आहे. त्याला आकळणारी एकही सत्ता त्रैलोक्यांत नाहीं ! असें अनावर मन आवरायला एकच उपाय आहे आणि तो हा ! :—

**जेविं हिरेनि हिरा चिरिजे । तेवीं मनेंचि मन धरिजे ।**
**हेंही तैंचि गा लाहिजे । जैं गुरुकृपा पाविजे संपूर्ण स्वयें ॥६८५**

जसा हिऱ्यानेंच हिरा चिरतात, तसें मनानेच मन वश करावें आणि हेंही गुरुकृपेनेंच साध्य होणार आहे! मनाचा एक उत्तम गुण आहेः—

**या मनाची एक उत्तम गती । जरी स्वयें लागलें परमार्थीं ।**
**तरी दासी करी चारी मुक्ती । दे बांधोनि हातीं परब्रह्म ॥ ६८७ ॥**

मनच मनाचे साधक व मनच मनाचे बाधक आहे ! मन अनेक

दोषांचे आगर आहे पण ज्याची गोडी घेऊन उठतें तदाकार होतें हा मनाचा एक मोठा गुण आहे. एकदां कां स्वसुखगोडीला तें बिलगलें कीं मग तें ती कालत्रयीं सोडीत नाहीं. मन मनाला कसें मारतें म्हणाल? वेळूचें वन आपण पाहिलें असेल! वेळूचें वेळूशी घर्षण होऊन स्फुलिंग निघतो तो वेळूचें वन जाळून टाकतो! मन ( विषयाकार मन ) मनाशीं ( स्वरूपाकार मनाशीं ) घर्षण पावून आपण आपणाला मारतें! गुरुकृपेनें मन स्वरूपाची गोडी घेऊन उठलें कीं मनच उन्मन होतें 'तेणेंचि पूर्वज तारिले। तेणें सकळ कुळ उद्धरिलें। तेणेंचि परब्रह्म आंगविलें। जेणें जिंकिलें मनातें' अद्वैतात्मनिष्ठच्या योगानें व सगुण-भक्तीनें मन वश होते.

**निर्विकल्प भावार्थे आपण। सगुण निर्गुण कां नामस्मरण।**
**भक्त भावार्थे आदरी जाण। तें तें होय पूर्ण सद्भावेंचि॥ ९२४॥**

भक्तिभावानें निजशांति मिळतें, द्वंद्वं पळून जातात, मनाचें उन्मन होतें, व 'परमानंदें तोपें सृष्टी। मी तूं दृष्टी दिसेना.' मन आणि विवेक याची गांठ घालून द्यावी—!' मन सितरील विवेकांसी। यालागीं हातकाडिया दोहींसी। करूनियां अहर्निशी। येरयेरापाशीं राखावी.' मन व विवेक यांची गट्टी करून भक्तिसुख भोगावें. मन संसार घेऊन बसलें आहे तें देवाच्या सेवेला लावावें. 'सांडूनि संसारस्फूर्ती। चित्स्वरूपीं जडे वृत्ती!'

**जो नासूं पाहे संसारदुःख। तेणें मन नेमावें आवश्यक।**
**मनावेगळें दुःखदायक। आणिक नाहीं त्रिलोकीं॥ ९४९॥**

पण बलिष्ठ मनही भक्तीनें वश होते. ११ व्या अध्यायांतही मनाचा विचार केला आहे तेथें ह्मटलें आहे:—

**मुखीं धरिल्या कृष्णसर्पासी। ढिलें करितां तो तत्काळ ग्रासी।**
**मरे तंववरी आवळावे त्यासी। तेवीं मनासी निर्दाळावें ११-९७९**

तापस, नेमस्त, बळी यांनाही गुंगविणारें मन भगवच्छरणागतीवांचून

वश होणें कठीण! नाथांनीं आपल्या अभंगांतही जागोजाग म्हटलें आहे:-

**(१) मन एके ठायीं। राहे ऐसें करीं कांहीं १**
**एकाग्र हें मन। करूनि करावें भजन २**
**एकाजनार्दनीं मन। दृढ ठेवावें बांधून ३**
**(२) मना! सांडीं विषयखोडी। लावी विठ्ठलेसी गोडी १**
**माझ्या मना लागो छंद। नित्य गोविंद गोविंद।**

---

## १४ गुणदोषदर्शन व स्तुतिनिंदा

(१) मनुष्यमात्रामध्यें दुसऱ्याच्या दोषाची कठोर निंदा व आपल्या गुणांची अवास्तव स्तुति करण्याची प्रवृत्ति असते ती त्याच्या अहंभावामुळेंच होय. 'आत्मस्तुति परनिंदा' हा अविद्यात्मक अज्ञानाचा स्वभाव आहे. आत्मभावाच्या विकासाबरोबर द्वैतभानच नाहींसें होतें तेथें गुणदोष पाहणार कोण? व कोणाचे? ब्रम्हनिष्ठाला गुणदोषभान कोठचें?

**ब्रह्म एक परिपूर्ण। तेथें कैचे दोष कैचे गुण?।**
**अविद्या क्षोभली तें जाण। गुणदोषलक्षण वाढवी॥ ५७४॥**
**पराचा देखावा दोषगुण। हाचि दोषांमाजी महादोष जाण।**
**गुणदोष न देखावा आपण। हा उत्तम गुण सर्वार्थी॥ ५७५॥**

रविबिंबाला राहूनें ग्रासलें कीं दिवसाही नक्षत्रें दिसतात, त्याप्रमाणें मूळच्या ब्रम्हस्वरूपावर अविद्येची छाया पडली कीं प्रत्येक वस्तूचे गुणदोष दिसायला लागतात! स्वधर्माचारासाठीं गुणदोष पहावे लागतात असें कोणी ह्मणेल तर त्याला उत्तर असें आहे कीं ही गोष्ट खोटी आहे, स्वधर्मच त्याला कळला नाहीं असें म्हटलें पाहिजे. आपले दोष घालविण्यासाठी-स्वधर्माचरण करायचें असतें! (अ० १९)

**न देखोनि दोषगुण। स्वधर्ममर्यादा नोसंडून।**
**करावें गा स्वधर्माचरण। हें मुख्य लक्षण कर्माचें॥ ५८७॥**
**गुणदोष देहाचे ठायीं। आत्मा नित्य विदेही।**
**गुणदोष त्याच्या ठायीं। सर्वथा नाहीं उद्धवा॥ ५८९॥**

सिद्ध गुणदोषापलीकडेच असतो, साधकानें आपल्या कल्याणासाठीं ते पाहूं नयेत. दुसऱ्याचे दोष पाहणें हाच महादोष होय.

**गुणदोष नायकावे कानीं । गुणदोष न देखावे नयनीं ।**
**गुणदोष न बोलावे वदनीं । गुणदोष मनीं न धरावे ॥ ५७२ ॥**

'गुणदोषीं भरली सृष्टी' हें जाणून आपल्या स्वरूपीं मग्न असावें.

( २ ) मी परमात्मा सर्वभूतीं आहे अशा अद्वैतभजनानें प्रकृति-परपार गेलेले माझे भक्त गुणदोष पाहत नाहींत. 'साखरेची साल फेडणें रत्नदीपीं काजळी काढणें । तै गुणदोष देखणें मद्भक्तां' ( अ० २० )

( ३ ) दुसऱ्याचे गुणदोष पाहिल्यानेंच निंदास्तुतीची प्रवृत्ती होते, म्हणून गुणदोषदर्शनच करूं नये. 'विचारितां जग त्रिगुण । गुणानुसारें कर्माचरण'–प्राणिमात्र आपल्या प्रकृतिस्वभावानुसार वागत असतात, त्यांचीं कर्मे सहज होत असतात. जगाची एकात्मता पाहणें ही ब्रह्मस्थिति सोडून गुणदोष पाहणारा आत्मनाश करून घेत असतो.

**ह्मणोनि निंदास्तुतीची कथा । सांडीं सांडीं गा सर्वथा ।**
**तरीच पावसी परमार्था । निजस्वार्था निजबोधु ॥ ५१ ॥**

निंदास्तुतीच्या ठिकाणीं भेदभाव क्षोभतो व परमार्थबुद्धीचें वाटोळें करितो. दुसरें असें कीं दुसऱ्याचे गुणदोष पाहून त्याच्या स्वभावकर्माचें वर्णन करण्यापासून आपल्याला काय फायदा आहे ? अहंकार मात्र बळावतो व तो आत्मघातास कारण होतो. (अ० २८ ओवी४५ते५६).

( ४ ) साधकानें आपल्या गुणांची स्तुति करावयाची नाहीं व दुसऱ्यानें केलेली निंदा मात्र आनंदानें सोसायची हाही अभ्यास केला पाहिजे ! आपली निंदा करणारा आपल्याहून वेगळा नाहीं. आपणच सर्वांतर्यामित्वानें नांदत आहोंत हा विचार दृढ असला पाहिजे. स्तुतिनिंदेनें गडबडेल तो परमार्थी कसला ?

**आपुली जिव्हा आपुले दांतीं । रगडिली होय अवचितीं ।**
**तया कोपाची अतिप्राप्ती । कोणाप्रती करावी ? ॥ ७७८ ॥**

दांत आपले व ओठही आपले, तेथें कोणी कोणावर कोपावें ? काय रागानें दांत उपटावेत ? कां जीभ हासडून बाहेर काढावी ? यानें हानी आपलीच होणार आहे ! दुसऱ्यानें ढका दिला तर कोपानें अविचारी मनुष्य त्यावर उसळेल, पण त्याचा तोच होऊन पडला तर त्यानें कोणावर रागवावें ? तात्पर्य, सर्वात्मभावाचा बोध ज्याला ठसला आहे तो दुसऱ्यानें केलेल्या छळानें, उपहासानें, लेशमात्र डगमगत नाहीं. (अ. २३)

———

## १४. त्रिगुणांचा विचार.

सत्व, रज व तम ह्या तीन गुणाचा विचार गीतेनें १४ व्या अध्यायांत सांगितला आहे व भागवतांत १३ व्या व २५ व्या अध्यायांत त्या विषयाची सविस्तर व सुंदर मांडणी केली असून नाथांनीं त्याचें विवरण फारच चांगलें केलें आहे. सारी सृष्टि त्रिगुणात्मक आहे. ‘ देखिजे अथवा ऐकिजे । कां मनें जें जें चिंतिजे ’ तें सारें त्रिगुणात्मक आहे. त्रिगुणांनीं जग बांधलें आहे. गुण हे प्रकृतीपासून झाले असून आत्म्याशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं. आत्मा गुणत्रयातीत आहे. तूं निस्त्रैगुण्य हो, गुणातीत हो, अशी गीतेचीही शिकवण आहे, त्रिगुण पुरुषाला बांधून संसारी बनवितात, त्यालाच जीव म्हणतात; तथापि पुरुष हा मूळचा गुणातीत, असंग, मुक्त आहे. गुणांनीं बांधलेला तो बद्ध व गुणांपासून आपले वेगळेपण ज्यानें जाणले तो मुक्त. गुणांपासून आपले वेगळेपण ओळखून गुणांत वागणें हें ज्ञान्याचें लक्षण आहे. ‘ मायाबिंबित चैतन्य । त्यासी बोलती जीवपण । त्या जीवासी त्रिगुणीं बांधोन । देहाभिमान दृढ केला.’ माझा संबंध मायाजनित गुणांसी नसून मी मूळचा गुणातीत, असंग मुक्त आहे हें ओळखून वागतां आले ह्मणजे जीव कृतकृत्य झाला. नारळाच्या तोंडावरची खीळ काढल्याशिवाय आंतलें पाणी आपणांस मिळत नाहीं; त्याप्रमाणें त्रिगुणाचा बंध सोडविल्याशिवाय ब्रह्मसुख

भोगतां येत नाहीं. सूर्य अंधाराचा नाश करितो पण अंधार कांहीं सूर्या-सन्मुख येत नाहीं; त्याप्रमाणें मायेचा नियंता जो परमात्मा तो माया दूर करितो पण माया त्याच्यासमोर ठरत नाहीं. अशा परमात्म्याशीं ऐक्य-सुख भोगणें ह्मणजेच उपासनेच्या भाषेंत त्याला शरण येणें होय. या हरिशरणागतीनें ह्म० भक्तीनें जीव गुणातीत होतो. 'करितां माझें अनन्यभजन । सहज वाढे सत्वगुण । सत्वगुणास्तव जाण । उपजे ज्ञान सविवेक ॥ विवेक ज्ञानाचीये वृत्ती । रजतम दोनी झडती । शोधित, सत्वाचिये स्थिती । अभेदभक्ती उल्हासे' असें नाथांनीं २९ व्या अध्यायांत ( ओवी ४१९।४२० ) ह्मटलें आहे. निद्रा, आलस्य, प्रमाद हा तमोगुणाच धर्म आहे; लोभ, महत्वाकांक्षा, चळवळी, कर्तृत्वा-चा अभिनिवेश हा रजोगुणाचा धर्म आहे; व आत्मज्ञान हा सत्वगुणाचा धर्म आहे. तमोगुण व रजोगुण हे दडपून सत्वगुणाची वाढ करावी, व सत्वाचा उत्कर्ष झाला कीं गुणातीतता सहज प्राप्त होते. कुंभकर्ण हा तमोगुण, रावण रजोगुण, बिभीषण सत्वगुण व राम निस्त्रैगुण्य—या-प्रमाणें रामायणांत हा त्रिगुणांचा खेळ कथारूपानें स्पष्ट केलेला आहे! याचा अर्थ रामायण रूपकात्मक आहे असा नाहीं. त्यांतील कथाभाग इतिहासच आहे. असो. कर्म, कर्ता, शास्त्रें, ज्ञान, आहार, श्रद्धा, सुख, देश, काल, जन, उदक, ध्यान, मंत्र व संस्कार यांत त्रिगुणत्व कसें भरलें आहे हें वाचकांच्या नीट लक्षांत यावें व सत्वगुणोत्कर्षानें त्यांनीं निस्त्रैगुण्याच्या मुक्कामावर जावें यासाठीं नाथभागवताच्या आधारें ( अ० १३ ओवी ६० ते १६० व अ० २५ ओवी ( १६० ते ३९० ) मी पुढें एक कोष्टक देत आहे. नाथांनीं हा विषय फार सुबोध केला आहे. आत्मा गुणातीत आहे व तूं ( जीव ) स्वरूपतः आत्मा असून तूंही गुणातीत आहेस हें जाणून घेऊन मग गुणांत खुशाल वाग असें नाथांचें सांगणें आहे.

———

## १५ त्रिगुणांचें कोष्टक.

| | तामस | राजस | सात्विक |
|---|---|---|---|
| १. कर्म : | क्रोधवश होऊन शत्रु मरणादि उपाय करणे हिंसा, दंभ, मत्सर, निंदा इ० मलिन मनोवृत्ति ठेवून केलेले घातक कर्म. | काम्यकर्म; इहपरलोकींच्या फलेच्छेने केलेलें सकाम कर्म; ससारकामना वाढविणारें, गृहासक्तीच्या व्यापारात आमरण गुंतवणारें कर्म. विषयगोडी वाढणारे कर्म राजस. | ईश्वरार्पण बुद्धीनें केलेले किंवा फलेच्छा व कर्तृत्वाभिमान सोडून केलेलें कर्म; स्वकर्म व स्वधर्माचरण हें स्वभावत:च पवित्र असतें. 'करूनि फळाशेचें शून्य स्वधर्मे करिती भगवद्भजन । पुरुष अथवा स्त्रिया जाण । ते सत्वसंपन्न निश्चित'. परोपकार सात्विक. |
| २. कर्ता : | नि:शेष हारपे विवेक ज्ञान स्मृति सैरा वळघे रान । नाठवे कार्यकारण । ऐसा कर्ता जाण तामस ॥ | फलाभिलाषेच्या चित्ती गाठी तेथें अंध झाली विवेकदृष्टी । राजस कर्ता फलाशेसाठीं अति दु:खकोटी स्वयें सोशी ॥ | सद्गुरुचरणसंगें,सकलसंग छेदी विरागें । सात्विक कर्ता निजांगे विषयसंगें असंगी ॥ |
| ३. शास्त्रें | वेद व ईश्वर यांना न मानणारीं सारीं पाखांडशास्त्रें. | प्रवृत्तिशास्त्रें हीं राजस होत. इतिहास, राजनीति,अर्थशास्त्र,काव्य-नाटकें, धर्मशास्त्र, भूगर्भशास्त्र, चौदाविद्या, चौसष्ट कला, हीं सारीं राजस होत. | निवृत्तिपर शास्त्रें सात्विक होत.श्रुति,गीता-भागवतादि ग्रंथ,सकल संतांचें ग्रंथ हे सात्विक होत. 'उपनिषद्भागेंसी वेदान्त । त्याचा मथितार्थ सेवावा' |
| ४. ज्ञान : | आहारनिद्राभयमैथुनादि सेवनापुरतें जें | वेदांतशास्त्राचें सांग अध्ययन होऊनही | आत्मज्ञान तेवढें सात्विक होय. एकपणाचें |

| | तामस | राजस | सात्विक |
|---|---|---|---|
| | प्राकृत ज्ञान तें तामस. 'महामोहो गिळी ज्ञानस्फूर्ती । मी जड अंध मानी निश्चिती । नश्वर पदार्थी आसक्ती । तें ज्ञान निश्चिती तामस॥ | 'अद्वैत निश्चयो नाहीं चित्तीं ' असें असेल तर तें ज्ञान राजस होय. विषयेंद्रियसंयोगानें होणारें भेदज्ञान राजस. | अभेदज्ञान तें सात्विक. 'देहीं असोनि देहातीत भूतीं भूतात्मा भगवंत । भूतांसबाह्य सभराभरित । हें ज्ञान निश्चित सात्विक.' सर्वेंद्रियाना आत्मस्फूर्ति. |
| ५. आहार | अपवित्र व भूतांना पीडा देणारा आहार | इंद्रियप्रेष्ठ ह्म. रसनेंद्रियाला रुचणारा आहार गोड, खरपूस, तिखट, आंबट, खारट, तळीव, फोडणीदार, चमचमीत पदार्थ. | पवित्र ह्म० धर्मार्जित, अल्पप्रयासानें सहज मिळणारा. 'ग्रासोग्रासीं गोविंद' तें भोजन शुद्ध सात्विक. |
| ६. श्रद्धा : | अधर्माला धर्म समजणारी आंधळी श्रद्धा. ' जेथें अपेयाचें पान । स्वेच्छा अभक्ष्यभक्षण । अगम्यादि घडे गमन । ते श्रद्धा जाण तामसी' क्षुद्रदेवतांच्या प्रसादार्थ बोकड वगैरें मारणें, प्राणिहिंसा करणें. | कर्मश्रद्धा राजस. देहाभिमान, वर्णाश्रमधर्माभिमान, देशाचा, जातीचा, भाषेचा इ० झाडून सर्वप्रकारचें अभिमान घेऊन केलेलीं कर्में राजस श्रद्धेमुळें होतात. | आत्मज्ञानविषयक श्रद्धा. मी आहे, मीं ब्रह्म आहे, मी मुक्त आहे अशा प्रकारची श्रद्धा सात्विक होय. |
| ७. सुख : | मोहजनित सुख. | वैषयिक सुख, विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून होणारें सुख. | आत्मसुख; जीवाला परमात्मसंयोगापासून होणारें सुख. |
| ८. देश : | द्यूत खेळण्याचीं स्थानें, वेश्यागारें, कलालांचीं किंवा अंमल करणारां· | राजद्वार, सभास्थानें, चोहाटे, बाजारपेठा, नाटकगृहें इ० जेथें | 'पवित्र आणि तीर्थभूत। विजनवन एकांत । ऐसिये वस्ती सुखावें |

| | तामस | राजस | सात्विक |
|---|---|---|---|
| | चीं घरें, जेथें दोष चर्चा व संतनिंदा होतें तीं स्थळें. | विषयक्षोभ होतो, अहंकार पेटतो तीं स्थळें. | चित्त । तो वास निश्चित सात्विक'. हरिमंदिरें, संतांचीं निवासस्थानें, अभेदभक्तांची घरें. |
| ९. काल: | मध्यरात्र; चोर, वेश्या, पापी यांचा काल. | सांजवेळ. सूर्योदयापासून सारा व्यवहारकाल. | ब्राह्ममुहूर्त. नामसंकीर्तनात सप्रेमव सोल्हास चित्त मग्न असतें असा सर्व काळ. |
| १०. जन: | पाखांडी, ढोंगी, लबाड, दुराचारी, पापी इ० लोक. | प्रवृत्तिमार्गात रमलेले लोक. सभापति, व्यापारी, शेतकरी, राजकारणी, प्रपंचव्यवसायांत मग्न असलेले लोक. चोहोटा ज्यांना प्रिय, राजद्वार, पार, सभा आवडणारे. | विरक्त, भक्त, ज्ञानी, संत इ. देवाचे लोक. |
| ११. उदकें | मद्यादि. | सुगंधी अत्तरें, तेलें, नाना प्रकारचे चविष्ट रस, वाळयाचे—कापराचे इ. पाणी. | तीर्थोदकें व गुरुपादोदक; हरिहरादि ईश्वरप्रतिमांचें चरणामृत. |
| १२. ध्यान | शत्रूंचें व त्यांच्या घातपातादि साधनांचें ध्यान | विषयांचें व स्त्रीपुत्रादि प्रपंचाचें ध्यान. | शिवविष्णूचें किंवा उपास्याचें ध्यान. संत सद्गुरूचें ध्यान. 'हारपे ध्येय ध्यान धाता' ठसावे चैतन्यघनता' तें ध्यान सात्विक होय. |

| | तामस | राजस | सात्विक |
|---|---|---|---|
| १३. मंत्र | क्षुद्र जारणादिमंत्र. | काम्यमंत्र. | गायत्रीमंत्र किंवा हरिहरांचें नाममंत्र. |
| १४. संस्कार | दगडमातींच्या घरांत शेतापोतांत मन. | माझी आज्ञा वंद्य व्हावी, लौकिकांत देहप्रतिष्ठा व्हावी, व 'सभेचे चोहटां मी पूज्य' असावें अशी वासना. | निःसंकल्प, हरिहरसेवेचे संकल्प; सवैराग्य परमात्मनिष्ठा. |

## १५ दोन पक्षी !

सुपर्ण म्ह० पक्षी जसा अनेक वृक्षांवरून उडत जातो, तसा देही अनेक देहांतरें स्वीकारितो. अर्थात् देही व देह भिन्न आहेत, देह वेगळा व आत्मा वेगळा ( ह्यांतच देहात्मवादाचें खंडण आहे. ) जीव आणि शिव हे दोन पक्षी एकाच देहवृक्षावर राहतात. हे अगदी जिवलग सखे आहेत, 'दोघेही चिद्रूपें सारखे' आहेत. हा जीवशिवांचा मेळा खेळीमेळीनें एकत्र नांदतो. जीवाच्या सर्व इच्छा शिव पुरवितो व जीव हा शिवाच्या ( ईश्वराच्या ) आज्ञेंत वागतो. 'जीवु अत्यंत आडलेपणें। ईश्वरासी धांव धांव गा म्हणे । तो तत्काळ पावे धांवणें । करी सोडवणें जीवाचें':-याप्रमाणें जीवाच्या सोडवणुकीला ईश्वर धांवतो अर्थात् जीव ईश्वराधीन आहे ( येथें अनीश्वरवादाचें खंडण आहे ). दीप प्रभेला किंवा प्रभा दीपाला कधींही सोडीत नाहीं, त्याप्रमाणें जीवशिव एकमेकाला पळभरही विसंबत नाहींत. 'ईश्वरू जैसें जैसें प्रेरी, तैसें तैसें जीवू करी' असें त्यांचें सख्य अनुपम आहे ! देहवृक्षावर अतिगूढ हृदयस्थान आहे तें या दोघांचें एकत्र बसण्याचें नीड ह्म० घरटें आहे, तें त्यांनीं यदृच्छेनें केलें आहे. जीव याप्रमाणें शिवाच्या सख्यत्वानें व दयेनें नांदतो व अखेर त्यांतच मिळून जातो ! देहवृक्षाला खारटतुरट पक्व अपक्व अशीं फळें

येतात तीं अधाशीपणानें जीव खातो पण शिव खात नाहीं, एवढाच त्या दोघांत फरक आहे ! हीं कर्मफळें खाऊं नकोस असा शिव जीवाला इषारा देत असतो पण जीव त्याचें ऐकत नाहीं व भवचक्रांत फिरत राहतो! शिव अधिक शहाणा आहे, 'तो कर्मफळातें न सेवित् । तो ज्ञान-शक्तीनें अनंतू । सदा परमानंदें तृप्तू । असे डुल्लतू स्वानंदें,' आणि जीव—'जीवू प्रपंचाचा ज्ञाता । परी परमात्मा नेणे तत्वता । यालागी भोगी भवव्यथा । कर्मफळें खातां अतिबद्ध ! । देहसंबंधाआंत प्रतिपदीं आत्मघात.' अखेर जीव कर्मफळांना ह्म० विषयभोगांना जेव्हां कंटाळून तीं खाण्याचें सोडून देतो व शिवाला शरण येतो तेव्हां शिव चिरस्नेहाला वश होऊन त्याला आपल्यांत मिळवून घेतो ! यालागी जीव बद्ध व शिव मुक्त म्हणतात ( अ० ११ ओवी १५५ ते २१५ )

---

## १६ आत्मा अवस्थात्रयाचा साक्षी आहे.

स्थूल, सूक्ष्म, व कारण ह्या तीन देहांच्या अनुक्रमें जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीन अवस्था आहेत. आत्मा अवस्थातीत आहेत, अवस्थाचा साक्षी आहे. बाल्य, तारुण्य, वार्धक्य ह्या देहस्थितींचा तो साक्षी एकच आहे हें उघड आहे. जागृतींतल्या कल्पना व संस्कार भोगाविस्तार पावतात. 'गज तुरंग खर नर । गिरि दुर्ग पुर नगर । विशाळ सरिता समुद्र । वासनेचें वैचित्र्य स्वप्नीं देखे॥' जागृतींत देहेंद्रियसंबंध प्रत्यक्ष असतो, स्वप्नांत तो मनोमय असतो. जागृति नाहीं, स्वप्न नाहीं, अंतःकरण लीन आहे, अहंकार नाहीं. अशी जी मूढ अज्ञानस्थिति तिला सुषुप्ति म्हणतात. जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्या तीन अवस्थांचें देखणे जे पुरुष विश्व, तैजस व प्राज्ञ हे तीन वेगवेगळे नसून त्यांचा देखणा एकच आहे व तो आत्मा आहे. जो मी जागतो तोच मी स्वप्नावस्था पाहतों व तोच मी सुखानें निजतों. मी सुखानें निजलों होतों असें जो जागृतींत म्हणतो तोच सुषुप्तीचाही साक्षी आहे हें स्पष्ट आहे. ' जो इंद्रियांचा प्रकाशकू । तोच

मनाचा चाळकू । जो सुषुप्तीद्योतकू । साक्षित्वें एकू आत्मा. ' सुषुप्तींत आत्मा नाहीं असें कोणी म्हणेल तर मी निजलों होतों हें कोणी जाणलें ? तात्पर्य:—

**प्रकृतिकार्याहून परता । देहादि अवस्थांतें प्रकाशिता ।**
**गुण-इंद्रियांचा नियंता । जाण तत्वता तो आत्मा ॥ ४९६ ॥**

इंद्रियें एकदेशी, मन संकल्प करणारें–आणि आत्मा सर्वदेशी निर्विकल्प आहे म्हणून तो त्याहून वेगळा आहे (अ० १३ओवी४१८ते५००)

## १७ ब्रह्मप्राप्तीचा सुगमउपाय–भागवतधर्माचरण.

**प्रश्न**:—ब्रह्मस्थिति अति दुर्गम आहे.. मनोजय अतिदुर्घट आहे व गुणातीतता दुर्लभ आहे अशा स्थितींत ब्रह्मप्राप्तीचा सुलभ उपाय कोणता असा प्रश्न उद्धवानें केला त्यास भगवंतांनीं जें उत्तर केलें तें २९ व्या अध्यायांत सविस्तर दिलें आहे. ' ब्रह्मप्राप्तीचें सुगमसमाधान । तें सप्रेम भगवद्भजन.' पण याचेंही अधिक विशद निरूपण पाहिजे. जो तो ब्रह्म निषेधरूपानें सांगतो. वस्तु व्यक्त ना अव्यक्त, प्रगट ना गुप्त, मूर्त ना अमूर्त, अशा वर्णनानें अज्ञान्यांनीं काय समजावें ? जेथें विचार चालत नाहीं, जेथें मनाचा व बुद्धीचा पोंच नाहीं, अशा निर्गुणनिराकार देवाची प्राप्ति अज्ञजीवांना व्हावी कशी ? मनोजय करावा म्हणतां पण ' घालुनि एकांतीं आसन ' जे प्राणापानादि साधनांत मग्न असतात अशा योग्यांनाही ठकवून जाणारें मन सामान्यजीवांना आवरावें कसें ? या ' मनाच्या वोढी अनिवार आहेत. '

योगयागदानक्रियादि करणारे व ज्ञानाभिमानी हे तुझ्या भक्तीचा जिव्हाळा नसल्यामुळें शीण पावतात. आम्ही ज्ञाते, आम्ही योगी, आम्ही प्रवर्तक कर्ममार्गी, आम्ही पवित्रश्रोत्रिय जगीं, अशा ज्ञातेकर्तेपणाच्या अभिमानानें जे वागतात ते तरणें कठिण !

**तूं जगातें चेतविता । मूढातें ज्ञानदाता ।**
**सकळजीवां आनंदविता । तुझिया सत्ता जग नांदे ॥ १६६ ॥**

**सुगमोपायें स्वरूपप्राप्ती । भाळे भोळे जन पावती ।**
**तसा उपाय श्रीपति । करुणामूर्ती सांगावा ॥ १६७ ॥**

**उत्तरः--(१) माझें करितां अनन्यभजन । मी सर्वथा भक्ताधीन ।**
**तेथ जाति गोत ज्ञातेपण । उंचनीच वर्ण मी न ह्मणे ॥ २१७ ॥**
**मृत्यूचे खणोनि खात । पाडूनि कळिकाळाचे दांत ।**
**अद्वयभजनें माझे भक्त । सुखें नांदत संसारीं ॥ २२४ ॥**

( १ ) देशाचार, कुलाचार व वृद्धाचार पाळावेत, व वेदोक्त नित्य-नैमित्तिक कर्मे कृष्णार्पणबुद्धीनें करावींत.

( ३ ) तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणीं वास करावा, तेथें अनायासें साधुसमागम घडतो. ' पुण्यसरिता जेथ वाहती । तेही साधकां पावन क्षिती.' नाथांनीं बदरिकाश्रम, अयोध्या, कुरुक्षेत्र, पंचवटी, ' मथुरा गोकुळ वृंदावन,' ब्रह्मगिरी ह्म० त्र्यंबकेश्वर, वाराणसी, पंढरपूर, श्रीशैल इ० क्षेत्रांचीं नांवें घेतलीं आहेत. ' जेथें वसले भक्तसज्जन । तो देश पावन सर्वार्थी-' जेथें संत राहतात तेच क्षेत्र व तेथें साधकानें वस्ती करून ' माझें स्वरूपीं ज्याचें चित्त । अखंड जडलें प्रेमयुक्त ' अशा मद्भक्तांच्या सहवासांत असावें. प्रेमळाच्या संगतींत प्रेम वाढतें.

( ४ ) रामनवमी, गोकुळाष्टमी, महाएकादशी असल्या महापर्वप्रसंगानें आपल्या सामर्थ्यवैभवानें प्रेमळांसह महोत्सव करावेत, किंवा होत असतील त्यांत सामील व्हावें व भक्तिसुखानंद वाढवीत असावा.

( ५ ) ' अंतरंगभक्ति ' शिवाय परमात्मप्रसाद होत नाहीं म्हणून मुख्य लक्ष अंतःस्थ श्रीहरीकडे असावें व तोच सर्व भूतांच्या अंतरीं आहे म्हणून सर्व भूतांशीं भगवद्भावनेनें वागावें. आपणासगट सर्वांभूतीं भगवद्भाव हीच उपासना आहे. कर्मभ्रष्टांचें तोंड पाहूं नये, पाप्यांपासून दूर असावें इ० नियम आरंभीं आपल्या ठिकाणचा भाव दृढ होईंपर्यंतच पाळावेत. अभेदभक्ति सर्वोत्तम आहे. तेथें पापी पुण्यवंत हा भेद नाहीं.

**अभेदभक्तीचें महिमान । तिच्या पायां लागे आत्मज्ञान ।**

**तेथ वंद्य निंद्य समसमान । विषमींही जाण विकारेना ॥ २९३ ॥**

( ६ ) ब्राह्मण, व चांडाळ, पुण्यात्मे व पापी, चोर व साव, सात्विक व क्रूर इ० आत्मदृष्टीनें पहावेत. ‘ समदृक् पंडितो मतः ’ ( असेंच ‘ पंडिताः समदर्शिनः ’ या वचनांत गीतेनें सांगितलें आहे ). मशक आणि ब्रह्म, ईश्वर आणि पाषाण हे भक्तांला समान आहेत.

**स्वधर्मकर्म वर्णाचार । करितांही निजव्यवहार ।**
**ज्यासी सर्वभूतें मदाकार । तो भक्त साचार प्रिय माझा ॥ ३१२ ॥**
**ज्यांसी सर्वभूतीं बुद्धि समान । तेंचि भक्ति तेंचि ज्ञान ।**
**तेंचि स्वानंदसमाधान । सत्य सज्ञान मानिती ॥ ३१३ ॥**

सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवून वागल्यानें अहंकार, स्पर्धा, असूया, निंदा भेद, तिरस्कार, द्वेष, क्रोध इत्यादि तामस वृत्ति अपाप नाहींशा होतात. सन्मानाची चाड, अहंता, लौकिकाची लाज, वर्णाभिमान हे सर्व सांडून ‘ चांडाळादि हीन जन । गोखरश्वान वंदावें.’ सर्वाभूतीं भगवद्भजन हेंच ब्रह्मप्राप्तीचें सुगमसाधन होय. हीच ज्ञानास्थिति व हीच सुगम भक्ति.

**काया वाचा आणि चित्तें । सर्वभूतीं भजले मातें ।**
**त्यासी भगवद्रूप सर्वभूतें । सुनिश्चितें ठसावतीं ॥ ३५९ ॥**
**तेव्हां मी एक एथें । भगवद्रूप पाहे सर्वभूतें ।**
**हेही वृत्ति हारपे तेथें । देखे सभोंवतें परब्रह्म ॥ ३६० ॥**

( ७ ) ब्रह्मच परिपूर्ण भरलें आहे हीही स्फूर्ति जिरून गेली ! येथें वेद-शास्त्र, देवभक्त, ‘ सर्व भेदभाव मावळले–‘ अखंड वस्तु अद्वयत्वें–’ येथें प्रपंचभान गेलें व राहिलें तरी ब्रह्मरूपानें राहिलें. ‘ सर्वभूतीं भगवत्दृष्टि ’ हीच पराभक्ति, हाच ब्रह्मभाव ! कायावाचामनानें होणारे भगवद्भजन हेंच. हें साधल्यावर दुसऱ्याचे गुणदोष बोलणें किंवा कठिण शब्दानें मन दुखवणें हें संपलें. अपकार साहून उपकार करणें हाच मग भक्ताचा व्यवसाय होतो. कर्माचरण सहजच कृष्णार्पण होतें. त्याचा ‘ व्यवहारार्थ जो प्रयास ’ तोही परब्रह्मीं अर्पिला जातो. येथें मतभेद नाहींत, वाद

नाहींत. याप्रमाणें सनातन ब्रह्मपद पावणें हेंच चातुर्य, हीच बुद्धिमत्ता, हाच परमधर्म. ( अ० २९ ओवी २१० ते ४१० )

*　　　*　　　*

उद्धवाचें हृदय कृतज्ञतेच्या प्रेमानें भरून आलें. त्यानें देवाची स्तुति केली व आशीर्वचन मागितलें. देवा ! तुझ्या कृपेनें मी कृतकृत्य झालों, ‘ न देखितां भवभयादि दुःखभान ’ स्वानंदनिमग्न झालों. तूं सद्‌गुरु झालास, तुझी भक्तिच राहो मला ती मुक्ति नको. ‘ सायुज्यावरीही पूर्ण । तुझें गुरुभजन मज देईं.’ मला मुक्तीवरील भक्ति ’ किंवा ‘ मोक्षावरील भक्ति ’ दे, त्यापेक्षां आणखी कांहींही नको. ‘ तुझे भक्तीवीण मुक्तपण ’ तें अलवण ह्म० आळणी आहे. मुक्तीला भक्तीची जोड असेल तरच ती सेव्य आहे. नुसती मुक्ती नको. माझी नित्यमुक्तता स्वतः सिद्ध आहे, भक्ति देशील तरच त्यांत तुझी उदारता आहे. ‘ माझी न मोडे नित्यमुक्तता । अहेतुक चालवी भक्तिपंथा ’ एवढेंच वरदान दे. ‘ गुरुबम्ह दोनी अभिन्न ’ हेंही त्वांच उपदेशिलें आहेस, म्हणून ‘ मुक्तीवरील गुरुभक्ति ’ दे. भगवंतांनीं उद्धवाचे मनोरथ पूर्ण केले. ( अ० २९ ओवी ७१८ ते ७६० ).

———

# १२ नाथांचें भावार्थरामायण.



## १ भावार्थरामायणाचा विशेष.

नाथांचा सर्वांत मोठा ग्रंथ म्हणजे त्यांचें भावार्थ रामायण हा होय. ह्या सप्तकांडात्मक प्रचंड ग्रंथाची एकंदर ओवीसंख्या सुमारें ४० हजारांवर आहे! हा संपूर्ण ग्रंथ नाथांनीं रचिला नाहीं. पहिलीं पांच कांडें व सहाव्या युद्धकांडाचे ४४ अध्याय झाल्यावर नाथांचें प्रयाण झालें व उरलेला भाग त्यांचा शिष्य गावबा यांनीं संपविला. याचीं शेवटचीं दोन कांडें पहिल्या पांच कांडांपेक्षां अधिक विस्तृत व मोठीं आहेत. एकंदर ग्रंथाचे अध्याय २९७ आहेत, त्यांपैकीं २७+१८+२३+१८+४२+४४=१७२ अध्याय नाथांच्या तोंडचे आहेत व बाकीचे १२५ अध्याय गावबाचे आहेत. मूळ ग्रंथाच्या ४० हजार ओव्यांपैकीं सुमारें २५ हजार ओव्या नाथांच्या आहेत, बाकीच्या १५ हजार गावबाच्या आहेत. वाल्मीकिरामायण, अध्यात्मरामायण, भागवत, रामविषयक संस्कृत नाटकें, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथांचे आधार नाथांनीं घेतलेले असून कित्येक संस्कृत सुभाषितांचीं रूपांतरेंही प्रसंगानुसार दिलीं आहेत! यावरून नाथांची विद्वत्ता व बहुश्रुतपणा प्रगट होतो. तथापि नाथांची ही एकंदर रचना स्वतंत्र स्फूर्तीची आहे. नाथांचें हें रामायण म्हणजे एक महापुराण आहे म्हटलें तरी चालेल. यांतील वर्णनें सरस व हृदयंगम असून ग्रंथ अर्थातच प्रासादिक आहे. नाथांसारख्या परिणतप्रज्ञाची ही गंभीरवाणी आहे. ह्या ग्रंथांत अध्यात्मविचारांचीं उत्तुंग शिखरें आहेत व मनुष्यस्वभावाच्या सागरतुल्य सखोल हृदयाचा ठाव घेतलेलीं सूक्ष्म स्थळेंही आहेत. कोठें हिमाचलाचीं शिखरें व कोठें अगाध समुद्राचा तळ, पण नाथांच्या सर्वगामी बुद्धीनें दोहोंनाही स्पर्श केला आहे! बुद्धीची व्यापकता व सूक्ष्मता

दोन्ही ह्या ग्रंथांत नाथांनीं प्रगट केलीं आहेत. कथेचा रसाळपणा आणि अध्यात्माचें गांभीर्य दोन्ही भक्तिरसासीं मिळून प्रगट झाले आहेत. नाथांचा समकालीन कृष्णदास मुद्गल यानें युद्धकांड लिहिलें आहे, रामदासांनीं सुंदरकांड व युद्धकांड दोनच लिहिलीं आहेत. श्रीधर, मोरोपंत, निरंजनमाधव इत्यादि कवींनीं लहानमोठीं अनेक रामायणें रचिलीं आहेत, पण नाथांच्या या विस्तृत व भावपूर्ण रामायणाच्या पंक्तीस वास्तविक त्यांतलें कोणतेंच रामायण बसत नाहीं. त्याच्या तुलनेला एक तुळशीरामायणच घेणें योग्य होईल. तुळशीरामायण अत्यंत सरस व लोकप्रिय आहे. त्याची व्यवस्थित मांडणी, त्यांतलें कवित्व व प्रेमळपणा अतुलनीय आहे यांत शंका नाहीं; तथापि नाथांच्या ह्या रामायणाचें गांभीर्य व व्यापकपण हे गुणही असेच अलौकिक आहेत. चारदोन उदाहरणें देतों. नाथांच्या बालकांडाचा २२ वा अध्याय काढून पहा. सीतास्वयंवरप्रसंगीं वसिष्ठांनीं रामाची वंशावळी दिली आहे व तींत 'सूर्यवंशांचे भूपती । एकाचढी एकाची ख्याती' अशा रामपूर्वजांची दिलेली त्यांच्यात्यांच्या ठळक प्रतापांसह भरपूर नामावळी तुह्मांस कोणत्याही रामायणांत सांपडणार नाहीं: सूर्य, मनु, इक्ष्वाकु, पृथुचक्रवर्ती, उत्तानचरण, ध्रुव, मांधाता, शिबी, हरिश्चंद्र, रुक्मांगद, धुंधुमार, धर्मांगद, अंबऋषी, सगर, भगीरथ, काकुत्स्थ, दिलीप, रघु, अज, दशरथ–राम. नाथांचा व्यापक पुराणपरिचय यावरून प्रतीत होतो.

विश्वामित्र रामाला घेऊन वनांत शिरले तेव्हां त्याला शुभशकुन झाले ते सांगतांना शकुनांचें जणुं शास्त्रच नाथांनीं उभें केलें आहे. बाहेर पडतांना पवित्र ब्राह्मण भेटला तर मनुष्य विजयी होईल, 'पूर्णकलश' घेऊन येणाऱ्या किंवा दधिक्षीरनवनीतांचें घट शिरीं वाहणाऱ्या गवळिणी समोरून आल्या तर 'मनोरथ पूर्ण होऊन ऐश्वर्याभिवृद्धि' होईल, 'सव्य गेलिया वायस' यश मिळेल व 'अपसव्य गेलिया तास' शत्रूंचें निर्दाळण होईल, हंस सन्मुख भेटल्यास कीर्ति मिळेल, 'सव्य गेलिया मृगगण' अपूर्व लाभ होऊन 'मृगीचें वामगमन' नववधूचा लाभ करून देईल,

'नकुळ गेलिया वामभागीं। तो विजयी होय रणरंगीं,' बरें 'डावा गेलिया भारद्वाज' तो कार्यसिद्धी करील इ० शकुनगती विश्वामित्रानें रामास सांगितल्या आहेत! रामलक्ष्मण 'काकपक्षशिखाधर। कवची खड्गी महावीर। बाळपणीं अतिदुर्धर। जेवीं वैश्वानर तेजस्वी' असे पाहून विश्वामित्रास सर्व शुभशकुन होत आहेत असेंच वाटलें (बाल० अ० १२). विश्वामित्रानें रामलक्ष्मणांस शस्त्रास्त्रविद्या शिकविली त्या-प्रसंगीं पन्नगास्त्र, गरुडास्त्र, अग्न्यस्त्र, पर्जन्यास्त्र, पर्वतास्त्र इ० २५।३० अस्त्रांचीं व तशींच शूळत्रिशूळादि शस्त्रांचीं नामावळी दिली आहे (अ० १३). सीतास्वयंवरप्रसंगीं स्वयंवरप्रसंग संपूर्णतेनें उभा केला आहे तर युद्धप्रसंगींचे खणखणाट व राक्षसवानरांचे युद्धप्रसंग जणुं प्रत्यक्ष पाहिले आहेत असें वर्णन केलें आहे. शोकवर्णनप्रसंगीं करुण-रस मूर्तिमंत उभा केला आहे. याप्रमाणें नवरसवर्णनांचे प्रसंग पूर्णतेनें नाथांनीं वर्णन केलें असून त्यांचें शब्दभांडारही अपूर्व आहे. पौराणिक आख्यानें गाणाऱ्या मराठी कवींचे नाथ आदिगुरु आहेत. संस्कृत सुभाषितें किंवा काव्यपुराणांतले श्लोकही नाथांनीं रूपांतरानें कसे सांगितले आहेत तें पहा. 'पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने। पुत्रस्तु स्थाविरे भावे न स्त्रीस्वातंत्र्यमर्हति' ह्या श्लोकाची ओढाताण नवे जुने लोक आपापल्यापरीनें करीत असतात! 'न स्त्रीस्वातंत्र्यमर्हति' हें वचन बायकांना स्वातंत्र्य मुळींच उपयोगाचें नाहीं, बायका म्हणजे काय–'पायींची वहाण' इ० प्रकारें जुने लोक वरील वचनाचा पुरुषाचें बायकांवर वर्चस्व स्थापन करितांना करीत असतात व नवे लोक बायकांच्या पक्षपातानें ह्या वचनावर तुटून पडत असतात! वरील श्लोकाचा दोघांनीं केलेला अर्थ बरोबर नसून त्यानें स्त्रीसंरक्षणाचा कायदा सांगितला आहे असें नाथ म्हणतात. मातेनें बालपणीं, पित्यानें कुमारपणीं, सासुसासऱ्यांनीं विवाहोत्तर, पुत्रांनीं वृद्धपणीं पण 'मुख्य रक्षण भर्तार। तेणें निरंतर रक्षावी' असा या वचनाचा कटाक्ष स्त्रियांच्या रक्षणाकडे आहे असें

नाथ सांगतात ( अयोध्या० अ० ७ ). ' पिता यस्य शुचिर्भूतो ' ह्या श्लोकाचा अर्थः ' पिता ज्याचा शुचिर्भूत । माता पतिव्रता निश्चित । श्रीरामसेवे नित्यरत । त्याचें चित्त चळेना ॥ रामभक्तांची नित्य स्थिती । गुह्य गुह्यार्थ देखती । तेणें चळेना चित्तवृत्ती । जाण निश्चिती श्रीरामा ' असा उद्गार परस्त्रीसौंदर्य एकांतांत दृष्टीस पडलें असतांनाही जातिवंताचें चित्त चंचल होत नाहीं हें प्रसंगविशेषानें लक्ष्मण रामास सांगत आहे ( अरण्य० अ० ८ ). सतीची योग्यता अनेक स्थळीं वर्णन केली असून प्रेताच्या प्रीतीनें ज्या अग्नीला देह अर्पण करितात त्या प्रेतभूत होतात म्हणून विधवांनीं सती न जातां ' जीवित्व रामार्पण ' करून मुलाच्या परिपालनांत व रामसेवेंत आयुष्य सुखानें कंठावें असें नाथांनीं स्पष्ट सांगितलें आहे ( किष्किंधा० अ० ७ )!

---

## २ नाथ आणि गावबा.

नाथांचें भावार्थरामायण युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायापर्यंत आलें तों त्यांचा निर्याणसमय ओढवला. ग्रंथ अपुरा राहणार म्हणून श्रोत्यांस फार वाईट वाटलें. कृष्णदास लोळे रामायणकर्ता नाथांकडे पूर्वी एकदां आला होता. त्याचें युद्धकांड संपण्यास अकरा दिवसांची मुदत पाहिजे होती, तेव्हां नाथांनीं त्याचें मरण अकरा दिवस लांबवून त्याच्या हातून ग्रंथ पूर्ण करविला होता ! ह्या गोष्टीची नाथांस श्रोत्यांनीं आठवण दिली व भावार्थरामायणाच्या समाप्तीपर्यंत तरी मृत्युकाळ लांबवण्यास सांगितलें. पण नाथांनीं कालवंचना करण्याचें नाकारलें. रामायणास प्रारंभ करितांना ज्यांनीं मीपणा अंगावर घेतला नाहीं ते ग्रंथपूर्ततेची वाट थोडीच पाहणार !

**देहीं अस्तावी देहबुद्धी । तैं जाल्या कवितेची हर्षसिद्धि ।**
**श्रीनाथ नैराश्य आधीं । लौकिकविधी नावडे पै ॥ ११० ॥**

—केशवकृत नाथचरित्र, अध्याय १९.

काळाला शिक्षा करून ग्रंथ समाप्तीस नेण्याचें कारण नाहीं असें

नाथांनीं सांगितलें; तरी कित्येकांनीं आग्रह केला तेव्हां नाथांच्या घरीं गावबा म्हणून एक वेडसर शिष्य होता त्यास नाथांनीं पुढें बोलावलें व ग्रंथ समाप्त करण्याची आज्ञा केली! गावबा सर्वांच्या परिचयांतला व त्याची विद्वत्ता केवढी अगडबंब आहे याची सर्वांस ओळख होती! त्यामुळें नाथांनीं गावबाचें नांव घेतलें तेव्हां हा विनोद असेल असें वाटून सर्वांस हंसूं आलें! पण नाथांसारखे पुरुष जें विनोदानें बोलतील तेंसुद्धां खरें करणें हरीला भाग आहे. गावबा गंगातीरच्या एका कुळकर्ण्याच्या मुलगा असून त्याला बाळपणापासून पुरणपोळी खाण्याची फार आवड होती. त्याला गायत्रीमंत्रसुद्धां धड उच्चारतां येत नव्हता. असा हा स्थूलबुद्धि मुलगा पुरणपोळीसाठीं एक दिवस हट्ट धरून बसला असतांना त्याचे आईनें त्यास सांगितलें कीं, 'पैठणास एकनाथ म्हणून साधु आहेत त्यांच्या घरीं जा म्हणजे तुला रोज पुरणपोळी खायला मिळेल!' मुलगा उठला तो चालूं लागला, पैठणास हा नाथांकडे आला तेव्हां नाथांनीं हरिपंडितासारखें याला ममतेनें वागवीत जा म्हणून गिरिजाबाईस सांगितलें. तेव्हांपासून हा पंधरा वर्षें नाथांच्या घरींच होता. याला नाथ मंत्रोपदेश देऊं लागले तेव्हां 'एकनाथ' ह्या शब्दाशिवाय मी दुसरा मंत्र जपणार नाहीं असें यानें सांगितलें! नाथांच्या घरीं कथापुराणें ऐकण्यांत व सर्वकाळ नाथांच्या सन्निध राहून पडेल तें काम आवडीनें करण्यांत हा सदा दक्ष असे. असा हा सेवेकरी मनुष्य सत्संगतीनें इतका तयार झाला कीं, नाथाज्ञेनें त्यानें वरील प्रसंगीं ४५ वा अध्याय करून दाखविला व नाथांच्या पश्चात् सर्व भावार्थरामायण त्यानें तडीस नेलें!

गावबांनीं आपलें नांव कोठेंही येऊं न देतां पूर्वपरिपाठीप्रमाणें 'एकाजनार्दनाच्या' नांवानें पुढील सारे अध्याय लिहिले आहेत! गुरुस्वरूपीं तो इतका मिळून गेला कीं आपल्या नांवाचा त्यानें उल्लेखही केला नाहीं! बरें नाथांच्या रचनेशीं त्यानें इतका बेमालूम सांधा सांधला आहे कीं साऱ्या ग्रंथाचा कर्ता एकच आहे असें वाटतें!

---

## ३ दोघांचा मिळून ग्रंथ !

भावार्थरामायणाच्या तृतीय विभागाचा लेखक नाथांशिवाय दुसरा कोणीतरी असला पाहिजे यास ग्रंथांतही थोडींशीं प्रमाणें सांपडतात. युद्धकांडाच्या ४५ व्या अध्यायाच्या शेवटीं पुढील ओव्या आहेतः—

**सज्जनांचा स्वभाव पूर्ण । दीनदयाळु चातकघन ।**
**अनाथासी देखतां जाण । घेती धांवोन उचलोनी ॥ १८५ ॥**
**गोड लागे निजमानसीं । तें वंचोनि स्वगोत्रासी ।**
**नेदोनि स्त्रीपुत्रांसी । अनाथासी अर्पिती ! ॥ १८६ ॥**
**यापरी मी अनाथ । होतों भवदरिद्रें पीडित ।**
**एकाजनार्दनीं येथ । केला सनाथ त्रिजगतीं ॥ १८७ ॥**

ह्या ओव्यावरून प्रस्तुत ४५ व्या अध्यायाचा लेखक नाथाव्यतिरिक्त दुसरा कोणी असावा असें वाटतें. रामचरित्रगायन नाथांना आवडत होतें तें काम आपल्या गोत्रजाला किंवा स्त्रीपुत्रांना ( विशेषतः हरिपंडिताला ) न देतां नाथांनीं मला अनाथाला दिलें व सनाथ केलें असा वरील ओव्यांचा अर्थ केल्यास लेखक नाथाशिवाय दुसरा आहे हें उघड दिसतें व प्रसिद्धिही तशीच आहे. पुढें ४७ व्या अध्यायांतः—

**चतुर एकाजनार्दन । करितां निजगुणानुकथन ।**
**शब्दांसीं उपरती होऊन । निजरूपीं लीन तो झाला ॥ १५४ ॥**
**स्वयें निजरूपीं लीन जाला । तरी न राहे उगला ।**
**निजकथा गावया वहिला । राहून ठेला साक्षित्वें ॥ १५५ ॥**
**भरंवसा नाहीं पोटीं । म्हणोनि श्रीरामासी मज गांठी ।**
**घालोनि ठेला अवचटीं । अतिसंकटीं सांडीना ॥ १५७ ॥**
**नेणे पदबंधव्युत्पत्ती । रीघ नाहीं संस्कृतीं ।**
**लेखणी देवोनि हातीं । राम निजकीर्ती लिहवितो ॥ १६३ ॥**

पुढें ५४ व्या अध्यायांत कवीनें आपलें नांव ‘ जयरामसुत ’ असें दिलें आहे. तो म्हणतोः—

**आळस सांडूनियां चित्तें । क्षणभरी करोनि अवकाशातें ।**
**पहावें शोधून ग्रंथातें । आशंकेतें फेडावें ॥ ३३२ ॥**
**एकनाथी रामायण । केलें सप्तकांडकथन ।**
**त्यांत अहिरावणाख्यान । काय म्हणोनि विसरले ॥ ३३३ ॥**
**ऐसें न वदावें उत्तर । ते तंव विष्णूचा अवतार ।**
**त्यांसी स्वप्नीं नाहीं विसर । महाचतुर ग्रंथकर्ते ॥ ३३५ ॥**
**मग साक्षेपें जयरामसुतें । करोनि घातलें अध्यायातें ।**
**हृदयीं धरोनि एकनाथें । हें मजहातें करविलें ॥ ३३६ ॥**
**ऐसें श्रोत्यांसी प्रार्थून । जयरामात्मजें करोनि नमन ।**
**म्हणे पुढील अनुसंधान । सावधान परिसावें ॥ ३४० ॥**

ह्या ओव्यांवरून वाटतें कीं हें सप्तकांडात्मक रामायण एकनाथी रामायण ह्मणून लोकांत पसरलें, पण त्यांत अहिरावणाख्यान नाहीं असें पाहून मागून बऱ्याच वर्षांनीं कोणी जयरामात्मजनामक कवीनें एवढाच अध्याय रचून ग्रंथपूर्तीसाठीं त्यांत घातला असावा ! ८९ व्या अध्यायांत 'शरण एका एकनाथा । जनार्दन कृपावंता । रसाळ रामायणी कथा । तुझा वक्ता तूं स्वामी ' अशी ओवी आहे व युद्धकांडाच्या शेवटीं ' एकनाथें तेणें पाडें । केलें रोकडें मज सरतें ' असें स्पष्टच आहे. ' जयरामसुत ' हे गावबांचेंच नांव असावें !

---

## ४ रामकथेचें अध्यात्म.

नाथ कांहींही लिहित असले तरी त्यांची अध्यात्मदृष्टि अणुमात्र ढळत नाहीं. रुक्मिणीस्वयंवराप्रमाणेंच त्यांनीं रामचरित्रही अध्यात्मपर वर्णिलें आहे. मुख्य कथाभागच काय पण उपविषयही त्यांनीं जागोजाग अध्यात्मदृष्टीनें खुलविले आहेत. सगुणाची गोडी संभाळून अध्यात्म सांगतां येणें फार कठीण आहे पण तें नाथांना चांगलें साधलें आहे. संस्कृत अध्यात्मरामायणा'पेक्षांही त्यांच्या वर्णनांत एक विशेष आहे. अध्यात्म-

रामायणांत स्तोत्रें वगैरे विशेष प्रसंगांनींच अध्यात्माचा विषय सांगितला आहे, एरव्ही कथाभाग सरळ वर्णिले आहेत; पण नाथांची अध्यात्मदृष्टि कथाभागांतही ओतप्रोत भरलेली आहे. त्यांचे कथाप्रसंगही अध्यात्मपर आहेत व अध्यात्मांतही सगुणप्रेमाची गोडी कायम राहिली आहे. सगुणनिर्गुण एक परमात्मा आहे ह्या सिद्धांतानुसार त्यांनीं रामायण गायिलें आहे. बालकांडांत आरंभींच ते सांगतात कीं ' अजापासोनि उत्पत्तिहेत । दशेंद्रियें अतिसमर्थ '—अज अशा परब्रह्मापासून दशेंद्रियें झालीं ह्म० अजापासून दशरथाचा जन्म झाला ! मूळचें अजत्व—ह्मणून अजन्मपण न ढवाळितां राम ' अहमात्मा ' दशरथाचे पोटीं आले. देवांचीं सांकडीं फेडायचीं व स्वधर्माची वाढी करायची हा अवताराचा हेतु. दशरथाच्या तीन राण्या—' जेष्ठ कौसल्या ते सद्विद्या । सुमित्रा ते शुद्ध मेधा । कैकेयी ते अविद्या । मंथरा कुविद्या तीपासी ॥ ' दशरथ हा पोटांतून विरक्त होता. राजभुवन किंवा सिंहासन याविषयींची आसक्ति नाहींशी होतांच वैराग्याच्या पोटीं ज्ञानमूर्ति प्रभु अवतरले ! अयोध्याकांडांतही नाथांनीं सांगितलें आहे कीं परमात्मा एक असून तो चतुर्धा झाला: ' आत्मप्रबोध तो लक्ष्मण । भावार्थ तो भरत जाण । निज निर्धार तो शत्रुघ्न । आनंदविग्रही पूर्ण श्रीराम. ' विवेक आणि विचार तसे विश्वामित्र व वसिष्ट, त्यांपाशीं राम शस्त्रशास्त्र शिकले. राम लक्ष्मणाला एकांतांत म्हणाले कीं 'माझें राज्य तें तुझें जाण । मीतूंपण आम्हां नाहीं. '— गोडी गुळासारखी ' आम्हां तुम्हां देख । वेगळीक असेना; ' तथापि ' तुझें सेवेचें सुख संपूर्ण ' तेंच मी मागत आहे असें लक्ष्मणानें वरदान मागितलें. याचा अर्थ जीवशिवांचें ऐक्य मूळांत आहे तरी जीवानें हें जाणून सेवासुखच मागण्यांत त्याची कृतकृत्यता आहे. राम आणि सीता ह्म० परमात्मा व त्याची चिच्छक्ति. त्यांची एकात्मता सहजच आहे.

**श्रीरामाच्या मनोगता । अनुकूल वर्ते सीता ।**
**सीतेचिया मनोरथा । परिपूर्णता श्रीरामें ॥ ७७ ॥**

**सीतेचा भाव श्रीरामीं पूर्ण । राम सीतेसीं संपूर्ण ।**
**सीता रामें सुखसंपन्न । सुखी रघुनंदन सीतेचेनि ॥ ७८ ॥**
**सीता रस श्रीराम स्वाद । सीता सुमन राम सुगंध ।**
**सीता बुद्धि श्रीराम बोध । अनन्यासिद्धी येरयेरां ॥ ८२ ॥**
**येरयेराविण जाण । न करिती उदकपान ।**
**येरयेराविण न खाती पान । प्रीती अनन्य येरयेरां ॥ ८८ ॥**
**येरयेरां वेगळेपण । होऊं न सकती अर्धक्षण ।**
**अणूमाजी दोघेजण । नांदती पूर्ण पूर्णत्वें ॥ ८९ ॥ (बाल० २७)**

---

## ५ दशरथ व त्याच्या बायका.

'राजा पाहे राष्ट्र सकळ। तंव फिटले द्वंद्वदुःखदुष्काळ!'– दशरथ आपल्या प्रजांच्या हिताविषयीं दक्ष होता. अतिवृष्टी–अनावृष्टि, अत्युष्णता–कडक थंडी इ० द्वंद्वें, दुःखें, व दुष्काळ यांचा राज्याला संसर्ग नव्हता. सर्वत्र सुकाळ नांदत होता. 'प्रजा स्वानंदें निर्भर। गोगोधनां आनंद थोर' अशी स्थिति होती. 'पृथ्वी धनधान्यें परिपूर्ण। कोण्हा नाहीं दुःखदैन्य। घरोघरीं वेदाध्ययन। हरिकीर्तन हरिभक्ती'–या प्रकारची दशरथकालीं भरतखंडाची सुखस्थिती होती. पुढें रामराज्य येणार त्याची ही जणों तयारीच होती! राजा निपुत्रक होता म्हणून त्यानें दैवीउपाय म्हणून विभांडकऋषीला आणविले, पुत्रकामेष्टीयज्ञ केला, यज्ञनारायणानें प्रसन्न होऊन दिलेलें पायस राजानें आपल्या कौसल्या व सुमित्रा या राण्यांस दिलें. कैकेयी सवतीमत्सरानें ग्रस्त झाली तेव्हां कौसल्येनें तिची प्रेमानें समजूत पाडून तिला आपल्या भागाचा अर्ध दिला. 'मत्सर नाहीं कौसल्येसी। म्हणून श्रीराम आला कुशीं.' कौसल्या तिला म्हणत्येः– 'एकोदरा सख्या बहिणी असतात पण त्यापेक्षां आपले सुखसंबंध फार निकटचे आहेत. त्या बहिणींना ना नित्य भेटी, ना नित्य गोठी, ना नित्य संबंध, ना नित्य बोध, पण—

**तुम्हां आम्हां एक अहेवपण । तुम्हां आम्हां एक निजभूषण ।**
**तुम्हां आम्हां एक निजमंडण । सख्यत्वें एकपण तुम्हां आम्हां ॥३-६॥**
**तुम्हां आम्हां एक सांगात । तुम्हां आम्हां एक भोगार्थ ।**
**तुम्हां आम्हां एक कांत । सख्यसख्यार्थ तुम्हां आम्हां ॥ ३-७ ॥**
**उदकाची गोडी शीतळता । अन्नाची गोडी आर्द्रता ।**
**स्त्रियांची गोडी अनुकूलता । अवंचकता मित्रगोडी ॥ ३-१८ ॥**
**तुम्ही आम्ही सख्या बहिणी । ऐसी बोलिजे काहाणी ।**
**ते करून दावावी करणी । येर बोलणीं अतिमिथ्या ॥ ३-१९ ॥**
**जैसा बोले तैसा क्रियार्थ । या नांव मुख्य परमार्थ ।**
**येर बोलणें तें व्यर्थ । विषयस्वार्थ परमार्थी ॥ ३-२० ॥**

असें म्हणून कौसल्येनें आपल्या भागाचा अर्ध कैकेयीस दिला, तें पाहून सुमित्रेनेंही आपला अर्धभाग तिला दिला. सत्संगानें सद्बुद्धि होते.

**यालागीं सत्संगतीं । दुःख नव्हे ना अधोगती ।**
**सत्संगाची परमख्याती । नेणों किती उद्धरिले ॥ ३-२७ ॥**

असो. तिघी राण्या गरोदर राहिल्या.

---

## ६ कौसल्येचें डोहळे.

तिघींना डोहळे पुसायला राजा त्यांच्या महालांत गेला. प्रथम कैकेयीकडे आला. ' अमावास्यें अंधारी पाही । त्याहीवरी दाटे धुई । गडदपणें न दिसे कांहीं । ते दशा पाहीं कैकेयीसी ! ' तिनें ' राज्य द्यावें कनिष्ठासी । जेष्ठा वनवासीं धाडावे ' अशा तऱ्हेचे आपले डोहळे सांगितले ! राजा खिन्न होऊन सुमित्रेच्या महालांत गेलाः—

**आला देखोनि प्राणनाथ । जीवीं उल्हास अतिअद्भुत ।**
**आनंदें पूर्ण भरित । प्रेमाचा अत्यंत पूर आला ॥ ४-५१ ॥**
**गर्भे टवटवीत मुखकमळ । शोभे सर्वांग सोज्वळ ।**
**गर्भतेजें निजनिर्मळ । मिरवे वेल्हाळ भक्तिभावें ॥ ४-५४ ॥**

**भक्तिभावो तिचा वांटा । त्याचा उदरीं केला सांठा ।**
**तैशाच रीतीच्या बाह्यचेष्टा । देखे द्रष्टा होवोनि रावो ॥४-५६॥**

तिनें जेष्ठ भ्रात्याच्या सेवेचें परमसुख मला असावें असी मनोत्कटता प्रगट केली. नंतर राजा कौसल्येकडे गेलाः—

**ऐका कौसल्येची स्थिती । अखंड वसे पै एकांतीं ।**
**न साहे संग सांगाती । गर्भप्रतीती श्रीराम ॥ ४–७६ ॥**
**देहीं निर्लोभलक्षण । हेंचि वैराग्य दृढ दारुण ।**
**उदरा आला श्रीरघुनंदन । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ७७ ॥**
**नावडे वस्त्रभूषण । नावडे सुमनचंदन ।**
**नावडे दिव्य भोगासन । नावडे शयन पर्यंकीं ॥ ७८ ॥**
**गर्भोदरीं बैसली दृष्टी । यालागीं वृत्ति जाली उफराटी ।**
**आपुल्यासमान देखे सृष्टी । गर्भपुष्टी स्वभावें ॥ ८१ ॥**

राजा तिला 'भोगभुवनीं' पाहूं लागला तेव्हां त्याला ती तेथें सांपडली नाहीं'! वैखरींत, मध्यमेच्या माजघरांत, पश्यन्तीच्या वोवरींत, अखेर परावाणीच्या पलीकडेही ती त्याला सांपडेना! तेव्हां

**काढोनि द्वैताची अगळा । फेडून शब्दाची शृंखळा ।**
**उघडी अद्वैतसुमनशाळा । गुरुवाक्यमेळा निर्धारें ॥ ८६ ॥**

निर्विकल्प निजसुख भोगणारी कौसल्या राजा दशरथानें पाहिली. तिच्या अंगीचें तेज अद्वितीय होतें.

**कैसी बैसली सहजसिंहासनीं । जैसी योगिया लागली उन्मनी ।**
**पाहतां निवाला लोचनीं । धर्मपत्नी सगर्भा ॥ ९१ ॥**
**उदरीं संभवला विदेही । यालागीं आठवू नाठवे देहीं ।**
**सबाह्य अंतरीं उरली नाहीं । तटस्थ पाही श्रीराम ॥ ९६ ॥**

राजाला कौसल्येची भूमिका उमगली नाहीं. कोणतें **भूत का महद्भूत** इच्या उदरीं आलें आहे, कोणी इला अवचटलें (झपाटलें) आहे, याचा बोध न झाल्यामुळें त्यानें गुरुवसिष्ठांना बोलावून आणलें. कौसल्या ब्रह्मभावानें भरली असून हिच्या उदरीं परमात्मा आला आहे हें त्यांनीं ओळखलें. ती अंतर्बाह्य रामरूप झालेली त्यांनीं पाहिली—

**जो उदरीं संभवला । तोचि सर्वेंद्रियीं वोसंडला ।**
**देहाचा पांग फिटला । प्रपंच जाला ब्रह्मरूप ॥ १०४ ॥**
**मुक्ता ब्रह्मरूप मीतूंपण । शत्रुमित्र ब्रह्मपूर्ण ।**
**ब्रह्मरूप त्रिभुवन । भूतें सनातन ब्रह्मरूप ॥ ११३ ॥**
**ऐसिया ब्रह्मस्थिती । मुक्त संसारीं वर्तती ।**
**जिण्यामरण्याची भ्रांती । नाहीं त्या चित्तीं ब्रह्मरूपत्वें ॥११४॥**

असो. कौसल्या ब्रह्मानुभवांत मग्न होती, तिची अवस्था पाहून वसिष्ठ महासुखीं बुडाले, राजाला पुत्रकामनेनेंच वेडावलें होतें.

कौसल्येनें नेत्र उघडिलें व दशरथानें तिला तिचे डोहळे विचारिले. 'कौसल्या रामगर्भ स्वरूपस्थिती । राजा प्रवृत्तिधर्मे पुत्रार्थी–' असें त्या दोघांत अंतर होतें. 'येरी ह्मणे मी अवघा रामु । मजमाजी कैंचा भ्रमु । अवतरलों पुरुषोत्तमु । देवांचें श्रमु फेडावया.' राजा चमकला व हिला कांहीं तरी बाधा झाली असावी असें त्यास भय वाटलें ! 'येरी म्हणे माझ्या ठायीं । मी तूं ऐसें उरलें नाहीं । अधिष्ठान जो विदेही । ' तो मी पाहीं आत्माराम '. रावणानें आपल्या लग्नाला विघ्न केल्याचें दशरथानें स्मरण दिलें.

**नांव ऐकोनि रावण । म्हणे दे दे धनुष्यबाण ।**
**करूं लंकेचें निर्वाण । मारूं दारुण राक्षस ॥ ९–१० ॥**
**पाचारा वनींचे वनचर । मुकुट कुंडलें द्या अलंकार ।**
**राज्य देवोनि धरा छत्र । वानरभार चालवा ॥ ११ ॥**
**केउता गेला रे हनुमंत । अंगद सुग्रीव जांबवंत ।**
**अजूनी रावणाची मात । जगाआंत उरलीसे ॥ १२ ॥**
**अहो वज्रदेही निजगडा । पुच्छें घालूनिया वेढा ।**
**लंका जाळां रे भडभडा । पाडा तडतडा राक्षस ॥ १३ ॥**
**आगड भेदा रे चोहटां । पाडूं लंकेच्या त्रिकूटा ।**
**मारूं रावणा अतिदुष्टा । स्वधर्मवाटा रुंधित ॥ १६ ॥**
**राक्षसांच्या शिरकमळीं । खेळूं लंकेपुढें चेंडूफळी ।**

**साजुक रुधिरांच्या कल्लोळीं । तृप्त कंकाळीं करूं आजी ॥ १८ ॥**
**तोडा नवग्रहांची बेडी । सोडा देवांची बांदवडी ( बंध ) ।**
**उभवा रामराज्याची गुढी । आज्ञा धडफुडी तिहीं लोकीं ॥१९॥**
**नासा रे जगाचीं दुःखें । त्रैलोक्य भरा रे हरिखें ।**
**दुमदुमित विश्वसुखें । परमपुरुषें श्रीरामें ॥ २१ ॥**

कौसल्यापोटीं एखादी विवशी तर आली नाहीं ना अशी राजाला शंका आली. तिचें तें वरळणें आहे असें त्याला वाटलें ! त्यानें वसिष्ठाला बोलावून आणलें !

**येवोनि वसिष्ठ जंव पाहे । तंव ते राममय जाली आहे ।**
**म्हणे धन्य धन्य वो माये । वंदावे पाय इयेचे ॥ ३३ ॥**
**आदरें पाहूं गेला दृष्टी । चित्तचैतन्या पडली मिठी ।**
**हर्षे बाष्प दाटे कंठीं । पडिला सृष्टीं मूर्छित ॥ ३४ ॥**

दशरथाला ' आतां मी कौसल्ये आवरूं । कीं वासिष्ठा सावध करूं ' असें झालें. त्याला वाटलें कीं कौसल्येच्या अंगच्या महाभूतानें वसिष्ठाला ही झपाटलें आहे ! वसिष्ठांनीं अवस्था पोटीं जिरवून दशरथाला सांगितलें कीं, ' खरोखरच महाभूतानें ( एको विष्णुर्महद्भूतं ) कौसल्येला पछाडलें आहे. तिच्या उदरीं परमात्मा आला आहे. सूर्यवंशाचें भाग्य उजळलें आहे. हिच्या तोंडून ज्या ज्या गोष्टी निघाल्या त्या सर्व खऱ्याच होणार आहेत. मुनिजनांचें ध्येय व जगाचें जगज्जीवन तुझ्या कुळीं अवतरला आहे.

**राया तुज नकळे वर्म । उदरा आलें परब्रह्म ।**
**धन्य धन्य आमुचें कर्म । पुरोहितधर्म ये वंशीं ॥ ४६ ॥**

---

## ७ रामजन्म.

नाथांचें बालकांड सारेंच अप्रतिम आहे. तुळशीदासांच्या रामायणाशीं तें ताडून पाहण्यासारखें आहे. तुळसीदासांची वाणी प्रेमळ

भक्ताची आहे, नाथांची ज्ञानीभक्ताची आहे. नाथवाणीचा रसास्वाद घेण्यास अध्यात्मज्ञानाची अंतर्निष्ठा अवश्य आहे. नाथांच्या विचाराची व भाषेची प्रौढी त्यांच्या अध्यात्मदृष्टीला शोभा देणारीच आहे. देव-विबुधांची अयोध्येस दाटी झाली, तर तिकडे 'वीज पडे लंकेवरी। भूस्फोटन नगरद्वारीं। भूकंप त्रिकुटनगरीं' झाले. राम अयोनी जन्मले, कौसल्येला वेण लागली नाहीं, पोट दुखलें नाहीं. राम प्रथम परमात्मरूपानें प्रगट झाले त्या रूपाचें फार बहारीचें वर्णन ( अ० ६ ओवी ६ ते १६ ) ध्यानयोगाला अत्युपयुक्त आहे.

रघुवीराचे चरणातळीची आरक्त शोभा, पोटरिया सरळा, वर्तुळ जानुचक्र, कर्दळीस्तंभासारख्या मांड्या, चरणांचे तोडर, कासेचा पीतांबर, नाभीकमळ, हृदयस्थान, मेखळा, कंबुकंठ, 'ओंकारामाजी वर्णव्यक्ति। तेवीं सुखामाजी दंतपक्ति', चैतन्याचें देखणेपण असलेले कमळनेत्र, श्रवण, अधरोष्ठ-'जीव शिव विभाग-जनीं। तैसे देखा अधर दोनी। ऐक्या आले श्रीरामवदनीं। मिनले मिळणी एकत्वें -' अशा प्रकारचें तें सुंदर रामरूप पाहून कौसल्येला परमानंद झाला यांत नवल काय? तिनें 'उगाळोनि अहंपण। सोहं काढिलें शुद्ध चंदन' आणि त्या चंदनाचा पिवळा टिळा त्याच्या विशाळ भाळावर लाविला. 'सच्चिदानंद एकमेळीं। तैसी ललाटीची त्रिगुणत्रिवळी। बोधचंदनाचें परिमळीं। पूजिला निर्मळीं निजसज्जनीं.' लेणियाचें लेणें असा तो राम त्रिभुवनीच्या सौंदर्याचें एकायतन होता. 'ऐसिया देखोनि श्रीरामा। कौसल्येसी आला प्रेमा। त्या सुखाच्या सुखसंभ्रमा। देहधर्मा विसरली.' अष्ट सात्विकभाव तिच्या देहावर उमटले. स्वानंदाच्या उर्मी जिरवून तिनें रामास सांगितलें कीं 'तूं अशा रूपानें प्रगट झालास तर तूं माझा मुलगा आहेस असें लोक मानणार नाहींत व बाललीलांचे कौतुक करावयाचे माझे मनोरथही पूर्ण होणार नाहींत.' राम तत्काळ बाळरूपानें प्रगटले! अयोध्येंत आनंदीआनंद झाला.

'त्याहटल्या निशाणभेरी । गगन–गर्जे मंगळतुरीं । त्रैलोक्य गर्जे जय-जयकारीं । घरोघरीं उल्लासु ॥' त्याचवेळीं सुमित्रेच्या उदरीं लक्ष्मण व कैकेयीच्या उदरीं भरतशत्रुघ्न जन्मले.

**यांचा बुडाली दानसमुद्रीं । दरिद्र बुडाले दातृत्वपूरीं ॥**
**मागत्यांचा दुष्काळ नगरीं । घरोघरीं आनंद ॥ ६—१०३ ॥**

---

## ८ राम आणि सीता.

कैकेयीच्या वरानें बांधले गेल्यामुळें राम वनवासाला निघाले तेव्हां:-

**सूर्यासवें जैसी प्रभा । वसंतासवें वनशोभा ।**
**तेवीं जानकी जगदंबा । प्राणवल्लभासवें निघे ॥ २३ ॥**
**जेवीं साकरेतें न सांडी गोडी । तेवीं सीता रामा न सोडी ।**
**केवळ सेवेची आवडी । वनीं रोकडी दासत्वाची ॥ २४ ॥**
**राज्यीं असतां रघुनंदनासी । सेवा वांटली सेवकांसी ॥**
**तरी मी एकली वनवासी । सर्वसेवेसी पात्र होईन ॥ २५ ॥**

**( अयोध्या० अ० १ )**

राम आणि सीता यांची एकरूपता नाथांनीं अनेक ठिकाणीं गायिली आहे. सीता जीव राम जीवन, सीता चित्त राम चैतन्यघन, सीता शर्करा राम गोडी, सीता रस राम रसज्ञ, सीता डोळसता राम देखणा इ० दृष्टांतांनीं प्रेमळ व पवित्र पतिपत्नींचें ऐक्य तर नाथांनीं वर्णिलें आहेच, पण त्यांत अध्यात्माचीही अंतर्दृष्टि चोख आहे. राम स्वतः हनुमंतास सांगतातः—

**माझें स्वरूप चैतन्यघन । सीता चिच्छक्ति संपूर्ण ॥**
**सीतेसी मज वेगळेपण । अणुप्रमाण असेना ॥ ३० ॥**
**अर्धनारी नटेश्वर । दोस्वरूपीं एक शरीर ॥**
**तेवीं सीता श्रीरामचंद्र । अभिन्नाकार भिन्नत्वें ॥ ३५ ॥**

**( किष्किंधाकांड अ० १३ )**

**सीतेचें सद्रूपपण । स्वयें श्रीराम जाणे आपण ॥**
**श्रीरामाचें पूर्णपण । जाणे संपूर्ण स्वयें सीता ॥ १०५ ॥**

## रामभेट.

सुमंत 'श्रीरामभवनांत रामभेटीला आला तेव्हां रामभुवन पाहतांच तो 'विसरला मागील दुःख। परमसुख पावला.' त्यानें पहिल्या द्वारीं रथ ठेवला, दुसऱ्या द्वारीं छत्रचामरें, व तिसऱ्या द्वारीं पादत्राणादि सामुग्री ठेविली, चवथ्या द्वारीं अर्थ, पांचव्या द्वारीं स्वार्थ, साहव्या द्वारीं समग्र साधनें ठेवून ह्म० हीं सहाही द्वारें ओलांडून आंत गेला. पुढें 'सांडोनि मी-तूपणाचा सांगात । रिघावें द्वारांआंत । तैंचि भेटे श्रीरघुनाथ । मुख्य परमार्थ या नांव.' 'भावार्थ तें रामभवन' व श्रवणकीर्तनादि नऊ पायऱ्या चढून गेल्यावर त्याला रामभेटी झाली. ( अयोध्या० अ० ५ )

ह्या ग्रंथांत नाथांनीं रामकथा रसाळपणानें सविस्तर गायिली आहे, मधून मधून रम्य सृष्टिवर्णनें व स्वभावविशेष चांगले खुलवून वर्णिले आहेत तरी पदोपदीं अध्यात्मविचारांची व नाथांच्या ग्रंथांत नेहमींच विपुल-पणें आढळणाऱ्या रूपकांची गर्दी उसळून दिल्यामुळें रामचारित्र व ब्रह्म-ज्ञान यांची या महाकाव्याच्या रम्य उपवनांत प्रेमळ भेट झाली आहे! परोपकारांत व जगदुद्धारकार्यांत गढलेला रामभक्त जसें रामायण लिहील तसेंच नाथांचें रामायण झालें आहे. रामकथा व परमार्थ दोन्हीं एक मुखानें भेटावेत अशी ज्याला आकांक्षा असेल त्यानें नाथांचें भावार्थ-रामायण अहर्निश वाचावें.

* * *

चार पुत्रांच्या मिषानें दशरथाच्या घरीं चारी पुरुषार्थ नांदायला आले, अथवा चतुर्विध मोक्ष त्याच्या अंगणांत लोळायला आले. लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न हे प्रणव व राम 'तिहींचे प्रकाशक वस्तु चिद्घन' मूर्त-जाले. वसिष्ठांनीं चार पुत्रांचे सर्व संस्कार केले.

**जातकर्म नामाभिधान । कटिसूत्र अन्नप्राशन ॥**
**चौलकर्म वायनदान । केले संपूर्ण विधियुक्त ॥** ( १—७ )

पुढें रामाचें व्रतबंधन होऊन चौघा भावांनीं वसिष्ठापाशीं वेदशास्त्रा-

ध्ययन केलें, प्रज्ञा व श्रद्धा दोन्ही अगाध असल्यामुळें वेदशास्त्राचे संस्कार होण्यास वेळ लागला नाहीं. १६ वें वर्षी चौघांनीं तीर्थाटण केलें.

* . * *

विश्वामित्रानें रामास मागितलें ( बाल० अ० ८ ) तेव्हां:—

**ऐकोनि ऋषीचें वचन । गजबजलें रायाचें मन ॥**
**वीर्य गेलें हारपोन । कंपायमान सर्वांगीं ॥ ३४ ॥**
**सर्पकपाळीं कांटा नेहटे । कां सापसुरळीचें पुच्छ तुटे ॥**
**मासा जळावेगळा फुटे । तैसें दुःख वाटे रायासी ॥ ३५ ॥**
**चणे वानरागालींचे । कां धन जैसें कृपणाचें ॥**
**भाणें नेलें भणगाचें । तैसें रायाचें मन श्रीरामीं ॥ ३६ ॥**

हे चारपांच दृष्टांत किती समर्पक, व नित्याच्या अवलोकनांतले आहेत !

* * *

गुरुसहवासांतच विकल्प व अहंभाव नष्ट होऊन ज्ञान मुरतें हें सांगतांना ( बाल० अ० १० ):—‘ हिंग पडितांचि रांजणीं ’ आंतलें दूधदहींसुद्धां नासून जातें, अथवा ‘ दुग्धीं कांजीचा थेंबू पडे । तेणें दुग्धाचे होती कवडे । तेवीं ज्ञानीं विकल्प वाढे । तैं ज्ञान उडे ज्ञानाभिमानें ! ’ सावध माणसानेंही कनकबीज ह्म० धोतऱ्याचें बीं खाल्लें तर तो क्षणांत भ्रमित होतो, त्याप्रमाणें विकल्प, संशय, किंवा संदेह उत्पन्न झाला तर ज्ञाता असूनही ज्ञानाभिमानानें वाटेल तें बहकूं लागतो ! मी ज्ञाता आहे हें चित्तांत स्फुरण होऊं लागलें कीं ब्रह्मज्ञान तेथून पळून जातें. पाडाचा आंबा आढींत ठेवून मुरूं दिला तरच त्याला गोडी येते, त्याप्रमाणें ज्ञान होऊन गुरुसेवेंत राहिल्यानें तें मुरलें म्हणजेच परिपक्व होतें.’ दधिमंथन करून लोणी काढलें आणि तें तसेंच ठेवलें तर त्याला खवट घाण येतें, पण तें अग्निसंगें तावून त्याचें तूप बनलें कीं त्याला सुवास सुटतो, त्याप्रमाणें गुरुसहवासांतच ज्ञान मुरतें !

* * *

रामाची मुद्रा निरंतर कशी प्रसन्न असे (बाल० अ० १९) तें पहाः—

**गाळीव आनंदाची मूस । कीं सोलीव सुखाचें हें सुख ॥**
**तेंचि श्रीरामाचें श्रीमुख । जें करी निर्दोष देखत्यांसी ॥ ८० ॥**
**देखतां श्रीरामाची दृष्टी । ब्रह्मानंदें जीव उठी ॥**
**दृश्य द्रष्टा न दिसे त्रिपुटी । हेलावे सृष्टी स्वानंदें ॥ ९२ ॥**

शूर्पणखेचें विरूपकरण (अरण्य०), शबरीचें आख्यान (अरण्य०), शत्रुपक्षीय बिभीषण घ्यावा कीं न घ्यावा ( सुंदर० ), रामरावणयुद्ध (युद्ध०), मारुतीचें सागरोल्लंघन (युद्ध०), इत्यादि अनेक प्रसंग नाथांनीं फार बहारीनें वर्णिले आहेत. वनाभिगमनप्रसंगीचा सीतारामांचा संवाद ( अयोध्या० अ० ७ ) अतिशयच बहारीचा आहे. वर्णनशैलीचे दोन उत्कृष्ट नमुने देऊन हें भावार्थरामायणाचें विवरण संपवितों.

---

## कनक कांता व कादंबरी.

( कनक, कांता व कादंबरी ( मद्य ) हे तीन ककार म्हणजेच इंग्रजींतले ( Wealth, Woman and Wine ) हे तीन वकार—यांचा पगडा मनुष्यमात्रावर किती बसला आहे हें सर्वांस माहीत आहेच. )

देवांचा राजा इंद्र हा ' स्वयें घेवोनि वारांगना । विमान हिंडवी गगना ' हें पाहोन मारुतिराय म्हणतात. ( युद्ध० अ० ४६ ):—

**जो स्त्रीसवें निरत जाला । मद्यप्राशनीं मातला ॥**
**जो धनलोभें भुलला । त्याचा गेला विवेक ॥ १०८ ॥**
**वेश्यागमनीं जे रत । ते सर्वदा अति उन्मत्त ॥**
**नाठवे स्वार्थ परमार्थ । स्वेच्छा विचरत खर जैसे ॥ १०९ ॥**
**स्त्रीकामाची ऐसी रीती । ऐका मद्यप्याची स्थिती ॥**
**वेंचून पदरींची संपत्ती । स्वयें होती जगनिंद्य ॥ ११४ ॥**
**वेंचूनियां ऐसें धन । करिताती मद्यपान ॥**
**ते निजात्मघाती संपूर्ण । नरकसेवन आकल्प ॥ ११६ ॥**

धनलोभी जे लुब्धक । स्वप्नीं न देखती सुख ॥ ......
दुर्लभ शरीर वृथा कष्टविलें । जेणें फळे निजमोक्ष ॥ ११९ ॥
कष्टें जोडिली संपत्ती । ते ठेविती अतिनिगुती ॥
तोंडीं दगड माती घालिती । आपण मरती धुळी खात ॥१२४॥
ऐसी एक एकाची जाती । अधःपाता स्वयें नेती ॥
तिन्ही एकत्र जेथें मिळती । तें दुःख किती सांगावे ? ॥ १२५॥

---

## रामाची मुद्रिका पाहून !

देखोनि अनुतापिनी सीता । कृपा उपजली हनुमंता ।
श्रीराममुद्रिका होय टाकिता । दुःखावस्था शमावया ॥ १ ॥
मुद्रिका शोभे करीं । श्रीरामनाम मुद्रिकेवरी ।
श्रीराम मुद्रिकेसबाह्यांतरीं । सीतासुंदरी स्वयें देखे ॥ २ ॥
देखतांचि चमत्कार जाहला । स्वयें श्रीरामचि आला ।
ऐसा सीतेसी भाव गमला । सरसावला अंचळू......॥ ३ ॥
श्रीराम आला एकाएकीं । लाजे जाहली अधोमुखी ।
सर्वांगें हर्षली जानकी । सुखोन्मुखी डुल्लत ॥ ४ ॥
मुद्रिका वंदिली निढळीं । मग आलिंगिली हृदयकमळीं ।
स्वानंदें चुंबी जनकबाळी । सुखें वेल्हाळी ! आलीसी ॥ ५ ॥
तूं माझी सखी श्रीराममुद्रा । घालूं सेजे, करीं निद्रा ।
श्रमलीस उतरतां समुद्रा । आणि गिरिवरा उल्लंघितां ॥ ६ ॥
न म्हणे अचेतन सचेतन । प्रेमपूर्ण सीता संपूर्ण ।
तेणें हनुमंतासी आलें रुदन । करी स्फुंदन वृक्षाआड ॥ ७ ॥
मुद्रिका देखोनि दृष्टी । अत्यानंद मानी गोरटी ।
सीता पुसे सप्रेम गोष्टी । अवस्था पोटीं जे वर्ते ॥ ८ ॥
कुशल असतां रामलक्ष्मण । माझी कां न करिती सोडवण ।
करावया नाहीं आंगवण । दुर्धर बाण असोनी ? ॥ ९ ॥

मुद्रिके ! तूं सांगें गोष्टी । रावणें मातें हरिल्यापाठीं ।
दोघे येवोनि पंचवटीं । आतिसंकटीं काय केलें ? ॥ १० ॥
विजनीं मूर्च्छित पडिले ? । कीं वृकव्याघ्रीं फाडिले ? ।
किंवा सिंहें विभांडिले ? । कीं रगडिलें वनगजीं ? ॥ ११ ॥
ते तों महावीर निधडे । सिंह व्याघ्र काय बापुडे ? ।
शार्दूल पळती तयापुढें । केलें कुडें रावणें ! ॥ १२ ॥
रावणें छळोनि केलें घाता । स्नानतर्पण संपादितां ।
अथवा फळ मूळ भक्षितां । दोघे निद्रिस्तां मारिलें ? ॥ १३ ॥
माझेनि दुःखशोकें जाणा । स्वयें रामें सांडिले प्राणा ? ।
येऱ्हवीं निवटोनि रावणा । माझे सोडवणा येता कीं ! ॥ १४ ॥
मुद्रिके ! सत्य सांगें मजपाशीं । श्रीराम तरी जाहला संन्यासी ?
अथवा पहुडला समाधिसेजेशीं ? । किंवा देहासी त्यागिलें ? ॥१५॥
मुद्रिके ! मौनाचें लक्षण । निमाले रामलक्ष्मण ?
हेंचि तुझें मौनवचन । अतिसावधान निजमौनें ॥ १६ ॥
मुद्रिके ! तुज कैसें चालविलें वाटा । कैसोनि उल्लंघविले घाटा ।
समुद्र तरोनि दुस्तर मोठा । कैसेनि परतटीं आलीस ? ॥ १७ ॥
मज संबोखावया येथें । तुज काय धाडिलें श्रीरघुनाथें ? " ।
ऐसें बोलत बोलत तेथें । पडे मूर्च्छित जानकी ॥ १८ ॥
( सुंदरकांड अ० ११ )



# १३ एकनाथी भारुडें.



## १ भारूड म्हणजे काय ?

भारूड म्हणजे काय ? भारूड हा शब्द रूढ कसा झाला ? भारुडाचीं विशेष लक्षणें कोणतीं ? भारुडांत कोणत्या काव्यविशेषांचा समावेश होतो ? ह्या प्रश्नांचा आपणांस प्रथम विचार केला पाहिजे. ज्यांत अर्थ थोडा व भूस किंवा पाल्हाळ फार अशा भाषणास किंवा लेखनास भारूड हा शब्द लावण्याचा सांप्रत प्रघात पडला आहे, पण भारूड ह्या शब्दाचा हा मूळचा अर्थ नसला पाहिजे. लोकभाषेंत शब्दांचे अर्थ कालाच्या ओघाबरोबर बदलत असतात. भारुडें हीं संतांचीं वाणी असल्यामुळें अर्थपूर्ण आहेत पण तीं म्हणणारी भजनीमंडळी वगैरे लोक मधून मधून स्वतःचीं भाषणें घालून, फुगवून वाढवून सांगतात व त्यामुळें पाल्हाळ होतो, म्हणून **भारूडाला पाल्हाळ** असा अर्थ आला असावा. **भारूढ** भारूड—बहुरूढ असा त्याचा मूळचा चांगला अर्थ होता, अर्थात् भारूढ म्हणजे **बहुरूढ, लोकप्रिय, असें गीत** ! इंग्रजींत ज्याला Popular Songs किंवा Folk Lore असें ह्मणतात असलीं गाणीं किंवा पद्यें. ‘ **बहु** ’ ह्या पदाचा अपभ्रंश **भा किंवा भो** असा अनेक ठिकाणीं झाला आहे. **बहुगुणं ह्म० भोगुणं**, भोगणं—अनेक गुणांचें भांडें. पातेल्याला भोगणं ह्मणतात. त्यांत भात होतो, आमटी होते, थालपीट होतें, काढा होतो, दूध तापवतां येतें, म्हणून अशा पातेल्याला भोगुणं ह्मणतात. भोगुणं किंवा भोगणं म्हणजे अनेक कामाच्या उपयोगी पडणारें भांडें, पातेलें ! ‘ त्याच्या **भोतनं** ( भोंवतीं ) पुष्कळ माणसांचा गराडा पडला होता ’ ह्या वाक्यांतला भोतनं शब्दही ‘ बहुतन ’ ( तनविस्तारे ) ह्या शब्दापासूनच झाला आहे. तात्पर्य, भारूड म्हणजे लोकांत

फार पसरलेलें, लोकांच्या तोंडीं झालेलें, लोकप्रिय गाणें ! भारूड हा शब्द अशा एका पद्याला किंवा अनेक पद्यांच्या समुच्चयाला अथवा संग्रहाला लावला जातो. अशा भारुडांना कोणी गारूड असेंही ह्मणतात. गारूड ह्म० चमत्कृतिजनक अद्भूत काव्य. भारूडांत अद्भुतपणा असतो, चमत्कृति ( शब्दांची व अर्थाची ) असते, हास्यविनोद भरपूर असतो, व्यक्तीवर किंवा समाजांतल्या कांहीं चालीरातींवर टीका असते व बोधही असतो; बोधाचा कडवेपणा नसतो तर खेळीमेळीनें वागतांना मनोरंजनाबरोबर बोध केलेला असतो. ऐकणाऱ्याची करमणूक व्हावी व त्याला बोधही व्हावा अशा दुहेरी हेतूनें भारुडें रचलेलीं असतात, भारुडांत इतके गुण असल्यामुळें तीं बहुजन समाजांत सहज रूढ होतात, लोकांत पसरतात, व त्यांना तीं वारंवार ऐकाविशीं वाटतात.

---

## २ भारूड-वाङ्मय.

' नाथांचीं भारुडें ' या नांवानें वाङमयाचा एक अपूर्व प्रकार भजनी मंडळांतून प्रसिद्ध आहे. वारकऱ्यांच्या निरूपणी कीर्तनांत, भजनांत व हरिदासी कीर्तनांच्या ललितांत यांपैकीं कांहीं भारुडें कधीं कधीं ऐकावयास मिळतात. पंढरपुरीं अश्विनी नवरात्रांत रात्रीं रुक्मिणीच्या मंडपांत हीं गायिलीं जातात. कालगतीनें हीं गाणारे लोक कमी कमी होत आहेत, त्याचा अर्थ समजणारे तर सुतरां कमी आहेत किंबहुना सांपडतच नाहींत. ज्ञानेश्वरकालीं ह्या भारुडांचा जन्म झाला असला तरी त्यांचा उत्कर्ष नाथांनीं केला. नाथांच्यानंतर तुकोबा व समर्थ ह्यांनीं कांहीं भारुडें रचलीं आहेत, तरी शंभरांत पाऊणशें ह्या प्रमाणांत नाथांचीं भारुडेंच लोकप्रिय आहेत. नामदेवांचा **खेळिया**-' नव्हतंच कैसं झालं रे खेळिया नाहिं तेंच दिसूं लागलं रे ', व तसाचा त्यांचा **बोवडा**-' कुतऱ्या थमाल ले थमाल आपुल्या गाई ' हीं दोन्ही भारुडें मी आपल्या ' ज्ञानेश्वरांची प्रभावळ ' ह्या ग्रंथांत दिलीं आहेत ( प्रभा-

वळ पृ० ३४७–३४८). तसाच ज्ञानेश्वरांचा **आंधळा**–' पूर्वजन्मीं पाप केलें तें हें बहुत विस्तारलें ', **घोंगडी**–' कान्हा तुझी घोंगडी चांगली चांगली। आह्मांसि कां दिली वांगली रे '–व त्यांचा **काऊ** (कावळा)–' उडरे उडरे काऊ तुझे सोन्यानें मढविन पाऊ ' हीं तीन भारुडें मी आपल्या ' मराठी वाङमयाचा इतिहास–खंड पहिला ' ह्या ग्रंथांत (पृष्ठ ६१३ ते ६१७) अर्थासह दिलीं आहेत. त्याच ग्रंथांत जोगा परमानंदाचें ' गुरगुडी ' (गुरुगोडी) वरील भारुडही सार्थ दिलें आहे. (पृ० ६४९ ते ६५१) हीं सहाहीं भारुडें उत्कृष्ट असून लोकप्रिय आहेत. समर्थांचा '**पांगुळ**' उत्तम आहे. तुकोरायांचाही '**आंधळा,**' **फुगडी** ' इ० पांचपंचवीस भारुडें आहेत. याप्रमाणें नाथांच्या पूर्वीं आणि नंतर ५० भारुडें इतर संतांनीं लिहिलीं आहेत व तीं सुंदर असून लोकप्रियही आहेत, तरी एकनाथी भारुडांची संख्या, व्यापकपणा, सौंदर्य, ठसठसितपणा, विनोद आणि अध्यात्मबोध हे गुण अद्भुत असल्यामुळें व त्यांचा प्रचारही अधिक प्रमाणावर असल्योमुळें नाथांच्या भारुडांचा अनन्यसाधारणपणा कायमच आहे. ' भारूड ' म्हटलें कीं प्रथम नाथांचेंच नांव पुढें येतें यावरूनही हें उघड होतें. असो. नाथांचीं भारुडें १२५ विषयांवर असून त्यांची संख्या ३०० वर आहे! त्यांत जोहारच ५० आहेत! गोंधळावर १२ भारुडें असून, गारुड, गारुडी, डौर हीं प्रकरणें अशींच मोठालीं आहेत. पाईक किंवा शिपाई यावर १२ अभंग आहेत. वासुदेव, बाळसंतोष, सौरी यावर आठ आठ भारुडें आहेत. यांत कांहीं गद्यात्मक भागही आहेत. ह्या भारुडांत वर्णनें कोठें कोठें पाल्हाळिक असून पुनरुक्तिही आहे, तथापि ह्यांत ३५० वर्षांपूर्वीच्या महाराष्ट्रसमाजाचें चित्र उत्कृष्ट प्रतिबिंबित झालें आहे. खेड्यांपाड्यांतून त्यावेळची समाजस्थिती आजही बहुतांशीं कायम आहे. मराठी भाषेचें सामान्य लोकांत प्रचलित असलेलें साधें स्वरूप यांत पहावयास मिळतें. यांत नादमाधुर्य, हास्यविनोद व रचनाचमत्कृति

विविध प्रकारची आहे. हीं सर्व भारुडें अर्थाला नीटशीं लागत नाहींत. सांगणारे कोणी भेटत नाहींत. मी पंढरपूर, पैठण, मातापूर, सोलापूर, नाशिक इ० ठिकाणीं भारुडें ह्मणणाऱ्यांकडून मुद्दाम यांपैकीं कांहीं भारुडें ऐकलीं, पण जाणत्यांची जेथें नांगी पडते तेथें भजनी वगैरे लोक त्यांचा अर्थ काय सांगणार ? अर्थाला झोंबतां आल्यावांचून त्यांची खरी बहार कळत नाहीं. सर्व भारुडांतून अध्यात्माचा तंतु ओतप्रोत भरला आहे. दहापांच तज्ज्ञ एके ठिकाणीं बसून चर्चा करितील तर सर्व भारुडें उलगडतील. ह्या भारुडांतून कांहीं सुलभ, मनोरंजक व बोधप्रद आणि सामान्यतः लोकांच्या प्रचारांत असलेलीं किंवा ज्यांकडे लोकांचें लक्ष वेधणें अवश्य अशा पांचपन्नास भारुडांची ओळख वाचकांस येथें करून देण्याचें मी योजिलें आहे. ज्या सामान्य लोकांत नाथ उत्तरवयांत त्यांच्या उद्धारार्थ वावरले त्यांच्या बोलींतले कित्येक शब्द किंवा वाक्प्रचार कोंवळ्या मनाच्या सुशिक्षित लोकांस ' ग्राम्य ' किंवा ' अश्लील ' वाटण्याचा संभव आहे. ' भागवताचा ' नागरीपणा ह्या भारुडांत दिसणार नाहीं, खेडवळांचा ' खेडवळपणा ' दिसेल.

कोणतें अश्लील व कोणतें श्लील हें मुकार ठरविणें कठिण आहे ! जी गोष्ट एखाद्यास अश्लील वाटेल ती दुसऱ्यास तशी वाटणार नाहीं. वर्ण्यविषय, तो प्रतिपादन करणाऱ्याचा अधिकार व प्रसंग ह्या गोष्टी कोणती अश्लीलता त्याज्य आहे हें ठरविण्याच्या वेळीं ध्यानांत घेतल्या पाहिजेत. एखादा फालतु माणूस कामुकबुद्धीनें कांहीं बोलेल किंवा करील तर तें त्याज्य ठरेल; पण स्त्रियांचे शरीर, अवयव व भोग या विषयीं शारीरज्ञान व्हावें म्हणून प्रौढपणानें वैद्यकीय ग्रंथांत वैद्य लिहील किंवा विषयवासनानिवृत्तीसाठीं एखादा ज्ञानी मोकळ्या शब्दांत उपदेश करील तर तें अश्लीलतेच्या सदरांत येणार नाहीं. बोलणाऱ्याची योग्यता, हेतु व प्रसंग लक्ष्यांत घेतले पाहिजेत.

---

## ३ नाथांच्या भारुडांचा अजबखाना !

महाराष्ट्र शारदेच्या एका अपूर्व आणि प्रशस्त अजबखान्यांत आतां आपणांस प्रवेश करावयाचा आहे ! अन्यत्र सहसा पाहण्यांत न येणाऱ्या अद्‌भुत चिजा येथें पहावयास मिळतील. ह्या चिजा नाथांच्या स्वतंत्र कलाकुसरीच्या आहेत. ज्या प्रदेशांत 'वेरूळचीं लेणीं' निर्माण झालीं त्याच प्रदेशांत तशींच अत्यद्‌भुत अशीं हीं 'नाथांचीं भारुडें' निर्माण झालीं आहेत ! पहिलीं स्थूलसृष्टींतलीं आहेत, दुसरी वाङ्मयसृष्टींतली आहेत. घटनेंत नीटनेटकेपणा जरा कमी असला तरी दोन्हीं आपल्या भव्यपणानें व अद्‌भुत सौंदर्यानें मोहून टाकणारीं आहेत. तीं पाहतांच 'अहो ! आश्चर्यम्' असेच उद्गार प्रेक्षकांच्या तोंडून सहजगत्या निघतात. त्यांतील कांहीं चित्रें नग्न वा अर्धनग्न स्वरूपांत दिसलीं तरी कारागिराचें बुद्धिकौशल्य पाहून प्रेक्षक देहभान विसरतात. वेरूळचीं लेणीं स्वयंभू दगडी डोंगरांतच पोखरून निर्माण केलीं आहेत, तशीं नाथांचीं भारुडें आत्मस्थितीच्या निजानंदांतून उद्‌भूत झालीं आहेत. वेरूळच्या लेण्यांचें अत्यद्‌भुतपण पाहून 'हीं हिंदुस्थानसारख्या रांगडी व रानटी देशांतल्या लोकांच्या कौशल्यानें निर्माण झालीं नसून आकाशांतूनच पृथ्वीवर पडलीं असलीं पाहिजेत' असा तर्क मिलसाहेबानें आपल्या हिंदुस्थानाच्या इतिहासांत केला आहे ! नाथांचीं भारुडेंही लौकिकवाङ्मयांतलीं नसून चिदाकाशांतून भूतलावर अवतरलीं आहेत ! नाथांचीं हीं भारुडें पाहून बुद्धिवंतांचीही मति गुंग झाल्याशिवाय राहत नाहीं ! नाशीकजवळचें पांडवलेणें व कार्लें, भाजें, धारापूर इत्यादि महाराष्ट्रांतील लेणीं प्रसिद्ध असलीं तरी 'वेरूळचीं लेणीं' पाहिलीं कीं सर्व लेणीं पाहिल्याचें समाधान होतें; त्याप्रमाणें वाङ्मयांत भारुडाच्या जातीचीं इतरांचीं कांहीं पद्यें असलीं तरी 'नाथांचीं भारुडें' पाहिलीं कीं सर्व भारुडसृष्टि पाहिल्याचें पूर्ण समाधान होतें.

'वासुदेव, बाळसंतोष, सरोदा म्ह० पिंगळा, भविष्य किंवा शकुन-

सांगणारा कुडमुड्या जोशी, वाघ्या, गोंधळी, कोल्हाटी, डोंबारी, माळी, आडबंग, खेळिया, फकीर, जोगी ' इत्यादि रूपांत नाथ कधीं प्रगट होतात तर कधीं ' महारीण, कंजारीण, जगझोडी, कोल्हाटीण, सौरी ठकडी, मुरळी, हुंडगी इ० स्त्रियांच्या वेषांत, भाषेंत व भावांत आत्मबोध करितात; कधीं भवानीदेवीचा ' भुत्या ' होऊन ' गोंधळ ' घालतात, ' रोडगा ' वाहतात, ' जोगवा ' मागतात, ' फुलवरा ' बांधतात तर कधीं हातीं ' डौर ' घेऊन वेदान्ती, सिद्धांती इ० ज्योतिषी, व धादांती यांचे कान उपटतात; कधीं ' वडवाघूळ, सर्प, विंचू, टिटवी, पोपट, गाय, बैल, कुत्रें ' इत्यादि प्राणी आपणच: बनून बोलतात तर कधीं विटीदांडू, चेंडूफळी, हमामा-हुंबरी-हुतुतु, भोंवरा, पिंगा, फुगडी इ० गोपागोपींच्या खेळांत मिसळून त्यांच्या मुखानें सदुपदेश करितात; कधीं गौळणींचीं गाणीं गातात तर कधीं ' एडका ' मदनाचे प्रताप गातांना मोठमोठाले देव व ऋषिमुनि यांच्या सामर्थ्याची व तपादिकांचीहीं भीडभाड न बाळगतां त्यांची ' थट्टा ' इ० विषयलंपटता चव्हाट्यावर मांडतात ! कधीं महार, महारीण, येसकरीण यांचा वेष घेऊन ' जोहार मायबाप जोहार ' करीत जगाला सद्बोध करितात; कधीं ' भूताच्या ' आकारांत तर कधीं दिव्य ' मोत्याच्या ' आकारांत प्रगट होतात; याप्रमाणें नाना वेष व नाना रूपें आपल्या अंगावर घेऊन सर्व लोकांच्या उद्धारार्थ त्यांना परोपरीनें बोध करणारे नाथ सर्वलोकहितार्थ अवतरलेली एक ईश्वरी विभूती आहे असें निःसंदेह वाटतें. नाथांच्या ह्या सर्व नामरूपांत त्यांची व्यापक भूतदया, समदृष्टि, पराकाष्ठेचा निर्भीडपणा, मनाचा मोकळेपणा, विनोदपरता हे गुण उघड दिसतात. ' अनंतरूपीं अनंतवेषीं देखिलें म्यां त्यासी ' ह्याप्रमाणें येथें नाना नामरूपांत प्रगट होणाऱ्या ' एकनाथाची ' खूण पटते. ह्या भारुडांत भल्याबुऱ्या, पापी पुण्यवंत, ज्ञानीअज्ञानी सर्व लोकांत सर्वात्मभावानें नांदणारा महापुरुष दिसतो ! कोणत्याही आश्रमाचा, जातीचा, वयाचा, पेशाचा, वेषाचा,

स्वभावाचा, धंद्याचा अभिमान किंवा तिरस्कार लवमात्र नाहीं, अशा सर्वात्मभावानें लहानथोरांसीं समरस झालेले स्वानंदी व विनोदी नाथ ह्या अजबखान्यांत आपणांस भेटतील ! सर्वांनीं सर्वात्मभावाचा महानंद भोगावा, व सकल भेदभाव विसरून परमात्मस्वरूपांत लीन व्हावें असा डांगोरा पिटून त्यांनीं वैकुंठीचा मार्ग सर्वांस मोकळा करून दिला आहे. 'वैकुंठीचा दारवंटा उघडा केला कीं जी मायबाप' व 'मी जागृनि जागवितो लोकां' असें त्यांनीं या भारुडांतून अनेकवार म्हटलेंही आहे !

---

## ४ भजनी मंडळें व गोंधळी, भराडी, वाघे वगैरे लोक.

नाथांनीं आपलीं भारुडें ज्या लोकांसाठीं किंवा ज्यांच्याकडे पाहून रचिलीं व ज्यांनीं तीं ललितादि प्रसंगीं गाऊन नाचून समाजांत फैलावलीं व त्यामुळें अगदीं तळच्या वर्गापर्यंत अध्यात्मभक्तीचें चैतन्य पसरलें गेलें त्या लोकांची ओळख झाली पाहिजे. वाघेमुरळ्या, गोंधळी, भराडी, वासुदेव, पांगुळ, आंधळे, जागल्ये इ० लोकांचे वेष, त्यांचीं वाद्यें, त्यांच्या भारुडें गाऊन दाखविणाऱ्या नाना तऱ्हा, तसेंच ज्या देवतांच्या स्तुतिपर किंवा वर्णनपर हीं भारुडें रचिलीं गेलीं त्या देवतांची माहिती वगैरे गोष्टी नीटपणें कळल्याशिवाय या भारुडांची गोडी समजावयाची नाहीं. सुशिक्षित नागरिकांस हे वरील लोक फार करून पहावयास मिळत नाहींत व मिळाले तरी त्यांच्याकडे त्यांचें लक्ष जात नाहीं. ज्या कांहीं कुळधर्मकुळाचारप्रसंगानें किंवा तीर्थयात्रामिषानें अशा लोकांच्या गांठी पडावयाच्या त्यांचा नवीन लोकांत लोप होत चालला आहे, व जुन्या राष्ट्रधर्मपरंपरेविषयीं त्यांची श्रद्धा कमी होत चालली आहे. कुलधर्म कुलाचारांना किंवा देवाधर्माला फांटा देणाऱ्या नागरिकांतून ह्या गोष्टींचा लोप होत चालल्यामुळें ह्या जातीच्या वाङ्मयाची त्यांची ओळखही बुजाली आहे. भावगीतें, सुनीतें, विडंबनकाव्यें यांचा प्रसार सुशिक्षितांत वाढत आहे, तथापि खेड्यापाड्यांतून बहुजनसमाजाच्या शेंकडों वर्षांच्या

ज्या धर्मसमजुती किंवा चालीरीति आहेत त्यांना धरून असलेला हा भारुडांचा प्रचार त्यांच्यांतून सहसा नष्ट होणार नाहीं. गोंधळी, भराडी वगैरे लोकांनीं व भजनी मंडळांनीं जनमनरंजनाचें व त्याबरोबर लोकशिक्षणाचेंही काम अनेक शतकें महाराष्ट्रांत केलें आहे व करीत आहेत. या लोकांचें महत्त्व खेड्यापाड्यांतून अजूनही आहे. समाजविघटनेचें काम सोपें आहे, संघटनेचें काम अधिक कठिण आहे. हरिदासपुराणिकांची कामगिरी पांढरपेशा व पुढारलेल्या लोकांपुरती असते, त्याहून खालच्या वर्गांकडे त्यांना पोंचतां येत नाहीं, म्हणून मागासलेल्यांच्या सोयींसाठीं कांहीं माध्यमिक शिक्षक लागतच असतात. 'प्रचारक पाहिजेत, संघ वाढविणारे आजन्म सेवक पाहिजेत' अशा प्रकारची ओरड आजकाल सुशिक्षितांत झाली आहे. वारकरी, रामदासी, व दत्तसंप्रदाय हे उत्पन्न होण्याच्या पूर्वींपासून गोंधळी, वाघ्ये, भराडी व इतर भजनी मंडळें महाराष्ट्रांत होतीं. स्त्रीपुरुषांचे हात पाहून भविष्य सांगणारे व शकुन सांगणारे कुडमुड्ये जोशी, सरोदे किंवा पिंगळे; डौर ( डमरू ) वाद्यावर मौजेचे नाद काढून हास्यविनोदात्मक गाणीं गाणारे ( भैरवनाथ उर्फ बहिरोबा ह्या ग्रामदेवतेचे उपासक ) भराडी; खंडोबाचे उपासक वाघेमुरळ्या; भवानीदेवीचे ह० यमाईतुकाईचे उपासक गोंधळी, भूते, भोपे, जोगी इ० लोक; वासुदेव, बाळसंतोष, जागल्ये, कोल्हाटी, डोंबारी, नानक, फकीर, गारुडी, वैदु, वगैरे इतस्ततः फिरणारे लोक हे सारे समाजांत—विशेषतः खेड्यापाड्यांतून वावरतांना अद्याप दिसतात. हा वर्ग [1]लहान नाहीं, मोठा आहे.

———

१. इ. स. १८३१ च्या खानेसुमारीवरून यांची सरासरी लोकसंख्या पुढील प्रमाणें दिसते. जोशी ८ हजार, गोंधळी ५ हजार, भराडी ४ हजार, सरवदे १ हजार, जोगी दीड हजार, डोंबारी व कोल्हाटी ३॥ हजार, वैदु १३००, कंजारी २००, बाळसंतोष ४०, भुते १२५, गारुडी २ हजार, कंजारी २००, पांगूळ १०० इ० इ०.

## ५ मातापूर, तुळजापूर व सप्तशृंगी.

ज्ञानेश्वरनामदेवांच्या काळापासून महाराष्ट्र विष्णुभक्तीकडे वळला असला तरी त्यांच्या पूर्वीपासून इकडे मुख्य उपासना शंकरपार्वतीची होती असें प्राचीन मंदिरांवरून उघड होतें. शंकराचीं व देवीचीं मंदिरें प्राचीनतर आहेत. परमेश्वर ह्म० शिव व पारमेश्वरी शक्ति ह्म० भवानी यांची उपासना सार्वत्रिक असे. भवानीचीं महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती अशीं तीन रूपें आहेत. महाकालीचा संचार क्षत्रियांत, महालक्ष्मीचा वैश्यांत, महासरस्वतीचा ब्राह्मणांत व्हावा व तीनही वर्ण शक्तिसंपन्न होऊन राष्ट्राचा सर्वांगीण अभ्युदय व्हावा अशा बुद्धीनें आदिमायेच्या उपासनेस प्रारंभ झाला असला पाहिजे. महाराष्ट्रांत देवीचीं मुख्य स्थानें चार:तुळजापूर, कोल्हापूर, मातापूर उर्फ माहूर व सप्तशृंगी. 'एक पीठ ते तुळजापूर । द्वितीय पीठ ते माहूर । तृतीय पीठ ते कोल्हापूर अर्धपीठ सप्तशृंगी ' असें देवीच्या एका स्तोत्रांत म्हटलें आहे. नाथांच्या परंपरेंतले सप्तशतीटीकाकार जे उत्तमश्लोक त्यांनीं म्हटलें आहे कीं ' मातापूरची एकवीरादेवी ही महाकाली, सप्तशृंगीची महिषासुरमर्दिनी ही महालक्ष्मी व तुळजापूरची श्रीतुरजा ही महासरस्वती होय ' (अ० १३). तुळजापूर व प्रतापगड येथील तुकाई उर्फ भवानी, औंधची यमाई, कोल्हापूरची महालक्ष्मी, माहूरची रेणुका, ही सारीं आदिमायेचींच रूपें आहेत.

**मातापूर उर्फ माहूर**—रेणुका, एकवीरा, यमाई ही माहूरच्या देवीचीं नांवें आहेत. माहूर हें देवीचें तसेंच दत्ताचें स्थान म्हणून महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. माहूर हें वऱ्हाडांतलें अत्यंत प्राचीन क्षेत्र आहे. धामणगांव–यवतमाळ–आर्णी–बाणगंगा ह्या मार्गानें तेथें जावें लागतें. बाणगंगा उर्फ पैनगंगा नदीच्या पलीकडे मोंगलाई हद्द आहे व नदी उतरून गेल्यावर हळू हळु गड चढावा लागतो. पांचसातशें फ़ूट चढून गेल्यावर सपाटीवर माहूरगांव लागतो, व तेथून १ मैलावर पलीकडे गाजलेले

रेणुकादेवीचे भक्त विष्णुकवि यांचा मठ आहे. त्यांचें चरित्र व कविता त्यांचे भाचे व साच्छिष्य नरहरशास्त्री खरशीकर यांनीं प्रसिद्ध केली आहे. मठापासून हजारबाराशें पायऱ्या चढून गेल्यावर रेणुकेचें मंदिर लागतें. रेणुका ही परशुरामाची आई व जमदग्नीची स्त्री. ही आपल्या पातिव्रत्यानें व दिव्यतपानें पूजनीय होऊन बसली आहे. हिची कथा कालिकाखंडांत व रेणुकामाहात्म्यांत दिली आहे. मंदिरांत हिच्या भव्य मुखवटा आहे. धारवाडाजवळही रेणुकेची ' यळम्मा ' नांवानें पूजाअर्चा होत असते. येळम्मा—येळ अम्मा—ये अम्मा. महाराष्ट्रांत हिलाच येलम्मा किंवा एकवीरा म्हणतात. जवळच माहूरगड ह्म० माहूरचा अभेद्य किल्ला आहे. किल्यांत एक पडका भव्य महाल आहे. येथें हजारबाराशें वर्षांपूर्वी एक बलाढ्य राजघराणें राज्य करीत होतें. त्यावेळीं माहूरला ४० हजार उंबरा होता अशी प्रसिद्धी आहे. माहूरगांव खालीं पसरत गेला असून चौथरे वगैरे पाहता ३।४ मैलांवर पसरलेली ही राजधानी एककाळीं ऐश्वर्यानें नटलेली असावी अशा खुणा आजही दिसतात! ह्या माहुरगडच्या राज्याबद्दल इतिहासकारानीं शोध केला पाहिजे. देवीच्या मंदिरापासून समोर असलेल्या दुसऱ्या गडावर श्रीदत्ताचें प्रसिद्ध मंदिर आहे. तेथें एका गोसाव्याची गादी असून संस्थानला ४० हजारांचें उत्पन्न आहे. रेणुकेलाही ३।४ हजारांचें सालिना उत्पन्न आहे. नाथ ह्या गडावर खास गेले होते. माहुरगडास सिंहाचळ, सैहाचळ सिंहाद्री म्हणतात. हें नांव मुख्य दत्तात्रेयांच्या डोंगरास दिलेलें आढळतें. ' मुळीं सिंहाद्री पर्वतीं । दत्तात्रेयें केली वस्ती' असें नाथ म्हणतात. नाथांनीं आपल्या भागवताच्या मंगलाचरणांत आपली कुलदेवता ही माहुरची एकवीरा हिचें स्मरण केलें आहे ( अ० १ ओवी ६८ ते ७८ ). ही एकवीरा ' बोध फरशुधरा प्रसवली. ' परशुरामाचेंही मंदिर देवीच्या मंदिराच्या नजीक खालीं आहे. 'माता माळनि जिवविली । तेचि कुळदेवता आम्हां जाहली.' औंधच्या पंतप्रतिनिधींची कुलस्वामिनी माहूरची यमाई हीच होय. तिचें मंदिर औंधनजीकच्या डोंगरावर

आहे. पुणें जिल्ह्यांत केंदुरपाबळजवळ यमाईतुकाईचें यादवकालीन भव्य मंदिर आहे. ती प्रस्तुत ग्रंथकर्त्याची कुलस्वामिनी होय.

**२ सप्तश्रृंगी**:— नाशीकच्या उत्तरेस सप्तशृंग म्हणून एक गड आहे. सभोंवार पहाडाची सात शिखरें असून हा गड चढायला बराच कठिण आहे. याच्या ७०० पायऱ्या असून दोनशें वर्षांपूर्वी त्या सरदार दाभाडे यांनीं बांधिल्या आहेत. गडावर चैत्रीपौर्णिमेस एकदां व दसऱ्याच्या नवरात्रांत एकदां अशी दोनदां यात्रा भरते. देवीची मूर्ति भव्य असून अठरा भूजांची व बारा फ़ूट उंचीची आहे. हवापाणी उत्कृष्ट आहे. तपश्चर्येस स्थान उत्तम आहे.

**३ तुळजापूर**:—तुळजापूरची भवानी उर्फ तुकाई देवी. भवानी ही महाराष्ट्राची चैतन्यदेवता आहे. हिचें वर्णन अग्निपुराण, स्कंधपुराण व मुख्यतः देवीभागवत या ग्रंथांत आहे. सप्तशतीग्रंथ हा देवी-उपासकांचा मुख्य उपासनाग्रंथ आहे. महिषासुर, शुंभनिशुंभ, मधुकैटभ, चंडमुंड इत्यादि दैत्यांचा भवानीनें स्वहस्तें संहार केला आहे. महाराष्ट्रांतील बहुतेक घराण्यांची कुलदेवता तुळजापूरची भवानी ही आहे. निंबाळकर, भोसले इ० घराणीं भवानीच्या उपासकांचीं आहेत. समर्थ व शिवाजीमहाराज ह्या गुरुशिष्यांची कुलस्वामिनी तुळजापूरची भवानी उर्फ तुकाई हीच आहे. शिवाजीमहाराजांच्या देवीदत्त प्रसिद्ध तलवारीचें नांव ' भवानी तलवार ' होतें हें प्रसिद्धच आहे. समर्थांनीं शिवाजीमहाराजांना लिहिलेल्या पत्रांत ' विवेकविचार सावधपणें । दीर्घप्रयत्न करणें । तुळजावराचेनि गुणें । रामें रावण मारिला ॥ ऐसी हे तुळजाभवानी । प्रसिद्ध रामवरदायिनी । ' असे चरण आहेत. समर्थांची तुळजादेवीवर ७१८ स्तोत्रें प्रसिद्ध आहेत. तुळजापूरची देवी अष्टभुजा आहे. व्याघ्रावर बसलेली आहे. तिच्या हातांत सहा आयुधें असून डाव्या हातानें तिनें महिषासुराची शेंडी धरिली आहे व उजव्या हातानें त्याच्या बरगडींत शूळ खुपसला आहे ! असें हें भवानीचें रूप

वीररसाला भरतें आणणारें आहे ! हिचा छबीना काढतात तेव्हां सिंह, हंस, मयूर, नंदी व गरुड यांपैकीं कोणत्यातरी लांकडी वाहनावर हिला बसवितात. याचा अर्थ असा आहे कीं ब्रह्मदेव, सरस्वति, शंकर, विष्णू हीं सारीं रूपें जगदंबेचींच आहेत ! भवानी ही जगाची चिच्छक्ति आहे. आदिमाया, प्रणवरूपिणी, भैरवी, भुवनेश्वरी, भवानी इ. नांवांनीं तिचीं शेंकडों स्तोत्रें गायिलीं गेलीं आहेत. देवीच्या पायाखालीं रेड्याचें ( महिषासुराचें ) शव पडलें आहे. भवानीच्या मस्तकावर पंढरपूरच्या विठोबाप्रमाणेंच शिवलिंग आहे ! भवानीचा क्षेत्रपाळ काळ-भैरव हा आहे. वर्षांतून सहा तरी बकरीं देवीच्या सिंहासनापुढें बळीं देतात. नवरात्रांतला घट पशुवधाशिवाय उठायचाच नाहीं !

४ **गोंधळीः**—तुळजापूरच्या देवीचे मुख्य हक्कदार गोंधळी आहेत. झांज, संबळ व तुणतुणें हीं यांचीं वाद्यें आहेत. सकाळसंध्याकाळच्या महापूजेच्या वेळीं संबळ वाजविणें, धुपारतीच्या पुढें संबळ वाजवीत फिरणें, छबिन्यापुढें संबळ वाजविणें व यात्रेकरूंच्या घरीं गोंधळ घालणें हें यांचें मुख्य काम आहे. छबिन्याच्या वेळीं संबळ वाजविणारे गोंधळी, पोत उजळून व हातीं घेऊन चालणारे दिवटे, भूत्ये, भोपे, आराध्ये व नवस फेडायला येणारे यात्रेकरू यांची मंदिरांत एकच गर्दी असते. पोत नवीन कापडाचा व परडी वेळुची असते. दिवट्याबुधल्या असंख्य असतात. देवीचे पुजारी जेथें तेली असतात तेथें त्यांना भगत म्हणतात. हजारों ब्राह्मण व मराठे यांच्या घरीं लग्न-मुंजीसारख्या कार्यविशेषीं देवीचा गोंधळ घालण्याचा प्रघात आहे. गोंधळ घालतांना चौघेजण येतात. मुख्य कथानिरूपण करणाऱ्याला नाईक ह्मणतात. तो सगळ्या देवांचीं नांवें घेऊन त्यांना गोंधळाला बोलावतो. दुसरा एकजण त्याची साथ करितांना मधून मधून विनोदी भाषणें व कोटया करितो. तिसऱ्याच्या हातांत संबळ व चौथ्याच्या हातीं तुणतुणें असतें. गोंधळ्याबरोबर दिवटे असतात. गोंधळी हे

याप्रमाणें मूळचेच वीरमूर्ती भवानीचे उपासक असल्यामुळें शिवाजी-महाराजांच्या वेळेपासून ह्म० स्वराज्याच्या उदयकाळापासून वीररसात्मक पोवाडे म्हणण्याचें काम त्यांनींच संतोषानें पत्करलें व महाराष्ट्रभर देवीचा ‘ उदो उदो ’ करीत स्वराज्याचाही ‘ उदो उदो ’ करण्याचें काम त्यांनीं केलें !

---

## ६ आदिमायेवरील एक ओजस्वी भारुड.

आदिमायेवर नाथांचीं दोन अत्यंत बहारीचीं भारुडें असून त्यांचें संक्षेपरूप एकच पद्य मी पुढें देत आहे. ह्या पद्यांत अत्यद्भुत ओज आहे. ह्यांत अध्यात्माचा व भक्तीचा प्रसाद तर आहेच, पण गेल्या तीन पिढयांच्या हृदयांना खळबळून सोडणाऱ्या देशभक्तीचें अत्युज्ज्वल स्वरूप यांत आहे. ह्याच्याइतकें राष्ट्रगीत होण्याच्या लायकीचें दुसरें एकही पद्य आमच्या पाहण्यांत नाहीं. बंकीमचंद्राचें ‘ वंदेमातरम् ’ गीत सुंदर आहे, पण त्या पद्यांत देशजननीचें स्थूलरूप वर्णिलें आहे, ह्यांत आध्यात्मिकदृष्टिही चोख आहे ! ह्या पद्याकडे हिंदुत्वाच्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे. हें भाविकांच्या मेळ्यांत, देशभक्तांच्या सभांत किंवा वीरांच्या रणांगणांवर सर्व ठिकाणीं व सर्व काळीं सर्वांना दिव्यस्फूर्ति देणारें आहे. ही नाथांची वीर्यवती वाणी अचेतनालाही सचेतन करील, अनाथाला सनाथ करील, दुर्बळांस शक्तिसंपन्न करील. ‘ ठोठाव म्हणजे दार उघडेल.’ या ख्रिस्ती धर्मपुस्तकांतील उक्तीसारखीच ‘ दार उघड बया दार उघड ’ अशी ही नाथांची खणखणित प्रार्थना आहे. ‘ उत्तिष्ठत जागृत प्राप्य वरान्निबोधत ’ ह्या श्रुतिवचनानुसार **समष्टिव्यष्टींतल्या ईश्वरीशक्तीला उद्देशून ही प्रार्थना केलेली आहे.** नाथ म्हणतात कीं—ह्या शक्तीनेंच मत्स्यकूर्मादि दहा अवतार घेतले आहेत ; रामरूपानें प्रगट होऊन रावण कुंभकर्णास हिनें मारलें, कृष्णरूपानें कंसशिशु-पालादिकांचा फडशा पाडला, व बिभीषण मारुती, अर्जुन इत्यादि वीर-

भक्तांचें हिनेंच रक्षण केलें आहे. प्रल्हादासाठीं स्तंभांतून प्रगटून पूर्ण देहात्मवादी अशा हिरण्यकशिपूचें पोट हिनेंच फाडलें आहे. व्यक्तींत किंवा समाजांत दुर्गुण व दुर्व्यसनें संचरलीं, कामक्रोधदंभादिकांचें प्राबल्य झालें, म्हणजे संतसज्जन हिचीच आराधना करितात, व ही अव्यक्तांतून व्यक्त होऊन लोकांचें रक्षण करिते. अशी ही पारमेश्वरी शक्ति विश्वाचा उद्धार करणारी आहे. नाथांच्या ह्या दणदणीत प्रार्थनेनेंच ती दचकून जागी झाली व समर्थशिवाजीमहाराजांच्या रूपानें प्रगट होऊन लोकसंरक्षण करिती झाली. प्रत्येकानें आपल्या हृदयांत असलेल्या ह्या शक्तीला जागे करावें, जिवंत व्हावें व आपलें आणि राष्ट्राचें मंगल साधावें !

॥ १ ॥

**नमो निर्गुण निराकार । मूळ आदिमाया तूं साकार ।**
**घेउनि दहा अवतार । करिसी दुष्टांचा संहार ॥**
**बैसलीस क्षीरसागरीं । शेषाचे पलंगावरी ।**
**जयविजयद्वारीं । प्रेमदिवटे तिष्ठती ॥ १ ॥**

**दार उघड बया । दार उघड ॥**

**दैत्यकुळीं हिरण्यकशिपु जन्मला । तेणें तुझा भक्त गांजिला ।**
**तें न पाहवे तुजला । त्वां उग्ररूप धरिलें बया ॥**
**तेव्हां क्रोधें स्तंभ फोडून । नारसिंहरूप धरून ।**
**दैत्यासी वधून । प्रल्हाद दिवटा रक्षिला बया ॥ २ ॥**

**दार उघड बया । दार उघड ॥**

**सीतेचेनि कैवारें । रावण मारिला सपरिवारें ।**
**अठरापद्म वानरें । गोंधळ मांडिला लंकेसी ॥**
**कौरव पांडव मिळाले । कुरुक्षेत्रीं युद्ध मांडिले ।**
**अठरा अक्षौहिणी दिवटे भले । नाचती रणकल्लोळीं ॥ ३ ॥**

**दार उघड बया । दार उघड ॥**

**बौद्ध अवतार घेऊन । विटे समचरण ठेवून ।**

पुंडलीक दिवटा पाहून । तयाचे द्वारीं गोंधळ मांडिला ।
आषाढी कार्तिकी गोंधळ मांडिला । उदो उदो शब्द जाला ।
कामक्रोधादिकां पळ सूटला । उदो उदो ऐकोनी बया ॥ ४ ॥

दार उघड बया । दार उघड ॥
कलीचा प्रथम चरण । दैवतें राहिलीं लपून ।
तीर्थें सांडिलें महिमान । अठरा वर्ण एक जाले बया ॥
म्लेंच्छें गांजिले देवभक्तां । महिमा उच्छेदिला सर्वथा ।
न चले जपतप तत्वता । एकरूप सर्व जाले बया ॥ ५ ॥

दार उघड बया । दार उघड ॥
काम महिषासुर मातला । तेणें विषयगोंधळ मांडिला ।
अज्ञानपोत पाजळला । आशासंबळ लावुनी बया ॥
क्रोध वेताळ दारुण । मातलासे मदें करून ।
मदमत्सर साह्य होऊन । भक्तिवैराग्य बुडविलें बया ॥ ६ ॥

दार उघड बया । दार उघड ॥
दंभझोटिंग महाबळी । अहंकारमुंजा छळी ।
आशा मनशा तृष्णा गोंधळी । विषयकल्लोळीं नाचती ॥
कल्पना वासना भूतावळी । औट कोटिया मिळाली ।
नाचती विषयकल्लोळीं । भोग दिवटा घेऊन बया ॥ ७ ॥

दार उघड बया । दार उघड ॥
ऐसें तुज न पाहावे जाण । ह्मणोनि बैसलीस मौन धरून ।
विटेवरी समचरण ठेवून । निवांत बैसलीस बया ॥
एकाजनार्दनीं शरण । विठ्ठल नामें अंबा जाण ।
पुंडलीक दिवटा अवलोकून । निवांत राहिलिस बया ॥ ८ ॥

दार उघड बया । दार उघड ॥
नमो आदिमाया भगवती । अनादिसिद्ध मूळप्रकृती ।
महालक्ष्मी त्रिजगती । बया दार उघड बया दार उघड ॥
हरिहर तुझें ध्यान करिती । सूर्य चंद्र कानीं तळपती ।
गगनीं तारांगणें रूळती । तेंवीं भांगीं भरिले मोतीं ॥

नवखंड पृथ्वी तुझी चोळी । सप्तपाताळीं पाउलें गेलीं ।
एकवीस स्वर्ग मुगुटीं झळाली । बया दार उघड ॥ ९ ॥

---

दार उघड बया । दार उघड ॥
अलक्ष्यपूर भवानी । दार उघड बया ॥
माहूरलक्ष्मी । दार उघड बया ॥
कोल्हापूरलक्ष्मी । दार उघड बया ॥
तुळजापूरलक्ष्मी । दार उघड बया ॥
तेलंगणलक्ष्मी । दार उघड बया ॥
कान्हाडलक्ष्मी । दार उघड बया ॥
पाताळलक्ष्मी । दार उघड बया ॥
अष्टभुजालक्ष्मी । दार उघड बया ॥
पंढरपूरनिवासिनी । दार उघड बया ॥ १० ॥
दार उघड बया । दार उघड बया ॥
दार उघड । दार उघड । दार उघड ॥
उदो उदो ऐसा शब्द गाजतो ।
कामक्रोधदैत्यांवर कोरडा कडकडां वाजतो ।
ज्ञानपोत पाजळतो । बोधाची परडी घेतो ।
प्रेमाचा पाउल पुढें टाकतो । अहंशंखासुर दैत्य बळी घेतो ११
दार उघड बया । दार उघड ॥
हनुमंत दिवटा बहाबळी । अठरापद्म येउनि रणकल्लोळीं ।
सागर बांधोनियां शिळीं । करी लंकेची होळी ।
रावण कुंभकर्ण घेसी बळी । खेळसी शिरांची चेंडुफळी ॥१२॥
दार उघड बया । दार उघड ॥
शरण आला बिभीषण । तयासी राज्यीं अक्षय्य स्थाउन ।
प्रल्हाद उपमन्यु ध्रुवापरी भातुकें देऊन । बुजाविसी कौतुकें १३
दार उघड बया । दार उघड ॥
जयजयाजी मूळपीठेंद्रभवानी । पांडवांची कुळस्वामिनी ।

**अर्जुनरथीं स्वार होऊनी । वाग्दोर हातीं धरूनी ।**
**रथ फिरविसी कवतुकें । बया दार उघड ॥ १४ ॥**
**उघड उघड बया । दार उघड ॥**
**रणवाद्य भम् भम् भम् । दण् दण्दण् कड्ककडड् ।**
**तोचि गोंधळ अंबे तुजप्रती । बया दार उघड ॥ १५ ॥**
**दार उघड बया । दार उघड ॥**
**त्वां रणकुंड जबडा पसरिला । आहुती घेसी दोनी दळां ।**
**रथ घोडे कुंजर तुला । नारळें बया अर्पिलीं ॥**
**अंबे ! तुझी न वर्णवे थोरी । खेळ खेळसी वैष्णवांमाझारी ।**
**पुंडलीक दिवटा महाभारी । ओवाळिसी महामाया ॥ १७ ॥**
**दार उघड बया । दार उघड ॥**
**जगदंबा प्रसन्न झाली । भक्तिकवाडें उघडिलीं ।**
**शंखचक्रांकित शोभली । कोटि चंद्रसूर्यप्रभा वेल्हाळी ।**
**एका जनार्दनी माउली । करी कृपेची साउली ।**
**भक्तजयाकारणें संपूर्ण झाली । बया दार उघड ॥ १८ ॥**
**दार उघड बया । दार उघड ॥**

पारमेश्वरी शक्तीचा व्यक्तीच्या व राष्ट्रांच्या अंगांत संचार व्हावा या बुद्धीनें नाथांनीं हें सुंदर स्तोत्र केलें आहे. विठोबा, दत्त, खंडोबा, जगदंबा ही एकाच परमात्म्याचीं स्वरूपें आहेत व कोणत्याही स्वरूपानें जगदीशाची उपासना होऊन जीवांनीं शक्ति, युक्ति व भक्ति या त्रिगुणांनीं संपन्न होऊन व्यक्तींचा व राष्ट्रांचा उद्धार करावा हाच नाथासारख्या महात्म्यांचा हेतु असतो. जगदंबेवर नाथांचीं बरींच पद्यें आहेत. त्यांपैकीं अंबेचा गोंधळ, फुलवरा, जोगवा व रोडगा यांचा विचार करूं. आध्यात्मिक दृष्ट्या देवी ह्म० ब्रह्मविद्या व ती मोहादि असुरांचा नाश करिते.

———

## ७ गोंधळ, फुलौरा, रोडगा व जोगवा.

( १ ) **अंबेचा गोंधळः**— ' नमो अनादि माया भगवति । मूळ-पीठनिवासिनी ! ' अहंकारमेंढा बळी देऊन आईभवानीला संतोषवावें. ' मोहमहिषासुराचा करावया घात । अंबा कडकडोनि दांत खात । तो धाकेंचि निमाला निश्चित । पूर्णानंद प्रगटला ' अंबाबाई व विठ्ठल एकच. ' गोंधळा येवो जगदंबे । विठाबाई तूं मूळस्तंभे ! ' पुंडलीक दिवटा पोत उजळून उभा आहे. माउलीच्या नांवाचा उदो उदो ह्म० उदय उदय अथवा जयजयकार करा. ' एकाचि माउली दहाअवतार खेळली वो । पाहतां गुरुवचनें मजचिमाजी भासली वो ! ' लोकप्रिय असा त्यांचा एक गोंधळ पहाः—

**उदो बोला उदो बोला कृष्णाबाई माउलिचा वो ॥ ध्रु० ॥**
**स्वर्गमृत्युपाताळ यांचा मंडप घातला वो ।**
**चार वेदांचा फुलवरा बांधिला वो ॥**
**शास्त्रपुराणें अनुवादती तुझा गोंधळ मांडिला वो ॥ उदो० ॥ १**
**जीव शिव संबळ घेऊनि आनंदें नाचती वो ।**
**अठ्यायशी सहस्र ऋषी दिवटे तिष्ठती वो ।**
**तेत्तिसकोटि देव चामुंडा उदो उदो म्हणती वो ॥ उदो० ॥ २ ॥**
**आषाढी कार्तिकी तुझ्या गोंधळाची दाटी वो ।**
**पुंडलीक दिवटा शोभे वाळुवंटीं वो ।**
**एका जनार्दनी अंबा उभी कर ठेवुनि कटीं वो ॥ उदो० ॥ ३ ॥**

' श्री जगदंबे भक्तपालके महिषासुरमर्धने ' असा आरंभ असलेला नाथांचा एक गोंधळ आहे. तो पाहतांना एक विचार सुचला तो सांगतों. नाथांच्या नंतर २५० वर्षांनीं पुण्याच्या ' होनाजी बाळांनीं ' ' घनश्याम-सुंदरा ' ची प्रसिद्ध भूपाळी रचलेली आहे. तिचा उगम श्रीधराच्या पांडव-प्रतापांत आहे असें एका शोधकानें दाखविल्याचें स्मरतें, पण श्रीधरा-च्याही पूर्वी नाथांच्या सदर गोंधळांत त्या लोकप्रसिद्ध भूपाळीचें बीज

आहे हें मला येथें सांगावयाचें आहे. भूपाळी सुप्रसिद्धच आहे.

**अरुणोदय झाला अंबिके ! ललितांबुजवदने ! ।**
**सायंकाळीं वृक्षीं द्विजगण होते ते उठले ।**
**कमलीं षट्पद निशीं गुंतले तेहि मुक्त झाले ॥**
**यात्रिकजन पंथानें सिद्धता करुनि चालीले ।**
**अग्निहोत्री देति आहुती कर्मी जे आगळे ।**
**सौर उपासिति सूर्या वैष्णव विष्णूतें स्मरले ।**
**शैव अर्चिती शिव गजाननभक्त पूजनीं रतले ॥ इ० इ० ॥**

( २ ) **फुलवरा:--जय जगदंबे ! विश्वकदंबे ! जगदुद्बोधे !**
**देह तुज अर्पिला । तुज म्यां फुलवरा बांधिला ॥ ध्रु० ॥**

हा फुलवरा वाचण्यापेक्षां गाइलेला ऐकण्यांत फार रस उत्पन्न होत असतो. याचें शेवटचें कडवें देतों:—

**वैकुंठीचें निधान त्याचें असती जे प्रियकर वो ।**
**त्यांची गांठ पडली त्यांनीं दिधला अभयंकर वो ।**
**त्यांचे संगतीं गेले भक्तिनें देखिले भीमातिर वो ।**
**परात्पर सोयरा । पुंडलिक बरा । दिधला थारा । तेणें मज बुडतां हात दिधला ॥ तुज०॥ ७॥**

( २ ) **रोडगा:**—भवानीआईला नाथांनीं एक रोडगा वाहिला आहे! हें भारूड मोठें गमतीचें आहे.

**सत्वर पाव गं मला भवानिआइ ! रोडगा वाहिन तुला ॥ रो०॥ ध्रु०॥**
**सासरा माझा गावीं गेला । तिकडेच खपवी त्याला ॥ भवानि०॥ १ ॥**
**सासू माझी फार गांजिते । मरिआइ येऊं दे तिला ॥ भ० ॥ २ ॥**
**जाऊ माझी फडफड बोलती । बोडकी कर गं तिला ॥ भ० ॥ ३ ॥**
**नणदचं पोर किरकिर करतं । खरूज येऊं दे त्याला ॥ भ० ॥ ४ ॥**
**दादला मारुनि आहूति देईन । मोकळी कर ग मला ॥ भ० ॥ ५ ॥**
**एकाजनार्दनी सगळेचि जाउं दे । एकटिच राहुं दे मला ॥ भ०॥ ६ ॥**

येथें बुद्धि चिच्छक्तीची ( भवानीदेवीची ) प्रार्थना करित आहे.

प्रपंच हें सासर व हरिपद हें माहेर अशा कल्पनेवर मराठींत मुकुंद-राजापासून महिपतीपर्यंत अनेक कवींनीं मनोरम पद्यें रचलीं आहेत. ह्या रूपकांच्या पोटीं अध्यात्मभाव उघड आहे. अहंकार सासरा, कल्पना सासू, इच्छा आणि निंदा या जावा, काम हा दादला व क्रोध हा दीर, ममता ही नणंद व तिचें पोर ह्म० दुःख, अशा रीतीनें ह्या रूपकात्मक पद्याचा अर्थ केला पाहिजे. नाथांचीं 'सासुरवासा' वर दोन भारुडें आहेत. त्यांच्या साह्यानें वरील रूपक नीट उकलतें.

( ४ ) **जोगवा**ः—हा जोगवाही गोंधळी व वारकरी म्हणतात. आम्हांला तो पैठणास ऐकायला मिळाला. छापील पुस्तकांतल्यापेक्षां त्याचे पाठही सरस आहेत. 'अनादि निर्गूणी निर्गूणी प्रगटलि भवानी। अहं महिषासूर महिषासूर मर्दनालागुनी' अशी तेथली चाल आहे.

**अनादि निर्गूणी प्रगटलि भवानी । अहं महिषासूरमर्दनालागुनी । ।**
**त्रिविध तापाची कराया झाडणी। भक्तालागोनी पावसि तूं निर्वाणीं १**
**आइचा जोगवा जोगवा मागेन । भेदरहीत वारीसी जाइन ।**
**हातीं बोधाचा झेंडा मी घेइन । द्वैत सारूनी माळ मी घालिन॥ध्रु०॥**
**नवविधभक्तीच्या करीन नवरात्रा । पोटीं मागेन मागेन ज्ञानपुत्रा ।**
**धरूनि सद्भाव अंतरीच्या मैत्रा । दंभसंसारा सांडीन कुपात्रा ॥ २॥**
**हातीं बोधाची घेईन परडी । आशातृष्णेच्या पाडीन दरडी ।**
**मनोविकार करीन हे कुरवंडी । अद्भुतरसाची भरीन दुरडी ॥ ३ ॥**
**आतां साजणि गं झाले मी निःसंग।विकल्पनवऱ्याचा सोडियला म्यां संग**
**कामक्रोध हे झोडियले म्यां मांग । केला मोकळा मारग म्यां सुरंग**
**ऐसा जोगवा मागूनी ठेविला । जाउनि नवस महाद्वारिं फेडिला ।**
**एकाएकीं म्यां जनार्दन देखिला। जन्ममरणाचा फेरा म्यां चुकाविला ५**

———

## ८ खंडोबा आणि वाघेमुरळ्या.

आदिमाया पार्वती ही जशी महाराष्ट्राची कुलस्वामिनी तसा महादेव हा प्राचीन महाराष्ट्राचा कुलदेव होय. गोवेप्रांतांतील मंगेश व शांतादुर्गा हीं शिवशक्तींचींच रूपें होत. महादेवाची उपासना खंडोबाच्या रूपानें कित्येक शतकें महाराष्ट्रांत चालू आहे. खंडोबा, मल्हारी, म्हाळसाकांत, मल्हारी-मार्तंड इ० नांवानें हा देव प्रसिद्ध आहे. भवानीप्रमाणें खंडोबाचींही अनेक महात्में, सहस्रनामें व स्तोत्रें मराठींत झालेलीं आहेत. खंडोबा म्हणजे महादेव. स्कंद ( खंड ) म्हणजे कार्तिकस्वामी-अर्थात् खंडोबा ह्मणजे कार्तिकस्वामी असें व्युत्पत्तिशास्त्रदृष्ट्या राजवाडे व थोरले भांडारकर यांच्यासारख्या पंडितांनीं लिहिलें आहे पण तें चुकीचें आहे. परंपरेचा किंवा आचारधर्माचा आधार माहित नाहीं ! खंडोबा म्हणजे जर कार्तिकस्वामी असता तर—ज्याचें दर्शन होतांच स्त्रियांना सात जन्म वैधव्य येतें अशी समजूत—त्याच्या सेवेला आपल्या मुली वाहण्याची हिंमत आईबापांची कशी झाली असती ? खंडोबाच्या सेवेला जे पुरुष आपणांस वाहून घेत त्यांना वाघे व कुमारी वाहून घेत त्यांना मुरळ्या म्हणत. स्कंदपुराणांत मणिमल्लदैत्यांच्या नाशार्थ शंकरानें खंडोबाचा अवतार घेतला असें स्पष्ट म्हटलें आहे आणि परंपराही अशीच आहे. एकनाथ, रंगनाथ, समर्थ यांच्या सारख्यांच्या घराण्यांत खंडोबाची उपासना पूर्वापार असे व त्यांनींही खंडोबा हा शंकराचाच अवतार आहे असें स्पष्ट म्हटलें आहे. नाथांनीं खंडोबास ‘ त्रिपुरारी ’ म्हटलें असून समर्थांनीं खंडोबाच्या आरतींत ‘ रघुविरनामस्मरणें हृदयीं शंकर नीवाला । तो हा मदनांतक अवतार झाला असें स्पष्ट म्हटलें आहे. जेजुरी, पाली, पेंबर व नळदुर्ग हीं खंडोबाचीं स्थानें प्रसिद्ध आहेत. खंडोबा हा वीरांचा देव असून त्याचें वाहन घोडा आहे. देशस्थ ब्राह्मण, लहान थोर सर्व मराठे, धनगर, रामोशी, मांग इत्यादि अठरापगड जातींचा कुलस्वामी खंडेराव हा आहे. ह्माळसा म्हणजे पार्वती ही खंडोबाची पत्नी व वाघेमुरळ्या त्याचे सेवक-

गण होत. मार्गशीर्ष शुद्धांतले पहिले सहा दिवस खंडोबाचें नवरात्र असतें, व षष्ठी म्हणजे सट–चंपाषष्ठीच्या दिवशीं जेजुरीस मोठी यात्रा भरते. इंदोरच्या होळकरांच्या घराण्याचें खंडोबा हें आदिदैवत आहे. जेजुरीच्या गडावर श्रीमती अहल्यादेवीनें खंडोबाचें मंदिर बांधलें असून पायथ्याशीं मोठा तलावही बांधला आहे. उमाजी नायकाच्या पोवाड्यांत फांशी जाण्याचे वेळीं उमाजीनें 'मल्हार गाजविला' ह्म० मल्हारीच्या नांवाचा मोठ्यानें जयघोष केला व त्याचा फांस तुटला असें वर्णन आहे. उमाजी नाईक हा रामोश्यांच्या जातीचा होता. जेजुरीचा खंडोबा जसा पुणें जिल्ह्यांत आहे तसा पालीचा खंडोबा सातारा जिल्ह्यांत आहे. तेथेंही खंडोबाचें देऊळ एका डोंगरावर आहे. पालाई नांवाची एक गवळण खंडोबाची भक्त होती तिच्या नांवावरून त्या गांवाला हें नांव पडलें. देवळाच्या पुढें दगडाचें नंदी व ५०० घोडे आहेत! डोंगराच्या पायथ्याशींही एक खंडोबाचें देऊळ आहे. येथील नदीचें नांव तारळी. नदीच्या डाव्या तीरांवर पेंबर आहे व तेथेंच खंडोबाचें प्रसिद्ध देवालय आहे. हे ४०० वर्षांपूर्वीं बांधलेलें असून पुढील सभामंडप सेनापति धनाजी जाधव यांनीं बांधला आहे. त्याला १२ खांब असून कांहीं पितळी पत्र्यांनीं मढविले आहेत. शिखर जमिनीपासून ५० फूट उंच आहे. समोर नंदी आहे. त्याच्या दोन्ही बाजूंस मोठाल्या दीपमाळा आहेत. आवाराची भिंत शिंद्यांनीं बांधलेली आहे. मुधोळकर, मुतालीक, माने यांनींही कांहीं आवारें, वेसी वगैरे बांधलीं आहेत. मराठ्यांचे लक्ष खंडोबा देवाकडे किती होतें हें यावरून दिसतें. पौषांत यात्रा भरते.

ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां खंडेराव हा देवगडकर जाधवांच्याही फार पूर्वीं झालेला एक शिवावतार असावा असें मी ३० वर्षांपूर्वीं 'खंडेराय व शिवराय' ह्या शीर्षकाखालीं एक लेख लिहून प्रसिद्ध केलें होतें (केसरी ता० १।१।१९०३). 'खंडेराय हा शिवरायासारखा धर्मरक्षक व गोब्राह्मण प्रतिपालक विख्यात वीर होता, म्हणजे हा शिवावतार ऐति-

हासिक पुरुष असावा.' रंगनाथ निगडीकर यांचें ( जन्म शके १५३४ ) एक मार्तंडाष्टक मला जुन्या बाडांत सांपडलें असून त्यांतील दोन श्लोक मी पुढें देत आहे:—

**त्रैलोकीं मणिमल्ल दैत्य सकला आजिंक्य जाला मही**
**तेणें ब्राह्मण यज्ञ होमहवनें विध्वंसिले सर्वही ।**
**आला ते समयीं सदाशिव स्वयें सोडूनि ब्रह्मांड हो**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारिमार्तंड हो ॥ १ ॥**
**घेतां हा अवतार दुष्टदमनीं सद्भक्त संरक्षिले**
**गाई ब्राह्मण यज्ञ होमहवनें हे धर्म संस्थापिले ।**
**गाती भक्त ऋषी मुनीजन सदा सत्कीर्ति ऊदंड हो**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारिमार्तंड हो ॥ २ ॥**

अलीकडच्या भाषेंत बोलायचें तर दुष्टदमनासारखें प्रचंड राष्ट्रकर्म खंडोबानें केलें. अलीकडे राष्ट्रकार्य करणारांनाही साह्यार्थ 'स्वयंसेवक व स्वयंसेविका' यांचे संघ लागत असतात ! तसेच खंडोबाच्या स्वयंसेवकांचे संघ म्हणजे 'वाघे' व सेविकासंघ म्हणजे 'मुरळ्या' होत असें कां मानूं नये ? अलीकडे निशाणाला शुभ्र, हिरवें, तांबडें, भगवें इत्यादि रंग कांहीं गूढार्थ दाखविण्यास लागतच असतात, तसा खंडोबाच्या संप्रदायानें आपला रंग पिंवळा ( भंडार ) ठरविला. खंडोबाला 'भरितरोडगा' लागतो हें या संप्रदायाच्या साध्या राहणीचें द्योतक आहे. इतिहासाची पुनरावृत्ति होते असें म्हणतात तें खरें आहे.

महादेवाची खंडोबाच्या रूपाची उपासना चालू असतांनाही पुष्कळ उच्च कुळींचे मराठे व इतर लोक 'महादेव' म्हणूनच शिंगणापूरच्या शंकराची उपासना करणारे आहेत. सातारा जिल्ह्यांत माण तालुक्यांत शिंगणापूर हा गांव आहे, तेथील डोंगरावर महादेवाचें प्रसिद्ध स्थान आहे. पश्चिमेकडे कृष्णेपासून, उत्तरेकडे नीरेपासून, पूर्वेकडे भीमेपासून व दक्षिणेकडे वारणेपासून चढत चढत जाणाऱ्या पर्वतशिखरावर महा-

देवाची स्थापना केलेली आहे. त्यालाच शिखरशिंगणापूर म्हणतात. पुष्कळ मराठे लोक लग्न झाल्यावर वधूवरांना ओहोर पायां पडायला तेथें नेतात. तेथें महाशिवरात्रीला फार मोठी यात्रा भरते.

---

## ९ वाघे व मुरळ्या.

( १ ) **वाघ्याः**— नाथांची ' वाघ्यावर ' दोन व मुरळीवर एक अशीं तीन पद्यें आहेत.

**( १ ) अहं वाघा सोहं वाघा प्रेम नगारा वारी ।**
**सावध होउनि भजनीं लागा देव करा कैवारी ॥ १ ॥**
**मल्हारीची वारी । माझ्या मल्हारीची वारी ॥ ध्रु० ॥**
**इच्छा-मुरळिस पाहुं नका तुह्मि पडाल नरकद्वारीं ।**
**बोध बुधली ज्ञानदिवटी उजळा महाद्वारीं ॥ २ ॥**
**आत्मनिवेदन रोडगा निवतिल हारोहारीं ।**
**एकाजनार्दनीं धन्य खंडेराव त्यावरि कुंचा वारीं ॥ ३ ॥**

( २ ) **मुरळीः**— पुढील पद्य नाथांच्या गाथ्यांत मला मिळालें नाहीं. हें ऐकण्यांत आलें. हें फार सुंदर आहे. नाथांनीं आपल्या अंगावर मुरळीचें रूपक घेतलें आहे. खंडोबाचे भक्त भंडार उधळतात, गळ्यांत भांडारी (पिंवळें वस्त्र, भंडार ह्म० हळद), व हातीं कोटंबा म्ह० वाडगा, भिक्षापात्र घेतात; देवाला भरितरोडग्याचा नैवेद्य करितात; पोत उजळतात; येळकोट करितात व 'खांजिरीमंजिरी' घेऊन त्यावर पोवाडे गातात.

**निःसंग मुरळी झाले । या मालूचें घर रिघाले ॥ ध्रु० ॥**
**गळां भक्तीची भांडारी । भावाचा कोटंबा करीं**
**विवेकाचि मागते मि वारी । या संतांच्या चौंधा आले ॥ या०॥१॥**
**चौ हात घांट वाजती । सोहं शब्दघोळ गर्जती ।**
**वाघ्या मुरळ्या या नाचती । गुरुकृपेचें अंजन ल्यालें ॥ या०॥२॥**
**वाजे वैराग्य तुणतुणं । तें कदा नव्हे बा सुनं ।**
**मन घुंगरूं वाजे छुनछुनं । नाचत जेजुरी गेले ॥ या० ॥ ३ ॥**

**गड देखीला जेजुरी । आत्मा नांदतो मल्हारी ।**
**जाउनि बसले मी मांडोवरी । एकाजनार्दन बोले ॥ या० ॥ ४ ॥**

घाट = घंटा, वेदघोष. सुनं = शून्य, स्तब्ध. चौंधा = चार रस्ते जेथें मिळतात तें ठिकाण, चौधारा, चव्हाटा. नाशकास एक तिबंधा आहे, तिबंधा म्ह० तीन रस्ते जेथें मिळतात तें स्थान.

---

## १० भैरवनाथाचे भराडी.

भैरवनाथ उर्फ बहिरोबा हा काशीचा कोतवाल ( फौजदार ) मानला जातो. प्रत्येक गांवांत एक बहिरोबाचें देऊळ असतें. बहिरोबाला भूतपिशाचादिकांपासून तो क्षेत्राचें रक्षण करितो म्हणून क्षेत्रपाळ म्हणतात. गांवांत सर्पदंशानें कोणी पीडिला गेला तर त्याला बरें वाटावें म्हणून बहिरोबापुढें आणून ठेवतात. लोकांची ही ग्रामरक्षकदेवता म्हणून त्यावर श्रद्धा असते. महाराष्ट्रांतील भैरवाचें मुख्य स्थान म्हणजे कोल्हापूराजवळील ज्योतिबा हा होय. तेथें लाखावर यात्रा जमते. ज्योतिबाच्या आरतींत ' उत्तरेचा देव दक्षिणे आला ' असं म्हटलें आहे. भैरवाचे भक्त ते भराडी. भैरवाची पूजा बांधणें याला भराड म्हणतात. भराडी हे डौर ( डमरू ) वाद्यावर गाणीं गाऊन मनोहर नाद उमटवितात. यांच्या बोलण्यांत गद्यही असतें. त्यांत विनोद, उपहास, चुणचुणीतपण असतो. ते उपहासानें बोध करितात. डौर वाहणें = उपहास करणें.

डौरकाराच्या बोलण्यांत गद्य अधिक व पद्य कमी असतें. हंसत खेळत उपहासानें बोध देण्याचा हा एक प्रकार आहे. याला उपहासात्मक किंवा उपरोधिक काव्य म्हणावें. ' डौर वाहूनि सांगणें निजहितार्थ । या कारणें मी डौरकार जालों ' असें नाथ सांगतात. डौर वाजवितांना भराडी मधून मधून कांहीं चमत्कारिक शब्दांचा नाद करितात. ' चुडमुख चुडसुख । दुक्दुक् दुक् दुक्, तळमळ तळमळ, चटपट चटपट, खटपट खटपट, बुड बुड बुड बुड, भुंग भुंग भुंग भुंग ' इत्यादि डौराचें एक उदाहरण.

१) ' **ढवळा** धरा जवळा. । धरितां मार्ग प्रांजळा—आतां जो ढवळा जवळ केल्यानें आपला मार्ग प्रांजळ होतो तो ढवळा कोणता 'कां ढवळा धरूं कापूस । कीं ढवळा धरूं राजहंस ? कीं ढवळा धरूं पारिजाची खोट ? ( पाऱ्याची गोळी कीं काय ? ) कीं । ढवळा धरूं काश्मीरीचा घट ? ' असे प्रश्न श्रोत्यांस विचारून डौरकार म्हणतो. ' ढवळा नव्हे कापूस । ढवळा नव्हे राजहंस—' इ० मग ' ढवळा कोण ?' उत्तरः- ' ढवळा जो निजधर्म चोखट तिहीं लोकीं !'

**ढवळा म्ह० सोज्वळ स्वधर्म !** पण ह्या ढवळ्याच्या तीन तऱ्हा आहेत त्या डावलून शुद्ध ढवळा ओळखून घेतला पाहिजे. तीन तऱ्हा कोणत्या ? खोटा, उफराटा व अव्हाटा ! याचा अर्थ ऐका. खोटा, उफराटा, आडवाटा असा ढवळा तो कोणता ? काशीचा पोहा ( यात्रेकरूंचा मेळा ) लुटावा, सात्विकांना नागवावें आणि त्या पापद्रव्यानें धर्म करावा; धर्माच्या वाटा मारून धर्माचा फाटा वाढवावा हा **खोटा** धर्म होय ! ' कन्याविक्रयें द्रव्य संचिती । गोविक्रयें द्रव्य अर्जिती ' या प्रकारें अधर्म करून धर्म म्हणून मिरवावा तो **उफराटा** धर्म होय ! संन्याशानें द्रव्य मिळवणें व संन्याशाला द्रव्य देणें, विवाह, मुंज, यज्ञ ब्राह्मणांकडून करवून घेऊन त्यांचे पैसे बुडविणें हा उफराटा धर्म होय. अधर्माच्या वाटेला लावणारा तो खरा धर्म नव्हेच ! आतां **अव्हाटा** धर्म कोणता तो ऐका. लौकिक वाढविण्यासाठीं तुलादान करणें म्ह० विष्टामूत्राचा जो अमंगल देह त्याचे भारंभार सोनें वगैरेंचें दान करणें, काम्यकर्में करवून घेऊन मजुरी न देणें व तीही भरपूर न देणें, श्राद्धपक्षाच्या वेळीं उदक सोडून दानाला आंगठा दाखविणें, धर्मस्थिति मोठी डौलाची मांडून म्ह० त्याचा बाजार पसरून द्रव्य मिळवणें व तें उदरार्थ वेंचणें, श्रीमंत यजमान आले म्हणजे तेवढयापुरतें अग्निहोत्रादि मांडणें व यजमानानें पाठ फिरवल्याबरोबर त्याची राख करणें, यात्रेच्या निमित्तानें किंवा रुद्रावर्तनाच्या मिषानें पैसे ( फंड ) गोळा करून ते संसाराला लावणें, अशी

प्रतिष्ठा मिरवण्यासाठीं धर्मचेष्टा करणें हा **आडवाटा** धर्म होय ! तात्पर्य, धर्माच्या नांवाखालीं होणारा हा सारा अधर्मच होय; हा खरा ढवळा नव्हे. शुद्ध धर्म सोज्वळ असतो, त्यांत दंभ, लबाडी, खोटेपणा लेशमात्र नसतें. तनमनधनवचन असा तोही ढवळा धर्म चतुष्पाद असतो. त्यांतही तन, धन व वचन यानें होणाऱ्या धर्मापेक्षां मानसिक धर्म तो खरा धर्म होय. त्याचें स्वरूप डौरकार सांगतोः—

**मानसिक धर्मस्थिति । होय ब्रह्मज्ञानाची प्राप्ति ।**
**चारी मुक्ति पायां लागति । ऐसी धर्मस्थिति अगाध ॥**
**मानसिक धर्माची स्थिती । भगवद्भाव सर्वांभूतीं......।**

जनीं जनार्दन पाहणें, सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवणें, सर्व प्राण्यांची देवरूपानें सेवा करणें हा ढवळा म्हणजे खरा धर्म होय. ‘चुडमुख चुडमुख पटपट पटपट ! ’ ही उपदेशपद्धति किती साधी व गोड आहे बरें !

---

## ११ कुडमुड्या जोशी.

**जोशीः**—खेडेगांवांतून पंचांग सांगून लोकांना तीथवार कळविणें हा ज्यांचा व्यवसाय त्यांना जोशी ( जोइसी ) म्हणतात. हात पाहून भविष्य सांगणारे जोशी बरेच फिरत असतात. गांवांत प्रमुख ह्म० पाटील. पाटीलपाटलिणींचे हात पाहिल्यावर मग इतरांचे हात पहातात. नाथ स्वतःच जोशी बनून येतात व देवडीवर जमलेल्या शिष्ट लोकांत प्रवेश करितात, ‘ ऐका ऐका, राजेश्री । प्रजा मोकदम कारभारी । शेटे महाजन चौधरी। बरवी नगरी वसविली नाना’ (मागें अनंत योनींतून फिरत फिरत) मनुष्यजन्मास आलांतः–‘ मागे कष्ट बहुत भोगिले । शेवटीं आले नरदेहासी नाना ’ ‘ या पांढरींत मागे बहुत आले । जोशी भविष्य सांगों गेले ’–पूर्वीं साधुसंतांनीं नाना प्रकारें उपदेश केले–‘ त्यांचे तुम्ही नाहिं ऐकिले । दगे झाले थोर थोर नाना. ’ ( रोहिदास चांभार, चोखामेळा इ० पंचमजातींत जन्मून त्यांनीं नांवलौकिक मिळविला व वरच्या जातींत

जन्मून लाखों लोकांनीं नरदेहाचें सार्थक केलें नाहीं ! )–' धेडमांगांच्या मान्यता झाल्या । उत्तम योनी भिकेस लागल्या ! '

**( पाटीलबुवास ) नांव काय पाटिलबुवाचें ? ।**
**पुढील भविष्य सांगेन साचें ।—**
**एका बायकोचि संगत घडली ।**
**तेणें तुझी महिमा बुडाली ।**
**जुनी भाकरी सरूनि गेली ।**
**गांठ पडली दरिद्राची नाना ॥ ८**

( वासना बायको, तिच्या संगतीनें जुनी भाकर ( पूर्वपुण्याई ) सरली व दारिद्रय आलें. ' आतां तिचा संग टाक व सुखी हो.

**(पाटलिणबाईस)** तुझा हात पाहूं दे बये ! दुर्बुद्धि ( विषयबुद्धि ) टाक.

**फार बरेपणा दोघांत । स्त्री-पुरुषांत बहु गोडी बये ।**
**विघ्न दिसतें वरले आळी । नाडूं पाहती थोर थोर बळी॥ ११ ॥**

वरल्या आळीपासून विघ्नें येतील ( उत्तमांग जें मस्तक त्यापासून. तेथें १ श्रोत्र २ त्वक् ३ चक्षु ४ जिव्हा व घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें बळवान् आहेत, तीं विषयाकडे धांवतात व विषयेंद्रियसंयोगापासून सुखदुःखादि विकार उत्पन्न होतात ). ' दहा लेंकुरें जाहलीं आई । परि तूं एकाचें सुख देखिलें नाहीं । आतां येथून पुढें पाहीं । सुख होईल तें ऐक बये. ' ( दशेंद्रियांपैकीं एकाही लेंकराचें सुख तुला मिळालें नाहीं, आतां दुर्बुद्धि सोडल्यावर तुला पुष्कळ सुख लागेल; ) कुबुद्धीची काचोळी ( तामसी वृत्ति ) तूं अंगांत घालूं नकोस. आतां मला जोश्याला दान दे, कोणतें दान ? ' विकल्प–उडदांचा मेळावा । द्वैत–तांब्याचा पाउड ( पैसा ) द्यावा । संदेहतेलाचा घट भरावा ' व हें सर्व ओवाळून देऊन टाक ! ' येथुन तुझा शनेश्वर गेला । जन्मगुरूचा पालट झाला. ' आतां दिवस चांगले येतील. ' कन्यापुत्र पोट पिकेल । वेल मांडवा जाईल. ' तुमचा वाडा ( देह ) चांगला नांदता होईल, रोगपीडा जातील. ' विघ्नें

जातील देशोधडी ! ' ,पण पुढें सावध रहा. ' मातापिता बंधुबहिणी । बाळ भ्रतार सुखाचि मांडणी. ' म्हातारपण येईल, यांतलें कोणी कामाला यायचें नाहीं बरें ! ' एकलें जावें लागेल स्वर्गासी ! ' नीट ऐकून ठेव ' देहगांवचा होरा जाईल । डोळेगांवीं दिवस मावळेल । कानपूरचीं कवाडें लागतिल–तोंडपूर ओस पडेल, दांतवाडीचा मार्ग मोडेल, नाकगांवीं गळती लागेल, सुरतीचा डौल बिघडेल,सकळ हवा सरेल ( प्राण जाईल).'

**एका जनार्दनी जोशी । सांगूं शकून सर्वत्रांसी ।**
**रामनाम घ्या वाचेसी । तेणें विश्वासें तराल दादांनो ॥**

---

## १२ बाळसंतोष व वासुदेव.

( २ ) **बाळसंतोषः**— जीर्ण वस्त्र किंवा मुलाच्या अंगचें अंगडें मागायला येणाऱ्यांचा एक वर्ग. नाथ ह्मणतातः 'आह्मी परात्पर दोशी। कोणी नोळखती आह्मांसी । टाकुनि आलों संतांपाशीं ।। बाळसंतोष । बाबा बाळसंतोष. ' ' जीर्णस्वरूपाचा शेला । विषय भोगितां विटला ' तो ( देहबुद्धि ) आह्मांस द्यावा ह्म० तुह्मी सोडावा ! ' ऐक्यत्वाचें बिरडें ( जीवशिवांची गांठ ) जोडी । त्रिगुणांची कसणी फेडी–' जीवशिवै-क्याचा अनुभव घे व त्रिगुणांच्या पिशवींत ज्या कांहीं जिनसा ( वृत्ति ) आहेत त्या ओतून टाक ! दो हातांचें द्वैतदान देऊन टाक. पूर्णत्वाची पुरणपोळी व प्रबोधलाडू यांचें मला भोजन दे.

( ३ ) **वासुदेवः**—बाळसंतोषाची व वासुदेवाचीं प्रत्येकाचीं आठ आठ भारुडें आहेत. ' धन्य तोचि एक जगीं हरिरंगीं नाचे । रामकृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचे ।। सुखदुःख समान सकळ जीवांचा कृपाळ । ज्ञानाचा उद्बोध भक्तिप्रेमाचा कल्लोळ ' असा हा वासुदेव वासुदेवा-सारखाच ( कृष्णासारखा ) असंग असतो. ' कर जोडुनि विनवितों तुह्मां । गुंतूं नका विषयकामा । तुह्मी आठवा मधुसूदना । वासुदेव म्हणा

तुम्हि वासुदेव म्हणा ' ॥ १ ॥ पायघोळ आंगरखा, उंच टोपी, हातीं चिपळ्या असे हे वासुदेव आपल्याभोंवतीं गरगर फिरत नाचत हे ' वासुदेव ' ह्मणतात!

---

## १३ पांगुळ, बहिरा, मुका व पिसा.

( ४ ) **पांगुळः**— ' हिंडलों दाही दिशा श्रम जाहला केवळा '— संसाराच्या भोंवऱ्यांत अनेक जन्म हिंडायला कंटाळून स्वरूपाच्या आसनावर स्थिर झालेला तो पांगुळ ! ' कर्माकर्माच्या वाटेंत ठेंचा लागल्या, संपत्तीविपत्तीचा भरंवसा मानून व कन्यापुत्रआप्तांच्या वळशांत सांपडून भ्रमडोहीं बुडाला त्याचा ' आक्रोश करून ' जीव पांगुळ ' होतो. ' मज नाहीं हातपाय डोळां पडली झांपड । कर्ण बहिर झाले वाचा बोले बोबड ' मग ' अवघे करिती हाडहाड. ' हें पाहून कंटाळलेला जीव संतांनीं दिलेल्या ' निजबोधानें ' तृप्त होऊन ' त्यावरी बैसोनी क्रीडे सर्वत्र स्वलीळा ' तो पांगुळ. वासुदेव हा भराडी, भुते यांसारखाच सर्व लोकांना जागे करीत हिंडणाऱ्यांचा एक वर्ग आहे. हे अरुणोदयीं जागे करीत फिरतात व भिक्षेवर निर्वाह करितात. सूर्याचा सारथी जो अरुण तो पांगुळ ( पंगुल ) आहे म्हणून ' पांगुळ आला, पांगुळ आला ' अर्थात् अरुणोदय झाला, उठा, निजलांत काय अशी कामगिरी हे पांगुळ करीत असतात. ' जागल्या 'चाच भाऊबंद ' पांगुळ ' आहे.

' पंढरपूर पाटणीं गा एकाजनार्दन दाता । पांगुळा पाय देतो विश्रांति समस्ता ' हा एक व ' मृत्युलोकीं एक नगर त्याचें नांव पंढपूर रे ' हा एक असे नाथांचे दोन पांगुळ वारकऱ्यांत वारंवार ऐकण्यांत येतात.

( ५ ) **बहिराः**— ' बहिरा झालों मी जगीं. ' बहिरा कसा ? ' नाहीं ऐकिलें हरिकीर्तन । नाहीं केलें पुराणश्रवण । नाहीं संतकीर्ति श्रवणीं आली । नाहीं संतवचनें ऐकिलीं । पितृवचनांसी पाठ दिधली.' जें ऐकायला पाहिजे होतें तें ऐकिलें नाहीं, आत्मकल्याणाच्या गोष्टी

ऐकल्या नाहींत आणि भलत्याच गोष्टी ऐकण्यावाचण्यांत व वादविवादांत जन्म व्यर्थ दवडिला म्हणून ' बहिरा ! ' बहुतेक लोक बहिरे आहेत !

( ६ ) **मुका**ः— ' मुका झालों वाचा गेली ! '—' होतों पंडित महाज्ञानी । दशग्रंथ षड्शास्त्रपुराणी । चारी वेद मुखोद्गत वाणी । गर्वामध्यें झाली हानी ॥ मुका० ॥ १ ॥ जिव्हा लाचावली भोजना । दुग्ध धृत शर्करा पक्वान्ना । निंदिले उपान्ना । तेणें पातलों मुखबंधना ॥ मुका० ॥ २ ॥ साधुसंतांची निंदा केली । हरिभक्तांची स्तुति नाहीं केली । तेणें वाचा पंगू झाली । एकाजनार्दनीं कृपा लाधली ॥ मुका० ॥ ३ ॥ ' वाचा होती म्हणून पुष्कळ ग्रंथांचें अध्ययनपठण केलें, नाना पदार्थ सेवन करून जीभ चावट केली—पण विद्येचें फळ ज्ञानविनय हें पदरांत न पडतां अहंकारानें ताठर होऊन संतसज्जनांच्या निंदेनें तीच वाचा विटाळली ! जिव्हा व रसना यांचा उपयोग आत्मकल्याणार्थ करून न घेतां दुरुपयोग केला पण हें वाचा गेल्यावर किंवा वाक्शक्ति क्षीण झाल्यावरच बहुतेकांच्या ध्यानांत येते ! एकाजनार्दनाच्या कृपेनें ' मुका झालें वाचा गेली ' हा ज्ञानोत्तरभक्तीनें जो अनुभव येतो तो वेगळाच आहे !

( ७ ) **पिसा**ः— ह्म० वेडा. जग ज्याला शाहणे समजतें त्याच्या अगदीं उलट ! पिसा वेडा. ' एका पिसाळला पिसाळला ! ' कसा ? ' नांवरूप नाहीं याचे पिसेपणीं '—नामरूपातीताच्या संगतींत हा मस्त असतो. ' हा धांवोनी संतांचे पितों पायवणी ' आणि ' झोंबोनी संतांचें उच्छिष्ट खाय ' ह्म० संतांचें ज्याला तोंड लागलें त्या नामामृताला पीत असतो. ' राम राम म्हणोनि सदा रडे । जें जें देखे त्याच्या पायां पडे ! हा ' बोलांमाजी घाली मनाची मिठी । शून्याहीवरील सांगतो गोठी ! '

---

## १४ जागल्या व पाईक.

( १ ) **जागल्या**ः—मध्यरात्रीच्या सुमारास चोर व दरोडेखोर चोऱ्यामाऱ्या करायला शहरांतून फिरतात, त्यावेळीं हुजूरचे शिपाई लोकांना

सावध राहण्याचा इषारा देण्यासाठीं गस्त घालतात; त्याप्रमाणें अविद्येच्या रात्रीं मायामोहाच्या निद्रेंत गुंग झालेल्या जीवांना जागविण्यासाठीं हुजूरचे ह्म० परमात्म्याचे शिपाई जे संत ते जागले होऊन येतात !

'मी जागतों गांव निजला सारा। कुणी हुषार नाहींत घरा '-त्यांना 'हुषार रहा' म्हणून मी सावध करण्यासाठीं आलों आहें. 'मी जागुनि जागवितों लोकां '-' निजेनें व्यापिले काळ ग्रासील ' याची यांना शुद्धि नाहीं. गडद अंधार पडला-' आतां येइल बा चोराची फेरी ' जिवाजीपंत ! सावध असा ! ' नाहींतर हिरोनि नेतिल गांठोडीं सारीं !' ज्या तत्त्वांचा हा देह बनला आहे तीं तत्त्वें, इंद्रियें, सारीं काळ ग्रासील आणि शेवटीं उजेड पडेल-फार शेवटीं सावध झालांत-तरी 'गळीं पडेल फांसा'-यमाचे पाश गळ्यांत पडतील आणि मग हें ना तें असें होईल. यासाठीं-

**उठा की जी मायबाप ! कशी लागली झोप।**
**हुजूर जाउनीयां येवढी चुकवा खेप ॥ ध्रु० ॥**
**तुमच्या नगरीची नाहीं नांदणूक बरी।**
**तुमच्या सेजेला हो ! दोन लोभिष्ट नारी।**
**त्यांच्या योगें दुःखें भारी तुमच्या नगरींत सारीं ॥**

दोन लोभिष्ट नारी म्हणजे अहंता व ममता ! सद्‌गुरुचा आश्रय करा व आत्मस्वरूपीं जागे व्हा. एकाजनार्दन ' हुजूरचा चाकर '- जागे करायला आला आहे-' उठा कीं जी मायबाप ! '

( २ ) **पाईकः**— शिपाई, सेवक. पाइकी ह्म० सेवा. पाईकीवर बहुतेक संतांचे अभंग आहेत. नाथांचेही आहेत. देवाचे पाईक म्ह० देवभक्त. ' यांची सत्ता स्वामीवरी ' असे ते बळी असतात !

**हरिचे दास जगीं बळवंत । नाहीं भीत कळिकाळा ॥**

हे स्वामीच्या बळाबर शूर असून संसाराला ( कळिकाळाला ) जिंकतात.

**नेणती कधीं दुजा ठाव । एक भाव स्वामिकाजीं ॥**
**उदार धीर एकमनें । स्वामिकार्या देह देणें ॥**

× × ×

**( १ ) शोभले उदार पाईकपणें देहीं । हेत दुजा नाहीं सेवेवीण ॥**
**स्वामीकाजीं एक न करी आळस । देहासी उदास सर्वभावें ॥**
**एका जनार्दनीं सर्वभावें प्रमाण । स्वामी आधीन केला तिहीं ॥**
**( २ ) नेणती जाणती होती आणि जाती । पाइकीची ज्योती ब्रम्हरूप १**
**म्हणोनि जडलें सेवेलागीं मन । नव्होचि उद्विग्न चित्त कधीं २**
**एकाजनार्दनी प्रेमाचें भांडार । पाइकपणें उदार शोभे जगीं ३**
**( ३ ) धनमानराज्य न धरितां आशा । तरीच स्वामिदशा पावती ते ॥**
**पाईकपण गेलें स्वामी होउनि ठेले । परि नाहीं विसरले सेवेलागीं**
**एका जनार्दनी पाइकीसी ठाव । देहींच तो देव हातीं लागे॥३॥**

---

## १५ जीवसृष्टींतील कांहीं प्राणी.

( १ ) **सर्प**:— ‘ साप चावला साप । अगागागा अबाबाबा अरेरेरे । साप चावला साप ! ’ ‘ स्वरूपमंदिरीं होते मी एकली’– अकस्मात् मायेच्या सांजवेळीं अविद्येच्या बिळांतून लोभमोहाचा दोन पट्टयाचा भुजंग सरकन् बाहेर आला व त्यानें करांगुळीला डंख मारला ! आशालहरींनीं देह तापला, विषयनिंब कडू पण तो गोड झाला व भजनगूळ गोड असून कडू झाला ! दारिद्र्याचा झेंडू आला व असत्यरक्ताच्या गुरुळा आल्या ! कामिनीकामाचें पित्त डोळ्यांत आलें, स्तुतिनिंदेनें दांत काळे झाले,– ‘ सद्‌गुरुगारुडी बोलवा माउली वो ! ’ गुरुगारुड्यानें: —

**बोधवैराग्याचें पाजिलें पाणी । विवेकांजन घातलें नयनीं ।**

अभंगस्वरूपाची विभूति अंगाला लावली, ‘ उतरला सर्प निवारली भ्रांति । एकाजनार्दनीं आलिसे प्रचीती वो ! ’

( २ ) **विंचू**:— ‘ अहं ’ विंचवानें अशीच दुर्दशा केली, त्यावर ‘ ब्रह्माऽहमास्मि ’ हा उतारा मिळाला. **देहबुद्धीचा विंचू व त्यावर आत्मबुद्धीचा उतारा !** ‘ इंगळी ’ फार वाईट. ‘ मनुष्यइंगळी अति दारुण । मज नांगा मारिला तिनं ’ सर्वांगीं वेदना झाल्या. ’ मग:—

**सत्त्व उतारा देऊन । अवघा सारिला तमोगुण ।**
**किंचित् राहिली फुणफुण । शांत केली जनार्दनें ॥**

**( ३ ) वडवाघूळः— ‘ पूर्वी पंक्तीस केला भेद ।**
**नाहीं अंतःकरण शुद्ध । झाले वडवाघूळ ! । ’**

( ४ ) **पांखरूंः**— ओळखा पाहूं हें पांखरूं ! ‘ त्याला मायबाप दोन्ही नाहीं ! ’ हा त्याचा विशेष !

**कृष्ण एक पांखरूं आहे । तें मुखेंविण चारा खाये ।**
**डोळे नाहीं परि तें पाहे । वाचेविण स्वयें गाय रे ॥ १ ॥**
**पर नाहिं पर तें उडे रे । त्याला हिंडतां त्रिभुवन थोडें रे ।**
**त्याचे नखांत आकाश बुडें । तें सन्मुख चहुंकडे रे ॥ २ ॥**

( ५ ) **पोपटः**— पोपट ह्म० पंचभूतांच्या पिंजऱ्यांत अडकलेला जीवात्मा आहे असें यांत रूपक सुंदर साधलें आहे. पिंजऱ्याला ‘ नवद्वारें सोळा सांधे ’ असून ह्याला प्राचीनाची दोरी लावून निजमंदिरीं ठेवला आहे.

**पढो माझ्या आत्मारामा । राधाकृष्णाचें हें ध्यान ।**
**पिंजऱ्यामध्यें गुंतलासी । तुज सोडवील कोण ? ॥ ध्रु० ॥**
**हिरवा तुझा रंग । गुंजवर्ण दोनी डोळे ।**
**चोंच आहे तुझी लाल । बोल तुझा हा मंजूळ ।**
**राघवा तूं माझ्या ! सख्या ! अमोलिक बोल ॥ पढो० ॥ ३ ॥**
**अचळ तूं चंचळ मोठा हिंडे तिन्ही ताळ ।**
**तुला जपला काळ बोका केव्हां घालिल गळ ! ।**
**जरी जासी उडोनीयां पूर्व सुकृताचें फळ ॥ पढो० ॥ ४ ॥**

तारकमंत्र देणारा गुरुच तुला ह्या देहपिंजऱ्यांतून सोडविणारा आहे !

---

## १६ ‘ थट्टा ’ ह्म० विषयासक्ति व ‘ एडका मदन ’

मोठमोठया देवांचीही विषयांनीं कशी फजिती केली हा विचार साधनतेसाठीं सुचविला आहे. येथें ‘ **थट्टा** ’ ह्या शब्दाचा अर्थ ‘ विनोद ’

असा करावयाचा नसून 'विषयासक्ति' असा केला पाहिजे.

**थट्टाः— अशी ही थट्टा । भल्याभल्यांसि लाविला बट्टा ॥ ध्रु० ॥**

**थट्टा दुर्योधनानें केली । पांचाळी सभेमाजि आणिली ।**
**गदाघायें मांडि फोडिली । अशी ही थट्टा ॥ भल्या० ॥ १ ॥**
**विराट राजाचा मेहुणा । नाम तयाचें कीचक जाणा ।**
**त्यानें घेतले बहुतांचे प्राण । बरि नव्हे थट्टा ॥ भल्या० ॥५॥**
**थट्टेपासुनि सुटले चौघेजण । शुक भीष्म आणि हनुमान ।**
**चौथा कार्तिकस्वामी जाण । त्यांला नाहिं थट्टा॥भल्या०॥६॥**
**एकाजनार्दन ह्मणे सर्वांला । थट्टेला भिउनि तुम्ही चाला ।**
**नाहींतरि नेईल नरककुंडाला । भलि नव्हे थट्टा ॥ ७ ॥**

**धोंगडाः—** कृष्णाचा सवंगडी एक वांकडा म्हणून मोठा गमती होता. त्याच्या तोंडांत नाथांनीं एक भारुड घातलें आहे. त्यांत थोर थोर देवांची त्यांच्या स्त्रीलंपटपणाबद्दल फजीती उडविली आहे! वांकडा म्हणतोः— 'धोंगडें माझें बोलणें कान्होबा धोंगडें माझें बोलणें.' यांतील शब्दरचना मोठी ठेकीची आहे. वांकडा कृष्णाला म्हणतो कीं 'शंकरानें मदनाला जाळलें तरी तो त्यालाही 'देहावीण छळतो' च आहे. खुद्द शंकरावर त्यानें आपला अंमल चालवून भिल्लिणीच्या वेषानें हिमाचलावर फिरणाऱ्या पार्वतीच्या मागें त्याला धावायाला लावलें व हाडाचा कुल्लाळ (कुंभार) व चाहाडाचा (नारदाचा) बाप जो ब्रह्मदेव त्याचीहि त्यानें रेवडी उडविली आहे!! मडकीं ह्म० प्राणी, देहवंत जीव.

**जुनाट जोगडा काळाचा काकडा डोंगरीं राहतो भोंडा रे ।**
**झडपिला हांवे नागवाचि धांवे पाठीसि लागला भिलगोंडा रे॥...**
**कुल्लाळ हाडाचा बाप चहाडाचा अखंड घडतो मडकीं रे ।**
**कोणि एके वेळीं पाठीसि लागला भेडसाविति लेक लाडकी रे ॥**

**एडकाः—एडका मदन । तो केवळ पंचानन ॥ ध्रु० ॥**

**थडक मारिली शंकरा । केला ब्रह्म्याचा मातेरा ।**

इंद्रचंद्रासि भेदरा । लाविला ज्यानं ॥ १ ॥
थडक मारिली नारदा । केला रावणाचा चेंदा ।
दुर्योधना मारिली गदा । घेतला प्राण ॥ २ ॥
भस्मासुर मुकला प्राणांसी । तेचि गति झाली वालीसी ।
विश्वामित्रासारिखा ऋषी । नाडिला ज्यानं ॥ ३ ॥
शुकदेवानें ध्यान धरोनी । एडका आणिला आकळोनी ।
एका जनार्दनाचे चरणीं । बांधिला त्यानं ॥ ४ ॥

---

## १७ भूत.

मूळ भागवतांत प्रल्हादाच्या वर्णनांत ' कृष्णग्रहगृहीतात्मा ' म्हणजे कृष्णरूपी महाभूतानें पछाडलेला असें एक पद आलें आहे. त्यावरूनच नाथांना हीं भूतांवर चार पदें रचण्याची स्फूर्ति झाली असावी. शिवाय ' एको विष्णुर्महद्भूतं ' हा चरण प्रसिद्धच आहे. येथें विष्णूला महद्भूत म्हटलें आहे. महद्भूत ह्म० पंचमहाभूतांना खाऊन टाकणारें परब्रह्म !

१

भुत जबर मोठं गडे बाई ।
झाली झडपण करु गत काई ॥ भुत जबर । भुत जबर ॥ ध्रु०
आंत दिसे बाहेर वसे । या भुतानें लाविलें पिसें ॥ भुत० ॥ १ ॥
भुत लागलं ध्रुवबाळाला । उभा अरण्यांत ठेला ॥ भुत० ॥ ६ ॥
भुत बसलं वाळुवंटीं । या पुंडलिकाच्या हो साठीं ॥ भुत० ॥ ७ ॥
एका जनार्दनीं भूत । मागेंपुढें सदोदित ॥ भुत० ॥ ८ ॥

२

तें भुत लागलें रे । तें भुत लागले रे ॥ ध्रु० ॥
भूत राहतें वैकुंठपुरीं तेंचि आहे भीमातिरीं । राहतें संतांचें अंतरीं ॥ तें० ॥ १ ॥
भूत विटेवरी सावळें पाहती जनलोक सकळ । जाला संसार सफळ

**भूत बोधल्याचे संगें । टाळ वाजवीत अंगें । दळूं लागे जनीसंगें ॥ तें० ॥ ३ ॥**

**भूत लागलें बहुतांसी । गोराकुंभार सावत्यासी । जनार्दन एकनाथासीं**

तें भूत वरल्या आळीला दिसतें, दोन्ही डोळे वटारितें, बहुत भेडसावितें, 'आल्यागेल्या गिळूं पहातें, तें मुळाहून शेंड्यावर व शेंड्यावरून मुळावर येरझारा घालतें, 'तें बा अचोज चोजवेना । जवळी आहे परी दिसेना । तें झोंबिन्नले कळेना । झाडितां परी झडेना !'

नाथांच्या अनुकरणानें पुढें समर्थांनीं 'तेंचि भूत गे माय' हें पद केलें असून 'पंढरीचें भूत मोठें । आल्यागेल्या झडपी वाटे' 'भूत नावरे कोणासी । पुंडलिकें खिळिलें त्यासी' इ० तुकोबांचेही अभंग आहेत !



## १८ मोतीं.

**धुतांच मोतीं जळीं हरपलें सखोल मोठें पाणी ।**
**चला जाऊं पाहूं चार सहा अठराजणी ॥ ध्रु० ॥**
**प्रपंच धोंडा मृगजळ पाणी आपाटित होते चोळी ।**
**विसरलें सुख घसरलें तळीं ॥**
**सखे ! मायेनें मोतिं दडिवलें भवासिंधूच्या जळीं ।**
**होती एक गडे भ्रांतिबहिण जवळी ॥**
**तिणेंच मजला गोष्टी गोवुनि चित्त नेलें हिरोनी ॥ चला० ॥ १ ॥**
**आठ जणींनीं मोतिं दडविलें वर ठेविला धोंडा ।**
**पहा या अशाच अवघ्या रांडा ॥**
**बारा सोळा तळीं उतरिल्या त्यांनीं धरिला दांडा ।**
**ठाऊक सत्राविला झेंडा ॥**
**त्यामध्यें मी गर्क जाहलें एकलिच बाई वनीं ॥ चला० ॥ २ ॥**
**चौघीजणी सत्वर मिळोनि डोळीं अंजन घाला ।**
**माझ्या मोत्याला प्रेमें न्याहाळा ॥**
**ज्ञानबोधाची लाउनि दिवटी बरवी वात ऊजळा ।**

**माझ्या मोत्याला सर्व कळा ॥**
**प्रपंच पडदा फाडुनि गुरूपदिं लावा ग ठिकाणीं ॥ चला० ॥ ३**
**चौघीजणी मोक्षनायिका मजला धरा हातीं ।**
**उतरा सागर पैलपंथीं ॥**
**या मोत्याच्या साठीं मजला जाणें आहे सती ।**
**म्हणुनि मी येत्ये काकूळती ॥**
**एका जनार्दनिं चिन्मय मोतीं न मिळे गुरुवांचुनी ॥ चला०॥ ४**

---

हें आत्मारामावर मोत्याचें अत्यंत सुंदर रूपक केलें आहे. 'चार सहा अठरा' ह्म० चार वेद, सहा शास्त्रें व अठरा पुराणें यांच्या साह्यानें आत्मस्वरूपाचा शोध घेऊं या. मी मायानदीच्या काठीं प्रपंचाच्या धोंडयावर देहबुद्धीची चोळी आपटीत असतांना मोतीं निसटलें ह्म० स्वरूप विसरलें. भ्रांतिबहिणीनें प्रपंचाच्या गोष्टींच्या नादीं लावलें व चित्त भ्रमांत पाडलें. बारा सूर्यकळा व सोळा चंद्रकला. आठजणी ह्म० 'भूमिरापोऽनलो वायुः' इ० अष्टधा प्रकृति अथवा अष्ट मदः–कुल, शील, धन, यौवन, रूप, विद्या, तप, राज्य हे आठ प्रकारचे मदः चौघीजणी ह्म० जागृति, स्वप्न, सुषुप्ती व तुर्या या चार अवस्था. सत्रावी अमृतकला, ब्रह्मस्थानचें अमृतसरोवर, याला योगशास्त्रांत अकुल म्हणतातः 'चंद्रसूर्या बुझावणी । करूनि अनाहताची सुडावणी । सतरावियेचें पाणी । जिंकिलें वेगीं' (ज्ञाने० १२–५४) ह्म० इडा व पिंगला या नाड्यांचें ऐक्य करून व (सोहंहंसः)' या अनुहतध्वनीचा गजर करून जीवनकलेच्या सरोवरापर्यंत योगी पोंचतात. सती जाणें ह्म० स्वस्वरूपीं लीन होणें, जीवभाव हरवणें. 'एकाजनार्दनी' ह्या ऐवजीं 'ज्ञानदेव म्हणे' असाही पाठ कोठें कोठें सांपडतो. मला हें पद नाथांचें निभ्रांत वाटतें.

## १९ सासुरवास व संसार.

**सासुरवासः**– 'विषयांचें सासुर' मला आतां नको; त्याचा जाच नको.
**अविवेक अबुला अहंकार सासरा । अविद्येच्या घरामाजीं नेले २**
**कल्पना हे सासु सदा सासुरवास । घेऊं नेदी उमसु आठवण ३**
कामक्रोध हे दीरभावे, ममता वहिनी व चिंता नंदुली, सदा ओटीवर बसलेले म्हातारे सासरे मोह आणि दंभ–किती पण मी यांच्या जाचांत सांपडलें आहे म्हणून सांगूं ? कामाहातीं मला उसंत नाहीं. माहेरचे माझे भाऊ ( भाव इ० ) व बहिणी ( शांति दया इ० ) मला भेटायला आल्या तर त्यांना हे नकोनकोसे करून पिटून लावतात !:—
**भोळा माझा भावो त्यासी नाहीं ठावो । त्यापाठीं संदेहोश्वान लागे ॥**
**त्याभेणें पळाला मागुता नाहीं आला । देशधाडी झाला भावो माझा**
**सखी माझी भक्ती भावासवें जाती । कोणां काकुळतीं येवूं माये १४**
**आर्तीचे निढळीं ठेउनी बाहुली । पाहते वाटुली माहेराची ॥१५॥**
**एकाजनार्दनीं सासुराचि केलें । तेंचि माहेर झालें गुरुकृपें ॥ २३ ॥**
काय चमत्कार झाला पहा ! संत भेटले, माझे गुरुही भेटले व त्यांच्या कृपेनें कोठें न जातां न येतां बसल्याजागीं सासर होतें तेंच माहेर झालें !
**संसारः– सांगते तुह्मां वेगळे निघा । वेगळे निघून संस्कार बघा ॥१॥**
**संसार करितां शिणले भारी । सासूसासरा घातला भरी ॥ २ ॥**
ह्या पद्यांत 'वेगळे निघून संसार बघा' हा मर्माचा चरण आहे. संसाराशी एकजीव झाल्यामुळें सुखदुःखादि द्वंद्वांचे धक्के सोसावे लागतात, म्हणून गुडगुड्या नारळासारखे संसारापासून आपलें वेगळेपण–असंगत्व ओळखा व साक्षित्वानें संसार पहा व करा. कर्तेभोक्तेपण सोडा.

---

## २० भोळी आणि दादला.

मराठी कवितेंत हास्य, विनोद व विडंबन हे प्रकार कमी नाहींत ! संतकवि हे जगापासून फाटून गिरिकंदरीं वास करणारे असे एकल-

कोडे नाहींत. संसारांत राहून संसाराचे धकेचपेटे सोसून संसार ब्रह्मरूप भावणारे व दुःखशोकांतून सर्व सामान्य जीवांना उद्धरून नेणारे खरे खरे लोकनायक होते. त्यांच्या काव्यांत शांतिरस किंवा भक्तिरस हा प्रधान रस असला तरी इतर नवरसांनाही त्यांनीं प्रसंगविशेषीं हाताशीं धरिलें आहे! नाथ व तुकोबा यांच्या सारख्यांच्या कवितेंत हास्यविनोदविडंबनादिकांना वस्तुतः वाव मिळाला नसेल अशी विद्वानांची समजूत आहे, पण त्यांच्या काव्यांत या विशिष्ट प्रकारांचाही आदर केलेला आहे! दुष्ट दुराचारी दुर्बल व दांभिक लोकांचे विडंबन त्यांनीं पुष्कळच केलें आहे! पण तो भाग असो! कामक्रोधादि विकारांनीं देवादिकांनाही कसे सतावून सोडले आहे व संसार सोडायचा म्हणतां म्हणतां जीवाचे तो कसे धिंडवडे करितो हें त्यांनीं ओजस्वी वाणीनें वर्णिलें आहे. नाथांच्या भारुडांत व तुकोबांच्या स्फुट अभंगांतून याची उदाहरणें हवीं तेवढीं देतां येतील. भारुडांतील ढोर, जोशी, रोडगा, थट्टा, एडकामदन इ० विषयांवरील त्यांचीं भारुडें पद्यें पहावींत. पुढील गमतीचीं दोन भारुडें पहाः—

१ भोळीः— **बाइ मी भोळी ग बाइ मी भोळी।**
**आठा दिसां खाते मी पुरणाचि पोळी ॥ बाई ॥ ध्रु० ॥**
**शिंपीभर लोणी गाडगाभर पाणी। दिवाळि दसरा दादला न्हाणी ॥ १**
**गाडगाभर लोणी सहा हांडे पाणी। शनिवारिंबुधवारिं आपण न्हाणी २**
**मला जेवाया पुरणाचि पोळी। नवा खणाचि एकचि चोळी ॥ ३ ॥**
**आठा दिसांनीं बाजारा जाते। पन्नास केळीं मोजुन खाते ॥ ४ ॥**
**मला जेवाया साखरपुरी। दादल्या वाढी आंबीलपोळी ॥ ५ ॥**
**एकाजनार्दनि भावाचि भोळा। कृष्णचरणीं लागला डोळा ॥ ६ ॥**

२ **दादलाः**—दरिद्री नवऱ्याबरोबर संसार करणें छानछुकीच्या पोरीला कसें आवडेल? दादला म्ह० प्रपंच!

**मला दादला न लगे बाई ॥ ध्रु० ॥**

**मोडकेसें घर तुटकेसें छप्पर। देवाला देवघर नाहीं ॥ मला० ॥ १ ॥**

**फाटकेसें लुगडें तुटकीशी चोळी । शिवाया दोरा नाहीं ॥ मला०॥२॥**
**जोंधळयाची भाकर आंबाड्याची भाजी। वर तेलाची धार नाहीं ॥३॥**
**मोडका पलंग तुटकी नवार । नरम बिछाना नाहीं ॥ मला० ॥ ४ ॥**
**सुरतीचें मोतीं गुळधांव सोनें। राज्यांत लेणें नाहीं ॥ मला० ॥ ५ ॥**

अलीकडे बी. ए. एम्. ए. झालेल्या मुलींना आय्. सी. एस्. डि. जज्ज, डि. डेप्युटी कलेक्टर; असा श्रीमान्, खोऱ्यानें पैसे ओढणारा, मोटार व नौकर बाळगणारा नवरा पाहिजे असतो! साधा बी. ए. एम्. ए. असला तरी 'मला दादला नलगे बाई' असेंच त्यांचें उत्तर असतें! कां कीं त्याच्याशीं संसार करूं गेल्यास हें आहे तें नाहीं असा कुंथायचा प्रसंग रोज यायचा! आतांच्या फक्कड मुली 'देवाला देवघर नाहीं' अशी तक्रार मात्र करायच्या नाहींत. त्याना देवही नको, देवघर नको!

**एका जनार्दनिं समरस झालें । तें सुख येथें नाहीं ॥ मला० ॥ ६ ॥**

गुरुशिष्यांची समरसता होतें त्यांत जें ब्रह्मसुख आहे तें सुख अशा ठिकाणीं नसतें, मात्र पतिपत्नींत जर चित्तांची मिळणी व प्रेमसुख असेल तर ती दारिद्यांतही 'मला दादला हवाग बाई' असेंच ह्मणेल?

---

## २१ ढालगज, शंखीणडंखीण, सारी.

१ **ढालगजः**—'अजि म्यां नवल देखिलें बाई'—कोणतें तें नवल? 'आधी नव्हतें कोठें कांहीं। तेथें व्याली माझी आई!' माझी आई ह्म० आदिमाया—'तिथें एक ढालगज निर्माण झाली । ती सकळ भूतांतें प्रसवली । ब्रह्मादिकां ते माउली । तिनें एवढी ख्याती केली' पण एवढें सृष्टिरचनेचे अचाट श्रम करून—'ते न पडे भ्रताराच्या दृष्टी'—ती फार लाजाळु असल्यामुळें भ्रताराच्या समोरे येत नाहीं—परब्रह्माची तिची दृष्टभेटही झाली नाहीं!

नाथ म्हणतात 'ह्या जीवींच्या गुजगोष्टी मी कोणाला सांगूं?'

**२ शंखीणडंखीणः—**

**हाट करूनी घरासि आणली बसली वसरिच्या काठीं रे ।**
**घरची बाइल बाहेर निघाली वसववून लागे पाठी रे ॥ १ ॥**
**शंखिण बाबा डंखिण रे । त्या घरिं शंखिण बाबा डंखिण रे ॥ध्रु०॥**
**आठ भाकरी बारा पोळ्या धिरडीं खादलीं सोळा रे ।**
**पाणी पिऊन ढेकर दिधला मराठि तिचा मोळा रे ॥ ३ ॥**
**बारा सोळा लुगडिं नेसलीं येइना पाठींपोटीं रे ।**
**नवाखणांची चोळी शिवली उरासि येइना गांठी रे ॥ ४ ॥**
**एका जनार्दनि ह्मणे बाबा ऐसी बाइल केली रे ।**
**तिच्या भयानें प्रजाच सारी पळुनियां दुर गेली रे ॥ ५ ॥**

**३ सौरीः—** सौरी ह्म० वेश्या, बाजारबसवी वाईट स्त्री. वाईट गतीनें सामान्य स्त्रियाही वाईट मार्गाला जातात, व एकदां चुकून ाउल पडलें कीं त्या तोच हीन धंदा पतकरून त्यांत सराईत होतात! एक ौरी म्हणतेः 'मी सुखाची कन्यका झाले वाढविली घरीं। देखतां ़खतां उचलून नेली चोरीं ॥ सौरी झाले बाई आतां करूं तरी काई?' ा सुधारलेल्या कायद्याच्या मनूंतही पंजाबबंगालकडे प्रत्यहीं असले ाकार होत आहेत! मग तो मुसलमानी सत्तेचा काळ तर काय सांगावा?

**वेणी फणी काजळ कुंकू केला टामकटिका ।**
**बांधुनि बुचडा उघडा माथां विभूतीचा पट्टा ॥**
**आला गेला म्हटला नाहीं धरल्या चारी बाटा ।**
**जातीभ्रष्ट झाली सौरी हिंडे दारोदारीं ॥**

---

## २२ जोहार! मायबाप! जोहार!

नाथांचे जोहार सुमारे ५० आहेत, त्यांत १० महारणीचे व बाकींचे ाहाराचे आहेत. जोहार (जयहर) हा जयवाचक शब्द आहे व महारलोक ापल्याहून वरिष्ठ अशा सर्व जातींस लवून मुजरा करितांना त्याचा उच्चार

करितात. हे जोहार मोठे बोधप्रद आहेत. ‘ जोहार मायबाप जोहार ’ असा बहुतेक जोहारांचा प्रारंभ आहे. महाराची भूमिका सहजच विनयाची, प्रार्थनेची, काकुळतीची व निरहंकाराची असते, तशी नाथांनीं या जोहारांत ठेविली आहे. ह्या जोहारांत नाथ कोठें ‘ निर्गुणपुरीचा महार ’ होऊन येतात; कोठें ‘ विठू पाटलाचा महार ’ होतात; कोठें ‘ रामजी पाटलाच्या दरबारचा ’ महार बनून निरोप सांगतात; कोठें ‘ मी संतांचा महार ’ असून ‘ संतसभेचा कारभार मीच पाहत असतो ’ म्हणून सांगतात; कोठें आपलें नांव ‘ आत्मनाक महार ’ आहे असें ह्मणतात; कोठें कोठें ‘ एकनाथ महार ’ ‘ विठनाक महार ’ ‘ जनार्दनाचा महार ’ अशीं हीं आपलीं नांवें सांगतात; एकदा मी ‘ दामाजीचा लेकवळा महार माझें नांव विठू साचार ’ असेंही त्यांनीं ह्मटलें आहे. चार दोन ठिकाणीं मी ‘ कसबे कायापूरचा महार ’ असून साऱ्या गांवचा कारभार पाहणारा मी वेसकर आहे ’ असेंही म्हटलें आहे. मी देवाचा निरोपी आहे, माझें पोट भरलें असून इतर लोक भुकेनें व्याकूळ झालेले मला पहावत नाहींत म्हणून त्यांना परमान्नाचें भोजन घालून मी तृप्त करीत आहे, मी गुरुकृपेनें कृतकार्य झालों असून मोक्षाचें द्वार साऱ्या लोकांना उघडून देत आहे अशा अधिकाराच्या वाणीनें नाथांनीं हे जोहार केले आहेत. आत्मसामर्थ्याच्या बळावर लोकांना धीर देऊन त्यांनीं सांगितलें आहेः—

**मी नफर ( सेवक ) आहे गाढा । तोडीन यमाच्या दाढा ।**
**उघडिन वैकुंठीच्या पेठा । नाम कडाडा गर्जेन कीं जी मायबाप ॥**
**मी नफर नोहे खोटा । विघ्नें लाविन बारा वाटा ।**
**नित्य मुक्तीच्या चोहटां । राहतों कीं जी मायबाप ॥ जोहार० ॥**

* * * *

**एका जनार्दन कुळवाडि मोठा । त्याणें बाकीस मारिला फांटा ।**
**अखंड कैलासीचा दारवंटा । मोकळा केला कीं जी मायबाप ॥**

अखंड कैलासीं राहणें । गुरुजनार्दनाचें देणें ।
सुखसमाधिमध्येंचि असणें । एका कीं जी मायबाप ॥जोहार०॥

## जोहार.

कसबे कायापूर लांबी साडेतीन गांव
तिनशे साठ पेठा तेथें नांदति उमराव ।
चौदा चौक दहा रस्ते वसाविले अपूर्व ।
दिली धन्यानें सनद जिवाजीपंताच्या नांवे ॥ १ ॥
जोहार माय बाप जोहार महार मी कायापूरींचा ।
जन्मोजन्मीं वेसराख्या आहे या गांवीचा ॥ जोहार० ॥ ध्रु०॥
शिवाजीपंतानें जिवाजी ठविला दिवाण ।
साही षड्विकार त्यासी मिळालें मन ।
आपआपणापरी माधिंच ते घेती भोंदून
तुह्मी सर्व ऐका तुह्मांसी सांगतों खूण ॥ जो० ॥ २ ॥
कामाजी कोतवाल त्याणें नाडिले बहुतांसी
हरीहरांची अब्रू घेतो भय नाहीं त्यासी ।
क्रोधाजी फौजदार तेही मिळाले त्यासी
जमदग्नी दुर्वास नाडिले महामहा ऋषी ॥ जो० ॥ ३ ॥
लोभाजी चौधरी याला पैक्याचि फार हांव
अहंकार पाटिल त्यासी कापतो सर्वगांव ।
दंभाजी शेटे सर्वदा करिति धांवाधांव
दया नाहीं रयतेवर केला उजाडचि गांव ॥ जो० ॥ ४ ॥
शिवाजीपंतास हिशेब द्या अवघा झाडा
नाहिंतर याचे पायीं टाका अनुहात खोडा ।
तरिच मायबाप गांव तुमचा चालेल बरा
एका जनार्दनि पाय गुरूचें बळकट धरा ॥ जो० ५ ॥

कसबे कायापूर हा गांव साडेतीन हात लांबीचा आहे. शिवाजीपंत ह्म० परमेश्वर हा याचा मालक आहे. त्यानें जिवाजीपंताला हा गांव सनद

लिहून देऊन कांहीं काळ वहिवाटीला दिला आहे ! हा गांव साडेतीन हात लांबीचा आहे. याला चौदा चौक, दहा रस्ते व तीनशेसाठ पेठा आहेत. हें सारें रूपक वाग्भटाचें शरीरस्थान हें प्रकरण पाहिलें असतां चांगलें उलगडतें. मनुष्याची लांबी ह्म० उंची ३॥ हात असते हें प्रसिद्ध आहे. वाग्भटानें म्हटलें आहेः ' स्वंस्वं हस्तयत्रं सार्धं वपुःपात्रं सुखायुषोः ' ह्म० स्वतःच्या हातानें ज्याची साडेतीन हात उंची असते त्या मनुष्याचें शरीर आरोग्य व आयुष्य यांस पात्र होतें ( शरीरस्थान अ० ३–१०६) ह्या कायापुरीला ३६० पेठा आहेत म्हणजे ३६० हाडे आहेतः ' अस्नां शतानि षष्ठिश्च त्रीणि दंतनखैःसह ' ( अ० ३–१६ ) ह्म० दांत व नखें यांसह ३६० हाडें देहांत आहेत. ह्या देहनगरींत चौदा चौक व दहा रस्ते आहेत. दहा रस्ते ह्म० दशेंद्रियें. चौदा चौक कोणते आहेत तें ' चतुर्दशास्थिसंघाताः '( अ० ३–१५ ) ह्म० अस्थिसंघांत किंवा अस्थींचे सांधे चौदा आहेतः–मनगटें दोन, खांदे दोन, कोपरें दोन, गुल्फ ह्म० घोटे दोन, गुडघे दोन, खुबे दोन, मिळून बारा. शिवाय त्रिकसंधि ह्म० कंबर व डोकें मिळून दोन–एकूण संधि चौदा. ह्या चौदा अस्थिसंधींना चौदा चौक म्हटलें आहे. नाथांना वैद्यक अवगत होतें असें म्हणण्यापेक्षां त्यांना अवगत काय नव्हतें हें विचारणेंच अधिक सोयीचें होईल ! असो. ह्या कायापुरीमध्यें शिवाजीपंत यांनीं जिवाजीपंतास आपले दिवाण नेमून पाठविलें व शहराची व्यवस्था नीट ठेवण्यास सांगून शेवटीं मला जमाखर्चाचा हिशेब देऊन झाडाबाकी पूज्य करा असें बजावलें आहे ! येथें कामक्रोधादि षड्विकारांनीं मनाजीरावांच्या साह्यानें फारच पुंडाई माजविली आहे ! हे सारे मातवर गडी ! जिवाजीपंत यांचेपुढें नरमाईस आले. कामाजी कोतवाल महापुंड–हरिहरांची सुद्धां प्रसंगीं अब्रू घेणारा हा बेडर ! क्रोधाजी फौजदारांचें व त्यांचें फार मेतकूट ! त्यानेंही जमदग्नीदुर्वासासारख्या मोठमोठ्या तपस्यांसही नाडलें आहे ! लोभाजी चौधरी, दंभाजी शेटे, अहंकार पाटील, सारे एकापेक्षां एक बलिष्ठ ! रयतेवर दयामाया बिलकूल

न दाखवितां यांनीं सारा गांव उजाड केला ! अहो जिवाजीराव ! तुमचे धनी शिवाजीपंत यांना हिशेब दाखवून झाडाबाकी पूज्य करून दाखवा, नाहीं-तर अनुहाताचा खोडा पायांत पडून फुकट कैद व्हाल व पुन्हां गर्भ-वासाच्या बंदिखान्यांत पडावें लागेल ! अनाहतचक्र हें हृदयस्थानीं असतें.

## २ जोहार.

**घ्या जोहार घ्या जोहार । मी निराकारचा महार ।**
**संतसभेचा कारभार । मीच करितों कीं जी मायबाप ॥ १ ॥**
**मी धन्याचा आवडता फार । धन्याचा विश्वास मजवर ।**
**धन्याचे चाकरीवर । रुजु मी कीं जी मायबाप ॥ २ ॥**
**चारी वेदां झाडितों । सहा शास्त्रांचा केर भरितों ।**
**पुराणें सारीं जमा करितों । संतपेठे आणतो कीं जी मायबाप॥३॥**
**ऐशी कांहीं करितां खटपट । संतसभेची सांपडेल वाट ।**
**तेणें मार्ग नीट । सांपडेल कीं जी मायबाप ॥ ४ ॥**
**मार्ग धरा पंढरीचा । एका विनवी जनार्दनाचा ।**
**रामनाम बोला वाचा । सावध होऊन कीं जी माय बाप ॥ ५ ॥**

'अस्पृश्यांचें' खरें खरें कल्याण कल्याण करून त्यांना आत्महिताचा मार्ग दाखविणारा ( ब्राह्मणांना व स्पृश्यांना शिव्या देऊन बंडखोरी करा-यला शिकविणारा नव्हे !) जर कोणी पुण्य पुरुष झाला असेल तर ते नाथच!

पुढील संवाद बोधप्रद आहेः—

**'कांरे महारा बदमस्ता !' । 'कांहो बामनबावा ! भलतेंच बोलतां !' १**
**'तुझे बापाचें भय काय ?' । 'मायबाप तुमचे आमचे हाय' ॥ २ ॥**
**'ऐक ! ऐसें बोलूं नको' । 'निर्गुणापासून अवघे झालों' ॥ ३ ॥**
**'निर्गुण तुला काय ठावें' । 'आत्मस्वरूपीं शोधून पहावें' ॥ ४ ॥**
**'आत्मस्वरूप आह्मां कळेना' । 'नाहीं तरी संतांसी शरण जाना' ॥५॥**
**'संतां शरण गेल्यानें काय होतें ?' । 'चौऱ्यायशीचा फेरा चुकतो' ॥६॥**
**'हें ज्ञान तुला कोणापासून झालें ? । एकाजनार्दनकृपें कळों आलें ॥७॥**

# १४ कविवर्य मुक्तेश्वर

## १ कुलवृत्त.

नाथांना गोदा व गंगा या नावाच्या दोन मुली व हरि नांवाचा एक मुलगा अशीं तीन अपत्यें होतीं. हरिशास्त्री हा विद्वान् कर्मठ होता पण नाथांच्या संगतीनें पुढें भागवधर्मांत प्रविष्ट झाला. मुलींपैकीं गोदा वडील व गंगा धाकटी. मौज अशी कीं गोदावरीचें सासरचें नांव गंगाबाई, व गंगाचें सासरचें नांव गोदावरी असें होतें ! मोठी मुलगी गोदा हिचें पाळण्यांतलें नांव गोदा, सासरचें नांव गंगा व नाथांनीं आवडीनें ठेवलेलें नांव लीला ! पैठणास मुद्गलांचें घराणें होतें, त्यातील चिंतामणिशास्त्री यांस लीला दिली होती. यांचें गोत्र अत्रि. लीलेच्या पतीला ह्म० चिंतामणीला नाथ विश्वंभर म्हणत. 'लीला कोणाची ? विश्वंभराची !' सत्पुरुष मोठे विनोदी व सदहृय असतात. या लीलाविश्वंभरांचा पुत्र प्रसिद्ध कवि मुक्तेश्वर होय. 'मातृजनक जनार्दनी । एकनाथ नमियेला' असें मुक्तेश्वरानें आपल्या भारताच्या उपोद्घातांत म्हटलें आहे. याचें उपनाव मुद्गल, गोत्र अत्रि, वसतिस्थान पैठण, समाधि नरसोबाच्या वाडीजवळ तेरवाड येथें. पैठणास नाथांच्या वाडयाशेजारीं चिंतामणीशास्त्री यांची समाधि आहे व पैठणकर अद्याप तिला नाथांच्या जांवयाची समाधि म्हणूनच ओळखतात. मुक्तेश्वरानें आदिपर्वाच्या उपसंहारांत आपणांस चिंतामणिभूदेवकुमर असें म्हटलें असून गुरु विश्वंभराच्या आरतींत शेवटच्या चरणांत 'शरण मी तुज आतां । पायीं ठेवियेला माथा । संतोषें सुत रक्षी । गुरु विश्वंभरनाथा' असें वरदान मागितलें आहे, यावरून चिंतामणि तेच विश्वंभर व तेच मुक्तेश्वराचे बाप व गुरु होते हें अगदीं सिद्ध झालें. मुक्तेश्वर आपल्या संक्षेपरामायणांत म्हणतो:—

**सुचिरसहजवासें गौतमीच्या तटाकीं**
**अतुट भजनपंथें पंथ टाकीत टाकी ।**
**द्विजवर कविनामा मुद्गलू अत्रिगोत्री**
**विमळवचनमुक्तें लेववी संतश्रोत्रीं ॥ ७—४७० ॥**

'आमुची देशभाषा मराठी । वास्तव्य प्रतिष्ठान गोदातटीं 'असें त्यानें युद्धकांडांतही म्हटलें आहे. मुक्तेश्वर कोठें 'विश्वंभर' कोठें 'लीलाविश्वंभर' या नांवानें आपल्या गुरुला वंदन करितो.

सभापर्वाच्या उपसंहारांत मुक्तेश्वर म्हणतोः—

**गोदावरीतटनिवासी । अत्रिगोत्री पवित्र वंशीं ।**
**चिंतामणि गुणैकराशी—। पासाव जन्म जयाचा ॥ २ ॥**
**तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात ।**
**व्यासभारतींचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥ ३ ॥**

मुक्तेश्वराची गुरुपरंपरा दत्त—जनार्दन एकनाथ—चिंतामणि उर्फ लीलाविश्वंभर—मुक्तेश्वर अशी आहे. कोल्हापूरची महालक्ष्मी व सुवर्णपुरीचा (बार्शीजवळची सोनारी,) भैरवनाथ ह्या त्याच्या कुळदेवता होत. आदिपर्वाच्या उपसंहारांत तो म्हणतोः—

**प्रसिद्ध महाराष्ट्रदेशीं । गोदावरीतटनिवासी ।**
**अत्रिगोत्र पवित्रवंशीं । जन्म जाहला जयातें ॥ ६ ॥**
**करवीरलक्ष्मी विष्णुभाजा । भैरव सुवर्णपुरींचा राजा ।**
**उभय कुळदैवतीं माजा । मस्तक पायीं स्पर्शिला ॥ ८ ॥**
**तेणें बळें परमसुखी । श्लाघ्यता पावलों उभयलोकीं ।**
**सद्गुरुकृपा—मातृअंकीं । योग्य झालों बैसावया ॥ ९ ॥**

लीलाविश्वंभरपदानें दत्ताचा, गुरूचा व आईबापांचा उल्लेख होतो.

**श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर । विनवी कवी मुक्तेश्वर ॥ आदि० अ० ११ ॥**
**चिन्मूर्ति लीलाविश्वंभरू । दत्तात्रेय जगद्गुरु ॥ आदि० अ० ३३ ॥**

'लीलाविश्वंभर' हें पद दासोपंतांच्या पदांत श्रीदत्ताला लावलेलें वारंवार आढळतें. मला पवित्रवंशीं जन्म मिळाला, मी भगवत्प्रसादानें

उभयलोकीं श्लाध्यता पावलों, असें स्वतःविषयींचे धन्योद्गार कवीनें अनेकवार काढले आहेत. त्याला जन्मभर पवित्र काव्यव्यासंगही मिळाला.

**पवित्रकथानिरूपण । परिसती पवित्रांचें श्रवण ।**
**पवित्र मुक्तेश्वराचें वदन । विश्वंभरगुरुनामें ॥ (सभा० १४-१७१)**

मुक्तेश्वराचे वंशज कुरुंदवाडाजवळ तेरवाड येथील इनामदार आहेत. तेथें मुक्तेश्वराचें वृंदावन असून दत्तमूर्तीची स्थापना केलेली आहे. मुक्तेश्वरापासून चौथ्या पुरुषानें वरील इनाम मिळविलें आहे. कोल्हापूरच्या शंभू छत्रपतीनें इ. स. १६५० मध्ये दिलेल्या सनदेंत पुढील वाक्यें आहेत. "राजश्री मुक्तेश्वर गोसावी बिन आकाण्णा गोसावी, गोत्र अत्रि, वास्तव्य मौजे कुरुंदवाड—आपले पणजे राजश्री थोरले मुक्तेश्वर गोसावी हे श्रीएकनाथस्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र यांचें वृंदावन मौजे तेरवाड येथें आहे."

---

## २ मुक्तेश्वराचें शिक्षण

मुक्तेश्वराचें शिक्षण नाथांच्या तालमींतच झालें. काव्यादर्शकार दंडी यानें म्हटल्याप्रमाणें नैसर्गिक प्रतिभा, निर्मल श्रुत (ज्ञान) व आनंदाभियोग या गुणांच्या समुच्चयामुळें त्याच्या ठिकाणीं काव्यशक्तीचा प्रादुर्भाव झाला. उपासनाबळानें त्याच्या प्रतिभेला शुचित्व प्राप्त झालें. विद्वत्व आणि कवित्व यांचें वांकडें आहे अशी कोणाकोणाची समजूत असते, पण ती योग्य नाहीं. मुक्तेश्वराची बुद्धि सूक्ष्म, प्रतिभा उज्ज्वल, व रसिकता ईश्वरदत्त असल्यामुळें आणि त्यांतच काव्यादि ललितवाङ्मयाच्या व वेदांतादि गहनवाङ्मयाच्या अध्ययनाची व त्याकाळीं सार्वत्रिक असलेल्या प्रवासप्राप्त व्यवहारज्ञानाची भर पडल्यामुळें त्याच्या उपजत कवित्वशक्तींत महाकाव्योचित गुणांचा पूर्ण विकास झाला व त्याचें सुंदर फळ महाराष्ट्रवाङ्मयास मिळालें.

रामायणाच्या उपोद्घातांत मुक्तेश्वर म्हणतोः—

**श्रीमद्रामपदांबुजे हृदि सदा ध्यातुर्भवाब्धेर्भिया**
**मुक्तेशस्य विराजते सुरुचिरा वाणी गुणग्राहिणी ।**
**नानानाटकभावपद्यरचना संदोहसांद्रीकृता**
**सुश्राव्या सुजनैर्मनोहरतरा संसारदुःखापहा ॥**

"संसारभयानें श्रीरामचरणांचें ध्यान करणाऱ्या मुक्तेश्वराची वाणी सुरुचिरा आहे, गुणग्राहिणी आहे, काव्यनाटकादि पद्यरचनेच्या प्रेमामुळें ती आर्द्रता व म्हणून मनोहरता पावली असून सज्जनांना सुश्राव्य आहे; ती ज्यांच्या कानांवर पडेल त्यांच्या संसारदुःखांचें हरण होईल." आपल्या भारताच्या मंगलाचरणांत त्यानें 'नेटका वेदांती' व्यास, जैमिनीवसिष्ठादि मीमांसक, नैय्यायिक गौतम यांस 'सद्भावें दंडप्रणाम' केला आहे; सांख्याचार्य कपिलमुनि, शेषावतार पतंजलि यांना वंदन केलें आहे; शंकराचार्य व त्यांचे गुरु गौडपादाचार्य तसेच 'टीकाकारांमाजी चतुर' असे श्रीधर यांना 'गुरुरूपें नमस्कारिलें' आहे. प्रसंगानें त्यानें नैय्यायिक, मीमांसक, वैशेषिक, चार्वाक, सांख्य व वेदांती यांच्या मतांचें निदर्शनही केलें आहे. काव्यनाटकादि ललितवाङ्मयाच्या अभ्यासानें वाणीला मार्दव येतें व रसिकतेचें उद्दीपन होतें; वेदशास्त्राध्ययनानें भाषेला आणि विचारांला प्रौढी व गांभीर्य प्राप्त होतात; देशाटन केल्यानें बुद्धींतला एकलकोंडेपणा जाऊन विविध प्रकृतींच्या लोकांशीं संघट्टण झाल्यामुळें व्यवहारचातुर्य उत्पन्न होतें आणि सत्सहवासापासून दयाक्षमाशांत्यादि सत्वगुण अंगीं जडून धर्मनीतींचीं रहस्यें उलगडतात व भगवंतीं अपार प्रेम जडतें. मुक्तेश्वराचें शिक्षण या चारी अंगांनीं पूर्ण झाल्यामुळें त्याच्या परिपाकाचा संस्कार त्याच्या वाणीवर उत्कृष्ट झालेला आहे.

**प्राकृतकवीश्वराचार्य । ज्ञानदेव ज्ञानैकवर्य ।**
**जयाचे बुद्धीचें गांभीर्य । अगाधसिंधूसारिखें ॥ ७६ ॥**
**त्याचे चरण चिंतिले मनीं । तेणें पावन जालों जनीं ।**
**मातृजनक जनार्दनी-। एकनाथ नामियेला॥७७॥ (आदि०१)**

———

## ३ नाथ व मुक्तेश्वर

मराठी संतकवींपैकीं मुक्तेश्वरानें ज्ञानेश्वर व एकनाथ याशिवाय कोणाचाही नामोल्लेख केला नाहीं. ‘सकळ सिद्धगणांमाजी तूं श्रेष्ठ’ असें ज्ञानोबांचें आरतींत वर्णन करून ‘मुक्तेश्वरीं न धरे प्रेमाचा लोट’ याप्रमाणें आपल्या ज्ञानेश्वरभक्तीची त्यानें उत्कटता व्यक्त केली आहे. मुक्तेश्वरानें एकनाथांवर २।३ आरत्या केल्या असून ९४ ओव्यांत त्यानें त्यांचें चरित्रही गाइलें आहे. चरित्रांत मुख्यतः ‘श्रीखंड्याख्यान’ वर्णिलें आहे. त्याचें ‘भजा हो भजा माझ्या एकनाथासी’ हें पद बारकाईनें पाहतां नाथांच्या चरित्रांतल्या ठळक गोष्टी डोळयांसमोर घडत असल्याप्रमाणें मुक्तेश्वर येथें गात आहे असें वाटतें. समर्थ व शिवाजी यांच्या संघट्टणाच्या काळापूर्वीं मुक्तेश्वरी भारत झालें असावें असें वाटतें. मुक्तेश्वरी भारताचा रचनाकाळ शके १५४०–१५६० हा असावा. महाराष्ट्र स्वराज्योन्मुख झाल्यावेळीं हा देदीप्यमान तारा महाराष्ट्राच्या क्षितिजावर उगवलासें दिसतें. नाथ, मुक्तेश्वर, तुकाराम व समर्थ यांच्या प्रासादिक वाणीचा प्रसाद महाराष्ट्राला एकामागें एक मिळत गेला.

नाथांच्या कृपेनें माझे मनोरथ पुरले असें सांगून मुक्तेश्वर म्हणतो:–

**करुणेचा अवतार तो हा विश्वतारक**
**कळेना स्वामीचे सहजासहजें कौतुक ।**
**करी देव दास्य ज्याचा आज्ञाधारक ॥**

एकनाथांवरील दुसऱ्या एका आरतींत तो म्हणतो:—

**नानारूपीं चालक व्यापक तूं एक**
**म्हणुनी ‘एका’ नामें पाचारिति लोक ।**
**निर्मळ गोदातटीं मुनिराजहंस**
**निर्गुणप्रतिष्ठानीं केला रहिवास ॥ जयदेव० ॥**
**ब्राह्मणतीर्थीं पूजा, नामाचा महिमा**
**सत्कर्में लोटली मोक्षाची सीमा ।**

## ४ मुक्तेश्वराची कविता.

मुक्तेश्वराची एकंदर कविता आज उपलब्ध आहे ती येणेंप्रमाणेः—

| | | |
|---|---|---|
| १ संक्षेपरामायण : ( श्लोकबद्ध )- | संख्या | ६६१ |
| २ मुक्तेश्वरी महाभारत ( ओवीबद्ध ) ... | | |
| ( मु ) आदिपर्व .... ... ... | | ७१२३ |
| ( क्ते ) सभापर्व ... ... ... | | २७०० |
| ( श्व ) वनपर्व ... ... ... | | २७६५ |
| ( र ) विराटपर्व ... ... ... | | ९९१ |
| * * * | | * |
| ( श्री ) सौप्तिकपर्व ... ... ... | | ५०० |
| | | १४०७९ |
| ३ स्फुट प्रकरणें:— | | |
| ( श्री ) हरिश्चंद्राख्यान ... ... ... | | ६०८ |
| ( द ) शतमुखरावणवधाख्यान ... ... | | १३३ |
| ( त्ता ) मूर्खांचीं लक्षणें ... ... ... | | ११३ |
| ( त्र ) भगवद्गीता ... ... ... | | ७०८ |
| ( या ) शुकरंभासंवाद ... ... ... | | ४६७ |
| ( य ) किरकोळ ४।५ प्रकरणें ... ... | | २७० |
| ( न ) श्रीएकनाथचरित्र... ... ... | | ९४ |
| ( मः ) पदें व आरत्या ... ... ... | | १७ |
| | | २४१० |
| | एकूण | १७१५० |

याप्रमाणें पाहतां मुक्तेश्वराची एकंदर कविता सरासरीनें १७ हजार आज उपलब्ध असून ती मुंबईच्या 'काव्यसंग्रहांत' प्रसिद्ध झालेली आहे. मुक्तेश्वराच्या भारताचीं मात्र पांचच पर्वें उपलब्ध प्रसिद्ध झालीं आहेत.

त्याचें संपूर्ण भारत अमुकाजवळ आहे, अमक्यानें पाहिलें आहे, शांतिपर्व अमुक गृहस्थ छापणार आहे, इ० गोष्टी आज४०वर्षांत अनेकवार प्रसिद्ध झाल्या आहेत व ऐकण्यांत येत आहेत; पण त्या तूर्त जमेंत धरण्यांत बिलकूल अर्थ दिसत नाहीं. मुक्तेश्वरी भारत कोणीं दुष्टानें मत्सरानें जाळून टाकलें किंवा नाथांच्या सांगण्यावरून कवीनें तें स्वतःच गोदावरींत बुडविलें अशाही दोन दंतकथा प्रचलित आहेत, पण त्या दोहींतही कांहीं अर्थ दिसत नाहीं. मुक्तेश्वराचें रामायण सामान्यांतलें आहे, इतर स्फुटकवितेंतही तीन प्रकरणाशिवाय विशेष स्वारस्य आहे असें नाहीं. मुक्तेश्वराची मुख्य कीर्ति त्याच्या भारतावर आहे व त्यांतही पहिलीं चार पर्वें हीं त्याच्या कीर्तिमंदिराला आधारभूत आहेत. मुक्तेश्वराचें काव्यगुणसर्वस्व ह्या चार पर्वांत प्रगट झालें आहे व चार पर्वांपुरतें पाहतां भारतीकथा लिहिणाऱ्या २५।३० ही महाराष्ट्रकवींत मुक्तेश्वर अग्रगण्य ठरतो यांत शंका नाहीं. कवित्वाचे सर्वोत्कृष्ट गुण ह्या चार पर्वांत पूर्ण पाहण्यास मिळतात. सौप्तिक पर्व ज्याअर्थी सांपडलें आहे त्याअर्थी त्या पूर्वींचीं पर्वें त्यानें लिहिलीं असलीं पाहिजेत व कदाचित् अधिक कसोशीनें संशोधन झालें तर यापुढें तीं उपलब्धही होतील, नाहीं कोणीं म्हणावें? मुक्तेश्वराचें संपूर्ण भारत उपलब्ध होईल तर महाराष्ट्रसाहित्यांतला कोहिनूर मिळाला असें सर्व रसिक काव्यभक्तांस वाटल्यावांचून राहणार नाहीं.

---

## ५ मुक्तेश्वरी भारताची लोकप्रियता

शके १६०८ च्या सुमारास झालेल्या देवदासकृत 'संतमालिका-स्तोत्रांत पुढील ओवी आहे:—

**मुक्तेश्वरा मुक्तदशा । दिधली तुवां हृषीकेशा ।**
**पुरवून त्याची आशा । भारती टीका वदविली ॥ ८ ॥**

अनेक संतमालिकांतून मुक्तेश्वराचें नांव आलेलें आहे. मुक्तेश्वरांची गणना महाराष्ट्रानें संतकवींत केली आहे. भारतावर ३० कवींपैकीं मुक्ते-

श्वराची बरोबरी एक मोरोपंतच करूं शकतो. श्रीधराचा पांडव–प्रताप हा मुक्तेश्वरी भारताचा केवळ तर्जुमा आहे !

मुक्तेश्वराची लोकप्रियता जुन्या लोकांत होती तशी नवीनांतही आहे, आणि याला योग्य कारणेंही आहेत. 'चातुर्य भक्तीसह बोल बोले' असें श्रीधरानें म्हटलें आहे. मुक्तेश्वराच्या वाणींत साहित्यचातुरी आहे. इतर भारतरचनाकारांनीं ( मोरोपंताशिवाय ) जीं ओवीबद्ध पर्वे लिहिलीं आहेत त्यांत वस्तुतः सारें गद्य आहे व खरें कवित्व विरळ आहे ! त्यांत काव्यदृष्टि फार करून कोणांतही नाहीं. अनंततनय त्र्यंबकानें मुक्तेश्वराला 'ओविकाकवीचा ईश्वर' म्ह० ओवीबद्ध काव्यरचनेचा ईश्वर म्हटलें आहे तें यथार्थ आहे. भारतकर्त्या जीवाशिवानेंही त्याला 'काव्यरचना-सौंदर्याच्या वैभवानें कविगणांत अग्रपद' मिळवणारा 'श्रेष्ठ कवि' असें म्हटलें आहे व त्याच्या काव्यगुणांचें वर्णन करून त्यानें 'भारतसार अप्रतिम' काढलें आहे अशी त्याची प्रशंसा केली आहे. कृष्णशास्त्री चिपळोणकरासारख्या रसिकाला मराठी कवितेंत फक्त एका मुक्तेश्वरानें मोहिलें होतें हें प्रसिद्ध आहे. राजवाडे यांनीं 'मराठी छंद' यावरील प्रबंधांत म्हटलें आहे:— 'इतर अनेक कवींनीं ओवीछंदांत भारतें रचिलीं आहेत, परंतु मुक्तेश्वराची धीरगंभीर रचना त्यांना साधलेली नाहीं. दोष ओवीबंधाचा नसून कर्त्यांच्या प्रतिभाभावाचा आहे. ऐतिह्य प्रतिभा, नैतिह्य विषय व ऐतिह्य छंद या त्रयींची जेव्हां सांगड घडावी तेव्हां ऐतिह्य काव्य निर्माण होतें. मुक्तेश्वराच्या भारतानें जो ऐतिह्य ठसा वाचकांच्या मनावर उठविला जातो तो मोरोपंताच्या भारतानेंही उठत नाहीं. मोरोपंतापेक्षां मुक्तेश्वर कविप्रतिभेच्या दृष्टीनें जो मोठा भासतो त्याचें मुख्य कारण हें आहे. महान् युद्धाची घनगर्जना व लहानशा चकमकींतील शस्त्रांचा खणखणाट ह्यांतलें जें अंतर तेंच मुक्तेश्वराच्या ओवींत व मोरोपंताच्या आर्येंत भासमान होतें !!" मी आपल्या 'मोरोपंतचरित्रांत' ( इ. स. १९०७) मुक्तेश्वर व मोरोपंत यांची तुलना करितांना जें म्हटलें आहे त्यांतील

सर्वप्रिय झालेला एक उतारा पुढें देतों. "मुक्तेश्वराची प्रतिभा, कल्पना, वर्णनचातुर्य, सृष्ट्यवलोकन, बुद्धीची व्यापकता व राष्ट्रीयभावना हे गुण अनन्यसाधारण असल्यामुळें मुक्तेश्वराची कवित्वाच्या दृष्टीनें कोणताही मराठी कवि बरोबरी करूं शकणार नाहीं असें मला वाटतें. मुक्तेश्वराच्या वाणींत लोकोत्तर प्रसाद, दिव्य ओजस्विता, व सृष्टिसौंदर्यवर्णनाची अनुपम शोभा दृष्टीस पडतात. मुक्तेश्वरानें प्रबळ मनोवृत्तींच्या प्रचंड प्रवाहाबरोबर भारतीआख्यानांची महानदी ' खळखळाट वाहविली ' आहे; पंतांनीं दुतर्फा मनोहर घांट बांधून व जागोजाग उपवनांचे रम्य देखावे निर्माण करून त्या महानदीचा ओघ दोन्ही पात्रांमधून अचूक सोडून दिला आहे. मुक्तेश्वराची कविता एखाद्या खेडवळ पण कुलीन देशस्थ ब्राह्मणाच्या मुलीसारखी तेजस्वी, साधीभोळी, काळीसांवळी, मोकळ्या मनाची व सशक्त अशी आहे; व मोरोपंताची कविता ही सुस्वरूप, टापटिपीची व सुगरण अशा नगरवासी कऱ्हाड्याच्या मुलीसारखी आहे ! दोन्ही संपन्न, शुचि व ईश्वरपरायण आहेत. पहिली वाटेल त्याला भुलवितें, दुसरीला भुलणारा सुविद्य नागरिकच पाहिजे. पहिलीच्या अंगावरचीं वस्त्रें उंची आहेत पण तीं कशीबशीं घेतलीं आहेत, दुसरीच्या वस्त्रालंकारांत नीटनेटकेपणा विशेष आहे. पहिली आपल्या काळ्या पाणीदार डोळ्यांनीं व सहजविलासांनीं मोहील, दुसरी नानाविध चेष्टांनीं जिंकील. पहिलीची निर्भय धिटाई व दुसरीची मर्यादशीलता, पहिलीचें अकृत्रिम हास्य, व दुसरीचें मंदस्मित, पहिलीचें सहजप्रेक्षण व दुसरीचें कटाक्षक्षेप, पहिलीचा आडदांडपणा व दुसरीचा संभावितपणा दोन्ही आपापल्यापरी मनमोहकच आहेत ! तथापि मुक्तेश्वरी भारती व मोरोपंती भारती यांचा विचार करितां ' दूरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः ' या दुष्यन्ताच्या वचनाचें स्मरण होतें ! मोरोपंतांनीं निर्भ-सरपणें स्पष्ट लिहिलें आहे कीं, मुक्तेश्वरी कवितेच्या तोलाची कविता

आपणांस उत्पन्न करितां येणार नाहीं असें वाटून अन्य कवि निराश व हतगर्व झाले आहेत !"

## ६ सरस प्रकरणें.

महाभारतांत आख्यानोपाख्यानें बहुत आहेत. मुक्तेश्वरी भारतांत उत्कृष्ट आख्यानें बहारीनें वर्णिलेले मुख्य प्रसंग दाखवितों:—

१ समुद्रमंथनाची कथा ( आदि० अ० ४ )
२ जरत्कारूची गोष्ट व आस्तिकजन्म ( आदि० अ० ९ )
३ दुष्यंतशकुंतलाख्यान ( आदि० अ० १५।१६ )
४ ययातिआख्यान ( आदि० अ० १९ )
५ पांडवधनुर्वेदपठण व विद्यापरीक्षा ( आदि० अ० ३०।३१ )
६ कणिकनीति ( आदि० अ० ३४ )
७ मंदपालचरित्र ( आदि० अ० ५० )
८ नारदनीति ( सभा० अ० ३ )
९ जरासंधाख्यान ( सभा० अ० ६।७ )
१० व्यासबोध व पांडवनाशाचा विचार ( सभा० अ० १२ )
११ द्रौपदीवस्त्रहरण ( सभा० अ० १५ )
१२ नलदमयंतीआख्यान ( वन० अ० ६।७।८ )
१३ दुर्वासकृत पांडवछल ( वन० अ० १२ )
१४ सावित्रीआख्यान ( वन० अ० १६ )
१५ विराटनगरींतले गोग्रहण ( विराट ५।६ )

हीं पंधरा प्रकरणेंही वाचायची ज्यांना सवड नसेल त्यांनीं निदान दुष्यन्तशकुंतलाख्यान, नलदमयंतिआख्यान व सावित्रीआख्यान हीं तीन आख्यानें व जरासंधवध, वस्त्रहरण व नारदनीति हीं तीन प्रकरणें मिळून सहा प्रकरणें तरी मुक्तेश्वराच्या वाणीनें ऐकल्यावांचून राहूं नये म्हणजे 'नवरसांची मंदाकिनी, दुःखदारिद्र्यपरिहारिणी, कवींची कुल-

स्वामिणी ' अशा श्रीशारदादेवीचा मुक्तेश्वरावर वरदहस्त आहे अशी वाचकांची खात्री होईल. त्याची वाणी प्रासादिक आहे, सहजसुंदर आहे. तिच्यांत विलक्षण मोहिनी आहे. कवित्व आणि विद्वत्त्व दोन्ही एकरूप झालेले येथें दिसतात. संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषांवर कवीचें दांडगें प्रभुत्व होतें याची साक्ष पदोपदीं पटते. मुक्तेश्वराचें वक्तृत्व अस्खलित व मोहक असून वर्णनशैली रम्य व उदात्त आहे. त्या त्या प्रसंगांचीं चित्रें रेखीव ठसठसीत असल्यामुळें ते ते प्रसंग आपल्यासमोर घडल्यासारखा मनोभ्रम होतो इतकी कवीच्या वाणींत जादू आहे.

---

## ७ उत्कृष्ट उतारे.

( १ ) दुष्यंताची शिकारः--

**कौरववंशीं विख्यातकीर्ती । दुष्यन्तनामा गुणैकमूर्ती ।**
**श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती । वीर्यें शौर्यें आगळा ॥ ४ ॥**
**प्राची प्रतीची दक्षिणोत्तर । चारी दिशा चतुःसमुद्र ।**
**आक्रमूनि मही महेंद्र । सुरेंद्र तैसा भूलोकीं ॥ ५ ॥**
**रोग दारिद्र्य कीं बंधन । दुःख दुर्भिक्ष अकाळमरण ।**
**सर्प वृश्चिक तस्कर जाण । दुष्यन्तराज्यीं असेना ॥ २३ ॥**
**विष्णुसमान सत्ताबळ । प्रतापें जैसा सूर्य तेजाळ ।**
**धरातुल्य सहनशीळ । अक्षोभ जैसा सागरु ॥ २७ ॥**
**सप्तसमुद्रांचे लोट । धरामंडळीं एकवट ।**
**तैसे सेनेचे संघाट । घेऊनि वना चालिला ॥ ३० ॥**
**अनेक शस्त्रास्त्रांचीं वृंदें । अनेक वाद्यें अनेक शब्दें ।**
**गर्जती तेणें विचित्रनादें । नादावलें अंबर ॥ ३२ ॥**
**देखे महाप्रचंड गिरी । विशाळ पर्वतांचिया दरीं ।**
**जळें तुंबिलीं सरितांतरीं । समुद्रतुल्य अगाध ॥ ५० ॥**

( २ ) वनोपवनांचें वर्णन मूळाशीं ताडून पाहिलें असतां अधिक उठावदार दिसतें. कण्वाश्रमांतल्या तपस्वी व ज्ञानी लोकांत विविध मतांची

चर्चा झाली तिचें वर्णन मूळभारतांत नाहीं पण मुक्तेश्वरानें तें केलें आहे. कवित्वाबरोबर पांडित्याचाही प्रकर्ष मुक्तेश्वरांत होता. दुष्यन्त कण्वाच्या पर्णकुटींत शिरला तेथें 'रूपयौवनचातुर्यभरिता । लावण्यकलिका साजिरी' अशी द्वारांत उभी असलेली शकुंतला त्यानें पाहिली.

**कनकलतिका सौदामिनी । कीं चंद्रकळा तनुधारिणी ।**
**सुवर्णकेतकीपत्रवर्णी । सुगंधखाणी हरिणाक्षी ॥ ९८ ॥**

( ३ ) भरताला ( सर्वदमनाला ) घेऊन शकुंतला दुष्यन्ताकडे आली तेव्हां त्यानें अनेक कटुवचनें बोलून तिचा अव्हेर केला. या प्रसंगीं कालिदासानें सुललित वाणीनें दुष्यन्ताचा बचाव केला आहे, पण मूळाप्रमाणें मुक्तेश्वरानें मात्र शकुंतला वाघिणीसारखी पतीवर चवताळली व नर्मोक्तीनें तिनें त्याची सडकून खरडपट्टी काढली असें वर्णिलें आहे:—

**" सत्यप्रतिज्ञा नरेंद्रोत्तमा ! । आठवोनियां आपुल्या नेमा**
**यौवनराज्यीं भरतनामा । पुत्र आपुला अभिषेकी ॥**

यावर राजानें आपल्याला शकुंतलेच्या भेटीबद्दल काहींच आठवत नाहीं असें सांगितलें !

**ह्मणे ' तूं कैची दुष्ट तापसी ? । कोण ? कोठील ? कोणे देशीं ?**
**कोणे काळीं एकांतवासीं । संग जाला मी नेणें ! '--॥११८॥**

याला साक्षी कोण आहे ? ' आतां आलेनि पंथें जाई । शीघ्र येथूनी निर्लज्जे ! '

**ऐसें बोलतां मेदिनीपाळा । क्रोधें संतप्त शकुंतला ।**
**जेवीं प्रळयाग्निचिया ज्वाळा । स्पर्शों धावती गगनातें ! ॥१२७॥**
**आरक्तता लेवूनि नयनें । अंजन क्षाळिलें अश्रुजीवनें ।**
**अधर स्फुरती--जेविं पवनें । पद्मपत्रें थरकती ॥ १२८ ॥**
**ह्मणे ' धन्य गा पुरुषोत्तमा ! । उत्तम ऐसोंचि रक्षिती नेमा ।**
**कर्मसाक्षी अंतरात्मा । तृप्त जाला या वचनीं ! ! ॥ १२९ ॥**
**ईश्वरु आणि जोडिलें पुण्य । स्मरोनि-बोलें यथार्थ वचन ।**
**माझी साक्षी-तुझेंचि मन । तुझे अंतरीं देताहे ! ॥ १३२ ॥**

पंचमहाभूतें, हृदय, यम आणि मुख्य ईश्वर हे सर्व कर्मांचे साक्षी आहेतच, पण मुख्यतः तूं आपल्या अंतरात्म्यालाच विचार, तोच माझा साक्षी आहे. यावर दुष्यन्तानें अविचारानें शकुंतलेचा बाप व आई मेनका यांची निंदा केली. त्यावेळीं मात्र ती खवळली व म्हणाली:—

**सर्षपप्राय पराचे दोष । पर्वतप्राय करी अधम पुरुष ।**
**आपुलीं दुष्कर्में अशेष । मेरुतुल्य गणीना ॥ १८२ ॥**
**मेनका त्रिदशपंक्तिमान्य । चतुर्दशलोकीं तिचें गमन ।**
**मीही जाण तिजसमान । देवतादेही दिव्य स्त्री ॥ १८४ ॥**
**अपरसृष्टीचा परमेष्ठी । गाधिज निंदिसी दोषदृष्टी ।**
**हें ऐकोनि काय श्रेष्ठी । श्रेष्ठ तूतें म्हणतील ? ॥ १८७ ॥**
**रूपें विरूप-कोणा न मानी । पवित्र-दोष न देखे नयनीं ।**
**सदोषियां-निर्दोष कोणी । भूवनत्रयीं दिसेना ॥**
**नरसिंहा ! सोडोनि कपट । मांडिये बैसवीं कुमार श्रेष्ठ ।**
**सत्य स्वधर्म करी प्रगट । वडिलवृद्धां देखतां ॥ २०५ ॥**
**सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म ।**
**सत्यापाशीं पुरुषोत्तम । सर्व काळ तिष्ठत ॥ २११ ॥**
**असत्य तेंचि पें पातक । असत्य तोचि महानरक ।**
**असत्याचेनि संगें दुःख । अनंतजन्मीं भोगती ॥ २१३ ॥**

सत्यत्वानें व शुद्धकोपाविर्भावानें भारलेल्या या सतीच्या वक्तृत्वाचा परिणाम दुष्यन्तावर व इतरांवर होऊन त्यानें तिची क्षमा मागून अंगीकार केला.

( ४ ) दैत्यगुरु जो शुक्राचार्य त्यापाशीं अमृतसंजीवनी विद्या होती, ती शिकण्यासाठीं देवांचा राजा जो इंद्र त्यानें गुरुसुत कच यास पाठविलें. पाठवितांना इंद्र म्हणाला ( आदि० अ० १७ ):—

**यत्न करिता न मिळे सृष्टीं । ते वस्तु असे शत्रूचे गांठीं ।**
**नीच सेवक होइजे निकटीं । हितस्वार्थाकारणें ! ॥ ३२ ॥**
**लोकलाज आणि अभिमान । सांडोनि आपुलें थोरपण ।**
**कार्य साधिती विचक्षण । गृहा जाऊनि शत्रूच्या ॥ ३३ ॥**

**शीळ दाक्षिण्य माधुर्यवचनीं । आचारवंतें अवक्र गुणीं ।**
**आराधिता देवयानी । संजीवनीफळ लाभे ॥ ३६ ॥**

परदेशीं किंवा परक्यांपाशीं जाऊन कांहीं अमोल विद्या शिकून येणारास वरील उपदेश मोलाचा वाटेल, मात्र त्यानें तिकडील देवयानीच्या प्रेमपाशांत अडकून न पडण्याइतकी तशीच सावधानता ठेविली पाहिजे!

( ५ ) आजन्म ब्रह्मचर्यव्रतपालनाविषयीं भीष्मांचा निर्धारः—

**उष्णता सांडील वैश्वानर । प्रभा त्यागील पद्मिनीवर ।**
**हिमांशु दवडील हिमकर । परी मी सत्य सांडीना ॥ ७ ॥**
**शब्दविषय सांडील गगन । रूप तेज, स्पर्श पवन, ।**
**रस विषय सांडील जीवन । सत्य माझें चळेना ॥ आदि·२४-८॥**

द्यूताची व वस्त्रहरणाची दिव्यकथा सभापर्व अ० १५ मध्यें कवीनें फार बहारीनें वर्णिली आहे. हा सारा अध्यायच अतिशय गोड झाला आहे.

( ६ ) वनवासक्लेशांना कंटाळून एकदां द्रौपदी धर्मास म्हणाली कीं भीमार्जुनांस युद्धाची आज्ञा करा, ते शत्रुकंदन करितील व आपणांस ‘ उभयलोकीं सुखलाभ ’ होईल. तिचें म्हणणें पडलें कीं सत्वगुण हा परमार्थाला शोभादायक आहे पण जगांतला न्याय ‘ क्रूरता भोगी वैभव । सात्विकां भिक्षा मिळेना ’ असा दिसतो। इतक्यांत तेथें व्यास आले.

**व्यास म्हणे ‘ विवेकखाणी !। कासया विकल्पिसी मनीं ।**
**निशा[1] लोटलिया तरणी । उगवे ऐसा संशयो ? ॥**
**सत्य सुकृत ज्याचे गांठीं । तेथें ईश्वरकृपा मोठी ।**
**ईश्वरकृपेस्तव संतुष्टी । पूर्णकामें सर्वथा ॥**

---

१ रात्र सरल्यावर दिवस यायचाच यांत काय संशय आहे ? ह्याप्रमाणें आपत्काळामागून भाग्यकाळ यायचाच असा पुण्यवंतांचा अनुभव आहे. हाच दृष्टान्त शेक्सपीयरच्या हॅम्लेट नाटकांत ( अंक १ ला ) आलेला आहे:--

To thine own self be true,
And it must follow, as the night the day,
Thou canst then be false to any man.

(७) मुक्तेश्वराचें नळदमयन्ती-आख्यान साहित्यछंदालंकारांनीं टलेल्या रघुनाथपंडिताच्या आख्यानाशीं ताडून पहाण्यासारखें आहे. क्तेश्वरी आख्यान भावप्रधान, सुबोध व सरळ आहे. त्याच्या वाणींत हमींच ठसठसितपणा असतो. नळराजाकडे पहाः--

**सुरमंडळीं सहस्रनयन ( इंद्र ) ग्रहमंडळी सहस्रकिरण ( सूर्य )।**
**पाताळभुवनीं सहस्रवदन ( शेष )। तेवीं तो मान्य भूतळीं ॥**
**अक्षय तारुण्य रसाळा। कोटिकंदर्पसौंदर्यपुतळा।**
**चतुर्दशविद्या चौसष्टकळा। विश्रामल्या त्या देहीं ॥**
**आशिष्ठ दृढिष्ठ बलिष्ठ। चक्रवर्तींमाजीं श्रेष्ठ।**
**ज्याचे आज्ञेचा अखंडपट। वेष्टुनी मिरवे मेदिनी ॥**
**न्यायें प्रजांचें पालन। प्रतापें शत्रुकुलांचें दमन।**
**विनयें साधूंचें संरक्षण। शीलवर्तन सर्वदा ॥**

दमयन्तीच्या तोंडून पतिव्रता:धर्मपत्नीची योग्यता फार उत्तम प्रकारें वीनें वदविली आहे.

**तापत्रयनिवारणाचें छत्र। भार्येपरता नाहीं मित्र।**
**पतिव्रता मी सुपवित्र। कशी त्यागूं भाविशी ? ॥ ८७ ॥**
**तुजही प्रबळक्षुधा बाधी। राज्यहानीची सखेद व्याधी।**
**संगीं भार्या दिव्यौषधी। उपचारीन दासीत्वें ! ॥ ८८ ॥**
**भार्या सकळश्रमातें हर्ती। भार्या सकळसुखांतें कर्ती।**
**भार्या पवित्रवंशधर्ती। यशकीर्ती स्त्रीसंगें ॥ ८९ ॥**
**स्त्रीसंगें धर्म निर्दोष। पुरुष कुमार्गीं न पवे भ्रंश।**
**भार्या नसतां महादोष। कामादिक पीडिती ॥ ९० ॥**

मुक्तेश्वर एके ठिकाणीं म्हणतो'—

**रूपवंत गुणवंत कुळवंत। भ्रतारसेवनीं सदा रत।**
**ते भार्यारूपें मूर्तिमंत। महासिद्धी जाण पां ॥**

भार्या महासिद्धि आहे, देवता आहे, सहधर्मचारिणी आहे.

मुक्तेश्वराच्या कुलस्त्रीविषयक कल्पना किती उदात्त होत्या हें येथें

स्पष्टच आहे, तथापि उन्मत्त व कुलटा स्त्रियांचीही त्यानें हजीरी घेतली आहेः—

**समर्थ माहेरीचें बळ । तेणें स्त्रिया उच्छृंखळ ।**
**भ्रतार मानूनि गोळांगुळ । अव्हेरिती सर्वस्वें ॥ २२ ॥ (आदि० ९)**
**ह्मणोनि स्त्रियांची प्रकृति । धनिक देखोनि उपजे प्रीति ।**
**दरिद्री भ्रतार अव्हेरिती । हेळोनियां सर्वस्वें ! ॥२२॥ (वन. ६ ॥)**

( ९ ) भीम, धर्म व अर्जुन यांचीं यथोचित स्वभावचित्रें पहाः—

**क्षोभोनियां पद्मनयना । क्रोधदृष्टी भीमार्जुना ।**
**अवलोकितां भीमसेना । हृदयस्फोट होतसे ॥ १५७ ॥**
**उसळोनियां गदापाणी । मिसळो पाहे तदा कंदनीं ।**
**हे देखोनि आज्ञावचनीं । धर्म वारी भीमातें ॥ १६० ॥**
**म्हणे " क्रोध नावरे तुझिया चित्ता ।**
**तरी गदा ओपीं माझिये माथां ।**
**परी असत्य कुंतीसुता । स्पर्शों ऐसें न करावें ॥ १६१ ॥**
**सत्य रक्षावया श्रीरामें । अरण्य सेविलें पुरुषोत्तमें ।**
**पिता, प्राण गेलिया, सीमे । नुलंघीच मर्यादा ॥ १६२ ॥**
**लटिकें साच करूनि स्वप्न । राज्य ब्राह्मणां दीधलें दान ।**
**तया हरिश्चंद्राचें कथन । ग्रंथकर्ते बोलती ॥ १६३ ॥**
**कपोत शरणागत पातलें । शिबीनें निजमांस छेदिलें ।**
**दधीचिऋषीनें दीधलें । देहदान द्विजांतें ॥ १६४ ॥**
**तैसें येथें अवघड कायी ? । विचारीं पा ! आपुल्या हृदयीं ।**
**सत्यनिष्ठातें अपायीं । ईश्वर न घाली सर्वथा " ॥ १६६ ॥**
**गदा उचलितां हातीं ! धनंजयें धरिला पुढती ।**
**ह्मणे ' भीमा ! अधर्मपंथीं । चळों नेदीं सर्वथा ॥**
**गुरु, स्वामी, वडिलबंधु, । पवित्र सात्विक धर्मसिंधु, ।**
**येणें नेमें गोविला शब्दु । तोचि प्रमाण आमुतें ॥**
**लाधलासि बळाचो प्रौढी । त्याची काय होचि जोडी ? ॥**
**धर्मासी मारूनि ब्रह्मांडीं । अपकीर्ती उरवणें ? ॥**

( १० ) द्रौपदीच्या तोंडी कवीनें एक वीररसमिश्रित विनोदपूर्ण रूपक घातलें आहे तें मोठें हृदयंगम आहे. दुर्योधनानें भरसभेंत आपली मांडी उघडी केली तेव्हां तिनें फणफणत उत्तर केलें:-

**भीमाकरीं जे केळवली । गदानोवरी सगुणाथिली ।**
**वाग्निश्चयें तुज नेमिली । गोत्रघटित निर्धारें ! ॥**
**बहुलें योजिलें रणतळवट । आयुष्य-अवधीचा अंतरपाट ।**
**हातें सारूनि बळी वरिष्ठ । लग्न लावील स्वहातें ! ॥**
**रक्त हरिद्रा तनुलेपुनी । माथां अक्षता पायपिटणी ।**
**स्त्रियाप्रलाप वाद्यध्वनी । सुखसोहळा भोगिसी !॥**
**ते गदा घेऊनि मांडीवरी । रणमंचकीं निद्रा करीं ।**
**प्राण पारखे दवडूनि दूरी । मग, एकांतीं पहुडे पा ! ॥**

( ११ ) महाभारतांत युद्धवर्णनें भीष्मद्रोणकर्णादि पर्वांत सांपडायचीं, पण तीं पर्वें उपलब्ध नसल्यामुळें वीररसाचीं उदाहरणें त्यांतून देतां येत नाहींत. एकच युद्धप्रसंग देऊं. एकदां कौरवपांडवांची सेना पांचाळपति जो द्रुपदराजा त्याच्या राजधानीवर चालून गेली:—

**वाद्यें वाजूं लागलीं अपार । बळें चालिले कौरवभार ।**
**हडबडलें पांचाळपुर । वार्ता पुढें परिसोनी ॥ ६ ॥**
**कडकडाटें वीरभारीं । पांचाळ पातला बाहेरी ।**
**उभयदळांचे झुंजारीं । रणकल्लोळ माजला ॥ ८ ॥**
**कुंजरावरी कुंजरभार । राउतावरी अश्वस्वार ।**
**नानाशस्त्री पायींचे वीर । घोर कंदना मिसळले ॥ १७ ॥**
**तिमिंगल निघे समुद्रजळीं । तसा भीम पांचाळदळीं ।**
**बळें मिसळतां खळबळी । सेना पांचाळपतीची ॥ ४२ ॥**
**असंख्य कुंजर थाट । स्त्रवती मदोदकाचे पाट ।**
**त्यावरी उठावला बलिष्ठ । गदाघायीं ताडित ॥ ४३ ॥**
**अश्वरथ कुंजरभार । विभांडीत रणझुंजार ।**
**रथ योद्धे शतसहस्र । बाणधारा खंडिले ॥ ५१ ॥**
**बाणधारा अकस्मात । शिरें उडती मुगुटांसहित ।**

**शस्त्रीं उभारिले हात । ते नभांत उसळती ॥ ५३ ॥**
**अशुद्धनदींचे खळखळाट । पुसती सागराची वाट ।**
**मार्ग दावावया नीट । अपार प्रेतें चालती ॥ ५५ ॥**
**' हाहाकार ' माजला प्रबळ । फुटलें पांचाळाचें दळ ।**
**एक म्हणती प्रळयकाळ । अत्यद्भुत मांडला ॥ ५७ ॥**

( १२ ) मुक्तेश्वर कुस्त्यांचीं किंवा मल्लयुद्धाचीं वर्णनें अत्यंत वीरश्रीनें करितो. भीम आणि जरासंध ( सभा० अ० ७ ), भीम आणि किर्मीर ( वन० अ० २ ), भीम आणि कीचक ( विराट० अ० ३ ) भीम आणि बकासुर ( आदि० अ० ३८ ) इ० प्रसंगीं मूर्तिमंत वीररस त्यानें उभा केला आहे. मुक्तेश्वराला कुस्त्यांचे डावपेंच चांगले माहित होते ! त्याच्या पूर्वींपासून महाराष्ट्रांत तालमी व आखाडे पुष्कळ होते. महाराष्ट्रीयांना तालमीचें वेड पहिल्यापासूनच आहे !

## भीम आणि जरासंध

**दोघे पिटिती पाणितळें । जानुमूळें बाहुमूळें ।**
**मही ताडितां पादतळें । शैलमौळें थरकती ॥ १९ ॥**
**किरीट काढोनि हस्तकीं । केश आवळिले मस्तकीं ।**
**चंड गर्जना करिती मुखीं । काळ कांपे चळचळां ॥ २२ ॥**
**धांवोनि भीमाची वीरगुंठी । मागधें कवळोनियां मुष्टी ।**
**दक्षिणहस्त सूदला कंठीं । काळपाशासारिखा ॥ २३ ॥**
**भीमें भैरवाकार दृष्टी । हृदयीं वोपिली वज्रमुष्टी ।**
**सोडवूनि मगरमिठी । झिंजाडोनि लोटिला ॥ २५ ॥**
**तेणें कोंपर दोनी मुष्टी । चारी आघात वोपिले पृष्टीं ।**
**मागध क्षोभोनि उफराटी । हुमणी (बुकी) हाणी मस्तकीं**
**करप्रहार लत्ताप्रहार । मुष्टिप्रहार मस्तकप्रहार ।**
**मोजोनि मारिती शतसहस्त्र । ' उसणें घे घे ' म्हणोनी ॥**
**मस्तकीं वाहती करूनि मोट । भूमी टाकिती जैसा घट ।**
**तळीं पाषाण होती पिष्ट । आंगलोटें दोघांच्या ॥ ३२ ॥**

**बाहु गदा बाहु मुसळें । बाहु मुद्गल कर त्रिशूळें ।**
**एकमेकांचीं मर्मस्थळें । पाहोनियां मारिती ॥ ३३ ॥**
**सर्पाऐसे फुस्कारिती । सिंहाऐसे हुंगारती ।**
**वृषभाऐसे फुंकारती । उफाळती इसाळें ॥ ३८ ॥**
**मुष्टिघातांचिया ध्वनी । थरथराटें थरके धरणी ।**
**वोथरोनि पाताळफणी । मार्ग पाहे पळावया ॥ ४० ॥**

---

## ८ मुक्तेश्वरकालीन भोजनाचे प्रकार !

मुक्तेश्वरी भारतांत भोजनाचीं वर्णनें सविस्तर आलीं आहेत तीं पाहिलीं असतां तीन शतकांमागें महाराष्ट्रीय उच्च घराण्यांत कोणकोणते पदार्थ खाण्यांत येत असत हें समजतें. कवीचे आजे नाथमहाराज हे गर्भश्रीमंत होते व त्यांचें घरीं अन्नसंतर्पण हा त्यांचा नित्यांतला क्रम होता. नाथ व मुक्तेश्वर हे दोघेही गृहस्थाश्रमी असल्यामुळें खाण्याचे विविधप्रकारचे स्वादिष्ट पदार्थ घरींच नित्य होत. पैठण गांवही तेव्हां भरवस्तीचा व सुसंपन्न असून विद्येचें केवळ माहेरघर होता. शिवाय मुक्तेश्वर हे एकलकोंडे नसून महाराष्ट्रभर किंबहुना सर्व हिंदुस्थानभर हिंडलेले असून ठिकठिकाणच्या खाण्यापिण्याच्या तऱ्हा त्यांना चांगल्या माहीत झालेल्या होत्या; तथापि मुक्तेश्वरानें वर्णिलेले पदार्थ बहुतेक सर्व महाराष्ट्रीय आहेत व आजही महाराष्ट्रीय स्त्रीपुरुषांच्या चांगल्या परिचयाचे आहेत! खाद्यपेयादि पदार्थांचीं वर्णनें नाथ, मुक्तेश्वर व रामदास यांच्या ग्रंथांतून बरींच सविस्तर मिळतात, व पाकशास्त्रावर ग्रंथ लिहिणारास ह्या तिघाचे ग्रंथ नीट पाहिले पाहिजेत! मुक्तेश्वराच्या वेळीं आमचें भोजनशास्त्र परिपाकावस्थेस पोंचलें होतें! मऱ्हाठा गडी जसा लढवय्या आहे तसा तो भोक्ता ह्म० ‘खवय्या’ ही चांगला आहे. **मराठ्यांना** ( महाराष्ट्रांतील अठरापगड जातींच्या सर्व लोकांना ) **युद्ध, भजन** आणि **भोजन तिन्ही गोष्टी सारख्याच प्रिय आहेत.** कुस्त्यांचे किंवा तालमींचे आखाडे व सूर्यनमस्कार याबरोबरच पोहणें

आणि स्वारीशिकारीहा त्यांना प्रिय आहेत. मराठा गडी मुत्सद्दीगिरींत किंवा शिपाईगिरींत जसा अग्रेसर आहे तसा तो भजनभोजनांतही पुढारीच आहे! फार आंबट नाहीं, फार तिखट नाहीं, फार खारट नाहीं, फार गोड नाहीं, असें समधात भोजन महाराष्ट्रासारखें कोठेंच नाहीं. कवि विनोदानें ह्मणतोः—

**अन्न द्यावें अन्न भक्षावें। अन्नापरतें नाहीं बरवें।**
**' अन्न परब्रह्म ' हें स्वभावें। वेद बोले निश्चिती! ॥ १२० ॥**
**अन्नचि एक परब्रह्म। यावेगळा सर्वही भ्रम।**
**अन्नोदकीं सुखविश्राम। त्याबीण श्रम सर्वही! ॥ १२१ ॥**
**उबगोनियां अमृतपाना। अमर इच्छिती कथिकोदना।**
**मृत्युलोकावेगळी जाणा। तृप्ति नाहीं ह्यलोकीं ॥ १२२ ॥**
**स्वर्गी आणि पाताळांत। नाहीं अन्नसुखाची मात।**
**म्हणोनि देवांचा मनोरथ। जन्म इच्छी भूतळीं! ॥ १२३ ॥**

(१) कौरवपांडवांच्या बाळपणच्या एका वनक्रीडेचें वर्णन आदि० अ० २९ मध्यें आलें आहे. खेळानंतर सर्वांचें भोजन झालें, तेव्हां ज्याला जें जें आवडलें तें तें वाढण्यांत आलें. ' दुग्धशर्करामिश्रित ' क्षीरभोजनीं एका आर्त। एक वटककथिकायुक्त। शाल्योदनें भक्षिती ' कोणाला दूधसाखर, कोणाला नुसता भातच वडे (वटक) व कढी (कथिका) बरोबर खाणें आवडलें. दधिसार (दह्याची साय) दुग्धसार (दुधाची साय), दध्योदन (दहींभात), घृतप्लुत खिचडी, गुळपोळ्या, खाज्या, करंजा, घृतपुऱ्या, अपूप (अनारसे) इ० अनेक पदार्थ तयार असून ' चणकवाटाण्याचे सोले। निंबरस लवण आलें ' ह्म० हरबऱ्याचे (चणक, चणे) व वाटाण्याचे सोले-त्यांत आलें, मीठ व लिंबाचा रस घालून तयार केलेले-असे सोलेहि होते. ' फणसें डाळिंबें जांभळें। द्राक्षें अमृतफळें। अंजिरें केळें नारिकेळें (नारळ) इ. फळेंही होतीं.

(२) राजसूययज्ञप्रसंगीं ' द्रौपदी वाढी उदारहस्तें। अन्नपूर्णा भगवती '

( सभा० अ० ९ ) 'शर्करेचिया वाळवंटीं घृतसरिता धांवती लोटीं' 'कथिका वटक अतिसोज्वळ' इ० वडे, कढी पुरणपोळी, लाडू, मांडे इतके सफेत कीं, पौर्णिमेचा जणूं चंद्रप्रकाशच ! कानवले आंत खसखस घातलेले किती प्रकारचे होते ! घृतपुऱ्या ( तुपांतल्या पुऱ्या ), वेळा ( वेलदोडे ) व मिरीं घमघमित घालून केलेल्या अरुवार ( पातळ, नाजूक ) पूर्णपोळ्या हें मुक्तेश्वराच्या वेळचें मुख्य पक्वान्न दिसते ! आठ धान्यांचे बनविलेले 'अष्टवटक,' तशींच पांच प्रकारचीं वरान्नें (वरणें), आठ प्रकारच्या शिखरिणी (शिकरणी), कोशिंबरीं, कुटें, सांबारीं, रायतीं, 'पापड सांडगे सांडया । तिळवडे कडकणें कुरवडिया। मिरगुंडी मुगवडिया ।' किती प्रकार सांगावे ? तक्र शक्रासी दुर्लभ' पण तेथें विपूल होतें. असा भोजनप्रकार एक संवत्सरपर्यंत चालला होता. हें वर्णन मूळभारतांत नाहीं. अशींच भोजनाचीं वर्णनें विराटपर्व अ. ८ व वनपर्व अ. ११ मध्यें पहावीत.

( ३ ) मोगऱ्याच्या कळ्यांसारखा फुटलेला भात 'वोगराळ्यांनीं' वाढलेला, त्यावर 'घृत साजूक पंचधारा' नंतर 'पूर्णपोळिया आज्यें तसें' इ० अनेक पदार्थ वाढले होते. 'गयेची शर्करा' तेव्हा इकडे प्रसिद्ध असावी.

**आम्ररसेसीं साखरमांडे । दधिसायेसीं कुरवडे ।**
**दुग्धसायेसीं वांकुडे । कानवले स्वादिष्ट ॥ १२९ ॥**
**दुग्धें आळूनि केली दाटें । श्वेतपोळिया शुभ्र सपीटें ।**
**जेवितां प्रेम वाटे मोठें । अधिकाधिक सेवाया ॥ १३० ॥**

मागील वर्णनांत 'गाजरें' नव्हतीं तीं यांत आहेत ! असो.

मुक्तेश्वराच्या वर्णनांत आले नाहींत असे कोणकोणते पदार्थ सवाई माधवरावांच्या लग्नात अधिक होते याचें संशोधन करून तें सविस्तर प्रसिद्ध करण्याची जबाबदारी संशोधकांवर येऊन पडते ! रावबाजीनें यांत कांहीं सुधारणा केली कीं काय हेंही त्यानें पाहिलें पाहिजे !

**अमर्यादेनें फुगलीं पोटें । धोत्रें ढिलाविती बोटें ।**

**रिता ठाव न दिसे कोठें । उदक तेंही घ्यावया ! ॥ १३७ ॥**
**' भोजन करितां गेला प्राण । पुढती मिळेल होतां जनन ।**
**परंतु ऐसें हें परान्न । जन्मोजन्मीं न देखों ! ' ॥ १३७ ॥**
**ऋषींस तृप्ती झाली मोठी । चंद्रमंडळीं लागली दृष्टी ।**
**वस्त्रें न दिसती तळवटीं । फिटलीं किंवा राहिलीं ! ॥ १४१ ॥**
**ह्मणती ' माथां असतीं मुखें । तरी होतें बहु निकें ।**
**ग्रास उचलूनी हस्तकें । ऊर्ध्ववदनीं घालितों ! ' (वन. अ. ११)**

विनोदी लेखनाचा हा एक उत्तम नमुना आहे !

---

## ९ वस्त्रांचें वर्णन.

अन्नामागून वस्त्र हें आलेंच पाहिजे ! अन्नवस्त्र यथास्थित मिळालें–आणखी काय पाहिजे ? द्रौपदीला भगवंतांनीं अनंत वस्त्रें पुरविलीं व तिची लाज राखली ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ( सभा० अ० १५ ) ' जे न देखे रवी ते देखे कवी ' या न्यायानें मुक्तेश्वरानें आपल्या प्रतिभेनें कल्पना-सृष्टींतून नानाप्रकारचीं उंची वस्त्रें काढून तीं द्रौपदीला नेसविलीं आहेत !

मूळ भारतात किंवा दुसऱ्या कोणत्याही भारतग्रंथांत या वस्त्रांचें बिलकूल वर्णन नाहीं. प्राचीनकाळीं भरतखंडांत कसल्या प्रकारचीं लुगडीं कोणकोणत्या प्रांतांत तयार होत होतीं याचा शोध घेणाऱ्या स्त्रीवेष-मीमांसकांना हें मुक्तेश्वराचें वर्णन फार उपयोगी पडेल !

कांहीं लुगडीं पलाशकुसुमासारखीं, कांहीं शेंदूर कन्हेरी किंवा गुंजा यांच्या वर्णाचीं, कांहीं सुवर्णकेतकीसारखीं पिवळीं, कांहीं तमाळदळासारखीं निळ्या वर्णाचीं, कांहीं अतसीपुष्परंगाचीं ( जवसाच्या फुलांसारखीं निळीं-जांभळीं ), कांहीं नीलोत्पलशुकासारखीं हिरव्या रंगाचीं, अशीं नाना पुष्पवर्णाचीं लुगडीं निघालीं ! कांहीं कांठाला पिवळीं असून पदराला मोत्यीं खिळलेलीं, कांहीं कोकिळकस्तुरी वर्णाचीं ह्म० काळीं असून पदराला तांबुस पद्मराग किंवा माणिकें जडलेलीं, कांहीं ' दुग्धसमुद्रीं ओप दिलेलीं ' म्ह० दुधांत भिजवून उन्हांत वाळवून शुभ्र केलेलीं, कांहीं अभ्र-

पुटें ओलेपणीं दिल्यामुळें तकाकणारी, कांहीं काश्मीर (स्फटिक) कर्दळी-गर्भ किंवा दुग्ध यासारखीं पांढरीशुभ्र, कांहीं जांभूळवर्णी, कांहीं धोतरा, पुंडरीक किंवा शंख यासारखीं किंवा रौप्यतगटासारखी 'हंसढवळीं, कांहीं तापीतीरचीं अतिमवाळ, पातळें, भरीत म्ह० कलाबतु भरून कशिदा काढलेलीं, मुर्गा म्ह० काळ्या व तांबड्या रेशमाच्या मुगाएवढ्या बारीक चवकटी करून काढलेलीं, कांहीं इंद्रगोप म्ह० मृगनक्षत्रारंभीं येणारा जो तांबडालाल किडा त्यासारखी, कांहीं कनकपत्रवेलीचीं, कांहीं हरिहरांचीं किंवा अन्य देवांचीं नांवें किंवा चित्रें काढलेलीं अशीं 'सप्त-द्वीपवतीचीं वस्त्रें । छपन्नदेशींचीं विचित्रें । कृष्णहस्तींचीं पवित्रें । पर्वतप्राय पडियेलीं'—कारलीं, चंद्रकळा, साड्या, चुनड्या, चौकड्या किती सांगाव्या ?

**तैलंग त्रिगुण मल्याळीचीं । सिंहलकोशलवैदर्भीचीं ।**
**गौडगुर्जरबंगालीचीं । बहुवर्णांची सावुलीं ( लुगडीं ) ॥**
**प्रावरणाचा पीतांबर । शेवटीं नेसवी जगदीश्वर ।**
**तेजें ग्रीष्मींचा दिनकर । किंवा वीज प्रळयाचीं ॥**

असो याप्रमाणें भगवंतानें तऱ्हतऱ्हेचीं लुगडीं नेसवून आपली बहीण व भक्त जी द्रौपदी तिची लाज राखिली कीं जेणेंकरून 'उघडे न पडे अंगुष्ठ नख । न दिसे मुख अपवित्रा.' कौरव फजीत पावले.

---

## १० सृष्टिसौंदर्याचीं वर्णनें.

मुक्तेश्वर शब्दसृष्टीचा ईश्वर आहे. भाषासुंदरी त्याच्यापुढें जणुं नाचत आहे. मराठी भाषेचा अस्सलपणा येथें पहावा. प्रतिभेचें सौंदर्य भोगावें !

**भीमसेन पाहे दृष्टी । तंव अंधकारें कोंदली सृष्टी ।**
**गुल्मलता वृक्षदाटी । तृणें मार्ग लक्षेना ॥ ५४ ॥**
**निशाचरी श्वापद पक्षी । थोर गर्जना करिती कक्षी ।**
**वोळकंबलीं महावृक्षी । आस्वलें आणि वाघुळें ॥ ५५ ॥**
**वनदेवता यक्षिणीपाळे । धुमस घालिती गदारोळे ।**
**दीपिका लावुनि भंबाळे । गुप्त होती एकसरा ॥ ५६ ॥**

प्रेतगण स्मशानवासी। रूपें धरूनि भ्यासुरवेषीं।
छळिती अशुचि मानवांसी। झोंबती मांस भक्षावया ॥५७॥
दिवाभीतांचे घुंघाट। पिंगाळियांचे किलाकिलाट।
भालू भुंकती सैराट। टिटिवे थोर टिवाटिवती ॥ ५८ ॥
चक्रवाकांचे आर्तस्वरीं। कुमुदीं भ्रमरांचे झुंकारीं।
मस्तकमणीतेजविखरीं। जीव आहारा शोधिती ॥ ५९ ॥
असो हे निशा दाटली [1]काळीं। जेवी काळपुरुषाची कांबळी[2]।
ब्रह्मांडदेवतेवरी सगळी। पांघुरविली आप्तत्वें ॥ ६० ॥
ऐसें देखोनि तयेकाळीं। भीमसेन बाळियांबळी।
धैर्यकांस घालोनि कवळी। पांचांतेंही एकला ॥ ६२ ॥
खांदीं वाहूनियां जननी। कडिये माद्रीकुमर दोनी।
धर्मार्जुना बाहुस्थानीं। पाणितळें कवळिलें ॥ ६३ ॥
पाठी देऊनि ध्रुवमंडळा। अगस्तिचक्रा लक्षूनि डोळां।
वामीं कृत्तिकांचा मेळा। याम्यदिशे चालला ॥ ६४ ॥
झडपाआड मोडीत झाडें। तळवा चूर्ण करीत धोंडे।
श्वापदसर्पांचीं जुंबाडें। पायातळीं रगडित ॥ ६६ ॥
शेष वंचितां अठरा घटिका। पूर्वदिशेनें क्षाळिलें मुखा।
कुंकुम रेखिलें त्या तिलका। अरुणोदय बोलिजे ! ॥ ६८ ॥
भार्गवाचार्य उदया येत। तरे अपार क्रमूनियां पंथ।
पुढें जान्हवीजळाचा वात। शीतळ मंद पातला ॥ ६९ ॥

---

१ रत्नझांकण समुद्रीं पडिलें। ब्रह्मांडकरंडा काजळ भरलें।
विश्वलोचनीं भरोनि उरलें। अपरिमित दशदिशा ॥ आदि. अ. ४०।४

२ गडद अंधकारावर 'काळपुरुषाची कांबळी' असें मुक्तेश्वरानें रूपक केलें आहे. शेक्सपीअरने अगदीं हेंच रूपक मॅकबेथ नाटकांत ( अंक १ प्र० ५ ) केलें आहे! त्यानेंही तेथें Blanket of Dark अशीच शब्द-योजना केली आहे!

**गाढालिंगनें पडली गांठी । सोडितां दंपत्यें होती कष्टी ।**
**वस्त्रें वेढिती परी पोटीं । अपूर्णकामें जळजळ ! ॥ ७२ ॥**
**वेश्यागारा सोडोनि विट । लोकाचारा मिनले निकट ।**
**वामी कौळिक धूर्त शठ । वेष घेती शिष्टांचे ! ॥ ७४ ॥**

हें सर्व वर्णन अत्यंत मनोहर आहे. भाषाशैली, कल्पनाशक्ती व सृष्टय-वलोकन या तीनही दृष्टींनीं वरील अत्युत्कृष्ट उतारा कोणत्याही कवीश्वराच्या उत्तमोत्तम सृष्टिवर्णनाशीं यशस्वी रीतीनें सामना देईल.

( २ ) वर्षाकाळ म्ह० पावसाळा, ( वन० अ० १० ):—

**यावरी पातला वर्षाकाळ । पंचम ऋतु झाला प्रबळ ।**
**सुटला पश्चिमेचा अनिळ । मेघमाळा मोकली ॥ १९२ ॥**
**विद्युल्लतांचे कडकडाट । घनगर्जना गडगडाट ।**
**गंगादिसरितांचे संघाट । महापूर माजले ॥ १९८ ॥**
**अठराभार वनस्पती । अंकुरवसनें वेढिली जगती ।**
**फळशाका धान्यसंपत्ति । पृथ्वी पिके जगातें ॥ १९९ ॥**

मुक्तेश्वराला सृष्टिसौंदर्याची मनःपूर्वक आवड असून वनें, उपवनें वृक्षवल्ली, पशुपक्षी याचे रम्य देखावे त्याच्या प्रतिभेला उत्तेजवीत असावेत ! ‘ गगनचुंबित तरुवर । माजी तुंबळ सरितापूर ’ ‘ पीयूषातुल्य शांतळोदकें । अक्षोभ तडागें अनेक ’ ‘ नानावनें नानाद्रुम । नाना सरितांचे संगम । नाना श्वापदें विहंगम । नानावर्ण भासती ’ ( वन० १०–३२ ) ही सारी सृष्टीची रम्यता त्याच्या दृष्टीसमोर उभी राहते, आणि मौज ही कीं तो जसा निर्जन वनोपवनांत रमतो तसाच राजेरजवाडे, त्यांचे दरबार, राष्ट्रांत चाललेल्या उलाढाली यांचींहि वर्णनें तो मनापासून सुंदर करितो. दुष्यन्त, नळ व हरिश्चंद्र यांच्या वर्णनांत व राज्यपद्धतींत मुक्तेश्वराला उत्कृष्ट राजकारणकौशल्य दाखवितां येतें.

**समुद्रवासीय नानायवनीं । रत्नें वसनें अनेकवर्णी ।**
**विशाळ कांचेच्या रांझणीं । सुविचित्र फळांतें ॥ ( सभा १२–१७२ )**

ही ओवी पाहिली कीं, मुक्तेश्वर १९३४ सालीं मुंबईच्या कोटांतून

फिरून गेला होता कीं काय अशी शंका येते !

( ४ ) **नगरशृंगार !**—बडा पाहुणा बड्यांच्या घरीं आला म्हणजे सारी नगरी शृंगारून त्याचा सत्कार कसा होतो याचें वर्णन सुभद्राविवाहानंतर रामकृष्ण हस्तिनापुरास आले तेव्हां केलेलें पहा. ( आदि० अ० ४८ )

( ४ ) **गोरक्षणकार्यांत** पडलेल्या लोकांनीं गाई व बैल या मुक्या जनावरांविषयींच्या करुणेनें भरलेला उतारा पहावा ( वन० अ० १ ) शेत-कऱ्यांपासून बैलाला फार त्रास होतो यामुळें कळवळून कामधेनूनें इंद्राकडे गाऱ्हाणें नेलें व इंद्रानें पाऊस पाडून त्या कृश बैलाला क्लेशमुक्त केलें एव-ढीच साधी गोष्ट मूळांत आहे. श्रीधरानें हा प्रसंग गाळला आहे व मोरोपंतानें एकाच आर्येत त्याची बोळवण केली आहे ! पण मुक्तेश्वरानें स्वतंत्र बुद्धीनें सर्व वर्णन पदरचें घालून गोधनांचा कैवार घेतला आहे !

**माझे पुत्र वृषभ सकळ । कष्ट भोगिती सर्वकाळ ।**
**दुःख देखोनि तळमळ । मज अपार वाटतसे ॥ १२० ॥**
**नांगर, शकट, रथ, गोणिया । धान्यमळणीं तेलघाणिया ।**
**पाठीं बहुभार वाहोनियां । अहोरात्र शिणताती ॥ १२१ ॥**
**दगडमाती काष्ठभार । सदा मारिती निष्ठुर ।**
**गाळीप्रदानें अपार । कष्ट करितां कोपिती ॥ १२२ ॥**
**शीत उष्ण पर्जन्य वात । निराश्रयें सर्व साहत ।**
**भुके तृणोदक नेदित । उपेक्षिती निर्दय ॥ १२३ ॥**
**वत्सें बंधनीं तळमळती । भुकेल्या आक्रोशें बोभाती ।**
**धेनुकांसेहूनि काढिती । पय प्राशितां मातेचें ! ॥ १२४ ॥**

( ५ ) इंग्रजी काव्यांत घुबडाचें कोणी कोणी वर्णन केलेलें आढ-ळतें व कांहीं अर्वाचीन कवींचा घुबड हा फार आवडता प्राणी आहे ! रात्रीच्या वेळीं ज्या झाडावर कावळे बसले असतील त्या झाडावर झडप घालून घुबड कावळे मारून जातो या प्रसंगाचें हुबेहुब वर्णन पहा. ( सौप्तिक० अ० १ )

प्रगटतां रात्रीचें मंडळ । उलूकभयें काककुळ ।
न्यग्रोधपादपीं निश्चळ । सहस्रावधी राहिले ॥ ३५ ॥
करूनि निद्रेसीं सख्यत्व । अज्ञानासी विकिलें जीवित्व ।
आयुष्यमर्यादेचें सत्व । काळ घेवोनी जातसे ॥ ३६ ॥
त्याचसमयीं उलूक घोर । पातला ज्याचें दीर्घशरीर ।
मुखें करीत विकृत स्वर । हर्यक्ष, चंचू पिंगळा । ॥ ३७ ॥
आयत ग्रीवा नखें तीक्ष्ण । वेगासी तुळावा सुपर्ण ।
तेणें वायसांचें सैन्य । बहुत सांडिलें मारुनी ॥ ३८ ॥

( ६ ) जरेनें खंगलेल्या क्षुधापीडित वृद्धाचें चित्र पहाः--

ज्वरें करूनि व्यापिली वपू । तेणें कंधरा प्राप्त कंपू ।
संहनन लवोनि झाला चापु । आला खोंकत टेंकीत ॥२-१०१ ॥
उदरपृष्ठीची घडी । करूनि चरणांची वेंगडी ।
झोंक सावरितां दंडीं । शब्द तोंडीं न बोलवे ॥ ४-७२ ॥

---

## ११ मुक्तेश्वरी नीतिरत्नमाला.

मुक्तेश्वर हा नीतिशिक्षक म्हणूनही केवढया उच्च प्रतीचा कवि आहे हें आपणास पुढील उताऱ्यांवरून दिसणार आहे.

### १ देवतुल्य नर कोणता.

जो ऐश्वर्यें न चढे मदा । दारिद्र्यें दीनत्वा न शिवे कदा ।
निंदी त्याची न करी निंदा । तो नारायण नररूपें ॥
वानितां मनोरम एकांतीं । आपण होऊनि पुरुषा प्रार्थी ।
तेथें जो निर्विकल्प चित्तीं । तोचि शंकर ह्मणों ये ॥
विजनीं भरलीं कनकें पाहे । देखिल्यावरी लोटी पायें ।
ऐसी निर्लोभता आहे । तोचि शंकर ह्मणों ये ॥
जया आधीन मन इंद्रियें । न मनीं सुखदुःखाचे घाये ।
छळितांही पर क्रोधा न ये । तोचि शंकर ह्मणों ये ॥

करणी करूनियां लपवी । महिमा दुजियाची वाढवी ।
महायशाची तो पदवी । आपआप पावतू ॥
गेलें हृदयीं नाठवावें । केलें मुखीं न बोलावें ।
सत्य सर्वथा न सांडावें । साधुवर्तन या नांव ॥

## ३ प्रारब्धाचे खेळ.

आपण करूं जावें एक । प्रारब्ध घडवी आणिक ।
ईश्वरीमायेचें कौतुक । ब्रह्मादिकां न कळे ॥
काळ ईश्वर आणि प्रारब्ध । सहा शास्त्रें चार वेद ।
प्रमाण बोलती ते शब्द । काय कृत्रिम मानावे ? ॥
आपुलें केलें पावे सिद्धी । हे मूर्खाची मूर्खबुद्धी ।
ईश्वरें प्रेरिलियां प्रारब्धीं । असेल तेंचि होतसे ॥
उत्तम सन्मार्गी वर्तावे । होईल तें उगेंचि पाहावें ।
इच्छिल्यासारिखें फळ व्हावें । हें सर्वथा अज्ञान ॥
ईश्वरें प्रेरिलें प्रारब्धातें । प्रारब्धें प्रेरिलें मनातें ।
यास्तव घडेल तेंचि निरुतें । ब्रह्मसूत्र जाणावें ॥
इच्छावें तें सहसा न घडे । न घडावें तें अंगां जडे ।
कर्मभोगाचें कुवाडें । कोणा नुबगे सहसा ॥
ईश्वरइच्छेनें घडे सकळ । वाउगी मनाची तळमळ ।
अज्ञानाचें हेंचि फळ । जे सुखदुःखें प्रलपिजे ॥
जें जें घडे जिये काळीं । तें तें मानें घेइजे मौळीं ।
भोगाविते तिघे बळी । काळ कर्म ईश्वरू ॥

## ४ सतिसावित्रीचा निर्धार.

येरी म्हणे ' न घडे ऐसें । एकदां वरिला जो मानसें ।
तें मन आणिका स्पर्शे । तो व्याभिचार स्वधर्मी ! ॥
मरण पावो तात्कालिक । अथवा वांचो कल्प एक ।
सत्यवानावीण आणिक । वरणें नाही सर्वथा ॥
अभाग्य-भाग्याचीं आभाळें । येती जाती आपुलिया काळें ।
निश्चयाचा ध्रुव अचळ । चळत्व सर्वथा न पाविजे ॥

कृपेनें अवलोकीं श्रीहरी। तरी अविवेकाचि विवेक करी।
सुकृत असलिया आपुले पदरीं। सर्व अरिष्टें नासती॥

### ७ कुलवतीनें काय टाकावें ?

स्वयें नर्तन गायन। गीतनृत्यअवलोकन।
शृंगारकामशास्त्रश्रवण। हें कुलक्षण कुलवंते॥
परघरअटण परघरवस्ती। जारजारिणींची संगती।
एकटशय्या एकटपंथी। सदा हें कुलक्षण कुलवंते॥
बहु हांसणें बहु बोलणें। सदा हांसत गोष्टी करणें।
परतपरतोनि निरखणें। हें कुलक्षण कुलवंते॥

### ८ परस्त्रीपरधन.

परस्त्री आणि परधन। अखंड वांछी ज्याचें मन।
तो जितचि प्रेतसमान। त्यासी सज्जन नातळती॥

### ९ आपले आपण.

विवेक आपआपणां मित्र। कुबुद्धी आपआपणां शत्रु।
आपणां आपण गुरु स्वतंत्र। शिष्यहि आपणां आपणु॥

### १० खरा ब्राह्मण.

जो ओतिला सत्वगुणें। कामादि दोषां नातळे मनें।
तोचि ब्राह्मण निश्चयें जाण। जातिमात्र तो नव्हे !॥
सत्य ज्ञान क्षमाशीलता। अनृशंसता तपोधनता।
ज्याचे ठायीं तो तत्वता। ब्राह्मण ऐसे जाण पा॥
जया सर्वत्र समदृष्टी। ब्रह्मबोधें तोषले पोटीं।
ब्रह्म जाणोनि लोकीं रहाटी। सदाचारें वर्तती॥
हृदयवृत्ती सुप्रसन्न। अग्निसेवा वेदाध्ययन।
शमदमयुक्त तपोधन। सुखसंतोषी ब्राह्मण॥

### ११ ब्राह्मण आणि क्षत्रिय.

ब्राह्मणांचे आशीर्वचन। तें क्षत्रियां शस्त्र जाण।
ब्राह्मणकृपेचें आंगवण। वज्रकवच अक्षयी॥
पवन पावक एकमेळीं। काननें जाळिती समूळीं।

तेविं मंत्रें शस्त्रें होळीं । शत्रुकुळांतें होतसे ! ॥

## १२ आपत्काळीं धैर्य.

शोकभयाचे आघात । क्षणक्षणां होती प्राप्त ।
मूर्ख होती व्याकुळचित्त । ज्ञानें पंडित भ्रमेना ॥
आपत्काळीं देखोनि पुढें । ज्ञानियाआंगीं वीरश्री चढे ।
कोटिदुःखांचे दळवाडे । विवेकलता विभांडीं ॥
ज्ञानें नासे संसारभ्रम । विष्णुस्मरणें पातक भस्म ।
कळिकाळ अतिदुर्गम ॥ धैर्यबळें लोटावा ॥
वडिलावृद्धांचें वचन पाळी । नीति न सांडी आपत्काळीं ।
विजयलक्ष्मी त्यातें कवळीं । कल्पांतींही सोडीना ॥

## १३ दुर्वाक्य न बोलावें.

( अ ) बहुकाळींचा मित्रसंबंधु । तोडी एक वोखटा शब्दु ।
जैसा कांजीचा स्वल्पबिंदु । घटाचि नाशी दुग्धाचा ॥
नाना तपांचिया जोडी । स्वल्पकामना नासती कोडी ।
परगृहीं षड्रसांची गोडी । दवडी एक हेळणा ॥
ज्वर वन्ही ग्रीष्मातप । यांचा उष्मा अत्यंत स्वल्प ।
त्याहूनि बोलाचा संताप । आगळा ऐसा मज वाटे ॥
हृदयीं तप्त लोहाचें सळ । साहों येईल चिरकाळ ।
परी दुष्ट शब्दाची जळजळ । मरणांतींही शमेना ॥
सोनें अथवा हस्तचरण । मोडिल्या सांधिती विचक्षण ।
फुटलें मोतीं , तुटलें मन । सांधूं न शके विधाता ! ॥
( आ ) कठोर वाग्बाण वर्माठायीं । मरणांत शल्य पराचे हृदयीं
राहे; ऐसें दुरुक्तिघाईं । मरण न कीजे कवणातें ॥
परवर्मभेदनी दुरुक्ती । ते अकीर्ती अवलक्ष्मी अवगती ।
ते प्रत्यक्ष राक्षसी व्यक्ती । हिंसा करी अशस्त्रें ॥
म्हणोनी दुर्वाक्य न बोलावें । पराचें आपण साहीत जावें ।
याहूनि श्रेष्ठ साधन बरवें । भुवनत्रयीं असेना ॥
साधु सद्भावें पूजावे । सज्जन संकटीं रक्षावे ।
खळापवाद साहोनि जावे । तेंचि वर्तन श्रेष्ठांचें ॥

सत्य विनीत मधुरभाषी । सकळ प्राणी वश्य त्यासी ॥
कोणापासोनि तयासी । अपाय कांहीं असेना ॥
मुखें सत्य अंगें विनीत । तेणें जिंकिले जन समस्त ।
इहीं सद्गुणीं अंलकृत । चतुरें जालें पाहिजे ॥

## १४ शुद्धीकरणाचीं भिन्नभिन्न तीर्थें.

सुबुद्ध शुद्ध विद्या-तीर्थीं । साधु सुस्नात सत्य-तीर्थीं ।
कुलांगना लज्जा-तीर्थीं । पवित्र होती जाण पा ॥ १६ ॥
धनाढ्य निर्दोष दान-तीर्थीं । पाप निःपाप गंगा-तीर्थीं
क्षत्रिय राजे धारा-तीर्थीं । प्रक्षाळिती अघातें ॥ १६ ॥
योगी आत्मज्ञान-तीर्थीं । आत्मस्वरूप स्वयें होती ।
श्रवणादिक नवही तीर्थीं । भक्त होती हरिरूप ॥ १६ ॥

## १५ निःस्पृहाचें बोलणें.

' तुझी तुष्टी आणि रुष्टी । दोन्ही तृणप्राय माझिये दृष्टी ।
जैसी निर्धनिकांची मुष्टी । झांकली उघडी समान ! ' ॥

## १६ आपत्काळींचें समाधान !

ईश्वर निष्ठुर कीं कृपाळु । काय करील कीं केव्हां काळु ।
याचा निश्चय विवेककुशळु । करूं नेणे सर्वथा ॥ ११४ ॥
नकळे विष्णुमायेचा महिमा । जे विचार हिरोनी पाडी भ्रमा
ह्मणोनि नळा आणि रामा । अपाय घडले जाणतां ॥ ११५ ॥
पुण्यमार्गी खेळतां निखिळ । दुःखें प्राप्त होती प्रबळ ।
पाप करितां क्षेमकुशळ । दिसे ये काळीं वाटतें ! ॥ ११६ ॥
पाप करितां पाविजे दुःख । सुकृतें भोगिजे अक्षयी सुख ।
ऐसें बोलती मन्वादिक । वेदवाक्यप्रमाणें ॥ ११७ ॥
नकळे पापपुण्याचें रूप । पापी पुनःपुन्हा करी पाप, ।
पाप करितांही अमूप । पुण्यफळें भोगिती ! ॥ ११८ ॥
अधर्मांचि धर्म एकांतें । विहित तें अविहित सर्वांतें ।
दिसे सर्वत्र बहुतांतें । समाधानासारिखें ॥ ११९ ॥

**विचारें पाहतां न मिळे साक्षी । ह्मणोनि मिळिजे प्रारब्धपक्षीं**
**जैसा समुद्रीं भ्रमोनि पक्षी । नौकास्तंभीं आरूढे ! ॥ १२१ ॥**
**विवेकबुद्धीनें जितुकें टळे । तितुकें टाळिजे विवेककुशळें ।**
**यालागीं माझीं हीं प्रांजळें । वचनें हृदयीं धरावीं ॥**
**पुढें वोढवूनि प्रारब्धा । जो टाकी प्रयत्न धंदा ।**
**तो पुरुष मतिमंदा-। माजी गणिती जाणते ॥**
**संसर्ग न करावा नीचाचा । विश्वास न मानावा गोत्रजाचा ।**
**क्रोध मदमत्सर यांचा । विटाळ मानी मानसें ॥**
**जो जो प्राप्त होईल भोग । त्याचा मानूं नको उबग ।**
**तेणें सत्वर रमारंग । कृपा करील निर्धारें ॥**

## १२ रामायण व स्फुट प्रकरणें.

कवीनें भारतापूर्वी व आपल्या तारुण्यांत काव्यनाटकादि ललितवाङ्मयाचे संस्कार बुद्धीवर ताजे असतांनाच रामायण लिहिलेलें दिसतें. भाषेचा साधेपणा व शुद्ध मराठी वळण हे मुक्तेश्वराचें गुण रामायणांतही दृष्टीस पडतात. मुक्तेश्वराला वीररस चांगला साधतो व त्याचें सुंदरकांड व युद्धकाड या दोन कांडांतले श्लोक समर्थांच्या याच दोन कांडातल्या श्लोकांशीं ताडून पाहण्यासारखे आहेत !

**मुखीं शब्द ऐकू, करीं बाण एकू । जगीं पत्नि एकू, व्रतें काम एकू**
**प्रतापी महीमंडळीं राम एकू । ह्मणे सोडिजेना कधीं नेम एकू॥ ११२**

या मुक्तेश्वरी श्लोकावर (अयोध्या०) मनाच्या श्लोकांतील समर्थांचा श्लोक

**भजाया जनी पाहतां राम एकू । करीं बाण एकू मुखीं शब्द एकू ।**
**क्रिया पाहतां उद्धरी सर्व लोकू । धरा जानकीनायकाचा विवेकू ॥**

वामनानें पुढें जी यमकानुप्रासरचना इतकी लोकप्रिय केली तिचा उगम मुक्तेश्वरी श्लोकांत ( अरण्य० ) दिसतो—

**गजगती जगतीवरि चामके । मलमती लपती पतिसामुके ।**
**कपटणी नटणी वधु पातकी ।, रघुपती कुमती मन पारखी ॥**

१ **मूर्खाचीं लक्षणें** २ **शुकरंभासंवाद** व ३ **हरिश्चंद्राख्यान** हीं तीनच

स्फुटें विचार करण्यासारखीं आहेत. भारताच्या उद्योपर्वांतील (अ० ३३०) जीं मूर्खांची लक्षणें १० श्लोकांत सांगितलीं आहेत त्यावरूनच मुक्तेश्वरांस व रामदासांस हीं सुचलेलीं आहेत. मूळांत हीं मूर्खलक्षणें थोडींच दिलीं आहेत, पण मुक्तेश्वर व समर्थ यानीं लोकव्यवहारनिरीक्षणानें तीं पुष्कळ वाढवून सांगितलीं आहेत !

शुकरंभासंवाद हें प्रकरण सुंदर आहे. त्यांत शृंगार आहे, जुगुप्सा ह्म० विषयविडंबन उर्फ वैराग्य आहे, शुद्ध परमार्थही आहे. पण शुकाच्या उत्तरानें तो शृंगारभाव मोडून वैराग्याचाच बोध होतो अशी या प्रकरणाची मांड झाली आहे. सुशील सासूच्या नजरेखालीं नांदणाऱ्या कुलवंत सुनेच्या शृंगारासारखा या प्रकरणांतील शृंगार आहे ! ह्मणजे प्रकरण वांचतांना शृंगाररसाचा उठाव होतो पण तो लगेच वैराग्याच्या उठावणींत लय पावतो ! 'विष्टामूत्राचें भाजन' अशा स्त्रीदेहाची निंदा करितांना पुरुषदेहालाही कवि विसरला नाहीं !

**स्त्रीच्या देहीं दोषदृष्टी । देखिजे जैसे विवेकनिष्ठीं ।**
**तसेंच आत्मदेहानिकटीं । विचारवंतें पाहिजे ॥ ३६४ ॥**

मुक्तेश्वराच्या पदांत त्याचा निर्भीड स्वभाव चांगला दिसतो. 'सांग पा वैराग्य कोठें रे । सर्व विटंबलें पोटें रे' ह्या पदांत व 'गुरु गुरुपणें गाजे रे । शिष्य शिष्यपणें लाजे रे' ह्या पदांत लबाड गुरूंचा व नालायख शिष्यांचा त्यानें खरपूस समाचार घेतला आहे व 'जीवत्व दवडुनि शिवत्व प्रगटवी। तोचि एक सद्गुरुरावो रे' असें सद्गुरूचें लक्षण सांगून ज्ञानेश्वरएकनाथांच्या गुरुशिष्यत्वाचें वर्म ओळखून सत्यमार्गानें उद्धरून जा असा बोध केला आहे.

## एक पद.

( हें एका जुन्या बाडांत सांपडलें. )

**आपुली करी सुटका । करि सुटका ॥**
**भवभ्रम अवघा लटिका ॥ आपु० ॥ ध्रु० ॥**
**आधींच नरदेह फुटका । शाश्वत मानुं नको क्षण घटिका ॥ १ ॥**

**गुरुचरणांबुजघुटका ! सेवुनि मनासि लावी चटका ॥ २ ॥**
**करुनि मनाचा मुटका। मुक्तेश्वर चुकवी यमझटका ॥ ३ ॥**

## १३. मुक्तेश्वरीभारतीचे विशेष गुण.

मुक्तेश्वराच्या वाणींत इतके विविध गुण आहेत, त्याची बुद्धि इतकी प्रतिभावान् आहे, त्याचें भाषासौंदर्य व वर्णनशैली इतकी मनोहर आहे कीं जगांतील महाकवींत मुक्तेश्वराची गणना करणें योग्य होईल. महाराष्ट्रकविमंडळांत मुक्तेश्वर कालिदासाप्रमाणें कनिष्ठिकाधिष्ठित आहे. उपजत काव्यशक्ति, नाथासारख्या महात्म्याचा बाळपणचा सहवास, पैठणसारख्या विद्वानांच्या राजधानींत विद्याभ्यास व शास्त्राध्ययन, हिंदुस्थानभर संचार व पट्टीचें भाषाप्रभुत्व, विद्वत्त्व, कवित्व व रसिकत्व ह्या तीन गुणांचें सामान्याधिकरण्य, 'सत्यं शिवं सुंदर' अशा उच्च प्रकारचें प्रतिभासंपन्नत्व या सर्व गुणांमुळें मुक्तेश्वराला खरोखरीचाच 'साहित्यसम्राट्' म्हणणें समुचित होईल.

(१) मुक्तेश्वराच्या कवितेंत प्रसाद व प्रतिभा हे दोन्ही गुण श्रेष्ठ प्रतीचे आहेत. इतर कलांप्रमाणें काव्यकलाही कांहींशी श्रमसाध्य आहे, पण प्रसाद व प्रतिभा या परिश्रमानें मिळणाऱ्या चिजा नाहींत. प्रसादाचें अंग व्युत्पत्तीनें येत नाहीं, व प्रतिभाही अभ्यासानें साधणारी नाहीं. 'प्रतीतिसुगमं वचः' ह्म० वचन ऐकतांच सुगमरीत्या अर्थबोध होणें ह्याचें नांव प्रसाद. प्रतिभा हा शुद्धबुद्धीचा गुण आहे व प्रसाद हा प्रेमळ उदार व विकसित अंतःकरणाचा धर्म आहे. असा कवि जन्मावाच लागतो, तो मारून मुटकून बनवितां येत नाहीं. मुक्तेश्वराच्या उपजत काव्यशक्तीचा विकास झाला व त्याच्या परिमळानें शारदेचें उद्यान दरवळून गेलें. मुक्तेश्वराची उज्ज्वल प्रतिभा त्याच्या काव्यांत सर्वत्र दृग्गोचर होते. अत्युत्कृष्ट रूपकें, समर्पक दृष्टांत, सहज सुचलेल्या मार्मिक उपमा, सुललित शब्दरचना या गोष्टी त्याच्या कवितेंत पदोपदीं सहज स्फुरलेल्या स्पष्ट दिसतात.

(२) दुसरा गुण त्याच्या भाषेसंबंधाचा. भाषा अर्थवाहक असणें ही गोष्ट सामान्य नाहीं. मुक्तेश्वराच्या मराठीचा अस्सलपणा हा त्याच्या लेखनशैलीचा दुसरा मोठा सद्गुण आहे. जेथें अस्सल शब्द लोकभाषेंत रूढ आहे तेथें तोच शब्द नेमका सप्खन् पडणें याला भाषेचा अस्सलपणा म्हणतात. हा अस्सलपणा जे कोणी लोकांत मिसळतात, लोकांच्या आचारविचारांशीं एकरूप असतात, ज्यांचा संचार साऱ्या राष्ट्रांत असतो, त्यांनाच साधतो. मराठीभाषेचा अस्सलपणा ज्ञानेश्वरींत आहे, नाथाच्या ग्रंथांत आहे, समर्थांच्या वाणींत आहे, जनाबाईनामदेवतुकोबांच्या अभंगांत आहे, बायकांच्या व शेतकऱ्यांच्या गाण्यांत आहे, लावण्यांत व पोवाड्यांत आहे. मराठी भाषेचा अस्सलपणा पुष्कळ प्राचीन व बहुतेक अर्वाचीन कवींच्या व गद्यलेखकांच्या ग्रंथांत नाहीं. संस्कृतचा अगर इंग्रजीचा आश्रय करून अर्वाचीन लेखक ग्रंथ अगर काव्यें प्रायः लिहीत असतात!

(३) मुक्तेश्वराच्या कवितेंत रूपकांची गर्दी असते व त्याचीं रूपकेंही सर्वांगपरिपूर्ण असतात. सुंदर रूपक मुक्तेश्वराच्या 'उठि रे गोपाळा! उघडी स्वरूपलोचना' ह्या भूपाळींत पहावें. मुक्तेश्वरी रूपकांचीं उदाहरणें या पुस्तकात घेतलेल्या अवतरणातही पुष्कळ येऊन गेलीं आहेत. आणखी एकच देतों:—

संसारगजकेसरी श्रीकृष्ण जरासंधास (सभा अ० ७) ह्मणतात:—

**सरला सुकृताचा तंतु। आयुष्यतैला झाला अंतु।**
**माझिये हस्तीं व्यजनवातु। भीमरूपें उदेला ॥ ३ ॥**
**तो झडपतां सत्वरगती। प्राणदीपक पंचज्योती ॥ ४ ॥**
**मालवोनि पडेल क्षिती। गात्रपात्र पालथें ॥ ४ ॥**

(४) मुक्तेश्वराचीं रूपकें बहारीचीं असतातच, पण प्रसंगीं उपमादृष्टांतांचीही गर्दी उसळून देण्याच्या कामीं त्याचा हातखंडा आहे. याचेंही एकच उदाहरण देतों. कौरवांनीं कपटयोगानें पांडवांस जाळून टाकण्यासाठीं लाक्षागृह तयार केलें व तेथें त्यांस कृत्रिमगौरवानें नेलें.

त्या गृहाची रचना पाहून अज्ञजनांनीं दुर्योधनादिकांची वाहवा केली, पण कवि म्हणतो ( आदि० अ० ३५ ):—

**दांभिकजनांचा पसारा । आदर उपजवी नारीनरां ।**
**अंतरीं दोषांचा थारा । तें एक जाणे ईश्वर ॥ १२८ ॥**
**जेवीं मैंदाचा पवित्राचार । प्रगट दिसे अतिसुंदर ।**
**कीं वेश्येचा मुखशृंगार । भुली पाडी कामिका ॥ १२९ ॥**
**बचनागाची कांडी गुळगुळी । सर्पाअंगीची मवाळी ।**
**खादिरांगाराची सोज्ज्वळी । रत्नमाळा आभासे ॥ १३० ॥**
**व्याघ्र दयाशीळ लोकीं । धेनु कुरवाळी निजनखीं ।**
**फणाग्रीं वाहूनि उदकीं । सर्प खेळवी बेडुकां ॥ १३१ ॥**
**संवचोराची निर्लोभ सेवा । जाणतां विश्वास नुपजवी जीवां ।**
**तेवीं तें गृह देखोनि पांडवा । गोड न वाटे मानसीं ॥ १३२ ।**

( ५ ) मुक्तेश्वर सृष्टिसौंदर्याचा भोक्ता होता व त्याची सृष्टिवर्णन करण्याची मनोहर शैली आपण पाहिलीच आहे. लोककल्याणकर्ता राजा, सुराज्य, सुंदर स्त्री, ब्रह्मर्षि, वनें, उद्यानें, घुबड, रात्र, प्रभात, निद्रा, कुस्त्या, मृगया, भोजनप्रकार, वस्त्रोपवस्त्रें इ० त्याचीं वर्णनें अतीव रम्य आहेत. राजकारणीं उपदेश, आपत्काळीं धैर्य, सामान्य नीति, यासंबंधाचे त्याचे उदात्त विचार डोळ्यांपुढें नित्य ठेवण्यासारखे आहेत.

( ६ ) मुक्तेश्वराचा आणखी एकच विशेष सांगून हें प्रकरण पुरें करितों. ' राष्ट्रीय भावना मुक्तेश्वरांत आहेत. महाराष्ट्र देश, मराठीभाषा, महाराष्ट्र झुंज याविषयीं महाराष्ट्रीय बाण्याला साजेसे उद्गार त्याच्या काव्यांत सांपडतात. म्ह० राष्ट्र उदयोन्मुख झाल्या वेळचा हा कवि त्या वेळच्या कर्तबगार पुढाऱ्यांच्या भावना, उल्हास व उत्साह या गुणांसह वर्णन करितो. कुस्त्या, भोजन, वेष इत्यादिकांचीं त्याचीं वर्णनें समाजस्थितिनिदर्शक आहेत, असा हा मराठ्यांचा राष्ट्रीय कवि आहे. असा सर्वांगसुंदर कवीश्वर मराठीवाङ्मयांत एक मुक्तेश्वरच आहे.

---

# १५ बालबोधकर्ते त्र्यंबकराज



ह्या नाथांच्या समकालीन संतकवीचा बालबोध उर्फ बालावबोध नांवाचा सुंदर ग्रंथ नाशीक येथें जुनीं दप्तरें चाळीत असतांना प्रथमच शके १८२३ सालीं माझ्या हातीं आला. ज्या दप्तरांतून हा ग्रंथ सांपडला त्याच दप्तरांत निरंजनमाधव कवीचा हस्तलिखित ग्रंथसंग्रहही मला मिळाला. निरंजनमाधव कवि हा शाहूबाजीरावकालीन असून त्याच्या संप्रदायाचा मूळ पुरुष हा त्र्यंबकराज. निरंजनमाधवाच्या स्वहस्तलिखित कवितासंग्रहांत त्र्यंबकरायाचा बालबोध हा सांप्रदायिक ग्रंथ सांपडावा हें अगदीं साहाजिक आहे. मी त्र्यंबकराय व निरंजनमाधव ह्या कवींचे ' ग्रंथ व त्यांचीं चरित्रें ' याविषयीं शके १८२५ सालीं केसरींत ३।४ लेखांक लिहून मराठी वाचकांस त्यांची प्रथमच ओळख करून दिली. ग्रंथ अतिशय उत्तम असून पुढें चांदोरकरांनीं विस्तृत टीपा देऊन तो काळजीपूर्वक छापला.

ह्या ग्रंथांत त्र्यंबकराय आपल्याविषयीं काय हकीकत सांगतात ती प्रथम पाहूं. कवीचें चरित्र व सांप्रदाय यांची प्रथम नीटशी कल्पना आली म्हणजे त्याच्या कवितेकडे पाहणें बरें पडतें. त्र्यंबकरायांनीं आपल्याविषयींची माहिती ग्रंथाच्या उपसंहारांत सुमारें १५० ओव्यांत दिली आहे. कवि म्हणतो कीं ' आमुचा पिता कृष्णदेवाचा सुतु । नामें भैरव विख्यातु । भला ब्राह्मण साक्षांतु । यजुर्वेदी ॥ शाखा माध्यंजनी पवित्र । शुद्ध सांतत्य गोत्र । वंशवृद्धीस्तव पुत्र । इच्छिले तेणें. ' त्र्यंबकरायाचा पिता भैरवनामक माध्यंदिन शाखेचा यजुर्वेदी कर्मनिष्ठ ब्राह्मण होता. त्यानें तुळजापुरास जाऊन भवानीदेवीपाशीं वंशवृद्धीसाठीं अनुष्ठान केलें. भवानीदेवीनें प्रसन्न होऊन नवव्या रात्रीं त्याच्या हातीं तीन फळें

दिलीं व मधलें फळ हातीं देतांना तिनें सांगितलें कीं ह्या फळाच्या भक्षणानें 'पुत्र जालेया केवळ। करीं देखसी त्रिशूळ। तें ज्ञानगर्भ महाफळ। माझें वरद.' भैरव आपल्या गांवीं आला. त्याला तीन पुत्र झाले. नृसिंह, त्र्यंबक व कौंडन्य. त्र्यंबकाचा जन्म होतांच भैरवानें दिवा घेऊन पाहिलें तों त्याच्या हातावर खरोखरीच रेखत्रयांकित त्रिशूळ होता! त्र्यंबक मोठा झाला तेव्हां हा कोण्हाचा अवतार कोण जाणे असें मनांत घेऊन पिता 'मज न बोले दुरोत्तर। ना न संगे धुळाक्षर। मग विद्या कैचीं!' व्रतबंध झाला. 'विवाहाचे भरीं न पडेचि पिता!' त्र्यंबकाच्या आईचें नांव अंबावती असून ती भारद्वाजगोत्रांत जन्मलेली होती. भैरवानें अंबावतीस जवळ घेऊन त्र्यंबकाच्या हातावरचा त्रिशूळ दाखवून तिला सांगितलें कीं हा कोणी महायोगी जन्मास आला आहे. योगी म्हणजे काय याचा उमग नीट न पडल्यामुळें आईबाप दोघे भ्याले हें सांगतांना कवि म्हणतोः 'जीवां ईश्वरां संयोगु। द्वैतभेदाचा त्यागु। यासी बोलिजे राजयोगु। हा स्मरु त्या नाहीं.' मग मीच कांहीं स्वमतीनें शिकलों. कालगतीनें पिता निजधामास गेला—'पाठीं आह्मींच आपुला। गृहस्थधर्मु विस्तारला!' वडीलबंधु नृसिंह याचा कांहीं उपदेश घेतला, कमळाकर नामक पुरुषानेंही कांहीं प्रबोध दिला. अनेक सज्जन पाहिले पण माझा कोठें पुरा विश्वास बसेना! मग चंडीची उपासना सुरू केली. खाणेंपिणें, निद्राजागर इकडे लक्ष ठेविलें नाहीं. १६ वे रात्रीं 'पांचा वरुषांची कुमरी' प्रगट होऊन तिनें सप्तशृंगीवर जाण्यास सांगितलें! सप्तशृंगीवर 'महामायेचा रहिवासु। ह्मणौनि नांदे श्रीसिद्धेशु' तेथें जाऊन ध्यान धरून बसल्यावर तिसऱ्याच रात्रीं अंबा प्रसन्न झाली! अंबेपाशीं त्र्यंबकानें ब्रह्मज्ञान मागितलें. 'कृपावछल भवानि। करें स्पर्शले वदनीं' आणखी एक चमत्कार झाला. 'जो ब्रह्ममूर्ति आकारु। तोही प्रसन्न जाला सिद्धेश्वरु। मस्तकीं ठेविला करु। द्विजवेषें' त्यानें पांच वचनें सांगितलीं त्यांचाच विस्तार मी बालबोधग्रंथांत केला आहे.

त्रिलोचन शंकरानें मला ब्रह्मज्ञान दिलें. ' पाठीं प्रकाशु करुनि । कांहीं येक दाविलें लोचनीं । जें भरलें दिसे आम्हुनी । दृष्टी सृष्टी ॥ मनसहित इंद्रियें सकळें । जालिं सुखपात्रें निर्मळें । याचा वेचु कोण्हे काळें । नाहिं तया ॥ प्रसन्न करितां भवानी । अवचित जोडले शूळपाणी । फिटली सर्व सिराणी । अप्रयासें ' भवानीला प्रसन्न करूं गेलों तो ' श्रीशंकरे-सहित भवानी । पुढारली आह्मां!' त्यांच्या प्रसादामुळें 'उन्मळले—लोचन'—आंतला ज्ञानाचा डोळा उघडला व ब्रह्मानंदु प्रगटला. ' महासुखाचा संचारु । निरसला स्वप्नसंसारु '—भानावर आलों तरी समाधिसुख दाटून राहतें. इकडील ह्म० संसारांतला स्वाद घेत असतांनाहि सर्वेंद्रियांत ब्रह्मानंद भरून वोसंडतो. ' फुल फळपणें सरे । आमोदु सन्मंत्री उरे । तेवीं आजन्मपर्यंत बा रे । सुखचि सर्व !' असो. हेंच भूमंडळीं पसरण्या-साठीं ग्रंथ लिहिण्याची जगदंबेनें आज्ञा केली. श्रोत्यांस कवीनें ' माझिये स्तुतीचेनि पाडें । न पडावे भिडे । शुद्धाशुद्ध तेवढें । निवडावे जी ' अशी मोकळ्या मनानें प्रार्थना केली आहे.

**' बाळबोध '** ह्या ग्रंथाचे आद्यखंड, मध्यखंड व उत्तरखंड असे तीन खंड असून प्रत्येक खंडात १५ ह्याप्रमाणें एकंदर ४५ कथनें आहेत व संपूर्ण ग्रंथाची ओवीसंख्या ५२४० आहे. प्रस्तुत ग्रंथांत वेदांताचा सोज्वळ उपदेश सुबोध वाणीनें केलेला आहे. वेदांताची पठडी ज्याला माहीत आहे व उपनिषदांशीं ज्याचा खोल परिचय आहे त्याला प्रस्तुत ग्रंथ आनंददायक वाटेल. सामान्य वाचकांस तो दुर्बोध वाटेल यांत नवल नाहीं. तथापि ग्रंथाची भाषा सोपी आहे. ह्या ग्रंथांत प्रणवो-पासना ह्म० ओंकाराची उपासना मुख्यतः सांगितली आहे व तिला धरून योगमार्गही सांगितला आहे. हा निर्गुणोपासनेचा उर्फ ज्ञानमार्गाचा ग्रंथ आहे. वेदतांची चर्पटपंजरी ग्रंथकारानें केलेली नसून स्वानुभवाचा रंग साऱ्या ग्रंथावर उमटला आहे, म्हणजे ग्रंथ शाब्दिक पांडित्याचा नसून अनुभवाचा आहे. मुकुंदराजाचा विवेकसिंधु व त्र्यंबकरायांचा हा

बाळबोध हे दोन्ही ग्रंथ एकाच जातीचे असून ह्या दोन्ही ग्रंथांचा पुढें समर्थांच्या दासबोधावर संस्कार घडलेला दिसतो. ह्या ग्रंथांत प्रणवाचे स्वरूप, पंचीकरण, सृष्टीची उत्पत्ति आणि प्रळय, देहाची उत्पत्ति, षट्-चक्रांचें विवरण, अष्टदेहनिरसन, जीवब्रह्मैक्यप्रतिपादन, अष्टांगयोग, माया-अविद्यालक्षण, ब्रह्मचतुष्टय, ब्रह्मसाक्षात्कार इत्यादि विषयांचें सोपपत्तिक व अनुभवाच्या अंगासह विवरण केलें आहे. ग्रंथ पूर्णपणें अद्वैतमार्गाचा आहे. लोक प्रायः बहिर्मुख झाल्यामुळें ह्या ग्रंथाची बूज ठेवणारे सांप्रतच्या काळीं सांपडणें कठिण आहे, पण म्हणून ग्रंथाची योग्यता कमी होते असें नाहीं. पहिलें मंगलाचरण झाल्यावर कर्त्यानें तीनही खंडांतल्या प्रतिपाद्य विषयांची अनुक्रमणिका दिली आहे. ह्या ग्रंथाला बाळबोध हें नांव कां दिलें, बाळ कोण व बोध कोणता, "मुख्य ब्रह्म कवण। सगुण कीं निर्गुण। सर्वस्थ सर्वांसमान। कीं एकदेशी ? ॥" ब्रह्मीं जीवाचा भेद कीं ऐक्यता, प्रकृतिपुरुषांचें लक्षण काय, 'ब्रह्म निर्विकार निर्गुण। कैसें जालें तें सगुण। माया येकदेशी कीं संपूर्ण। (व) ते निवडिली कैसी ?' महत्तत्व काय, अहंकारापासून तत्वें कशीं उत्पन्न झालीं ? 'हिरण्यगर्भु जगदीशु। देहइंद्रियें प्रकाशु। परस्परानुप्रवेशु। कैसा जाला ? ॥ कवण योगें जागृति। कवणे प्रवर्ते स्वप्नस्थिति। कवणे प्रकारे सुषुप्ति। तुरीया ते कैसी ?॥' इ० प्रश्न पहिल्या खंडाच्या अनुक्रमणिकेंत दिले असून पुढील दोन खंडांच्या अनुक्रमणिकेंत त्या त्या खंडांतल्या प्रतिपाद्यविषयांची ओळखण करून दिली आहे. हे सारे प्रश्न अतिशय मोठे आहेत व आजच्या चिकित्सक व चोखंदळ युगांत बाळबोधानें आजच्या जिज्ञासूचें पूर्ण समाधान न झालें तरी त्याच्या विचाराला ह्या ग्रंथाच्या वाचनानें चांगली चालना मिळेल यांत संशयच नाहीं.

बाळबोधाच्या मंगलाचरणांत श्रीसिद्धेश्वर व भवानी या आपल्या उपास्यांना नमन करून मग ग्रंथकारानें श्रोत्यांची प्रार्थना केली आहे. पूर्वखंडाची शके १५११ मध्यें नकललेली प्रत मला मिळाली असून त्या प्रती-

बरहुकूम मी प्रस्तुत ग्रंथ छापला आहे असें चांदोरकर यांनीं लिहिलें असल्यामुळें नाथकालीन मराठीभाषेचा नमुना म्हणूनही पुढील ओव्या पहाव्यात.

अनादिमूर्ति श्रीसिद्धेशा । प्रकाश स्वयंप्रकाशा ।
जगदात्मया जगदीशा । जगत्पूर्णा ॥ २ ॥
जे हे प्रपंचउभारणी । ते तुजपासोनि तुझां स्थानीं ।
जैसी [1]अंबरा बिंबे वाणी । निजतंतुसी ॥ ४ ॥
शक्ति तुझां [2]अहंभावीं । तुं शक्तिचक्रांचा गोसावी ।
रूपें धरूनि मायावी । प्रकट होसी ॥ ५ ॥
ते माया तुझेनि घटे । तुं न भुलतां देहो फुटे ।
येरां वाजे [3]कांविटे । संसाराचें ॥ ६ ॥
इंद्रादिकें बापुडीं । अखंड जीचां [4]बांदोडी ।
ते मायादेवीचि प्रौढी । कवण जाणे ॥ ७ ॥
जे ब्रह्मीं ब्रह्म संचली । वाढोनि विश्वाकार जाली ।
ते मोटकी सामावली । सप्तशृंगीं ॥ १३ ॥
[5]सप्तचक्रें आदिवंतें । तें शृंग अधिदेवतें ।
वाटिका मातृका तेथें । शबळचंडीं ॥ १४ ॥
ते भवानी चंडिका । या जगा जगदंबिका ।
आदिद्रष्टु तुं त्रिंबका । श्रीसिद्धेश्वरू ॥ १७ ॥
तुमचेनि अभिवंदनें । ज्ञान होय [6]हातधरणें ।
म्हणौनि आरंभि [7]येषणें । अंतःकरण ॥ १८ ॥
तुम्हीं पुरस्काराल हे वाणी । तै वाचा होईल [8]ताम्रपर्णी ।
ते मोलातीत पिकेल खाणी । शब्दरत्नाची ॥ २१ ॥

---

१ वस्त्राचा वाण ह्म० रंग जो तोच त्याच्या तंतूचा वाण असतो. प्रपंच ह्म० विश्व शिवस्वरूपच आहे. २ स्फुरणांत, एकोहं ह्या स्फूर्तीतच मायेचें रूप आहे. ३ कांव, तडाखा. ४ बंदींत. ५ आधारादि सहा चक्रें. ६ हस्तगत, एवढें. ८ ?

**यावरी स्मरलें निकें । तुम्हीं सर्वांचीं [९]मूळिकें ।**
**तुमचा नमनीं सकाळेकें । नमस्कारिलीं म्या तें ॥ २६ ॥**
**मूळिं पावलीया पाणी । शाखापल्लवा होय धणी ।**
**फळें घेईजती वोढोनि । दंठाग्रिचीं ॥ २७ ॥**

शेवटच्या दोन ओव्यांवर ज्ञानेश्वरांच्या वाणीची छाया पडलेली आहे. श्रोत्यांची प्रार्थना करितानां कवि गोड वाणीनें म्हणतोः—

**तुम्हीं [१०]वोळा कृपाबिंदें ॥ तैं वाचावल्ली [११]पेलील दोंदें ।**
**रसनाडेखीं पदें । पुष्पें येती ॥ ३८ ॥**
**तुम्हा ज्ञानगिरीचे डोहो । आम्ही गौरवस्नान लाहों ।**
**तेणें तुम्हां सन्मुख राहों । अर्थ्यें [१२]वचनें ॥ ३९ ॥**

त्र्यंबकरायांनीं आपल्या ग्रंथांत नाना भेदमतांचा गलबला कसा झाला आहे हें सांगतांना शिवालाच उपास्य मानून षडक्षरी मंत्राचा जप करणारे व लिंगधारण करणारे लिंगाईत, देहपूजक व नास्तिक चार्वाकमतानुयायी, प्रकृतीला मूलतत्व मानून आत्मा हा तत्वसंयोगांचा परिणाम मानणारे सृष्टिवादी, केशलुंचन करणारे जैन, भक्ष्याभक्ष्यादिकीं दुफळी न मानणारे कापालिक, तसेच 'भटमार्गी' व 'लीलाचरित्राचे' गायक महानुभाव, आचांडाळ भिक्षा मागत फिरणारे कानफाटे, खेचरीअगोचरींचे थोतांड माजवून 'बापुडे लोक भोंदणारे' योगी, त्याचप्रमाणें शिवविष्णूंत भेदभाव वाढविणारे शैव व वैष्णव, तसेच 'नैय्यायिक दर्शन । तया कर्तव्यप्रमाण', मीमांसक, पुराणिक इत्यादि प्रकार सांगितले आहेत. 'जे जन्मपर्यंत भेदसागरीं । डहुळत राहिले माझारी । ते पूर्णतेचा तीरीं । सुखावती कैंचे?' शब्दछल करणारे व वांदागें वाढविणारे विद्वान् विपुल आहेतः 'सांडोन सर्वांगा सकळा । क्षत पाहे

९ विश्वाचे पहिले मायबाप. १० कृपाबिंदूची वृष्टि कराल. ११ पुष्ट होईल. १२ आर्षवचनें, बाळाचे बोबडेबोल बोलून.

काउळा । माशिचाही जिव्हाळा । तेचि ठाईं । ’ असो. तत्वमस्यादि महावाक्यबोधानें ‘ जेणें चुके लोकापवादु । निरसे संसारबंधु ’ असें एक अद्वैतप्रतिपादक वेदांतशास्त्रच सत्य होयः–‘ जेथ होय विध्वंसन । सर्व मता. ’ इतर मतें तीं जंबुकें व अद्वैतशास्त्र हा भवगजपंचानन होय ! त्याचा बोध सर्वांना व्हावा ‘ यास्तव बहुतांच्या उपकारा । कृपा उपजली शंकरा । उघडावया मोक्षद्वारा । हे कीली दिधली. ’ श्रीशंकराच्या कृपेनें ‘ गुरूचीं जें गुह्यज्ञानें । तें उजाळिलीं येणें । बाळबोधें. ’ हा ग्रंथ लोकोद्धारार्थ अवतरला आहे–‘ हें मऱ्हाटें परी बरवें । शास्त्रदू( दो )हन आहे ’–किंबहुना ‘ आत्मा आत्मत्वें गिवसी । ते हें शास्त्र ! ’ पण म्हणून हा ग्रंथ रुक्ष नाहीं, हा सरस आहे. ‘ हें शास्त्रगौचें दुग्ध ’ आहे म्हणजे शास्त्ररूप कामधेनूचें ताजें दूध आहे. यांत निर्धार ह्म० निश्चयात्मक ज्ञान आहे, संशयाचें ज्ञान नाहीं–‘ चातुर्यता वरी उपदेशु । निर्धारु आणि ज्ञानप्रकाशु । सद्विद्या आणि सुरसु । तो हा ग्रंथ. ’ उत्तम दृष्टांतांनीं सरसपणास आलेलें कवित्व यांत आहे. हें सप्रमाण व अनुभवाचें बोलणें आहे. दुसऱ्याच्या मत्सरानें भरलेलें कवित्व तुच्छ होय. येथें ‘ सहजचि वोवी । वोविली एईल ’ निर्मळ कवित्वाचें लक्षण हें आहे– ‘ जैसी संतानार्ची वोलि । किं महामणींची प्रभावळि । किं कर्पुराचा रवाळी । अंतर्बाह्य ’–कल्पवृक्ष आंत बाहेर ओला ह्म० सरस असतो; दिव्य रत्नांची प्रभा किंवा कापुराची रवाळता तसें उत्तम काव्य निर्मळ असतें. ह्या ग्रंथांत अद्वैतनिरूपण पूर्ण असून वर्णव्यवस्था पाळावी असाही याचा कटाक्ष आहे. ‘ समर्थ वेदाची आज्ञा । ते पाळावी सर्वज्ञा । यास्तव कर्माची संज्ञा । सांडो नये ॥ दाटोनि कर्मे चाळिती । ईश्वर आज्ञा पाळिती । वर्णसंकर चुकविती । महामहंत ’ असें यांत संतांचें लक्षण सांगितलें आहे. विश्वजनकानें सृष्टि केली तेव्हांच ‘ श्रौतें स्मार्तें नित्यें नैमित्यें । कर्में प्रसिद्धें विहितें । विधिनिषेध अनंतें । तींचे नेमिले । ’ ज्यानें त्यानें स्वधर्मानें वागलेंच पाहिजे. ‘ जो स्वजाति वाले ( वाळी,

टाकी ) । अन्य जाति कवलि । तो प्राणी कोण्हे काळीं । पवित्र नोहे ' असा दंडक असल्यामुळें ' स्वधर्मरहित होऊंच नये, ' वर्णसंकर करूंच नये. सार्वत्रिक धर्म– ' तीर्थ व्रत दया दान भक्ति । हे ग्राह्य सर्व ज्ञातिं । वरि असिजे ब्रह्मस्थिति । हा विशेषगुण. ' सर्वांनाच आपल्या जातिधर्मा- प्रमाणें चालण्यांत गति आहेच मग ' लोकप्रवृत्ति कां न राखावी ? '

**आम्हां हेचि दिवाळी । आजि जिव्हेचां परेळीं ।**
**तुम्हां सज्जनांतें वोवाळीं । शब्दरत्नीं ॥ ४० ॥**
**जी तुमची प्रसन्नता । उल्लास पावे वाग्देवता ।**
**ते पदें प्रसवेल पूर्णता । ब्रह्मविद्येची ॥ ४१ ॥**

रसवेत्ते अशा ' श्रोतेविण कविता ! शोभे केवि ! ' शृंगाराचा दृष्टांत देऊन कवि विचारतोः ' स्वकरें कुचमर्दनीं । संतोष न पवे कामिनी । तेवि श्रोतियावांचूनि । दीन वक्ता ! ' अनुकूल वाऱ्याच्या लाटांनीं नाव समुद्रांत चालतें त्याप्रमाणें जाणत्यांच्या संवादसुखामुळें कवीचें बोल स्फुरतात. श्रोतेसूर्य न मिळाले तर वक्त्याचें शब्दरूप नेत्र अंध होतात.

**जो अर्थ गिवसी श्रोता । तेचि पदीं वोडवी वक्ता ।**
**तो संवाद अमृता । उणें आणी ॥ ५२ ॥**

श्रोता जो अर्थ धुंडीत असतो तोच वक्त्याच्या मुखानें बाहेर आल तर त्या संवादांत जी माधुरी आहे तीपुढें अमृतही फिकेंच आहे द्राक्षाच्या आळ्यांत जे रंग घालावेत तेंच फळांत उमटतात त्याप्रमाणें श्रोत्यांचा स्नेहभाव हाच वक्त्याचा मुख्य जिव्हाळा होय. श्रोते समुत्सुक नसले तर वक्ता काय भिंतीशीं बोलेल ? ह्या ओव्या अत्यंत रसभरित व स्फूर्तीच्या आहेत. वक्त्याच्या वक्तृत्वाचा ओघ चालू असतां जो अर्थ श्रोता ' **गिवसीत** –' शोधीत, चांचपडत पाहत असतो —तोच नेमका वक्त्याच्या मुखांतून येताना श्रोत्या–वक्त्यांना, जो आनंद होतो तो अपार आहे. हा अनुभव मोठा रमणीय आहे. कविता शुद्ध आहे का अशुद्ध आहे, कवि भक्त आहे कां अभक्त आहे, हें श्रोत्याला

कळणार नाहीं तर तो श्रोता कसला ? 'एकवटलेया पयपाणी। हंसने घे निवडोनी । तो हंसु हंसपणीं । वाखाणूं नये !'

ग्रंथसमाप्तीच्या वेळीं त्र्यंबकरायांनीं कवितेचा हेतु काय हें दाखविलें आहे. ते ह्मणतात कीं 'नानाशास्त्रांचें दोहन' करून हा ग्रंथ मी शिष्यप्रबोधार्थ लिहिला आहे. 'प्रकाशेविण बोलणें । तें जळों लाजिरवाणें । जें प्रत्यक्ष अंगीं बाणे । तेंचि घ्यावें.' ज्यांत शुद्ध स्वानुभवाचें ज्ञान नाहीं तो ग्रंथ ह्मणजे जळेविण सरोवर, फळेविण उद्यान, गंधहीन पुष्प तसा समजावा ! 'परमार्थेविण । बोले सर्व अकारण । जैसें सरस पक्क इंद्रवन। असेव्य होय—' परमार्थावांचून सारे बोल दिसायला सुंदर पण चवीला कडू अशा इंद्रवनफळासारखे होत ! आत्महित ज्यांत नाहीं अशी कविता व कवि हे कलेवांचून चंद्र, तारुण्यावांचून नायक, नियमावांचून तापसी, निग्रहावांचून संन्याशी, क्षात्रवृत्तिवांचून राजा किंवा अंतर्निष्ठेवांचून ब्राह्मण—तसे विशोभित होत ! ज्ञानगर्भ नाहींत ते बोल ऐकूंच नयेत. हा बालबोध ग्रंथ, कवि सांगतो, तसा फोल नाहीं. येथें मूर्तिमंत ज्ञानच पाझरलें आहे. ही ब्रह्मसृष्टि आहे. 'वाचा वोचिले शब्दहिरे.' हें श्रवण श्रीमंतांच्या कानांला उत्तम अलंकार आहेत. 'असो हे केली ग्रंथवोवनी । परि जो वोविला शब्दमणी । तो नाहीं आला परतोनि । माळिके ये.' ग्रंथ मराठी पण गुरुकृपेचा असल्यामुळें 'संस्कृताचा गोडिवा येथें आहे.'

**हा अबुधाचे अर्थ हरी । प्रबुधा ( प्रबुद्धां ) उजळणी करी ।**
**ज्ञानावरी ज्ञान भरी । बाळावबोधु हा ॥**
**'गुरु बोले गुरुपणें । बोलु बोलातें जिणे ।**
**आनंदासी पाहुणे । आनंद होतो ॥**
**हें अज्ञानतमा निरसी । ज्ञानप्रकाशुही प्रकाशी ।**
**ते हे समर्थ सुदेशी । सर्वज्ञपणें ॥**
**वेदशास्त्रद्रुमवल्ली । तेथींचि पुष्पें यें गुंफिलीं ।**
**जे आमोदगुणें आथिली । मकरंदबोधें ॥**

**संसारमूळछेदकें । तेचि शास्त्रें अलोकिकें ।**
**ते घेईजाति कौतुकें । हितार्थालागीं ॥**

असेच आत्मप्रत्ययाचे उद्गार कवीनें आपल्या ग्रंथांत अन्यत्रही काढले आहेत. आदिखंड पुरा झाल्यावर त्याला वाटलें कीं 'हे मऱ्हाठें परी बरवें । शास्त्रदोहन आहे !'

**येणें शिष्या ज्ञान घडे । हे नवल नाहीं येवढें ।**
**गुरूचेंही गुरुत्व वाढे । ते हे कथा ॥**
**पणे सद्‌गुरु उद्धरे । हें सत्यचि निर्धारें ।**
**पतीतुही मोक्षद्वारें । चाले ये कथे ॥**

हें ऐकता 'मोक्ष घरचाच आहे असें वाचकांस वाटेल. 'स्त्री वृद्ध तरुण बाळ । शुद्र वैश्य आदिकरुनि सकळ'— सर्वांना हें तारणारें आहे, बहिर्मुखाला मात्र हें सांगूं नये !

**चातुर्यता वरी उपदेशु । निर्धारु आणि ज्ञानप्रकाशु ।**
**सद्विद्या आणि सुरसु । तो हा ग्रंथ ॥**

हा शिव व भवानी यांच्या कृपेचें फळ आहे. हा योगविद्येचा ग्रंथ असून यांत ठायीं ठायीं भक्तीचीही माधुरी आहे. मध्यखंडाला प्रारंभ करितांना कवीनें देवापाशीं 'तुझ्या दास्यासी गोडी' मागितली. 'याहीवरीं वो आमुतें । ह्मणे आपुले विश्वमाते' हा उद्गार तर 'एक बार मुखसे कहो । तुलसीदास मेरा' ह्या तुलसीदासांच्या उक्तीची आठवण देतो. कवि देवीचा निस्सीम भक्त आहे खरा. देवी त्याच्याशीं बोलते, त्याला 'सूचना' व 'प्रेरणा' देते. देवाधिदेवतेच्या ध्यानीं मन ठेविलें 'तों भवानी प्रगट झाली' व म्हणाली कीं ही स्तुति पुरे कर व 'तूं आधीं नमस्कारीं शंकरातें.'

**त्या श्रीसिद्धेश्वराच्या आचोळा । ज्यां तुज घातले रे बाळा ।**
**तेणें सांगितले सकळां । प्राप्त करी ।**

मध्यखंडाच्या शेवटीं कवि ह्मणतो कीं, ह्या 'बाळबोधानें सर्व गुह्य ज्ञानें उधळलीं' आहेत.

**यास्तव बहुतांच्या उपकारा । कृपा उपजली शंकरा ॥**
**उघडावया मोक्षद्वारां । हे कीली दीधली ॥**

'ईश्वरज्ञाना आधार' असा हा 'भैरवात्मज त्रिंबकविरचित बालबोध' ग्रंथ शके १४९४ अंगिरा संवत्सर फाल्गुन शुद्ध ५ ह्या दिवशीं लिहिण्यास आरंभ केला व त्याचें लेखन शके १५०२ बहुधान्य संवत्सर चैत्र शुद्ध १ ह्या दिवशीं समाप्त झालें. मध्यंतरीं एकदा ग्रंथ सिद्ध झाल्यावर एका संन्याश्यानें प्रीतीनें पण 'तस्करहेतु' धरून म्हणजे चोरून नेला! तेव्हां 'पुनरपि जगन्माता । ग्रंथु रचिला मागुता । यास्तव नयेल साम्यता । दोहीं प्रतींसी!'– देवीच्या कृपेनें कवीनें हा ग्रंथ पुन्हा रचिला. दोन्ही प्रतींत अर्थातच थोडाफार फरक पडणारच!

येथवर त्र्यंबकराज व त्याचा बाळबोध ग्रंथ याविषयीं त्याच्याच वचनाधारें विवरण केलें. आतां त्याच्या विस्तृत ग्रंथांतील १।२ उतारे देतों.

( १ ) उत्तरखंडाचें मंगलाचरण बहारीचें आहे. तें मूळांत पहावें:—

**सजयति जयशृंगारा । जगद्रूपा जगदीश्वरा ॥**
**जगतारका माहेरा । अनादिसिद्धा ॥ १ ॥**
**तुझें स्वरूप गहन । कोण घेते प्रमाण ।**
**देवा! जी तुजवांचून । कांहींचि नसे ॥ ४ ॥**
**तूं विश्वरूप साचार । ऐसें निरंतर देखे ॥**
**अगा हें तुझेंचि शरीर । अनेक जालें ॥ ६ ॥**
**वर्तुळ लंब सान वाड । कुब्ज पीन घन रोड ॥**
**थीर ( स्थिर ) जंगमादि जड । रूप तुझें ॥ ७ ॥**
**ऐसें रूप नानाकार । जों मी पाहे साकार ॥**
**तों आश्चर्य थोर । जालें येक ॥ १४ ॥**
**या स्वरूपा-अंतर्गत । देखिलें निर्गुण सदोदित ॥**
**एवं उभयमिश्रित । तूंचि होसी ॥ १५ ॥**
**हा कोणें निर्धारें आकळूं । तों निर्धारुचि होय पांगुळु ॥**
**कोण्हेंही भेदें मळु । न लगे यासी ॥ २४ ॥**

**कोणतें घेऊं दर्शन । कोणाचें करूं भजन ॥**
**मंत्र स्तोत्र पठणा । कोण नेमें ॥ २७ ॥........**
**न लगे वासना जाळावी । ना यें इंद्रियें मारावीं ।**
**देहदमनाची गोवी । न पडे येथें ॥ ३८ ॥**
**हा सहजाचि लाहिजे । उपाधि ते काय कीजे ? ।**
**समताबुद्धी ध्याइजे । या देवातें ॥ १९ ॥**

( २ ) भूतदया, अहिंसा व गृहस्थधर्म यावर उत्तरखंडांतलें विवरण फार चांगलें झालें आहे.

**हा आत्मा जाणोनि प्रवृत्ति । भलें भजावें सर्वभूतीं ॥**
**ये भूतदयेपरती । दशा नाहीं ॥**
**क्षुधार्थी भोजन । दुर्बलां दीजे दान ॥**
**नझांसी ( नग्नांसी ) प्रावरण । याचिपरी ॥**
**जळीं वनीं हुताशनीं । राजद्वारीं रिपुस्थानीं ॥**
**येथ पिडे तो प्राणी । राखितां भला ॥**

ह्या तीन ओव्यांत भूतदयेचें आचरण उत्कृष्ट सांगितलें आहे. ‘ भूत दयेपरती । दशा नाहीं ’ हा सिद्धांत बहारीचा आहे. ‘ ऐसा भूतभजन नरु । तो देवाचा अवतारु ’ यांत शंकाच नाहीं. म्हणून ‘ अहिंसा ’ हा भल्यांचा धर्म ठरतो.

**पाहतां हिंसेपरतें । पाप नाहीं निरुतें ॥**
**कां जे आत्मरूपें भूतें । पीडा पावती ॥**
**जीव आदि करूनि मशक । वनस्पती तृणादिक ॥**
**यांचें दुःख सकळैक । स्वयें मानी ॥**

अहिंसेचें आचरण हें ‘ धर्मभूषणांचा कळस ’ आहे. आतां गृहस्थ-धर्मांत दळण, कंडण, मार्जन इ० प्रसंगानें हिंसा घडते. ब्राह्मणालाही होमहवनउद्यापनासाठीं पत्रपुष्पफलादि लागतात. क्षत्रियाला तर वरील अहिंसा पोटाशीं धरून चालायचेंच नाहीं.

**क्रूर दुष्ट रिपु तस्कर । यांचे करावे संहार ॥**
**न करितां पतन थोर । क्षात्रधर्मा ॥**

चारी वर्णांना हिंसेपासून सुटतांच येत नाहीं मग 'अहिंसा साधावी कशी?' तर याला एक विचार दृढ करावा. चारी वर्णांना आपापले धर्म आचरीत असतांना हिंसा घडली तर तो दोष नाहीं!

**गृहस्थधर्मी दोषु घडे ॥ तो तेथिचेंचि धर्मे मोडे ॥**
**विशेषें पुण्यें जोडें । पुण्यपद ॥**

समूळ धर्म सोडून काष्ठासारखा पडून राहील त्याला मात्र अहिंसा घडेल, बाकी हिंसा टाकून वागतांच येणें शक्य नाहीं! 'कार्यावांचून' उगाच चैन किंवा लहर म्हणून काडीही तोडूं नये. अश्वमेधादि यज्ञ करणें हा तर क्षत्रियांचा धर्म आहे, यज्ञयागादि सर्व द्विजांचा धर्म आहे, आणि हें धर्म तर हिंसेशिवाय पाळतां येत नाहींत, म्हणून वेदाज्ञेप्रमाणें स्वधर्माचरण करणें हा मुख्य धर्म आहे हा सिद्धांत ध्यानीं धरून वागावें म्हणजे कोणताच दोष नाहीं.

**यागु करितां गहन ॥ न मनावें पशूचें दूषण ॥**
**भोजनार्थी शाख अन्न ॥ वर्जू नये ॥**

पंचसूनादोष हे गृहस्थाश्रमाचरणांत उरतच नाहींत. गृहस्थधर्मांत अनेक जीवांचें पोषण होतें, अनेक पुण्य परोपकार घडतात, म्हणून नित्यधर्माचें आचरण केल्यानें दोष उरतच नाहींत. 'वायाळ' ह्म० वृथा हिंसा करूं नये इतकेंच मनीं धरावें.

असो. हा बाळबोध ग्रंथ व त्याचा सिद्धेश्वरसांप्रदाय अनेकांना तारक झाला असला पाहिजे. याच सांप्रदायांत १५० वर्षांनीं निरंजनमाधव निर्माण झाले. त्यांनीं आपल्या 'सांप्रदायपरिमळ' ह्या ग्रंथांत (शके १६८५) लिहिलें आहे कीं बापजी पंडित हे बाळबोध ग्रंथ शिष्यांस पढवीत असतांना मीही त्यांजपाशीं हा ग्रंथ पढलों व त्यांच्यापासूनच ह्या सांप्रदायाची दीक्षा घेतली. निरंजनमाधव म्हणतातः—

**बाळबोध महाग्रंथ ॥ अखंड समागमीं वर्तत ॥**
**नित्य शिष्यांस पढवित ॥ अध्यात्मविद्या अतिगहन ॥**
**बाळबोध कपिलगीता । प्रणवार्थ बोधिला यथार्थता ॥**
**पंचीकरण महावाक्य सर्वथा । बोधिला समर्पक व्यक्तार्थे ॥**
**षण्मुखी खेचरी मुद्रा दोनी । दावोनि लक्ष नादानुसंधानीं ।**
**मुक्त केलें अर्धक्षणीं । कोटि जन्मीं जें साधिजे ॥**
**सद्गुरुच्या वरदानें । मज प्रत्यक्ष ब्रह्मदर्शन ।**
**अंतर्बाह्य दिसे पूर्ण । सत्य चिद्घन आस्तिभातिप्रिय ॥**
**सिद्धेशमत सांप्रदाय । स्थळस्थळीं कथिलाचि आहे ॥**
**भैरवसमुद्रोद्भव होय । सुधाकर-त्र्यंबकराज गुरु ॥**
**बाळबोधीं सांप्रदाय । स्वजन्मप्रभृति जो होय ।**
**तो कथिलाचि असे निश्चय । शिष्यबोधार्थ निजमहिमा ॥**

निरंजनमाधव सांगतात कीं आमच्या संप्रदायाचे ' प्रकाशक ' माध्यंदिन त्र्यंबकराज हे होत. यांनीं ' सप्तशृंगी देवी एकवीरा। अर्चिली कठिण तपें.' त्यांना देवी सातव्या दिवशीं प्रसन्न झाली व ' सिद्धेश्वरसहित दर्शन । देऊन हृदयीं प्रवेशली.' त्यांना श्रुतिस्मृति-उपासनाबळानें करतळामळवत् झाल्या. देवीच्या कृपेनें त्यांना सकळज्ञाननिधान ११ वे वर्षीं प्राप्त झालें.

**त्यांचा शोधोनि मथितार्थ । सर्व जनोपकारार्थ ।**
**बाळबोध महाग्रंथ । रचिला विश्वब्रह्मबोधार्थ ॥**
**त्रिखंडमंडित महाग्रंथ । कथनें पंचताळीस विख्यात ।**
**ज्ञानमंदार उगवत । मोक्षफळदायक ॥**

---

# १६ शिवकल्याण



## १ गुरुपरंपरा.

ह्या काळच्या ग्रंथकारांत शिवकल्याण हें एक मोठेंच धेंड होऊन गेले. यांची प्रसिद्धि यांच्या अमृतानुभवावरील 'नित्यानंदैक्यदीपिका' नामक उत्कृष्ट टीकेवरून विशेष आहे. ज्ञानेश्वरमहाराजांच्या अमृतानुभव ग्रंथावर ज्या गद्यपद्यात्मक टीका प्रसिद्ध झाल्या आहेत त्या सर्वांत शिवकल्याणांच्या प्रस्तुत टीकेची सर एकाही टीकेला नाहीं. ज्या योग्यतेचा मूळ ग्रंथ त्याच योग्यतेची टीका असा प्रसंग विरळच! पण प्रस्तुत टीका तशीच अत्युत्कृष्ट असून वेदांताच्या अभ्यासकांत तिची पहिल्यापासून लोकप्रियताही आहे. यांनीं दशमस्कंधावर सुमारें एक लाख ओव्यांचा प्रचंड ग्रंथ लिहिल्याचेंही प्रसिद्ध असून त्यांपैकीं श्रीकृष्णजन्माची पहिली पंचाध्यायी (ओवीसंख्या ३९२२), रासपंचाध्यायी (ओवी ४१७७), ब्रह्मस्तुति (ओवी २०५८) व वेदस्तुति (ओवी २६०१) मिळून चार प्रकरणें उपलब्ध झालीं आहेत. ब्रह्मस्तुति मात्र अद्याप छापली गेली नाहीं पण मी पाहिली आहे. अमृतानुभवटीका (ओवी ६३१०) व हीं चार भागवती प्रकरणें (ओवी १२७५८) मिळून यांच्या सुमारें १९।२० हजार ओव्या उपलब्ध आहेत. संपूर्ण दशक प्रसिद्ध होण्याचा योग केव्हां येईल तो येवो, तूर्त तरी शिवकल्याणांची माहिती ह्या एवढ्या प्रसिद्ध ग्रंथांवरून जेवढी होईल तेवढ्यावरच आपणांस संतुष्ट राहिलें पाहिजे. दशमाची पहिलीं दोन प्रकरणें 'ज्या मूळ पोथ्यांवरून' रा. गणेश बळवंत मोडक (वऱ्हाडांतील एक माजी शिक्षक) यांनीं अनेकांच्या साह्यानें छापलीं त्यांस शिवकल्याणांचा समग्र दशम मिळाला होता; म्हणजे शिवकल्याणांनीं दशमावर संपूर्ण टीका लिहिली होती यांत संशयच नाहीं. दशमटीका व अमृतानुभवटीका हे दोन्ही

जरी टीकाग्रंथ आहेत तरी ते स्वतंत्रप्रज्ञ व पूर्णानुभवी अशा सत्पुरुषाच्या वाणींतून प्रकट झाले असल्यामुळें त्यांची योग्यता फार मोठी आहे. दशम संपूर्ण मिळता तर फार चांगलें झालें असतें.

अमृतानुभवटीकेंत शिवकल्याणांनीं आपली व आपल्या गुरुपरंपरेची थोडीशी माहिती दिली आहे. त्यांची गुरुपरंपरा मुक्ताबाईकडून आलेली आहे.

आदिनाथ शंकर–मच्छेंद्रनाथ–गोरक्षनाथ–मुक्ताबाई–वटेश्वर चांगा–चक्रपाणी–विमळानंद–केशवदास चांगा–जनकराज–नृसिंह–हृदयानंद–विश्वेश्वर–केशवराज–हरिदासस्वामी–परमानंद–नित्यानंद–शिवकल्याण.

गोरक्षनाथांचा साक्षात् उपदेश मुक्ताबाईला झाला. गोरक्षनाथ ज्ञानेश्वरमंडळास प्रत्यक्ष भेटले होते असें मी पहिल्या खंडांत लिहिलें आहेच. गोरक्षनाथ–गयनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञानेश्वर ही ज्ञानेश्वरांची परंपराही शिवकल्याणांनीं दिली असून 'तो हा ज्ञानेश्वर पूर्ण । आमुचे कुळीं मंडण ' असें म्हटलें आहे आणि ज्ञानेश्वरांमुळें ही परंपरा विश्वांत विख्यात झाली आहे हें उघडच आहे. हरिदासस्वामीसंबंधानें शिवकल्याण लिहितात कीं 'तो मातापुरप्रदेशीं । प्रकट कैवल्याची राशी । तेथें बहुतां मुमुक्षांसी । पावनता जोडे.' आतां ह्या परंपरेंतले नित्यानंद हे अंबानगरी ह्म० जोगाईचे आंबे येथें राहत असत. ते 'योगीजनविश्रामस्थान' होते ह्म० अनेक योगी व भक्त त्यांचे शिष्य होते. यांचें उपनामही 'नित्यानंद ऐसेंच पूर्वापार चालत' आलें होतें. शिवकल्याणांचा हा विद्यावंश. त्यांचा मांसवंश–कमलाकर–चिंतामणि–त्रिमल उर्फ नित्यानंद असा आहे. ही त्यांची पितृत्रयी होय. अर्थात् नित्यानंद उर्फ त्रिमल हे त्यांचे जनक व गुरु होत! बापच परमार्थदाता सद्गुरु असे प्रसंग विरळ असतात. जनकानें पुत्रास जन्म द्यावा आणि आपलें अध्यात्मधनही देऊन त्याला जन्ममरणपरंपरेंतून सोडवावें असे प्रसंग विरळच!

**माझा संभवही येथेंचि । पाळणही केलें तेणेंचि ।**
**आपलाही रूपीं रुचि । लाविले तेणें ॥ ३७६ ॥**

**ते गोडी मिथां लाधोन । विसरोन गेलें देहभान ।**
**पिता होत्साता जाण । गुरुवर्यें कीं !॥ ३७७ ॥**
**पावलों नित्यानंदावलोकन । येणें अवघेंचि शिवकल्याण ।**
**अकस्मात् लाधलों खूण । अनुभवामृताची ॥ ३७९ ॥**

ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे ग्रंथ त्यांना नित्यानंदांनींच पढविले व स्वस्वरूपाची गोडी लाविली. विद्यागुरु व मोक्षगुरु तेच. अमृतानुभवावरील ओवीबद्ध टीका लिहिण्याची आपणांस कोणाकडून मूळ प्रेरणा झाली हें सांगतांना ते पुढेंच ( नित्या० प्रक० १० ) लिहितातः—

**गोदातीर उत्तरभाग । देवगिरी नगर सुभग ।**
**धारागिरीपर्वतेसी योग । जया नगरासी ॥ ३८१ ॥**
**तेथें याज्ञवल्की श्रीमंत । श्रीगोपाळ श्रीकृष्णसुत ।**
**तपोयोगाचे अधिभूत । ज्ञानाधिष्ठान ॥ ३८२ ॥**
**तयाची गोडी फळा आली । म्हणोनी विवरणा हांव झाली ।**
**नाना ते हांव सामावली । विवरणीं इये ॥ ३८४ ॥**

देवगिरी उर्फ दौलताबाद प्रख्यात आहे. त्याच्या नजीकच धारागिरी नामक पर्वत आहे. त्या पर्वतावर कृष्णयाज्ञवल्कींचे पुत्र गोपाळ याज्ञवल्की राहतात. त्यांचा अधिकार फार मोठा आहे. ' तपोयोगाचे अधिभूत । ज्ञानाधिष्ठान ' असें शिवकल्याणांनीं त्यांचें गौरव केलें आहे. अमृतानुभवावर ओवीबद्ध टीका करावी असा ' तेणें मनोरथ केला । तो स्वामी माझेनि स्वीकारिला ' ह्य० त्यांनीं मनोरथ व्यक्त केला व माझे गुरु श्रीनित्यानंद यांनीं त्यास संमती दिली असें शिवकल्याण सांगतात. त्यांनीं पूर्वी अमृतानुभवावर गद्यग्रंथ लिहिला होता व ग्रंथान्वय, ग्रंथार्थसंक्षेप सारा मऱ्हाठी गद्यांत सांगितला होता तथापि—

**मागुता श्रीगोपाळमनोरथ । जे ओवीबद्ध होवावा ग्रंथ ।**
**जो कां श्रवणापठणा उपयुक्त । प्रेमळां जना ॥ ३९३ ॥**
**नाना तो गोपाळ सज्जन । त्याचें लाहोन कृपावधान ।**
**तेंचि जालें जीवन । विवरणासी यया ॥ ३९४ ॥**

गद्यग्रंथ लिहिण्याची तेव्हां फारशी प्रथा नसल्यामुळें व श्रवणपठणास पद्यरचना अधिक सोयीची असल्यामुळें शिवकल्याणांनीं आपला ओवी-बद्ध ग्रंथ गोपाळ याज्ञवल्की यांच्या प्रेरणेनें गुरूच्या संमतीनें देवगिरीस लिहिण्यास प्रारंभ मात्र केला पण त्याची रचना व समाप्ति झाली पंढरपुरास श्रीविठ्ठलचरणापाशीं !

**तया गोपाळ संनिधानीं । आरंभिली हे शब्दवोवणी ।**
**मग कोण्हीएक काळ धरूनी । उगाचि होतों ॥ ३९८ ॥**
**मग वैराग्यभीमरथीतीरीं । परमशांति जे पंढरी ।**
**जे बोधविठ्ठलें पुरी । अधिष्ठिली असे ॥ ३९९ ॥**
**पूर्वील अन्वय धरून । येथें केलें ग्रंथावसान ।**
**जेथें अधिष्ठात्री सज्जन । महानुभवें जी ॥ ४०० ॥**

कृष्ण व गोपाळ याज्ञवल्क्य यांचेविषयीं विशेष हकीकत १८ वें प्रकरणांत येईल.

---

## २ कालनिर्णय.

ही ग्रंथरचना ' माझे आग्रहेवीण उगवली, ' ' ही ग्रंथवोवणी प्रवाहें आली ' असें कवीनें ४।५ वेळ म्हटलें आहे. आतां ग्रंथरचनाकालः—

**कलियुग प्रथम चरण । विख्यात शक शालिवाहन ।**
**पंधराशत सत्तावन । संवत्सरगणना ॥ ४२९ ॥**
**युवनाम संवत्सर । जेथ शुभफळाचा पडिभर ।**
**मार्गशीर्षमास शिशिर । पौर्णिमेसी ॥ ४३० ॥**

शके १५५७ मध्यें मार्गशीर्ष पौर्णिमेस पंढरीस ह्या ग्रंथाची समाप्ति झाली. मुक्ताबाईपासून शिवकल्याण हे चौदावे पुरुष येतात. म्हणजे दर-पिढी २५ वर्षांची धरल्यास शक १२१८ ( मुक्ताबाईंचा समाधिकाल ) पासून १३ पिढ्यांस ३२५ वर्षें लागतात. शक १२१८ + ३२५ = १५४३. कवीची दशमावरील टीका अगोदर त्याच्या मध्यवयांत लिहिली गेली व शेवटीं अमृतानुभवटीका ' परिणतप्रज्ञ ' झाल्यावर लिहिली गेली. यास एक प्रमाणही आहे. ब्रह्मस्तुति ह्या भागवतीप्रकरणाचा रचना-

काल त्यांनींच ' विक्रम शक १६६२ रौद्रनाम संवत्सर श्रावण शुद्ध १५ रविवार ' हा दिला आहे. ब्रह्मस्तुति अर्थात् शक १५२७ मध्यें रचिली गेली. ब्रह्मस्तुति हा दशमांतला १४ वा अध्याय आहे. म्हणजे शके १५२५ ते १५५० ह्या काळांत दशम लिहिला गेला व अमृतानुभव-टीका शक १५५७ मध्यें लिहिली गेली. शक १५२७ ला शिवकल्याण ३५ वर्षांचे असावेत. कृष्ण याज्ञवल्की याचा काल पुढें आपण १४७० ते १५३५ हा ठरविणार आहोंत तेव्हां शिवकल्याणांचा व त्यांचे मित्र गोपाळ याज्ञवल्की यांचा काळ शके १४९० – शके १५६०. हा जवळजवळ निश्चित म्हणून समजण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

---

## ३ उपास्य—श्रीकृष्ण ह्म० विठ्ठल.

शिवकल्याणांचें उपास्य दैवत श्रीकृष्ण म्हणजे विठ्ठल. वेदस्तुतीच्या आरंभींचें नमन पंढरपूरपति श्रीविठ्ठलाला आहे. विठ्ठल सगुणनिर्गुण-रूप आहे. किंबहुना तेथें हा भेदच नाहीं:—

**जोडूनि समपदें साजिरीं । दाविली तत्त्वपदैक्य-उजरी ।**
**मध्यदेश करद्वयें करी । या हेतू धरिला ॥ ८ ॥**
**जे सच्चिदत्वें करद्वंद्व । मध्य तो मुख्य आनंद ।**
**एवं कटीं धरूनि त्रिपद । येकत्र केलें ॥ ९ ॥**

विठ्ठलाच्या समपदांवरून तत् ( ब्रह्म ) व त्वम् ( जीव ) यांच्या ह्म० जीवब्रह्मांच्या ऐक्याचा बोध होतो, व दोनी कटींवर दोन कर ठवले आहेत यावरून एकीकडे सत्, दुसरीकडे चित् व मध्यदेशीं आनंद याप्र-माणें हें सच्चिदानंदस्वरूप आहे असें समजतें. त्याच्या कंठीचा तेजस्वी कौस्तुभ पाहतां ' निजभक्ताची प्रेमकळा । पुंजाळिली दिसे. ' त्याचे कृपाकटाक्ष, नासापुट, श्रवण हेही निर्गुणरूपाचेच द्योतक आहेत.

**एवं न मोडोनि निर्गुणता । निजभक्तोद्धारणार्था ।**
**सगुणतनूतें धर्ता । विठ्ठलवेश ॥ १० ॥**
**सांडोनि पराङ्मुखपण । लोभलें प्रत्यगानंदीं मन ।**

**तैं मनाचें मनपण । हारपोनि गेलें ॥ १८ ॥**
**म्हणोनि भेद जरी नाहीं । तऱ्ही भज्यभजनप्रवाहीं ।**
**नांदतां ऐक्यासी कांहीं । विपर्यास न घडे ॥ २१ ॥**
**सत्य ज्ञान अनंतता । हे निर्गुणाचे गुणाचि पाहतां ।**
**एवं सगुणीं निर्गुणीं तत्वता । भेदुचि नाहीं ॥ २७ ॥**

उपसंहारांत पुढील ओवी आहे. तींत उपास्य व गुरु यांचें ऐक्य दाखविलें आहे:—

**तोचि हा नित्यानंदु । जो माझे हृदयीं प्रबोधु ।**
**श्रीपांडुरंग प्रसिध्दु । हें नाम जयाचें ॥ २५८४ ॥**

---

## ४ ज्ञानेश्वरांविषयी पूज्यभाव.

ज्ञानेश्वरमहाराज हे आमच्या ‘ गुरुकुळाचें मंडण ’ आहेत असें शिवकल्याणांनीं आपली गुरुपरंपरा देतांना म्हटलेंच आहे. शिवाय अमृतानुभवावर त्यांनीं विस्तृत टीकाही केली आहे तीवरूनही त्यांचा ज्ञानेश्वरमाउलीविषयीं पूज्यभाव प्रगट होत आहेच.

**अगा कालिकालें आकलितां जन । हातीं घेऊनि ज्ञानखड्ग जाण ।**
**अवतरला आत्मा पूर्ण । ज्ञानेश्वरवेषें ॥ प्र० १-१२५ ॥**
**अगा ज्ञानाज्ञानविहीन । निखळ ज्ञानमात्र संपूर्ण ।**
**म्हणौनि ज्ञानेश्वर ऐसी खूण । रूपा आली ॥ १२६ ॥**
**तेणें श्रीगीतालयाचें कपाट । उघडूनि केली मोकळी वाट ।**
**गीतेश्वर प्रगट । दाखविला लोकां ॥ १२७ ॥**
**तया गीतेश्वराचें दर्शन । केलिया होतसे कालिकाल भग्न ।**
**मग करावया अमृतपान । त्राटिका रचिली ॥ १२८ ॥**
**जे अमृतातें जीवविते । म्हणोनि अनुभवामृत म्हणिजे यातें ।**
**लोक म्हणती जयातें । अमृत ऐसें ॥**

---

## ५ शिवकल्याणांचा दशम.

'मूळ पोथीबरहुकूम नक्कल करून शुद्धलेखन पूर्वींचंच कायम ठेवलें आहे' अशी प्रतिज्ञा करून प्रकाशकांनीं शिवकल्याणांचीं दशमावरील तीन प्रकरणें छापलीं आहेत. ह्यांत संपूर्ण कृष्णचारित्र गायिलें आहे. ह्या दशमाचें गायन पूर्वीं बहिरापिसा ह्यांनीं केलें होतें, संपूर्ण दशम बहिरापिसा व शिवकल्याण या दोघांनींही लिहिले असून ते आपणांस संपूर्ण उपलब्ध नाहींत, कृष्णदयार्णवांचा दशम नंतरचा पण उपलब्ध आहे.

शिवकल्याण हे मोठे योगी, अध्यात्मप्रेमी व कृष्णभक्त होते यामुळें त्यांनीं कृष्णचरित्राचा अध्यात्मपर अर्थ सांगत सांगत कृष्णकथा परमप्रेमानें गायिली आहे. यामुळें ज्ञानी आणि भक्त दोघेही त्यांच्या ग्रंथावर समाधान पावतील असा त्यांच्या वार्णाचा परिपाक आहे.

---

## ६ श्रीकृष्णजन्मपंचाध्यायी.

'सत्यज्ञानानंतादि' लक्षणांनीं वेदानीं ज्याचें वर्णन केलें त्या परब्रह्माच्या 'आत्मसुखासी निघोनि अंकूर। लीलाविग्रही मनोहर। वेणुवादनतत्पर। देखिलासि डोळां' आणि तो कोठें देखिला? तर 'भक्तिभीमेच्या तीरीं। प्रतीति-इटेवरी। समानि पदीं श्रीहरी। देखिलासि उभा—' 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' असें ज्याचें उपनिषदांनीं वर्णन केलें तोच वृंदावनीं मुरली वाजविणारा श्रीहरी म्यां पंढरीस विटेवर उभा देखिला. त्या तुझ्या पायीं मन मुरून आनंद पावलें व 'तया आनंदें चेतविलें। वाग्देवतेतें.' मी काव्यकला व्युत्पत्ति कांहीं जाणत नाहीं.

**परी हृदिस्थें नित्यानंदें। स्वसुखाचेनि छंदें।**
**चिच्छक्तिचेनि विनोदें। क्रीडा केली॥ १-५८॥**
**ह्मणौनि मऱ्हाठिया बोली। निजकीर्ति गावविली।**
**ते बोबडांचि बोलीं। बोलेन कांहिं॥ ६०॥**

'ग्रंथ व्हावा कीं न व्हावा' हें मजकडे उरलें नाहीं, गुर्वाज्ञेनें 'नित्या-

नंदें वेळु फेडावा ' एवढेंच मजकडे राहिलें. ' दुष्टीं पीडितां मेदिनि । धर्माचि देखोनि हानि ' परमात्मा यदुकुळीं अवतरले व त्यांनीं ' दुष्ट राजे दमिले । अधर्माचें मूळ छेदिले । तत्प्रसंगें जालें । उदंड चरित ॥ तें कृष्ण-चरितावळि । दशमामाजि वर्णिली ' तीच येथें मी गात आहे.

**जे भवतापें तप्त । इहामुत्रीं जे विरक्त ।**
**त्यांसि हेंचि परमामृत । भगवद्गुणकीर्तन ॥ १२० ॥**
**आमुचें परंपरागत । श्रीकृष्णचि कुळदैवत ।**
**ह्मणोनि उत्कंठित चित्त । गुणश्रवणीं ॥ १४३ ॥**

दैत्यांच्या शासनार्थ कृष्णावतार झाला. ते दैत्य कोणते ?

**दरिद्रें पिडिले । अधर्मि प्रवर्तले ।**
**आणि विषयासक्ति माजले । तेचि दैत्य ॥ २६४ ॥**
**एवं आत्मसुखासि चुकले । विषयीं आसक्त जाले ।**
**दैत्यशब्दीं बोलिले । तेचि येथें ॥ २६५ ॥**

ब्रह्मा भूमीसहित देवगणासह ( शुद्धसत्वाच्या ) क्षीरसागरावर शयन करणाऱ्या परमपुरुषाला शरण गेला; ह्म० ' प्रपंचप्रवृत्तीचें कारण मन । तोचि येथें कमळासन । तो निवृत्ति अधिष्ठून । सत्वस्थ जाला. ' भूमीनें दैत्यांचा त्रास भोगला, त्यांना ती कंटाळली व विटली तेव्हांच खरोखर तिचा भार उतरला ! ' प्रवृत्तीची कुळवाडी ' कामक्रोधादि असुरांच्या हातीं जाऊन ' निवृत्ति बापुडी ' झालेली भासते व सकळ सत्प्रजा त्रस्त होते तेव्हांच देवाचा अवतार होतो. हें नित्य होत असतें !

वस्तुतः परमात्मा हा अखंड एकाकारत्वानें नटलेला असल्यामुळें त्याच्या ठायीं येणेंजाणें हें कांहींच नाहीं. आकृतिमात्र भगवत्स्वरूपच आहे. हें विश्व व विश्वपति यांचें ऐक्याचें रहस्य ध्यानांत ठेऊन अवतारकथांकडे पाहिलें पाहिजे. ' निवृत्तीचे प्रवाहीं संतोषु जोडे ' हे जाणून सत्वादि देव यादव जाले – ' त्यांतु अहंकारें पैसु केला । तोही तेथेंचि संचरला । कंसरूपें अवतरला । पहिलें तेथें '–त्या अहंकंसाचें कंदन करण्यासाठीं श्रीकृष्णजी आविर्भूत झाले.

शुद्धसत्वरूपी वसुदेव सद्बुद्धिदेवकीशीं विवाहरूपानें संयोग पावून विवेकरथावर आरूढ होऊन चालला तेव्हां रथाचे दोर अहंकंसाच्या हातीं गेल्यामुळें विघ्न आलें. तन्निवारणार्थ भगवंताला वसुदेवाच्या पोटीं जन्म ध्यावा लागला. ' बुद्धियोगेंकरून । कीजे अहंकाराचें छेदन । जेणें आत्मसमाधान । तत्काळ उपजे. ' ह्या पंचाध्यायीचे शेवटीं वसुदेवाची आनंदनंदाशीं गांठ पडल्याचें मनोहर वर्णन आहे. पहिल्या अध्यायांत वसुदेवानें कंसास केलेला बोध फार वहारीचा आहे तो मळांतच पाहावा. दुसऱ्या अध्यायांत षट्साधनरूप षट्पुत्रांचा अहंकंसानें वध केल्यावर ' ब्रह्माहमस्मि ह्या आत्मावबोधरूपी बळरामाच्या जन्माचें वर्णन आलें आहे. ब्रह्मास्मिज्ञान हें परोक्षात्मदर्शन आहे, व ' बोध्यबोधकतेवीण । बोधमात्र जें जाण । सच्चिदाघन । कृष्णाख्य जें ।। निगमाचें जें आद्य । निगमीं जें प्रतिपाद्य । कीं स्वतःसिद्ध । चिन्मात्र वस्तु ।। ऐसा जो भगवान् । विश्वात्मा विश्वजीवन । जयातें पाहतां जाण । नाडळे विश्व. ' कृष्ण जन्मून अजन्मा आहे. आनंदकर शशीला प्रसवूनही पूर्वदिशा चंद्राचें जन्मस्थान ह्मणतां येत नाहीं ! त्याप्रमाणें देवकी ही कृष्णाला जन्म देणारी असूनही कृष्णाच्या ' अयोनिसंभव ' ह्या ख्यातीला उणेपणा येत नाहीं. कृष्ण प्रगट झाल्यावर वसुदेवदेवकीनीं त्याची परमात्मभावानें स्तुति केली. बाळकृष्णरूपाचें सुंदर वर्णन मूळांतच पाहावें.

पुढें ही अनेक उतारे घ्यावेसे वाटतात, पण स्थलाभावामुळें घेतां येत नाहींत. ही सारी कृष्णकथा शिवकल्याणांनीं अशीच अध्यात्मतंतूंनीं सर्वभर विणली आहे, व कथाभागाचा रसरंगही पूर्णपणें कायम ठेवला आहे. येथें एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे कीं, प्रस्तुत कवीचा व इतरही भगवत्कथा गाणाऱ्या संतकवींचा हेतु कथाभागांत अध्यात्मही कसें ओतप्रोत भरलेलें असतें हें दाखवून ज्ञानभक्तीचा उत्कर्ष करण्याचा असतो. कृष्णचरित्रांतील कथाभागांवर पूर्ण श्रद्धा ठेवूनही

अध्यात्मरंग भोगतां येतो. भक्त हे रसालंकारांनीं मनोहर काव्य उठवणारे नुस्ते कवि नाहींत, तर ज्ञानीभक्त आहेत, अंतरंग उपासक आहेत. कथाभाग व अध्यात्मभाग ह्या दोन्ही भागांला प्रकाशक अशीच देवचरित्रें असतात.

वसुदेवानें श्रीकृष्णाला गोकुळांत नंदगृहीं पोंचविलें. यशोदेला मुलगा झाल्याची वार्ता गांवांत पसरली. नंदसद्भाव व यशोदाभक्ति यांच्या हातीं श्रीकृष्णानंद आला तो त्यांनीं जगाला दिला ! नंदानें सर्व धर्मविधि परमप्रेमानें केले.

**मंगळवाचा युक्त । ब्राम्हण असते जाले समस्त ।**
**तैसेचि महोत्सवें तेथ । सुतादिक आले ॥ ९२ ॥**
**धातुरंगेंकरुन । द्वारिं केलें संमार्जन ।**
**तैसेंचि कुंकुमसडे घालुन । शोभाविलिं अंगणें ॥ १०० ॥**
**तेथ शोभेसि वानि काई । सकळ शोभा कृष्णाचां पाईं ।**
**असो कृष्णशोभेकरिं सर्वहि । शोभतें जालें ॥ १०५ ॥**
**कृष्णोत्सवपर्वकाळिं । त्रैलोक्यासि जालि दिवाळि ।**
**अमंगळाचि गेलि । जगांतुनि मात ॥ ११२ ॥**
**गाई वृषभ आणि वत्सें । शोभति जालि कृष्णतोषें ।**
**तथापि गोपाळिं विशेषें । शृंगारिलिं बहु ॥ ११६ ॥**
**कृष्णजातकप्रसंगें । पशु शृंगारिले अवघे ।**
**विचित्ररंगिं रंगिलिं शृंगें । गेरीकादिकिं ॥ १२२ ॥**
**माहामोल्यें वस्त्रें । आणि कनकाभरणें विचित्रें ।**
**लेवउनि निजगात्रें । शृंगारिलिं गोपाळिं ॥ १२८ ॥**
**कृष्णार्चनकाळिं । नंदेंही निजतनु शोभविलि ।**
**नाना कृष्णस्मरणें केलि । कृष्णाकार तनु ॥ १३१ ॥**
**तैसेचि गोपिका समस्त । यशोदा पुत्रोद्भवहर्षाचित्त ।**
**महामहोत्सवयुक्त । साळंकृत जालिया ॥ १३७ ॥**
**त्या कृष्णप्रेमप्रतिपादका । मूर्तिमंता श्रुतिचि देखा ।**

**श्रीकृष्णें निजकौतुक । आणिलिया रूपा ॥ १४२ ॥**
**या कृष्णशक्तीचिया शक्ति । होति या प्रपंचोन्मुखवृत्ति ।**
**तिया–प्रकटताचि कृष्णमूर्ति— । फिरलिया मागे ! ॥**
**तेणें तुटलें विषयध्यान । वृत्तींचें गेलें क्षुद्रपण ।**
**कृष्णप्राप्तिलागून । थोरावलिया गोपि ॥ १५५ ॥**
**कृष्ण सुभरिला चित्तिं । तेणें शृंगारासि आलि संपत्ति ।**
**कृष्णसभ्रमें पंथिं । चालतिये वेळे ॥ १७४ ॥**
**मार्गिं अतिशयें विराजति । चालतां कुचकुंडलें चळति ।**
**आणि कंठस्थ आंदोळति । मुक्तांचे हार ॥ १७५ ॥**
**आणि शिरिं तुरंबिलिं सुमनें । तेहिं नावेक जालिं विशीर्णें**
**चालतां अतित्वरेनें । ठाईंठाईं वळति ॥ १७७ ॥**
**ह्मणोनि नंदासि वश्य होउन । गो-गोपाळ–गोपीजन ।**
**अवघे कृष्णपरायण । होउनि ठेले ॥ २४४ ॥**

नंदानें स्वभाग्योत्कर्षानें ‘ ईश्वरपण पुत्रपण । संपादिली दोनी ! ’

———

## ५ रासपंचाध्यायी.

शिवकल्याणांनीं रासपंचाध्यायीवर चार हजारांवर ओंव्या लिहिल्या असून त्या साऱ्या अमृताधिक मधुर अशा भक्तिरसानें ओथंबलेल्या आहेत. मूळ दशमांतल्या २९ ते ३३ ह्या पाच अध्यायांवरची ही टीका आहे. भाषा आणि प्रसंग शृंगारिक पण आंतून सारा प्रवाह दिव्यभक्ति-रसाचा आहे. हा पांच अध्यायांचा गट म्हणजे ‘ शृंगाररसयुक्त शांतिडोह ’ आहे, येथें ‘ शृंगाररसाचि शांतिरसें मांडला ’ आहे असें शिवकल्याणानीं म्हटलें आहे खरें, तथापि हा सारा भाग एका दिवसाच्या बैठकींत आम्ही वाचला तेव्हां वैषयिक शृंगारांचा त्यांत लेशमात्र उठाव होत नसून भक्ति-रसाच्या आनंदलहरींनीं प्रतप्त हृदयही शांतिरसानें पदोपदीं भरून येतें असा आमचा अनुभव आहे! शृंगाररसाच्या भाषेंतलें हें शांतिरसाचें ह्म० अध्यात्मसंमत भक्तिरसाचें अनुपम व्याख्यान आहे. मूळ भागवतग्रंथच

भक्तिमद्वारसाचें भांडार आहे व त्यांतही हा पंचाध्यायी निरुपम आहे. रासपंचाध्यायीवर शिवकल्याणांच्याइतकें बहारीचें व्याख्यान दुसरें आमच्या पाहण्यांत नाहीं. भक्तभाविकांना तर तें वेडच लावील! पण वाचक नास्तिक, तार्किक, संशयी कसाही असला तरी त्यालाही तें विचार करायला लावील व शेवटीं समाधानच देईल! अगदीं मलिनचित्त वाचकालाही तें पाझर फोडील. श्रीकृष्णाची वेधशक्ति जन्मापासूनच अलौकिक होती. वृद्धतरुण, स्त्रीपुरुष, पशुपक्षी सारी चराचरसृष्टि त्यांच्या दिव्यरूपगुणांवर लुब्ध झाली होती. यशोदादि पोक्त स्त्रियांचे त्याच्यावर अपत्यप्रेम होतें. कांहीं तारुण्याच्या दारांत उभ्या राहिलेल्या तरुणींना कृष्णच पति मिळावा असें मनापासून वाटत होतें. त्यांनीं त्यासाठीं कात्यायनीव्रत आचरिलें होतें. त्या व्रताच्या समाप्तीच्या वेळीं ' मी तुम्हांस एकच रात्र माझें समागमसुख देईन ' असें त्यांनीं त्यापासून वचन घेतलें होतें. श्रीकृष्णासारखा रूपगुणसंपन्न पुरुषच दुसरा नाहीं अशी त्यांची श्रीकृष्णावर निष्ठा होती म्हणजे मनानें त्या कृष्णकांताच झाल्या होत्या. त्यांना एकनिष्ठप्रेमाचा अनुभव आला. त्या सकाम गोपींना आत्मतृप्त व निष्काम अशा श्रीकृष्णानें रासक्रीडाप्रसंगानें आपलें संगसुख देऊन निष्काम केल्या, त्यांना भक्तीचा अपरोक्षानुभव आणून दिला व जगाला भक्तीचा धडा घालून दिला असें या कथेचें वर्म आहे. अज्ञ व जड जीवांच्या भूमिकेवर येऊनच त्यांना मार्ग दाखविण्याचें काम श्रेष्ठांना करावें लागतें. रासक्रीडाप्रसंगीं श्रीकृष्णाचें वय सात वर्षाचें होतें हें प्रसिद्ध आहे. पुनश्च कृष्णकथेंत गोपींचा संबंध आलेला नाहीं. यानंतर कंसादिदैत्यांचा वध करून धर्मसंस्थापना करण्याचा श्रीकृष्णांचा हेतु होता गोपीही रानट, सामान्य स्त्रिया होत्या. मात्र त्यांचें चित्त श्रीकृष्णीं पूर्ण जडलें होतें म्हणून त्यांना आत्मपर करण्यासाठीं देवानें ही रासक्रीडा केली. ह्यांत सारी मधुरभक्ति आहे. सामान्य जीवांना शुद्ध व केवल परमार्थ कळत नाहीं, ते बहुधा सारेच विषयतत्पर असतात, त्यांना त्यांतूनच वर घ्यावें लागतें. नरसीमेहता, मीराबाई,

कृष्णचैतन्य, सूरदास, ज्ञानेश्वर, नाथ, तुकोबा इत्यादि भक्तांनीं गोपींची उज्वल भक्ति तेवढी या रासक्रीडेंतून घेतली आहे. बेझंट बाईसारख्या परद्वीपस्थ पण अध्यात्मप्रिय विदुषीलाही रासक्रीडेचें अंतरंग आकलन करितां आलें. कलकत्त्यास एक रासक्रीडेवर बंगाली नाटक कोणी रचलें असून त्याचे खेळ चालू होते. कांहीं नाजुकप्रकृतीच्या नकली सुधारकांनीं त्याविरुद्ध मोठा गिल्ला केला व तें बंद पाडण्यासाठीं हायकोर्टाकडे अर्ज केला तेव्हां हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधीशानें असा निवाडा केला कीं 'रासक्रीडेमुळें प्रेक्षकांच्या शृंगारवृत्ति उत्तेजित होत नसून लोकांच्या मनावर भक्तिभावाचेच संस्कार होतात असा अनुभव असल्यामुळें सदर खेळ बंद पाडावयाचें कारण नाहीं' सामान्य व विषयी बुवा असले चाळे करितील तर नरकांत जातीलच पण येथेंही ठोक खातील व खातातही! असामान्य पुरुषांचा उपदेश घ्यावयाचा असतो, त्यांच्या कृतींचें सर्वत्र अनुकरण करायचें नसतें. आजही महात्मा गांधी स्त्रियांच्या मेळ्यांत निर्धास्तपणें वावरतात, त्यांच्याविषयीं कोणीही शंका घेत नाहीं; पण त्यांना जी सवलत आहे ती त्यांच्या अनुयायांना मिळतांच काय धिंडवडे होतात हेंही आपण पाहतच आहोंत! शिवकल्याण सांगतातः—

**जे सामर्थ्यवंत होत्साते। उल्लंघित जाले धर्मातें।**
**तरि तो विधिव्यतिक्रम त्यांतें। बाधक जाला काई? ॥७७६॥**
**तिहीं तपोत्कर्षतेजोबळें। उद्भूत दोषांतें जाळिलें।**
**निरहंकृति कर्म घडलें। तें अकर्मचि जाणावें ॥ ७७७ ॥**
**ईश्वरत्वें इयें जनीं। संपादितसामर्थ्य जे कोण्हि।**
**तपोनिष्ठ आणि ज्ञानी। ख्यात जाले जे जे ॥ ७९० ॥**
**तिहीं निषिद्धही जें केलें। तें त्यांसि फळ नाहीं जालें।**
**मा कृष्ण तो ब्रह्म सावळें। ईश्वराचा ईश्वर ॥ ७९१ ॥ (अ०५)**

शंकरांनीं हालाहल विष खाऊन पचविलें, इतर जन 'प्राशितांचि जाण। तात्काळ मरेल!' अग्नि सर्वभक्षक आहे; येरांस चार घांस

जास्त पचत नाहींत ! म्हणून ' धर्मसेतुभंगाच्या ठाईं । इतरांसी अधिकार नाहीं. ' जितेंद्रियांना जी सवलत ती इतरांना नाहीं.

**जे तपोज्ञानें संपन्न । ते असोनि विकारशून्य ।**
**कदाचित् विधिउल्लंघन । कोणे एके निमित्तें घडे ॥ ८४३ ॥**
**जरि प्रवाहपतित । विधिसि जालें विपरीत ।**
**तरि तें विरुद्धाचरित । इतरांसि प्रमाण नव्हे ॥ ८५४ ॥**
**प्राकृत देहधारी । धर्मसेतूतें भंगिती जरि ।**
**तरि ते महानरकघोरीं । पडतिल तेच समई ॥ ९५७ ॥**

ज्या श्रीकृष्णांनीं भीष्मार्जुनविदुरादिक ज्ञात्यांना ब्रह्मज्ञान दिलें त्यानींच ही रासक्रीडा कां करावी ?

**जे शृंगाररसीं आसक्त । त्यांसि हाचि रस प्रस्तुत ।**
**सेव्य असोनि त्यांचें चित्त । स्वनिष्ठ करावें ॥ ९३१ ॥**

गोपी हा स्त्रीवाचक शब्द असला, व एकंदर वर्णन स्त्रीधर्मानुकूल असलें तरी गोपीशब्दानें प्रपंचधर्मविरहित व भगवदुन्मुख झालेले सर्व जीव येथें समजावयाचे आहेत असा शिवकल्याणांनीं इषारा दिला आहे. ज्यांचें ' अंतर्बाह्य झालें कृष्णार्पण ' त्या विवेक राजहंसानाच येथील गोडी कळेल. ' सुरत ' म्हटलें कीं ग्राम्य अर्थ वैषयिकांच्या मनांत येईल, पण ' सौरत जे आत्मप्रीति । आत्मत्वें भक्तांची रति । त्या प्रीतिस्तव निजसुरतीं । त्या आत्मनिष्ठा केलिया ' (५-७३४) हा त्याचा खरा अर्थ आहे. ' नग्न केल्या ' हा० विषयवासनांचीं वस्त्रें काढून घेतलीं, वृत्ति निर्विषय केल्या. उच्च संस्कृतीच्या पवित्र लोकांनाच रासक्रीडेचें दिव्य सुख अंतरांत भोगतां येतें.

शारदीय पौर्णिमेचे एके रात्रीं श्रीकृष्णानें मुरली वाजवून गोपींना एकत्रित केलें. रात्रीं म्ह० ' एकांतलक्षण '—जे काळीं निर्विक्षिप्त मन । धैर्यातें पावे. ' गोपी मनोहर कृष्णगीत ऐकून ' एकासी एक न कळतां ' धांवत कृष्णाजवळ आल्या. शेंकडो गोपी होत्या. त्या कामेच्छेनें भरल्या

होत्या पण कृष्ण निष्कामप्रेमाचा भोक्ता होता. ‘ सर्वथा सहाय करून। त्यांचे अविद्येचें निवारण । संपादूनि स्वता श्रीकृष्ण । गति होय त्यांतें.’ हा वस्तुशक्तिमहिमा आहे. त्या श्रीकृष्णीं तन्मयता पावल्या. श्रीकृष्ण म्हणाले. ‘ हें माझें क्रीडास्थान कसें रम्य आहे पहाः—

**नानापुष्पिं आकीर्ण । पाहा हें सुशोभित वन ।**
**अतिकोमळ जे शशिकिरण । तयाकरीं मंडित ॥ ५६५ ॥**
**जैसी पौर्णिमेची निशि । कळापूर्ण तैसा शशी ।**
**तेणें आजि या वनासि । शोभविलें बहु ॥ ५६६ ॥**
**आणि यमुनाजळ स्पर्शित । शीतळ मंदगति वात ।**
**तेणें हे पल्लववंत । या वनिचे वृक्ष ॥ ५६७ ॥**
**आपुले लीळेकरून । शोभती दोलायमान ।**
**पावविलें चलन । मंदोर्मिवातें ॥ ५६८ ॥**

आमुचें हें क्रीडास्थळ ‘ शिष्टसेव्य ’ आहे. हें वनस्थळ पाहिलेत-आतां तुम्ही घरीं जा, पतिपुत्रांत सुखानें नांदाः—

**कर्तव्य सरलें नाहि । तिहीं न रहावें ये ठायिं ।**
**ज्याचें विहित जें कांहिं । तें केलेंचि पाहिजे ॥ ५७४ ॥**

पतिशुश्रूषा, सासरच्या लहानथोर माणसांचें पालन व बालसंगोपन हा स्त्रियांचा मुख्य धर्म आहे. ‘ पतिः स्त्रीभिर्न हातव्यो ’—पति कसाही असला तरी त्याचा त्याग उचित नाहीं. हा सतीधर्म श्रीकृष्णानें त्यांना सांगितला पण त्या ‘ गोविंदासक्तहृदया ’ होत्या. ‘ कृष्णाहूनि परतें प्रियवस्तु नाहीं ’ असा त्यांचा निर्धार होता. त्या म्हणाल्या ‘ तूंच आमचें सर्वस्व आहेस, ‘ तूं सर्व धर्मांचें स्थान । लोकशास्ता गुरु ’ आहेस.

**पूर्वप्रवाहें साधारण । जातिवर्णआश्रमगुण ।**
**तें न स्मरोनि निरंजन । कृष्णचि आवडला ॥ १२०८ ॥**
**असो नानारसकेलि । जे गोपिकांसि संपादिलि ।**
**सिंचोनि प्रेमजळिं । खेळविल्या कृष्णें ॥ १-१२०९ ॥**

श्रीकृष्ण अस्खलितवीर्य असून ( ‘ आत्मनिष्ठेपासून । सर्वथा न

पवे स्खलन ' ) त्यानें गोपींना परोपरीनें कसें रमविलें याचें प्रतिपदीं अध्यात्मदृष्टीचा डोळा उघडवीत कवीनें सविस्तर वर्णन केलें आहे. येथें केवळ विषयी शृंगाररसाच्या मिटक्या मारतील, भक्तभाविक भक्तिसुखांत डुबून जातील, व अंतरंगपुरुष रासक्रीडेचा सुखसोहळा अंतरांत भोगतील. ' उथळोनि प्रेमा । कृष्णीं मिळाल्या त्या रामा । भाग्यें सांडिली सीमा । गोपिकांच्या.' त्यांचा संसारिक ताप ' सरोनि गेला तत्काळ ' त्यांना सौंदर्याचा गर्व झाला तेव्हां ' आकर्षोनि गोपीचित्तें । अधिष्ठानि मायेतें । पावला अंतर्धानानें । दिसेना कृष्ण ! ' देवाला भक्ताचाही सूक्ष्मही अहंकार सोसत नाहीं. त्या गोपी श्रीकृष्णाला शोधीत वणवण हिंडू लागल्या ! कृष्णाचें रमणीय रूप, त्याचें प्रेमहास्यावलोकन, त्याच्या संगतींत झालेला अपार आनंद स्मरस्मरून त्या शोकविव्हल झाल्या. त्या गोपी मग वृक्षलतादिकांना ' माझा कृष्ण पाहिला काय ? ' असे विचारीत वनभर वणवण हिंडू लागल्या. प्लक्ष ( पलाश, पळस ) अगर पिंपरी, न्यग्रोध म्ह० वटवृक्ष, कुरबक ह्म० कोन्हांटा, अशोक, पुन्नाग ह्म० नागचाफा, चंपक, मालत्यादि लता, मल्लिका, यूथिका, च्यूत ह्म० आम्रवृक्ष, प्रियाळवृक्ष, पनस ( फणस ), आसन ह्म० खिरणीवृक्ष, अक्ष ह्म० बेहडा, बकुल, आम्र ह्म० आमसोल, जंबु ( जांभूळ ), तुलसी इत्यादिकांपाशीं कृष्णाचा त्यांनीं शोध घेतला ! ( डोंगर, दऱ्या, वृक्षवेली यांजपाशीं वर्षांतून एकदा जाऊन देवाचा शोध करायचा धडा प्रार्थनासमाजिष्टांनीं गोपींपासून घेतला असावा ! ) तुलसीपाशी जाऊन ' पुसतसों तुज बाई । कृष्णाची सोय ' असें त्यांनीं तिला पुसलें. कृष्णाची चिंतवणी करितां करितां त्यांना ' कृष्णपदांकित मेदिनी ' दिसली. ' अवो ये महीतळी ! तुवां काय सुकृतें केली ? । तपें कोण तपीनली । तेणें तूं शोभलीस ऐसी ? ' कृष्णचरणस्पर्शानेंच तूं प्रमुदित झालेली दिसतेस ! त्यांनीं शेवटीं कृष्णलीलानुकरण केलें व यमुनातीरीं येऊन अत्यंत मधुर असें ' गोपीगीत ' गाइलें.

गोपींनीं गायिलेलें ‘ गोपीगीत ’ अत्यंत मधुर आहे. ‘ प्रगटलासि तूं नंदगोकुळीं । म्हणुनि इंदिरावास ये स्थळीं ’ ह्याप्रमाणें मूळच्या कामदा-वृत्तांत वामन पंडितांनीं केलेली समश्लोकी लोकप्रिय आहेच. गोपींचा अथवा कोण्याही भक्ताचा आशय ह्या गीतांत उत्कृष्ट प्रगट झाला आहे. गोपी विमलाशय झाल्या हें पाहून श्रीकृष्ण पुन्हा प्रगट झाले व त्यांनीं गोपींच्या भक्तिप्रेमाचें गौरव केलें व मला परमात्म्याला हृदयांत ठेवून तुम्ही आपापल्या घरीं जा व पतिपुत्रांचा संसार सुखानें करा असा त्यास उपदेश केला. हा सर्व भाग मूळांतच गोड आहे व शिवकल्याणांनीं गोडवाणीनें त्याचा विस्तार केला आहे.

**अगा ये सखया श्रीकृष्णा । परमप्रीतीचिया सदना ।**
**आम्ही ज्या व्रजांगना । अनन्य दासि तुझिया ॥ ३-१३८ ॥**
**हें अध्यस्त जगद्भान । तुझा ठाईं दृश्यमान ।**
**त्याचे बुद्धिसाक्षित्वें करून । सकळांतरिं वर्तासि तुं ॥१०१३९॥**
**तव गुणकथारसें । नाश पावती किल्बिषें ।**
**होउनि शुद्धमानसें । ज्ञानाधिकार संपादे श्रवणें ॥ २६७ ॥**
**आणि तवकथामृतपान । पावनाचेंहि पावन ।**
**परमशांतीचें सदन । कैवल्याचें साधक जें २८५ ॥**
**आणि तुझी जे मंगळमूर्ति । शोभा जे हे विलासवति ।**
**जे कि सौष्ठव्याची संपत्ति । कैवल्याचि मुस ॥ ३०५ ॥**
**त्या मूर्तीचें तुझें ध्यान । जें मंगळाचें निकेतन ।**
**मनोविश्रांतीचें हें स्थान । प्रेमाचें वर्धक ॥ ३०७ ॥**
**लाउनि आपुली प्रीति । चोरिली आमुची चित्तवृत्ति ।**
**नेणों गा कपटयुक्ति । भोळिया आम्ही ॥ ३२१ ॥**
**आतां प्रकटि आपणातें । रक्षि गा आमुचीं जीवितें ।**
**सर्वथा आम्हां प्रपन्नातें । उपेक्षूं नको ॥ ३-३२३ ॥**

श्रीकृष्णांनीं ‘ लक्षुनि मज एकातें । तुम्ही सांडिलें लौकिकातें ’ असें म्हणून गोपींना धन्यवाद दिले. ‘ विषयांलागीं जे कुशल । त्यांचें

मानिती उत्तम शीळ । आणि मद्भक्तांतें हे बरळ । म्हणती स्वार्थभ्रष्ट ' असा हा व्यवहार आहे.

**अपेक्षूनि मज एकातें । तुच्छ केलें देहादिकांतें ।**
**तद्योगें उचितानुचितें । सांडिलिं अवघिं ॥ ४–२३ ॥**
**जे तुम्ही मजानिमित्त । वेदही सांडिला प्रस्तुत ।**
**आणि लोक स्वजाति समस्त । स्वकुळ सोइरे ॥ ४३१ ॥**
**सांडुनि पतिसुतादिकांतें । सदा चित्तिं वाहिलें मातें ॥**
**असो वोपिलिं स्वजीवितें । मजलागिं तुम्हि ॥ ४३२ ॥**
**अवो मज जे भजति । त्यांसि ब्रह्मपदं तुच्छ होति ।**
**तेथें भजावयापुरति । भिन्नता कैची ? ॥ ४८४ ॥**
**किंवा मजवेगळें कांहिं । सर्वथा सेव्य नाहिं ।**
**तरि म्यां तुम्हांसि काइ । आपणाविण द्यावें ! ॥४–४८५ ॥**

देवानें त्या स्वशरण आलेल्या गोपींशीं नृत्यगायनवादनपूर्वक रासक्रीडा केली, व ' स्वप्राप्तीहीवरौति । न मोडोनि ऐक्यात्मस्थिति । प्रतिगोपिकांचिया भक्ति । सार्थका केल्या ॥' देहभावनाशून्य प्रेमाप्लुतमना अशा त्या गोपींशीं देवाधिदेवानें रास ( नृत्य ) केला.

**कृष्ण गुण गातिये वेळे । प्रेमाचें भरितें आलें ।**
**तेणें देहभाव विकळ जाले । सुटल्या ग्रंथि ॥ ५–७६ ॥**
**असो त्या गोपिकांचें चित्त । अन्य विषयाशारहित ।**
**आनंदप्रेमोद्रेकप्लुत । मुरालें श्रीकृष्णीं ॥ ५–४४८ ॥**

---

## ८ ब्रह्मस्तुति.

हें सुमारें दोन हजार ओव्यांचें प्रकरण म्हणजे दशमस्कंधाच्या १४ व्या अध्यायावरील विस्तृत टीका होय. मूळश्लोक ६१ संमतिश्लोक ५ व ओवी १९९२ मिळून २०५८ असा हिशेब ग्रंथकारानेंच ग्रंथाच्या शेवटीं दिला आहे.

ब्रह्मस्तुतीचा पहिलाच भागवती श्लोक अत्यंत लोकप्रिय आहेः—

**नौमीड्य तेऽभ्रवपुषे तडिदंबराय । गुंजावतंसपरिपिच्छलसन्मुखाय।**
**वन्यस्त्रजे कवलवेत्रविषाणवेणु-। लक्ष्मश्रिये मृदुपदे पशुपांगजाय १**

ह्या श्लोकाचा अर्थ शिवकल्याणांच्या वाणीनें ऐकूं–' ईड्य ह्म० 'स्तुतिकर्तयाचें स्थान । स्तौत्य जो तं. ' शतपथांचा तात्पयार्थ तूंच एक आहेस, तूं सकळांसी स्तौत्य आहेस. तुला मी ' नौमि ' ह्म० नमन करितों, ह्म० ध्यानीं मन ठेवून ' कोठें न गुंतो मन । करूं कृष्णगुणाचें कीर्तन ' असें साविनय प्रार्थितों. अभ्रापरी तुझी श्यामसुंदर तनु आहे. तडित् ह्म० विद्युल्लता, व अंबर ह्म० वस्त्र, पीतांबर. ' एवं विद्युल्लते-सारिखी दीप्ती । पीतांबरें वोप देती । नाना सुवर्णाचे परी फांकती । पीतांबररश्मी. ' गुंजांच्या माळा, कर्णांतील भूषणें, व मोरांचीं पिसें यांच्या योगानें तुझें मुख सुशोभित दिसत आहे: ' आणि गुंजांचा गुंफोनि झेला । तो मयूरपिच्छेंसी मिरवला । अतिशोभा आथिला । तो शिरोभूषण शिरीं ॥ नाना ( अथवा ) ते गुंजाभूषणांची कुसरी । ते खोविली कर्णाउपरी । आणि मयूरपिच्छें शिरीं । मिरवली बहू ॥ '. तुझ्या कंठांत वनपुष्पांच्या माळा आहेत. दहीभाताचा घांस, वेताची छडी, शिंग व वेणु यांच्या सौंदर्यानें तुझें स्वरूप उत्तम प्रकारें शोभत आहे– ' आणि दध्योदन कवळ । तेणें शोभले बहु करतळ. ' आतां वेताची छडी व शिंग कोठें व कसे घेतलें होतें तें पहाः ' आणि हस्तसंधीसी । धरिले वेत्रविषाणासी । ह्मणिजे धरिलें कक्षाप्रदेशीं । वेत आणि शिंग. ' असो ' कृष्णजी घनसांवळा । इहीं चिन्हीं शोभला. ' ' पशुपांगज ' कृष्ण ह्याचे कवीनें चार अर्थ सांगितले आहेत ! पशुप ह्म० नंद व त्याचा अंगज कृष्ण, नंदनंदन–हा झाला सरळ नित्याचा अर्थ.

**सुलभ सगुण तव मूर्ती । जे मनानयनांतें रमविती ॥**
**जियेते पाहतां तरती । भवार्णवातें भक्त ॥**
**ऐकोनि तुझी गुणकीर्ती । मन पावलें विश्रांती ॥**
**विषयिक तळमळ होती । ते विसरोनि गेलें ॥**

**तुझिया गुणकथा । त्या परमानंदरसभरिता ॥**
**जिया संसारतापतप्ता । सञ्जीवनीया ॥**
**सगुणनिर्गुणत्वें करून । जो तूं एकाकी सद्धन ॥**
**भेदत्रयशून्य । चिन्मात्र वस्तु ॥**

ह्या ओव्यांना संस्कृतीवळण उघडच दिसत आहे. प्रकरण वेदांतपर व जरा बिकट आहे. ' तुझियाचि ठायीं जीवितें । वोपिलीं उखितीं ' येथें ज्ञानेश्वरीची छाया आहे. ' पै सर्वभावेंसीं उखितें । जे वोपिले मज चित्तें ' ( ज्ञान० ९-३३५ ). उखितें वोपिले ह्य० जे सर्वस्वें मला अर्पण झाले, मला विकले. व्रजवासियांचे भाग्यः—

**प्रभो ! हे व्रजवासी जन । तुझेनि संगें अतिधन्य ॥**
**यांच्या भाग्याचें वर्णन । कोण पा करी ? ॥**
**तुझिया भुलीं भुलले ॥ आपणासींचि विसरोन गेले ॥**
**अंतर्बाह्य धाले ॥ तुज सुखरूपेंकरोनि ॥**
**तत्त्वमस्यासि महावाक्यार्थ ॥ हा यांसीच जाला सार्थ ॥**
**अवचिता परमस्वार्थ जोडलासि तूं ॥**
**अवघे तुझेनि जिती ॥ अवघियांची तूं संपत्ती ॥**
**अनायासें अहंमती ॥ विराली यांची ॥**

अशा प्रेमरसाची ही अमृतसरिता सारखी सतत वाहत आहे.

आणखी सुंदर उतारे दिले असते पण विस्तारभयास्तव आखडतें घेतों. शिवकल्याण तर कृष्णगुणवर्णनीं पूर्ण रंगून गेले होतेः 'म्हणोनि माझी वाणी । वश जाली इये वर्णनीं । श्रीकृष्ण येउनि मनीं । बांधलें ठाण ॥ ' या मिषानें मी आपली वाणी पवित्र केली व ' जन्मशतांची दुरितश्रेणी नाशिली ' असा त्यास आनंद झाला. कृष्णगुणानुवाद गातां गातां ' मनीं मनोहर मूर्ती । ठसावली कृष्णाची-' तोच कृष्ण पंढरीस विटेवर ठाण मांडून उभा राहिला आहे. ' जो कटीं व्यस्त करद्वंद्व । सांवळा सुकुमार शुद्ध । जो मर्दूनीयां भेद । समपदीं शोभला. ' विश्रांतीचें विश्रांतिस्थान अशी ही ' नित्यानंदैक्यचिन्मूर्ती । वर्णितां कथा

भागवतीं । येऊनि बैसली चित्तीं । नाठवे कांहीं. ' त्याचे चरणीं मच्चित्त निरंतर रंगो यावांचून दुसरी कमलीही चाड मला उरली नाहीं असें शिवकल्याणांनीं शेवटीं म्हटलें आहे.

भगवद्भक्ताशिवाय अशी निरपेक्षता अन्यत्र कोठें आढळेल ?

---

## ९ वेदस्तुति.

मूळ दशमाच्या ८७ व्या अध्यायांत ' वेदस्तुति ' हें प्रकरण आहे— ' जेथं शतपथें हृषीकेशी । स्तविला असे. ' येथें वेदांनीं भगवंताची स्तुति नारायण व नारद यांच्यांतील संवादरूपानें केली आहे. हा भाग सामान्य वाचकांस समजायला जरा कठिणच आहे. तरी शिवकल्याणांनीं श्रीधरीटीकेचा आधार घेऊन तो मुद्देसूदपणें सुबोध केला आहे.

**आधींचि भगवत्कथाप्रसंग । वरी भागवत-शिरोभाग ।**
**त्याहीवरी मुकुटरत्न चांग । वेदस्तवन ॥ ४३ ॥**
**जेथें भक्तिवैराग्यज्ञान । उघड दिसती शोभायमान ।**
**जेथें नारदेंसी नारायण । बोलिले गुज ॥ ४४ ॥**
**त्यावरि श्रीधरस्वामीचें व्याख्यान । जालें गुरुमुखें श्रवण ।**
**तेंचि अंतरीं संग्रहण । पडिताला ( पडताळा ) देऊं ॥ ४६ ॥**

' ब्रह्म अनिर्देश्य निर्गुण । सदसद्भावाहून विलक्षण ' आहे आणि वेद सगुणपर आहेत, मग वेदांनीं ब्रह्माची स्तुति केली हें कसें संभवतें हा प्रश्न उपस्थित झाला आहे. निःशब्दाचे ठिकाणीं शब्दाची प्रवृत्ति कशी होते ? .शब्दाची त्रिधा प्रवृत्ति—मुख्य लक्षणा व गौणी—मुख्यावृत्तीचें रूढ व यौगिक हे दोन भेद—त्यांत रूढीचे पुन्हां स्वरूप, जाति व गुण अशा प्रकारें शब्दाचा संबंध पदार्थासी येतो आणि ब्रह्म कांहीं पदार्थ नव्हे, मग निःशब्द व अद्वितीय वस्तूचें वेदांनीं स्तवन केलें हें कसें शक्य आहे ? ह्या प्रश्नाचें पुढें सविस्तर उत्तर दिलें आहे. प्रभूनें या जीवांची बुद्धि, मन, इंद्रियें व प्राण उत्पन्न केलीं आहेत व त्यांत हा त्याचा

हेतु त्यांना विषयभोग मिळावा, त्यांचा संसार चालावा, त्यांना चांगली गति मिळावी व मोक्ष मिळावा असा चतुर्विध आहे ह्मणजेच धर्मार्थ-काममोक्ष असा चार प्रकारचा आहेः—

**प्रभुत्वपदें करून । ईश्वरत्व सूचिलें सगुण ।**
**त्या सगुणी प्रवृत्ति जाण । वेदासी घडली ॥ १२३ ॥**
**ईश्वरें लीलया क्रीडिजे । तें जीवसृष्टि एकीं कल्पिजे ।**
**त्याचे निर्वाहालागिं साजे । ईश्वरीं प्रभुत्व ॥ १२५ ॥**
**प्रभु ईश्वर आपण । जनांचीं बुद्धींद्रिय मनःप्राण ।**
**पुरुषार्थ सिद्धीलागून । स्त्राजिता जाला ॥ १२७ ॥**
**तस्मात् जीवसंबंधवशें । ईश्वरासी सृष्ट्यादिप्रवृत्ति दिसे**
**परंतु प्रभु येणें विशेषें । नित्यमुक्तचि तो ॥ १२६ ॥**
**आतां सगुणत्वाचि प्रतिपादितां । निर्गुणताचि चढे हाता**
**ह्मणोनि वेदांसी ब्रम्हपरता । निरंतर असे ॥ १३९ ॥**
**जेवीं नटासी अर्पितां दान । नटियासीच जालें अर्पण ।**
**तेवीं प्रतिपादितां सगुण । निर्गुणताचि लाभे ॥ १४० ॥**

याप्रमाणें सगुण तोच निर्गुण आहे. नट हें मिथ्या सोंग आहे म्हटलें तरी त्यानें चांगलें सोंग आणल्यावर त्यास बाक्षिस मिळालेली शाल ती सोंग आणणाऱ्या खऱ्या मनुष्यासच मिळते, त्याप्रमाणें सगुणाची उपासना निर्गुणब्रह्मालाच पोंचतें ! म्हणून तो ईश्वर ( ब्रह्म म्हणा ) सच्चिदानंदघन आहे, स्वामी आहे, सर्वज्ञ सर्वकर्ताभर्ता आहे, समस्तैकजीवन आहे, व त्याच्याशीं ऐक्यत्वाची खूण तत्वमस्यादि महावाक्यांनीं वेदानें दिली आहे म्हणून वेद ब्रह्मस्तुति करण्यास समर्थ आहे. ऐक्य मूळचेंच आहे पण वेदानें सांगितल्यामुळें पटतें !

वेद हे परमात्म्याचे भाट आहेत !

**कोण्ही एक नृपवर । राजा महामंडलेश्वर ।**
**त्यातें निद्राप्रांतीं अनुचर । बोधविते होती ॥ ३०० ॥**
**पराक्रम जे शार्यादि गुण । औदार्यादि कीर्तिशोभन ।**
**इहीं गुणीं करून । गायनादि करिती ॥ ३०१ ॥**

**तेवीं सकळांचें जीवन । सकळ सुखाचें येकस्थान ।**
**जीवजविनार्थ जाण । बोधाविती श्रुती ॥ ३०४ ॥**

यानंतर श्रुतींनें भगवंताची स्तुति केली. ते मूळचे श्लोक व त्यावरील शिवकल्याणांची टीका मूळग्रंथावरूनच पाहिली पाहिजे. ती पाहिली म्हणजे श्रुतींचीं वचनें व साधुसंतांचीं प्राकृत वचनें हीं अगदीं एकरूप आहेत हें मनाला पटतें. 'एकाकी ब्रह्म अद्वितीयत्वें पूर्ण' आहे व इंद्रादि वैदिक दैवतांचे किंवा रामकृष्णादि पौराणिक देवतांचें, फार काय पण पाषाणमूर्तींचेंही यजनपूजन केलें तरी तें मूळ ब्रह्माचेंच होतें हें १५ व्या श्लोकावरील टीकेंत सांगितलें आहे. दुधाचें शोधनक्रियेनें तूप होतें त्याप्रमाणें हा सारा विश्वप्रपंच शोधितां 'येथेंही शोधितां । भगवंता तुजवीण कैंचें' असाच बोध होतो. मृत्तिकेच्या विकृति म्ह० 'घटभांड-शरावादि आकृति' यांची उत्पत्तिलयस्थिति मृत्तिकेंतच असते त्याप्रमाणें अनंत ब्रह्मांडें शोधून पाहतां भगवंतावांचून दुसरें नाहीं हेंच प्रत्ययास येतें.

नरादिकांचीं पावलें जेथें जेथें पडतात, त्या वृक्षकाष्ठपाषाणादिकांत पृथ्वीवांचून काय आहे? म्हणून वेद काय, वेदज्ञ संत काय, देवावांचून काय बोलतात? लोक देहादिद्वारा किंवा पुत्रधनादिद्वारां 'निजात्मसुखाला'च भोगतात.

---

## १० अमृतानुभवटीका.

ग्रंथाच्या मंगलाचरणाच्या १८० सुरस ओव्या आहेत. तेवढया नीट पाहिल्या, तरीही ग्रंथकाराची भूमिका व ग्रंथाचेंही स्वरूप ध्यानांत येतें. 'जयजयाजी चिन्मात्रपूर्णा । नित्यानंदा निजकल्याणा । करुणाकरा सुखघना । गुरुवर्या जी ।' ही पहिली ओवी. अमृत आणि गोडी, किंवा सिंधु आणि कल्लोळ तसा तुझा माझा ऐक्यसंबंध आहे. रवीच्या अनु-ग्रहानें प्रभा प्रकाशवंती, तसा तुझ्या गुणानें मी स्फूर्ति पावलों आहें, तथापि गुणगुणी हा भेद तुझ्या ठायीं नाहीं. 'तुझी अद्वैतखुण द्वंद्व-

भागा नये.' अंबा व अंबाधीश ( शंकर ) या दोन्ही नांवांनीं तूंच तूं एकला नांदत आहेस. सच्चिदानंद त्रिशूळ हातीं घेऊन त्रिगुणत्रिपुरासूर निवटणारा तूंच आहेस. जीवात्मा गणेश व त्याची प्रसन्नता ह्म० वाग्देवता उभयरूपानें तूंच प्रगट आहेस. आठवविसर किंवा आलागेला याविरहित चिन्मात्र तूंच आहेस. ' ऐसा जो निजबोध । जेथ नाहीं बोध्यबोधक भेद । तोचि तूं स्वतःसिद्ध । विठ्ठलरूप.'

**अहो रूपाअरूपातीत । नामाअनामाविवर्जित ।**
**श्यामसुंदर अद्भुत । टवकारलें असे ॥ ३२ ॥**

तूं निजदासाची आवडी तीच पीतांबरमिषानें कासेला लाविली आहेस, तुझा नाभिदेश हाच ब्रह्मभुवन असून ' सर्वांचि उदर जें गहन । तेथ सांठविलें हें जग '— एवं ' चिन्मात्राची रेखा न मोडे । जालेनि जगें ' निजशांतियमुनातीरीं । स्वानंदाभिरामनगरीं । बोधअर्जुनासमवेत नांदणारा श्रीकृष्णराज ' तूंच आहेस. तूं नित्यानंद आमुची माय आहेस—पण ' अहो तुज म्हणावें माये। तरी बापु काय दुजा आहे ?' क्षीर म्हणा किंवा दुग्ध म्हणा— ' आम्हांसी नित्यानंदु । श्रीकृष्ण तोचि.' आदिनाथ आमुचा मूळ गुरु म्हणून ' केलियावीण माझें नमन ' तेथें आहे. ' माझा अधिवास निरंजनीं । नित्यानंदीं ' आहे हेंही सांगिजे ऐसें नव्हें. ' जाणिवेविण जाणों लाहे । न बोलणेंचि बोलिजत आहे । जरी यथार्थे पायें । वंदिजेति तुझे.' बोध्यबोधकपण बोधमात्र जाण— ' गुळ गोडी मिळोन। गूळचि जेवीं '. असो.

**गुरुकृपा खड्ग घेऊनि । संशयविरोध विदारूनी ।**
**स्वानुभवराजधानीं । पहुडावें सुखें ॥ ९४ ॥**

आम्ही तेवढे ब्रह्मज्ञानी व येर अवघें विश्व अज्ञानी, आम्ही ब्राह्मण व इतर सारे चांडाळ, असा फुंज ज्याचे ठायीं आहे तो ब्रह्मज्ञानीच नव्हे ! तसेच ज्ञाता विधिनिषेधाच्या पार गेला, मुक्त झाला, याउपरि त्यानें लोक-

संग्रहार्थ कर्म केलेंच पाहिजे असे कोणी म्हणेल तर शिवकल्याण त्याला उत्तर देतातः--

**स्वतंत्रता लाधला । विरोध जयाचा मोडला ।**
**जालेपणाचा उतरला । फुंजाचि ज्याचा ॥ १०२ ॥**
**तेणें आपणेंविण कांहीं । लोकुचि देखिला नाहीं ।**
**तयासी येव्हडें वोझें काई । लोकसंग्रहाचें ! ॥ १०३ ॥**

'जो स्वार्थाचेनि नांवें । कैवल्यही नेघे' व 'जो आत्मसुखाहूनि । न चाखेचि कांहीं' त्याला कांहीं दुजेपण उरलें नसल्यामुळें तो कोणाचें कांहीं लागत नाहीं. ज्ञानोत्तरभक्तानें लोकसंग्रहार्थ कर्म केलेंच पाहिजे हा 'च'कार शिवकल्याणांना मान्य नाहीं.

**ह्मणोन मतांतर सांडून । करावें हें अमृतपान ।**
**मग हें अमृताचि आपण । होऊनि ठाकिजे ॥ १६३ ॥**

येथलें गुह्यज्ञान गुरुकृपेशिवाय प्राप्त होणारें नाहीं, केवळ प्राकृत जनांना तें दुर्लभच !

ज्ञानेश्वरांचा मूळ ग्रंथ ८०० ओव्यांचा असून त्यावर शिवकल्याणांनीं सरासरी आठपट ओव्या रचल्या आहेत ! मूळ ग्रंथाप्रमाणेंच हा टीकाग्रंथही प्रासादिक व विशद असून विद्वमान्य आहे. 'त्यांत पहिलें प्रकृतिपुरुषवंदन । दुजें श्रीगुरूचें स्तवन । तिजें वाचारिणोत्तीर्ण । अवसान केलें ॥ चौथ्यांत शून्यवाद खंडिला । ज्ञान अभेदुही दाविला । सच्चिदानंदु वर्णिला । पांचव्या प्रकरणी ॥ षष्ठी शब्दीं शब्दखंडण केलें । सप्तमीं अज्ञान अभावा आणिलें । अष्टमीं उतरिलें । ज्ञानफुंजातें ॥ नवमीं सिद्धांची रहणी । दशमी ग्रंथोद्भवाची कडसणी । इये रीतीं ग्रंथवोवणी । प्रवाहें आली' अशी ग्रंथकारानें विषयानुक्रमणिका दिली आहे. सातवें प्रकरण मुळांतही मोठें आहे व त्यावर यांच्या २१६१ ओव्या आहेत. प्रकरण १।६।९ यावरही प्रत्येकीं ६०० वर ओव्या आहेत. विषय प्रौढ असून या टीकाग्रंथाची मांडणी

ही प्रौढपणाची आहे, व शिवकल्याण हें मोठे स्वानुभवाची सत्पुरुष होते हें या ग्रंथावरूनही स्पष्टच दिसतें. ग्रंथकारांनीं हा ग्रंथ आपले निजगुरु नित्यानंद यांस अर्पण केला आहे. ह्या ग्रंथाचे अधिकारी वाचक कोण आहेत ?

**जें वैराग्यें चोखाळलें । मतांतरीं सांडवलें ।**
**साच स्वरूपीं सांठवलें । स्वानुभवें जें ॥ ४१९ ॥**
**जें श्रुतिशिराचें सार । तयाचें झालें वसतें घर ।**
**शांतीचा शेजार । लाधला जया ॥ ४२० ॥**
**जें सद्गुरूसी विकलें । देहभावासी मुकलें ।**
**कांहीं न होनि आतलें । अवघेंचि जें ॥ ४२१ ॥**
**तयाचे आंगीची हे खूण । म्हणोनि तयासीच अर्पो हें जाण ।**
**जेवीं सागरीचें जीवन । सागरीं अर्पे ॥ ४२३ ॥**

विषयाच्या मानानें ग्रंथाची भाषा दुर्गम नाहीं, सुलभच आहे. ' नवां भक्तीवरील जाण । दहावी जे स्थिति ' तथला आत्मतेजसुसंपन्न असा हा ग्रंथ आहे.

संप्रदाय एक, विचारसरणी एक, अनुभव एक, असा प्रकार असल्यामुळें शिवकल्याणांची टीका ज्ञानेश्वरांच्या रहस्याला अगदीं धरून आहे हें सांगायलाच नको. टीका ह्या शब्दाला ह्या विसाव्या शतकांत जो अर्थ आला आहे तो पूर्वी नव्हता. पूर्वी टीका म्हणजे मूळ ग्रंथाचें विशदीकरण, स्पष्टीकरण, रहस्यप्रकाशन असा असे. ज्ञानेश्वरी ही गीतेवरची टीका, नाथभागवत ही एकादशावरची टीका, ह्या टीका म्हणजे मूळाशीं एकरस झालेल्या पुरुषाचें विस्तृत विवरण होय. पूर्वींच्या टीकांत विरुद्धपणा नसे व क्वचित् अर्थभेद प्रकट करावयाचा असला तरी तो अत्यंत प्रेमादरानें, सूक्ष्मदृशांवाचून सहसा कोणाच्या लक्ष्यांतही येणार नाहीं अशा खुबीनें, तो व्यक्त करावयाचा. बाहेरा पिसा, शिवकल्याण व नाथ यांनीं श्रीधरी टीकेला धरून व त्यांत आपला अनुभव मिळवून टीका केल्या आहेत. दासोपंतांनीं गीतार्णवांत स्वतःचा धोपट मार्ग काढला आहे. शिवकल्याणांनीं ज्ञानेश्वरांचें हृद्गत त्यांच्याशीं पूर्ण समरस होऊन प्रगट केलें आहे व म्हणून त्यांच्या टीकेंत ' बोंचणारा खडा ' भाविकांस सांपडत नाहीं.

---

# १७ रमावल्लभदास.

## १ जन्मकाळ व बाळपण

एकनाथरूपी एक प्रचंड तारकनौका महाराष्ट्रसमाजसागरांत जंगी खळबळ उडवून तीराला लागून विराम पावली तरी तिच्या चळवळीमुळें ज्या गगनभेदी लाटा उसळल्या त्यांनींही तीराजवळपास अनेक लहानमोठया नौकांना हेलकावे खात तरंगायला लावलें! लहानसहान नौका सागराच्या पोटांत गडप झाल्या, मोठाल्या नौका अद्याप तगून राहिल्या आहेत. अशा मोठया नौकांपैकींच रमावल्लभदास ही एक मोठी सुंदर बांधणीची व नयनमनोहर नौका दक्षिणकानडाप्रांताच्या किनाऱ्यावर लागून तेथेंच अद्याप तरंगत राहिली आहे! ह्या कवीनें गीतेवर '**चमत्कारी टीका**' नांवाचा टीकाग्रंथ रचिला आहे. त्यांत ९ व्या अध्यायाच्या शेवटीं ग्रंथरचनेचा काल शक १५५० धाता संवत्सर, आश्विन शुद्ध १० ह्म० विजयादशमी हा दिला आहे. '**दशकनिर्धार**' हा कृष्णजन्माध्यायावरील छोटा ग्रंथ शके १५५५, श्रीमुखसंवत्सर मार्गशीर्ष पौर्णिमा बुधवार (दत्तजयन्ति) या दिवशीं संपल्याचे त्या ग्रंथांत नमूद आहे. तसेच '**गुरुवळी**' ह्या **गुरुमाहात्म्य** पर प्रकरणावर रचनाकाल शके १५५८ कार्तिक हा दिलेला आहे. 'गुरुमहिमा' ही त्याच शकांत व त्याच मासांत शुद्ध १० स पंढरीस झाला. दोन्ही प्रकरणें अभंगवृत्तांत आहेत. कवीची एकंदर कविता पाहतां ह्या कवितेचा निपज शक १५४० ते शक १५७० ह्या काळांतला दिसतो, अर्थात् त्यांचा जन्मकाल शके १५१० च्या सुमारचा असावा. माझ्यामतें शके १५१० ते शके १५७० हा रमावल्लभदास यांच्या आयुर्मानाचा काळ ठरतो.

रमावल्लभदासांचें पूर्वाश्रमींचें नांव '**तुकोपंत**' असें होतें. त्याचे

वडील अंबाजीपंत हे देवगड येथील मुसलमानी राजाचा एक अंबरखान नांवाचा प्रधान होता त्याचे कारभारी होते. हे आश्वलायनशाखेचे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून यांचें गोत्र अगस्ति होतें (चमत्कारी टीका अ० ९). जगदंबेच्या कृपेनें त्यास हें एकच पुत्ररत्न झालें व त्याचें नांव त्यांनीं 'तुकोपंत' ठेवलें. तुकोपंताच्या जन्मकाळीं हत्तीवरून साखरा वांटण्यांत आल्या व त्याच्या अंगावर श्रीमंती बाळलेणीं होतीं. ७ वे वर्षी मुंज, व १२ वे वर्षी लग्न होऊन वयाचे १८ वे वर्षी तुकोपंतास वडिलांचा कारभार मिळाला, आणि व तो त्यांनीं कांहीं वर्षे अक्कलहुषारीनें चालविला. तुकोपंतास चार पुत्र होते. त्याच्या चौथ्या मुलाचा वंश सांप्रत सोलापुरास राळेरासकर या उपनांवानें प्रसिद्ध आहे. त्याचे घरीं रमावल्लभदासांच्या पूजेची कृष्णमूर्ति असून कृष्णाष्टमीचा उत्सव होत असतो.

---

## २ वैराग्यलाभ व गुरुकृपा.

वडिलाचा कारभार मिळून तें काम करीत असतांना एकदां किल्ल्यास शत्रूनें वेढा दिला. तुकोपंतांनीं २ हजार 'स्वार व पायनर' म्ह० घोडदळ व पायदळ बरोबर घेऊन शत्रूशीं युद्ध करून जय मिळविला. 'धीर ते वीर मोक्ष पात्रता' या युद्धनीतीस जागून तुकोपंत शौर्यानें लढले व विजयी झाले. लुटींत कोणांस घोडे, कोणांस हिरेमाणकें सांपडलीं, आमचे तुकोपंतास 'एकनाथी भागवताची' एक प्रत मिळाली ! तुकोपंतांनीं नाथभागवत साग्र वाचून पाहिलें तेव्हा 'भाग्य आमुचें परमाद्भुत । श्रीभगवंतें कृपा केली' असें त्यास वाटलें. तुकोपंत व त्याचे बाळमित्र कृष्णाजीपंत या उभयतांनीं नाथभागवताचीं अनेक पारायणें केलीं. उभयता त्यांत रमले व त्यांचे चित्तांत भगवद्भक्तीचा उदय झाला. नाथभागवत प्रेमसमुद्र आहे. त्याचे संगतींत अहोरात्र रमतां रमतां त्यांची तन्मयता झाली. प्रपंचाकडे व नोकरीकडे त्यांचें दुर्लक्ष होऊं लागलें.

प्राप्तपुरुषाची गांठ पडावी व चिदचित्ग्रंथी सुटावी याविषयीं त्यास तळमळ लागली. घरांतील मंडळीचा विरोध झाला; पण 'दीपकलिका लहान असते ती वाऱ्याच्या झुळुकीनें विझून जाते, तथापि पेटलेलें कोलीत असतें त्यास वारा लागावा तितकें तें अधिकच पेट घेते' या न्यायानें तुकोपंतांचा वैराग्याग्नि अधिकच प्रज्वळला. सद्गुरुशोधनार्थ घरदार सोडून व नोकरीचा त्याग करून ते घराबाहेर पडले. प्रथम त्यांनीं पंढरी गांठली. तेथील भक्तिप्रेमानंद पाहून त्यांचें चित्त स्थिर झालें. रमावल्लभदास सांगतात:— ( वृ. वा. अ. १० )

**कैसें दासपण घेऊनी। संतचरणरज वंदूनी ॥**
**श्रीपंढरपुरास जाऊनी। अपार रजीं घोळला ॥ १४१ ॥**
**घोळला आपण सर्व जाहला। श्रीगुरुपदा शरण आला।**
**श्रीगोपाळ-उपासने रिघाला ॥ जें महावाक्याचें जिव्हार १४२**

त्यांचे नियतगुरु 'लक्ष्मीधरदास' हे त्यांस गोदातटाकीं भेटले व त्यांनीं यांचा अधिकार पाहून त्याजवर अनुग्रह केला. यानंतर तुकोपंत हे रमावल्लभदास या नांवानें प्रसिद्धीस आले. गोदा व प्रवरा या पावन नद्यांचा जेथें संगम होतो तेथें लक्ष्मीधरानीं त्याचा अंगीकार केला व त्यांस गोपाळविद्या दिली. त्यांनीं स्वतःच म्हटल्याप्रमाणें:—

**पर्वकाळीं श्रीगोपाळविद्या। उपासना देतांच सुविद्या।**
**प्रगटली, गेली अविद्या। स्फूर्ति होऊं लागली ॥**

श्रीगुरुपासून त्यास कृष्णभक्तीचें रहस्य कळलें. रमावल्लभदास कृतार्थ झाले. वाक्यवृत्तिटीकेंत त्यानीं आपली गुरुपरंपरा दिली आहे तीवरून हे श्रीशंकराचार्यपरंपरेंतले होते असें दिसतें. आदिनारायण—ब्रह्मा—नारद—व्यास—शुक अशी ही परंपरा शंकराचार्यांकडून विज्ञानाश्रम—आनंदाश्रम—श्रीलक्ष्मीधर येथपर्यंत आली. 'बोलिजे त्यावरी श्रीलक्ष्मीधर। तो अस्मादिकांसी गुरुवर। भिक्षुकवृत्ती परी मनोहर। नैराश्यलक्ष्मी साच घरीं'

'**गुरुवाळि**' ग्रंथांतही त्यांनीं आपली गुरुपरंपरा अशीच दिली आहे;

अहिंसातत्त्वाचा बुद्धानें पुरस्कार केला पण त्याचबरोबर वेदाचें प्रामाण्य मानलें नाहीं व त्यामुळें कर्ममार्ग उच्छेदिला; तो पुन्हा रूढ करण्यासाठीं भट्टाचार्य यांनीं बौद्धमत उडविलें असें सांगून रमावल्लभदास म्हणतात कीं पुढें:—

**कर्ममार्गीं लोक कर्मजड झाले। बुडों पै रिघाले भ्रमामाजीं॥११३॥**
**मार्गीं भ्रमें लोक बुडत अपार। 'शंकर' उदार अवतरला ११४**

शंकराचार्यांचा संन्यासमार्ग पुढें श्रीधराचार्यांनीं चालविला व तेथून पुढें विज्ञानाश्रम–आनंदाश्रम–लक्ष्मीधरदास–रमावल्लभदास अशी परंपरा चालली असें कवीचे शिष्य राघवदास यांनीं २।३ ठिकाणीं म्हटलें आहे.

श्रीशंकराचार्यांच्या वाक्यवृत्तीचें 'जो भक्तियुक्त घे विचार' त्याला 'गुरुवीण देव नाहीं' हेंच रहस्य रमावल्लभदासांस पटलें. हरिगुरूंसी भेद नाहीं हें पूर्ण पटलें. 'राहिलें मनीं गुरूचें ठाण' 'दास देहास नाम स्वभावीं। वल्लभ अंतरीचा गोसावी। रमा हे स्फूर्तीच प्रगट दावी। रमा-वल्लभदास म्हणे'—रमा ह्म० अंतःस्फूर्ति, तिचा वल्लभ ह्म० अंतर्यामी रहाणारा नारायण व त्याचा दास तो रमावल्लभदास! कवीचे आवडते ग्रंथकार मुख्य शंकराचार्य व त्यांचे व्याख्यानकार, भागवतकर्ते व्यास व भागवतटीकाकार श्रीधर, मुकुंदराज, ज्ञानेश्वर, बहिरंभट, एकनाथ, व माधवदास हे होत. ते 'चमत्कारीटीकेंत' म्हणतातः—'संवाद गुरु-शिष्यांचा। ऐसा विवेकसिंधु केला साचा। त्या मुकुंदराज योगियाचा। उप-कार वाचा न बोलवे ॥ आणि जातवेद सज्जन। श्रीभागवतीं ज्याचें मन। तेवीं एका एकीजनार्दन। जे जीवन भाविकां' वैष्णवधर्मी अति-प्रेम ठेवणारे 'अच्युताश्रमस्वामी,' व 'माधवदास' याचे उल्लेख करून रमावल्लभदास म्हणतात कीं 'या सर्वांसी भावचि कारण। भावें करितां यांचें स्मरण। माझे निरूपणासी स्फुरण। हे आपण देताती—' कवीनें ज्ञानेश्वरनामदेवांचाही उल्लेख केलेला आहे.

लक्ष्मीधर गुरूंनीं गीताभागवतार्थ विशद दाखवून मला अर्थमय केलें,

दृष्टिमात्रें अंतर्बाह्य शांतिसुख दिलें, भवाची कल्पनाही ठेवली नाहीं, त्यामुळें सर्व वासुदेव होऊन अनुभवीं अनुभव मुराला, नाना मतांच्या व देवांच्या मार्गी हिंडणाऱ्या मला स्वस्वरूपीं स्थिर केलें. आतां ' मज पाहतां दुजें नाहीं ' असें झालें आहे. सगुणनिर्गुण, जीवब्रह्म, विश्व व गुरु ' दोन्ही एकचि जालें. '

**गुरुशिष्यविलास । लोपे जगदाभास । आनंदें आनंद व्याप्त रे ।**
**बोल खुंटला अबोल तुटला परिपूर्ण नटला आप्त रे ॥**

रमावल्लभदासांनीं एका पदांत थोडेंसें आत्मचरित्र दिलें आहे:—

**देवगिरीगडीचा राजा । अंबर प्रधान त्याचा ।**
**सकळ महालाचा साचा । लेखक होतों मी त्याचा ॥......**
**वेडें वेडें ग केलें । कान्हाईनें मग नेलें ।**
**म्लेंच्छसेवे सांडविलें । आपुल्या सेवे लावियेलें ॥ वेडे० ॥**
**संसार हा झाडावया । सद्गुरु लवकरी आला ।**
**पहिलेपण नाहीं नाहीं । झेलितों अनुभव भला ॥ ३ ॥**
**देहबुद्धि खोंचियेली । जनमान खोंचियेला ।**
**अहंकार विरोनि गेला । स्वानंद मुरोनि ठेला ॥ ४ ॥**
**शिव जिणें मोहियेला । जीवु माझा तिणें नेला ।**
**रमावल्लभाचा दास । कान्हाई होउनि ठेला ॥ ५ ॥**

---

## २ पूर्वींचा मी व आतांचा मी !

रमावल्लभदासांचा एक सुंदर अभंग आहे. 'पूर्वी' कसा होतों व 'आतां' कसा आहे—याचें त्यांनीं त्यांत नामी वर्णन केलें आहे. गुरुबोधानें आत्मतृप्त होण्याच्या पूर्वींचा मी व आतांचा मी, साधकस्थितींतला मी व सिद्धावस्थेंतला मी, ह्या दोन अवस्थांचें यांत फार मनोरम चित्र काढलें आहे. पूर्वींचा मुमुक्षु व आतांचा मुक्त—ह्या चित्रांत साधकांना मोठा बोध घेण्यासारखा आहे. ' तो मी व हा मी ' दोन्ही चित्रें पहा:—

**मुळीं लागतां सहज । मायबाप नाहित मज ॥ १ ॥**
**झालों पोसणें संतांचें । मन कोंवळें तयांचें ॥ धृ० ॥**
**गोत्र ‘ अगस्ति ’ होतें साचें । आतां गोत्र व्यापकाचें ॥ २ ॥**
**‘ ऋग्वेदी ’ होतों पहिलें । आतां ‘ भागवती ’ वहिलें ॥ ३ ॥**
**नामघोषाचा आचारू । भगवद्गीतेचा विचारू ॥ ४ ॥**
**पूर्वीं संध्या ते त्रिकाळ । प्रेमसंध्या सर्वकाळ ॥ ५ ॥**
**पूर्वीं होतों मतभेदी । आतां मत जी अभेदी ॥ ६ ॥**
**पूर्वीं बोलिलों लौकिक । आतां बोले अलौकिक ॥ ७ ॥**
**पूर्वीं मान त्यांच घ्यावा । आतां मान सर्वां द्यावा ॥ ८ ॥**
**पूर्वीं रुचे चतुरपण । आतां भोळीव आपण ॥ ९ ॥**
**पूर्वीं मुक्तीलागीं वाहे । आतां भक्तीलागीं वाहे ॥ १० ॥**
**पूर्वीं ‘ तारक होता हरी ’ । आतां ‘ तारक मजला करी ’ ११**
**पूर्वीं होतों परतंत्र । आतां सर्वांशीं स्वतंत्र ॥ १२ ॥**
**पूर्वीं रुचे रूपनाम । आतां त्याचें नाहीं काम ॥ १३ ॥**
**नामरूप जाउनि भास । अवघा रमावल्लभदास ॥ १४ ॥**

ह्या बहारीच्या पदांत पहिले दोन चरण अधिक महत्त्वाचे आहेत. पहिल्या चरणाचा अर्थ नाथांच्या अभंगांत स्पष्ट केला आहे (पृ.२१७).

मी मायबापविहीन पोरकें पोर आहे हें जाणून दयाघन संतांनीं मला जवळ केलें, आपल्या कृपेची शाल मला पांघुरविली. हें झाल्यावर मागें आणि पुढें पाहूं लागलों तों माझ्यांत काय भेद झाला तें मला कळून आलें. देहबुद्धि होती तोंवर कसा होतों हें पहिल्या चरणांत व आत्मबोध झाल्यावर कसा आहे हें दुसऱ्या चरणांत ह्याप्रमाणें कवीनें पुढें अभंगभर वर्णन केलें आहे. पूर्वीं मतभेदांत, लौकिककथावार्तेत गुरफटून मानासाठीं धडपडत होतों, आतां तें पूर्वींचें सारें वेड गेलें! आतां भेदाभेदातीत झालों असून अद्वितीय परमात्म्याच्या गोष्टीवांचून दुसरी गोष्टच बोलत नाहीं व ‘ अमानी मानदो मान्यो ’ असा होऊन महीवर विचरत आहे !

---

## ४ मित्रलाभ व ग्रंथरचनारंभ.

रमावल्लभदास गुरुकृपा झाल्यावर नाशीकत्र्यंबकला गेले. पंचवटींत त्यांना गोपाळ गोसावी भेटले. त्यांचें परस्परप्रेम जमलें. 'लागली संतसंगाची चट। ब्रह्मनिरूपण आवडे चोखट.' याप्रमाणें 'म्लेंच्छसेवा टाकून देऊन। निःस्पृह हरिभक्त होऊन' ते गोदातीरींच कित्येक वर्षं राहिले. तेथें त्याचे बाळमित्र कृष्णार्जापंतही आले. त्रिवर्ग समशील मित्र क्षेत्रांत एकत्र मिळाले. तेथें भक्तिप्रेमाचा सुकाळ झाला. 'बहिरंभटाची दशमस्कंधावरील प्राकृत टीका,' ज्ञानेश्वरी व नाथांचें एकादशावरील भाष्य बरोबर वाचण्यांत, त्यावर गोड संवाद करण्यांत व प्रेमळपणानें कृष्णसुख भोगण्यांत त्यांचा बराच काळ गेला. हे तीन ग्रंथ नित्य सत्संगीं पाहण्यात काळ जात असतांना आपली स्थिति कशी होत असे याचें रमावल्लभदासांनींच गोड वर्णन केलें आहे. "अर्थांतरें मी जालों तुष्ट। सद्भाव अष्ट दाटले॥ स्वेद रोमांच उभे राहिले। अर्धोन्मीलित नेत्र वाहिले। बाष्पस्फुंदनें वाचें मोहिलें। आणि लाहिले कंपातें" गोपाळ गोसावी यांनीं रमावल्लभदासांना 'ब्रह्म होऊनि ब्रह्मपदें गावीं। श्रीकृष्णावताराचीं' अशी प्रेरणा केली. तेव्हां त्यांनीं '**दशकानिर्धार**' ग्रंथ लिहिला. रमावल्लभदास प्रसंगानुसार स्वयंस्फूर्तीनें कृष्णवर्णनपर पदेंही लिहूं लागले. त्यांचा मित्र कृष्ण गोसावी हा वाईस गेला व तेथून कोंकणांत दालभ्यपूर (दाभोळ) येथें गेला व रमावल्लभदासांची कविता व पदें तिकडील लोकांस ऐकवून त्यानें रमावल्लभदासांच्या भेटीची उत्कंठा लोकांत उत्पन्न केली. रमावल्लभदास वांईक्षेत्रीं गेले. तेथें त्यास नृसिंह आप्पाजी, गोविंद वांकडा, राघवदास, एकनिष्ठ शिवभक्त उमावल्लभदास इत्यादि सद्भक्त भेटले, व ह्या संतमेळ्यांत रमावल्लभदासांनीं श्रीशंकराचार्यांच्या '**वाक्यवृत्ती**' वर प्राकृत टीका लिहिण्यास आरंभ केला. पुढें ही मंडळी दालभ्यपुरास गेल्यावर तेथें ह्या

टीकेची त्यांनीं समाप्ति केली. 'तीरीं कृष्णेचे आरंभिला । मग दाल्भ्येश्वरीं संपविला.' कृष्णभक्तिपर भजनकीर्तनांनीं त्यांनीं जडमूढ व नास्तिकजन भक्तिमार्गास लावले.

**" निजभक्तसुखाकारणें । श्रीशंकराचार्य बोलणें ।
ते वाक्यवृत्तीची टीका करणें । जाहलें प्रेरणें गुरूचें ।
गुरूचें वचन करावें । महावाक्यरहस्य प्रगटावें ।
ब्रह्मज्ञान भक्तांसी होआवें । वैराग्यभक्तिसहित " ॥**

श्रोता कसा असावा यावरील सुंदर ओवीः—

**संपूर्ण आणावें मन कानीं । दृष्टी वक्त्याचें लावी ध्यानीं ॥
श्रवण करावया अवधानीं । जें ऐकावें तें अंगें होणें ॥**

वाक्यवृत्तिग्रंथावरील ही टीका फार नामी झाली आहे. दास्याची महती कवि स्वतः सांगतातः—

**' दास्यत्व घ्यावयासी हेंचि कारण । जे भक्तीचें होआवें संरक्षण
भक्तीवीण विचक्षण । ज्ञान अलवण ( आळणी ) बोलती ! ' ॥**

देवाचें दास म्हणविण्यांत हानी कोणती ? अभेदभावाचें ज्ञान झालें तरी देहेंद्रियांना सेवेचें वळण राहतें. देवाच्या अंगावर वस्त्रालंकार चढवितांना आपले हात सेवा करितात, डोळ्यांच्या पात्यांना रूप पाहतांना शोभा येते. ' दासपणाची रीती । ज्ञानरत्नासी कोंदण ' आहे.

विराट देशाभीतरीं ( वाईप्रांतीं ) धोममहाबळेश्वरीं मेरुलिंग प्रसिद्ध आहे. त्याच्या दक्षिणेस यवतेश्वर जागृतस्थान आहे. तेथें काशीभट अनुष्ठानी, गोविंदभट भागवत, शंकर गोविंद मल्हारी, नृसिंह आप्पाजी—हे प्रीतीचे साधु,

**' या संतावें चातुर्मासी झाली । ' निर्धारटीका ' वाचे आली ।
एकान्तीं वृत्ति श्रवणीं घाली । ग्रंथीं लागली वृत्ति त्यांची ॥
साधकांच्या हिताकारणें । श्रीकृष्णें मज बोलविणें ॥
श्रीरमावल्लभदासपणें ॥ ग्रंथ करणें संपूर्ण ॥**

## ५ कानडाप्रांतांत कृष्णभक्तीचा प्रसार व आवडीमठ.

आपले शिष्य आणि मित्र व कुटुंब आणि मुलें इतका परिवार बरोबर घेऊन सभाग्य जीवांचा उद्धार करण्यासाठीं व भाविकांना भक्तिसुख देण्यासाठीं रमावल्लभदास हे रत्नागिरी, सावंतवाडी, वेंगुर्लें, व गोवा ह्या प्रांतांतून दक्षिणकर्नाटकांत उतरले. महाशिवरात्रीची पर्वणी पाहून ते दक्षिण कानडाप्रांतांत पुरातन शिवक्षेत्र जें गोकर्ण तेथें गेले. हें समुद्रतीरीं वसलें आहे. यात्रा बहुत जमली होती, त्या यात्रेंत लक्ष्मीबाई नांवाची एक तरुण सुस्वरूप सारस्वत स्त्री स्नान करीत होती. रमावल्लभदास व त्यांची मंडळी जवळच स्नानदानादि करीत होती. एकाएकीं त्या मुलीचें कर्णफूल तिच्या हातावर टप्पदिशी पडून त्यांतून समुद्रात पडलें व वाळूंत गेलें. ती मुलगी तें पाहून रडूं लागली. रमावल्लभदासांनीं विचारिलें 'मुली रडतेस कां?' तिनें उत्तर केलें: 'माझें कर्णफूल कानांतून गळून समुद्रात पडलें म्हणून रडते! कर्णफुलाची मोठीशी किंमत नाहीं. माझ्या घरचे चार कर्णफुलें घेऊन द्यायला समर्थ आहेत, पण आजच्या महापर्वणीला माझा सौभाग्यालंकार गळून पडला म्हणून मला रडायला आलें' 'तुझा सौभाग्यालंकार तर तुझा तुझ्यापाशींच आहे'–'नाहीं महाराज! तो माझ्या हातावर टप्पदिशीं पडून समुद्रांत पडतांना मी पाहिला देखील!' 'शोधून तर पहा'–तिनें कानाला हात लावला व पाहतें तों कर्णफुलें कानांतच आहेत! तिला व सभोंवारच्या लोकांना नवल वाटलें! हा कोणी सत्पुरुष आहे व याच्या कृपेनें आपला सौभाग्यालंकार आपणास मिळाला असें वाटून लक्ष्मीनें रमावल्लभदासांचें चरण धरिले व 'घरीं चलावें म्हणजे सर्वांना दर्शन होईल' अशी त्यांची विनंति केली. त्याप्रमाणें ते लक्ष्मीच्या घरीं गेले. घरमंडळीला तिनें घडलेला चमत्कार सांगितला. सर्वांची त्यामुळें पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. भूमि उत्तम आहे, परमार्थाची पेरणी करायला योग्य आहे असें जाणून थोडक्याच काळांत त्यांनीं लक्ष्मीला व तिच्या घरच्या सर्वांना श्रीकृष्णभक्तीचा उपदेश केला.

सर्वांनीं त्यांचा अनुग्रह घेतला. लक्ष्मीची कृष्णपरमात्म्यावर अतोनात भक्ति बसली. तिची कृष्ण-आवडी पाहून गुरूंनीं तिचें 'आवडी' हेंच नांव ठेवलें. 'आवडी' ला द्वादशाक्षरी मंत्र देऊन त्यांनीं कृष्णाची उपासना दिली. श्रीकृष्णजयन्तीचा पंधरा दिवसांचा उत्सव रमावल्लभदासांनीं त्यांचे घरीं केला, व दरसालच्या उत्सवाचा कित्ता घालून दिला. प्रत्येक दिवशीचा कार्यक्रम ठरविला, अनेक प्रकारचीं पदें व अभंग रचून दिले. त्यांनीं दिलेली कालियामर्दन कृष्णाची मूर्ति अद्याप आवडीमठांत आहे. लक्ष्मीचे पति नारायणआप्पा हैसूर राज्यापैकीं नगर संस्थानचे दिवाण झाले. घरांत लक्ष्मी खेळू लागली. नगराधिपतींनीं गैरसप्पा व चंदावर या उभय प्रांतांचा कारभार त्यांस दिला व लोभ 'उभयकर' म्हणूं लागले. नारायणआप्पा हे दरसाल श्रीकृष्णाष्टमीचा उत्सव करूं लागले. तेथील उत्सवमंदिरास 'आवडीचा मठ' म्हणूं लागले व याच नांवानें तो अजून प्रसिद्ध आहे. ह्या उत्सवाचा कार्यक्रम मी स्वतः पाहिला आहे.

'आवडी मठ' जेथें आहे तें मल्लापूरगांव कारवार जिल्ह्यांत कुमठा बंदरापासून ४ मैलांवर आहे. चंदावर हा गांव तेथून जवळच एका ओढ्यापलीकडे आहे. तेथें मुरलीधर कृष्णाची मूर्ति भव्य मंदिर बांधून प्रतिष्ठित केली आहे. तेथें श्रीरमावल्लभदाससंप्रदायानुसार दरवर्षी श्रीकृष्णजयन्तीचा उत्सव मोठ्या थाटांत होतो. श्रीरमावल्लदासांची पारमार्थिक संपत्ति त्यांची प्रिय शिष्यीण आवडाबाई हिनें व कारवारप्रांतांतील प्रेमळ जनांनीं लुटली व यामुळें त्यांचा संप्रदाय तिकडे अद्यापही जिवंत राहिला आहे. आवडीमठाशिवाय कानडाप्रातांत शिराली गावीं राघवदासमठ, हेम्माडी येथील जोगनाडीमठ, हटयंगडी येथील गोसावीमठ, हे रमावल्लभदासांच्या हयातीपासून चालू असून त्यानंतर कारवार, भटकळ, कुंदापूर, मंगळूर, पुत्तूर इ० ठिकाणीं त्यांचे संप्रदायी मठ असून तेथें कृष्णजन्मोत्सव त्यांनीं सुरू केल्याप्रमाणें चालू आहे. कृष्णाष्टमीचा उत्सव अत्यंत शिस्तीनें व प्रेमळ निष्ठेनें 'आवडीचे' वंशज अद्याप करीत

असतात. श्रीरमावल्लभदासांनीं नारायणआप्पास कांहीं ओवीबद्ध पत्रें पाठविलीं आहेत त्यांतील दोन उतारे येथें देतों:—

... " **म्हणोनि गुरुभक्ता भाविका। नारायणा परम सात्विका। चतुरांमाजी चतुर निका।जाणसी विवेका शास्त्रमार्गें॥ शास्त्रमार्गें प्रवृत्ती प्रतिपाळिसी गुरुभक्ती। गुरुवचनीं प्रेमप्रीती। नाहीं स्थिती इतरांसी॥ हा भजनमार्ग। सर्वथा नव्हे सांग। रमावल्लभदास सांगे। ह्मणोनी अभंग असावें.** "

... " **आवडीस ऐसें रहा ह्मणा। जाणा विश्वासाच्या खुणा। तेणें कार्य साधेल बहु नाणा। श्रीकृष्णगुरुभजनासी॥ अवस्था अंतरींच घोटावी। बाह्यप्रपंचीं प्रीति दावावी। सावध असावें गुरु-अनुभवीं। लोकांमध्यें लोकसे॥ या स्थितीनें आवडी। असतां आह्मां बहु गोडी। जाण भक्तिप्रौढी। गोपाळनामें वाढल॥ जरी वेगळेपणें असावें। तरी कृपा असोंदे म्हणावें। आवडीस सांभाळावें। हेही लिहिणें नलगे॥ इति ओविया एकवीस। येणें स्वरूपीं होय समरस। ह्मणे रमावल्लभदास। आवडीस वाचावें** ".

आवडाबाईस रमावल्लभदासानीं लिहिलेलीं ११ लिखितें उर्फ ओवीबद्ध पत्रें 'प्रबोधचंद्रिका' ह्या छोटया पुस्तकांत छापलेलीं आहेत. ह्या पत्रांत कृष्णभक्तीचा महिमा सांगितला असून जागोजाग नीतिबोध केला आहे.

---

## ७ श्रीकृष्णजयन्तीव्रतोत्सवभजन.

रमावल्लभदासांनीं शिष्यांसाठीं श्रीकृष्णजन्मोत्सवाचा जो भजनमार्ग ठरविला तो वरील नांवाच्या एका पुस्तकांत एकत्रित केला आहे. प्रातः-स्मरण, काकडआरती, नित्यनियमाचें भजन, प्रत्येक वाराचें भजन,

ध्यानोपासना, गोंधळ, पूजोपचार, संतपूजन, श्रीकृष्णजन्मोत्सवाचा कार्यक्रम, दोलोत्सव, इत्यादि अनेक प्रसंगांवर रमावल्लभदासांनीं केलेल्या अभंगपदादिकांचा केलेला संग्रह फार मधुर आहे. मुख्य कवित्व रमावल्लभदासांचेंच आहे, तथापि त्यांत प्रसंगानुसार नाथांचीं कांहीं पद्यें, दोनचार तुकोबांचे अभंग, शिष्य राघवादिकांचीं पद्यें हींही घेऊन हा भजनसंभार पुरा केला आहे. चौदा आणे भाग रमावल्लभदासांचा व दोन आणे इतरांचा व तोही भजनांत सामील केलेला आहे. हें सर्व पुस्तक उपासकांना तर अत्यंत प्रिय वाटेलच पण कवित्वाच्या भोक्त्यांनाही त्यांतील सुंदर सरळ, सोपी व प्रासादिक कविता वाचून आनंद झाल्यावाचून राहणार नाहीं. रमावल्लभदास स्वानुभवी सत्पुरुष व प्रेमळ कृष्णभक्त होते. त्यांची वाणी साधीभोळी असली तरी अत्यंत प्रासादिक आहे. त्यांच्या कृष्णजन्मकथेचे बाराही प्रबंध अतिसुरस आहेत. त्यांत भागवतांत वर्णिलेली कृष्णजन्मकथा दिली असून बाळंतविडा, पूतनाशोषण, बालरक्षा, पाळणा, हल्लरगीता, दोला, भोंवरा, हुतुतु, बाळसंतोष, वासुदेव इ० विषयांवरील कविता भावनाप्रधान असून निरतिशय भक्तिसुखानें भाविकांचीं अंतःकरणें हालविणारी आहे. नाथांप्रमाणें त्यानींही ‘ मास श्रावण वद्य अष्टमी नक्षत्र रोहिणी मंगल । बुधवासर अर्ध निशी हृषीकेशी जन्मला ’ याप्रमाणें अजन्मा श्रीकृष्णाचा जन्मकाल दिला आहे. स्थलोस्थलीं श्रीकृष्णरूपाचीं व त्याच्या लेण्यांचीं वर्णनें बहारीचीं दिलीं आहेत. असो. आपण आतां ह्या गोड ग्रंथांतील थोडयाशा मौजा पाहूं:—

( १ ) “ पूर्ण ब्रह्म हें अनुपम्य गोकुळीं अवतरले । कंसा भय त्याचें थोर हृदयीं भरलें । पूतनेला विडा दिला विषें स्तन भरिलें । रूप सुंदर धरुनि अपार नंदगृह तें ठाकिलें ॥ १ ॥ ‘ यशोदे तुझें ग तान्हुलें अभिनव म्यां देखिलें । ऐसें कोठें नाहीं झालें । पाहिजे हृदयीं धरिलें । देईं मज यशोदे ! देखुनि वांझ मी पान्हेले । यशोदे ! ॥ पाहिजे निंबलोण केलें । कैसें पहा गुलगुलें । यशोदे ॥ ध्रु० ॥ देखोनियां पूतना बाळें

मांडिलें रुदन । यशोदा समजावी परि न राहे जगज्जीवन । त्या पापिणी-पाशीं तिनें दिधलें आणून । स्तनीं लावितांचि आकर्षिलें पंचही प्राण॥२॥ ' बाळा सोडीं रे क्षणभरी' मीच जाते बाहेरी ॥ बाळा० ॥ कैसा झोंबलासि जिव्हारीं । तान्हें नव्हेसि तूं निर्धारीं ॥ बाळा० ॥ आतां कैची माझी उरी। तिडक्या उठल्या माझ्र शिरीं ॥ बाळा० ॥ यशोदे । धांव गे बाहेरी ।कैशा वांचल्या या नारी ॥ बाळा० ॥ ३ ॥ आक्रंद आरोळ्या कैसें डोकें पै आपटी । झाडझाडुनि सांडी परी ते न सुटे कृष्णमिठी । वाढली दीड गांव मग पसरली ती मोठी । गर्जना ऐकुनि यशोदा आली उठाउठी ॥ ४ ॥ " अगाई काय बाळा झालें, कैसें अरिष्ट उदेलें । अगई०। माझ्या तान्हुल्या विसंबलें, इसी सुकुमार देखिलें । अगई० ॥ केवढे धूड पसरलें लेंकरूं नाहीं कीं दुखवलें ? ॥ अ० ॥ मज काय मोहन पडलें । अगई अंग तोंड रक्तें भरलें ॥ अगई ॥ पिलें नसेल कीं भ्यालें, म्हातारपणीं देवें दिल्हें ॥ अगई० " ॥ ५ ॥ अगोचर वेदा दृश्य तो गौळणीलागुनी । आपेआप मानुनियां स्तन पाहे धांगसुनी । हरिख झाला समस्तांला श्रीमुख पाहे जननी । ' आतां मोकळा गे नंदन शीत टाका उवाळुनी ' ॥ ७ ॥...

( २ ) " चिमणेसें मूल याचा चिमणासा पावा । ' ह्या पदांत 'चिमणी जडित कुंर्ची, चिमणे कशीदी व मोचे, चिमणाले गडी, चिमणाल्या गोपिका, चिमणी वेताटी, चिमणालीं वासुरें असा ' चिमण्याच्या 'भक्तीचा ओलावा रमावल्लभदासांनीं गाइला आहे.

( ३ ) 'हृदयमंदिर सावळ्या ! हें तुझें'– पण तूं ह्याचा त्याग केलास कीं ' काम क्रोध लोभ उंदिर मातले । तुजवीण गृह सर्वहि चाळिलें ' असें असून वासनेच्या पिसा, स्वार्थ हा किरात, ममतेची पाल, भुजंग हा मोह, दंभमान तस्कर, अविवेक श्वान हे सारे त्यांत घुसून त्याचा नाश करितात ! देवाचा धांवा करूनि त्याला बोलावलें कीं तो प्रथम अनुतापाला पाठवून सारें घर शुद्ध करून ठेवतो ! विवेक व विचार पाहणी करितात. तेव्हां ' गुरुवाक्यमंत्रें मोहसर्प गेला । अविवेकश्वान पूर्वीच

पळाला ॥ दंभमान दोघे देशोधडी झाले । सदा अनुतापें वसूं आरंभिले.' तंव्हां अहंकार मरून पडतो व बोधकृष्ण वस्तीस येतो.

( ४ ) "हृदयवृंदावनीं सद्‌गुरु सावळी हो । मांडुनि त्रिभंग ठाण गोपीगोपाळांच्या मेळीं हो । अरुणप्रभादीप्ति लाजे चरणकमळीं हो । ध्वजवज्रपद्मरेखा तेजागळी हो ॥ १ ॥ सद्‌गुरु व्यापके कोण्हा न कळे तुझा पार हो । सगुण गुणातीत तूंचि होउनि साकार हो । गाती तुझें नाम त्यांसी करिसी तदाकार हो । देउनि आपुलें प्रेम नुरविसी भेदा थार हो ॥ २ ॥...यमुनातटीं उभे धीट वेणु वाजवित छंदें हो । गायी पक्षी तेंचि लक्षी वृत्ति वेधल्या आनंदें हो । त्रिभुवना मोहन गहन घातलें ब्रह्मानंदें हो ॥ ३ ॥......

---

## ८ चमत्कारी टीका.

श्रीरमावल्लभदासांनीं भगवद्गीतेवर एक ओवीबद्ध सुंदर टीका लिहिली आहे. तिचें नांव त्यांनीं 'चमत्कारी टीका' असें ठेविलें आहे. ही टीका खरोखरीच अपूर्व आहे. हिच्याकडे महाराष्ट्राचें लक्ष जायला पाहिजे तितकें गेलें नाहीं. ह्या ग्रंथावर नाथभागवताची व त्यापेक्षांही ज्ञानेश्वरीची छाप अधिक पडली आहे. रमावल्लभदासांचें हृदय ज्ञानभक्तीनें पूर्ण भरलें होतें. त्यांची ही टीका अत्यंत सुबोध, प्रेमळ, सुसंबद्ध व सुटसुटीत आहे. हिच्यांत वाद किंवा मतमतांतरें नाहींत. सरळ गीतार्थ गंगाप्रवाहाप्रमाणें चालला आहे. वाचक कोठेंही अडखळत नाहीं, अचूक भक्तिप्रेमांत निमग्न होतो. यांत दोन चमत्कार आहेत. रमावल्लभदासांनीं 'राजगुह्याच्या' ९ व्या अध्यायावर प्रथम टीका लिहिली. 'ती संतां गोड वाटली भारी । उपरी विभूतीही बोलिलों ॥ बोलिलों विश्वरूपही मग । ऐसे अठरा अध्यायावरी सुभग । उत्तरार्ध जाहले तै संत जिवलग । पूर्वार्ध करी म्हणताती.' ९ व्या अध्यायापासून १८ व्या अध्यायापर्यंतची टीका प्रथम लिहिली, मग पहिल्यापासून ८ अध्यायापर्यंतची टीका

लिहिली व याप्रमाणें ही चमत्कारी टीका पुरी झाली. दुसरा चमत्कार असा कीं प्रत्येक अध्यायांत प्रकार कल्पून मग प्रकारानुरूप कवि ओव्या लिहित गेले. उदाहरणार्थ, ९ वाच अध्याय घेऊं. ९ व्या अध्यायात १३ प्रकार आहेत. एकाच विषयावरील श्लोकांचा एक गट म्हणजे एक प्रकार. राजगुह्यज्ञापणिका ( श्लोक १ ते ३ ) हा एक प्रकार, निर्गुण उपदेश ( श्लोक ४ ते ५ ) हा दुसरा प्रकार, पाखाडवर्णन ( श्लोक ६ ते १२ ) हा तिसरा प्रकार, इ० इ० प्रथम श्लोक, नंतर टीकेच्या ओव्या, नंतर श्लोकांतील महत्त्वाच्या पदावर भाष्य किंवा टिप्पणी–अशा क्रमानें हा सर्व ग्रंथ झाला आहे. गीताभ्यासकास ह्या पद्धतीनें दुसऱ्या ग्रंथाच्या साह्यावाचून स्वतंत्रपणें सर्व गीताग्रंथ लावायला सोपें जातें. ( अ० १ ).

आतां कोणी म्हणेल कीं ( अ० १३ ) ' श्रीगीता महाराष्ट्रसार । उदंड टीका झाल्या अपार । त्या असता पै साचार । त्वा हे प्रकार रचिले कां ? ' कवि म्हणतात ' कां रचिले तें मी नेणे ! ' पण थोडेसें सांगतों: ' ते अफाट ग्रंथ नेणती तेणें। काय घेणें कळेना । ' ' कळेना मग उपेक्षिती ! ' याची भगवंताला चिंता वाटून त्यानीं सकळग्रंथसार असा हा ग्रंथ लिहिण्याची मला स्फूर्ति दिली ! ही टीका ' चमत्कारी ' कैसी आहे ? ' असें विचाराल तर सांगतों: ' एकतांच जन अर्थ लाहे । आणि थोडियाच मध्यें पाहे । प्रमेय राहे सकाळिक ॥ सकळिक दुग्ध–हे त्याची साय । काढूनि चारी श्रीकृष्णमाय । बहु बहु गोड वानूं काय । मानस धाय तत्काळ ' हे प्रस्तुत ग्रंथाच्या सुबोधतेचें कविकृत वर्णन अगदीं यथार्थ आहे.

' सकळ वेदांचा अंतरार्थ । श्रीगीताशास्त्र यथार्थ । कर्म भक्ति आणि ज्ञानार्थ । त्रिकांडी भावार्थ एकचि '–आणि एकच भावार्थ ह्म० परमात्म्याला अनन्यभावें भजावें हाच. ' श्रीकृष्ण माझे अंतरीं असून ' तोच मला लिहवित आहे । हात वाहे त्याचेनि ' ( अ० ६ ).

पतीचें पत्र आलें. कीं सती जशी अनेकवार तें वाचूनही अतृप्त

राहते—इतरांना तें एकदां वाचलें कीं पुरतें—त्याप्रमाणें हें कृष्णाचें गीताख्य पत्र भक्तांना पुनः पुन्हा वाचावेसें वाटत असतें ! ( अ० १० )

'तुमची ही गीताटीका उष्टीच आहे कीं नाहीं ' या आक्षेपाचा परिहार कवीनें मौजेनें केला आहे. गीता ही व्यासांनीं ग्रथिली व मी ती देशभाषेंत आणीत आहे, गीतामृत हें मऱ्हाठी भाषेच्या वाटींतून श्रोत्यांस देत आहे. 'देश भाषा हे मऱ्हाटी। प्राशनास केली सत्य वाटी। घ्या घ्या मुखीं लावा वोटीं फिके पाठीं अमृत ॥ अमृत अमर सेविती। परी तृप्ती नव्हे, मग हें प्राशिती। मग चिरंजीवपद भोगिती। आरोगिती परी हेंच. ' रमावल्लभदास म्हणतात कीं हें व्यासोच्छिष्ट सारें जगच सेवन करीत आहे. मी ' सावकाश हें उच्छिष्ट सेवन ' केलें तर त्यांत नवल काय ? पण शब्द जरी उच्छिष्ट असले तरी ते ' अनुच्छिष्ट सुख ' देणारे आहेत ! त्यांचा सुवास अवीट आहे. ' तें दे अनुच्छिष्ट सुखास। येत सुवास अवीट ज्याचा. ' व्यासांचे शब्द संस्कृत व माझे 'देशभाषा मऱ्हाटी' असले त्यापासून होणारे स्वानुभवसुख हें—ताज्या लोणकढी तुपाप्रमाणें ताजें आहे, ते कधीं शिळें होत नाहीं ! आत्मसुख कधींच शिळें होत नाहीं. पात्र थोडेंसे भिन्न झालें तरी सेव्य वस्तु अभिन्न अखंड एकरस आहे. ' उच्छिष्टचि अनुच्छिष्ट कैसें ' यावर कवीनें २।३ मौजेचे दृष्टांत दिले आहेत. आत्मसुख उष्टें होतच नाहीं. मेघांतून पाणी पृथ्वीवर पडलें म्हणजे तें काय अपवित्र होतें? गाईचें दूध वासरूं पितें आणि मगच भरलेल्या चरव्या जगाला मिळतात म्हणून काय चरव्यांतलें दूध उच्छिष्ट होतें ? कृष्णमुखीचें अमृत अर्जुनाला मिळालें तेव्हां अनुच्छिष्ट होतें आणि तें काय आतां उच्छिष्ट झालें? चंद्राचें चांदणें जसें कधीं उच्छिष्ट होत नाहीं, तसें गीतेचें बोलणें कधीं उष्टें होत नाहीं ! ' घारीं चाड कीं छिद्रीं चाड '—घारगे खाण्याकडे सुज्ञ लक्ष देतात कीं घारग्याच्या छिद्राकडे लक्ष देतात ?—' तैसे प्राकृत बोल परी होय निवाड। अर्थ—सुरवाड अनुभवें '—बोल प्राकृत असले तरी अनुभवाची

वाणी असल्यामुळें अर्थाचें सुख भोगण्याकडेच सुज्ञांचें सारें लक्ष असतें. ( अ० १६ )

---

## ९ थोडे उतारे.

( १ ) **देह म्हणजे भाड्याचे घोडें** ! " जैसें घोडें भाडियाचें । काशीस जावया घेतलें साचें । वरें संरक्षण केलिया त्याचें । चालावयाचें बळ मार्गीं ॥ मार्गीं त्यास जतन करी ॥ कां मरों टेंकलें घोडें जरी । मग राहिली चालती परी । लोक उपरी हांसतील ॥ हांसतील लोक घोडियाचा । धणी बोल ठेवील साचा । तैसाच देहो ज्ञात्याचा । लोभ त्याचा त्यास नाहीं ! ॥ नाहीं, परी परोपकार । घडावया करी ज्ञानविचार । तदर्थी देत प्राणां आहार । परी स्वार्थाकार त्या नाहीं. ! ॥ ( अ० ४ )

( २ ) **चांगला राजा** " जो न्यायनीती सदा आचरे । पितृप्रेमें प्रजापालनीं वावरे । तस्करांमाजीं कणवें न भरे । देव द्विज वरे सुखी करी ॥ सात्विकां अयाचितां पाळी । दांभिकां तामसां वाळी । रणीं झुंजावया प्रेमनव्हाळी । सदा गाळी अनीति वाचा ॥ ऐसीयासी नराधिप बोलणें । जो झिजे धर्मरक्षणाकारणें । " ( अ० १० )

( ३ ) **शब्दज्ञानी व अनुभवी.** " अगाध प्रयत्नेंकरूनि । निजचित्ता आवरूनि । सदा आत्मा विवरूनि । राहे धरूनि अभ्यास ॥ तो सर्व पापांवेगळा । होवोनि लाहे बोध आगळा । अनेक जन्मींच्या संस्कारबळा । लाहूनि फळा पावतसे ॥ यापरी योगफळ पावतसे । आत्मस्वरूपा समरसे । तरी संवादविषयीं उल्हसे । धाला देतसे ढेकर जेवीं ॥ परी शब्दज्ञान बोलतीं । तैसी नव्हे त्याची मती । दृष्टांत देऊनि तुजप्रती । सांगों अतिसावध हो ॥ तरी एक अमृत खातसे । एक तो नोळखोनि सांगतसे । धाल्या भुकेल्या सारिखें नव्हे । तैशा दशे जाणावे ॥ कां प्रगल्भा सुरत वर्णन करी । तैसींच बाळाही गाय वैखरी । तरी ते नेणे अनुभवपरी । तैसीच कुसरी शब्दज्ञानियाची ॥ कां व्याली वेदनेचें निरू-

पण । करी ते व्यालीच जाणे आपण । वांझ नेणे तें लक्षण । तैसे तूं गण शब्दज्ञानी । कां जेणें अनुभविलें समरांगण । तेच विराळे ( वेराचे आविर्भाव ) नट आणी आपण । परी तो नेणे निर्वाणसण ( सण = उल्हास ) तैसे तूं गण शब्दज्ञानी । ( अ० ६ )

( ४ ) **आसुरी प्रकृतीचे श्लोक.** " त्यांची आशा परम घातक । त्यांचें कर्म परमपातक । त्यांचें ज्ञान भ्रमकारक । शास्त्र तारक नव्हे त्यांचें ॥ म्हणती तें मारूं हें हरूं । म्हणती तें करूं हें विसरूं (ठकवूं)। म्हणती तें पुरूं हें भरूं । पैल नरा धरूं एकान्तीं ॥ म्हणती तें नेऊं हें खाऊं । म्हणती तें देऊं हें दाऊं । म्हणती तें लेऊं हें गाऊं । हें घेऊं जाऊं एकान्तीं ॥"

(५) **ज्ञानीभक्त** "आर्त जिज्ञासु अर्थार्थी । तहीं महंत सर्व परमार्थी । परी ज्ञानी माझा आत्माचि सर्वार्थी । मज यथार्थी तो जाणे ॥ भेद जाऊनि अभेद आटे । अभेदावरी प्रेम दाटे । मीतूंपणाचें खत फाटे । सुख थाटे सुखाचें ॥ अनुत्तम हरिभक्तीवीण । नुसत्या शब्दज्ञानें प्रवीण । तो कोंडा कांडूनि करी शीण । अतिहीन गति पावे ॥ असो मद्भक्तिवैभव जाणती । तेचि ज्ञानीभक्त म्हणविती । तयांची मीच परमगति । जोडे संगती तो धन्य ॥ ( अ० ७ )

( ६ ) **दैवी संपत्तीचे लोक.** " ह्मणे महात्मयाचें चित्त । मज अपारातें गिंवसीत । दैवी प्रकृतीचे होऊनि आश्रित । कैसे निश्चित तें ऐक ॥ जे निर्धारासी वाढविती । जे शुद्धसत्वा लाडविती । जे शमदमा चढविती । वांचविती शांतीतें ॥ जिहीं जनमान तुच्छ केला । ज्यांचा दंभ विरोनि गेला । जे रागेले परपीडेला । ज्यांचा मेला अहंकार ॥ जाणूनियां निरुतें । सर्वांभूतीं देखती मातें । सेवूनि पूर्ण सद्गुरुतें । संदेहतरूतें छेदिती ॥ ( अ० ९ )

———

## पद व अभंग.

कृष्ण आवडी देखेन केव्हां दृष्टी । कृष्ण आवडी देखिल्या प्रेमवृष्टि । कृष्ण आवडी अगाध सर्व सृष्टी । कृष्ण आवडी पाहिल्या निजपुष्टी ॥ १ ॥ कृष्ण-आवडी हे परेहून पर । कृष्ण-आवडी हे साराहुनि सार ॥ ध्रु० ॥ कृष्ण-आवडी तोडिते मीतूंपण । कृष्ण-आवडी हें स्नेहाचें बंधन । कृष्ण आवडी स्मरवी नारायण । सदाशीवासीं अखंड हेंचि ध्यान ॥ २ ॥ कृष्ण-आवडी धरिति जीवन्मुक्त । कृष्ण-आवडी मानिती पूर्ण भक्त । कृष्ण-आवडी अत्यंत विरक्त । कृष्ण आवडी सिद्ध जीवन्मुक्त ॥ ६ ॥ कृष्ण-आवडी सांगतां प्रेम कोड । कृष्ण- आवडी चाखितां लागे गोड । कृष्ण-आवडी तोडिते विषय झाड । कृष्ण-आवडी अविद्या झाली रोड ॥ ८ ॥ कृष्ण-आवडी उपमे नाहीं सरी । कृष्ण-आवडी दाटल्या सबराभरी । कृष्ण-आवडी क्षणांत ऐक्य करी । रमा-वल्लभदास हे नवलपरी ॥ ९ ॥

( २ ) अवघा बोले चाले हरी । ज्याची कथा तोची करी १
होऊनीयां श्रोतावक्ता । करी आपुली आपण कथा २
तोचि झाला जनवन । तोची मनाचें पै मन ३
तोचि अहं सोहं झाला । अहंसोहं गिळोनि ठेला ४
विश्व व्यापक परिपूर्ण । अवघा एकचि नारायण ५
कैचा रमावल्लभदास । अवघा हरीचा उल्हास ६

---

## १० संतनामावळी.

( रमावल्लभदासांचे वेळीं ह्म० शके १५५० च्या सुमारास महाराष्ट्रांत ‘ भाववळें नामांकित ’ झालेल्या संताचीं नामावळि येथें आपणांस मिळत आहे. कांहीं नांवें आपल्या परिचयाचीं नाहींत. यांत नानक ( हिंदी ) संत आले आहेत. चोंभा, वहिरो जातवेद, नामापाठक, मृत्युंजय, दिगंबरदास, ( दासोपंत, ) कृष्णदास मुद्गल, हीं नांवें विशेष लक्षांत ठेवलीं पाहिजेत. )

निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान वटेश्वर । विसोबा खेचर ज्ञानशील १
परमानंद जोगा जगमित्र नागा । केशवदास चांगा हरिप्रिय २
साबडे हे भक्त हरीसी आवडत । स्मरण करितां नेत आपणापासी ३
परिसा भागवत नामा सिंपी भक्त । नाम ज्याचें रुचत हरीलागीं ४
कान्हया हरिदास महादेव पाठका । सावतामाळी चोखा हरिजन ५
मुक्ताबाई माता कूर्मदास आवडता । गोरा कुंभार अनंता प्रिय बहु ६
हरिदास मुरारी सोनार नरहरी । निरंतरा निरंतरीं हरिध्यान ७
मुकुंदराज योगी नानक पवित्र जगीं । अवधूत बैरागी हरिलागीं ८
वल्लभानंद भानुदास जाण । हरिनामें पावन हरिसखे ९
बाहिरो जातवेद चिंतामणी प्रसिद्ध । आणि तो नित्यानंद हरिगण १०
योगी दामोदर हरीचा शरणागत । विठू नारा सुत नामयाचे ११
कान्होपाठक भक्त सद्गुरु-अंकित । बनाजी विश्वनाथ हरिदिन १२
पाठक नामा आणि दिगंबरदास । अंतागिरि शिवदास हरिसखे १३
एकाजनार्दन अवतार परिपूर्ण । करावया उद्धरण भाविकांचें १४
अच्युताश्रम यति जया नामीं अतिप्रीती । गंगाधर निश्चितीं गुरुभक्त
कृष्णदास मुद्गल चोंभा कृष्ण बाळ । विठ्ठलनाम निर्मळ महाभक्त १६
विठा कृष्णदास अगस्तींच्या गोत्रीं । मृत्युंजय वक्त्रीं नाम गाय १७
ऐसे साबडे भक्त हरीचे शरणागत । झाले नामांकित भावबळें १८
रमावल्लभदास नित्य स्मरे यांस । त्यांचे सेवुनि शेष सुखी असे १९

---

# १८ पंधरासोळाव्या शतकांतील कांहीं संतकवि.



## १ रामाजनार्दन.

महाराष्ट्र संतकवींत तीन पंचायतनें आहेत ! एक ज्ञानेश्वरपंचायतन. यांत ज्ञानेश्वर, निवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई व चांगदेव या पांचांचा समावेश होतो. दुसरें पंचायतन एकनाथांचें. यांत एकनाथ ह्म० एकाजनार्दन, दुसरे रामाजनार्दन, तिसरे जनीजनार्दन, चवथे विठा रेणुकानंदन, व पांचवे दासोपंत. यांना नाथपंचक म्हणतात. तिसरें रामदासपंचायतन. यांत रामदास, रंगनाथस्वामी, जयरामस्वामी, केशवस्वामी व आनंदमूर्ति. पंचायतन ह्म० अगदीं आंतला पुष्ठा ! पहिल्या पंचायतनाचा विचार पहिल्या खंडांत व दुसऱ्याचा चालू ह्म० दुसऱ्या खंडांत झाला. तिसऱ्याचा तिसऱ्या खंडांत होईल. तूर्त नाथपंचायतनाचा विचार करूं. त्यांतल्या **रामाजनार्दनांची** कांहींच माहिती नाहीं. फक्त त्यांची ज्ञानेश्वरमहाराजांवरील आरती अतिशय लोकप्रिय आहे व ती वारकरी व इतर लोक कीर्तनभजनाच्या शेवटीं म्हणत असतात. ती आरती:—

**‘ आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा । सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ आरती० ॥ ध्रु० ॥ लोपलें ज्ञान जगीं ॥ हित नेणती कोणी । अवतार पांडुरंग । नाम ठेविलें ज्ञानी । आरती० ॥ १ ॥ प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें । रामाजनार्दनीं । पायीं टकाचि ठेलें ॥ २ ॥**

रामाजनार्दन वारकरीपंथांत मान्य असल्याशिवाय कांहीं त्यांनीं रचलेली आरती वारकऱ्यांनीं उचललेली नाहीं. कोणाचें वचन मानायचें व कोणाचें नाहीं याबद्दल वारकरी मोठे चिकित्सक आहेत ! जनार्दनस्वामी ज्ञानेश्वरीवर प्रत्यहीं रात्रीं पुराण सांगत हें प्रसिद्ध आहे. त्यांच्या-

पासूनच वरील त्यांच्या शिष्यांना ज्ञानेश्वरीश्रवणाचा लाभ घडला. ‘ आरती अनंतभुजा । विठो पंढरीराजा । ’ ही यांची दुसरी आरतीही अशीच लोकप्रिय आहे.

## २ विठा रेणुकानंदन.

ह्या साधुपुरुषाविषयीं विशेष माहिती मिळत नाहीं. त्याचीं ५।७ पदेंच तेवढीं उपलब्ध झालीं आहेत. यानें एक सीतास्वयंवर ’ लिहिलें आहे असें ऐकण्यांत आहे. मात्र याच्यानंतरच्या सर्व संतमालिकांतून यांचें नांव आढळतें. याच्या एका पदांत ‘ विठयाचा स्वामी रेणुकानंदन ’ अशीं पदें आहेत त्यावरून रेणुकानंदन हें त्याच्या गुरूचें नांव आहे असें ठरतें. एकाजनार्दन तसाच हा विठा रेणुकानंदन. हा कवि अनुभवी सत्पुरुष आहे. एका पदांत जमदग्निसुत परशुरामाचें वर्णन आहे त्यावरून याचा गुरु माहूरच्या रेणुकेचा ( परशुरामाच्या आईचा ) भक्त असावा असें वाटतें, कदाचित् गुरूच्या आईचें नांवही रेणुका असेल. ‘ एकांतवीरें फरशुरामें असुर ’ मारिलें तेव्हां ‘ रविकिरण तुटती गिरिवर फुटती सागर आटती धाके । कोपें काळाग्निरुद्र खवळला भेणें त्रिभुवन कोपे रे ! ’ दुसऱ्या एका पदांतः—

**मी माझे ये दोन्हि नाहीं । विठया रेणुकानंदन पाहीं ।**
**मग उरेल जें कांहीं । तें सकळहि आदिपुरुषु** ॥ ६ ॥

कवीचा वल्लभ म्ह० आवडतें उपास्य ‘ आदिपुरुष ’ होतें. आदिपुरुष म्ह० आई रेणुका. यांच्या कृतार्थतेचें एक पदः—

( १ ) **यैसे प्रसन्न श्रीगुरुनाथ । जेणें मस्तकिं ठेविला हात ॥**
**शरीराच्या खुणा असे सांगत । परमार्थ पातलियां** ॥ १ ॥
**देखों गेलों जी सहज । मन संतोषाचें भोज ।**
**जें जें चिंतित होतों गुज । तें प्रत्यक्ष मज दाविलें** ॥ २ ॥......
**विठलीं विठल भेटला । आदिपुरुषीं मीनला ।**
**विठा रेणुकानंदन सुखिया जाहला । मग राहियला निजसुखें** ६

आतां कवीचीं दोन बहारीचीं सुंदर पदें देतों.

१

उगवला दिनकरु विश्व देखे डोळां ।
न देखे आंधळा-तरी काय सूर्यु नव्हे ? ॥ १ ॥
गाजे वाजे ध्वनि विश्व ऐके कानीं ।
न पडे बधिराश्रवणीं-तरी काय नादु नव्हे ? ॥ २ ॥
पंचमालापस्वरें शब्द करिती कोकिळा ।
नायके कावळा-तरी काय वसंतु नव्हे ? ॥ ३ ॥
तैसा आदिपुरुषाचा दासु विठा रेणुकानंदनु ।
न मनिती दुर्जनु-तरी काय साधु नव्हे ? ॥ ४ ॥

केवढा हा आत्मविश्वास ! किती मार्मिक दृष्टांतांत गुरफटलेला आहे !

२

उघडोचि लोचन उघडोचि निधान।उघाडिया आन काय सेवों वो माय?॥
मनाचें मुरलेपण तेथें कैचें मीपण।श्रुति हारपली खूण कैची वो माय ?॥
जाणीव म्हणों तरी जाणतेचि नाहीं।तेथें सांगते ऐकते तेही कैचे वो माय
विजूच्या प्रकाशा डोळे जाले आरिसा।नयन बुबुळ ठसा कैचा वो माय
विठा नाहीं-रेणुकानंदन काई ?।आई आदिपुरुष तोहि कैचा वो माय ॥

ह्या कवीच्या उपासनेंत ' आई आदिपुरुष ' हें पद येतें तें चिंत्य आहे 'रामदासस्वामींच्या ' स्फुट ओव्यांत '

आई आदिपुरुष होचि विचारावें । आपुलें करावें समाधान ।

असा एक चरण आहे. ' आई आदिपुरुष ' म्ह० रेणुका उर्फ आदिमाया. पंतप्रतिनिधींच्या घराण्याची हीच उपासना असल्यानें त्यांच्या सर्व कागदपत्रांत 'आई आदिपुरुष' हा शिक्का आरंभीं असतो.

---

## ३ जनीजनार्दन,

यांच्याबद्दल राजवाडे लिहितातः—" बालेघाटीं बीड शहरीं पाटांगण नांवाचें एक देवस्थान आहे. मुसलमानी राज्य झाल्यावर कांहीं वर्षें बीड व जोगाईचें आंबे या दोन शहरीं स्वतंत्र संस्थानिक असत. त्यांच्या कागदपत्राचे दप्तर ठेवण्याच्या कचेरीस पाटांगण म्हणत. पत्रा-पट्टा-पाटा-

हे पाटे ठेवणाऱ्या अधिकाऱ्याला पाटेल्ल (पुढें पाटील) ह्मणत. हे पाट (पाटा याचें अनेकवचन) पूर्वीं तांब्याचे किंवा भूर्ज पत्र्याचे असत, पुढें हे कागदाचे झाले. बीडच्या पाटांगणाचे अधिकारी मथुरादास गोसावी (इ. स. १९०३) हे जनीजनार्दनांचे वंशज होत. जनार्दन-पंतांचे उपास्य गणपति होते व त्याचें त्यानें मंदिर बांधलें असून तें पैठणजवळ गंगामसलें ह्या गांवीं आहे. जनीजनार्दनापासून हे दहावे पुरुष होत." राजवाडे यांनीं त्यांची वंशावळ दिली आहे. यांचें उपनांव गोसावी हें चालत आहे. जनीजनार्दन नाथांच्यानंतर दोन वर्षांनीं शके १५२३ श्रावण वद्य ७ स समाधिस्थ झाले. यांच्या दोन समाधि आहेत, एक भूम या गावीं व एक बीड येथें—एक त्यांचें देहावसान झाले त्या ठिकाणीं बांधलेली व दुसरी त्यांच्या शिष्यांनीं त्यांच्या अस्थि नेऊन मठांत बांधलेली. त्यांचे वंशज बीड येथें आहेत. त्यांच्या वंश-वृक्षांत 'श्रीजनीजनार्दनमहाराज सिद्धपुरुष महानुभाव कुळपुरुष' असें लिहिलें आहे."

जनीजनार्दन उर्फ जनार्दनपंत हे पातशाहींत कमाविसदार होते. एकदां दामाजीपंताप्रमाणें यांनींही दुष्काळांत गोरगरिबांचे प्राण वांच-विण्याकरितां सरकारी कोठारें लुटविलीं! नंतर अर्थात्च सरकारचें गंडांतर आलें, तेव्हां यांना हत्तीच्या पायाखालीं तुडविण्याचा हुकूम झाला! पण ह्या शांतिब्रह्माला स्पर्श करण्याची त्या मस्तवाल पशूलाही छाती होईना तेव्हां त्यांना सोडून देण्यांत आलें! पुन्हां यवनाची नौकरी करावयाची नाहीं अशी यानीं शपथ घेतली व उर्वरित काळ ईश्वरा-राधनेंत व कवित्व रचण्यांत घालविला. हे यजुर्वेदी ब्राह्मण.

यांचे नांव जनार्दन व याचे गुरु जनार्दनस्वामी हेही जनार्दन. नाथांच्या गाथ्यांत जनार्दनस्वामींचे ह्मणून जे अभंग छापले आहेत ते जनार्दनस्वामींचें नसावेत असें मी पूर्वी म्हटलें आहे. ते अभंग कदाचित् या जनीजनार्दनाचे असावेत.

दासा दुःख झालें फार । वेगीं करा प्रतीकार १
सोडूनियां मी स्वधर्म । आचरलों नीच कर्म २
सेवा केली नीच यातीं । द्रव्यलोभें घाताघाती ३
अन्नग्रास न जाय मुखीं । पश्चात्ताप जाला शोखीं ४
पुण्यस्थान मी पावलों । गुरुचरणीं विश्रामलों ५
जन्मनाम जनार्दन । मुखीं गुरु अभिधान ६

जनीजनार्दनाचा 'निर्विकल्प ग्रंथ' उर्फ 'उद्धवबोध' याची भावे यांजप्रमाणेंच एक हस्तलिखित प्रत माझेही संग्रहीं आहे. कृष्ण व उद्धव यांचा यांत संवाद आहे. ग्रंथाची ओवी सुमारें ७०० आहे. यांत माया ब्रह्म, जीव शिव व सगुण निर्गुण यांचें ऐक्य प्रतिपादिलें आहे. विश्व विष्णुमय आहे हा भावार्थ:—

कळाहुनि सूर्य वेगळा ? । कि सूर्य कळा निराळा ? ॥
ऐसि माया ब्रह्माला । जडली असे ॥ ६६२ ॥
चंदनाचा परिमळु । गाळीता न होये वेगळु ।
तैसा हा ब्रह्मगोळु । भीन्नाभीन्न नसे ॥ ६६४ ॥
बीजापासोनि वृक्ष झाला । सेवटि बीजि सामावला ।
ऐसा येक कळो आला । भूगोळ सर्व ॥ ६७० ॥
सगुण निर्गुण येक । ऐसा विचार देख ।
जेणें झाला हरिख । जनार्दनासि ॥ ६७२ ॥
जनामध्यें जनार्दन । जनार्दन जन येक जाण ।
हे जाणति साधु सज्जन । जे पुरते ज्ञानसिंधु ॥ ६७३ ॥
यमुनेनदीचे तिरि । काळिनी नाम महानगरी ।
तेथे ग्रंथकर्ता श्रीहरि । सांगे उद्धवासि ॥ ६७९ ॥
जे जे श्रीकृष्ण बोलिला । तेथे उद्धवें भाव ठेविला ।
तेणे तो जिवन्मुक्त झाला । देहातीत ॥ ६९६ ॥
तोचि हा निर्विकल्प ग्रंथ । हा भागवताचा मथितार्थ ।
जनि जनार्दनी येकनाथ । बोलिला असे ॥ ६९७ ॥

**कार्तीक शुद्ध येकादशि । स्नान केले यमुनेसि ।**
**ग्रंथ पावला अभंगासि । त्रितिये प्रहरी ॥ ६९८ ॥**
**जनि जनार्दनु म्हणे । हे श्रीकृष्णाचे बोलणे ।**
**परिसावे सज्जने । निर्मळ करुनिया ॥ ७०२ ॥**

ही पोथी 'मुकनदासपठनार्थ दशरथशेट चांदवडकर' यानें शके १६९६ मध्यें लिहिली आहे! ह्या पोथींत अनुस्वारांचें बंड अगदीं नाहीं हेंही वरील उताऱ्यावरून लक्ष्यांत येणारें आहे. दशरथशेटजींनीं 'मजविन होनार नाहीं' 'बोलने चालने' 'सोणें' इ० प्रकारें णचा न व नचा ण बहुतेक ठिकाणीं केला आहे, एरव्हीं पोथी शुद्ध व सुवाच्य लिहिली आहे. ग्रंथांत 'पुसी केली' ह्म० पुसणें केलें, प्रश्न केला, ह्या मौजेचा प्रयोग अनेकवार आला आहे.

ह्या ग्रंथांत सांगितलेल्या ब्रह्मज्ञानाचा जो नीट विचार करील तो 'चतुरपणानें संसार करून जीवन्मुक्तपणा भोगील' अशी ग्रंथाची फलश्रुति आहे (ओवी ३०७). 'ज्याचे गांठी थोर पुण्य । त्यासीच हा ग्रंथ होय श्रवण । चांडाळ तेही तरोन । जातील येणें' (३८७).

हा सारा ग्रंथ कवीनें एका दिवसाच्या चार प्रहरांत रचिला व मीही एकाच बैठकींत दीड तासांत वाचला! ग्रंथ उत्तम आहे. ब्रह्माचें निर्विकल्प स्वरूप कवीनें अगदीं सुलभ वाणीनें समजावून दिलें आहे तरी त्यानें सगुणाला किंवा वर्णाश्रमव्यवस्थेला अथवा साधनमार्गाला धक्का लागूं दिला नाहीं. भगवंतांनीं अर्जुनाला गीता सांगितली ती शास्त्रमार्गानुसार सांगितली पण पलीकडची निर्विकल्प स्थिति उद्धवालाच सांगितली असा कवीचा कटाक्ष दिसतो! उद्धव आणि कृष्ण यांच्या प्रश्नोत्तरांत सारा ग्रंथ लिहिला आहे.

परमात्मा सृष्टीहून अलिप्त व व्यापक आहे. कसा?

**जैसे अग्निविना । लोहो न पिटवे जाणा ।**
**परंतु लोखंडासी अग्नि जाना । अलिप्त असे ॥ २४६ ॥**

कि फुलाचा परिमळु जैसा । फुली सामावला आपैसा ।
आलिप्तरूपे जैसा । फुली असे ॥ २४७ ॥
फुलामाजि परिमळू । तसा जगामाजि मी गोपाळु ।
ऐसा हा सर्व भूगोळू । अलिप्तपणे रचिला ॥ २४८ ॥
अक्षरामाझारि । अर्थ जैसा निर्धारि ।
ऐसा असे मी मुरारि । व्यापकपणें ॥ २४९ ॥
अक्षर पुसिता काही । अर्थ जैसा गेला नाहीं ।
ऐसा मी सर्वदेही । व्यापक असे ॥ २५१ ॥
व्यापक मी आहे । परी सर्वांसि अदेखना पाहे ।
देखणेपण विलये । जाईल सहज ॥ २५२ ॥

स्वरूपाचें स्वसुख पावला तरीही जाणत्यानें मार्गाधारेंच जावें, 'जनाचार सोडूं नये.'

करावा बुद्धिचा प्रकाशु । अवघा देव हाचि उपदेशु ।
परंतु वर्णावर्णकर्माचा नाशु । करो नये ॥ ४४९ ॥
ज्या ज्या वर्णासि यावे । तैसे आचारा विचारा वर्तावे ।
तेने कर्मेचि मुक्त व्हावे । सर्वकाळ ॥ ४५१ ॥
आत्मवत सर्व जाणावे । परंतु आचारासि न भंगावे ।
आचारवर्तणुकि पावावे । परमपद ॥ ४५३ ॥
आचार ह्मणिजे देवो । आचार तोचि शिवो ।...

---

काटलेलें वस्त्र रजक धुवून शुद्ध करितो, किंवा मळीण झालेला आरसा स्वच्छ करावा लागतो त्याप्रमाणें आचारधर्मानें चित्तशुद्धि होते व चित्तशुद्ध झाल्यानेंच मोक्षदायक आत्मस्वरूपाविष्कार होतो असें कवीनें म्हटलें आहे.

जनीजनार्दनाचीं शेदीडशें पदेंही उपलब्ध आहेत. त्यांतील १।२ नमुन्यासाठीं देतों:--

## पदें व अभंग

(१) स्वधर्म स्थापावया पूर्णानंदघनु । जगत्रैजीवनु रूप धरी १
कैसा शोभे स्वामी श्रीगुरु सावळा।प्रेमाचा पूतळा चिदानंदू २
दुष्टनिर्दळनु सज्जनस्थापनु । ह्मणत जनार्दनू स्वामी माझा ३
(२) कैसा हा देवदेवो निर्गुण गुणवंतू । रिंगणीं रिंगतु नंदाचा वो ।
राधिके देखोनि हासतु मुरडतु । डोळे पै घालितु सदाचा वो ।
(३) चंद्रीच्या अमृता भोक्ते ते चकोर । नेणती गांवार काक अंध१
तैसे स्वये सुख सेविती साधुजन।नेणती अज्ञान पासीं असतां२
पद्मिनी पराग सेविती मधुकर । नेणती दर्दूर पंकभोक्ते ३
धेनुस्तनीं क्षीर नेती ते श्रीमंत । गोचिडा शोणित जन्मवरी ४
जनार्दनु ह्मणे न चले काही योगू।त्याचा कर्मभोगू काय कीजे५

---

## ४ मोरया गोसावी.

मोरया गोसावी यांचे वडील वामनभटजी हे कर्नाटकांत शाली नांवाचें एक गांव आहे तेथून पुण्यप्रांतीं काहीं योगायोगानें आले. शाली-ग्रामचे राहणारे म्हणून त्यांना शाळिग्राम हें आडनाव मिळालें! त्यावेळीं रामदास गोसावी, तुकोबा गोसावी, मोरया गोसावी असें सन्मानानें म्हणत, असें तत्कालीन पत्रव्यवहारावरून स्पष्ट दिसतें. चिंतामणि गोसावी यांना तुकोबांनीं 'देव' ही पदवी दिली त्यावेळेपासून मोरया गोसावी यांचे वंशजांना 'चिंचवडचे देव' म्हणतात. यांचें गोत्र हरितम् किंवा हारीत. हे आश्वलायनशाखेचे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. वामनभटजींच्या स्त्रीचें नांव उमाबाई किंवा पार्वतीबाई. पतिपत्नी धर्मशील होती. त्यांची उपासना गणपतीची. वामनभट ब्रह्मकमंडलुनदीच्या तीरीं ह्म० कऱ्हेच्या कांठीं मोरगाव आहे तेथें तपोनुष्ठान करण्यासाठीं राहिले. ते शुल्कवृत्तीनें ह्म० क्षेत्रांत पडलेलें धान्य गोळा करून त्यावर राहत. त्यांना उत्तरवयांत गणपतिप्रसादानें एक पुत्र झाला त्याचें नांव त्यांनीं मोरया ठेवलें. वामन

भटजी मृत्युसमयीं १२५ वर्षांचे होते व त्यांची स्त्री उमाबाई याही पतिपूर्वी १०५ वर्षांच्या होऊन वारल्या! मोरया गोसावी यांना त्यांच्या पित्यापासूनच गणेशोपासनेची दीक्षा मिळाली अर्थात् त्यांचे वडील हेच त्यांचे गुरु होत. मोरया गोसावी यांचा जन्म मोरगांवास झाला पण त्यांनीं तपोनुष्ठान मोरगांव, थेऊर व चिंचवड या तीनही गांवीं केलें, व वस्ती मात्र चिंचवडास केली.

**मस्तकीं शोभे जटाभार। कंठीं रुद्राक्षांचें हार।**
**सर्वांगीं विभूती सुंदर। तेज अपार दिसतसे॥**

चिंचवडपासून दोन मैलांवर पवनेच्याच तीरीं जंगलांत निर्मनुष्य एकांतांत त्यांनीं तीव्र तप केलें. तें स्थान अद्याप पाहण्यांत येतें. हे एकवीस एकवीस दिवस दूर्वारस पिऊन अनुष्ठान करीत. तपोबळानें सर्वसिद्धि त्यांस प्राप्त झाल्या. एकदां तर त्यानीं ४२ दिवस आसन सोडलें नाहीं. व्याघ्र त्यांचेजवळ सदय होत व सर्प निर्विष होत. त्यानीं अनेक चमत्कार केल्याचें प्रसिद्ध आहे. एका गरीब पण सदाचारी ब्राह्मणानें त्यांना प्रौढवयांत आपली कन्या विवाहविधीनें समर्पण केली. विवाहात शंभर पानांचा स्वयंपाक झाला होता पण तेवढ्यांत हजार पान जेवलें! त्यानीं अंधांस डोळस केलें, निपुत्रिकांस पुत्र दिले. आपल्या पावनचरित्रानें भूप्रदेश पावन केला, हजारों संसारतप्त जीवांस संतृप्त केलें.

त्यांचे पुत्र चिंतामणिदेव हें बापाप्रमाणेंच सिद्ध पुरुष निघाले. मोरया गोसावी नाथांचे व हे तुकोबारायांचे समकालीन होत. मोरया गोसावी यांनीं आपल्या स्त्रीस ब्रह्मविद्या दिली व पुत्राच्या हातीं स्वानुभवसंपत्ति दिली.

चिंतामणिमहाराजांनीं चाकणच्या मुसलमान सुभेदारास एकदां एक प्रत्यय आणून दिला. सुभेदारानें गोमांसाचें पातेलें यांजपुढें आणून ठेवलें,

व त्यांस विचारलें कीं 'आंत काय आहे?' चिंतामणिदेव म्हणाले, 'आंत गुलाबाचीं फुलें आहेत!' वरचा रुमाल काढून पाहतात तों पातेलेंभर खरोखरीच गुलाबाचीं फुलें निघालीं! यानंतर तो सुभेदार त्यांस शरण आला.

मोरया गोसावी यांचे वंशांत सात औरस पुरुष ओळीनें ब्रह्मनिष्ठ झाले! नंतर दत्तकास आरंभ झाला. सारख्या सात पिढया सिद्धपुरुषाच्या चालविणारें घराणें चिंचवडच्या देवांसारखें दुसरें नाहीं! सातही पुरुषांची माहिती देवस्थानांत मिळाली ती अशीः—

( १ ) मूळपुरुष मोरया गोसावी. जिवंत समाधि घेतली. ( शके १४८३ ) मार्गशीर्ष कृष्ण षष्ठी.

( २ ) चिंतामणिदेव-समाधि पौष वद्य ४.

( ३ ) नारायणमहाराज थोरले, संस्थानची जहागीर मिळवणारे. जन्म माघ शुद्ध ७ व समाधि शके १६३२ भाद्रपद शुद्ध ७. यांस पुत्र पांच.

( ४ ) धाकटे चिंतामणिमहाराज-समाधि शके १६५८ कार्तिक. पुत्र तीन.

( ५ ) धरणीधरमहाराज थोरले-समाधि शके १६९४ मार्गशीर्ष वद्य ६.

( ६ ) धाकटे नारायणमहाराज उर्फ गबाजीदेव—समाधि शके १७२४ मार्गशीर्ष वद्य १२.

( ७ ) चिंतामणि उर्फ बाबामहाराज—समाधि पौष शुद्ध १४.

चिंचवडास पवनातीरीं ह्या सातही पुरुषांच्या समाधि शेजारींशेजारीं बांधल्या आहेत. मुख्य समाधिमंदिर मोरया गोसावी यांचें असून चिंचवड गांव पवनेच्या उत्तर तीरावर वसलेलें आहे. यांच्या उपास्यमूर्तीचें म्हणजे गणपतीचें भव्य मंदिर थोडया अंतरावर आहे. मोरया गोसावी यांचें समाधिमंदिर शके १५८० मध्यें बांधण्यांत आलें. त्यांच्या मंदिराच्या गाभाऱ्यांत मोठया महादेवाच्यानजीक पुढील शिलालेख आहे.

शके १५८० विळंब संवत्सरे
कार्तिक शुध १२ ते दिवासि
देवाळयास आरंभ वि
कारी ( संव ) त्सरे आषाढ शुध
४ सोमवारि संपुर्ण

शके १५९७ मध्यें देवगृह, जोतें व यज्ञशाळा बांधल्याबद्दलचा आणखी एक शिलालेख आहे. दोन्ही शिलालेखांवरून मोरया गोसावी यांचें समाधिमंदिर आधी म्ह० शके १५८० मध्यें बांधलें व श्रीमोरया ( गणपति )चा वाडा नंतर १७ वर्षांनीं बांधला गेला हें उघड दिसतें.

मोरया गोसावी व चिंतामणिदेव यांचे ग्रंथ कांहीं नाहींत. त्यांच्या कांहीं आरत्या, पदें वगैरे आहेत व त्या चिंचवडास ऐकावयास मिळतात. चतुर्थीस रात्री प्रसादाचीं पात्रें जेवावयास बसण्यापूर्वी वाड्यांत ज्या आरत्या होतात त्या ऐकण्याची फार बहार आहे. देवमंडळी व इतर भक्तमंडळी मिळून सर्व आरत्या मोठ्यानें गर्जून म्हणतात. तशी खणखणित व वीरश्रीची म्हणणी अन्यत्र कोठेंच ( मोरगांवखेरीज ) ऐकायला मिळत नाहीं ! आरत्या व पदें ऐकावयाचीं तर तीं चिंचवडासच ऐकावीत. श्रीमंगलमूर्तीची स्वारी दरसाल पालखींतून भाद्रपदमासीं समारंभानें मोरगावीं जाते. भाऊबंद व गणमंडळी बरोबर असते. मोरया गोसावी व चिंतामणिदेव हे तपस्वी व मंगलमूर्तीचे एकनिष्ठ भक्त म्हणून प्रसिद्धच आहेत. एकनाथ पुणेंप्रांतीं चतुर्मास राहून जाण्यापूर्वी मोरया गोसावी यांनीं पुणेंप्रांत मंगलमूर्तीच्या उपासनेनें व प्रार्थनेनें भिजविला व नंतर तुकोबारायांनीं विठलभक्तीनें तो गाजविला यामुळें ' स्वदेशस्वधर्मस्वभाषादिकांच्या ' उत्कर्षामुळें तो लवकरच भरतखंडाच्या अभ्युदयार्थ पुढें आला. स्वधर्मप्रीतीनें भिजलेल्या पुणेंप्रांतांतूनच शिवाजीचे मावळे निर्माण झाले !

वऱ्हाडांतले प्रसिद्ध गाणपत्य गोसावीनंदन यांनीं चिंचवड येथील श्रीमंगलमूर्तीचें वर्णन पुढील श्लोकांत केलेलें प्रसिद्ध आहे:--

**नेत्रीं दोन हिरे प्रकाश पसरे अत्यंत ते साजिरे**
**माथां सेंदुर पाझरे वरिवरी दूर्वांकुराचे तुरे।**
**माझें चित्त विरे मनोरथ पुरे देखोनि चिंता हरे**
**गोसावीसुत स्वामिराज कवि रे या मोरयाला स्मरे॥**

पुढील पद पंचपदीचे वेळीं म्हणत जाते त्यांतील कांहीं चरण पहा:—

**तिन्ही अक्षरांचे नाम तुम्ही ह्मणारे वाचे। तुम्ही ह्मणारे वाचे।**
**चुकतिल भवबंधनें। चुकति०। दोष जातिल जन्माचे॥ १॥**
**जयजय मोरया हो। माझ्या मोरया हो। वाट पाहतो तुझी मोरया हो**
**कधि मज भेटसी रे। माझ्या०। धांवे धांवण्या हो। माझ्या० ॥ध्रु०॥**
**विघ्नेशाचे नामीं तुह्मी करावा घोष। तुह्मी०।**
**नासतिल पातकें। नास०। दोष जातिल भवक्लेश॥ २॥ जयजय०॥**
**जन्मोजन्मीं दास तुझा आहे गणराजा मी। आहे गणराजा मी।**
**आणिक दैवत मी नेणे। आणिक०। आह्मां नलगे या काजा॥५॥ज०॥**
**मृत्युलोकीं कऱ्हातीरीं रहिवासु केला। मोरया। रहिवासु केला।**
**निजभक्तांसी द्यावया। निज०। अनुपम मुक्तीचा सोहळा॥ ८॥जय०**

सकळ सिद्धींचा दातार, विघ्नहर, बुद्धिदाता असा मोरया कऱ्हेच्या पठारावर मोरगांवीं राहतो तेथें माझें लक्ष आहे, तेथें मी प्रतिमासी लोटांगणीं जात असतों, तेंच माझें तीर्थ, तीच माझी यात्रा असें मोरया गोसावी यांनीं अनेक पदात म्हटलें आहे.

मोरयागोसावी यांचीं दोन व चिंतामणिदेव यांचें एक अशीं तीन पदें देतों.

१

**सुखें नांदत होते मी संसारीं वो तव अवचित जालिये परी वो॥ध्रु०॥**
**मज संचार जाला ये शरीरीं वो नेउनि घाला मोरेश्वरीं वो।**
**सुंदर दैवत लागलें मोरगांवीचें वो उतार न सके कोणी साचे बाई वो**
**सकाळिक म्हणती झाली झडपणी वो बोलवा पंचाक्षरी कसा झाडणी**

**माझें तनुमन गुंतलें मोरयापायीं वो नेणती बापुडी करिती जाचणी वो। दास तुझा मोरया गोसावी वो याहो मोरयावेगळे नेणे कांहीं वो ॥**

२

**तुजविण कोण आह्मां आहे रे मोरया ॥ ध्रु० ॥**

**तुझिया भेटीची बहु आस रे मोरया। देखितां तुज बहु दिवस जाले रे मोरया ॥ १ ॥ रात्रंदिवस वाट तुझी पाहे रे मोरया। जन्मोजन्मींचा तुझा दास रे मोरया ॥ ३ ॥ आणिक कोणाची चाड नाहीं रे मोरया। एक वेळ कृपादृष्टी पाहे रे मोरया ॥ ४ ॥ धेनु वत्सालागीं जैसी मोहे रे मोरया। वेगें येई तूं लवलाहीं रे मोरया ॥ ५ ॥ एक वेळां दयासिंधु तारीं रे मोरया। आयागमन तूं निवारीं रे मोरया ॥ ६ ॥ दीनवत्सल देव आला पाहा रे मोरया। दीननाथा एक वेळां तारीं रे मोरया ॥ ७ ॥ मोरया गोसावी तन्मय जाला रे मोरया। चरणांबुज देखुनियां निवाला रे मोरया ॥ ८ ॥**

एकाच परमात्मस्वरूपाला जनार्दनस्वामी ‘ दत्त ’ म्हणतात, मोरया गोसावी ‘ मोरया ’ म्हणतात, तुकोबा ‘ विठ्ठल ’ म्हणतात, समर्थ ‘राम’ म्हणतात ! साऱ्या भक्तांचा अनुभव एक, देवाधिदेव एकच ! नामरूपें भिन्न पण स्वरूप एक, तन्मयता एक, भक्तिसुख एक, मोक्षपद एक ! देव तोच गुरु, तोच संत, तोच आपण, तोच प्राणिमात्र, तोच विश्व ! याला सगुण म्हणा वा निर्गुण म्हणा, ज्ञान म्हणा वा भक्ति म्हणा, नांव कांहींही द्या ! तोच अनामी आहे व अनंतनामी आहे, तोच अरूप आहे व रूपसही आहे. मोरयांचीं पदें करुणरसानें ओथंबलीं आहेत.

३

**जन्ममरण गर्भवास चुकविता नाहीं। तुजविण चुकविता नाहीं।**
**एक आहेसी तूं बापा। एक०। गणराज पाहीं ॥ १ ॥ जय० ॥**
**मोरया गोसावी याचे देहीं पै वासु। याचे देहीं पै वासु।**
**द्वैत नाहीं तयासी। द्वैत०। त्याचे हृदयीं गणेशु ॥ २ ॥ जयजय० ॥**
**मयूरपूरीं कऱ्हातीरीं रहिवासु केला। मोरया रहिवासु केला।**

**भक्तिभाव देखोनियां । भक्तभाव देखोनीया चिंचवडीं आला ॥ ३ ॥**
**जपतप अनुष्ठान नलगे साधन देवा । नलगे साधन देवा ।**
**देई देवा माझे तूं । देई० । हृदयीं घे चरणसेवा ॥ ४ ॥ जय० ॥**
**दुष्ट भोग झाले मज । दुष्टभोग० । न कळेची गती ।**
**चिंतामणी दास तुझा । चिंतामणी० । करितो विनंती ॥ ५ ॥ जय० ॥**

---

## ५ विष्णुदास नामा.

श्रीनामदेवांच्या अभंगांचा गाथा पुण्याचे आवटे यांनीं इंदिरा छापखान्यांत छापला आहे. या गाथ्यांत सुमारें २५०० अभंग नामदेवांचे ह्मणून छापले आहेत. त्यांत ज्ञानेश्वरकालीन नामदेवांचे अभंग चारपांचशें असतील, बाकीचे अभंग दुसऱ्या नामदेवांचे आहेत ! गाथ्यांत कित्येक प्राचीन व अर्वाचीन संतांचीं चरित्रें गायिलीं आहेत. हरिश्चंद्र, श्रियाळ, प्रल्हाद, ध्रुव, उपमन्यु, सुदामा, शुक, आणि ह्माळसेन यांच्या त्यांत कथा आहेतच, पण याशिवाय जगमित्र नागा, चोखामेळा, जनाबाई, सावतामाळी, गोरोबा व राका कुंभार, कबीर, कमाल, मिराबाई, जन जसवंत, भानुदास, बोधलेबोवा, नरसी मेहता या अर्वाचीन संतांच्या कथाही त्यांत वर्णिल्या आहेत. आतां पौराणिक कथा कोणाच्याही असूं शकतील, पण नरसी मेहता ( श. १३३५ ), भानुदास ( श. १४२० ), जन जसवंत ( समाधि शके १५३९ ), मिराबाई, बोधलेबोवा, इत्यादि मागाहून झालेल्या संतांच्या कथा शके १२७२ मध्यें पंढरपुरीं विठोबाच्या पायांशीं समाधि घेणाऱ्या नामदेवरायांनीं गाइल्या असतील हें शक्यच नाहीं ! वरील पौराणिक संत व अर्वाचीन संत यांच्या कथांची धाटी व कवितेचें अर्वाचीन वळण अगदीं एक आहे म्हणून हा संतकथा गाणारा ‘ विष्णुदास नामा ’ पहिल्या नामाहून अगदींच वेगळा असला पाहिजे. यानें शुकाख्यानही रचल्याचा काळ शके १५१७ असा दिला आहे. एवढयावरूनच, नामदेव दोन

आहेत हें अगदीं उघड ठरतें:—एक ज्ञानेश्वरकालीन व एक एकनाथकालीन नामदेव. दोघेही नामदेव, दोघेही शिंपी, दोघेही विठ्ठलभक्त आणि वारकरी, आणि दोघेही आपणांस विष्णुदास नामा म्हणवितात! यामुळें त्यांच्या अभंगांची खिचडी जुन्या हस्तलिखित पोथ्यांत झाली आहे व यांतलेंच एखादें बाड आवटे यांच्या हातीं लागून तें त्यांनीं जसेंच्या तसेंच छापून काढलें! ह्या दुसऱ्या विष्णुदास नामाची एक 'बुधबावनी' राजवाडे यांना कऱ्हाडच्या एका बाडांत मिळालेली छापली आहे. तींत त्यानें पहिल्या नामदेवांना नमनही केलें आहे! 'नामदेवाचें पवित्र। नाम उच्चारी अखंडित। नामें होय हरिहर-भक्त। नाम प्रिय गोविंदा' अशी ती ओवी आहे. 'विष्णुदासाचा नामा' ह्मणजे विष्णुदासनामक सत्पुरुषाचा नामा अशा अर्थाचे दोन अभंग आहेत. हा अर्थातच विसोबा खेचराच्या नामदेवाहून वेगळा आहे. नामदेव नांवाचे तीनचार कवि झालेले दिसतात! याशिवाय महाभारतावर एक प्रचंड ह्म० सुमारें २० हजार ओव्यांचा ग्रंथ लिहिणारा नामदेव नुकताच लोकांपुढें आला आहे, पण तो विठ्ठलभक्त आहे कां महानुभावपंथी आहे याविषयीं संशोधकांत मतभेद आहेत! हा कवि नाथांचा समकालीन असून मुक्तेश्वराच्या आधीं झाला हें उघड आहे. याचा भारतग्रंथ मुक्तेश्वराच्या आधीं झालेला असून तो महाराष्ट्र-समाजांत मान्यता पावला होता हें याच्या कांहीं पर्वांच्या ठिकठिकाणीं ज्या प्रती उपलब्ध होतात त्यावरून दिसतें. मराठी भाषेंतलें जुन्यांत जुनें व संपूर्ण महाभारत विष्णुदास नामा याचेंच आहे असा अभिप्राय देणें चुकीचें होणार नाहीं. याचा एक अभंग:—

**अमंगळु भूमीसी उगवल्या तुळसी। अपवित्र तयासी ह्मणों नये ॥१॥**
**कागविष्टेमधीं उगवला पिंपळु। तयासी अमंगळु ह्मणों नये॥ २॥**
**लोखंडाचा विळा परिसा लाविला। मागालिया मोला मागूं नये॥ ३॥**
**दासीचिया पुत्रा राज्यपट आला। मागली उपमा देऊं नये॥ ४॥**

**विष्णुदास नामा विठ्ठलीं मिळाला । सिंपी सिंपी त्याला ह्मणूं नये॥५॥**

दृष्टांत फार बहारीचे आहेत. ह्या नामदेवाला ' सिंपी सिंपी ' म्हट-ल्याची थोडीतरी खंती वाटत होती असें यावरून दिसतें ? पहिला नामदेव ह्या देहाभिमानजनित सर्व विकारांपासून सुटला होता म्हणून तो भगवद्भक्त म्हणून मान्य झाला, पंढरपूर येथील देवाच्या पायरींत त्याला स्थान मिळालें व लाखो लोक त्याला वंदन करितात ! हा नामदेवसुद्धां विठ्ठलभक्त व उत्तम कवि खरा पण पोथ्यांतूनच त्याला धुंडावें लागतें ! पहिले नामदेव सकलभेदाभेदातीत अशा श्रीविठ्ठल-स्वरूपीं लीन झाले ह्मणूनच ते विश्ववंद्य झाले.

विष्णुदास नामा यानें ' कपोताख्यानांत ' आपल्या गुरूचें नांव ' रामभारती ' असें दिलें आहे तर शल्यपर्वांत ' गोपीनाथाचें ' नांव आहे.

**गोपीनाथाचेनि प्रसादें । सांगीन गदापर्व विनोदें ।**
**तयामाजी आधीं । शल्यपर्व ॥ ... ...**

' कपोताख्यान ' कर्ता तिसराच कोणी ' विष्णुदास नामा ' असेल काय ? तो कोणीही असो-तोही नाथकालीन आहे यांत शंका नाहीं. कपोताख्यानाच्या ओव्या १५२ असून भाषा अगदीं प्राचीन आहे. गोष्ट अर्थात् ' शिबि ' राजाची आहे. त्यांतल्या थोड्या ओव्या खालीं देतों. प्रधानाचें नांव सुबुद्धि पण त्याची दुर्बुद्धि होती. दृष्टांत:—

**ईश्वरु नांवें-मोळी आणी । कुबेरनांव-वाहे पाणी !**
**विध्वा नावो-सुवासिनी । हे भांडवनी नांवाची ॥ २८ ॥**
**ढेकुण नांव-वाणिया । तो विचित्र कोणिया ।**
**तो दुष( ख )वी सकळ प्रोंणिया । केवि ग्राहीक होईल ?॥२९**

पुढें ' राया विहिरी मोडिजती । तेणें देउळें बांधिजेती ' असा एक ह्मणीवजा चरण आहे.

**विष्णुदासाचा दातारु । पावला भक्तालागी सारंगधरू ।**
**प्रसन्नरूपी सदा हरिहरु । नामस्मरणें पावतुसे ॥ १५२ ॥**

विष्णुदास नामा याचें हें एक मौजेचें काव्य आहे. त्याच्या पहिल्या तीन ओंव्या प्रास्ताविक आहेत. पुढील पांच ओंव्यांत 'ॐ नमः सिद्धं' हा पंचाक्षरी मंत्र साधला आहे, व पुढील १६ ओंव्यांत १६ स्वर साधले आहेत, याप्रमाणें २४ ओंव्या असून २५ व्या ओंवींत 'प्रथम प्रसंगाची' समाप्ति केली आहे. दुसऱ्या प्रसंगाच्या ४० ओंव्या असून त्यांत व्यंजनांची व्यवस्था लावली आहे. याप्रमाणें ५२ वर्णांची यांत मिसळ लावली असून सर्वत्र व्यावहारिक उपदेश केला आहे. स्वतः कवीनें या काव्यास 'बुधबावणी' असें नांव दिलें आहे. 'मूर्ख मनाचें अज्ञान–अंधकारपण' ही ऐकली असतां फिटेल. पहिली ओंवीः—

**ज्ञानरत्नाचा दिवा । हृदयें घरामाजी लावावा ।**
**तरी आंधारीं सांपडे ठेवा । पूर्वसंचिताचा ॥ १ ॥**

'ॐ नमः सिद्धं' हा मंत्र साधलेल्या पांच ओंव्या अशा आहेतः—

**ॐ विवेक शंभु गाईजे । वोखटें मनि नाधरीजे ।**
**वोळखी पडों न दीजे । तया तस्कराची ॥ ४ ॥**
**नमन कीजे गोविंदा । न लागीजे कवणाचीया झकवादा ।**
**न कीजे निंदा । साधुजनाचि ॥ ५ ॥**
**मनि दृढ होईजे । माहाविघ्न चुकविजे ।**
**मति तर्क घेईजे । वडिलांचा ॥ ६ ॥**
**सिव सिव म्हाणिजे । सीवासी शरण जाईजे ।**
**सींकाविलें किजे । मायबापाचे ॥ ७ ॥**
**धर्ममति कराविं । धर्मकीर्ति वाढवावी ।**
**धुमाळी न घालावि । राणीवसा ॥ ८ ॥**

मोरोपंतांनीं पुढें २०० वर्षांनीं मंत्र साधून रामायणभागवतादि ग्रंथ मोठ्या कौशल्यानें रचिले आहेत पण 'समंत्र' काव्यरचनेचा हा आरंभ आहे ! कांहीं निवडक ओंव्या पहाः—

अवगुण सांडिजे । अपशब्द न बोलिजे । आशाभंगु न किजे याचकाचा ॥ ९ ॥
ईश्वरु सेविजे । ईच्छीली वस्तु घेईजे ईच्छाफळ मागीजे । परमेश्वरीं ॥ १४ ॥
ऊधार मैत्रासी न दीजे।उजागरपणें आसिजे।उणी गोष्टी न बोलिजे।सभेमाजी १४
लिंहू चांगलें जाणिजे। लिखित दडदडा वाचिजे। लीन होउनि असिजे जगामाजीं।
ओस पुर जाणिजे । वोडी समर्थासीं न कीजे । बोजे रोहिजे । जगामाजि २१
औ(अव)क्रिया सांडिजे। औगुण न कीजे। औदशा आलिया ओळखिजे आप्तांसीं।

दासबोधांतील येथें एका समासाची आठवण होते. केवळ व्यावहारिक बोध समाजास देणारे हे नामदेव समर्थांच्या अगोदरचे आहेत व वारकरी विठ्ठलभक्त आहेत ! एकाक्षरी पहा:—

कल्पना वोखटी मोडिजे। कळिजवाळि उभे न राहिजे। कळावंता मानु दीजे धुरेनें।
घणवटपणें असिजे । घडे तेंचि काम कीजे । घडिभरी न राहिजे । पापियासंगें ॥४॥
चंचळचित्त न कीजे। चळलिया जवळिं उभे न राहिजे । चटपट न बोलिजे सभेमाजीं।
ठसा नांवाचा कीजे । ठेवा जतन ठेविजे । ठाव न दीजे । कुसंगासी ॥ १२ ॥
बरळ न बोलिजे । बाळकांसीं संग न कीजे। बहुत बडबड न किजे। जाणतयापुढें
या म्हणोनि मानू दीजे । यश येईल तें बोलिजे। येकलें न जाइजे।भलतिया ठायां २६

'फड न पाडिजे सौचियाचा' 'लक्षण जाणिजे सर्वशास्त्रांचे' 'सांकडें पडो न दीजे स्वामिकाजीं' 'हळवटपणें नसिजे' 'आळस-न कीजे । भलतया गोष्टीचा' 'क्षमारूपी असिजे । क्षत्रधर्म न सांडिजे'— 'ही एकाक्षरी परिसावी चतुरीं । म्हणे विष्णुदास नामा'

---

## ६ कृष्णदास मुद्गल.

ह्या कवीचें रामायणाच्या युद्धकांडावर एक ७८ अध्यायांचें मोठें प्रकरण प्रसिद्ध झालें आहे. त्याच्या ७८ हजारांवर ओव्या असून ओवी सुंदर, ओजस्वी व सुबोध आहे. कृष्णदासमुद्गलाचें रामायण पुढें स्वराज्यस्थापनेच्या काळांत फार लोकप्रिय झालें, व त्याचें वाचन किल्ल्यांवरून होत असे. जुन्या बाडांहून याच्या रामायणाच्या प्रती किंवा निदान कांहीं अध्याय सर्वभर सांपडतात यावरून याची लोक-

प्रियता प्रतीत होते. याच्या वाणींत ओजस्विता आहे, कवित्व आहे व याचे शब्दभांडार मोठें आहे. 'श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः' असें बहुतेक अध्यायाच्या आरंभीं मंगल केलें आहे यावरून हा कवि रामोपासक असून यांच्या गुरूचें नांव काशिराज होतें असें दिसतें. एके ठिकाणीं याच्या गुरूनें यास नृसिंहात्मज म्हटलें आहे यावरून याच्या बापाचें नांव नृसिंह होतें असें उघडच दिसतें. याच्या रामायणाचें युद्धकांडच उपलब्ध झाल आहे. 'मागें सुंदरकांड संपादिलें। आतां युद्धकांड आरंभिलें।' असें म्हणून 'रत्नमालेचा मध्यमणि। कीं ग्रहसमुदायामाजी तरणी। तैसें युद्धकांड रामायणीं। रसाळ बहुसाळ' अशी यानें युद्धकांडाची प्रशंसा केली आहे यावरून रामायणाचीं मागील कांडेंही यानें लिहिलीं असावीं असें दिसतें. मुक्तेश्वराप्रमाणें याच्या वाणींत काव्यशक्ति प्रगट आहे. 'उपजली हे अंतःकरणीं। काव्यवृत्ति' गुरुस्तवनांत कवि म्हणतोः—

**मायबापें विऊनि वेगळीं झालीं। परि परमार्थवाट तुवां दाखविली,**
**जैसी भास्करें पाहविली। प्रभात डोळियांसी॥ १-३३॥**
**तूं विद्यावेलीचें नंदनवन। तूं कीर्तिचंद्राचें गगन।**
**तूं गुणरत्नांचें भुवन। सूर्य साहित्यसृष्टीचा॥ ४३॥**

हा कवि पैठणचा राहणारा व मुक्तेश्वराचा समकालीन व आडनांव तेच 'मुद्गल!' एका घराण्यांतले दोघे असावेत!

**आमुची देशभाषा मऱ्हाठी। वास्तव्य प्रतिष्ठान गोदातटीं।**
**ह्मणोनि कौतुकें वचनराहाटी। ऐसी पदोत्तरांची॥ १-१०६॥**

चतुर, काव्यकलाकुशल श्रोत्यांची कवीनें वारंवार प्रार्थना केली आहे.

**( १ ) श्रोतियांचे आदरकृपाजीवनें। कवितरु पाल्हेजती अतिमानें**
**तेथें विकसती सुमनें। साहित्यशब्दांची॥ १६-८८॥**
**साहित्यसुमनांचेनि परिमळें। लुब्धलीं पंडितांचीं चित्तभ्रमरकुळें;**
**अमृतपानाहूनि आगळें। सुख सेव्य येथीचें॥ ८९॥**

वाल्मीकिरामायणाला धरून व कोठें कोठें अग्निपुराणाचा आधार घेऊन कवीनें आपलें रामायण रचिलें आहे. वाल्मीकाची रामकथा व पुण्यपावन गंगा यांची तुलना ( अ० ६५ ) एके ठिकाणीं कवीनें केली आहे:—

इतिश्री कथा रामायणी । गंगाचि केवळ जगतारिणी ।
धन्य वाल्मीकिऋषीची वाणी । उगवली तेथोनी ॥ ९७ ॥
चालिला गंगेचा जळओघु । तरि कथेचा चाले विचित्रमार्गु ।
शोधितां सुधाकाव्यीचा रंगु । स्वर्ग तृणासमान वाटे ॥ १०१ ॥
गंगा सर्वकाळ सेवन । करिती धर्मात्मे मुनिजन ।
तरी कथाही ते सज्जन । परिसताति प्रीती ॥ १०३ ॥
गंगा तारक गाती पुराणें । तरि भवबंध तुटे कथाश्रवणें ।
गंगेहुनि बहु गुणें । हे आगळी विचारितां ॥१०४ ॥
सप्तमुखें गोदावरी । मिळाली पूर्वसागरीं ।
तरि रामकथा त्रैलोक्या साजिरी । सप्तकांडें तियेचीं ॥

युद्धकांड म्हणजे वीररसाचा आकर. त्यांतून १।२ रत्नें काढून दाखवितों.

पदाति, अश्व, गज, रथ । रुंधूनि चालती राजपथ ।
वीर दाखविती पुरुषार्थ । क्षणक्षणा गर्जोनी ॥
नदीपूरवत धांवती फौजा । खड्गें झेलिती जैसिया विजा ।
वाद्यें लागलीं तेणें दिग्गजा । भयकंपु सुटला ॥ ४ ॥
भालें त्रिशूलें चक्रें तोमर । परिघ पट्टीश खड्गें सुरिया शर ।
एहीं शस्त्रीं निशाचर । वानरा ताडिते जाले ॥ ४ ॥
वीर वीरांसी धांवोनि निकट । उस्तिणा घायीं हाणिती धीट ।
तृणापरिस हळुवट । जीवित मानिलें जिहीं ॥ ५ ॥
भिडता येकयेकांचेनि प्रहारें । पडती छेदिलियां शरीरें ।
अशुद्ध वाहे भूमी, सिंदूरें । जेशा डहुळल्या नदी ॥ ६ ॥
तुंबळलिया अशुद्धाचिया नदी । वीरप्रेतें पडलीं पदोपदीं ।
कोल्हाळु माजला चंडशब्दीं । कपि काढावा काढिला ॥७(अ०१७)

* * *

दाशरथी आणि रावणी । सन्मुख उभे समरंगणीं ।
एक एकाचे हृदय बाणीं । चूर्ण करावेया ॥ १ ॥
ते दोघे शास्त्रविद्यासमुद्र । दोघे प्रळयकाळोचे रुद्र ।
दोघे बळाचे महींद्र । महावीरोत्तम ॥ २ ॥
एक कृतांतु, एक काळु, । एक दावाग्नी, एक वडवानळु ।
एक सिंह । एक शार्दूळु । समान बळिये ॥ ३ ॥
दोघीं टणत्कारिलीं धनुष्यें । भुवनें कांपिन्नली तेणें घोषें ।
शीत धरिलें अग्नि पुरुषें । भयातुर जाला ॥ ४ ॥ ( अ० ४३ )

---

## ७ महालिंगदास ( शके १४४७ ).

हा खानदेशी कवि. चाळीसगांव तालुक्यांत गिरिजा उर्फ गिरणानदीच्या दोन तीरांवर बहाळ व वाडें हीं दोन गांवें जवळजवळ आहेत त्यांपैकीं वाडेगांवीं महालिंगदास राहात होते. आपला गांव पवित्र व थोर आहे असा त्यानें अभिमान व्यक्त केला आहे. शिवाय त्याचा 'सिंहासनबत्तिशी' हा ग्रंथ वाडेगांवींच शके १४८७ मध्यें लिहिला गेला. वेताळपंचविशी व सिंहासनबत्तिशी हे ग्रंथ आधीं गद्यांत होते ते त्यानें पद्यांत वर्णिले. पहिला ग्रंथ आधीं व दुसरा नंतर लिहिला गेला. कवि म्हणतो:—

रिद्धि सिद्धि प्रसन्न करणें । ह्मणे राया तु वेताळ आणणे ।
हे कथा पूर्वींच तुज जाणे । सांघीतली असे ॥ ३१-५ ॥
मागे दीगांबराचिया बोला । राजा वेताळ आणो गेला ।
पंचवीस वेळा आला गेला । तेव्हां आणिला तो वेताळ ॥ ६ ॥

नंतर वेताळानें २५ कथा सांगितल्या म्हणून त्या कथासंग्रहाला वेताळपंचविशी म्हणतात. भोजराजापुढें ३२ पुतळ्यांनीं विक्रमाचा विक्रम, जितेंद्रियता व औदार्य यांचें गायन केलें त्यावरून कनककांतेच्या मोहांतून लोकांनीं सुटावें हेंच सांगण्याचा कवीचा हेतु होता. दोन्ही ग्रंथांत कवीचें व्यवहारचातुर्य व लोकांना राजनीतिपर बोध करण्याची उत्सुकता हे गुण चांगले दिसून येतात. ग्रंथसमाप्तीचे वेळीं कवि म्हणतो:—

**हा ग्रंथ प्रस्ताविक । राजनीति आत्यंतिक ।**
**डोळस होय लोक । आइकिलीया ॥ ३२-४५ ॥**

बत्तिशींत ग्रंथकारानें ३६ कुळींचे व ६० उपकुळींचे मिळून ९६ कुळींचे रजपूत राजे अथवा मऱ्हाठे यांची नामावळी दिली आहे ती इतिहासदृष्टया महत्त्वाची आहे. आडनांवें कशीं उत्पन्न होतात याबद्दलची एक ओवी मौजेची आहे:--

**जैसे स्थानीं बैसले । तेचि आडनांव पावले ।**
**अथवा करणीस्तव जाले । नाना कुळांचे ॥**

छत्तीस कुळींत सूर्यवंशी, सोमवंशी, यादव, विदर्भ, चव्हाण, चाळके, सिराळे इ० नांवें आहेत. उपकुळींत वाघ, पवार, सोनवणी, चाळोके, कळंब, गायकवाड, विंगळे, जगताप, सेलार, सलीग, डांबरे, गरुडे, चवरे, मोरे, मोहिते इ० अनेक नांवें आहेत. सर्व यादी येथें देण्याचें कारण नाहीं. ही सारी यादी मराठे लोकांच्या विशेष उपयोगाची आहे. ९६ कुळींस कवि रजपूत किंवा राजपुत्र म्हणतो. ही यादी पुरी नाहीं, याहून 'अगणित परोपरींचीं बहुत' कुळीं आहेत. वरील यादींत भोसले हें नांव नाहीं ही गोष्ट चिंत्य आहे.

वे. पंचविशी व सिं. बत्तिशी यांशिवाय पंचोपाख्यान, चाणक्यनीति, शालिहोत्र इ० याचे ग्रंथ आहेत. शालिहोत्र ग्रंथ अश्वविद्येवर आहे. यांत अश्वाचे गुण व अवगुण, रूप व रंग, त्याच्या चाली व त्याच्या केसांचे भोंवरे, त्याला होणारे रोग व त्यांवरील औषधें इ० बाबींचा चांगला विचार केला आहे. चाणक्यनीतीच्या प्रारंभीं तो म्हणतो:— 'पुरातन चाणक्य बोलिला । संस्कृत भाषे वदला । त्याचें उच्छिष्ट बोलता जाला । महालिंगदासू ॥ संस्कृत न कळे आरजां जनां । म्हणौनि केली मऱ्हाटी रचना '—ह्यांत 'राजनीती बोलिजैल.' 'बुद्धी धृती सांधिजैल । हित अनहित जाणिजैल.' मित्रकुमित्र व स्त्रियेचे गुणावगुण आणि । भृत्यांचें परीक्षण । इ० इ० 'सांधिजैल.'

**हे कथा जो पठण करी । तो श्लाघ्य होय लोकाचारीं ।**
**शोभे सभेभीतरीं । सर्वांसि मान्य ॥**

पंचोपाख्यानांतील ओवी ( २२६।२७ ) वरून हा ' सूर्यवंशी विप्र ' होता असें दिसतें ! चाणक्यनीतींत " रामकृष्ण माझें गुरुदैवत । विक्रमदेव माझा पिता । महालिंगदासू करी कविता । सूत बंकदेवाचा ॥ वंशू कश्यपाचा । गोत्र भारद्वाजाचा । कुळ वासुकीचा । उपनाम आहिररावो.' यांच्या अंगीं स्वातंत्र्याचें वारें खेळत होतें. यवनांची नोकरी करणाऱ्या ब्राह्मणांच्या कोडगेपणाचें त्यानें चांगलें वर्णन केलें आहे ( मागें पृ० ८० पहा ). अहिरराव हें यजुर्वेदी ब्राह्मण घराणें पुणेंप्रांतीं आहे. हा कवि ब्राह्मण असेल किंवा क्षत्रियही असूं शकेल. निर्णय सांगतां येत नाहीं.

असो. महालिंगदास हा एक व्यावहारिक कवि होता. याचे ग्रंथ छापून निघाले तर फार बरें होईल. आमचे कवि व्यवहाराकडे लक्ष देत नाहींत असें म्हणणारास त्याचे ग्रंथ आवडतील असे आहेत.

पंचतंत्र उर्फ पंचोपाख्यान या ग्रंथाची एकंदर ओवीसंख्या ३१४८ आहे. हें याला विष्णुशर्म्याच्या मूळ ग्रंथावरून कवीनें नांव दिलें आहे: ' रामकृष्णभट माझा गुरु । तयासी केला नमस्कारू । आतां देऊं गौरव थोरू । या विष्णुशर्म्यासी. '

वेताळपंचविशींतला एक उतारा पुढें देत आहे. पोथीवर शक नाहीं, अपूर्ण आहे, पण जुनी ३०० वर्षांमागची नाथकालीन आहे. उतारा जशाचा तसा देत आहे:—

**पुनरपि राजा महुर्त पाहें । सतरावीये पुतळीये संनीध जायें ॥**
**तंव तीस वाचा होउनी बोळिली काये । ते परीयेसां पां ॥ ५१ ॥**
**तु विक्रमासारीखा धीर्य उदार्य होसि । तरीच यें सीहासनीं बैसें ॥**
**भोजु म्हणें ते कैसें । सांगें मज ॥ ५२ ॥**
**रावो विक्रम उदार्य अति । त्रीलोकीं वाढली ज्याची कीर्ती ॥**
**बहुळोक्ती जया भळा म्हणति । तोचि धन्यु ॥ ५३ ॥**

उदार्य धीर्य जया । परउपकार आळा वांटेया ॥
सत्त्वभक्ती तया । तीहि ळोकी मानु ॥ ५४ ॥
म्हणौनि ळौकिकी जो भळा म्हणती । तया सत्य म्हणावी गती ॥
जया अनोपकारी जन ह्मणती । ते कोठे न सरती ॥ ५५ ॥
जो देवोधर्मु नेणे । नुचीष्टे हातें न हाणी सुने ॥
घरा गोळिया बैस न म्हुणे । तो अनोपकारी बोळिजे ॥ ५७ ॥
जुझारु जऱ्ही वानीजे । तरी काई पशुत्वें जुझीजें ॥ ?
पंडीतु वाखाणीजे । तरी सुकासारीखें पढती ? ॥ ५८ ॥
म्हणोनी जो दानसीळु । तोचि जुझार पंडित केवळू ॥
संवस्कृती बोळिळा बोळु । तो आईका मनोभावें ॥ ५९ ॥

× × × ×

ऐसा उदार उपकारी । तु होसी अवधारिं ॥
तरीच सींहासनावरी । आरूढ होई ॥ ८९ ॥

---

## ८ रंगनाथ मोगरेकर.

रामदासपंचायतनांतल्या रंगनाथ निगडीकरांहून हे रंगनाथ मोगरेकर वेगळे असून हे त्यांच्या ५०।६० वर्षें अगोदरचे आहेत. यांचे दोन ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. ( १ ) चित्सदानंदलहरी नामक गीतेवरील टीका व ( २ ) शंकराचार्यांच्या सोपानपंचकावरील टीका. दोन्ही ग्रंथ ओवीबद्ध आहेत. पहिल्या ग्रंथाच्या ११ हजार व दुसऱ्याच्या २ हजार मिळून सुमारें १३ हजार ओव्या उपलब्ध आहेत. चित्सदानंदलहरींत कवीनें आपली पितृपरंपरा व गुरुपरंपरा या दोन्ही परंपरा दिल्या आहेत. ‘ गोदेच्या नाभीं अब्जक । त्यासन्निध नामें मोगरे ग्राम अगाध । श्रीमन्नरहरिक्षेत्र प्रसिद्ध । क्षेत्र जें सिद्ध सिद्धांचें ’ अशा त्या मोगरेगावीं याचे पूर्वज राहत. या घराण्यांत कित्येक पिढया कृष्णाची उपासना चालत होती. तेथें ‘ कपिलगोत्रोत्पन्न । श्रीनृसिंहाकित अनंतगुण ’

असा अनंत नांवाचा ब्राह्मण होता. हा याचा आजा. अनंताचा पुत्र आपेराज (आप्पाराव) हा रंगनाथाचा बाप. विठ्ठलाच्या प्रीतीस्तव कवीनें प्रस्तुत ग्रंथ रचिला. आतां त्याची गुरूपरंपरा सांगतों. 'ईश्वरापासोनि ज्ञान। शिष्यपरंपरेनें आलें पूर्ण—' वासुदेवानंदसरस्वती उर्फ सिद्धानंद यांनीं कुरुक्षेत्रीं वस्ती केली पण देह ठेवायला ते गंगासागरसंगमीं गेले. तयाचा शिष्य परमानंद (समाधि गंगातीरीं). परमानंदाचा शिष्य वैकुंठानंद (यांनीं आनंदवनीं ह्म० काशीक्षेत्रीं दीर्घकाल वस्ती केली पण 'देहविसर्जन केदारीं। केलें), अलकनंदातीरीं' त्याचा शिष्य कृष्णानंद व कृष्णानंदाचा शिष्य रंगनाथ. सिद्धानंद—परमानंद—वैकुंठानंद—कृष्णानंद—रंगनाथ अशी ही शिष्यपरंपरा झाली. कृष्णानंदाचा रंगनाथावर अनुग्रह कोठें झाला तें ते (अ० १४) सांगतातः—

**धारा नामें महानगरी। गोदावरीच्या दक्षिणतीरीं**
**षोडश क्रोशांभीतरी। वर्ते पुरी अति विशाळ ॥ १७५१ ॥**
**तद्देशदुर्गपश्चिमतीरीं। महा विशाळगुह्यगिरीदरी।**
**तेथ अतिकृपाकटाक्षें करीं। पद्मकरु शिरीं ठेवियेला ॥ ५२ ॥**

पुढें ग्रंथरचनेचा काल दिला आहे तो शके १५२० कीलक संवत्सर, आश्विन वद्य ८ गुरुवार असा दिला आहे. याच्या पुढच्या ओवींत त्यांनीं स्पष्ट सांगितलें आहे कीं योगवासिष्ठसार संपूर्ण झाला—' त्याउपरी ग्रंथराज निर्माण। गीता नामें संपूर्ण झाला असे.' आधीं योगवासिष्ठसार कवीनें लिहिला व त्यानंतर चित्सदानंदलरी हा ग्रंथ लिहिला याला चित्सदानंदलहरीतील पुढील ओवीही आधारभूत आहे. 'वासिष्ठसार ग्रंथाच्या ठायीं। मनोनाश तत्स्वरूप पाहीं। तैसेंचि वासनास्वरूप तिचा नाशही। बोलिला तो सर्वही पहा ह्मे तेथें' (अ० ६—४९१). रंगनाथांनीं गीताटीका नाशीकक्षेत्रींच लिहिली असें म्हटलें असून नाशकाचें गौरवही केले आहे. उत्तमोत्तम सर्वा क्षेत्रांत श्रेष्ठ असें नाशीकक्षेत्र हें 'ग्रंथसमाप्तीचें स्थान' आहे असें म्हणून नाशीकचा

' क्षेत्रस्वामी सुंदरनारायण ' व ' कपालेश्वर ' यांचे उल्लेख केले आहेत, नाशीकच्या ' अरुणावरुणागोदांच्या ' संगमाचाही स्पष्ट निर्देश आहे, नाशीक क्षेत्राच्या गौरवपर पुढील ओव्या पहाः--

**सर्वावयव अति सुंदर । सकोमळ सुभग शरीर ।**
**त्याहीवरी लेइले अलंकार । शोभा प्रचुर अनुपम ॥**
**तेथ एक नासीकचि नसतां । सर्वहि सुंदरपण जाय वृथा ॥**
**तैसें एके नाशिकेविण समस्तां । सर्वां क्षेत्रां शोभा कैची ?॥१॥**
**म्हणोनि सर्व क्षेत्रांचा अलंकार । तें हे नासिकनामें महाक्षेत्र ।**
**चहूं युगांचें नगर । दक्षिण तीर गोदावरीचें ॥ १८०० ॥**

रंगनाथ मोगरेकर नाशीकलाच राहत असे. याचा पुत्र व शिष्य जो काशिराज त्याचा एक विश्वनाथनामक शिष्य होता. त्यानें लिहिलेल्या ' उपदेशरहस्य ' नामक ग्रंथांत तो म्हणतोः-' कृष्णानंदाचा अनुग्रहीत। तो महाप्रसिद्ध रंगनाथ । कपिलगोत्रोत्पन्न विख्यात । नाशिकीं वसत निजसुखें ' यावरून रंगनाथ मोगरेकर हा गोदातीरचा कवि व रंगनाथ निगडीकर हा कृष्णातीरचा कवि हा भेद लक्ष्यांत ठेवावा.

' रंगनाथी योगवासिष्ठ ' हा ग्रंथ २५ वर्षांपूर्वी छापलेला आहे, पण हा ग्रंथ कोणत्या रंगनाथाचा याविषयीं वाद आहे ! छापलेला हा ग्रंथ मोगरेकर रंगनाथांचा असें प्रकाशक, दामोदर सावळाराम आणि मंडळी, यानीं प्रस्तावनेंत म्हटलें आहे आणि महाराष्ट्रसारस्वतकर्ते भावे हेही तसेच म्हणतात पण दोघांनींही ग्रंथ उघडून पाहिलेला दिसत नाहीं ! हा प्रसिद्ध ' रंगनाथी योगवासिष्ठ ' रंगनाथ निगडीकर यांचा आहे, मोगरेकर रंगनाथांचा नाहीं, असें ग्रंथ पाहिल्यावर कोणासही पटणारें आहे. निगडीकर रंगनाथाचे गुरु निजानंद, त्यांचें गुरु पूर्णानंद व त्यांचे गुरु सहजानंद अशी ही परंपरा दत्तापासून आलेली प्रसिद्ध आहे. ' निजरंगीं रंगला ' ह्म० निजानंदशिष्य रंगनाथ ( अर्थात् निगडीकर ). योगवासिष्ठग्रंथांत प्रारंभीं ' श्रीमत्सद्गुरु निजानंदाय नमः ' असें मंगल

आहे व शेवटीं 'सहज—पूर्ण—निज—रंगास' असा त्रयीसगट कवीनें स्वनामोल्लेख केला आहे.

**सहजीं सहज पूर्णानंदू । सर्व भावें सेवोनि एकांतु ।**
**निजानंदें रंगूनि स्वार्थु । निरलसपणें जोडिला ॥ प्र०३–४४६॥**
**निजानंदें रंगूनि चरणीं । सहज रूळत अनुदिनी ।**
**पूर्ण बोध लाधला मनीं । कृपावलोकें सद्गुरूच्या ॥ ३९५ ॥**
**ह्मणोनि सद्गुरूचा केला । पूर्णबोध सुखावला ।**
**निजानंदें जो रंगला । अनिर्वाच्य सुखरूप ॥ प्र०६–३९६ ॥**

दहाव्या प्रकरणाचा आरंभच 'जयजयाजी श्रीनिजानंद' येथपासून आहे. ग्रंथ समाप्तीच्या पुढील ओव्या आहेतः—

**श्रीकृष्णातटसन्निध । नामें निर्गुणग्राम ( निर्गुड ) अगाध ।**
**तेथें ग्रंथ समाप्तिबोध । जाला सहज पूर्णत्वें ॥ १०६३ ॥**
**शके पंधराशें चौऱ्यांसी । शुभकृत्नाम संवत्सरासी ।**
**उदगयन माघ शुक्लदशमीसी । ग्रंथ केला समाप्त ॥ १०६४ ॥**

ह्यावरून हें उघड आहे कीं, रंगनाथ निगडीकर यांनींच प्रस्तुत योगवासिष्ठसारग्रंथ लिहिला आहे. आतां पूर्वीं सांगितल्याप्रमाणें रंगनाथ मोगरेकर यांनींही योगवासिष्ठावर ग्रंथ लिहिला असावा असें चित्सदानंदलहरींतील उल्लेखांवरून दिसतें. पण तो ग्रंथ हा नव्हे व तो उपलब्धही नाहीं. ज्यांत रंगनाथ मोगरेकरांनीं आपल्या घराण्याची व गुरूचीं परंपरा सांगितली आहे त्या ओव्या चित्सदानंदलहरींतील आहेत व त्याच ( सुमारें ८० ) ओव्या प्रस्तुत योगवासिष्ठाच्या शेवटीं छापून ग्रंथ न पाहतां प्रकाशकांनीं प्रस्तुत ग्रंथ मोगरेकरांचा म्हणून खुशाल दडपून दिला आहे ! हा रंगनाथ निगडीकरांचा योगवासिष्ठग्रंथ फार उत्तम आहे, व मोठा मासा धाकट्या माशाला गिळून टाकतो त्याप्रमाणें ह्या ग्रंथापुढें मोगरेकर रंगनाथाचा ग्रंथ नाहींसा झाला व शेवटच्या ८० ओव्या मात्र राहिल्या त्या या ग्रंथांच्या शेवटीं प्रकाशकानें ( अगर नक्कलकारानें म्हणा ) बेशक छापून टाकल्या !

१ **चित्सदानंदलहरी**:--रंगनाथ मोगरेकर यांची ही भगवद्गीतेवरची टीका होय. ही ज्ञानेश्वरीला बरीच धरून आहे, किंबहुना ज्ञानेश्वरींतील कित्येक सुंदर ओव्या या टीकेंत तशाच घेतल्या आहेत, कांहीं ओव्यांचे दोन चरण व कांहीं ओव्या ज्ञानेश्वरीच्या शब्दांत रूपांतर केलेल्या अशा आहेत ! रंगनाथाच्या ह्मणून ज्या ओव्या आहेत त्यांत कांहीं ठिकाणीं त्यानीं योगवासिष्ठसारांतल्या विषयानुरोधानें प्रतिपादन केलें आहे, कांहीं ओव्या चांगल्या आहेत व कांहीं ठिकाणीं तर ओव्यांच्या मिषानें आपण गद्य वाचीत आहोंत असेंच वाटतें ! यांच्या ओव्यांना आटपशीरपणा, सौंदर्य किंवा कवित्कल्पनांच्या भराऱ्या नाहींत. कित्येक ठिकाणीं चरण फार लांबट आहेत इतकें कीं ओवीला वेढबपणा मात्र आलेला आहे. पण असें आहे तरी रंगनाथाचा पारमार्थिक अधिकार मोठा होता व त्याची विद्वत्ताही गाढ होती हें कबूल करावें लागतें. रंगनाथ हे सत्पुरुष होते पण कवि नव्हते. पद्यांच्या ऐवजीं ते गद्य लिहितें तर चाललें असतें. याच्या ओव्याचा नमुना (अ० १) पहा:—

**तरी मोक्षाचें मूळभूतकारण । तें बोलिलें निष्कामकर्मानुष्ठान ।**
**तयासी प्रतिबंधक पापरूप हे गुण।सूर्योदयालागून मंदे हे राक्षस जैसे॥**
**तेंवी शोकमोहादिकीं गुणीं करून । स्वधर्म टाकूनी निषिद्धाचरण ।**
**अहंकारें करी सकाम कर्मानुष्ठान । न पवे जाण पुरुषार्थसिद्धि ॥**
**दुःखसंतती न व्हावी ह्मणोनि।प्रयत्न करितां शोकमोह न जाती जाण।**
**आतां कोणे हे उपाय करूं नाशालागून । करिती चिंतन अहोरात्र जे॥**
**मग स्वधर्मानुष्ठानें करून । परम पुरुषार्थ जो ब्रह्मत्व जाण ।**
**तयाचे उपायभूत हें शास्त्र निर्वाण । भगवंत आपण उपदेशिती ॥**

प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं त्या अध्यायाचें महत्त्व स्थापन करण्यासाठीं एक गोष्ट देण्यांत कवीनें थोडी कल्पकता दाखविली आहे, मात्र या गोष्टी स्वारस्यशून्य व संदर्भहीन अशा भाकडकथा आहेत ! 'शंकरमधुसूदनांचा कर धरून । पावे मुख्य स्थान गीतातत्व' 'एकेक अक्षराचें व्याख्यान । केलें असें श्रुतिस्मृतिमधून' हें कवीचें म्हणणें खरें

आहे. शास्त्रवचनांची ग्रंथांत लयलूट आहे. पण तीं वचनें पचवून स्वतंत्र प्रज्ञेनें विषय समजावून सांगणें हें त्याला साधलें नाहीं. ग्रंथांत वाणीचा प्रसाद दिसत नाहीं. ' वाग्दंड, मनोदंड, कायदंड हे ज्यापाशीं आहेत तो त्रिदंडी संन्याशी ' अशा व्याख्या कोठें कोठें ओघांत दिल्या आहेत. लोकवासना, शास्त्रवासना, देहवासना—वासनांचा त्याग किंवा वासनाजय याविषयींचें ६ व्या अध्यायांतलें निरूपण बरें आहे. त्यांवर योगवासिष्ठाची छाप आहे.

२ **पंचरत्नटीकाः**— मला आश्चर्य वाटतें कीं, ' **चित्सदानंदलरी** ' सारखा अगदींच सामान्य प्रतीचा ग्रंथ ज्यानें रचिला त्यानेंच ' **पंचरत्न-टीके** ' सारखा उत्कृष्ट ग्रंथ रचावा ! आणि अधिक आश्चर्य हें कीं, अंतर्बाह्य प्रमाणांवरून दोन्ही ग्रंथांचा कर्ता एकच आहे हें निर्विवाद ठरावें ! पंचरत्नटीकेवरही ' कृष्णानंदांचा शिष्य रंगनाथ ' याचाच शिक्का आहे. दोन्ही ग्रंथांवर योगवासिष्ठाची, गीताभागवतांची, उपनिष-दांची, मधुसूदन व सुरेश्वर यांच्या ग्रंथांची व ज्ञानेश्वरीची पूर्ण छाप असून त्यांतील पुष्कळशीं अवतरणें या दोन्ही ग्रंथांत घेतलीं आहेत, मात्र तीं पंचरत्नांत फार व्यवस्थेनें व अवश्य तेवढींच घेतलीं आहेत. दोन्ही ग्रंथांत विद्वत्ता व भगवद्भाव पूर्ण आहेत व ग्रंथकर्ता अध्यात्मनिरत आहे हें उभयत्र स्पष्ट आहे, मात्र पहिल्या ग्रंथांत ओव्यांची घडण अगदीं गयाळपणाची आहे, विषयांची मांडणी तितकी सुसंबद्ध नाहीं व दुसऱ्यांत ओव्यांची घडण शास्त्रशुद्ध व टापटिपीची असून ग्रंथांत मुद्देसूदपणा आहे, सरळपणा व प्रसाद आहे. पहिल्याचा अवतार एखाद्या क्षेत्रस्थ भिक्षुकासारखा गबाळपणाचा आहे व दुसऱ्याचा एकंदर रुबाब व्यवस्थित, मानी मुरलेल्या पंडितासारखा आहे ! एकाच बापाचे दोन मुलगेः—एक हायकोर्ट वकील व दुसरा आचारी तसाच हा प्रकार आहे ! पहिल्या ग्रंथांत प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं एक नीरस अर्थशून्य अशी भाकडकथा दिली आहे व दुसऱ्यांतही तीन गोष्टी प्रसंगानुसार

आलेल्या आहेत. गार्ग्य आणि जनक (ओवी ९७० ते १०१५), नहुष आणि जडभरत (ओवी १२३४ ते १२५०), स्वतःला हरवणाऱ्या दहा मूर्खांची गोष्ट (१६८४ ते १७०३). पण या गोष्टींची बांधेसूद ठेवण कोठें व त्या चित्सदानंदलहरींतल्या पांचट गोष्टी कोठें! कदाचित् चित्सदानंदलहरींची नक्कल करणारा गचाळ असेल व त्यानेंच त्या पांचट गोष्टी प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं दिल्याही असतील! पण हें जमेंत धरलें तरी वरील अभिप्रायांत विशेष फरक होण्याचें कारण नाहीं. दोन्ही ग्रंथांच्या रचनाकालांत बरेंच अंतर असावें. पंचरत्नी मुरलेल्या अध्यात्मपंडिताचा ग्रंथ आहे व त्यांत आपल्या 'पूर्वीच्या' ग्रंथाचा त्यानें संदर्भही दिला आहे. 'पद अल्प जरी जाहलें। तरी व्याख्यान पाहिजे प्रत्यया आलें। तुम्हां शास्त्रज्ञांसी रुचलें। पाहिजे अनुभवें' असा त्यानें या दुसऱ्या ग्रंथांत धाक बाळगला आहे, व 'पदसंगति' व ग्रंथविस्तार' याची त्यानें काळजी वाहिली आहे. 'हा ग्रंथ अनुभवसिद्ध आहे' असें त्यानें म्हटलें आहे तें यथार्थ आहे. पूर्वीच्या ग्रथांतला गबाळपणा स्वतःस पटूनच कीं काय कोण जाणें त्यानें साहित्याच्या 'सौभाग्य आणि सौंदर्य' या गुणांकडे लक्ष दिल्याचें पंचरत्नींत कबूल केलें आहे. असो. एकाच मनुष्याला एक गचाळ व एक उत्कृष्ट असें अगदीं उलट गुणांचे दोन ग्रंथ लिहितां येतात त्याचें हें एक मजेदार उदाहरण आहे!

ग्रंथारंभीं आराध्यलिंग जे सद्गुरु त्यांची स्तुति आहे. 'जे ज्ञानोद्धारार्थ मूर्ति। आचार्यरूपें जाहली' त्या श्रीशंकराचार्य जगद्गुरूंनीं पंचश्लोकांत द्विजपुत्रांना 'वेदोनित्यमधीयताम्' येथपासून तों 'अथ परब्रह्मात्मना स्थीयताम्' येथपर्यंत अज्ञान भूमिकेपासून तों स्थितप्रज्ञाच्या भूमिकेपर्यंत उपयोगी पडणारा जो बोध केला आहे तोच मी यथामति लोकहितार्थ महाराष्ट्र भाषेंत सांगत आहे. आचार्य लोकहितार्थ बोलले आहेत, आणि हित म्हणजे काय? 'सकळां हितांचें हित। तें परब्रह्म जाण निश्चित। जें निरतिशय सुख अद्भुत। सुखरूपत्वें.'

**तुम्ही संस्कृताचे ज्ञाते । तथापि विनोदार्थ बोलिजेते ।**
**संस्कृतीं अप्रवेशु तयांतें । सोपान हें ॥ ४३ ॥**

पहिल्या श्लोकाच्या स्पष्टीकरणार्थ ५०० ओवी सहज लीलेनें प्रगट झाली आहे. सारें प्रतिपादन शास्त्रीय असून सुबोध व रसाळ झालें आहे. येथें ज्ञानधर्मनिरूपण आहे, येथें '**साभाग्य** आणि **सौंदर्य**' यांच्या खाणी उघडल्या आहेत. असो. विवेकराजहंसांनीं मूळ ग्रंथच समग्र पहावा अशी माझी नम्र प्रार्थना आहे. ग्रंथांत शंकाआशंका फेडल्या आहेत, जिज्ञासूंचें समाधान होईल असें मोकळें प्रतिपादन केलें आहे. समग्र ग्रंथ पाहिल्यावर कर्वाप्रमाणें वाचकांनाही वाटेल कीं:—

**जाला ब्रह्मसुखाचा सुकाळ । संपतां ग्रंथ रसाळ ।**
**अनिर्वाच्य सखोल । परिपूर्णत्वें ॥ २०३१ ॥**
**रंगनाथ म्हणे सद्‌गुरूचा । तो आनंद न बोलवे वाचा ।**
**अनुभवी अनुभव तयाचा । अनुभवें जाणती ॥ २०३२ ॥**

( १ ) देहेंद्रियमनःप्राणादिकाचा प्रकाशक आत्मा आहे हें दीपकाच्या दृष्टांतानें सांगतातः—

**जैसा राजसभेचा दीपकु । सकळांसी एकचि प्रकाशकु ।**
**राजा, राजसभा, नर्तकी, नर्तकु । नृत्य करविती ॥ ३१५ ॥**
**एकु राजा एकु सभासदु । एकी नर्तकी नृत्यकारें प्रसिध्दु ।**
**टाळमृदंगादि विशदु । नाचविणारे ॥ ३१६ ॥**
**आणि ते सकळही सभा । सकळां प्रकाशी दीपप्रभा ।**
**आपण तरि स्वयें वोथंबा । अढळपणें ॥ ३१७ ॥**
**तैसोंचि दार्ष्टांदिकीं जाणणें । सर्वांसि साक्षिपणेंचि प्रकाशणें ।**
**कोणें स्थानीं कोणें । तें परियसा पैं ॥ ३१८ ॥**
**सभा ते मूळ अविद्या । राजा तो अहंकारविशिष्ट जीव प्रसिद्ध ।**
**नर्तकी बुद्धि प्रबुद्धा । जाणावी कीं ॥ ३१९ ॥**
**तालादिधर ते इंद्रियें । जे बुद्धीसी नाचविती सान्वयें ।**
**सुख देती विषयान्वयें । अहंभूसी ॥ ३२० ॥**

सभासद ते विषयजात । ते तंव प्रसिद्ध तटस्थभूत ।
इंद्रियेंचि प्रवर्तवित । बुद्धीसी पै ॥ ३२१ ॥
बुद्धि आणि मन । हे तंव प्रसिद्ध अभिन्न ।
अंतःकरणचतुष्टय जाण । वृत्तिभेदें ॥ ३२२ ॥
दीपस्थानीं साक्षी कूटस्थ । तो सकळां प्रकाशकु तटस्थ ।
अलिप्त आणि अंतःस्थ । सर्वेंद्रियांसी ॥ ३२३ ॥
जैसे तालाधिधर नर्तकीतें । नाचविती स्वच्छंदाविर्भूतें ।
तैसीं इंद्रियेंही समस्तें । बुद्धीसी नाचविती ॥ ३४२ ॥
तिच्या नृत्यासी भुलोनी । नाना कर्में करी तियेचेनि ।
मग पावे नाना योनी । कर्मानुसार ॥ ३४४ ॥
असो हें तिचें भुलविणें । या समस्तांसी दीपेंचि प्रकाशणें ।
तैसे बुद्धींद्रियविषयां साक्षीनें । प्रकाशिजे ॥ ३४५ ॥
तो साक्षीरूप आपण । आपणचि साक्षित्वें राहोन ।
कर्म करिजे तें ईश्वरार्पण । सहजचि होय ॥ ३७३ ॥

( २ ) दहा मूर्खांची गोष्टः— ग्रंथ वाचून जर होत आहे तर गुरु कशाला पाहिजे असें कांहीं ज्ञानमानी ह्मणत असतात त्यांना सद्गुरूची महती पटविण्यासाठीं पुढील गोष्ट सांगण्यांत येत आहेः—

दहा पुरुष ग्रामांतरा । सुखें चालिले एका नगरा ।
मध्यें नदीचिया पुरा । उतरोनि गेले ॥ १६८५ ॥
पैलतीरीं जाऊनि पाहती । आम्ही अवघे आहों किती सांगाती ?।
मोजूनि जंव पाहती । तंव नऊजण ! ॥ १६८६ ॥
प्रत्येकें गणूनि पाहती । गणितां आपणातें न गणिती ।
एक बुडाला ह्मणोनि करिती । शोक दारुण ॥ १६८७ ॥
रडती पडती आक्रंदती । परी दाहवा आपण ऐसें नेणती ।
इतर येऊनें त्यांप्रती । पुसता जाहला ॥ १६८८ ॥
ते सांगती ' दाहवा नाहीं ! । ह्मणोनि शोक करितों पाहीं ' ।
तो म्हणे ' दाहवा आहे ' । हेंही वाचा बोले ॥ १६८९ ॥
इतुकेनि ते रडूं राहिले । परि आपणातें नाहीं देखिले ।

**आक्रंदन निवारलें । इतुकेंचि जालें ॥ १६९० ॥**
**आपणां आपण अपरोक्ष असतां । सांगणारेंविण नेणे तत्वता ।**
**हे ऐसी अनुभवकथा । अपूर्व असे ॥ १ ॥**

आपणां सर्वांचें असेंच होतें ! आपण तीन देह, मन, बुद्धि, अहंकार व जीव हे चतुष्टय, संचित प्रारब्ध हीं कर्में हे सोबती बरोबर घेऊन येतों, यांना आपलेपणानें कवटाळतों पण 'आपण' कोण तेवढेंच मोजायला ह्मणजे शोधायला विसरतों ! दाहवा आहे आणि जो आहे तो तूं आहेस हें सांगणारा गुरु लागत असतो. नवांच्या मेळांत आपण आपणासच नेमकें विसरतो. त्यानें तूं आहेस म्हणतांच रडणें निवारतें ! अज्ञानाच्या 'नास्ति' आणि 'न प्रकाशते' अशा दोन शक्ति आहेत. त्यांत 'आहे' म्हणतांच 'नास्ति' गेलें, पण प्रकाश–भेटी उरलीच आहे म्हणून प्रकाशासाठीं दशदिशा शोधतो.

निजस्वरूपाची ओळख पटविणारा सद्गुरु भेटल्यावांचून ब्रह्मज्ञान होणें नाहीं हें ठरलें. आतां या गोष्टीला एक उपांग आहे. गुरुवांचून मोक्ष नाहीं हें म्हणतांच दांभिक लोक गुरुपणाचा बाजार भरवूं लागले ! उचल्यांची गर्दी झाली ! अज्ञानी लोक भराभर गुरु शोधूं लागले, 'ऐसेन एखादा गुरु करिती । जया अत्यंत विषयासक्ति । शिष्यद्रव्याचिये प्रीती । करिताति बहु ॥ अध्यात्मपरा गोष्टी शिकती । तेचि शिष्यांसी उपदेशिती । उभयांची येकचि गती । प्रसिद्ध कीं ! ॥ अंधें अंध नेइजे । दोघां मार्गीं मार्गु न सुजे । अंधकूपीं पडिजे । उभयता जैसे ॥', कोणी लयलक्ष सांगूं लागले, कोणी मनपवनमार्ग सांगूं लागले, असे नाना फंद जाले, पण अपरोक्षानुभव देणारा गुरु गुप्तच राहिला ! शास्त्रज्ञान, अपरोक्षानुभव व प्रबोधशक्ति तीनही ज्याचे ठायीं आहेत असा सद्गुरु शोधण्याइतका दम कोणाला आहे ? त्यामुळें लबाडांचें फावलें. गुरुबाजी उर्फ बोवाबाजी बोकाळली ! असो. सावधपणा नसला म्हणजे चोरांचें फावतें. सद्गुरुविण अपरोक्षत्व नाहीं या सिद्धांताला मात्र त्यामुळें बाध नाहीं.

( १ ) कदान्नचि भक्षावें । मिष्टान्न सर्वथा त्यजावें ।
या आग्रहा न वाढवावें । विपश्चितें ॥ १२०७ ॥
मिष्टान्न अथवा कदान्न । मिळाल्या दोनी समसमान ।
भुंजावें संतोषेंकरून । परमार्थालागीं ॥ १२०८ ॥

( २ ) सकळजनांमध्यें आहे । आणि ब्रह्मावेगळें दुजें न पाहे ।
तो सर्वदा एकांतींच आहे । परमानंद भोगी ॥ १३६१ ॥
जेथें न मोडे स्वरूपस्थिती । ते लौकिकींही एकांतस्थिती ।
ज्ञाता कर्ता ऐसा दिसे । परि कांहींच करितु नसे ।
अज्ञानी लोक पिसे । कर्तृत्व मानिती ॥ १४२२ ॥
शुद्ध वस्तूचा ठाईं । कर्तृत्व भोक्तृत्व कैचें काई ? ।
तो सर्वदा अधिकारी पाही । निर्गुणपणें ॥ १४२३ ॥
पूर्वसंस्कारवशें । राहिलेनि अज्ञानशेषें ।
ज्ञानियाचे देह तेणें मिषें । व्यापारत असे ॥ १४२६ ॥
तो लोकसंग्रहार्थ जाण । कर्में करितु आपण ।
परी विधिनिषेधपूर्ण । नसोनि करी ॥ १४२८ ॥

( ३ ) शास्त्रीं सर्वही आहे । उपनिषदें गर्जती उभूनि बाहे ।
परि सद्गुरुवेगळें नोहे । ब्रह्मज्ञान ॥ १७११ ॥

---

## ९ कृष्णयाज्ञवल्की व मधुकरकवि

ह्या दोन कवींनीं मिळून कथाकल्पतरु नांवाचा एक ३९००० ओव्यांचा ग्रंथ लिहिला आहे. कृष्णयाज्ञवल्की हे ह्या ' कथाकल्पतरू ' ग्रंथाचे मूळ उत्पादक असून त्यांच्या देहावसानानंतर मधुकरकवीला स्फूर्ति होऊन त्यानें पुढील सात स्तबक लिहिले. कृष्णयाज्ञवल्कींचे मधुकरकवि हे श्रोते व शिष्य होत. बाणभट्टाच्या कादंबरीप्रमाणें हा मोठा ग्रंथ दोघांनीं मिळून संपविला. ग्रंथसमाप्तीचा शक मधुकरकवीनें शक १५४५ हा दिला आहे, त्यावरून पुढील सात स्तबक शक १५३५ ते १५४५ ह्या दहा वर्षांत झाले असें धरल्यास कृष्णयाज्ञवल्कीचें देहावसान शके १५३५ च्या सुमारास झालें असलें पाहिजे. त्यावेळीं त्याचें वय ६५ वर्षांचें असावें व त्याचा जन्म शक १४७० हा असावा. सामान्यतः कृष्णयाज्ञवल्कीचें आयुर्मान शके

१४७० ते १५३५ असें धरण्यास हरकत नाहीं. हा काळ प्रमाण मानण्यास आणखीही एक पुरावा अन्यत्र सांपडतो. कृष्णयाज्ञवल्कीचा पुत्र गोपाळ याज्ञवल्की हा शिवकल्याणांचा वयानें वडिल असा मित्र होता व त्याच्या प्रेरणेनें मी अमृतानुभवटीका ( नित्यानंदैक्यदीपिका ) हा ग्रंथ लिहिला असें शिवकल्याणांनीं त्या ग्रंथाच्या टीकेंत लिहिलें असून सदर ग्रंथरचनेचा शक १५५७ हा दिला आहे. शिवकल्याणांनीं दशमावर एक लाख ओंव्यांचा जो अजस्त्र ग्रंथ लिहिला आहे त्यांतील 'ब्रह्मस्तुति' प्रकरण शके १५२७ मध्यें रचल्याचें आपण पाहिलेंच आहे. (पृ. ५२३) म्हणजे शिवकल्याणांच्या ग्रंथरचनेचा काल शक १५२५ तो १५६० हा स्पष्ट आहे. अर्थात् गोपाळ याज्ञवल्कीचा हाच काळ होय आणि गोपाळ याज्ञवल्कीचे जनक कृष्णयाज्ञवल्कि तेव्हां त्यांचा काळ शक १४७० ते १५३५ हा आपण वर धरिला आहे तोच योग्य ठरतो. पांच सात वर्षें आगेमागें असण्याचा संभव आहे.

कथाकल्पतरू हा ग्रंथ शके १८१५ मध्यें मुंबईच्या जगदीश्वर छापखान्याचे मालक रा. सोहनी यांनीं मोहरेदार कागदावर मोठ्या टाईपांत सुंदर चित्रें घालून अनुक्रमणिका वगैरे देऊन उत्कृष्ट छापला आहे. सदर ग्रंथाची ओवी संख्या अध्यायवार पुढें दिली आहे.

| कृष्णयाज्ञवल्कीचा पूर्वार्ध | | | मधुकरकवीचा उत्तरार्ध | | |
|---|---|---|---|---|---|
| | ओवी | अध्याय | | ओवी | अध्याय |
| स्तबक १ | २६२५ | १५ | स्तबक ८ | ४२०४ | ३३ |
| स्तबक २ | २४३४ | १७ | स्तबक ९ | २१२४ | १६ |
| स्तबक ३ | ३१९१ | १७ | स्तबक १० | १९५४ | १६ |
| स्तबक ४ | ३५२५ | १९ | स्तबक ११ | १०५९ | १० |
| स्तबक ५ | २९१७ | १८ | स्तबग १२ | ८७३ | ८ |
| स्तबक ६ | २७१८ | २१ | स्तबक १३ | ३९६४ | ३१ |
| स्तबक ७ | २६५८ | १९ | स्तबक १४ | ४५२५ | ३२ |
| एकूण | २००६८ | १२६ | एकूण | १८७०० | १४६ |

आतां ह्या दोन्ही कवींनीं आपल्याविषयीं आपापल्या भागांतून काय माहिती दिली आहे तें पाहूं. दोन्ही कवि नाशीक जिल्ह्यांतले आहेत. गणेश, शारदा, कुलस्वामिनी मातापुरवासिनी रेणुका, 'ज्ञानगुरू' चिंतामणि, व 'व्यासवाल्मीक ऋषेश्वरू' यांना वंदन केल्यावर कृष्णकवीनें ज्ञानवंत हरिभक्त असे जे श्रोते त्यांना गौरविलें आहे. 'परद्रव्यासि अनादरु। परनिंदेसि बधिरू। परस्त्रीसी सहोदरु' अशा श्रोत्यांचे कवीनें धन्यवाद गायिले आहेत. वेद, शास्त्रें, पुराणें, उपपुराणें, रामायण, महाभारत, भागवत ह्या ग्रंथांत विखुरलेल्या नानाकथा मऱ्हाठी भाषेंत प्राकृत जनांच्या सुखबोधार्थ गाण्याचा आपला मनोदय कृष्णयाज्ञवल्कीनें प्रगट केला आहे, 'संस्कृताचा अर्थ। प्राकृतांसी नव्हे प्राप्त' म्हणून हा खटाटोप आहे:—

**जैसे कूपामधील नीर। तेथ पाहिजे पात्रदोर।**
**तृषाक्रांतासी विचार। पडत असे।**
**तैसी नव्हे ती सरिता। पात्रदोर नलगे सर्वथा।**
**तृप्त करी तृषार्ता। मुखांजुळीनें।**
**नाना कथांचा विस्तारु। तया नाम कल्पतरु।**
**हा जाणावा पुण्यसागरु। ह्मणे कृष्ण याज्ञवल्की॥**
**परोपकाराकारणें। प्राणियांतें उद्धरणें।**
**ह्मणोनि ग्रंथ रचणें। आरंभिलें॥**
**गीर्वाणश्रमांहीं प्राप्त जालें। प्राकृत सहजीं हातां आलें।**
**परी आनंदा नव्हे वाहिलें। न्यून कांहीं॥**

ह्या कवीनें 'मऱ्हाठी भाषारत्नाचें' स्तोत्र उत्तम केलें असून त्यावेळीं हिंदुस्थानभर प्रचलित असलेल्या पांचपन्नास 'लोकबोलींचे' उल्लेख केले आहेत व मराठी सर्व भाषांत श्रेष्ठ आहे असें अभिमानानें म्हटलें आहे, पण त्या मुद्द्याचा अन्यत्र प्रपंच केला असल्यामुळें येथें त्याविषयीं अधिक लिहीत नाहीं. आपल्या ग्रंथाला कवीनें 'ग्रंथराज' म्हटलें असून हा 'करावया पाहुणेर। वैष्णवांसी' म्यां रचिला आहे असें म्हटलें आहे.

१ त्या स्तबकाच्या १५ व्या अध्यायांत कवि स्वतः विषयींची माहिती देतोः—

**कौंडिण्य गोत्र वसिष्ठमैत्रावरुण । प्रविण त्रिगुणयोग सांख्यधारण ।**
**महाधर्मपरायण । अंबऋषींचें ॥ १५२ ॥**
**त्या अंबरीषीची कांता । कमळजा नामें पतिव्रता ।**
**ते प्रसवली विष्णुभक्ता । कृष्णकवीसी ॥ १५३ ॥**
**गोदेच्या दक्षिणतीरीं । पद्मपुरी बोलिजे द्वापारीं ।**
**ग्रंथ जाहला पुण्यक्षेत्रीं । नाशीकस्थानीं ॥ १५६ ॥**
**अरुणा वरुणा गोदावरी । कपालेश्वर साक्ष सुंदरी ।**
**कल्पतरु पुण्यपवित्रीं । वाहिला गोविंदचरणीं ॥ १५७ ॥**

कौंडिण्यगोत्री त्रिप्रवरी हा कृष्णकवि अंबरीष बाप व कमलजा आई यांच्या पोटीं जन्मला व यानें नाशीकक्षेत्रीं आपला ग्रंथ लिहिला ' नाना पुष्पजातींचा रस । मधुमाक्षिका मेळवी अंश । तेसा हा रचिला. नवरस । श्रोतयांसी ' ( ४–१९–२२७ ) ह्या ओंवीवरून दुसऱ्या कवीस ' मधुकर ' हें टोपणनांव घेण्याची कल्पना सुचली असावी !

दोनतीन संतमालिकांतून ' कृष्णंभट ' याज्ञवल्कींचा उल्लेख केलेला आढळतो.

ह्या दुसऱ्या जोडकवीचें नांव महादेव असून त्यानें ' मधुकरकवि ' हें टोपणनांव धारण केलेलें दिसतें. आठव्या स्तबकाच्या प्रारंभीं हा म्हणतो कीं ' कवि कृष्ण याज्ञवल्की । जया अखंड वास नासिकीं ' त्यांनीं ७ स्तबक ' ओंवी प्रबंधें मनोहरु । महाराष्ट्र भाषा ' रचिले पण त्यानंतर त्यांचें देहावसान झालें—

**यास्तव तोचि संपूर्ण करावा । कथासमूह मेळवावा ।**
**ह्मणोनि आम्ही मांडिला आघवा । पुढील ग्रंथ ॥ ८-१-४१ ॥**

मधुकर कवि राजाश्रित होता. त्यानें आपल्या राजाचें, राजनगरीचें व तेथील लोकांचें मौजेचें वर्णन केलें आहे. ह्या ऐतिहासिक प्रकरणाचा विचार पुढील खंडाच्या पहिल्याच प्रकरणात सविस्तर होणार असल्या-

मुळें येथें त्याचा कांहींच प्रपंच करीत नाहीं. त्याला काव्यस्फूर्ति झालीः–

**आतां खरेकार सोमवंशी । शिवराम नामें गुणधर्मराशी ।**
**तयापासोनि चाहिजीकुशीं । जाहला जन्म ॥ ७-१५२ ॥**
**नांव ठेविले महादेव आत्मजीं । अखंड वास मोहरीमाजीं ।**
**प्रौढबुद्धि राज्यकाजीं । हरिभक्तितत्पर ॥ ९३ ॥**
**तयासी काव्यधर्मीं अपेक्षा । मनीं उपजली परियेसा ।**
**म्हणोनि सुनीळा परमपुरुषा । ध्याइलें अंतरीं ॥ ९४ ॥**

त्या परमेश्वरानें ' काव्यधर्मस्फूर्तिज्ञान ' दिलें म्हणोनि ' आरंभिलें कवन कल्पतरूचें. ' कृष्णयाज्ञवल्कीविषयीं मधुकराचा अर्थात्‌च पूज्यभाव आहे. तो ' प्रस्तुत कवीचा गुरु । मुळी कर्ता कल्पतरु. '

**कविकृष्ण याज्ञवल्कियें मार्ग दाविला । तोचि म्यां पुढें चालविला ।**
**तरी हा याज्ञवल्कीनामें । ग्रंथ विशेषला अनुक्रमें ।**
**श्रोतीं अवधान द्यावें प्रेमें । ह्मणे मधुकर कवि ॥ ८-१-१२८ ॥**

ग्रंथसमाप्तीच्या वेळीं पुढील ओवी आली आहेः—

**कृष्ण याज्ञवल्की हो का मधुकर । हीं बाहुलीं करोनि निमित्तमात्र ।**
**स्वयें बोलिला लीलाचरित्र । आपुलें आपण परमात्मा॥१४-३२-२०५॥**

---

## १० गीताटीकाकार माधवदास.

ही भगवद्गीतेवर एक ओवीबद्ध टीका माधवदास कवीनें बृहत्पूर उर्फ बऱ्हाणपूर येथें तापीतीरीं समाप्त केली. यांचे गुरु नारायण हे पैठणास राहत. नारायण सद्‌गुरु ' तो प्रतिष्ठाननिवासी । भूषण महर्षीच्या वंशीं । तो उद्धरी जडजीवासी । कृपाकटाक्षमात्रें ' असें कवीनें अन्यत्र म्हटलें आहे. ' जो प्रतिष्ठानशुक्तीं मुक्ताफळ । जो ऋषिकुळदीपक केवळ. ' ह्यावरून कवीच्या नारायण गुरूचें उपनांव ऋषि असावें असें वाटतें. माधवदास व त्याचे गुरु नारायण हे दोघेही पैठणचे रहिवासी असून नाथांचे समकालीन होते. १८ वा अध्याय अपुरा राहिला असल्यामुळें कवीची हकीकत अर्धीच राहिली आहे. कवीची कुलस्वामिनी सप्तशृंगीची देवी.

ग्रंथ शके १५२१ विकारी नाम संवत्सर, माघ वद्य १४ रोजीं रविवारीं श्रवणनक्षत्रीं कवि तापीतीरीं बृहत्पुरीं असतां सिद्धीस पावला असें कवीनेंच म्हटलें आहे. सदर ग्रंथाला गुरुस्मरणार्थ त्यानें 'नारायण-कीर्ति' असें नांव दिलें आहे. ग्रंथ साधारण आहे, ओवींतही विशेष स्वारस्य नाहीं. गीतेच्या ७०० श्लोकांपैकीं ५७४ श्रीकृष्णाचें, ८४ अर्जुनाचे, ३२ संजयाचे, ९ दुर्योधनाचे व १ धृतराष्ट्राचा असें कवीनें श्लोकांचें कोष्टक दिलें आहे.

गीतेवर त्यानें रूपक बसविलें आहे:—

**कृष्ण नव्हे तो आत्माचि केवळ**
**सत्साधनीं सहाय सर्वकाळ ।**
**एवं हे कौरव पांडव सकळ**
**नांदती स्थूलदेहीं हस्तिनापुरीं ॥**

कौरव = मोहसंतती, विकार. पांडवः-सत्वसंतती, सत्साधनभाव.
धृतराष्ट्र = मोह. संजय = विवेक. व्यास = सद्गुरु.
दुर्योधन = अहंकार; हा मुख्य विकार. कुरुक्षेत्र = लिंगदेह.
धर्म = स्वधर्म. कुरुक्षेत्र हें केवळ धर्मसदन आहे, पवित्रभूमि आहे.
वैराग्यभूमिकेवर सत्साधनभाव पांडव राहतात.
विषयभूमिकेवर विकारभाव कौरव राहातात.
असें 'द्व्यार्थ कथानुसंधान' कवीनें मार्मिकपणें सांगितलें आहे.

---

## ११ लोलिंबराज.

मराठी कवींत अत्यंत अश्लील कविता लिहिणारा याच्या बरोबरीचा दुसरा कवि नाहीं असें म्हणतात! हा जुन्नरचा राहणारा असून याचें उपनांव जोशी असें होतें. याचा धंदा वैद्यकीचा असून यानें 'वैद्यजीवन' नांवाचा एक संस्कृतांत वैद्यकीवर ग्रथ लिहिला आहे (श० १५५५). रत्नकला नांवाची एक सुंदर स्त्री होती. उभयतांत अत्यंत प्रेम असे. एकमेकांचा वियोग सहन होत नसे! कवि दूर गेला म्हणजे रत्नकला

घाबरी पडे. ती जुन्नरच्या यवनसुभेदाराची कन्या होती. कवि मोठा रंगेल होता असें दिसतें. यानें ८५ श्लोकांचें ' रत्नकलाचरित्र ' नामक काव्य लिहिलें आहे.

**चटपट सुटलीसे जीव कोठें न राहे**
**वदन धरुनि हस्तीं येकली वाट पाहे ।**
**करुनि सकल शोभा दर्पणीं रूप पाहे**
**पति अजुनि न ये का हेंचि चिंतीत आहे ॥**

अशी रत्नकलेची विरहव्याकुळता होत असे. कवि डौलानें तिला म्हणतो:-

**ज्याची कीर्ति जगत्त्रइ प्रगटली मंदाकिनीचे परी**
**जो एके घटकेंत शंभर नवीं पद्यें विनोदें करी ।**
**ज्याला की ' कविपातशाह ' पदवी विद्वज्जनीं लाभली**
**तो हा रत्नकले ! तुला विनवितो लोलीमराजः कवी ! ॥**

कालान्तरानें रत्नकला मरण पावली. कवि म्हणतो:—

**मजविण घडि कोठें जासि तूं ना रसाले !**
**न पुसत परलोका केवि गेलीस बाळे !**
**विषय विषय करितां सर्व सौंसार गेला ।**
**क्षणभरि परि नाहीं मुक्तिचा यत्न केला ।**

असा त्याला अनुताप झाला. त्यानें सप्तशृंगीस जाऊन भगवती देवीची आराधाना केली. देवी प्रसन्न झाली व याचें उत्तर वय भजनांत गेलें. साधु म्हणून हा मान्यता पावला. संतमालिकांतून याचें नांव आहे. याचा काल शक १५०० ते १५७० असा दिसतो.

यानें आपल्या ' वैद्यजीवन ' नामक संस्कृत ग्रंथाच्या आधारें कांहीं मराठी श्लोकही केले आहेत. संस्कृत ग्रंथ शके १५५५ मध्यें झाला.

' लोलीमराज मज सोडुनियां पळाला ' यासाठी ' लोलीमराज समजावुनि शीघ्र आणा ' अशी ती रत्नमाला, ' दस्तुरखान, मीरखान, फरादरखान, गालीबखान, नुरीबखान, ' इ० खानांची व कृष्णाजीपंत, हरिपंत, तिमाजीपंत, मुरारीपंत ' इ० पंतांची विणवणी करीत आहे ! लोलीमराजांची ही ' रत्नकला ' हा० जगन्नाथपंडिताची ' लवंगी'च दिसते !

# १९ तुकोबाराय

## १ नाथ, तुकोबा व समर्थ यांचे कालनिर्णय.

नाथांनीं शके १५२१ च्या फाल्गुनवद्यांत देह ठेवला आणि आठ वर्षांनीं महाराष्ट्रांत दोन महापुरुष जन्मास आले. शके १५३० ह्या एकाच वर्षांत देहू येथें तुकोबाराय व तिकडे गोदातीरीं रामदासस्वामी ! तुकोबारायांचा अवतार ४१।४२ वर्षेंच ह्या भूलोकीं होता पण तेवढ्यांत त्यांनीं आपल्या प्रखर वैराग्यानें व नामसंकीर्तनभक्तीनें महाराष्ट्र हालविला, त्यावर सुधामधुर अभंगांची अमृतवृष्टि करून ह्या भूला भूवैकुंठ बनविलें आणि आपण सदेह वैकुंठाला गेले ! तुकोबारायांनीं आपल्या अभंगवाणीनें शके १५५४ ते १५७२ पर्यंतचा १८ वर्षांचा काळ दणदणून सोडला. शिवाजी महाराजांचा जन्म शके १५५० मध्यें झाला व त्यांनीं तोरणा किल्ला घेऊन १७ व्या वर्षी स्वराज्याचें तोरण बांधलें आणि त्याच सुमारास ( शके १५६६ ), समर्थांनीं आपल्या रामभक्तीचा कृष्णतीरीं ध्वज उभारला ! तुकोबाराय शके १५७२ मध्यें निजधामाला गेले व तेथून समर्थांच्या कर्तबगारीस आरंभ झाला. समर्थांनीं शके १५६६ ते १६०३ पर्यंत आपल्या भक्तिज्ञानवैराग्याचा व कर्तबगारीचा लाभ महाराष्ट्रास दिला, म्हणजे तुकोबा, समर्थ व शिवराय यांच्या गांठीभेटी शके १५६६ ते १५७२ ह्या सहा वर्षांच्या काळांतच झाल्या असल्या पाहिजेत.

शके १५२१ नाथांचें प्रयाण.
शके १५३० तुकोबांचा व समर्थांचा जन्म.
शके १५५० शिवरायांचा शिवनेरीस जन्म.
शके १५५४–७१ तुकोबारायांची अभंगवाणी.

शके १५६६ { समर्थांचें कृष्णातीरीं आगमन.
शिवरायांच्या स्वराज्यस्थापनेचा आरंभ.

शके १५६६-७२ वरील त्रिमूर्तींच्या भेटीगांठीचे प्रसंग.

शके १५७१-७२ तुकोबारायांचें प्रयाण.

शके १५८० समर्थांच्या दासबोधाची रचना.

शके १५६६-१६०३ समर्थांची कर्तबगारी व ग्रंथरचना.

शके १६०३ शिवराय व समर्थ यांचा वैकुंठवास.

तुकोबाराय हे ज्ञानेश्वरनामदेवनाथ यांच्याच परंपरेंत वाढले व वर्तले,व समर्थांनीं जरासा आपला 'सवता सुभा' स्थापन करून तुकोबारायांच्या नंतर राष्ट्रजागृतीचें कार्य केलें.तुकोबारायांचें कार्य संपलें तेथून समर्थांचें सुरू झालें. नाथ, तुकोबा व समर्थ ह्या तीनही अलौकिक विभूति महाराष्ट्राच्या वाङ्मयांत व इतिहासांत चिरंजीव आहेत, सर्वमान्य आहेत व लोकप्रिय आहेत. समर्थांचा विचार पुढील खंडांत करूं. तूर्त तुकोबारायांकडेच पाहूं.

---

## २ देहू आणि लोहगांव.

श्रीतुकाराममहाराजांच्या सहवासानें पावन व विश्वविख्यात झालेलें देहूक्षेत्र पुणेप्रांतांत इंद्रायणीनदीच्या तीरावर वसलें आहे. हें आळंदीपासून पांच कोस असून पुण्याच्या वायव्येस आहे. शेलारवाडी स्टेशनच्या उत्तरेस हें ३ मैलांवर आहे. देहू हें तुकोबांचें वडिलार्जित राहण्याचें ठिकाण आणि लोहगांव हें त्यांचें आजोळ. देहूस त्यांचा छळ झाला व लोहगावांस कौतुक झालें! 'मथुरेसी कृष्ण जन्मला पाहीं। परी गोकुळीच्या सुखासी पार नाहीं। तैसा तुकोबांचा प्रेमा पाहीं। लोहगावीं लुटिला' (भक्तलीलामृत अ० ३६),

**धन्य देहु गांव पुण्यभूमीं ठाव। तेथें नांदे देव पांडुरंग ॥१॥**
**धन्य क्षेत्रवासी लोक दइवाचे। उच्चारिती वाचे नामघोष ॥२॥**
**कटीं कर उभा विश्वाचा जनिता। वामांगीं तें माता रखुमाई ॥३॥**

**दास तुका तेथें करितो कीर्तन । हृदयीं चरण विठोबाचे ॥४॥**

मधल्या चार चरणांत वर्णिलेल्या देवता तुकोबांच्या वेळीं होत्या तशाच आज आहेत. देहूस विठ्ठलरखुमाई शेजारीं शेजारीं उभे आहेत, समोर गरुडपार आहे, गरुड–हनूमंत देवासमोर हात जोडून उभे आहेत, पूर्वेकडील दरवाज्यावर दक्षिणाभिमुख विघ्नराज आहेत, बाहेर बहिरवाचें छोटेसें मंदिर आहे. गांवाच्या मध्येंच अगदीं इंद्रायणीतीरावर तुकोबांचें नववे पूर्वज विश्वंभरबाबा यांनीं बांधलेलें विठ्ठलरखुमाईचें मंदिर व तुकोबांच्या वंशजांचा ( इनामदारांचा ) वाडा आहे. त्याच्यालगतच तुकोबारायांचें राहतें घर आहे व त्यांत ज्या खोलींत तुकोबांचा जन्म झाला त्या खोलींत मागाहून स्थापन झालेली विठ्ठलमूर्ति आहे. वाड्याच्या पश्चिमेस आज एक पडकी बखळ आहे तेथें त्यावेळीं मंबाजीबुवांचें घर व बाग होती. नदीकांठानें उत्तरेकडे जातांना एक मैल लांबीचा प्रचंड डोह लागतो. या डोहाच्या कांठीं गोपाळपूर असून तेथें जुनाट पिंपरीचा वृक्ष आहे. त्या वृक्षाखालीं तुकोबांचें अखेरचें कीर्तन होऊन प्रयाण झालें. त्याच्यापुढें अर्धा मैल करंजाईचें स्थान आहे व तेथेंच मुरलीधराचें मंदिर आहे. महाराज डोहाच्या कांठीं एकांतांत बसत ते येथेंच. वैराग्य झाल्यावर खतपत्रें येथेंच इंद्रायणींत टाकलीं. रामेश्वरभटानें छळ केला तेव्हां महाराज एका शिलातलावर तेरा दिवस ध्यानस्थितींत बसले होते व शिलेवर पडले असतांनाच श्रीकृष्णानें बालरूपानें त्यास दर्शन देऊन वह्या तारिल्या. ती शिलापुढें भक्तमंडळास अर्थात् अत्यंत प्रिय व पूज्य वाटून त्यांनीं ढकलीत ढकलीत विठ्ठल मंदिरांत आणली, व तुकोबांची पहिली स्त्री रखुमाबाई इचें वृंदावन आहे त्याला टेंकून उभी ठेविली. ती आज तेथेंच आहे. इंद्रायणीच्या कांठावर पश्चिमाभिमुख उभे राहिले कीं डाव्या बाजूस ६ मैलांवर गोराड्याचा उर्फ घोरवडीचा डोंगर दिसतो. थेट पश्चिमेस दोन मैलांवर भंडाऱ्याचा डोंगर दिसतो व उजव्या बाजूस डोहाच्या पलीकडे पण देहूहून आठ मैलांवर भामगिरी ( भामनाथ उर्फ

भामचंद्र ) हा डोंगर दिसतो. हे तिन्ही डोंगर व डोह हीं तुकोबांचीं एकांतस्थानें होत. तुकोबांच्या चरणरजानें पावन झालेला हा देहूचा पुण्यपरिसर होय.

**लोहगांवीं** तुकोबांचे आजोळ होतें. हें लोहगांव पुण्याच्या ईशान्येस ९ मैलांवर आहे. तुकोबांच्या आईच्या माहेरचें आडनांव 'मोझे' असें होतें. तुकोबा आजोळीं गेले म्हणजे ते ज्या शिळेवर बसून ध्यानभजन करीत ती शिळा त्यांच्या पश्चात् एका वृंदावनावर ठेवली असून वारकऱ्यांचें तेथें नित्य भजन होत असतें. वारकरी पंढरीहून आळंदीस जातांना कार्तिक वद्य ९ स येथें दरसाल मुक्काम करितात. येथें शिवबा कासाराच्या वाड्याच्या पडक्या भिंती आहेत! वाड्यासमोर महादेवाचें एक पडकें देऊळ आहे त्या देवळांत तुकोबांनीं शिवबा कासारास परमार्थबोध केला. हा लोहगांव तुकोबांच्या वेळीं कसब्याचा गांव होता. लोहगांवाहून आळंदी २॥ कोस, देहू ७ कोस व सासवड ९ कोस आहे. लोहगांवीं कासार, मोझे, खांदवे, व माळी यांची वस्ती पुरातन आहे. कोंड पाटील खांदवे; नावजी माळी, शिवबा कासार व आंबाजीपंत कुळकर्णी हे तुकोबांचे १४ पैकीं चार प्रमुख टाळकरी लोहगांवचेच राहणारे होते. या देवळाची स्थापना गुंडोजीबावांचे शिष्य इराप्पा यांनीं केली असें समजतें. गांवांत शिरतांच 'कासारविहिर' लागते.

---

## ३ जातकुळी व घराण्याची प्रतिष्ठा.

भगवद्भक्तांची जातकुळी पाहून काय करायचें आहे? भक्तीला श्रेष्ठत्व आहे, जातीला नाहीं. गुणानें मनुष्य लोकपूज्य होतो, त्याच्या घराण्याकडे सहसा कोणी पाहत नाहीं. तथापि एकनाथ, तुकोबा, समर्थ यांच्या घराण्याकडे पाहिलें तरी यांचीं घराणीं भगवद्भक्तांची लोकपूज्यच होतीं. तुकोबा हे 'वंशपरंपरागत विठ्ठलाचे दास' होते. विश्वंभरबावापासून देव त्यांच्या घरीं आले होते. पंढरीची वारी त्यांचे घरची होती. वार-

कऱ्यांत मद्यमांसादि अशुचि प्रकार अजीबात बंद असतात, गळ्यांत तुळशीची माळ घालतांना व वारी धरितांना तशी शपथच घ्यावी लागते. शुचिर्भूत भगवद्भक्ताच्या घराण्यांत तुकोबांना जन्म मिळाला व 'शुद्धबीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं' याचा जनांस प्रत्यय आला. तुकोबा शूद्रयातींत जन्मले असें मी मागें महाराजांच्या चरित्रांत लिहिलें आहे. याचा सध्याच्या जात्यभिमानाच्या वावटळींत कित्येकांस राग आला व ते 'जातिवंत क्षत्रिय होते' असें यापुढें लिहा अशी त्यांनीं मला सूचनाही दिली! तुकोबा खरोखरच अस्सल क्षत्रिय ठरले तरी यांत आमची काय हानि आहे? त्यांच्या भक्तपणाच्या कीर्तीत त्यामुळें लेशमात्र कमीअधिकपणा येऊं शकत नाहीं. तुकोबा व्यापकपणानें चारी वर्ण होते अगर चहूंवर्णातीत होते! ते ब्रह्मनिष्ठ होते व 'ब्रह्म जाणे तो ब्राह्मण' या न्यायानें खरोखरेच **ब्राह्मण** होते! 'रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन'—आंत मनासी व बाहेर जनांसी युद्ध करून त्यांनीं दोघांवरही जय मिळविला यावरून ते **क्षत्रिय** होते यांतही शंका नाहीं. 'संतांचा उदीम उपदेशाची पेठ। प्रेमसुखासाटी देती घेती' याप्रमाणें भक्तिप्रेमाच्या देवघेवीचा व्यापार त्यांनीं जन्मभर केला यावरून ते **वैश्य** होते असें म्हणण्यासही प्रत्यवाय नाहीं! पांडुरंगाची म्ह० जनीजनार्दनाची जन्मभर त्यांनीं निष्काम सेवा केल्यामुळें ते **शूद्रही** उघडच ठरतात! बरें ते चहूंवर्णांच्या पलीकडे गेले होते यांत तिळमात्र संशयच नाहीं. 'क्षरअक्षरावेगळा। तुका राहिला सोवळा'—क्षराक्षरापलीकडचे ते असल्यामुळें तेथें कुठली जातकुळी अन् कुठला घराण्याचा अभिमान? 'तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते। स्वयंभू आइते केले नहो'—आम्ही ब्रह्मदेवाचे बाप आहोंत, स्वयंभू शुद्ध चैतन्य आहोंत, घडलेले म्ह० आल्यागेल्यांतले नहोंत—या त्यांच्या स्वानुभवसूर्यापुढें देहाचे—खालचे—सारेच विचार तुच्छ ठरतात!

असो. लौकिकदृष्ट्या त्यांच्या जातकुळीचा व घराण्याच्या प्रतिष्ठेचा विचार त्यांना व त्यांच्या मुलाबाळांनाच विचारूं!तुकोबा स्वतःच सांगतात:-

**शूद्रवंशीं जन्मलों । म्हणोनि दंभें मोकलिलों ॥ १ ॥**
**अरे तूं माझा आतां । मायबाप पंढरिनाथा ॥ ध्रु० ॥**
**घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार ॥ २ ॥**
**सर्वभावें दीन । तुका ह्मणे यातिहीन ॥ ३ ॥**

विद्येबरोबर सामान्यतः आढळणारा अभिमानदंभ नाहीं, असा मीं सर्व प्रकारें दीन तुला शरण आलों आहे.

**( २ ) याती शूद्र वैश्य केला वेवसाय ।**
**( ३ ) बरा देवा कुणबी केलों । नाहीं तरी दंभें असतों मेलों ॥**

हा जातीचा विचार झाला, आतां कुळीचा विचार करूं! त्यांचे आडनांव कोणी 'मोरे' व कोणी 'आंबळे' असें दिलें आहे. मी नाशीक व त्र्यंबक येथील देहूकरांच्या क्षेत्रोपाध्याय यांच्या मूळ वह्या शोधून पाहिल्या त्यांवरून त्यांची 'कुळी मोरे व आडनांव आंबिले उर्फ आंबळे' असा निष्कर्ष निघाला. नाशीक येथील वहींत पुढील लेख सांपडलाः- "नारोबा गोसावी पीते तुकोबा गोसावी आजे बोल्होबा भाऊ विठोबा गोसावी महादाजी गोसावी...माता अवळीबाई कुणवाणी अडनांव आंबीले गांव देहु प्र० पुणे कुळी मोरे..." अवळीबाइ म्ह० जिजाबाई. त्र्यंबक येथें त्याच नारायणबुवाचा (तुकोबांच्या तिसऱ्या मुलाचा) जो लेख आहे त्यांत 'माता जीजाईबाई ज्ञात कुनबी आवळे वास देहु प्र. पुने' अशीं अक्षरें आहेत. कांहीं लेखांत 'कुणंबवाणी आंबळे' असे उल्लेख सांपडतात. या सर्व लेखांवरून तुकोबांची जात शूद्र उर्फ कुणंबवाणी असून त्यांची कुळी मोरे व आडनांव आंबिले, आंबळे, अंबळे असें होतें हें उघड दिसतें.

पूर्वार्जित महाजनकी चालविण्याची तुकोबांनीं उदासीनवृत्तीमुळें उपेक्षा केली पण त्याची दुरुस्ती त्यांचे पुत्र नारायणोबा यांनीं पुढें करून घेतली! राजशक ५ कालयुक्त संवत्सर शके १६०० मध्यें फाल्गुनांत शिवाजी महाराजांच्या एका आज्ञापत्रांत म्हटलें आहेः-" तुकोबा गोसावी

यांचे पुत्र नारायण गोसावी याणीं सांगितलें कीं मौजे देहू परगणे मजकुर (पुणें) येथील महाजनकी आपले वडिलांची मिरास आहे वडील गोसावी जाले याकरितां महाजनकी चालवायाची उपेक्षा करीत गेले... आपण न चालवावें तरी वृत्तीचा लोप होतो, याकरितां माहाजनकी आपली मिरास आहे ते चालवूं पाहातों तरी पुरातन चालत आल्याप्रमाणें चालवीत जाणें ऐसें आज्ञापत्र करून देविलें पाहिजे." यावर महाराजांनीं 'यांची महाजनकी मिरासी पहिलेपासून चालत आली आहे तेणेंप्रमाणें चालविणें' असी पुणें परगण्याच्या देशाधिकाऱ्यास आज्ञा केली आहे. ह्या लेखांवरून महाजनकी चालवायाची तुकोबानीं उपेक्षा केली असली तरी ती त्यांचे घराण्याकडे पुरातन चालत होती हें उघड आहे. तुकोबांच्या नातवांनीं लिहिलेल्या एका यादींतही "श्रीतुकारामबावा वास्तव्य क्षेत्र देहू यांची वृत्ति मूळची क्षेत्र मजकूरची महाजनकी" अशीं अक्षरें आहेत. तुकोबांचे पुत्र महादेवबोवा, विठ्ठलबोवा व नारायणबोवा यांचें शके १६११ चें एक फारकतपत्र मी पाहिलें आहे त्यांत महादेवबोवा आपल्या दोघां भावांस लिहितात "आपले मिरासीचीं घरें दोन एक श्रीसंनिध एक पेठेंत महाजनकीचें घर त्यास आपण महाजनकीचा वाडा व महाजनकी घेतली व तुम्हांस उभयेतांस श्रीसंनिध वाडा व श्रीची पूजा तुमचे स्वाधीन केली." आणखी एका पत्रांत "विठ्ठलटिकें (देहू येथील एका शेताचें नांव) श्रीस इनाम पुरातन आहे असा पांढरीच्या (गांवांतील पंचांच्या) मुखें" पंत मुतालिक व पंतप्रधान यांनीं खरें-खुरें करून घेतल्याचें लिहिलें आहे. देहूस मला पाहण्यास मिळालेल्या सर्व लेखांवरून तुकोबांच्या घराण्याकडे देहू येथील महाजनकीची मिरास, बाजारपेठेंतला महाजनकीचा वाडा, अर्थात् महाजनकीचे अधिकार व उत्पन्न 'पुरातन चालत होतें, त्याप्रमाणेंच श्रीच्या (विठ्ठलाच्या) पूजाअर्चेसाठीं 'पुरातन इनाम' चालत होतें. शिवाय त्यांचें खाजगी घर श्रीसंनिध होतेंच. देहु ही बाजारपेठ होती, कसबा होता, म्हणून

तेथें महाजन व शेटे असे प्रतिष्ठित अधिकारी असत. या शिवाय त्यांची कांहीं शेतवाडी, सावकारी व वाणिज्यही होतें. एकंदरीनें तुकोबांचें घराणें कसब्याच्या मानानें खाऊनपिऊन सुखी व प्रतिष्ठित होतें.

---

## ४ तुकोबांचे पूर्वज.

तुकोबापासून त्यांचे आठवे पूर्वज विश्वंभरबुवा हे मोठे विठ्ठलभक्त होऊन गेले. त्यांच्या स्त्रीचें नांव आमाबाई. त्यांच्या घराण्यांत पंढरीनाथाची भक्ति पूर्वापार होती. ' तुझ्या वडिलोंवडिलीं निर्धारीं । चालविली पंढरीची वारी । त्यासी सर्वथा अंतर न करीं । तरीच संसारीं सफलपण ' असा विश्वंभराच्या आईचा त्याला सदुपदेश होता व त्याप्रमाणें पंढरीची वारी निष्ठाप्रेमानें त्यानें दीर्घकाल केली. त्याची अनन्यभक्ति पाहून देव त्याच्या घरीं कायम आले. दृष्टांत झाला त्याप्रमाणें ते जवळच्या आंब्याच्या वनांत गेलें. तेथें विठ्ठलरखुमाईच्या मूर्ति दृष्टांताप्रमाणें त्यास मिळाल्या त्यानें वाजत गाजत आणून आपल्या घरींच त्यांची स्थापना केली व ' देहूंत पंढरपूर ' आणले ! त्याचे पुत्र हरि व मुकुंद हे दोघे तरुणपणींच नांवलौकिक आणि द्रव्य मिळविण्याच्या लोभानें घराबाहेर पडले, कोणा राजाच्या पदरीं नौकरीस राहिले व एका लढाईंत दोघेही मारले गेले. हरीची बायको गरोदर होती तिला मुलगा झाला व आमाबाईनेंच त्याला लहानाचे मोठे केले. पंढरीस रामभाऊ देहूकरांकडे मला तुकोबांची वंशावळ मिळाली तीवरून " विश्वंभरबोवा—हरिबोवा—विठोबा—पदाजी—शंकरबोवा—कान्हया—बोल्होबाबा ( कुटुंब कनकाबाई )— श्री तुकाराम महाराज चैतन्य ( स्त्रिया दोन रखमाबाई व जिजाबाई " अशी तुकोबांची पूर्वपरंपरा दिसली. देहूचीं दप्तरें चाळींत असतां एक लेख मिळाला त्यांतील उतारा पुढें देतों:— " यादि वंशावळ स्वामीची मूलपुरुष विश्वंभरबावा यास पुत्र दोघे वडील हरि, धाकटे मुकुंद. हरिबावास पुत्र विठोबा—विठोबास पुत्र पदाजी, पदाजीस पुत्र शंकरबावा, शंकरबावा यांचे पुत्र

कान्होबा, कान्होबा यास पुत्र बोल्होबावा, बोल्होबावास पुत्र वडील सावजीबाबा मधवे तुकारामबावा व धाकटे कान्होबा. सावजीबावाचे कांहीं नाहीं. तुकोबावास पुत्र तिघे. वडील महादेव, मधवे विठोबा, धाकटे नारायणबावा..." इ० इ० देहूसच एका जुन्या बाडांत वंशावळीचा असाच अभंगही मिळाला आहे.

आपलें घराणें विठ्ठलभक्ताचें आहे, विठ्ठलभक्ति ही माझी ' मिरास आहे याबद्दल तुकोबांस अभिमान वाटत असे. विठ्ठलभक्तीचा कुळधर्म चालविल्यानें ज्ञान, भक्ति, सर्व कांहीं लाभ होतात असें त्यांनीं ' कुळ-धर्म ज्ञान ' ह्या अभंगांत म्हटलें आहे.

**पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणिक न करी तीर्थव्रत ॥ १ ॥**
**व्रत एकादशी करीन उपवासी । गाईन अहर्निशी मुखीं नाम ॥ २ ॥**
**माझ्या वडिलांची मिरासी गा देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥ १॥**
**उपवास पारणीं राखिला दारवंटा । केला भोगवटा आह्मांलागी ॥२॥**
**वंशपरंपरा दास मी अंकित । तुका मोकालितां लाज कोणा ॥ ३ ॥**

---

## ५ बाळपण.

तुकोबांच्या वयाचीं पहिलीं तेरा वर्षें मातापित्यांच्या सुखशीतल संरक्षक छायेखालीं मोठया आनंदांत गेलीं. त्यांना लहानपणीं बाहेरच्या मुलांशीं खेळण्याचा बराच छंद असावा ! श्रीकृष्णाच्या व त्याच्या सवंगड्यांच्या बाललीला नाथांप्रमाणेंच त्यांनीं मोठया हौसेनें, आवडीनें वर्णिल्या आहेत. टिपऱ्या, चेंडू, मृदंग, पाव्या, हुतुतू, हमारा, हुंबरी, विटीदांडू, कुरघोडी, इत्यादि विषयांवरचे त्यांचे अभंग, काल्याचे अभंग व देवाशीं प्रेमकलह करितांना घेतलेले खेळांतले मौजेचे दृष्टांत वगैरे सर्व प्रकार पाहतां ते बाळपणीं एखाद्या एकलकोंड्या मुलासारखे नसून मूलपणाचे खेळ खेळणारे उत्साही खेळाडू असावेत असें वाटतें. तुकोबांना घरांत मातृसुखही चांगल्यापैकीं मिळालें असावें. पुढे देवाला आळ-

वितांना त्यांनीं अनेकवार आईच्या गोड दृष्टांतानें देवाचें प्रेम आपल्याकडे खेंचून घेतलें आहे. थोडा नमुना पहाः—

**( १ ) प्रीतिचा तो कळवळा । जिव्हाळाचि वेगळा १**
**बहु नेदी रडों माता । दुश्चित होतां धीर नव्हे २**
**( २ ) लागलिया मुख स्तना । घाली पान्हा माउली १**
**मेळवितां अंगें अंग । प्रेमरंग वाढतो २**
**( ३ ) मातेचिया चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ती १**
**देह विसरे आपुला । जवळीं घेतां शीण गेला २**
**( ४ ) नलगे मायेसी बाळें निरवावें । आपुल्या स्वभावें वोढे त्यासी १**
**गोडधोड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां ठेवी मना २**
**खेळतां गुंतलें उगवूनी आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ३**
**त्याच्या दुःखें पडे आपण खापरीं । लाही तळीवरी होय जैसी ४**
**तुका म्हणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ५**
**( ५ ) माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हायेली १**
**कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दूरी जवळूनी २**
**केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ३**
**तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ४**

तुकोबासारखा आईच्या प्रेमळ हृदयाचा ठाव घेणारा कवि क्वचितच सांपडेल ! तुकोबांना मातृसुख खचितच भोगावयास सांपडलें असलें पाहिजे. आई मेल्यावर त्यांना दुसऱ्या माणसांत हें प्रेम दिसलें नाहीं, म्हणून यांनीं प्रेमाचा संपूर्ण ठेवा देवाला दिला !

---

## ६ संसाराचा थोडा अनुभव.

तुकोबांच्या आईबापांना सावजी, तुकाराम व कान्होबा असे तीन पुत्र झाले. त्यावेळच्या चालीप्रमाणें तीनही मुलांची त्यांनीं बाळपणींच लग्नें करून दिलीं. तुकोबांच्या बायकोचें नांव रखुमाई असें होतें, पण तिला दम्याची व्यथा आहे असें लग्नानंतर आढळून आल्यामुळें त्यांचें दुसरें

लग्न पुण्याचे आप्पाजी गुळवेनामक एक सावकार होते त्यांच्या कन्येसी लगेच लावून दिलें. तुकोबांच्या आईबापांनीं तुकोबांच्या १२ व्या १३ व्या वर्षी या दोन बायका तुकोबांच्या गळ्यांत बांधल्या. ह्या दुसऱ्या बायकोचें नांव जिजाई उर्फ आवळी हें होतें. सावजी लौकरच विरक्त होऊन तीर्थाटणाला निघून गेला तेव्हां बोल्होबांचें वय झाल्यामुळें त्यांनीं संसारा तुकोबांच्या गळ्यांत घातला. तुकोबांनींही जमाखर्च ठेवणें, टिपटांचण पहाणें, शेताकडे व सावकारीकडे दक्षतेनें पाहणें, दुकानाची व्यवस्था नीट पहाणें हीं सर्व कामें हळुहळु अंगावर घेऊन तीं फार अक्कलहुषारीनें चालविलीं. बोल्होबांनीं तुकोबासः– 'देणें घेणें उदीम हातवटी । तोट्या-नफ्यांत असावी दृष्टि । जेणें स्वहित होईल शेवटीं ! तैसी गोष्टी करावी' अशा प्रकारचा उपदेश केला. 'बापा रे ! प्रपंचांत नफा श्रीहरि व तोटा अशाश्वतसंग्रह ! ही नफ्यातोट्याची दृष्टि ठेवून स्वहित श्रीहरिपदप्राप्ति तें जोड' असाच या उपदेशाचा अर्थ तुकोबांना कोणी तरी अदृश्य शक्तीनें सांगितला असावा ! तुकोबांनीं चार वर्षे संसार नेटका करून लोकांकडून भलाई मिळविली, पण देवाजीच्या मनांत तुकोबांनाच संसारां-तून बाहेर काढून त्यांच्या आयुष्याचें सोनें करायचें होतें म्हणून त्यानें त्यांच्यावर संकटें आणलीं.

---

## ७ आपत्तीचा कडेलोट !

चारवर्षे संसारांत बऱ्यांपैकीं काढलीं तोंच १७ व्या वर्षांपासून द्रव्य-हानि, ,अपमान, दुष्काळ, प्रियजनवियोग या आपत्ती त्यांच्यावर एकामागून एक कोसळल्या व त्यामुळें संसाराचें भीपण स्वरूप प्रगट झालें ! त्यांची पहिली बायको त्यांच्या डोळ्यांदेखत दुष्काळांत अन्ना-वांचून मृत्युमुखीं पडली व त्यांच्या प्रेमाचें प्रथम पुष्प–संताजीबाळ–तेंही गळून पडलें ! आई, बाप, भावजय, स्त्री, पुत्र हे सर्व कालवश झाले व कडुकाळांतील सर्व दुःखें अंगावर येऊन आदळलीं–त्यामुळें त्यांच्या

कोमळ मनास मोठा धक्का बसला. त्यांची वृत्ति उदास झाली. अशावेळीं जिजाई जर सौम्यप्रकृतीची असती तर तिनें पतीचें चित्त प्रेमानें हातीं घेतलें असतें, त्याच्या मनोगताप्रमाणें वागून संसारावरून पक्ष्याप्रमाणें उडून जाणारें त्यांचें मन मंजुभाषणांनीं व प्रेमळ कथालापांनीं संसाराला कदाचित् तिला जखडून ठेवतां आलें असतें ! पण ती अंमळ करड्या-स्वभावाची होती. हा तिचा स्वभावच त्यांच्या वैराग्यास कारण झाला असावा ! ' दुःखबांदवडी आहे हा संसार ' ' फळकट हा संसार ' हें त्याचें स्वरूप त्यांनीं ओळखलें व ' सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ' हा अनुभव घेऊन त्यांनीं संसाराकडे पाठ फिरविली ! तेव्हां लगेच तोंड देवाकडे झालें ! ' तुका म्हणे माझी न होत हीं कोणी । तुज चक्रपाणी वांचोनिया. ' संसाराला चित्त विटलें व वैतागाला वैराग्याचें रूप आलें आणि विवेकवैराग्यामुळें ज्ञानभक्तीचा मार्ग उघड झाला !

१

**बाप मेला न कळतां । नव्हती संसाराची चिंता ॥ १ ॥**
**विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ ध्रु० ॥**
**बाइल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥ २ ॥**
**पोर मेलें बरें झालें । देवें मायेविरहित केलें ॥ ३ ॥**
**माता मेली मज देखतां । तुका म्हणे हरली चिंता ॥ ४ ॥**

२

**बरें झालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥**
**अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ ध्रु० ॥**
**बरें झालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनांमध्यें ॥ २ ॥**
**बरें झालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ३ ॥**
**बरें झालें नाहीं धरिली लोककाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ४ ॥**

' देव भक्तालागीं करूं नेदी संसार ' ह्या अभंगांतहीं भाग्यही नाहीं व अनुकूल भार्याही नाहीं ( कर्कशा आहे ) असें त्यांनीं म्हटलें आहे. सामान्य माणसें प्रपंचाच्या आड परमार्थ आला तर परमार्थाचा नाद सोडून प्रपंचाच्या

जाळ्यांत गुरफटून मरतात; तुकोबांनीं परमार्थाच्या आड प्रपंच येतो हें पाहतांच प्रपंच सोडला व परमार्थाची बळकट कास धरिली! 'देव ना संसार। तुका दोहींकडे चोर' असें वाटलें तेव्हां त्यांनीं देवाचे पाय धरिले.

त्यांच्या उदासीनतेचा फायदा घेऊन घेणेकऱ्यांनीं त्यांचे पैसे बुडविले व देणेकऱ्यांनीं तगादे लावले. तुकोबांनीं चव्हाट्यावर एक वाणसवद्याचें दुकान चालविलें होतें तेंही बुडालें. आंतबट्ट्याचा व्यापार झाला. सावकार घरांत शिरले. घरांतली वस्तभाव मोडली. जिजाबाईची आदळआपट सुरू झाली. तिचाही त्यांत दोष नव्हता. तुकोबांना आंतबाहेर, घरींदारीं उन्हाळा भासूं लागला! 'कर्कशसंगतीं दुःख उदंड फजीती। नाहीं इह ना परलोक। मजूर दिसे जैसे रंक!' घरांत बायकोची पिरपिर, बाहेर सावकारांचे तगादे–यामुळें त्यांचें मन वैतागलें. दुर्दैव पाठीशीं लागावें तसें झालें. एकदां रात्रीं बैलावर धान्य घेऊन येत असतां एक गोणीचा पडून गेली! घरांत चार ढोरें होतीं त्यांतील तीन कांहीं रोगानें अकस्मात् मरून गेलीं. त्यांचें दिवाळें निघालें! कोणी उसनवार देईना. त्यांनीं मोठा हिय्या करून मिरच्या विकत घेतल्या व गोण्या भरून ते कोंकणांत गेले. तेथें त्यांचा भोळवटपणा पाहून त्यांना चार लुच्च्यांनीं लुटलें. कांहीं पैसे वसूल झाले ते घेऊन परत येतांना वाटेंत एका भामट्यानें पितळेचीं कडीं सोन्याचा मुलामा दिलेलीं त्यांच्या हातीं दिलीं व त्यांचे पैसे उपटून घेऊन निघून गेला! एकदां जिजाबाईनें आपल्या नांवाचें खत लिहून तुकोबांस २०० रुपये दिले. तुकोबांनीं त्याचें मीठ भरून दूरदेशीं नेलें व दोनशेंचे अडीचशें केले, पण परत येतांना वाटेंत एक दीन व दारिद्र्यानें त्रस्त झालेला मनुष्य रडून फार गयावया करूं लागला, तेव्हां चित्तास द्रव येऊन त्यांनीं त्यास सर्व द्रव्य देऊन टाकलें! अशांत तीन वर्षें महाराष्ट्रांत भयानक दुष्काळ पडला. अन्नान्नदशा झाली. संसाराला त्रासून तुकोबांनीं वैराग्य घेतलें.

## ८ तुकोबांच्या आयुष्यक्रमाचा नकाशा.

तुकोबांचा जन्मकाळ, गुरूपदेशाचा काळ व प्रयाणकाळ याबद्दल नानामतें आहेत त्या सर्वमतांचें मी आपल्या 'श्रीतुकारामचरित्र' ह्या ग्रंथांत सविस्तर परीक्षण केलें आहे. त्या ३६ पृष्ठांत जीं साधक-बाधक प्रमाणें देऊन खंडण-मंडण केलें आहे तें सर्व येथें न देतां माझा निर्णय मात्र पुढें देतों. हा निर्णय आतां सर्वांनीं मान्य केला आहे इतकें सांगितलें म्हणजे पुरें. चिकित्सकांनीं तें मूळ प्रकरण वाचावें. तुकोबांचें आयुर्मान मी ४२ वर्षांचें ठरविलें आहे.

| वर्ष. | |
|---|---|
| | शके १५३० तुकोबारायांचा देहुक्षेत्रीं जन्म. |
| १३ | शक १५४३ तुकोबांच्या गळ्यांत बापानें संसार घातला. |
| १४–१६ | शक १५४४-४६ च्या सुमारास तुकोबांचीं दोन्ही लग्नें. |
| १७ | शक १५४७ तुकोबांचे आईबाप व वडील भावजय ( सावजीची बायको ) वारली. |
| १८ | शक १५४८ सावजी विरक्त होऊन तीर्थाटणाला निघून गेला. |
| २० | शक १५५० मनाचें औदासीन्य आवरून तुकोबांनीं पहिला पुत्र संताजी व उभय स्त्रिया यांसह संसार नेटका करण्याची उमेद बांधली. |
| २१ | शक १५५१ विपरीत काळ येऊन दिवाळें निघालें. दुष्काळ. |
| २२ | शक १५५२ दुष्काळाचें भयानक स्वरूप. पाहिली बायको दुष्काळांत अन्नान्न करून मेली. मुलगा मेला. वैराग्य उत्पन्न होऊन भामनाथ गांठला. नामस्मरणाचा अभ्यास. |
| २३ | शक १५५३ विठ्ठलमंदिराचा जीर्णोद्धार, कीर्तनश्रवणाचा व ज्ञानेश्वरीनाथभागवतांच्या पारायणांचा सपाटा. |
| २४ | शक १५५४ माघ शुद्ध १० गुरुवार गुरुपदेश. |
| २६ | शक १५५६।५७ कवित्वस्फूर्ति. |
| ३० | शक १५६० रामेश्वरभटाचा छळ व सगुणसाक्षात्करा . |

४१ शक १५७१ फाल्गुन वद्य २ शनिवार सूर्योदयानंतर ४ घटका दिवसास प्रयाण.

---

## ९ आत्मचरित्रपर अभंग.

याती शूद्र वैश्य केला वेवसाय । आदि तो हा देव कुळपूज्य ॥ १ ॥
नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं ॥ ध्रु० ॥
संवसारें जालों अतिदुःखें दुःखी । मायबापें सेखीं क्रमिलिया ॥ २ ॥
दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान । स्त्री एकी अन्नअन्न करितां मेली ३
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखे तुटी येतां ॥ ४ ॥
देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ५ ॥
आरंभीं कीर्तन करीं एकादशीं । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ६ ॥
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ७ ॥
गाती पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ८ ॥
संतांचें सेविलें तीर्थपायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ ९ ॥
ठाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनी ॥ १० ॥
वचन मानिलें नाहीं सुहृदांचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ ११ ॥
सत्य असत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १२ ॥
मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढनामीं ॥ १३ ॥
यावरीश जाली कवित्वाची स्फूर्ती। पाय धरिले चित्तीं विठोबाचे१४
निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखावलें ॥ १५ ॥
बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १६ ॥
विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १७ ॥
आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १८ ॥
भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसें कळों आलें ॥ १९ ॥
तुका ह्मणें माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २० ॥

( १ ) मी ' याती शूद्र '–जातीचा शूद्र खरा पण व्यवसाय वैश्याचा.

( २ ) आमच्या कुळांत पूर्वापार पांडुरंगाची उपासना चालत आहे.

( ३ ) संसारदुःखानें मी फार गांजलों त्यांतच आईबापांचें छत्र होतें तें जाऊन मी उघडा पडलों.

( ४ ) भयंकर दुष्काळ पडला त्यांत घरांत होतें नव्हतें तें सारें संपलें व द्रव्य गेलें त्याबरोबर लोकांत मानप्रतिष्ठा होती तीही गेली. एक स्त्री 'अन्नान्न' करीत अन्नावांचून मेली. जो व्यवसाय करावा त्यांत आंत पाय! असा आंतबट्याचा व्यापार झाला. या सर्व दुःखानें मी त्रासलों व माझी मलाच लाज वाटूं लागली.

( ५ ) या मनःस्थितींत जीवाला कांहीं विरंगुळा वाटावा व देवाकडे लक्ष लागावें म्हणून ( विश्वंभरबावानीं बांधलेलें ) विठ्ठलाचें मंदिर मोडकळीस आलें होतें. त्याचा जीर्णोद्धार करण्याचें मनानें घेतलें व अहोरात्र शरीरकष्ट करून तें काम पुरें केलें.

( ६ ) प्रारंभीं एकादशीस कीर्तन करूं लागलों. प्रथम ह्या अभ्यासाकडे चित्त लागेना. मग संतांचे ग्रंथ पाहिले व त्यांचीं उत्तरें (वचनें) मुखपाठ केलीं. संतवचनांवर पूर्ण विश्वास ठेवून व त्यांविषयीं आदर बाळगून तीं पाठ केलीं. ( व अर्थमननद्वारां चित्त अभ्यासाकडे लावलें. )

( ७ ) हरिदास कीर्तनभजन करीत तेव्हां टाळ घेऊन त्यांच्या मागें उभे राहून ध्रुपद धरावें, 'भावें चित्त शुद्ध करून' अर्थपर व्हावें व हरिप्रेम चित्तांत जमवावें असा अभ्यास सुरू केला.

( ८ ) कीर्तनकार, भजनकार, वारकरी कोणीही देवाचें नांव घेणारे संत भेटतील त्यांच्या पायां पडून त्यांच्या चरणाचें तीर्थ घ्यावें. याची लाज बाळगली नाहीं.

( ९ ) शरीर कष्टवून घडेल तेवढा परोपकार करूं लागलों. दुसऱ्याच्या उपयोगीं पडावें, परकार्यांत देह झिजवावा यांत सार्थकता वाटूं लागली. याप्रमाणें मी आपलें चित्त परमार्थाकडे लावलें.

( १० ) एकादशीव्रत, कथाकीर्तन, सत्संग व परोपकार ही परमार्थाची चतुःसूत्री मी आपली ठरवून त्याप्रमाणें प्रत्यक्ष वागूं लागलों.

तेव्हां स्त्री, बंधु, आप्तेष्ट हे मला प्रपंचाचा उपदेश करून प्रपंचाकडे परत वळवूं लागले, तेव्हां मन घट्ट घेऊन मी त्यांचें ऐकलें नाहीं व धरलेला मार्ग सोडला नाहीं. मन परमार्थमार्गाकडे वळलें व लोक प्रपंचाकडे ओढूं लागले ! प्रवृत्तिनिवृत्तींचा झगडा सुरू झाला. त्यावेळीं 'सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही '—मन साक्षी करून सत्यस्वरूप जो श्रीहरी त्याचा मी मार्ग धरिला व असत्य ( मिथ्या, नाशवंत ) असा जो प्रपंच त्याकडे दुर्लक्ष केलें व याप्रमाणें 'मानियेले नाहीं बहुमतां '— प्रपंचानुकूल असें जें बहुमत तें मानलें नाहीं. 'प्रपंचाचा समूळ वीट आला व नित्यानित्यविवेक करून मी श्रीहरीचा मार्ग निश्चित केला.

( ११ ) देवच पाहिजे असा माझ्या ठिकाणीं निश्चय झाल्यावर श्रीगुरु बाबाजी चैतन्य यांनीं स्वप्नांत उपदेश करून आवडीचा व सोपा 'रामकृष्ण हरी ' हा मंत्र दिला व मींही ' धरिला विश्वास दृढ नामीं ' नामस्मरणच मला तारील, नामच नामी जो श्रीहरी त्याची भेट करवील, असा दृढ विश्वास धरून नामस्मरणाची कास धरिली.

( १२ ) नामरंगीं रंगलों तेव्हां मला कवित्वाची स्फूर्ति झाली व मुखावाटें अभंग येऊं लागले. हा माझ्या बुद्धीचा प्रभाव नसून बोलविता देव आहे असें समजून मी विठ्ठलाचें पाय चित्तीं दृढ धरिलें.

( १३ ) असा क्रम चालला असतां ( मुखीं नाम व चित्तीं रूप ) रामेश्वरभटाच्या द्वारें निषेधाचा ( कवित्व करूं नकोस असा ) आघात झाला. माझें कवित्व देवाला मान्य नसावें अशी कल्पना येऊन माझ्या अभंगाच्या वह्या मी ( इंद्रायणीच्या डोहांत ) बुडविल्या. तेव्हां दयाघन श्रीहरीनें ( स्वतः प्रगट होऊन ) माझें समाधान केलें, आघातांपासून माझें व वह्यांचें स्वतः रक्षण केलें.

( १४ ) भक्ताची नारायण उपेक्षा करीत नाहीं असा प्रत्यक्ष अनुभव आला.

**'तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरता' हें त्यांचें उरलेलें चरित्र !**

# २० नामसंकीर्तनाचा महामंत्र!



## १ भक्तिपंथ बहुसोपा.

कलियुगांत भक्तिमार्ग हा भगवत्प्राप्तीचा एकमेव मार्ग आहे व नामसंकीर्तन हें त्याचें एकमेव साधन आहे हें पूर्वील साधुसंतांप्रमाणें तुकोबांनींही—पण अधिक ठसठासितपणें—लोकांच्या मनावर बिंबविलें! साधुसंतांनीं भगवद्वचनानुरोधानें, स्वानुभवानें व भूतहितेच्छेनें भक्तिमार्गाचाच पुरस्कार केला आहे. ज्ञानेश्वरनामदेवादि संतांनीं ज्ञानोत्तरभक्ति जगाला शिकविली व तोच पूर्वापार ओघ नाथतुकोबांनीं पुढें चालविला. तुकोबाराय सांगतातः—

**गेले पुढें त्यांचा शोधित मारग। चला जाऊं माग घेत आम्ही॥**
**अवघे होती लाभ एका या चिंतनें। नामसंकीर्तनें गोविंदाच्या॥**

*　　　*　　　*　　　*

**वेदाचें गव्हर न कळे पाठकां। अधिकार लोकां नाहीं येरां॥**
**विठोबाचे नाम सुलभ सोपारें। तारी एकसरें भवसिंधु॥**

मंत्रतंत्र विधिनिषेध हे मार्ग या काळीं तरी बिकट आहेत.

**लय लक्ष्यीं मन न राहे निश्चळ। मुख्य तेथें बळ आसनाचें॥**
**हें तों असाध्य जी सर्वत्र या जना। भलें नारायणा आळवितां॥**

भक्ताच्या 'अष्ट महासिद्धी वोळगती द्वारीं,' त्याच्या 'योगभाग्य येती घरा। अवघ्या शक्ती चालत' असा अनुभव असल्यामुळें योगप्रक्रियेच्या मागें लागण्याचें कारण नाहीं. ज्ञानेश्वरमाउलीनें खरा योग म्हणजे 'जीवपरमात्मसंयोग'—देवभक्तांचें ऐक्य—असें शिकविलें आहे.

मंततंत्रजपतपव्रत हे मार्ग बिकट अनिश्चित फलदायी असून त्याचें अनुपान कठिण, श्रमाचे व दगदगीचें आहेः—

**तपें इंद्रियां आघात । क्षणें एक वाताहात ॥**
**मंत्र चळे थोडा । तरी धडचि होय वेडा ॥**
**व्रतें करितां सांग । तरी एक चुकतां भंग ॥**
**तैसी नव्हे भोळी सेवा । एक भावचि कारण देवा ॥**

* * * *

**अवघ्या वाटा झाल्या क्षीण । कलीं न घडे साधन ।**
**उचित विधिविधान । न कळे न घडे सर्वथा ॥ १ ॥**
**भक्तिपंथ बहु सोपा । पुण्या नागवे या पापा ।**
**येणें जाणें खेपा । येणेंचि एके खुंटती ॥ २ ॥**
**उभारूनि बाहे । विठो पालवीत आहे ।**
**दासा मीच साहे । मुखें बोले आपुल्या ॥**

निर्गुणच भक्तकार्यार्थे, भक्तिसुखार्थे किंबहुना स्वात्मसुखार्थ सगुण झालें आहे! आपलें निर्गुणपण न मोडतां देव सगुण आहे. अद्वैत न बिघडूं देतां तो द्वैत झाला आहे! अमूर्त असूनही तो मूर्तींत प्रगट आहे! हें गुह्य संतगुरुकृपेनेंच अनुभवाला येणारें आहे!

**( १ ) लक्षूनियां योगी पाहती आभास । तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें १**
**कर जोडोनी कटीं राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥ २॥**
**अचेत चेतले भक्तीचिया सुखें । आपुल्या कवतुकें तुका ह्मणे ॥ ३ ॥**

'विठ्ठल आमुचें जीवन'–आगमनिगमांचें स्थान, कुळींचें दैवत, ध्यानाचा विसावा सर्व काहीं विठ्ठल आहे. 'विठ्ठल विस्तारला जनीं। सप्तहि पाताळें भरुनी। विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं। विठ्ठल मुनिमानसीं.'

**नलगे जाणावे नेणावे । गावें आनंदें नाचावें ।**
**प्रेमसुख घ्यावें । वैष्णवांचे संगती ॥ १ ॥**

भक्तिपंथांत देवाचें ध्यान व नाम मुख्य आहेत. **चित्तीं ध्यान, नेत्रीं रूप व मुखीं नाम हा एवढाच खराखुरा भक्तिपंथ आहे.** 'समचरण दृष्टी विटेवरी साजिरी' 'सुंदर तें ध्यान उभा विटेवरी' 'राजस सुकुमार मदनाचा पुतळा' 'सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती' 'कर कटावरी तुळशीच्या माळा' हे तुकोबांचे ध्यानाचे पांच अभंग

अत्यंत लोकप्रिय व अतिमनोहर आहेत. ज्ञानाहून ध्यान थोर व ध्यान निरंतर राहण्याचें मुख्य साधन नामस्मरण, ह्मणून नामसंकीर्तनाचें अत्यंत महत्व आहे. मधुर स्वराची देवाला आवड नाहीं, 'विश्वासेसी प्रीति भावबळें' भक्तिभावबळाला देव भुलतो. 'भावचि कारण भावचि कारण । मोक्षाचें साधन बोलियेलें.' प्रपंचत्यागाचें येथें कारण नाहीं, प्रेमसूत्रदोरीनेंच हरि वश होतो.

हा विठ्ठल 'वेदाचें जें सार शास्त्रांची जो मूर्ति' तोच आहे, निराळा नाहीं.

**आनंद अद्वय नित्य निरामय । जें कां निजध्येय योगियांचें १**
**ते हे समचरण साजिरे विटेवरी । पहा भीमातीरीं विठ्ठलरूप२**

उपनिषदांनीं गायिलेलें निर्गुणस्वरूपच सगुणरूपानें विटेवर उभें आहे, तेथें माझें मन विनटलें आहे, त्याच्या प्रेमानें मला वेडे केलें आहे.

१

**आणिक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्तापासुनियां १**
**पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं । जागृती स्वप्नीं पांडुरंग ॥ २ ॥**
**पडिलें वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाहीं दुजा ३ ॥**
**तुका ह्मणे नेत्रीं केली वोळखण । तटस्थ हें ध्यान विटेवरी ॥ ४ ॥**

२

**नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ॥**
**जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥**
**नाहीं आकार विकार । चराचर भरलेसें ॥**
**नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ! ॥**
**तुका म्हणे भावाविण । त्याचें मन वोळेना ॥**

माझ्या साऱ्या इच्छा तुझ्या चरणापायीं गोंवल्या आहेत. मुक्तीचा अभिलाष दाखवायचा असेल तर 'जाण ते ब्रह्मज्ञानी' असतील त्यांना दाखवा माझा भक्तिरस मला पुरे ! देवा ! 'लागली न सुटे नामाची आवडी । माझी भावजोडी भंगूं नका'

**बहु भीतों जाणपणा । आड नयो नारायणा ।**
**घेइन प्रेमपान्हा । भक्तिसुखनिवाडें ॥ १ ॥**
**यासी तुळे ऐसें कांहीं । दुजे त्रिभुवनीं नाहीं ।**
**कालाभातदहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ २ ॥**

देवाच्यामाझ्यामध्यें हा जाणपणा ह्म० ज्ञानाचा अभिमान येईल कीं काय याला मी भितों. भक्तिप्रेमाची बरोबरी करील असें त्रैलोक्यांत दुसरें कांहीं नाहीं ! संतांच्या मेळ्यांत दहिकाल्याचें कृष्णसुख भोगणें यापरतें श्रेष्ठ कांहींच नाहीं. ब्रह्मादिकांना हें दुर्लभ आहे !

**तूं स्वामी मी सेवक । उंच पद निंच एक ।**
**ऐसें करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥**

जळ जळाचा रस चाखीत नाहीं, वृक्ष आपल्याच फळाचा आस्वाद घेत नाहीं, हिरा कोंदणाशिवाय शोभत नाहीं, सोन्याला अलंकाराशिवाय शोभा नाहीं, उष्णाशिवाय छायेची मौज नाहीं, बाळाशिवाय मातेला पान्हा फुटत नाहीं, हे अतिशय गोड दृष्टांत देऊन तुकोबा विचारतात कीं ' एका एक भेटे । कोण सुख ते काळीं ?'– दोनपणाशिवाय सुखच कोठें आहे ? म्हणून म्हणतों कीं ' जळो माझी ऐसी बुद्धी । मज घालीं तुजमधीं '

**मोक्षपदें तुच्छ केलीं याकारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं ॥**
**विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढतीपुढती आस सेवावें हें ॥**
**देवा हातीं रूप धरविला आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥**
**तुका म्हणे चित्त निवांत राहिलें । ध्याईं तीं पाऊलें विटेवरी ॥**

आम्ही आपल्या भक्तिबळानें निराकाराला आकार घ्यायला लावतों व भक्ताच्या प्रेमानें देवही तो घेतो ! ' नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन '– शुष्क काष्ठाचा चुरा करणारा भ्रमर कोवळ्या कमळांत अडकून पडतो, पदराला पिळा घालून लडिवाळ प्रेमानें बाळ बापाला थोपवून धरितो, तात्पर्य–' प्रेमप्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें '–

आम्ही भक्तांनीं प्रेमप्रीतीनें बांधून ठेवल्यामुळें देवाला सगुण सोडून जातांच येत नाहीं !

---

## २ एकादशीव्रत.

भागवतधर्मांत एकादशीव्रताचें मोठें माहात्म्य आहे. एकनाथ, तुकाराम, रामदास यांनीं एकादशीवर अनेक अभंग लिहिले आहेत. तुकोबाच्या पूर्वजांनीं ' उपवास पारणीं राखिला दारवंटा ' यास्तव त्यांना तें वळणच होतें. ' आरंभीं कीर्तन करी एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ' असें त्यानीं आत्मचरित्र सांगतांना म्हटलें आहे. दशमीच्या रात्रीचें कीर्तन, एकादशीचा उपवास व रात्रीचा हरिजागर, द्वादशीचें पारणें व कीर्तन असें हें त्रिदिनव्रत आहे. उपवासानें शरीर हलकें, मन तरतारेत व बुद्धि सूक्ष्म होते व ईश्वरभजनाकडे लक्ष लागतें, असा सर्व भाविकांचा अनुभवच आहे. गंगास्नान, निराहार किंवा निदान अल्पाहार, भाविकांच्या भेटी, प्रेमळांचा सांगात, मृंदगटाळवीणाच्या गजरांत नामघोष, भगत्कथालाप, हे सारे लाभ एकादशीव्रताचा अंगीकार केल्यानें होतात. संसाराचा विसर पडून हरिचरणीं प्रेम जडतें. तुकोबांनीं हें व्रत न करणाऱ्या पिंडपोषी, आळशी लोकांचा तीव्र शब्दांनीं निषेध केला आहे. हीं आंधळीं बहिर्मुखें कशीं करतील या विषयीं ' काय करूं वाटे बहु तळमळ ' अशी त्यांना कींव येई. ' एकादशी हें व्रतसार आहे. ' सत्संगीं हरिकीर्तन ' हा तुकोबाचा अभ्यास होता व हाच मार्ग त्यांनीं जगाला दाखवून दिला आहे.

---

## ३ वारकरी संतांचा मेळा.

तुकोबा आषाढीकार्तिकीला मेळ्यानें कीर्तनभजन करीत आनंदानें गात नाचत पंढरीस जात व देहूआळंदीसही वारकऱ्यांच्या मेळ्यांत

कथाकीर्तनें व भजनें नित्य करीत. एका उपास्याचे उपासक बंधुप्रेमानें बद्ध होतात. त्यांचे आचारविचार, त्यांचें उपास्य, त्यांच्या उपासनापद्धती, त्यांचे नित्यनेम, खाणेंपिणें, आवडी-निवडी, स्वभावही एका विशिष्ट प्रकारचे बनतात आणि त्यांच्यांत सहज ' भाऊपण ' उत्पन्न होतें. ' संतसंगतीं सर्वकाळ। थोर प्रेमाचा सुकाळ ' होत असल्यामुळें ' साधु-संतांच्या दाटणीं। तुका जाय लोटांगणीं ' किंवा ' तुका म्हणे संतमेळीं। पायधूळी वंदीन ' असा वारकऱ्यांविषयीं त्यांच्या चित्तांत प्रेमादर असे. पंढरीचा पंथ सोपा आहे. ' न लगे हिंडणें मुंडणें तें कांहीं ' तेथें फक्त ' चंद्रभागे स्नान विध तो हरिकथा ' एवढयानेंच ' समाधान चित्ता सर्वकाळ ' मिळतें !

**संसार तो कोण देखे। आह्मां सखे हरिजन ॥**
**काळ ब्रह्मानंदें सरे। आवडी उरे संचली ॥**
**हरिभक्त माझे जिवलग सोयरे। हृदयीं पाउलें धरीन त्यांचीं ॥ १ ॥**
**कंठीं तुळशीमाळा नामाचे धारक। ते माझे तारक भवनदीचे ॥ध्रु०॥**
**झुंझार ते एक विष्णुदास जगीं। पापपुण्य अंगीं नातळे त्या ॥ १ ॥**
**गोविंद आसनीं गोविंद शयनीं। गोविंद त्या मनीं बैसलासे ॥ ध्रु० ॥**

हरिदासांची भेट होतांच ' पापताप दैन्य जाय उठाउठीं ' संतचरण रजांचा हा अनुभव आला कीं ' तुका प्रेमें नाचे गाये। गाणियांत विरोनि जाये, तुकोबांचे वारकरी भक्तभाविकांवर व सामान्य व विशिष्ट संतांवर शेकडो अभंग आहेत ते मूळ गाथ्यांत पहावेत.

तुकोबा म्हणतात कीं पूर्वी एकाकाळीं मला एकांताची आवड होती पण आतां या ' माझ्या जातीच्या ' भक्तांच्या मेळ्यांतच मला अधिक आनंद वाटतो !

**नाचेन मी सुखें वैष्णवांच्या मेळी। दिंडी टाळ घोळीं आनंदें या।**
**कासया एकांत सेवूं तया वना। आनंद या जनामांजी असे ॥**
**कासया उदास होऊं देहावरी। अमृतसागरीं बुडोनियां ! ॥**

आतां ' पाहे तिकडे मायबाप। विठ्ठल आहे रखुमाई ' यामुळें ' जन

विजन झालें आम्हां ' तसेंच ' वन पट्टन एक भाव ' झाला आहे. संत-मेळ्यांत सर्वकाळ एकांतच आहे. ' आठव नाहीं सुखदुःखा । नाचे तुका कौतुकें ' आतां आम्हांला कळलें कीं देवालाही तसला एकांत आवडत नसून कीर्तनच आवडतें व तो वैकुंठांत, योग्यांच्या समाधींत व रानाव-नांत सांपडत नसून ' माझे भक्त गाती जेथें । नारदा मी उभा तेथें ' या त्याच्याच वचनाप्रमाणें तो कीर्तनांत वैष्णवांच्या मेळ्यांतच सांपडतो ! त्याच्या दर्शनाची खरी जागा आम्हांला सांपडली ! आम्ही निजलों, बसलों किंवा उभे असलों तरी त्याच्या नामसंकीर्तनांत गुंग असलों म्हणजे तो आम्हांला सोडीत नाहीं.

**निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥ १॥**
**उभा राहोनीयां मुखीं नाम वदे । नाचे हा गोविंद नाना छंदें ॥ २ ॥**

---

## ४ नामसंकीर्तनानें माझें कार्य झालें.

नामसंकीर्तनभक्तीचा विश्वांत जयजयकार करण्यासाठीं तुकोबांचा अवतार ! नामसंकीर्तनांत कीर्तन ऊर्फ हरिकथा, नामस्मरण व भजन ह्या तिहींचा अंतर्भाव होतो. **कीर्तनांत** एक वक्ता व बाकीचे सारे श्रोते असतात. मृदंग, टाळ, वीणा इ० साहित्याची त्याला मदत असते. गायन, वादन, नर्तन ह्या तीनही गोष्टी कीर्तनरंगास पोषक असतात. वक्त्यानें आत्मज्ञान सांगावें, सगुणलीला गाव्यात, ज्ञानभक्तिवैराग्याचें उद्बोधन करावें. मागे उभे असलेल्या टाळकऱ्यांच्या साथीनें भजन करावें व सर्वांनीं मधून मधून नामघोष करावा, ह्या कीर्तनपद्धतीला **निरूपणी कीर्तन** म्हणतात. हाच प्रकार वारकऱ्यांत पहिल्यापासून रूढ आहे. ह्यांत आख्यानें लावीत नाहींत. आख्यानी कीर्तनें करणारे हरिदास वेगळे आहेत. लोकशिक्षणास कीर्तनासारखें दुसरें उत्कृष्ट साधनच नाहीं. ' भावें करितां कीर्तन । तरे तारी आणिक जन । भेटे नारायण । संदेह नाहीं म्हणे तुका ' कीर्तनानें आत्मोद्धार व लोकोद्धार होतो. कीर्तनाला

नामस्मरणानें रंग भरतोच, पण **नामस्मरण** किंवा चिंतन हें ज्याचें त्याला एकांतांतही हवें तेव्हां किंवा सर्वकाळ करितां येते. खऱ्या अर्थानें नामस्मरण हें अंतरंग उपासनेंत येतें. यज्ञयागजपतपादि साधनें थोडी फार रुक्ष वाटणारीं आहेत, नामस्मरणांत अंतःसंगतीला सदैव देव असल्यामुळें तें आनंदवर्धक व चित्तवेधक असतें. त्यांत मनन, चिंतन, निदिध्यास व साक्षात्कार हें सर्व क्रमानें येतें, नाम व नामी एकमय होतात. **भजन** हें सर्व टाळकरी मिळून बसून अगर उभ्यानें करितात. हेंही एकांतांत व लोकांतांत होतें. तुकोबाराय **कीर्तन, नामस्मरण व भजन मिळून जी नामसंकीर्तनभक्ति तिच्या योगानें स्वतः तरले व त्यांनीं जगास तारिलें.** नामसंकीर्तनानें मी संसारदुःखांतून मुक्त झालों, माझा सारा शीणभाग गेला, विघ्नें निवारलीं व देव जोडला असें त्यांनीं अनेकवार स्पष्ट सांगितलें आहे. ‘ सुखाची वसती झाली माझे जीवीं ’ त्यांचे शंभरशंभर चरणीं दोन गोड अभंग आहेत त्यांत ते म्हणतात—

**( १ ) शीण झाला मज संसारसंभ्रमें। शीतळ या नामें झाली काया**
**माझिया जीवाची केली सोडवण। ऐसा नारायण कृपाळू हा ॥ २३॥**
**हाचि माझा नेम हाचि माझा धर्म। नित्य वाचे नाम विठोबाचें २४**
**कोठें नका पाहूं करा हरिकथा। तेथें अवचिता सांपडेल ॥ ६७ ॥**
**सांपडे हा देव भाविकांचे हातीं। शाहणे मरती तरी नाहीं ॥ ६८ ॥**
**सुखाचा सागरु आहे विटेवरी। कृपादान करी तोचि एक ॥ ९ ॥**
**राहिलोसे दृढ विठोबाचे पायीं। तुका ह्मणे कांहीं नलगे आतां ९९**

* * * *

**( २ ) रंगलें हें चित्त माझें तयापाईं। ह्मणऊनी घेईं हाचि लाहो २**
**लाहो करीन मी हाचि संवसारीं। रामकृष्ण हरी नारायण ॥ ३ ॥**
**अमृताचें सार निजतत्वबीज। गुह्यांचें तें गुज रामनाम ॥ ३२ ॥**
**हेंचि सुख आम्हीं घेऊं सर्वकाळ। करूं हे निर्मळ हरिकथा ॥ ३४ ॥**
**कथाकाळीं लागे सगळां समाधि। तात्काळ हे बुद्धि दुष्ट नासे ३९**
**नासे लोभ मोह आशा तृष्णा माया। गातां गुण तया विठोबाचे ४०**

**येणें अंगिकार केला पांडुरंगें । रंगविलें रंगें आपुलिया ४२**
**विठोबाचे आम्ही लाडिके डिंगर । कांपती असुर काळ धाकें ॥४६॥**
**सत्य मानूनियां संतांच्या वचना । जा रे नारायणा शरण तुम्ही ४७**

तुकोबा आणखी एके ठिकाणीं ह्मणतातः—

**झाली होती काया । बहुत मळिण देवराया ॥ १ ॥**
**तुझ्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥ २ ॥**

प्रारब्धाचा संबंध तुटला, कायावाचामनाचे दोष तुझ्या प्रेमानें गेले, नामामृतसेवनानें देहाची कांतिही वाढली! 'आम्ही या कीर्तनें शुद्ध झालों.' आमचे दोष गेले.

**नाम घेतां कंठीं शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥ १॥**
**प्रेमरसें जाली पुष्ट अंगकांती । त्रिविध नासती ताप क्षणें॥३॥**
**तुका ह्मणे तेथें विकाराची मात । बोलों नये-हित सकळांचें॥४**

'उतरलों पार । सत्य जाला हा निर्धार'– पार व्हायला कोणता आश्रय धरिलांत? 'तुझें नाम धरिलें कंठीं । पडिली संसारासी तुटी' देवा फार काय सांगूं! तुझ्या–माझ्यांत जो भेदभाव पूर्वी होता तोही आतां पार गेला! कामक्रोधादि विकार चित्तांतून गेले व चित्त शुद्ध झालें येथपासून तो अद्वयानंदाच्या अनुभवापर्यंतचे सारे लाभ देवाच्या नामसंकीर्तन भक्तीनें झाले. वेदशास्त्रपुराणांचा मतितार्थ व आमचा अनुभव 'विठोबासी शरण जावें । निजनिष्ठा नाम गावें' हाच आहे. हें अंतर्बाह्य परम सुख आकंठ व अपार भोगीत असतां तुकोबाची कायाही ब्रह्मरूप झाली. ज्ञानोत्तरभक्तीचा हा स्वानंद तुकोबांनीं भोगला असल्यामुळें तोच त्यांनीं जगास द्यावा यांत नवल नाहीं. नामचिंतनाचा महामंत्र जगास देण्यासाठींच तुकोबाचा अवतार होता.

---

## ५ नामाची सुलभता व गोडी.

मनाला कोठें तरी समाधि दिल्याशिवाय त्याच्याहातून सुटका होत

नाहीं. नामस्मरणाचा छंद वाचा प्रथम अनभ्यासामुळें मोठ्या कष्टानें पत्करते पण एकदा पत्करल्यावर वाचा नामाला पळही विसंबत नाहीं. 'मग तें जीव गेल्या न सोडी !' 'चित्तीं नसे तरी नसो । परी वाचे तरी असो' येथून नामाभ्यास सुरू झाला तो 'माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे' यांत त्याचें पर्यवसान झालें ! नामचिंतनसुखानेंच 'रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें.' रूप आणि नाम यांच्या मेळांतलें नामस्मरणच खरें नामस्मरण होयः—

**देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवोनीयां ॥१॥**
**तेणें माझ्या चित्ता होतें समाधान।वाटतें चरण न सोडावे ॥ध्रु०॥**
**मुखें गातां गीत वाजवितो टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥२॥**
**तुका म्हणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥३॥**

नामानें देवाचें प्रेमसुख भोगतां आलें तरच तें नामस्मरणः— 'तुझ्या प्रेमसुखापुढें । काय वैकुंठ बापुडें.' देवाच्या चरणावर, मुखावर व एकंदर रूपावर चित्ताची एकाग्रता झाल्यानें त्याचें प्रेमसुख वाढतें. नामस्मरणानें न कळे तें कळों येतें, न दिसे तें दिसूं लागतें, अबोलणें बोलतां येतें, न भेटे तें भेटतें—असा अलभ्य अपार लाभ घरीं चालत येतो. 'तुका म्हणे जों जों भजनासी वळे । अंग तों तों कळे सान्निधता' भजनाकडे देह जों जों लावावा तों तों देव सान्निध ह्म० अगदीं आपल्याजवळ, व आपल्या हृदयांतच आहे असा **प्रत्यय** येतो. नामाच्या चिंतनानें हृदयस्थ परमात्मा हालूं चालूं बोलूं लागतो, देव अंतरींच प्रकट होतो. 'चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां' हें नामरंगानें अनायासें साधतें. 'मुख्य उपासना सगुण भक्ती' असून 'प्रकटे हृदयीं मूर्ती । भावशुद्धी जाणोनीयां.'—परमात्मा शुद्धभाव पाहून हृदयांतच प्रगट होतो ! नामाचा अभ्यास सकळ मंगळांचें मंगळ आहे. आदिनाथ शंकर, नारद, वाल्मीकि, व्यास, शुक, परीक्षिती व इतर अनेक महात्मे नामरंगांत रंगून कृतकृत्यता पावले आहेत. देव सगुण का निर्गुण याची चर्चा पंडित करि-

तात, पण नामानें देवाच्या उभयरूपांचा मेळ घातला आहे! 'सगुण निर्गुण तुज म्हणे वेद। तुका म्हणे भेद नाहीं नामीं!'

नाम सर्वांस सर्वकाळीं सुलभ आहे. 'नाम घेतां नलगे मोल। नाममंत्र नाहीं खोल.' आणि हें तात्काळ फळ देणारें आहे. येथें उधारी नाहीं. 'मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसी साक्ष बहुतांसी,' पण हा दुसऱ्यांचा हवाला न देता 'तुका म्हणे रामनामीं। कृतकृत्य झालों आम्ही' याप्रमाणें तुकोबांनीं स्वतःची साक्षही दिली आहे! गूळ आणि गोडी तसें नाम आणि नामी एकरूप आहेत. नाम हें केवळ साधन नसून नामछंदानें साध्यसाधन एकमय होऊन जातात! आसनीं, भोजनीं, शयनीं, गमनागमन करितां सर्व कार्य करितां नामचिंतन चालतें व 'चिंतनें चिंतनें तद्रूपता' हा अनुभव येतो. नामचिंतनानें जन्मजराभयव्याधि सर्व दूर होतात. नामरंगीं रंगतां रंगतां श्रीरंग अंतरीं प्रगटतो व नामनामींच्या एकरूपतेंत जीवभाव विरून जातो.

**नाम घेतां मन निवे। जिव्हे अमृतचि स्रवे।**
**होताती बरवे। ऐसे शकुन लाभाचे॥ १॥**
**मन रंगलें रंगलें। तुझिया चरणीं स्थिरावलें।**
**केलियां विठ्ठलें। कृपा ऐसी जाणावी॥ २॥**

* * *

**बैसूं खेळूं जेवूं। तेथें नाम तुझें गावूं॥ १॥**
**रामकृष्णनाममाळा। घालूं वोवूनियां गळा॥ २॥**

* * *

**संग आसनीं शयनीं। घडे भोजनीं गमनीं॥ २॥**
**तुका म्हणे काळ। अवघा गोविंदें सुकाळ॥ ४॥**

* * *

नामाची योग्यता पुढील लोकप्रिय अभंगांत फार उत्कृष्ट प्रकारें सांगितली आहे:—

**राम म्हणे वाटचाली। यज्ञ पाउलापाउलीं॥ १॥**

धन्य धन्य ते शरीर । तीर्थांव्रतांचें माहेर ॥ ध्रु० ॥
राम म्हणे ग्रासोग्रासीं । तोचि जेविला उपवासी ॥ ३ ॥
राम म्हणे भोगीं त्यागीं । कर्म न लिंपे त्या जगीं ॥ ४ ॥
ऐसा राम जपे नित्य । तुका म्हणे तोचि जीवन्मुक्त ॥ ५ ॥

× × ×

१

विषयीं विसर पडला निःशेष । अंगीं ब्रम्हरस ठसावला ॥ १ ॥
माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे २
तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या उर्मी एकमय ३

× × ×

२

प्रेमामृतें माझी रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं १
सकळही तेथें बोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ध्रु०॥
सकळ इंद्रियें झालीं ब्रह्मरूप । वोतलें स्वरूप तयामाजी ॥ २ ॥
तुका म्हणे जेथें वसे भक्तराव । नांदे तेथें देव संदेह नाहीं ॥३॥

× × ×

ज्याला स्वहित साधायचें असेल त्यानें ‘ आवडी विठ्ठल गाइजे एकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा. ’ नामस्मरण हीच देवाची सेवा होय: ‘ सेवा ते आवडी उच्चारावें नाम. ’ घरांत बसून ह० कांहीं सांडी मांडी न करितां–अखंड नाम घ्यावें, अनुसंधान राखावें. नामसुमनांनीं देवाचा संतोष जोडावा:—

देवाचींच नामें देवाचिया शिरीं । सर्व अलंकारीं समर्पावीं ॥

× × ×

नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरींचीं ॥ १ ॥
न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ध्रु०॥

× × ×

आनंदाच्या कोटी । सांठविल्या आम्हांपोटीं ॥ १ ॥

**प्रेम चालिला प्रवाहो । नामओघ लवलाहो ॥ ध्रु० ॥**
**अखंड खंडेना जीवन । रामकृष्ण नारायण ॥ २ ॥**
**थडी आहिक्य परत्र । तुका म्हणे समतीर ॥ ३ ॥**

तुकोबांच्या गायमुखांतून घडघडाट वाहिलेल्या नामामृतरसतरंगिणीनें विश्व पावन केलें आहे.

---

## ६ नाममहिमा देवालाही ठाऊक नाहीं !

देवाच्या नामरंगाची गोडी आम्ही भक्तांनींच भोगावी, देवालाही ती ठाऊक नाहीं ! कमळाला आपला सुवास घेतां येत नसून त्याचा भोग भ्रमरालाच होतो ! गाईनें गवत खाऊन गवताचें दूध करावें पण त्या दुधाचें सेवन करणारें वत्स वेगळेंच असतें ! शिंपीच्या पोटांत मोतीं पण त्या शिंपेला त्याचा भोग नाहीं ! नामसुख मोक्षाहूनही श्रेष्ठ आहे, त्याची गोडी आम्हालांच ठाऊक ! त्याच्यापुढें आम्ही ऋद्धि व सिद्धी यांच्याकडे ढुंकूनही पाहत नाहीं व वैकुंठाचीही इच्छा करीत नाहीं ! ‘ काय वैकुंठ बापुडें । तुझ्या प्रेमसुखाकडे ! ’

१

**कुमुदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगितसे ॥**
**तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हींच तें प्रेमसुख जाणों ॥**
**माते तृण बाळा दुधाची ते गोडी।ज्याची नये जोडी त्यासी कामा**
**तुका म्हणे मुक्ताफळ शिंपीपोटीं । नाही त्याची भेटी भोग तिये ॥**

---

## ७ या रे या रे लहानथोर !

‘ विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी ’—नामस्मरणाचीं बाह्य साधनेंही विठ्ठलरूप होतात, सुखदुःखही विरून जातें.

**विठ्ठल हा चित्तीं । गोड गातां लागे गीतीं ॥ १ ॥**
**आम्हां विठ्ठल जीवन । टाळ चिपळीया धन ॥२॥**
**विठ्ठल विठ्ठल वाणी । अमृत हे संजीवनी ॥ ३ ॥**

**रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ॥ ४ ॥**

नामरंगानें मी स्वयंसुखमय झाल्यामुळें 'अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ' असें लोकांस मला सांगतां येतें. ह्या ब्रह्मरसभोजनाचा सर्वांस अधिकार आहे.

**देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोणकोण भाग्याचे ते १**
**ब्रह्मादिकांसीं हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं २**
**अवघियापुरतें वोसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ३**
**इच्छादानी येथें वोळला समर्थ । अवघेंचि आर्त पुरवी तो ४**

तुकोबाराय सांगतात कीं नामरंगानें मीं रंगलों आहे, नामाचें चिंतन व नामीचा निदिध्यास याचा अखंड अभ्यास असल्यामुळें नामामृताचें भोजन मी सर्वांस घालावयास सिद्ध झालों आहे ! धणी समर्थ आहे, तो सर्वांचें पोट भरून उरेल एवढें ब्रह्मरसाचें भोजन देण्यास उत्सुक आहे, हें अन्न अवीट व कधीं न सरणारें आहे. ज्यांच्या भाग्यांत असेल त्या नारीनरबाळांनीं अवश्य भोजनास यावें असें मी माझ्या मालकाच्या तर्फे सर्वांस उघड आमंत्रण देत आहे ! देवाचा शिक्का माझ्या हातांत आहे. 'नाम घेतां वाया गेला ' असें कधींच झालें नाहीं. आम्ही विष्णुदास गर्भवासाला (ह्म० जन्ममरणाला) भीत नाहीं इतकेंच काय पण या सुखासाठीं गर्भवास पुनःपुन्हा मागतों ! कळिकाळ आमच्यासमोर येऊं शकत नाहीं.

**तुका म्हणे जनां सकळांसहित । घेऊं अखंडित प्रेमसुख ॥**

आम्ही 'वीर विठ्ठलाचे गाढे ' आहोंत, आमच्यापुढें अशुभ तें शुभ होऊन जातें !

१

**कांस घालोनि बळकट । झालों कळिकाळासी नीट ।**
**केली पायवाट । भवसिंधुवरूनि ॥**
**या रे या रे लहान थोर । याती भलते नारी नर ।**
**करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥**

× × ×

**सेवितों हा रस वांटितो आणिकां । घ्या रे होऊं नका रानभरी ॥**
**विटेवरी ज्याची पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥**
**मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धि याच पायीं ॥**
**तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥**

---

## ८ कीर्तनानें लोकोद्धार.

देव, भक्त आणि नाम यांचा त्रिवेणीसंगम ( प्रयाग ) हें कीर्तन होय.

**कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि नाम ।**
**तेथीचें उत्तम । चरणरज वंदितां ॥**
**जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारीनर ।**
**गाती ऐकती सादर । जे पवित्र हरिकथा ॥**

कीर्तनासारखें पवित्र दुसरें कांहीं नाहीं, याचा 'महिमा अनुपम्य' आहे.

**दीन आणि दुर्बळांसी । सुखराशी हरिकथा ॥**
**कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥**
**प्रेमछंदें नाचे डोले । हारपले देहभाव ॥**

कीर्तनांत देवाचे गुणानुवाद ऐकायला मिळतात, भक्तभाविक भेटतात, नामामृतसेवन घडतें. दीनदुबळ्यांना हे तीनही लाभ एकदम भोगायला सांपडतात. तन्मयतेचें सुख जोडतें, प्रेमानंदांत नाचतांना देहभाव हरपतात व दुःखउद्वेगभयचिंता पार नाहींशा होतात ! सादर व सप्रेम हरिकथा गाणारे व ऐकणारे स्त्रीपुरुष उद्धरून जातात. कीर्तनासारखें स्वोद्धाराचें व लोकशिक्षणाचें दुसरें कोणतेंच साधन नाहीं. कीर्तनांत देव प्रत्यक्ष होतात. काळाचेंही देवापुढें बळ चालत नाहीं– ' येथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ '

**सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ॥**
**समाधीचें सुख सांडा ओंवाळूनी । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ॥धु०॥**
**पुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ २ ॥**

समाधिसुखापेक्षां उघड्या डोळ्यांनीं सर्वांस भोगतां येणारा हा रस

अत्यंत श्रेष्ठ आहे ! हरिकथा ही ऊर्ध्ववाहिनी (वर नेणारी) सात्विकभाव उत्पन्न करून तारणारी गंगा आहे.

**सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥**
**सर्वसुख ल्यालों सर्व अळंकार । आनंदें निर्भर डुल्लतसों ॥ ध्रु० ॥**
**असों ऐसा कोठें आठवचि नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥ २॥**
**तुका म्हणे आम्ही जालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य अंगा॥३॥**

ब्रह्मज्ञानी, जीवन्मुक्त, तीर्थें हिंडणारे, याज्ञिक, तपी जपी, इ० नाना साधनांच्या मागें लागणाऱ्या नानालोकांना त्यांच्या त्यांच्या साधनांपेक्षां कीर्तनरसच श्रेष्ठ आहे असें वाटायला लावीन अशी त्यांची एक अभंगांत प्रतिज्ञाच आहे.

## ९ कीर्तनाचा आनंदोल्हास.

कीर्तनाचा उत्साह, आनंद व पावित्र्य अत्यद्भुत आहेः —

**आजी आनंदु रे एकी परमानंदु रे**
**जया श्रुति नेति म्हणति गोविंदु रे ॥ १ ॥**
**विठोबाचीं वेडीं आम्ही आनंदु सदा ।**
**गाऊं नाचूं वाहूं टाळी रंजवूं गोविंदा ॥ २॥**

कीर्तन ही आमची नित्याची दिवाळी आहे. आम्ही 'आनंदें निर्भर' आहोंत. आम्हांला कीर्तनसुखापुढें जन्ममरणाचा धाक वाटत नाहीं.

**आह्मां भयचिंता नाहीं धाक । जन्ममरण कांहीं एक ।**
**जाला इहलोक परलोक । आलें सकळिक वैकुंठ ॥ १ ॥**
**न कळे दिवसराती । अखंड लागलीसे ज्योती ।**
**आनंदलहरीची गती । वर्णूं किती तया सुखा ॥ २ ॥**

कीर्तनाच्या महालाभानें 'देव जाले अवघे जन । गुणदोष हारपले!'

**हारपोनि गेली निशी । निद्रा कैसी न देखों ॥**
**नारायणीं वसलें घर । निरंतर आनंद ॥**
**उघडी समाधि हरिकथा सोहळा । नरनारी बाळं लहानथोरां ॥**

। ही उघडी समाधि आहे. जाणतेनेणते सारे हरिकीर्तनांत तन्मय होतात.

यापुढें मुक्तिही कमीच ! 'डौरलों भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें '

**मुक्त व्हावें कशासाठीं । कैंची येणें रसें भेटी ? ॥**

संतांच्या मुखानें ऐकलेलें किंवा त्यांनीं भोगून दिलेलें ब्रह्मसुख हाच त्यांचा उच्छिष्टप्रसाद होय. ह्या कीर्तनसुखापुढें वैकुंठसुखही कमीच !

**वैकुंठीचा वास । तया सुखा असे नास ।**
**अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ॥**

कथाकीर्तनांतला संतसंगतीचा व नादब्रह्माचा आनंद कांहीं अपूर्व आहे. देहाचेंही भान विसरविणारा, जगाच्या गुणदोषांवर पडदा टाकून जग ब्रह्मरूपतेनें प्रत्यक्ष करणारा प्रसंग कीर्तनासारखा दुसरा नाहीं.

**गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्ही न मागों तुज॥**
**सगुण निर्गुण एकचि आवडी । चित्तें दिली बुडी चिदानंदीं ॥**
**वृत्तिसहित मन रिघे प्रेमडोहीं । नाठविती देहीं देहभाव ॥**

---

## १० तुकोबांचे पूर्णोद्गार.

पोट भरल्यावरचे उद्गार ह्म० आत्मतृप्तीचे ढेकर. तुकोबा पूर्णता जेवून धाल्यावर जे कांहीं बोलले आहेत ते त्यांचे पूर्णोद्गार त्यांच्या अभंगांत अनेक ठिकाणीं निघाले आहेत. ज्ञानोत्तरभक्ति, अद्वैतभक्ति, पराभक्ति, मुक्तीवरील भक्ति हीं नांवें ज्या एका स्थितीला संतांनीं दिलीं आहेत, तिला पंचम पुरुषार्थ असेंही म्हणतात. जिचा अनुभव ज्ञानेश्वरनाथादि पूर्ण भक्तांनीं घेतला आहे व संत नित्य घेत असतात. त्या पूर्णावस्थेला तुकोबा पोंचले. 'भेद नाहीं सर्वात्मना। नारायणा तुज मज' हा अनुभव आला. 'निरंजनीं आम्हीं बांधियेलें घर ' तेव्हां 'निराभासीं पूर्ण जालों समरस । अखंड ऐक्यास पावलों आम्हीं. ' प्रवृत्तिनिवृत्तींचे भाग पाहून ब्रह्मींचा ब्रह्मरस प्रतीतिसुखानें घतला. द्वैताद्वैताची कल्पना निमाली.

**देशकालवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥**
**न जाला प्रपंच आहे परब्रह्म । ' अहं सोहं ' भ्रम मावळले ॥**

आतां ' वाणीं खाणीं रसीं रूपीं गंधीं ' एक परमात्माच भरून उरला. ' आम्ही आपआपणासी देखिले ' व हें देखणेपणही मावळलें. आतां ' अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख. ' आतां ' चित्त चैतन्या पडली मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टी ! ' याजसाठीं एवढा अट्टाहास केला. आम्हीं ' मरणाही आधी राहिलों मरोनि '–जन्म-मरणाची भ्रांति निरसली, त्याचें सुतक फिटलें, मी–माझें हा संकोच गेला. अवघाच देव झाला.

**क्षरला सागर गंगा–ओघीं मिळे । आपणाचि खेळे आपणासी ॥१॥**
**तुका म्हणे बीजें बीज दाखविलें । पत्रपुष्प आलें गेलें वायां॥ ४ ॥**

* * * *

**तरूवर बीजापोटीं । बीज तरुवराशेवटीं ॥ १ ॥**
**तैसें तुम्हां आह्मां जालें । एकीं एक सामावलें ॥ ध्रु० ॥**

* * * *

**लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें ? ॥ १ ॥**
**तैसा समरस जालों । तुजमाजीं हारपलों ॥ ध्रु० ॥**
**अग्निकर्पूरांच्या मेळीं । काय उरली काजळी ? ॥ २ ॥**
**तुका म्हणे होती । तुझी माझी एक ज्योती ! ॥ ३ ॥**

---

## २१ तुकोबांचें उपदेशामृत.



### १ सर्वांस सामान्य उपदेश.

सगुणसाक्षात्काराचें तेज अंगावर फांकलेलें, इंद्रियें उपशम पावलेलीं, प्रखरतर वैराग्याचीं लक्षणें देहावर उमटलेलीं, प्राप्तव्य प्राप्त झाल्यानंतरचें समाधान नेत्रांत चमकून राहिलेलें–अशी ती तुकोबारायांची श्याममूर्ति ज्या नेत्रांनीं पाहिली असेल ते नेत्र परम धन्य होत! तुकोबारायांच्या मुखांतून जी अमृताची गंगा वाहिली तिच्यांत निमज्जन करण्याचें महद्भाग्य ज्यांना लाधलें असेल ते श्रोते धन्य होत! देहू, लोहगांव, पुणें, पंढरपूर, आळंदी, येथील व आसपासच्या आणि यात्राप्रसंगीं वाटेंतल्या ज्या ज्यांना तुकोबांच्या साक्षात् मुखांतून स्रवलेली वाणी ऐकायला मिळाली असेल त्यांना कितीतरी धन्य वाटलें असेल! तुकोबानीं गुरुत्व अंगावर घेऊन उपदेश केला नाहीं.

**गुरुशिष्यपण। हें तों अधम लक्षण॥ १॥**
**भूतीं नारायण खरा। आप तैसाचि दुसरा॥ २॥**

ही त्यांची उच्च भूमिका होती म्हणून 'मेघवृष्टीनें करावा उपदेश। परी गुरूनें न करावा शिष्य' 'पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें। आपुलाल्या दैवें पिके भूमी' अशी त्यांनीं अगदीं निर्लोभ निःसंगपणाची वृत्ति ठेवली होती. वक्त्याची अंतर्मुखताच श्रोत्यावाचकांना अंतर्मुख करिते! स्वतःचें पोट भरल्यावर तुकोबांनीं जनांस बोध केला आहे. खळांस व भाविकांस, राजांस व रंकांस, शूरांस व पामरांस, पुरुषांस व स्त्रियांस, ब्राम्हणांस व अंत्यजांस सर्वांस त्यांनीं प्रसंगाप्रसंगानें बोध केला आहे. त्यांची वाणी कोठें सौम्य आहे कोठें कडक आहे, पण सर्वत्र ती भूतांच्या करुणेनें भरलेली आहे. जन देवाला विसरून काळाच्या हातीं सांप-

डत आहेत म्हणून त्यांच्या कोमल चित्ताला कळवळा येत असेः 'येतो हिताचा कळवळा । पडती हातीं म्हणोनि काळा.' त्यांचा हरिभक्तीचा उपदेश सर्वांसच सारखा आहेः—

**आइके रे जना । तुझ्या स्वहिताच्या खुणा ।**
**पंढरीचा राणा । मनामाजी स्मरावा ॥ १ ॥**
**मग कैचें रे बंधन । वाचे गातां नारायण ।**
**भवसिंधु तो जाण । येचि तीरीं सरेल ॥ २ ॥**
**ब्राह्मण क्षेत्री वैश्य शूद्र । चांडाळाही अधिकार ।**
**बाळें नारी नर । आदी करूनि वेश्याही ॥ ४ ॥**
**तुका म्हणे अनुभवें । आम्ही पाडियेले ठावें ।**
**आणिकही देवें । सुख घेती भाविकें ॥ ५ ॥**

* * * *

**हेंचि भवरोगाचें औषध । जन्म जरा तुटे व्याध ।**
**आणिक कांहीं नव्हे बाध । करील वध षड्वर्गा ॥ १ ॥**
**सांवळें रूप ल्यावें डोळा । सा-चौ-अठरांचा गोळा**
**पद्र लागों नेदी खळां । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र ॥ २ ॥**

वेदशास्त्रपुराणांचें सारसर्वस्व असें पांडुरंगाचें श्यामरूप डोळ्यांत सांठवून घ्या व मुखानें विष्णुसहस्रनामाचे पाठ चालूं द्या. स्वस्वरूपाच्या घरांतून बाहेर पडूं नका, आत्मचिंतन विसरूं नका, देहबुद्धीचा वारा अंगावर घेऊं नका; वायफळ बोलायचें सोडून द्या व अनात्म्याचा संग करूं नका. प्रपंचाचें दहीं घुसळून त्यांतील सारभूत हरि तेवढा घ्या. रडायचें असेल तर देवापाशीं रडा, त्याला अनुतापपूर्वक शरण जा, मागें झालेले दोष पुन्हां आचरूं नका. 'हरिहरि म्हणा व सदाचारानें रहा.' देव कृपेचा सागर आहे. त्याच्या नामामृताचें पान करून संसार-दुःख विसरून जा.

**न लगे सांडावा आश्रम । उपजले कुळीचे धर्म ।**
**आणिक न करावे श्रम । पुरे एक नाम विठोबाचें ॥ ४ ॥**

* * *

**जोडोनीयां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेंच करीं १**
**परउपकारीं नेणे परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणीमाई ॥ २ ॥**
**भूतदया गाईपशूंचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ३ ॥**

याप्रमाणें वागाल तर गृहस्थाश्रम हाच परमार्थाला पोंचविणारा होईल. बरें, असें वागणें कठिण आहे काय ?

**पराविया नारी माउलीसमान । मानिलियां धन काय वेंचे ? १**

संसार करितांना एकमात्र विसरूं नकाः--

**नव्हे तुझा हा परिवार । द्रव्य दारा क्षणभंगूर ॥ ३ ॥**
**अंतकाळींचा सोइरा । तुका ह्मणे विठो धरा ॥ ४ ॥**

मनोजय करा, इंद्रियांना विषयांपासून आवरा, एकांताची आवड धरा, आत्मपरीक्षणाचा अभ्यास ठेवा, दुसऱ्याच्या गुणदोषांचीं उठाठेव करूं नका, सत्संगीं नामस्मरणाचा आनंद लुटा व देव आपलासा करा असा त्यांनीं स्वानुभवपूर्वक अनेक ठिकाणीं मनोहर व ठसठशित वाणीनें जनांस बोध केला आहे. जग ब्रह्मरूप आहे. ह्मणून 'आपली आपण करा सोडवण । संसारबंधन तोडा वेगीं–' आंतला संसार बंधकर आहे.

**मन करा रे प्रसन्न । सर्वसिद्धींचें साधन ।**
**मोक्ष अथवा बंधन । सुखसमाधान इच्छा ते ॥ १ ॥**

मन प्रसन्न करणें म्हणजे त्याला बाह्य विषयांच्या ओढींपासून खेचणें व स्वस्वरुपीं रमविणें. हें मन रजोगुणी आहे, स्वभावतः चंचल आहे. त्यावर राखण पाहिजे.

**तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥**

जनसंग सोडून एकांताचा अभ्यास करा. एकांतावांचून वृत्ति निवळत नाहींत, परमार्थ मुरत नाहीं. वेदांताचें कितीही ग्रंथ वाचले, व्याख्यानें ऐकलीं, चर्चावादांत काळ घालविला तरी शब्दचावटीपलीकडे पदरांत फारसें कांहीं पडत नाहीं ! नानाविध वृत्तींनीं खळबळलेल्या लोकांच्या संगतींत नसते गुणदोष अंगीं जडतात, वाचाळता-

वाढतें; पण अनुभवाचें अंग प्राप्त होत नाहीं, निःशब्दांचा एकांत मिळत नाहीं. एकांत ही अर्धी समाधि आहे ! एकातांत चित्ताचे मलिन संस्कार पुसून जातात, भगवत्प्रेमाच्या लहरींशीं खेळतां खेळतां जीवभाव लोपून अखंड अद्वयानंदाचा अनुभव प्राप्त होतो. तुकोबांनीं यासाठींच गोराडा, भंडारा, किंवा भामनाथ या जवळच्या डोंगरांचा आश्रय केला.

**वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें । पक्षीये सुस्वरें आळवीती ॥ १ ॥**
**येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुणदोष अंगा येत ॥ २ ॥**

* * *

**खेळों मनासवें जीवाच्या संवादें । कौतुकें विनोदें निरंजनीं ॥ १ ॥**
**एकांताचें सुख जडलें जिव्हारीं । वीट परिचारीं बरा आला ॥ २ ॥**

भागवतधर्मात अहिंसेवर मोठा भर आहे. ‘ भूतमात्रीं हरीवीण । न पाहेचि दुजेपण ’ ‘ विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म ’ ‘ कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ’ हीं सूत्रें म्हणजे वैष्णवधर्माचा जीवप्राण आहेत. कायावाचामनानें कोणाही जीवाचा द्रोह न करितां त्यास सुख देणें ही **अहिंसा**. वारकऱ्यांत मांसाहार सर्वस्वी वर्ज्य आहे. ‘ धिक् तो दुर्जन नाहीं भूतदया ’ हा अभंग पहा. सर्व जीव आपल्या प्राणासारखे जो मानीत नाहीं त्या चांडाळाला काय म्हणावें असें तुकोबा स्पष्ट विचारतातः---

**तुका म्हणे सुखें कांपीतसे गळे । आपुलिया वेळे रडतसे ॥ ४ ॥**

पोटासाठीं किंवा सैदऱ्या दैवतापुढें नवस फेडण्यासाठींः—

**आणिकांच्या कापिती माना । निष्ठुरपणा पार नाहीं ॥ १ ॥**
**करिती बेटे उसनवारी । यमपुरी भोगावया ॥ २ ॥**

* * *

**जीवें जीव नेणे पापी सारिखाची । नळी दुजियाची कापूं बैसे ॥**
**आत्मा नारायण सर्वांघटीं आहे । पशूंमध्यें काय कळों नये ? ॥**
**देखत हा जीव हुंबरे वरडत । निष्ठुराचे हात वाहती कैसे ? ॥ ३ ॥**

* * *

अशा चांडाळाला आपण पुढील जन्मीं जो चांगला सूड उगवील असा एक वैरी करून ठेवीत आहोंत हें देखील कळत नाहीं !

**मांस खातां हौस करी । जोडुनि वैरी ठेविला ॥ १ ॥**
**पुढिलांसाठीं पाजवी सुरी । आपुली चोरी अंगुळी ॥ २ ॥**
**तुका ह्मणे फुटती हाडें । आपुल्या नाडें रडतील ॥ ३ ॥**

* * *

कन्या, गाय आणि हरिकथा यांचा विक्रय करून नरकाला जवळ करणारे जे पापी आहेत त्यांचा तुकोबांनीं धिक्कार केला आहे. 'गायित्री विकोनी पोट जे जाळिती ' 'कन्येचा जे नर करिती विकरा ' व 'नाम गाऊनीयां द्रव्य जे मागती ' ते अघोर नरकाला जातात व आम्हांसी संगती न लगे त्यांची ! गायित्री, कन्या व हरिनाम ह्या तीन वस्तु आपल्या धर्मानें पूज्य मानल्या असून त्यांचा विक्रय करणारांस दोष सांगितले आहेत. अन्नदान व अतिथिपूजन ह्या गोष्टीही आपल्या धर्मानें पवित्र मानल्या आहेत व तुकोबांनीं त्यांचाही ठायीं ठायीं उपदेश केला आहे. ' सर्वांभूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारून. ' द्रव्य, पात्र, वस्त्र इ० वस्तु मनुष्य पाहून ( त्यांचा दुरुपयोग होणार नाहीं अशी खात्री करून घेऊन ) मग द्याव्यात ! अन्न मात्र कोणाही क्षुधिताला द्यावें असा हा सोज्ज्वळ गृहस्थाश्रम म्हणजे तो परमार्थच आहे. सर्व सामान्य लोकांस तुकोबांनीं हा जो बोध केला आहे त्याशिवाय कांहीं विशेष प्रसंगांनीं एका धरणेकरी ब्राह्मणास, जिजाबाईच्या निमित्तानें स्त्रीवर्गास, शिवरायांस व पाईकांस म्ह० कर्तबगारी गाजवूं इच्छिणाऱ्या पुरुषांस जो बोध केला आहे त्याचाही आपण थोडा विचार करूं.

---

## २ स्त्रीवर्गास बोध.

स्त्रीवर्गाला तुकोबांचा सामान्य बोध एवढाच असे कीं त्यांनीं पतिव्रता; धर्मानें चालावें; शील संभाळावें; धर्मकार्यांत पतीला अनुकूल वागावें-

सडासंमार्जन, तुळशीची व गाईची पूजा, पाहुण्यांचें आगत्य, ब्राह्मणांचा सत्कार, कीर्तनश्रवण हे करून घर स्वच्छ व शांत ठेवावें; हरिभजनानें 'आपला गळा उगवून घ्यावा' व मुलांबाळांना हरिभजनाचें वळण लावावें. 'तुका म्हणे असल जाती। जातीसाठीं खाती माती' असा एक चरण आहे, ह्म० कुलवती स्त्री आपली शुद्रता राखण्यासाठीं मरून जाईल पण भ्रष्टपणा करणार नाहीं!

'पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण' या दृष्टांतद्वारें सतीचें मुख्य व्रत पातिव्रत्य हेंच त्यांनीं सांगितलें आहे. तुकोबांना इतर साधुसंतांप्रमाणें वर्णाश्रमधर्म सर्वस्वी मान्य असल्यामुळें घेडगुजरी विवाह (वाटेल त्या जातींच्या स्त्रीपुरुषांचे विवाह) मान्य नव्हते हें उघडच आहे. 'चारी वर्ण अठरा याती' यांच्या विवाहांचे, व भोजनादिकांचे संकर यावर त्यांनीं चांगलेच प्रहार केले आहेत हें आपण (पृ० १९६) पाहिलेंच आहे.

हिंदुसमाजांत स्त्रीचा पुरुषावर वरपगडा पहिल्यापासून नाहीं; संसारचक्राचीं स्त्रीपुरुष हीं दोन्हीं चाकें असलीं तरी निर्णायक मत देण्याचा अधिकार पुरुषाचा असतो! यावरून स्त्रीविषयीं तुकोबांची किंवा हिंदुसमाजाची अनादरबुद्धि असते हें तर्कट मात्र खरें नाहीं. परमेश्वराविषयीं 'त्वमेव माता च पिता त्वमेव' किंवा 'माता धाता पितामहः' अशी ज्या समाजाची बुद्धि आहे, 'सीताराम, राधाकृष्ण, विठोबारखुमाई' हीं ज्यांचीं भजनें आहेत, देवाला 'माउली' ह्मणून ज्यांनीं सहस्रशः आळविलें आहे, जगदंबारूपानें जिची उपासना चालू आहे, 'तुका ह्मणे मायबापें। अवघी देवाचीं स्वरूपें' ही ज्यांची पितरांविषयीं बुद्धि आहे त्या समाजाला परक्यांनीं किंवा त्यांच्या संसर्गानें विकृतदृष्टि झालेल्या स्वकीयांनींही नांवें ठेवणें अत्यंत अनुचित आहे! कामी पुरुष तारुण्यमदानें तर्र झाला ह्मणून स्त्रीलंपट किंवा बाईल्या बनतो व त्याचा मात्र आमच्या संतांनीं तिरस्कार केला आहे.

तुकोबा जिजाईस म्हणतात कीं:—

" तूं माझ्या विचाराला येऊन मिळशील तर आपल्यांतला विरोध मिटेल. देवावांचून दुसरें कांहींच नाहीं. त्याची मी कुळवाडी केली आहे, तो मला सोडीत नाहीं.

**करितां विचार अवघें एक राज्य। दुजा कोण मज घाली पाठीं ?॥**

तुला उपदेश एवढाच आहे:—

आमची भूकतान गेली, मनाचें चंचळपण जाऊन तें स्थिरावलें, ' द्रव्य जीवाहूनी आवडे या जना। आम्हांसी पाषाणाहूनि हीन ' हें तूं पाहतच आहेस; सोइरे सज्जन जन आम्हांला समान झालें आहे; देव आम्हांजवळ असून आम्ही सुखदुःखातीत आहोंत. हें सारें तुला दिसतें ना ? मग आमच्यासारखें वैराग्य घेऊन संसारांतून झडझडोन वेगळी नीघ पाहूं ! "

पण हा उपदेश तुकोबांनीं आपल्या बैठकीवरून केलेला मोठमोठयांसही पचणें कठिण आहे ! हा पचत नसेल त्या स्त्रियांनीं:—

**सडासंमार्जन तुळसीवृंदावन। अतीतपूजन ब्राह्मणाचें॥**
**वैष्णवांची दासी होईं सर्वभावें। मुखीं नाम घ्यावें विठोबाचें॥**

एवढा तुकोबांचा उपदेश मानला तरी आरंभ चांगला झाला म्हणायचा!

---

## ३ तुकोबा व शिवबा !

' धर्म रक्षावयासाठीं। करणें आटी आम्हांसी ' हा तुकोबांच्या अवताराचा हेतु व ' हिंदुधर्मरक्षणासाठीं आम्ही फकीरी घेतली आहे ' हें शिवाजी राजे यांचें ब्रीदवाक्य ! समर्थांचाही तोच हेतु. तिघेही महापुरुष एकच धर्मरक्षणाच्या स्फूर्तीनें प्रेरित झालेले. त्यांच्या भेटीगांठी १५६७ ते १५७१ ह्या चारपांच वर्षांत निःसंशय झाल्या असल्या पाहिजेत. तुकोबांना राष्ट्राच्या दुःस्थितीबद्दल खेद वाटे. लोकांची दैना धर्मभ्रष्टतेमुळें झाली आहे व धर्माची घडी नीट बसविण्यास क्षात्रधर्माचीही घडी नीट बसली पाहिजे, स्वधर्माच्या जागृतीस स्वराज्यही पाहिजे, या गोष्टी

तुकोबांच्या पूर्ण ध्यानांत आल्या होत्या व त्यांनीं 'दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें' अशा दुधारी दयेचें लक्षण केलें आहे ! 'काय करूं देवा नाहीं ऐसी शक्ती । दंडूनी पुढती लावूं वाटे' म्हणून 'तुका म्हणे देवा । काय निद्रा केली थांवा' अशी देवाची प्रार्थना त्यांनीं केली 'न घडे यावरी न धरवे धीर । पीडितां राष्ट्र देखोनि जग,' 'राजा प्रजा पीडा । क्षेत्री दुश्चितांसी ताडी' याप्रमाणें राष्ट्रोद्धाराची तुकोबांस तळमळ लागलेली होती व शिवरायाचे बालपराक्रम ऐकून आतां राष्ट्राचें ऊर्जित होणार अशी त्यांना देहप्रयाणापूर्वींच खात्री वाटून समाधान झालें, असलें पाहिजे.

शिवाजी राजे संतसमागमप्रेमी होते व साधुसंतांचे आशीर्वाद घेतल्याशिवाय तुला स्वराज्यस्थापनेच्या कामीं निश्चित यश मिळणार नाहीं अशी त्यांस मातोश्री जिजाईची शिकवण होती. पुण्याचें अनगडशाहा, चिंचवडचे चिंतामणिदेव, मौनीबुवा, बाबा याकूब, तुकोबाराय, नाथांचे प्रशिष्य स्वानंदस्वामी, यांची शिवरायांवर पूर्ण कृपादृष्टि होती. समर्थांचा त्यांनीं अनुग्रह घेतला पण तत्पूर्वी व नंतर पुण्याहून रात्रीं घोडेस्वार होऊन देहू व लोहगांव येथें ते सवडींत सवड काढून तुकोबांचीं कीर्तनें ऐकण्यास जात असत ! तुकोबांच्या कीर्तनांचा शिवरायांस छंद लागला ! तुकोबांचें तीव्रतम वैराग्य त्या निधड्या छातीच्या जातिवंतवीरास पटलें. तुकोबांच्या जिवंत वाणीचा त्या रणधीरावर परिणाम झाला. शिवाजीच्या मनांत वैराग्याचें वारें भरलें व ते चालू राजकारणाकडे दुर्लक्ष करून तुकोबांच्या संगतीला देहूसच आठ दिवस राहिले ! शिवाजी साधु होऊन क्षात्रकर्म विसरतो कीं काय अशी जिजाईस भीति वाटली. त्या देहूस गेल्या व तुकोबांच्या चरणीं लागल्या. तुकोबांनीं त्या दिवशींचे कीर्तनांत पुढील अभंग निरुपणास घेतलाः—

**स्वामिकाज गुरुभक्ती । पितृवचन सेवा पती ॥ १ ॥**
**होचि विष्णुची महापूजा । अनुभव नाहीं दुजा ॥ ध्रु० ॥**

**सत्य बोलें मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥ २ ॥**
**निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥ ३ ॥**

याच्या निरूपणप्रसंगानें तुकोबांनीं वर्णाश्रमधर्म, क्षात्रधर्म, राजधर्म हें सांगितले व शिवबांस आपला क्षात्रधर्म जागवण्यास सांगून पुण्यास लावून दिलें ! 'मैत्र केले महाबळी । कामा न येती अंतकाळीं ॥ कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥' हा अभंग एका प्रसंगीं शिवबांस उद्देशूनच सांगितला असावा. एकदां तुकोबांच्या कीर्तनास शिवबा बसले असतांना हजार पठाणांनीं पाळत ठेवून मंदिरास वेढा दिला असतांना तुकोबांच्या पुण्यप्रतापानें वा शिवबांच्या सावधानतेनें एक हजार शिवबाचा वेष घेतलेले पुरुष बाहेर पडले व अनर्थ टळला.

तुकोबांच्या कीर्तनश्रवणानें प्रसन्न होऊन शिवरायानें एकदां अबदागिर, घोडा, कारकून पाठवून बरोबर जड जवाहीर पाठविलें. तें तुकोबारायानें प्रखरवैराग्यबळानें परत केलें व १४ अभंगाचें एक पत्र पाठविलें.

(१) **दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥ १ ॥**
**आतां येथें पंढरिराया । मज गोविसी कासया ॥** ध्रु० ॥
**मान दंभ चेष्टा । हे तों सूकराची विष्ठा ॥ २ ॥**
**तुका म्हणे देवा । माझे सोडवणें धांवा ॥ ३ ॥**

(२) **मुंगी आणि राव । आह्मां सारिखाचि जीव ॥ १ ॥**
**गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥ ध्रु० ॥**
**सोनें आणि माती । आह्मां समान हें चित्तीं ॥ २ ॥**
**तुका म्हणे आलें । घरां वैकुंठ सगळें ॥ ३ ॥**

आपला वैराग्याचा दृढनिश्चय व विठ्ठलभक्तीनें प्राप्त झालेली समाधानाची बैठक यांची शिवबांस ओळख करून दिल्यावर व्यवहाराच्या भूमिकेवर उतरून तुकोबांनीं शिवरायांचें गौरव केलें व त्यांच्या 'प्रधान अष्टकास' नमन करून त्यास दोन उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या:—

तुम्ही पूर्वजन्मीच सारा परमार्थ करून मोकळें झालां आहांत, आह्मी या जन्मीं साधन करीत आहोंत.

**युक्तीचा बाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेसी ॥**
**शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्रपति सूत्र विश्वाचें की ॥**
**व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनी मोकळा जालासी तूं ॥**
**तुका म्हणे तुम्ही श्रीमंत मानाचे । पूर्वील दैवाचे हरिभक्त ॥**
**आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥**
**जेणें योगें तुम्हां घडूं पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ २ ॥**
**निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ती चित्तीं आणूं नये ॥३॥**
**परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनीयां ॥ ४ ॥**
**सांगणें नलगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें॥५॥**
**आत्मारामीं मन ठेवूनियां राहे । रामदासीं पाहे आपणेया ॥ ८ ॥**

बुद्धिमत्ता, उद्योगपरता, उच्च ध्येय, धाडस, पराक्रम, लोककल्याण-कारित्व हे जातिवंत वीरांचे सहजगुण होत. संत, धर्मसंस्थापक व धर्म-संरक्षक, महातत्त्वज्ञानी, महाकवि, अव्वलदर्जाचे ग्रंथकार, व शास्त्रज्ञ हे आपापल्यापरी आपापल्या व्यावसायांतले वीरच होत! वीरावांचून पराक्रम व विजय नाहीं. तुकोबांनीं पाईक ह्म० शिपाई गडी, सेवक, शूर वीर कसा असावा याची शिकवण देण्यासाठीं 'पाईकीचे अभंग' सांगि-तले. तुकोबांचे अनुयायी 'विठ्ठलाचे गाढवीर'–आणि शिवरायांचें 'रण-धीर मावळे वीर' ह्म० धर्मवीर व रणवीर, ह्या उभयतांना या अभंगां-तून एकदमच उपदेश केला आहे तो गाथ्यांतच पहावा.

या अभंगांतून तेजस्वी वाणीनें तुकोबांनीं देवभक्तांस व देशभक्तांस, वारकऱ्यांस व धारकऱ्यांस उपदेश केला आहे. पाईक ( शिपाई गडी, वीर ) जीवाचा उदार असतो, तो तनु तृणवत् व सोनें पाषाणासमान मानतो, पाइकीवांचून प्रजांच्या दुःखक्लेशांचें निवारण होत नाहीं, 'देह मी नव्हे' असा एका क्षणाचा निर्धार करून पाईक अविनाशी सुखाचा धनी होतो, पाईक स्वामीपुढें सत्याचें भांडण भांडायला कचरत नाहीं, तो अंतर्बाह्य शूर असतो, ह्म० मनाशीं व जनांशीं धैर्यानें झगडून

दोघांवर विजयी होतो, स्वामीवर निश्चल भाव ठेवल्यामुळें तो मोलाला चढतो, व पाईकच पाइकाला ओळखतो. अशा निर्भय झालेल्या पाइकांच्या कांहीं खुणा आहेत !

" नये मरों लंडीपणें । काय यापुढें तें जिणें ॥ तुका म्हणे शूर । व्हावें धुरेसीच धूर– " बरोबरच्यांशीं सामना करावा. वीरश्रीचें जिणेंच खरें ! ' गेली वीरसरी । मग त्यासी रांड मारी ! ' तुकोबांच्या वाणींत वीररस नाचतच आहे. कारण ते ' विठ्ठलाचे गाढे वीर ' आहेत. ' आम्ही रामाचे राऊत । वीर झुंजार अद्भुत ' आहेत.

---

## ४ धरणेकरी ब्राह्मणास उपदेश.

एक ब्राह्मण–ज्ञानेश्वरमहाराजांनीं साक्षात् प्रकट होऊन आपल्यावर कृपा करावी अशा निग्रहानें आळंदीस धरणें धरून बसला होता. त्याला ज्ञानोबारायांचा दृष्टांत झाला कीं ' तूं देहूस जा, तेथें तुकाराम माझाच आहे; तो न् मी दोन नाहींत, तो उपदेश करील तो माझाच प्रसाद आहे असें जाण. " ब्राह्मण देहूस आला व तुकोबारायांस त्यानें आपला स्वप्नदृष्टांत सांगितला. त्याप्रसंगीं तुकोबारायांनीं ३१ अभंग केले. हे अभंग फार उत्कृष्ट आहेत. त्यांत त्यांनीं पांडुरंगाचा धांवा केला आहे व त्या ब्राह्मणास सुंदर उपदेश करून ज्ञानेश्वरांची स्तुति केली आहे व आपण काय केल्यानें ह्या स्थितीस आलों याचाही त्यांत ध्वनि आहे. तुकोबांना लौकिकाची–कीर्तीची चाड नव्हती हें ' काय ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविले धरणें ' असें म्हणून पुढील अभंग लिहिला आहेः—

**नव्हे दास खरा । परी जाला हा डांगोरा ॥ १ ॥**
**यास काये करूं आतां । तूं हे सकळ जाणता ॥ ध्रु० ॥**
**नाहीं पुण्य गाठीं । जे हें वेचूं कोणासाठीं ॥ २ ॥**
**तुका म्हणे कां उपाधि । वाढविली कृपानिधी ॥ ३ ॥**

ज्ञानोबारायांनीं हा मोठेपणा मला का दिला हें समजत नाहीं. ज्ञानेश्वरांच्या आज्ञेप्रमाणें त्यांनीं त्या ब्राह्मणास बोध केला. ते सांगतातः—

१

**( १ ) नको कांहीं पडों ग्रंथाचिये भरीं । शीघ्रव्रत करीं हेंचि आतां ॥**
**देवाचिये चाडें आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥**
**तुका म्हणे घालीं नामासाठीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥**

२

**( २ ) देवापाशीं नाहीं मोक्षाचें गाठोडें । आणूनि निराळें द्यावें हातीं**
**इंद्रियांचा जय साधुनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥**
**उपास पारणीं अक्षरांची आटी (या) सत्कर्मा शेवटीं असे फळ**
**तुका ह्मणे फळ आहे मूळापाशीं । शरण देवासीं जाय वेगीं ॥**

देवापाशीं कांहीं मोक्षाचें गांठोडें नाहीं कीं तें तो तें एकदम तुझ्या हातीं देईल ! इंद्रियांचा जय साधून मन निर्विषय करावें. देवासाठींच देवाला निष्काम भजावें व त्याचें नाम अखंड गावें म्हणजे तो दयाळु देव तुला तारील. याविरहित इतर साधनांच्या खटाटोपांत पडूं नकोस.

‘ संकोचोनी काय जालासी लहान । घेईं अपोशन ब्रह्मांडाचें. ’ देहबुद्धीच्या ‘ घरकुलानें होता पडिला अंधार ’ तो जाऊन ब्रह्मांड आत्मभावानें भरून उरलास कीं सर्वत्र स्वप्रकाशरूप होशील. आत्मभावाच्या विकासानें विश्व भरून रहा.

**( ३ ) गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥ १ ॥**
**मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ ध्रु० ॥**
**आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ २ ॥**
**तुका म्हणे आळी । जेवी नुरेचि वेगळी ॥ ३ ॥**

**( ४ ) ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ॥ १ ॥**
**ह्मणउनि अवघें सारा । पांडुरंग दृढ धरा ॥ ध्रु० ॥**
**समखूण ज्याचे पाये । उभा व्यापक विटे ठाये ॥ २ ॥**
**तुका म्हणे नभा-। परता अणूचाही गाभा ॥ ३ ॥**

" मनाला गोविंदाचा छंद लागला कीं मन आनंदरूप होतें, प्रेमानें नेत्र पाझरतात व भ्रमरीचें ध्यान करितां करितां आळी भ्रमरी होऊन जशी आकाशांत उडून जाते त्याप्रमाणें देहपण जाऊन जीवच ब्रह्मरूप होतो ! तन्मयतेनें चित्त चैतन्य होतें व ज्याचें ध्यान करावें तदाकार मन होतें म्हणून व्यापकाचें ध्यान करावें. समचरण विटेवर उभे आहेत ते जीवशिवांचीं एकात्मता दर्शवितात ! अणूचा गाभा म्ह० सूक्ष्मतम असें ब्रह्म. नभापरता म्ह० आकाशाहूनही व्यापक आहे. "

---

## ५ तुकोबांचा संप्रदाय

तुकोबाचे टिपऱ्यांच्या खेळावर सात अभंग आहेत त्यांपैकीं एकांत 'खेळ खेळोनीयां निराळे राहिले' अशा ह्म० प्रपंचाच्या डावांत न सांपडलेल्या 'खेळियांचें (महात्म्यांचें) गौरव केलें आहे; त्यांत नामदेव, ज्ञानेश्वर (व त्यांचें मंडळ), कबीर व एकनाथ या चौघांच्या तरी मार्गाला लाग असा लोकांना उपदेश केला आहे, अर्थात् हे चौघे तुकोबांचे आवडते व गुरूतुल्य संत होत.

ह्या चौघांशिवाय 'आणिक खेळिये होऊनियां गेले । वर्णावया वाचा मज नाहीं रे ।' पण 'या चाघांचि तरि धरि सोई रे' म्ह० ह्या चौघांच्या तरी मार्गाला लागा म्हणून त्यांनीं लोकांना उपदेश केला आहे. या 'खेळियाचे' ध्रुवपदः—

**एके घाई खेळतां न पडसी डाई । दुचाळ्यानें ठकासिल भाई रे ॥**
**त्रिगुणांचे फेरीं तुं थोर कष्टी होसी । या चौघांचि तरि धरि सोई रे ।**

ऐक्यभावानें तूं खेळ खेळूं लागलास तर या प्रपंचाच्या डावांत सांपडणार नाहींस, पण द्वैतभाव धरशील (दुचाळा ह्म० कात्री, चिमटा) तर फसशील ! त्रिगुणांचे कष्ट चुकवायचे असतील तर या चार खेळियांचा आश्रय धर, यांच्या मार्गानें जा.

ज्या चौघांचा आश्रय धरण्यास तुकोबानीं लोकांस सांगितलें आहे

त्या चौघांचा त्यांनीं आश्रय केला होता हें उघड आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ या परंपरेंतले तुकोबा होत, त्यांचे ग्रंथ व अभंग त्यांनीं आवडीनें व आदरानें वाचले होते, व त्यांचीं वचनें पाठांत ठेविलीं होतीं. यांच्या ग्रंथांचा त्यांनीं कसा कसोशीनें अभ्यास केला होता हें मी आपल्या श्रीतुकारामचरित्रांत 'तुकोबांचें ग्रंथाध्ययन' नामक साहव्या प्रकरणांत अगदीं सविस्तर व खुलासेवार दाखविलें आहे. ज्ञानेश्वरी व एकनाथी भागवत, नामदेवांचें व एकनाथांचें अभंग, यांची स्वच्छ प्रतीकें तुकोबांच्या अभंगांत सहस्रशः सांपडतात. 'मज बहु गोत संत आणि महंत' त्यांचेंही मी स्मरण करीत असतों असें तुकोबाराया सांगतात. ह्या तुकोबांच्या गोतात भागवतधर्मीय महंत उद्धव, अक्रूर, व्यास, अंबऋषी, नारद, गरुड, पुंडलीक यांचीं नांवें आधीं आलीं असून पुढें ज्ञानेश्वर मंडळ, 'जिवलग' नामदेव, नागो, जनमित्र, नरहरि सोनार, रोहिदास, 'सोयरिया' कबीर, परिसा भागवत, सूरदास, सावता, 'जीवीचें जीवन' एकनाथ, कान्हया पाठक, मिराबाई, व 'चोखामेळा संत जीवाचे सोईरे' यांचीं नांवें आलीं आहेत व 'न पडे विसर यांचा घडी.' माझ्या जीवाचे सोइरे संत आणीकही आहेत. या 'सकळां चरणीं जीव माझा' पंढरीचे समस्त वारकरी माझे बंधु आहेत, सर्व संप्रदायांतलें भरतखंडांतले सारेच भक्त माझे बांधव आहेत.

---

## ६ तुकोबांचीं सुभाषितें

विवेकी स्वानुभवी सत्पुरुषांचीं वचनें सिद्धांतरूप असतात व ह्मणून तीं जनांच्या जिव्हारीं जाऊन भिनतात. वेदोपनिषदांचीं वचनें अशीं आहेत. ज्ञानेश्वरनाथतुकोबांचीं वचनें अशींच सिद्धांतमय आहेत म्हणून समाजांत त्यांना मान आहे. मुरलेपणाशिवाय वचनांना सिद्धांताचें स्वरूप प्राप्त होत नाही. जगांत संशयात्मेच फार! 'असेल वा नसेल, होईल वा न होईल, करावें वा न करावें' अशा विचारांच्या भोंवऱ्यांत बहुतांचीं

मनें गिरक्या खात असतात! संशयात्म्यांना 'निश्चयाचें बळ' ठाऊक नसतें. संत निश्चितार्थ असतात, त्यांना लोकांना आपला निश्चय सांगायचा असतो, त्यांचीं अनुभविक निश्चयाचीं वचनें ठसठासित सिद्धांतरूप असतात, त्यांत लेचेपेचेपणा नसतो. 'अनुभवें आलें अंगा। तें या जना देतसों.' देव आहेच व तो असा आहे, तो आम्ही अनुभवला आहे, असें त्यांचें छातीठोक बोलणें असतें! त्यांचे जबाब रोखठोक असतात. प्रचीतीवीण जें ज्ञान तें सारें भ्रमात्मक होय. तुकोबांच्या अभंगवाणींत निश्चयात्मक ज्ञान भरलें आहे. त्यांच्या वचनांला सुभाषितत्व प्राप्त होऊन तीं लोकप्रिय झालीं आहेत. तीं म्हणींसारखीं ज्याच्या त्याच्या तोंडीं झालीं आहेत. तीं विविध प्रकारचीं आहेत. ह्या तुकोबांच्या सूत्ररूप वचनांनीं मराठी भाषेला अपूर्व शोभा आली आहे, मराठी भाषा श्रीमंत झाली आहे. हजारो लोकांना तीं मार्गदर्शक झालीं आहेत. सिद्धांत पूर्वींचेच आहेत, त्यांत नवीन असें कांहीं नाहीं, पण तुकोबांच्या चटकदार आटपशीर व ओजस्वी वाणींतून ते आल्यानें सर्वलोकप्रिय झाले आहेत. तुकोबांची वाणी अस्सल मराठी आहे व विचार शुद्ध परमार्थाचे आहेत. वाणी आणि विचार किंवा वाक् व अर्थ हे दोन्ही जेथें परमरमणीय असतात तेथेंच वाङ्मयाचें विमलस्वरूप दिसतें. गीता भागवत, नामदेव, ज्ञानेश्वर, एकनाथ यांनीं प्रसृत केलेले विचारच तुकोबांच्या वाणींत येऊन त्यांना चौगुणी तेज चढलें आहे. सुभाषितें विविध प्रकारचीं व विविध विषयांवरचीं आहेत. तीं सर्वच एकत्र करूं म्हटल्यास ग्रंथ होईल! हा उद्योग कोणी तरी करण्यासारखा आहे. मराठी कविश्रेष्ठांच्या ग्रंथांतून अशीं सुंदर सुभाषितें विषयवारीनें निवडून ग्रंथरूपानें प्रसिद्ध केल्यास 'मराठी सुभाषितरत्नभांडागार' निर्माण होईल! माझ्या अनेक संकल्पितांपैकीं हा एक संकल्प आहे; माझ्या किंवा कोणाच्यातरी हातून हा सिद्धीस जावो! मराठी भाषेचें ऐश्वर्य येणेंकरून प्रकट होईल.

## १ परमार्थविषयक सुभाषितें.

( १ ) पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ॥
खादल्याची गोडी । देखिल्यासी नाहीं ! ॥
मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी ॥
आगी लागो तया सुखा । जेणें हरी नये मुखा ॥
ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ।
ह्मणउनि अवघे सारा । पांडुरंग दृढधरा ॥
भक्तीच्या उत्कर्षें । नाहीं मुक्तीचें तें पिसें ॥
कथनी पठणीं करूनि काय । वाचुनि रहणी वाया जाय ॥
आपुलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥
कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि नाम ॥
पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥
( ११ ) तरीच जन्मा यावें । दास विठ्ठलाचे व्हावें ।
नाहीं तरी काय थोडीं । श्वान सूकरें बापुडीं ॥
देव ते संत संत ते देव । निमित्त त्या प्रतिमा ॥
निष्ठुर तो दिसे निराकारपणें । कोवळा सगुणें प्रतिपाळी ॥
उपजों मरों हे आमुची मिरासी । हे तूं निवारिसी तरी थोर ! ॥
वेडेंवांकुडें गाईन । परि मी तुझा म्हणवीन ॥
भक्तिभावेंविण । तुका म्हणे अवघा शीण ॥
नाइकावे कानीं । तयाचे ते बोल । भक्तिविण फोल ज्ञान सांगे ॥
ब्रह्मज्ञान दारीं येते काकुळती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ॥
नलगे मुक्ति धनसंपदा । संतसंग देईं सदा ॥
( २० ) तुझ्या प्रेमसुखापुढें । काय वैकुंठ बापुडें ॥
प्रेम नये देतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणे ॥
विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ ।
कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥
होचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥
दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ॥
कंठीं धरिला कृष्णमणी । अवघा जनीं प्रकाश ॥

देवभक्तपण । तुका म्हणे नाहीं भिन्न ॥
वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥
तुझें आहे तुजपाशीं परि तूं जागा चुकलासी ।
चिवडूनियां नासी तुझ्या घरच्यांनीं केली ॥
विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥
तुका ह्मणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥
भाव तसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥
जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥
प्रेमसूत्रदोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥
साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ॥
संतांचिये गावीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश ।
संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥
जगाच्या कल्याणा संताच्या विभूती । देह कष्टविती उपकारें ॥
भूतांची दया हें भांडवल संता । आपुलिया ममता नाहीं देहीं
पवित्र तो देह वाणी पुण्यवंत ॥ जो वदे अच्युत सर्वकाळ ॥
आम्ही पापी तूं पावन । हें तों पूर्वापार जाण ॥
नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें त्याणें ॥
( ४० ) दुजें खंडें तरी । उरला तो अवघा हरी ।
आपणाबाहेरी । नलगे ठाव धुंडावा ॥

## २ नीतिबोधविषयक सुभाषितें.

( १ ) पुण्य तें जाणारे भाईनो ! पर-उपकाराचे ॥
परपीडा परनिंदा रे ! खरें पाप तयाचें ॥
सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी धूर्तपण कामा नये ॥
केला पाहिजे विचार । मन मित्र दावेदार ।
मधुरा उत्तरीं । रावा खेळे उरावरी ॥
परस्त्रीसी अंध निंदेसी जो मुका ।
तोचि संत देखा तुका म्हणे ॥
परद्रव्य परनारी । यांचा धरी विटाळ ॥
कासया गुणदोष वानूं आणिकांचे । मज काय त्यांचे उणे असे? ॥

आणिकांचे कानी । गुणदोष मना नाणीं ॥
तुका म्हणे तोची संत । सोसी जगाचे आघात ॥
पोटापुरतें काम । परी अगत्य तो राम ॥
सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥
उभयलोकीं उत्तम कीर्ती । देव चित्तीं राहिलिया ॥
भुकें नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥
अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें आंधार ॥
मान-अपमान-गोवें । अवघे गुंडूनी ठेवावे ॥
भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥
सर्वभूतीं द्यावें अन्न । द्रव्यपात्र विचारून ॥
तुका ह्मणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ॥
( २० ) शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥
नम्र झाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥
मुंगी होउनि साखर खावी । निजवस्तूची भेट घ्यावी ॥
भूमी अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ॥
बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवूनियां तृप्त कोण झाला? ॥
कोणी वंदा कोणी निंदा । आमुचा स्वहिताचा धंदा ॥
बोले तसा चाले । त्याची वंदावीं पाउलें ।
आली ऊर्मी साहे । तुका म्हणे थोडें आहे ॥
थोडे आहे थोडें आहे । चित्त साहे ( साह्य ) जालिया ॥
नसावे ओशाळ । मग मानिती सकळ ॥
चित्तीं नाही आस । त्याचा पांडुरंग दास ॥
नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ? ॥
मोकळें मन रसाळवाणीं । याचि गुणीं संपन्न ॥
लहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥
ज्याचें अंगीं मोठेपण । तया यातना कठिण ॥
नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाही हेवा ॥
भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥
खरें बोले ( चाले ) तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥

चित्त शुद्ध जरी शत्रु मित्र होती। व्याघ्र हे न खाती सर्प तया
वेदबाह्य लंड बोले तो पाषांड। त्याचें काळें तोंड जनांमध्यें॥
देह तोचि देव भोजन ते भक्ति। मरण ते मुक्ति पाखंड्याची॥
कांहीं नित्यनेमाविण। अन्न खाय-तोंचि श्वान॥
बैसोनी निवांत शुद्ध करीं चित्त। तया सुखा अंतपार नाहीं॥
कळवळ्याची जाती। करी लाभाविण प्रीति॥
तुका म्हणे मना पाहिजे अंकुश। नित्य नवा दिस जागृतीचा॥
सोंगें छंदें कांहीं। देव जोडे ऐसा नाहीं॥
वंदी कोण्ही मारी। निंदी कोणी पूजा करी।
मज हेंही नाहीं तेंही नाहीं। वेगळा दोहींपासोनी॥

---

## ३ प्रपंचविषयक सुभाषितें.

(१) धनवंतालागीं। सर्व मान्यता हे जगीं॥
सुख पाहतां जवापाडें। दुःख पर्वताएवढें॥
इंद्रियांचीं दीनें। केलों आह्मीं नारायणें॥
फळकट तो संसार। येथें सार भगवंत॥
देह हें देवाचें धन कुबेराचें। येथें मनुष्याचें काय आहे ?॥
अन्नधनमान। हे तों प्रारब्धा-आधीन॥
तुका म्हणे वाणी। सुखें वेंचा नारायणीं॥
विधीनें सेवन। विषयत्यागातें समाधान॥
एक शेर अन्ना चाड। येर वाउगी बडबड॥
ऑट हात तुझा जागा। येर शिणसी वाउगा॥ २॥
दाता नारायण। स्वयें भोगिता आपण॥

---

## ४ सामान्य व्यवहारविषयक सुभाषितें.

(१) निश्चयाचें बळ। तुका म्हणे तोंचि फळ॥
मोलें घातलें रडाबा। नाहीं असूं आणि माया॥
सासुसाठीं रडे सून। भाव अंतरींचा भिन्न॥
नाहीं घाटावें लागत। एका शितें कळे भात॥

मुंगीचिया घरीं कोण जाय मूळ । देखोनियां गूळ धांव घाली॥
नाकेंविण मोतीं । उभ्या बाजारा फजीती ॥
अवघें पोटासाठीं ढोंग । तेथें कैंचा पांडुरंग ! ॥
एके हातें टाळी । कोठें वाजतें निराळीं ? ॥
गांठ पडली ठकाठका । त्याचें वर्म देखे तुका ॥
घोडें काय थोडें वागवितें ओझें । भावेंविण तैसें पाठांतर ॥
असाध्य तें साध्य करितां सायास।कारण अभ्यास तुका ह्मणे॥
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें । येरें गबाळाचें काम नाहीं ॥
ढेकणाचे संगें हिरा जो भंगला । कुसंगें नाडला साधु तैसा ॥
बहुतांचीं बहुत मतें । अवघीं रितें पोकळ ! ॥
गेली वीरसरी । मग त्यासी रांड मारी! ॥
आंधळ्यासी जन सारेंचि आंधळें ।
आपणासी डोळे दृष्टी नाहीं ॥
तुका म्हणे लाभकाळ । तेथें नसावे शीतळ ।
मग तैसी वेळ । कोठें जाते सांपडों ! ॥
आधारावांचुनी । काय सांगसी काहणी ? ॥
ऋणवैरहत्या । हे तों न सुटे न देतां ॥
तुका म्हणे हरिच्या दासा । शुभकाळ दाही दिशा ॥
तुका म्हणे भले । ऐसें नष्टांनीं कळलें ॥
हातीच्या कांकणा कायसा आरसा ? ।
चित्त चित्ता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥
भाविका कंटक करिताती पीडा । हा तंव रोकडा अनुभव ॥
वंदिले वंदावे निंदिले निंदावे । येक गेले जावे त्याचि वाटा ॥
(२५) चाकरीवांचुन । खाणें अनुचित वेतन ॥

# २२ तुका वाणी !



## १ सहा तुकाराम !

तुकाराम नांवाचे ५।७ कवि महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत व बहुतेकांनीं थोडी फार अभंगरचना केली आहे ! तुका वाणी, तुका विप्र, तुका सुंदर, तुका वर्दे, तुका नागनाथ, तुका ब्रह्मानंद इ० ! तुका विप्र याचा मठ सातारा जिल्ह्यांत बोरवन गांवीं असून त्यांचेही १० हजारावर अभंग आहेत. आपणांस 'तुका वाणी देहूकर' म्हणजेच सुविख्यात तुकाराम महाराज यांचाच येथें विचार कर्तव्य आहे. देहूस तुकोबारायांनीं कांहींवर्षें वाणसवद्याचें दुकान चालविलें होते व थोडीफार शेतवाडी व सावकारीही ते करीत. पूर्ववयीं वाण्याचा धंदा करीत असतांना व्यापाराची, शेतीची, सावकाराची, देवघेवीची, दरबारची भाषा त्यांच्या तोंडीं बसली होती तीच पुढें देवाशीं सलगीची प्रार्थना करितांना किंवा प्रेमकलह करितांना किंवा लोकांस उपदेश करितांना त्यांच्या अभंगांत कशी उतरली आहे हें पाहणें मोठें मौजेचें आहे ! ज्यांत ही व्यापाराची किंवा शेती-सावकारीची भाषा आली आहे असे शंभरावर अभंग त्यांच्या गाथ्यांत सांपडतात. हे एकत्र करून त्यांजकडे पाहणें बोधप्रद तर आहेच पण कौतुकाचेंही आहे ! येथें त्यांपैकीं कांहीं अभंगांकडे आपण पाहूं. लोकव्यवहारांत रूढ झालेले फारशी अरबी शब्द यांत सहजच पुष्कळ आले आहेत.



## २ धनको नाम तुकावाणी । ऋणको नाम विठ्ठल धनी !

( १ ) '**रोजकीर्दी जमा करूनी सकळ**'— रोजकीर्दींत काळाची जमा धरून मी '**खतावणी बरोबर**' केली आहे ! आतां ' झाडया-

पाडयाचें लिगाड ' राहिलें नाहीं व माझी ' सेवाही हुजुरातीला रुजू ' होऊन ह्म० धन्याला मान्य होऊन त्यानें गोड करून घेतली आहे ! ' चोरांसाठीं रदबदल आटाहास ' करावा लागतो पण ' बहुतांचें ' दास्य करणाऱ्या ' चोराचें ' जिणें धिक् ' होय ! मला आतां ' सालझाडयांत गुंफावें ' लागणार नाहीं—साल अखेर हिशेब पाहतात त्यांत गुंतून पडावें लागणार नाहीं, ह्मणून ' सावधान तुका निर्भर मानसीं-' तुका निश्चित झाला आहे ! या अनुभवानें तुकोबा लोकांनाही बोध करितात कीं:—

( २ ) ' **आपुल्या आपण उगवा लिगाड** '— आपणच आपल्या गुंत्यांतून आपणाला सोडवून घ्या कां कीं ' तुका म्हणे बाकी झडलिया-वरी । न पडे व्यवहारीं संचिताचें '-बाकी पूज्य करा म्हणजे त्रिविध कर्माच्या कचाटयांतून सुटाल. देव झाला ह्मणून काय झालें ? ' हिशेबें आलें तें सकळांसी प्रमाण ' झालेंच पाहिजे !

( ३ ) ' **रिणाच्या परिहारा जालों वोळगणा** '— देवाच्या ऋणां-तून मुक्त होण्यासाठीं मी त्याची सेवाचाकरी पत्करिली आहे. ' व्याजें कासाविसी बहुत केलें '-पण चाकरी करून मी त्याच्या कर्जांतून सुटलों आहे. सावकाराची भरपाई करण्यास भरपूर द्रव्य जवळ नसलें म्हणजे चाकरी करूनच रिणमुक्त व्हावें लागतें !

( ४ ) ' **प्राण समर्पिला आम्हीं** '— माझें सेवारिण तुम्ही घेत-लेंत त्याचा भार न मानतां माझा अंगीकार करून तें रिण फेडा !

( ५ ) ' **लटिकाचि केला** '— देवा तूं, ' अवघा बुडालासी रिणें। बहुतांचें देणें घेणें '-लफंग्या मनुष्य ढोंगपसारा दाखवितो व शेवटीं कर्जांत बुडतो ! तुझी तीच गत झाली आहे! शहाणे लोक त्यासी व्यव-हार करीत नाहींत म्हणूनच ' तुका म्हणे हात । आम्हीं आवरिली मात ! '

( ६ ) ' **लाज ना विचार । बाजारी तूं भांडखोर** '— सगळ्यांना बुडवून ' लंगोटी फेडून नागवा ' झालेला जो ठक त्याच्याशीं भल्यानें

व्यवहार करूं नये ! ' ऐसें ज्यानें व्हावें '-त्याच्याच सारखा जो नागवा ह्म० निर्लज्ज होईल तोच त्याच्याशीं संबंध ठेवील !

( ७ ) ' **करितां येरझारा** '— देव कुळ आणि तुकोबा हिशेब मागायला आलेले सावकार-हा थाट पहा—

**करितां येरझारा । उभा न राहसी वेव्हारा ॥ १ ॥**
**हे तों झोंडाईचें चाळे । काय पोटीं तें न कळे ॥ २ ॥**
**आरोगूनी मूग । बैसलासी जैसा बग ॥ ३ ॥**
**तुका म्हणे किती । बुडविलीं आळविती ॥ ४ ॥**

मूग गिळून बगळ्यासारखा गप्प कां बसला आहेस ? आजवर तूं पुष्कळांना बुडविलेंस, पण असली ठकबाजी माझ्यापुढें चालणार नाहीं !

( ८ ) ' **याचि हाका तुझे द्वारीं** '— देव बडा ठक आहे. रिणकरी ( भक्त ) सदा याचे द्वारीं हाका मारीत असतात. हा कोणासीं वायदे ( खंड, करार ) करितो, कोणाला दंड करितो, तक्रारी घेऊन रिणकरी दाराशीं आले कीं हा त्यांना भोजनाच्या ( विषयभोगाच्या ) नादीं गुंतवून आपलें तोंड लपवितो ! कर्जबाजारी अशीच चुकवाचुकव करीत असतात !

**( ९ ) ' भक्ति ऋण घेतलें माझें । चरण गाहाण आहेत तुझें ॥ १ ॥**
**प्रेमव्याज देईं हरी । माझा हिशेब लवकर करीं ॥ ध्रु० ॥**
**माझें मी न सोडीं धन । नित्य करितों कीर्तन ॥ २ ॥**
**तुझें नामीं आहे खत । सुखें करी पंचाईत ॥ ३ ॥**
**तुका म्हणे गरुडध्वजा । यासी साक्ष श्रीगुरुराजा ॥ ४ ॥**

**( १० ) दिवाळखोर नारायण । त्यावरी बहुतांचे ऋण ॥ १ ॥**
**उठतांचि उभे द्वारीं । अवघे दे दे म्हणती हरी ॥ ध्रु० ॥**
**माजघरीं दडे हरी । माया तडकी आड करी ॥ २ ॥**
**युगायुगींचें हें ऋण । म्हणउनि धरियेलें मौन्य ॥ ३ ॥**
**रोखापत्र पाहीं । वेदशास्त्र देती ग्वाही ॥ ४ ॥**
**धनकोनाम तुका वाणी । रिणकोनाम विठ्ठल धणी ॥ ५ ॥**

( ११ ) '**आतां होइन धरणेकरी**'— देवाला ऋणको करून तुकोबा आपण धरणेकरी झाले! 'आतां होइन धरणेकरी। भीतरींच कोंडीन' आतां देवा, तुला घरांत ( चित्तांत ) कोंडून टाकीन, घराबाहेर पाऊल टाकूं देणार नाहीं! आतां 'जीवें साटी' केली आहे—मी जीवावर उदार झालों आहें. 'तों कां गोष्टी रुचे ते?' आतां तुमचे वायदे ऐकायला मला सवड नाहीं! आतां बाकी चुकती होईतों आमचें जेवणखाण तुमच्याच घरीं व तुमच्याच पंक्तीचें! 'तुका म्हणे खाऊं जेऊं। नेदूं होऊं वेगळा!'

( १२ ) '**उपजों मरों हे आमुची मिरासी**।'— हे तूं निवारिसी तरी थोरः— जन्ममरणापासून आम्हांला सोडविशील तरच तुला थोर म्हणूं! 'उभा राहे करीं खरा खोटा वाद'—संतांकडे लवाद नेऊं. 'आम्ही निंद्य जालों लंडीपणें' पण तुझी फजीती झाली तर मात्र कठिण! 'उभयतां आहे करणें समान। तुम्हां आहे ऐसा मीही देवा' तुझी माझी बरोबरी मला सिद्ध करून दाखवायची आहे. तुला जन्म-मरण नाहीं तर मलाही नाहीं! तूं अमर तर मीही अमरच आहे. तुला जन्म असेल तर मलाही आहे, नसेल तर नाहीं! तूं साच लटिका तसा मीही आहे.

( १३ ) '**चुकलिया आह्मां करितसां दंड**'— आम्ही चुकलों कीं आम्हांला शिक्षा करायचा तुह्मी आपला अधिकार बजावतां, मग 'हाकासी कां खंड पांडुरंगा?'—मग आम्हीं हाक मारताच समोर हजर कां होत नाहीं! ही चाळवाचाळव आम्ही चालूं देणार नाहीं. आपुलें 'वचन जतन' करा—'तुका म्हणे ताळा घातला आडाखीं। ठावें होय सेखीं आडवसी'—सावकार मला ( कुळाला ) शेवटीं आडवणार हें ठाऊकच होतें!

( १४ ) '**पतित मिरासी**':— माझी पतितपणाची मिराशी आहे

पण तूं आपला पतितपावनाचा ठसा दाखव पाहूं ! ' तुका म्हणे वाव झालें । रोख पाहिजे दाविलें.' हो ! व्यवहारांत रोखठोक पाहिजे.

( १५ ) ' **मजसवें नको चेष्टा** । नव्हे साळी कांहीं कोष्टा. ' मी कांहीं साळीकोष्टयांसारखा अडाणी अक्षरशत्रु नाहीं, माझ्याशीं या गमज्या चालायच्या नाहींत. मी हाडाचा वाणी आहे, ' हीण व्यापार ' कोणता, भलाईचा कोणता, लाभ कशांत आहे, कशांत नाहीं हें सर्व मी जाणतों.

( १६ ) ' **न करीं तुमची सेवा** ':-- परमार्थांत काय व व्यवहारांत काय उधारी कामाची नाहीं ! उधारींत सारा पातेरा ( फजीती ) होते. ' ठेविलें उधारा । वरी काय तो पातेरा ॥ तुका म्हणे बरा । रोकडाचि निवाडा ॥ '

( १७ ) ' **भयाची तों आह्मां चित्तीं** ':-- सारा दिवस आम्हीं जिव्हारूपी माप हरिनामाला लावून नामाचा आनंद भोगूं, आम्हांला भय नाहीं.

**तुका म्हणे माप भरूं । दिस सारूं कवतुकें** ॥ ४ ॥

( १८ ) ' **आतां बरें झालें** ' माझे माथाचें निघाले ॥ १ ॥ ' डोक्यावरचा कर्जाचा बोजा उतरला; हिशेब पुरा झाला म्हणजे मनुष्यास समाधान वाटतें. ' जाला झाडावाडा । तुका म्हणे गेली पीडा ॥ ४ ॥ '

---

## ३ पंढरीच्या पेठेंत तुकोबांचें दुकान !

( १९ ) **पंढरीस दुःख न मिळे ओखदा** ':—

**पंढरीस दुःख न मिळे ओखदा । प्रेमसुख सदा सर्वकाळ** ॥ १ ॥
**पुंडलीकें हाट भरियेली पेठ । अवघें वैकुंठ आणियेलें** ॥ ध्रु० ॥
**उदमासी तुटी नाहीं कोणा हानी । घेऊनियां धणी लाभ घेती** ॥ २ ॥
**पुरलें देशासी भरलें सिगेसी । अवघी पंचक्रोशी दुमदुमिता** ॥ ३ ॥
**तुका म्हणे संतां लागलीसे धणी । बैसली राहोनी पंढरीस** ॥ ४ ॥

पंढरीच्या पेठेंत उदमांसी कमतरता नाहीं, कोणीही व्यापारांत बुडत

नाहीं, सर्वजण लाभ घेऊन तृप्त होतात, येथें हरिनामाचा माल इतका अमूप आला आहे कीं तो सर्व देशाला पुरून उरतो ! पंढरीची पंच-क्रोशी तर आनंदानें दुमदुमून राहिली आहे.

( २० ) '**द्वारकेचें केणें आलें याचि ठायां**':— द्वारकेहून श्री-कृष्णरूपी माल ह्या पंढरीच्या बाजारास आला आहे ! ' गोविलें विसारें माप खरें ' म्ह० हा माल भक्तांनीं विसार देऊन गुंतवून ठेवला आहे. ' वैष्णव मापारी नाहीं झाली सळे । पुढेंही न कळे पार त्याचा- ' साधुसंत हे मापारी ( माप घेणारे ) आहेत व या मालाला सळ ( न्यूनता ) आली नाहीं व पुढेंही कधीं येणार नाहीं. ' तुका म्हणे मज मिळाली मजूरी । विश्वास या घरीं संतांचिया- ' मी मजूरीवर ह्म० सेवेवरच खूष आहे. संतांच्या वशिल्यानें हा सेवेचा अधिकार मला मिळाला आहे.

( २१ ) '**आम्हां सुकाळ सुखाचा**':-- पंढरीचा हाट भरला आहे, वैष्णव ' रामनामें वाचा सादावीत ' आहेत. ' वाहे बंदर द्वारका । खेप आली पुंडलिका । उभेंचि विकिलें एका । सनकादिकां सांपडलें । ' ह्म० द्वारकाबंदराहून सारखा माल येत असून त्याची एक खेप पुंडलिका-करितां पंढरीस आली आहे. ती त्यानें उक्तीच विकत घेतली ! असाच लाभ पूर्वी सनकादिकांना झाला होता. हें ' माप आपुलेनि हातें घ्यावें,' ' चित्त पैसे ( विशाळ ) करून घ्यावें, हें घेऊं नका असें येथें ' कोणी नाहीं निवारितें.' माल अगणित भरला आहे. ' नाहीं वांटितां सरलें । आहे तैसेंचि भरलें । तुका म्हणे गेले । वायांवीण न घेतां ॥ ६ ॥ ' ज्यांनीं हा माल घेतला नाहीं असें लक्षावधि लोक जन्मून व्यर्थ गेले आहेत !

( २२ ) '**आषाढी निकट**':--पंढरीचा मोठा बाजार उभ्या वर्षांत दोनदा भरतोः—

**आषाढी निकट । आणि कार्तिकीचा हाट ॥ १ ॥**

**पुरे दोन्हीच बाजार । न लगे आणीक व्यापार ॥ २ ॥**

येथें याच मालाची देवघेव होते. ‘ तेंचि द्यावें तेंचि घ्यावें, ’ पण ह्या व्यापारांत ‘ कैवल्याच्या राशी ’ पदरांत पडतात !

( २४ ) ‘ **तिन्ही लोक रिणें** ’:-- संतापैकीं प्रत्येकानें ‘ पंढरी चोहोटां घातलें दुकान । ’ व मांडियेलें वान आवडीचें ! ’ संत हे अनंत जन्मींचे सांटेकरी आहेत. येथें भक्तिसुखाचीच देवघेव होते. येथें मुक्तीकडे कोणी ढुंकून पाहत नाहीं !

**‘ मुक्ति कोणी येथें हातीं ने घे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ।।३।।**

( २५ ) ‘ **आलें भरा केणें** ’:-- हा भक्तिसुखाचा माल लुटा, विठोरायाची ‘ पेठ इनाम पंढरी ’ आहे. हिचीच चोहोंकडे भराभराट झाली आहे. ‘ वाहती मारग । अवघें मोहोरलें जग ॥ ३ ॥ ’

( २६ ) ‘ **सांठविला वान । पैस घातला दुकान** ’:— ह्या पंढरीच्या बाजारांत आम्हीही एक प्रशस्त दुकान थाटलें आहे, व सर्व प्रकारचे वाण त्यांत भरून ठेवले आहेत ! ‘ जें ज्या पाहिजे ज्या काळीं । आहे सिद्धचि जवळीं ’ भक्ति, ज्ञान, वैराग्य इ० उंची उंची सणंगें आमच्या दुकानांत मिळतात. आपापल्या खिशांतला दाम पाहून मागणी करा ! ‘ तुका बैसला दुकानीं । दावी मोलाऐसी वाणी ’

( २७ ) ‘ **निवडोनियां वाण** ’:-- आमच्या दुकानांत निरनिराळे वाण वेगळे वेगळे ठेवले आहेत. ज्याला ‘ जसे डोहाळे ’ ( अधिकार ) तसे त्यानें घ्यावे. ( भक्ति, ज्ञान, कर्म, अद्वैत सर्व प्रकारचे अभंग आहेत ज्यानें त्यानें आपापल्या योग्यतेप्रमाणें घ्यावे ) ‘ कौतुकानें पाहणारे निराळेच राहतात ’- पण ज्यांचा विभाग असेल ( भाग्योदयांत असेल ) त्यालाच खरा भोग घडतो !

( २८ ) ‘ **आम्हां हें कौतुक** ’:-- आमच्या दुकानांत खरा माल भरला आहे, खोटा माल पाहिजे त्यानें दुसरीं ( दांभिकांचीं ) दुकानें पहावींत ! ,तुका म्हणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्यापरी ॥ ४ ॥

( २९ ) **' भक्तिभाव आम्ही बांधिलासे गांठीं '**:- आणि ह्या एवढयाच भांडवलावरः—

**सुखाचिये पेठे घातला दुकान । मांडियेले वान रामनाम ॥ २ ॥**

पूर्वी जे भाग्यवंत झाले त्यांनीं याचाच सांठा केला होता. ' सादावितों हाटीं घ्या रे कोणी ' ह्म० भरबाजारांत उभा राहून ' हा वान घ्या ' म्हणून मी गर्जत आहें. हा व्यापार नेकीचा आहे. ' खोटें कुडें येथें नाहीं घातपात. ' या वानाला फक्त ' चित्तशुद्ध ' हेंच मोल पाहिजे.

( ३० ) **' तडामोडी करा । परी उत्तम तें भरा ॥ १ ॥ '** पदरची मोडतोड करा ( सर्व पुण्यसंग्रह खर्चीं घाला ) पण हा उत्तम हरिभक्तीचा माल घरांत भरा. ' जेणें खंडे एके खेपे । जाण तेथें लाभें वोपे ॥ २ ॥–' ह्मणजे एका खेपेंतच ( या नरजन्मांतच ) सर्व यातायाती ( अनंत जन्मींचे फेरे ) चुकतील. उत्तम माल संग्रहीं असला म्हणजे जाल तेथें नफा देऊनच विकतां येतो ( वोपे = वोपणें, विकणें ). ' मागें पुढें रीण । तुका म्हणे फिटे हीण ॥ ४ ॥ ' मागचें ऋग ( संचित ) व पुढचें ऋण ( क्रियमाण ) फिटून हीनता ( दारिद्र्य ) दूर होतें.

( ३१ ) **' सादाविले एका '**:–– आम्हीं एकवार आरोळी ठोकून सर्वांस जाहीर केलें कीं आमच्या दुकानीं भेदाभेद नाहीं. ' मोकळींच पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ॥ ३ ॥ '– परमार्थाचीं पोतीं तोंड न बांधतां आम्हीं मोकळींच ठेवलीं आहेत, विचारायची–परवानगी मागायची–गुंती भानगड कांहीं नाहीं ! ' तुका म्हणे बरा । हात ढसाळ वेव्हारा ॥ ४ ॥ ' व्यवहारांत हात चांगला सढळ ठेवला आहे !

( ३२ ) **' बरवे दुकानीं बैसावें । श्रवणमननें असावें**:––' आमच्या दुकानांत बसून श्रवणमनन करा. ग्राहिक पाहून ' सार असाराची पोतीं ' रितीं करा. ' सत्य तराजू हातीं धरा. '

**सत्य जाला तुका वाणी । चुकवुनि चौऱ्यायशीच्या खाणी ॥ ४ ॥**

———

## ४. भांडवल धन्याचें–भांडाराची किल्ली माझे हातीं !

( ३३ ) ‘ **तरी हांव केली अमूप व्यापारें** ’:-- एकसरें (एकदम) धनवंत ’ व्हावें म्हणून मी ‘ अमूप ( अफाट ) व्यापाराची हांव केली ’ आणि मोठें ‘ शूरत्व ’ ( धाडस ) करून हरि आपला केला यामुळें झालें काय कीं असें छातीठोक काम करून धनवंत झालेले जे पूर्वीचे हरिभक्त त्यांचीं ‘ वर्मे ’ ( रहस्यें, गुह्यें, लक्षणें ) मला कळून आलीं ! पण हें असें साहस ‘ जनावेगळें अभिनव ’ आहे, त्यासाठीं मला ‘ जीव बळी द्यावा लागला ’ आहे ! जीवावर उदार झाल्यामुळेंच मी विल्हेला लागलों व माझी संपत्ति एवढी अफाट वाढली कीं जो माझा पूर्वी ‘ स्वामी ’ होता तो आतां माझा ‘ ऋणी ’ ह्म० ऋणको झाला आहे व मी ‘ धनको ’ झालों आहें !

( ३४ ) ‘ **फोडिलें भांडार** ’ --जिव्हारूपी ‘ माप ’ घेऊन मीं देवाचें भांडार फोडिलें ‘ आहे. आतां हरिनामाची ‘ वरो ’ ह्म० विपुलता केली आहे. ‘ देशांत सुकाळ । झाला हारपला काळ ॥ ३ ॥ ’ हरिनामाचा सुकाळ झाल्यामुळें दुष्काळ संपला आहे. ‘ घ्यावें धणीवरी । तुका म्हणे लहानथोरीं. ’ पीक अमूप आल्यामुळें लहानथोरांनीं–गरीबश्रीमंतांनीं–सर्वांनीं आतां पोटभर जेवावें !

( ३५ ) ‘ **झालों बळिवंत** ’:--देवाच्या पायीं ‘ मिठी देऊन लूट केली ’ म्हणून आम्हीही देवासारखेच बाळिवंत–श्रीमंत–झालों आहोंत. ‘ हाता चढे धन ’ अशी युक्ति योजिली. धनवंतासी सख्य केलें म्हणजे तें करणाराही त्याच युक्तीनें तसाच धनवंत होतो !

( ३६ ) ‘ **खरें भांडवल सांपडलें गांठी** ’:--खरें विठ्ठलनामाचें भांडवल आम्हांला सांपडल्यामुळें आमच्या ‘ उदमास तूटी ’ येत नाहीं. विठ्ठल हा माल ( केणें ) आम्हांला स्वस्तांत पडला आहे व तो आम्हीं आपल्या वाणींत सांठवला आहे ! त्याच्या देवघेवींत भावानुसार सर्वांना लाभ होतो.

**खरें भांडवल सांपडलें गांठीं । जेणें नये तुटी उद्मासी ॥ १ ॥**
**सवंगाचें केणें सांपडलें घरीं । भरूनी वैखरी सांठविलें ॥ २ ॥**

( ३७ ) ‘ **जायाचें अंगुलें** ’:—“ तुका म्हणे स्वता नाहीं भांडवल । भिकेचें तें फोल बीज नव्हे ”—भीक मागून आणलेलें पोंचट धान्य पेरणीच्या उपयोगाचें नसतें, त्याला घरचेंच भांडवल लागत असतें !

**भांडाराची किली माझे हातीं आहे । पाहिजे तो पाहे वान येथें॥३॥**
**तुका म्हणे आह्मां विश्वासाच्या बळें । ठेविलें मोकळे देवें येथें॥४॥**

मालकाचा सेवकावर विश्वास असल्यामुळें त्यानें आम्हांला मोकळे ठेवलें आहे व आमच्या हातीं भांडाराची किल्ली दिली आहे !

( ३८ ) ‘ **भाग्यवंता हेंचि काम** ’:— वाचेनें नामाचें माप टाकीत जा. आम्ही तृप्तच आहोंत, तुम्हीही तृप्त व्हा.

**आनंदाच्या पुष्टी अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥ २ ॥**
**पिकलें तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥ ३ ॥**

( ३९ ) ‘ **सकाळिकांच्या पायां** ’:— माझा माल कसाला उतरून लोकांत मान्यता पावला आहे:—

**फोडिलें भांडार धान्याचा हा माल । मी तंव हमाल भारवाही ॥३॥**
**तुका म्हणे चाली झाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ॥ ४॥**

---

## २३ विनोदउपरोधउपहासपर अभंग !

नाथांच्या लीलाविनोदपर काव्यांचा परामर्ष मागें (पृ० ३०४ ते ३१० ) घेतला असून त्यांच्या भारुडांत विनोदाच्या छटा ठिकठिकाणीं दाखविल्या आहेत. आतां तुकोबांच्याही कवितेंत हास्य, विनोद, उपरोध, उपहास किती भरपूर भरला आहे हें आपण पाहूं.

### १ शेंदाड शिपाई !

एका रड्या आणि रांड्या शिपायाचें मोठें विनोदी चित्र पुढील अभंगांत काढलें आहे !

**' ढालतरवारें गुंतले हे कर ' । म्हणे तो जुंझार ' कैसा झुंजों । '**
**पेटी पडदळे सिले टोप ओझें । हें तों जालें दुजें मरणमूळ ! ॥ २ ॥**
**बैसाविलें मला येणें अश्वावरी । धावूं पळूं तरी कैसा आतां ॥ ३ ॥**
**असोनी उपाय म्हणे हे अपाय ! । म्हणे ' हाय हाय ! काय करूं ' ॥४॥**
**तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥ ५ ॥**

तो म्हणतोः–' ढालतरवारीनें माझे दोन हात गुंतले आहेत आतां मी लढूं तरी कसा? पेटी, पडदळे (तरवार अडकवायचा पट्टा), सिले (हत्यारें), टोप (शिरस्त्राण) हें ओझें माझ्या अंगावर धण्यानें चढवलें नसतें तर माझें शौर्य मी दाखविलें असतें ! मला त्यानें घोड्यावर डांबून टाकलें आहे आतां मी धांवावें पळावें तरी कसें ? हाय हाय ! ' मूर्खाला उपायच अपाय वाटतात ! संतचरणसेवा हा ब्रह्मप्राप्तीचा उपायच मूढाला अपाय वाटतो ! संतांची टवाळी करणेंच त्याला आवडतें !

### २ पुराणिकाची दाढी !

**देखोनि पुराणिकाची दाढी । रडे कुंदे नाक ओढी ॥ १ ॥**
**प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥ ध्रु० ॥**

एक वृद्ध पुराणिक पुराण सांगत असे. त्याची दाढी तो बोलण्याच्या रंगांत आला कीं हलत असे. त्याच्या श्रोत्यांत एक धनगर होता. पुराणिकाची दाढी हलली कीं तो धनगर फुंदफुंदून रडे, हुंदके देई व नाक चोळी! श्रोत्यांना वाटे कीं हा खराच प्रेमळ आहे! पण त्याच्या अंतरांतली भावना अगदीं वेगळी होती.

**आवरितां नावरे । खुर आळवी नेवरे ॥ २ ॥**
**बोलों नये मुखावांटा म्हणे हाता ब्यांचा तोटा ॥ ३ ॥**

त्या धनगराला रडणें अगदीं अनावर होई. त्याच्या रडण्याचें कारण वेगळेंच होतें! त्याचा आवडता बोकड मेला होता. त्याचे खुर व नख्या (नेवरा = नखी) आठवून आठवून तो रडे. त्याला बोलवेना पण तो मनांत म्हणे कीं 'माझ्या कळपांत हजारो शेरडया आहेत पण ब्याचा (बेण्याचा) असा माझा बोकड तो एकटाच होता.'

**दोन्ही शिंगें चारी पाय । खुणा दावी म्हणे 'होय' ॥ ४ ॥**
**मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥ ५ ॥**

पुराणिकबुवा दोन बोटें दाखवून एक पुरुष व एक प्रकृति अशीं दोनच मूलतत्वें आहेत असें सांगत तेव्हां बोकडाचीं दोनच शिंगें आहेत हें मनांत आणून तो 'होय हो होय' असें म्हणे! पिंडाचे चार देह व ब्रह्मांडाचेही चारच देह आहेत असें सांगतांना पुराणिकांनीं चार बोटें केलीं कीं आपल्या बोकडाचे चारच खूर आहेत असें आठवून तो रडून म्हणे 'होय हो होय! अगदीं खरें!' पुराणिक कसें अगदीं मनांतलें सांगतात असें धनगराला वाटे! वस्तुतः पुराणिकाची दाढी पाहून त्या धनगराला आपल्या बोकडाची आठवण होऊन तो रडत होता!

**होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥ ६ ॥**
**तुका म्हणे कुडें । कळों येतें तें रोकडें ॥ ७ ॥**

शेवटीं त्यानें पुराणिकाला आपल्या पोटांतली खरी गोष्ट सांगितली. चित्तांतली खोटी गोष्ट उघडकीला येतेच!

## ३ अतिराग–भीक माग !

**तेलीनीसी रुसला वेडा । रागें कोरडें खातो भिडा ॥ १ ॥**
**आपुलें हित आपण पाहीं । संकोच तो न धरीं कांहीं ॥ ध्रु० ॥**
**नाडिले लोकां टाकिला गोहो । बोडिलें डोकें सांडिला मोहो २**
**शेजारणीच्या गेली रागें । कुतऱ्यांनीं घर भरलें मागें ॥ ३ ॥**
**पिसारागें भाजिलें घर । नागविलें तें नेणे फार ॥ ४ ॥**
**तुका म्हणे वांच्या रागें । फेडिलें सावलें देखिलें जगें ॥ ५ ॥**

एक मनुष्य वेडेपणानें तेलिणीवर रुसला व तिच्यावरील रागानें संताप पावून तेल न आणतांच कोरडें अन्न खात बसला ! एका आचरट बाईनें लोकांना अपशकून करून नाडावे म्हणून आपल्या नवऱ्याला ( गोहो = वनरा ) टाकलें व केशांचा मोह सोडून आपलें शिरावरील केस बोडून घेतलें ! एक मूर्ख स्त्री शेजारणीशीं भांडून आपलें घर उघडें टाकून गेली व पश्चात् कुत्र्यांनीं तिचें घर भरलें ! एका खुळ्यानें घरांत पिसा फार झाल्या म्हणून आपलें घरच जाळून टाकलें व यांत आपण आपलें केवढें नुकसान करून घेत आहोंत हें मनांत आणलें नाहीं ! एका गलिच्छ स्त्रीच्या लुगडयांत उवा फार झाल्या म्हणून उवांच्या रागावर ( वांच्या रागें ) तिनें आपलें लुगडें ( सावलें ) फेडून टाकलें व लोकांनीं तिला नागवें पाहिलें !

तात्पर्य ( दुसऱ्या चरणांत )–भलत्यांच्या रागावर शाहण्यांनीं आपलें अनहित करून घेऊं नये !

---

## ४ आवा चालली पंढरपुरा—वेशीपासून आली घरा !

एक बाई पंढरीस जायचें म्हणून तोंडानें नेहमीं म्हणत असे. एकदां ती अशीच जायला निघाली. ‘ परिसें गे सूनबाई । नको वेंचूं दूध दहीं ’ असें तिनें घरांतून बाहेर पडतांना सुनेस बजावलें. दोन पावलें चालून मागें वळून पुन्हां म्हणालीः—

**ऐके गोष्टी सादर बाळे । करीं जतन फुटकें पाळें ॥ २ ॥**
**माझे हातिचा कलवडू । मजवांचुनि नको फोडूं ॥ ३ ॥**

कलवड ह्म० गोवऱ्यांचा ढीग रचून त्यावर लिंपण घालून ठेवतात तो. फुटकें पाळें संभाळून ठेव, मी परत येईपर्यंत कलवड ( तें लिंपण ) फोडूं नकोस. आणखी ऐक ! शेवयांचें लिंपण काढूं नकोस.

**बळकट क्षिरींचें लिंपण । नको फोडूं मजवांचून ॥ ४ ॥**
**उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ॥ ५ ॥**
**भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥ ६ ॥**
**भक्षीं परिमित आहारू । नको फारशी वरी (वऱ्या)सारूं ॥ ७ ॥**

सुनेला सासुबाई कोठें मनापासून पाहिजे होती ?

**सून म्हणे बहुत निकें । तुम्हिं यात्रेसि जावें सुखें ॥ ८ ॥**
**सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ॥ ९ ॥**

हें ऐकून सासू चमकली !

**सूनमुखीचें वचन कानीं । ऐकून सासू विवंची मनीं ॥ १० ॥**
**सवतीचे चाले खोटें । म्यां जावेसें इला वाटे ॥ ११ ॥**
**आतां कासया यात्रे जाऊं । काय जाऊनि तेथें पाहूं ॥ १२ ॥**
**मुलें लेंकरें घरदार । माझें येथेंचि पंढरपूर ॥ १३ ॥**
**तुका म्हणे ऐसे जन । गोविंयेले मायकरून ॥ १४ ॥**

---

## ५ वाघ आणि कोल्हा यांची संगत.

**वाघें उपदेशिला कोल्हा । ' सुखें खाऊं द्यावें मला ॥ १ ॥**
**अंतीं मरसी तें न चुके । मजहि मारितोसी भुकें ! ' ॥ २ ॥**
**येरू म्हणे ' भला भला ! । निवाड तुझ्या मुखें जाला ॥ ३ ॥**
**देह तंव जाणार । घडेल हा पर-उपकार ! ॥ ४ ॥**
**येरू म्हणे मनीं । ऐसें जावें समजोनी ! ॥ ५ ॥**
**गांठ पडली ठकाठका । त्याचें वर्म बोले तुका ॥ ६ ॥**

वाघ कोल्ह्याला म्हणतोः ' मी भुकेनें मरतों आहे, मला खाऊं दिलेस तर तुला उपकार घडेल. हें पहा देह नाशवंत आहे ! ' हा लबाडीचा वेदांत ऐकून धूर्त कोल्हा उत्तर करितोः ' तुझा वेदांत मला मान्य आहे. देह नाशवंत आहे व परोपकारांत त्याचा व्यय करावा हें मला मान्य आहे. पण मी तुलाच म्हणतो कीं तूं मला वाचूं दिलेस तर तुला परोपकाराचें पुण्य लागेल. देह अशाश्वत आहे हें जाणून मरणाला तयार हो !'

**गांठ पडली ठकाठका । त्याचें वर्म देखे तुका ॥**

सावकार आणि कूळ किंवा भाडवलवाले आणि मजूर, जुलमी राजे आणि दुर्बळ प्रजा, बलिष्ठ आणि कनिष्ठ, क्रूर नवरा आणि सालस बायको—यांच्या कलहांत ही वाघकोल्ह्यांची नीति उभयपक्षीं नेहमींच प्रतिपादिली जाते. बलिष्ठ वाघ आणि धूर्त कोल्हा यांचा हा संवाद मनुष्यामनुष्यांतही नेहमीं चाललेलाच आहे !

---

## ६ खुशालचंदी बायको !

**सुखें वोळंब दावी गोहा । माझें दुःख नेणा पहा ॥ १ ॥**
**आवडीचा मारिला वेडा । होय होय म्हणे भिडा ॥ ध्रु० ॥**

एका नेभळ्या नवऱ्याची बायको आपल्या नवऱ्याला ( गोहा ) लाडिकपणानें सोंग ( वोळंब = ढोंग, सोंग, लाड ) करून बोलते. ' तुमचं किनई माझ्याकडे अगदींच लक्ष नाहीं, माझें दुःख तुम्ही कांहीं जाणत नाहीं ! ' तो भिडस्त व कामानें मारलेला बाइल्या नवरा म्हणतोः— " खरंच ग खरंच ! माझी चूक आहे, मी अपराधी आहे ! ' उत्तेजन येऊन ती म्हणतेः—

**निपट मज न चले अन्न । पायली गहूं सांजा तीन ॥ २ ॥**
**गेले वारीं आणालि साखर । चार दिवस गेली साडेदहा शेर ३**
**अखंड मज पोटाची व्यथा । दूधभात साखर पथ्या ॥ ४ ॥**
**दों पाहरा मज लहरी येती । शुद्ध नाहीं पडे सुपती ॥ ५ ॥**

मला अन्न अगदीं जात नाहीं. तीन वेळ मिळून मी सारा पायलीचा सांजा खाते ! साडे दहा शेर साखर चार दिवस पुरवते. मला पोटाची व्यथा आहे म्हणून दुधभात साखर हें पथ्य पाळीत मी कशी तरी जगलें आहे ! दुपारीं मला लहरी येतात म्हणून मी गादीवर ( सुपती ) लोळत पडते.

**आंथरुणावर घाली फुलें । न साहती जवळी मुलें ॥ ६ ॥**
**अंगीं चंदन लावते भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥ ७ ॥**

झोप येत नाहीं म्हणून गादीवर फुलें पसरून मी त्यावर झोंपते. मला मुलाची कटकट अगदीं सोसत नाहीं. सदा कपाळशूळ उठतो म्हणून साऱ्या अंगाला चंदन लावते.

**हाड गळोनि आलें मास । माझें दुःख नेणवे कसें ॥ ८ ॥**
**तुका म्हणे जिता गाढव केला । मेलियावरी नरका नेला ॥९॥**

ही नाथांच्या ' भोळीची ' च बहिण दिसतें ( ४६२ पहा ) !

---

## ७ घर फोडणारी बायको व कामांध नवरा.

**भ्रतारासी बोले गुजगोष्टी । मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥**
**अखंड तुमचे धंद्यावरी मन । माझें तों हेळण करिती सर्व ॥ २ ॥**

पोटचेपें काम दिसतांच तिनें सासू, दुष्ट नंदली, जावा दीर याविषयींचीं गाऱ्हाणीं नवऱ्याला सांगितलीं. ' ठाकते ठमकते जीव धरुनि मुठी ' पण तुम्ही कांहीं अजून लाज धरीत नाहीं ! ' वेगळे निघतां संसार करीन । नाहीं तर प्राण देते आतां ! ' तो ' कामाचा अंकित ' पुरुष एकदम वेगळा निघायला तयार झाला. ' माझीं मायबापें बंधुही बहिण । तुजें करिती शीण त्यागीन मी ! ' ' तुझ्या अंगसंगें आम्हांसी विश्रांती ! ' उजाडूं तर दे !

**वेगळे निघतां घडीन दोरे चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥**
**ताईत सांखळी गळाची दूलडी । बाजूबंद जोडी हातसर ॥**

**वेणीचे ते नग सर्वही करीन । नको करूं शीण मनीं कांहीं ॥**
**तुका म्हणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ॥**

नवऱ्याला आईबापांसून वेगळे काढणाऱ्या बायका तुमच्या आमच्या पाहण्यांत कांहीं थोड्या थिडक्या नाहींत ! दोन अभंगांत तुकोबांनीं वरील प्रकारचें यथार्थ चित्र काढलें आहे. सासुरवासणींचा उगाच छळ करणाऱ्या कैदाशिणी सास्वा व कजाग नणदाही कांहीं कमी नाहींत ! पुरुष मायाळु पण खंबीर मनाचा असला कीं दोन्ही बाजू पाहून तडजोड करूं शकतो व घराण्याचा एकोपा बिघडूं देत नाहीं ! ' तुकोबांनीं अन्य प्रसंगानें म्हटलेंच आहेः ' एके हातें टाळी । कोठें वाजते निराळी ? '

---

## ८ बाइल्या नवरा.

बाइल्या नवरा, जारिणी स्त्री व गुर्वाज्ञाभंग करणारे कुपुत्र यांनाही तुकोबांनीं तुच्छ केलें आहे. ज्याची बाईल ' आपलीच करवी सेवा । पूजवी देवासारिखें ' अशी वरचढ असेल व नवऱ्याला ' हातसोका कुतरा ' करीत असेल व हाही ' गाढव पशु ' बनून कामांध होऊन तिच्या भोंवतीं नाचत असेल व तिच्या छंदानें जिवलगांना दूर करीत असेल तर तो आपल्या आयुष्याचा व्यर्थ नाश करून घेत आहे !

---

## ९ किरकोळ.

**( १६ ) संसाराचे धांवे वेठी । आवडी पोटीं केवढी ! ॥१॥**
**हागों जातां दगड सांची । अंतरींही संकल्प ॥ २ ॥**
**लाज तव्हढी नारायणीं । वांकडी वाणी पोरापें ॥ ३ ॥**
**तुका म्हणे बेशरमा । भ्रमावरी पडिभारू ॥ ४ ॥**

( १७ ) ' अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ' — असें असेल तर परमार्थाचीं जीं जीं साधनें करिशील तीं तीं व्यर्थ होत !

**उपवास...काय सर्प खातो अन्न ? ।**
**ध्यान...काय ध्यान बकाचें ? ॥ १ ॥**
**एकांत...काय उंदिर नाहीं धांवी ? ।**
**भस्मचर्चन...राख लावी गाढव ? ॥ २ ॥**
**स्नानादि...काय म्हणे सुसर जळीं ?**
**काय न काउळीं न्हाती ? ॥ ३ ॥**

येथें उपवासादि साधनांची निंदा नाहीं-खोट्या बुद्धीची निंदा आहे! बुद्धि शुद्धि असेल तर हीं साधनें तारकच आहेत.

**(१८) महाराशी शिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥**

येथें अस्पृश्यतेचा तिरस्कार नाहीं-कोपाचा तिरस्कार आहे! महाराचा स्पर्श झाला तरी जो क्रोधवश होणार नाहीं तो ब्राह्मण.

**(१९) कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान ॥ १ ॥**

येथें ज्ञानाची निंदा नाहीं-अहंकाराची आहे. गोरावर्ण-ज्ञान. कोडफुटणें = अहंकार.

**(२०) परद्रव्य परनारी । अभिलाषूनि नाक धरी॥**
**जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥ २ ॥**
**सोवळ्याची स्फीती । क्रोधें विटाळला चित्तीं ॥ ३ ॥**
**तुका म्हणे सोंग । दावी बाहेरील रंग ॥ ४ ॥**

येथें नाक धरण्याचा म्ह० प्राणायामाचा तिरस्कार केला नाहीं, परद्रव्य परदारा यांच्या अभिलाषाचा तिरस्कार आहे. हीं पापें ज्याच्या चित्तांत नाहींत अशा शुद्धचित्ताचा प्राणायाम इष्टच आहे. सोवळ्याचा तिरस्कार नाहीं, अंतरीच्या क्रोधाचा तिरस्कार आहे, अंतरीं कामक्रोध नसतांना सोवळें इष्टच आहे. चित्त शुद्ध नसतांना किंवा त्याची तळमळ न करितां केवळ बाह्यरंग नटविणें हें निंद्य आहे.

( २१ ) 'अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड'-वैष्णव चांभार धन्य

त्याची माता ॥ येथें ब्राह्मणाची निंदा अगर चांभाराची स्तुति अभिप्रेत नाहीं. भक्तीचा गौरव व अभक्तीची निंदा अभिप्रेत आहे.

हे ‘ बाह्य वेषधाऱ्यांच्या ’ निंदेचे सर्व अभंग असेच निर्विकारमनानें लावले पाहिजेत. तुकाराम महाराज पूर्ण सनातनी धर्मिष्ठ होते हें निर्वि-वाद आहे.

---

## १० देवाशीं प्रेमकलह

देवदर्शनासाठीं चित्त तळमळत असतांना तुकोबांनीं देवावर कधीं रागवावें, कधीं प्रेमाची याचना करावी, कधीं अद्‌भुत युक्तिवाद किंवा विलक्षण कोटिक्रम करावा, कधीं त्याला निष्ठुर म्हणावें व कधीं ‘ तुका ह्मणे भोळा । स्वामी माझा हो कोंवळा । ’ असें त्याचें भक्तवात्सल्य चिंतून प्रेमांत विरून जावें; कधीं ‘ पांडुरंगे पहा खादलीसे रडी । परी नामशेंडी धरिली आम्ही ’ असें म्हणत देवावर आपला विजय झाला असें भावावें; कधीं आपलें पातित्य आटवून लज्जेनें मुख खालीं घालावें; कधीं देवाला संतांच्या पंचायतींत नेऊन त्याला फजितखोर, दिवाळखोर ठरवायचा डौल घालावा व कधीं ‘ केली कोणासाठीं संसाराची होळी ’ असें म्हणून दीन होऊन जावें; ‘ कधीं प्रसंगीं देईन आजी शिव्या ’ म्हणून देवावर सडकून पुष्पांजळी वहावी व कधीं ‘ तू माउलीहूनि मयाळ । चंद्राहूनि शीतळ कल्लोळ प्रेमाचा ’ म्हणून त्याच्या दयालुत्वाचें चिंतन करीत विरघळून जावें; कधीं आपण पतित आहोंत म्हणावें कधीं देवाशीं बरोबरी करावी, कधीं देवाला निर्गुण म्हणावें-कधीं सगुण म्हणावें, कधीं द्वैतकल्पना करावी कधीं अद्वैताचा भाव प्रगट करावा, याप्रमाणें प्रेमाचे अनंत प्रकार करून तुकोबांनीं देवाचें प्रेमसुख भोगावें हे प्रेमाचे नानाविध रंग त्यांच्या अभंगांत प्रगट झाले आहेत ! भक्ति-सुख एकच पण त्याच्या अनंत परवडी करून त्यांनीं तें भोगलें आहे ! एकपणाची ओळख पटल्यावरच्या या झटापटी आहेत !

तुकोबांनीं देवाशी प्रेमभरांत विनोदउत्तर करीत असावें. ' कळावें तयासी कळे अंतरींचें ! ' आणि भांडण तरी प्रेमावांचून कोण करितो ! उत्कट प्रेमाशिवाय भांडायला कड कोठून येणार ! प्रेमावांचून मनुष्याला कडोविकडीचें भांडणही करितां येत नाहीं ! !

( १ ) ' **जेणें तुज आलें रूप आणि नांव**:—' देवा तुला नांव-रूपाला आणणारे आम्हीं पतितच तुझे खरे देव आहोंत. आम्हीं आहोंत म्हणून तुझी थोरवी ! अंधारामुळें दीपाला शोभा येते, रोगांमुळें धन्वंतरी प्रसिद्धीस येतो व विषामुळें अमृताला व पितळेमुळें सोन्याला किंमत आहे !

( २ ) ' **तुझें म्हणवितों** ':—' तुज नाहीं आमुचे उपकार । नामरूपा थार केलियाचे ' पण तुला आमच्या उपकाराची कांहीं तरी आठवण? देवा ! आम्हीं भक्तांनीं तुला नांवरूपाला आणलें म्हणून तुझा जगांत एवढा बडिवार चालला आहे, ' नाहीं तरी तुज कोण हो पूसतें ! '.

( ३ ) ' **सोळा सहस्र होऊं येतें** ? ' ह्म० सोळा हजार नारींसाठीं सोळा हजार रूपें तुम्हांला घेतां येतात आणि या तुक्याला एक रूप दाखवा म्हटलें तर मात्र जिवावर आलें आहे—' हें देव ह्मण संपादे ! '

( ४ ) ' **जाणिवेचें काळें तोंड** ! ' खचित या मोठेपणाला धिक्कार असो ! मी दारांत सारखा हाका मारीत आहे पण नुस्तें ' ओ ' सुद्धा देववत नाहीं ! ' आलिया अतीता शब्दसमाधान । करितां वचन काय वेंचे ! ' देवा ! हें तुह्मांलाच साजतें ! आम्ही माणसें निलाजरीं नव्होत ! आमच्यामुळें तुला देवपण आलें आहे पण हा उपकार तूं विसरलास ! हा मोठेपणा बरें !

**समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्या आठवण वांचोनीयां ॥**

( ५ ) कोणता उपकार म्हणून म्हणाल तर सांगतों. मी पतित म्हणून तूं पतितपावन ! मी आधीं मग तूं.

**जरि मी नव्हतों पतित । तरि तूं कैचा पावन येथ ? ॥**
**म्हणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥**

( ६ ) देवा ! तूं समर्थ मी दीन; पण तुम्ही निरंतरचे सबळ आणि आम्ही निरंतरचे दुर्बळ—अशी कांहीं आह्मी दुर्बळपणाची मिराशी घेतली नाहीं. आमचेही कांहीं तुमच्यावर उपकार आहेत हें विसरूं नका. ‘ एकल्यानें थोर केंचे तुम्ही ? ’

( ७ ) ‘ **काय तें सामर्थ्य न चले या काळें** ’ देवा ! माझें संचित तुम्हांहून बलिष्ठ झालें म्हणून तुम्ही गप्प बसलांत किंवा ‘ काय गमाविली सुदर्शनगदा । त्या भेणें गोविंदा लाजतसां ? ’

( ८ ) देवा ! माझा कंटाळा करितां, मग आधींच पायांचें प्रेम कां लावलेंत ! आजवर भीड ठेवून बोलत होतों, पण आतां विचारतों कीं आमचा जीव घ्यायचा तर तुम्हीं आकारालाच कां आलेंत ?

( ९ ) देवा ! तुझ्या माझ्यांत श्रेष्ठ कोण तें पाहूं—मी पतित आहें, पण तूं आपलें पावनत्व सिद्ध करून दाखविलें नाहींस ! आम्ही भेद-बुद्धि जीवाशीं घट्ट धरून बसलों आहोंत पण तुझ्यानें तिचा छेद होत नाहीं ! आमचे दोष इतके बळिवंत आहेत कीं तुझें त्यांच्यापुढें कांहीं चालत नाहीं ! माझें मन दशदिशा भटकत आहे पण तूं त्याच्या भयानें फार दूर ( मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ) लपला आहेस ! ! मग सांग बरें ! तूं श्रेष्ठ कां आम्हीं श्रेष्ठ ! !

( १० ) देवा ! माझीं सगळीं नात्यागोत्याचीं माणसें मेलीं आणि तूं रे कसा मेला नाहींस !

**तुज देखतांचि माझा । गेला बाप आजा पणजा ॥**
**विठो ! कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं ॥**
**आम्हां लागलेसे पाठीं । बालत्व तारुण्य काठी ॥**
**विठो ! कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं ॥**

( ११ ) तूं मूळचा चांगला आहेस पण या मायेच्या भिडेनें वागतोस. तिच्या संगतीनें रंगढंग शिकलास.

**बहु होता भला । परि ये रांडेनें नासला ! ॥**
**ज्याचे त्यासि नेदी देव । तुका म्हणे धांवे खावूं ॥**

( १२ ) देवा ! तूं घरघेणा आहेस, लांचखाऊ आहेस ! ‘ जेथें तेथें देखे लांचाचे पर्वत ! ’ कोणीही घेतल्याशिवाय कांहीं देत नाहीं ! तूंच अपवाद कोठून असणार ? ‘ आधीं हात वर या नांव उदार । उसण्याचे उपकार फिटाफिट ! ’ तुम्ही सर्वस्व घेतल्याशिवाय कांहीं दर्शन देत नाहीं, हें काय औदार्य ?

—— x ——

# २४ देशी भाषांचा—विशेषतः मराठीचा उत्कर्ष.

## १ सिंहावलोकन.

मागें पहात पुढें पाऊल टाकावें म्हणजे मार्ग व मुक्काम याविषयीं भूल होण्याचा संभव नसतो. वाचकांनीं पहिल्या खंडांतील ‘ महाराष्ट्री उर्फ मराठी भाषा ’ हें नववें प्रकरण समग्र डोळ्यांपुढें ठेवून प्रस्तुत प्रकरण वाचावें म्हणजे पूर्वापार संबंध समजणें सुकर होईल. देशी भाषांचा उगम, २ वररुचीचें व्याकरण, ३ हालाची ‘ सप्तशती, ४ दहाव्या शतकांतली ‘ कर्पूरमंजरी ’, ५ मऱ्हाठी भाषा असते असते बनत चालली होती याविषयींचीं प्रमाणें, ६ मुकुंदराज व मराठी भाषा, ७ महानुभावपंथ व मऱ्हाटी भाषा, ८ ज्ञानेश्वरांची मऱ्हाटी म्हणजे ‘ साहित्य व शांति ’ यांचें समन्वित सौंदर्य, ९ संस्कृतच्या बरोबरीची मराठीची योग्यता, १० मऱ्हाठी हें शांतिरसाचें घर व आनंदाचें आवार, ११ मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांचे मऱ्हाठी ग्रंथरचनेचे हेतु व जुन्या काव्यांच्या पंधरासोळाव्या शतकांतील प्रति इत्यादि विषयांचा त्या प्रकणांत सविस्तर व सप्रमाण ऊहापोह केलेला आहे व मराठी भाषेच्या उगमापासून तों ज्ञानेश्वरीपर्यंतच्या मराठीच्या विविध अंगांचा व्यवस्थित प्रपंच केला आहे. महानुभावकवींचेंही म्हणणें विचारांत घेतलें आहे. ज्ञानेश्वर हे प्राकृतकवीश्वराचार्य आहेत. त्यांच्या भाषेची व विचारांची छाप मराठी सर्व ग्रंथकारांवर पडलेली आहे. ज्ञानेश्वरांची ‘ नागरी मऱ्हाटी ’ कांहीं एकदम् उत्पन्न झाली नाहीं ती कित्येक शतकें बनत बनत आली होती. शालिवाहनाच्या सप्तशतीची जी ‘ महाराष्ट्री ’ तीच पुढें मऱ्हाठी झाली व ज्ञानेश्वरांच्या वाणीनें तिला परिपक्कतेस पोंचविलें. शालिवाहनाच्याही मागें दृष्टि पोंचविणें झाल्यास वैदिक किंवा आर्षभाष -

पाणिनीय भाषा-काव्यपुराणांची अभिजात संस्कृत भाषा-सप्तशतीसेतु-बंधांची महाराष्ट्री उर्फ प्राकृत भाषा-मुकुंदराजज्ञानेश्वरांची नागरी मऱ्हाठी भाषा अशी मऱ्हाठी भाषेची परंपरा लावावी लागते. उत्तरोत्तर लोकबोलींतले शब्द व भाषणसंप्रदाय तिच्यांत समाविष्ट होऊं लागले व ती संस्कृतोत्पन्न असूनही तिचा विस्तार व विकास होत गेल्यानें तिला आपला अंमळ वेगळा संसार थाटावा लागला. ज्ञानेश्वरीमराठीनंतरचा टप्पा म्हणजे एकनाथी मराठी हा होय. एकनाथदासोपंतांपासून मराठीला अर्वाचीन वळण लागलें. मऱ्हाठी व इतर देशी भाषांना स्वतंत्र स्वरूप ७ व्या शतकांत आलें, ११ व्या १२ शतकांपासून त्यांच्यांत स्वतंत्र ग्रंथ होऊं लागले व १५ व्या १६ व्या शतकांत भागवतधर्माच्या प्रचंड लाटेबरोबर संस्कृत मागें पडून हिंदुस्थानभर त्यांचेंच खरें साम्राज्य सुरू झालें. मराठी, हिंदी, बंगाली वगैरे देशभाषा ७ व्या शतकांत उत्पन्न झाल्या, वाङ्मयनिर्मितीची योग्यता येण्यास त्यांना ५००. वर्षें लागलीं व नंतर २।३ शें वर्षांनीं त्या संपूर्ण ऐश्वर्य पावल्या.

---

## २ देशभाषा अनेक आहेत.

देशभाषा प्रांताप्रांतागणिक अनेक झाल्या. पंधराव्या शतकाच्या शेवटीं झालेल्या एका मराठी कवीनें ‘ लोकबोलींची ’ गणती देऊन त्यांत आमची मराठी बोली सर्वांत श्रेष्ठ आहे असें म्हटलें आहे. कृष्ण याज्ञवल्की आपल्या ‘ कथाकल्पतरु ’ ग्रंथांत (स्तबक ५-१८) म्हणतोः—

**भाषा संस्कृत प्राकृत । या सहोदरी जी सत्य ।**
**रूप वेगळें-परि मत । एकचि कीं ॥ ८८ ॥**
**ऐसा कोण आहे वक्ता । कीं भाषा सर्वही बोलेल ज्ञाता ? ।**
**आणि बोलिलिया समस्ता । जाणेल जो ! ॥ ८९ ॥**

संस्कृत भाषा ऋषिप्रणीत, अगाध आणि सुरेख खरी; पण नाना देशांत नाना भाषा पसरल्या आहेत व त्यांनीं त्यांच्या त्यांच्या देशांत

लोकव्यवहार सरळ चालले आहेत. प्रांतपरत्वें कोणत्या ' लोकबोली ' आहेत तें कवि सांगतोः—

**भिल्ल, हिंदोड, कोकण, कूनिप, कर्णाव, काश्मीर, आरबस्तान, द्रविड, गौड, तेलंग, सेंधळ, लंका, कावंग, कुंभकोण, मरंग, मरु, श्रीहर, जाम, काम आणि भोटाक, अहिर, गुर्जर, कर्नाटक, वैद्य, माळ, दीनवाटक, कनोज, काबूल, यवात, अथनी, मंगरूळ, मोरकाड, मकाशीळ, हेमनंद, हेरंब, मारवाड, जोट, तेटन, मोरकावर, महाराष्ट्र, कोह, चोहट, महानंद, हाबिल, काबिल, मुलताना, हबस, फिरंगी, खुदासन, वेद, अंतर्वेद, महाचीन, चोळ, पांचाळ, अंग, वंग, कालिंग, असीब, कांबोज, नेपाळ, जाफरशाग, कुंतळ, मेरु, तपींद्र, वानरउगुळ,—**

ह्या विविध देशांत, देशपरत्वें विविध ' **देशबोल्या** ' आहेत. तथापि कवि अभिमानानें म्हणतो—

**ययामधील येकाचि नेहटी । ते मी बोलिलों मऱ्हाठी ।**
**जैसा हिरा शोभे मुकुटीं । रत्नांमाजी ! ॥ ९९ ॥**
**तैसा हा कथाकल्पतरु । भाषादीक्षा ग्रंथगुरु ।**
**कीं नभोगणीं दिनकरू । मिरवे जैसा ॥ १०० ॥**

---

## २ आठ प्रमुख देशभाषा.

मराठीशिवाय ज्या इतर देशभाषा आज भरतखंडांत रूढ आहेत त्यांत गुजराथी, हिंदी, बंगाली, कानडी, तामीळ, तेलगू व मल्याळी ह्या सात मुख्य आहेत. चार वर्षांपूर्वी झालेल्या खानेसुमारीवरून पाहतां ३५ कोटीपैकीं हिंदी बोलणारे ११ कोटी, बंगाली बोलणारे ५॥ कोटी, तेलगू बोलणारे २॥। कोटी, मराठी व तामीळ बोलणारे २ कोटी १० लक्ष, कानडी बोलणारे १। कोटी व मल्याळी भाषा बोलणारे ८० लक्ष लोक आहेत ! मराठी भाषा बोलणाऱ्या २ कोटी १० लक्ष लोकांपैकीं १ कोटि ११ लक्ष मुंबई इलाख्यांत आहेत, ५४ लक्ष मध्यप्रांत व

वऱ्हाड यांत आहेत, ३८ लक्ष निजामच्या राज्यांत आहेत व बाकीचे मध्यहिंदुस्थान ( इ० इंदोर, देवास, धार, उज्जयिनी वगैरे ), ग्वाल्हेर, बडोदें, मद्रास वगैरे प्रांतांत आहेत. ह्या आठ प्रमुख भाषांचे दोन गट पाडतां येतात. मराठी, गुजराथी, बंगाली व हिंदी ह्या चार भाषांचा एक गट व तामिळ, तेलगू, कानडी व मल्याळी या चार भाषांचा दुसरा गट. पहिल्या गटांत आर्यभाषा व दुसऱ्यांत द्राविड भाषा येतात. तामीळ भाषेंतील वाङ्मय सर्व देशी भाषांच्या पूर्वींचें आहे, ती भाषा सर्व देशी भाषांत प्राचीनतम आहे, तिच्यांत वैष्णव व शैव वीर सर्वांच्या आधीं झाले आहेत. तामीळांचें साम्राज्य, तामीळ संत व तामीळ आचार्य यांचें सविस्तर वर्णन पहिल्या खंडांत ७ व्या प्रकरणांत सविस्तर केलेलें आहे.

---

## ४ कानडी, तेलगु व मल्याळी.

सामान्यतः कृष्णातुंगभद्रा नद्यांच्या दक्षिणेस कावेरीपर्यंतच्या भागास कर्नाटक म्हणतात व त्यांच्या भाषेस कन्नड किंवा कानडी भाषा म्हणतात. कर्नाटकावर कदंब, पल्लव, चालुक्य, राष्ट्रकूट, कलचूरी, होयसळ जाधव, विजयानगर, वोडेयर या राजघराण्यांनीं राज्य केलें आहे. कर्नाटक व महाराष्ट्र यांच्या सीमा एकमेकांला लागल्या असून कानडी शब्दांचा मराठी भाषेवर थोडासा संस्कारही झाला आहे. आडवी, नींद, बोण, उगळी, मुग, चोखाळ, पन्नासिले ( रचिले ), पोळी, हडप, ठाळिग इ० शेपन्नास कानडी शब्द ज्ञानेश्वरांच्या काव्यांत आढळतात. 'अडगुळ मडगुळ सोन्याचं कडगुळ' 'औडक चौडक दामाडू दामाडूचा पंचाडू' 'वकट लेंड मूंड नाल' इ० मराठींत रूढलेले शब्द मूळचे कानडी आहेत. पुरंदरदास व कनकदास हे कानडी संत पंढरीच्या भक्तमंडळांत सर्वमान्य झालेले आहेत. कानडी व मराठी या शेजारपणांत राहिल्या तरी कानडी वाङ्मयाचा मात्र मराठी वाङ्मयावर परिणाम झालेला नाहीं. जैनांनीं कानडीचा फार पूर्वींपासून ती लोकभाषा म्हणून

स्वमतप्रसारार्थ उपयोग केलेला आहे. कानडी भाषा मराठीपेक्षांही प्राचीन महाराष्ट्रीची समकालीन आहे. राजभाषा असल्यामुळें तिचा प्रसारही अधिक झाला. गोदावरीतीरापर्यंत ती येऊन भिडली. कानडींत प्रथम जैन वाङ्मय व बसवानें इ. स. ११६० च्या सुमारास लिंगायतपंथ काढल्यावर त्या पंथाचें वाङ्मय बरेंच निर्माण झालें. मध्वाचार्य व चैतन्य यांनीं वैष्णवपंथाचा प्रसार केल्यावर मग १३ व्या शतकानंतर कानडींत वैष्णवपंथाचें वाङ्मय निर्माण होऊं लागलें. १० व्या शतकांत पंप, पोन्न, रन्न, चामुंडराय इ० जैनपंथीय ग्रंथकार झाले. नागवर्म यानें 'छंदोम्बुधि' नांवाचा छंदःशास्त्रावर कानडींत ग्रंथ रचिला व बाणाच्या कादंबरीवरून त्यानें 'कानडी कादंबरी' लिहिली. नागचंद्र यानें इ. स. ११०० च्या सुमारास 'रामचंद्रचरितपुराण' उर्फ 'पंप-रामायण' रचिलें. ह्यांत वाल्मीकीच्या रामायणाचा मुख्य भाग कायम ठेवला आहे तरी कवीनें पुष्कळ फरक केला आहे. याच्या वेळेस कांति नांवाची एक कवयित्री होऊन गेली. ही पहिली कानडी कवयित्री होय! यावेळीं कानडीवर कांहीं व्याकरणग्रंथ झाले. कानडी वैष्णववाङ्मयांत स्वतंत्र असा भाग थोडा आहे, बहुतेक ग्रंथ भाषांतरित आहेत. पहिला कानडी वैष्णव ग्रंथकार रुद्रभट हा होय. यानें विष्णुपुराणाधारें कृष्ण-जन्मापासून बाणासुरवधापर्यंतची कृष्णकथा 'जगन्नाथविजय' नामक ग्रंथांत (श. ११४०) लिहिली. शक १२२० मध्यें पंढरीच्या विठ्ठलाचा भक्त चावुंडरस यानें चंपूच्या धर्तीवर 'अभिनव दशकुमारचरित्र' दंडीच्या ग्रंथाधारें लिहिले. शके १४३० मध्यें कानडींत महाभारताचें भाषांतर झालें. तें नारणप्पा व तिमण्णा यांनीं केलें. या कार्यास विजयानगरच्या कृष्णरायानें चांगलें साह्य केलें. हें सारें 'षट्पदी' छंदांत लिहिलें आहे. शके. १५०० च्या सुमारास 'तोखे रामायण' रचण्यांत आलें. नंतर चाटु विठ्ठलनाथ यानें भागवतपुराण लिहिलें, व 'कृष्णलीलाभ्युदय' हा ग्रंथ वेंकट आर्य नांवाच्या मध्वभक्तानें लिहिला.

याप्रमाणें रामायणभागवतभारतांतील कथा कानडी भाषेंत एका शतकांत निर्माण झाल्या. त्या सर्व एकनाथांच्या समकालीन होत! भरतखंड व्यापणाऱ्या भागवतधर्माच्या लाटेबरोबरच कानडी भाषेला हिंदूंचे तीनही राष्ट्रीय ग्रंथ मिळाले. कृष्णभक्तीचा प्रसार कर्नाटकांत 'रगळे' ह्म० भावगीतें गाऊन वैष्णवभक्तांनीं सर्वभर केला. हीं गीतें गात व भजन करीत ते गांवोगांव हिंडत. यावेळीं पुरंदरदास (नाथसमकालीन) यांनीं कानडी लोकांस पंढरीच्या विठ्ठलाची भक्ति लावली (श. १४८०). कनकदासांनींही अनेक ग्रंथ लिहिले आहेत. भक्तिपंथप्रसारकार्यांत कानडी मराठीच्या विशेष मागें राहिली नाहीं. मराठी आपल्या अंगच्या सौंदर्यानें व संतकवींच्या पुण्याईनें वाढली.

**तेलगु** व मल्याळी भाषांचा मराठीशीं संबंध नाहीं. तेलगू लोकांचा देश तो तेलंगण किंवा आंध्र. संस्कृत भाषेंतील बहुतेक वाङ्मय भाषांतररूपानें तेलगू भाषेंत आलेलें आहे. शार्दूलविक्रीडित, चंपकमाला, व उत्पलमाला हीं यांचीं आवडतीं वृत्तें! तेलंगी पद्यांच्या चारी चरणांस प्रास असतो व प्रत्येक चरणास यति असतो. तेलगू कवींत पहिल्यापासून कोणातरी राजामहाराजांस किंवा सधन मनुष्यास आपलें काव्य अर्पण करण्याचा प्रघात आहे! त्यामुळें तिकडील कवींत मोठाल्या जमीनी, देणग्या, अग्रहार मिळत असतात. कांहीं कवि देवतांस आपलीं काव्यें अर्पण करितात, म्हणून कांहीं काव्यें देवांकित व कांहीं नरांकित आहेत! ज्याला काव्य अर्पण करितात त्याला कृतिभर्ता म्हणतात. विद्वानांच्या सभेंत कृतिभर्त्यासमोर काव्य वाचून दाखवायच्या समारंभास रंगाधिरोहण म्हणतात. राजपुतान्यांतील 'भाटचारण' किंवा हे 'तेलगू कवि' यापेक्षां आमचे महाराष्ट्र कवि निरपेक्ष व स्वतंत्र असत म्हणून मराठी कवितेचें आध्यात्मिक तेजही अलोट असे! त्यांनीं विठोबाशिवाय कोणाची मनधरणी केलीच नाहीं! हिंदी व तेलगू भाषा राजाश्रयानें उदयास आल्या, मराठी भाषा साधुसंतांच्या निर्लोभ ईश्वरभक्तीमुळें उदय

पावली ! ज्ञानदेवनामदेवांच्या काळीं तेलगू भाषेंत ४१५ नामांकित ग्रंथकार झाले. त्या सर्वांत आद्य व सर्वश्रेष्ठ ग्रंथकार म्हणजे नन्नयभट हा होय. हा संस्कृत, कानडी, पैशाची व तेलगू या चारही भाषांत निष्णात होता. हा राजमहेंद्री येथील चालुक्यराजा जो विष्णुवर्धन त्याच्या आश्रयानें उदयास आला व राजा राजराजनरेंद्र याच्या राजवटींत त्याचा भाग्योत्कर्ष झाला ( शक १२१२ चा सुमार ).

**मल्याळी** भाषा ही मलबार, कोचीन, कूर्ग, त्रावणकोर, म्हैसूर, निलगिरी ( मळयालम्-मल्याळी ) या भागांत प्रचलित आहे. हिच्यांत प्राचीन वाङ्मय नाहीं. तेराव्या शतकांत एका राजानें 'रामचरित' लिहिलें किंवा लिहविलें ! पुढें संस्कृत काव्यनाटकांचीं भाषांतरें बरींच झालीं. पंधराव्या शतकांत म्हणजे नाथकालीं चेरुस्सेरी नंबूरी यानें 'कृष्णगाथा' लिहिली. आर्य एसत्तु यानें महाभारताचें व कांहीं पुराणांचें भाषांतर केलें. विशेष कांहीं झालें नाहीं. नाथांच्याच काळीं दक्षिणहिंदुस्थानांत केरळप्रांतीं श्रीकृष्णभक्तीचा प्रसार मोठ्या प्रमाणावर झाला, व गुरुवायूर येथील प्राचीन सुप्रसिद्ध प्रचंड श्रीकृष्णमंदिराचा जीर्णोद्धार करण्यांत आला. गुरु आणि वायु यांच्या प्रेरणेनें श्रीकृष्णभक्त उद्धव यानें अर्पण केलेल्या कृष्णमूर्तीची येथें स्थापना झाली आहे अशी तिकडे समजूत आहे. नारायणभट्ट त्रिपाद नामक एका प्रेमळ व विद्वान् कवीनें शक १५०० च्या सुमारास 'नारायणीय ग्रंथ' संस्कृत भाषेंत लिहून केरळप्रांतांत कृष्णभक्तीचा प्रसार केला. ह्यांत भक्तांचा व भक्तीचा महिमाही वर्णिला आहे. याचे १०१ दशक आहेत. ग्रंथ अत्युत्कृष्ट आहे ! सांप्रत तो तिकडे छापण्याचें काम चालू आहे ! कर्मकांडाचा कडेलोट झाला तेव्हां अध्यात्मविद्येच्या प्रसारार्थ एका नांबुद्री ब्राह्मणघराण्यांत शंकराचार्यांचा अवतार झाला. त्यांनीं कर्ममीमांसेवर व तसेच वेदबाह्य बुद्धादि पाखांडमतांवर हल्ले चढवून अद्वैतसिद्धांत जगाला शिकविला. कालगतीनें तो ज्ञानमार्ग लुप्त झाला व पंडित तर्कटी व वाद-

पटु झाले म्हणून भक्तिधर्माचा जयजयकार करण्यासाठीं '**नारायणीय ग्रंथ**' निर्माण झाला व केरळप्रांतांत कृष्णभक्तीची पुन्हा मशाल पेटली! पूर्वीच्या तामीळ संतांनीं किंवा इकडील नाथतुकोबादि महाराष्ट्रीय साधुसंतांनीं जो भक्तिमार्ग लोकप्रिय केला त्याचाच प्रसार १५ व्या शतकांत केरळांत झाला. याचें पुष्कळसें श्रेय 'नारायणीय' ह्या ग्रंथास दिलें पाहिजे.

---

## ५ गुजराथी.

गुजराथ ह्म० गुर्जरराष्ट्र व सौराष्ट्र मिळून होय. पश्चिमेस द्वारका आहे. बलरामाची बायको रेवती ही आनर्त ह्म० उत्तर गुजराथच्या राजाची कन्या. गिरनारच्या यात्रेंत सुभद्राहरण झालें व प्रभास येथें यादवी होऊन यादवांचें राज्य बुडालें. द्वारका, प्रभास, सुदामपुरी उर्फ पोरबंदर, गिरनार हीं सौराष्ट्रांतील प्राचीन देवस्थानें. वल्लभ राजे हे गुर्जर क्षत्रिय असून त्यांच्या वेळेपासून गुर्जर, गुजराथ हे शब्द रूढ होऊं लागले. हे शैव असल्यामुळें ६ व्या शतकापासून गुजराथेंत शिवसंप्रदाय रूढ झाला. जैनांचें एकाकाळीं गुजराथेंत प्राबल्य होतें, पण तें राजकीय दृष्टया नव्हे. गुजराथच्या चालुक्य घराण्यांत सिद्धराज **जयसिंग** ( शक १०१६–१०६५ ) व **कुमारपाल** ( श. १०६५–१०९६ ) हे दोन मोठे पराक्रमी राजे झाले. त्यांनीं शैवसंप्रदायाचा फार मोठया प्रमाणावर पुरस्कार केला व जैन पंडितांनाही चांगला आश्रय दिला. सर्व गुजराथी राजात जयसिंग हा राजा पराक्रमी, धार्मिक व दानशूर होऊन गेला. यानें सिद्धपूर येथें रुद्रमाळ नांवाची सुंदर इमारत व पाटण येथें सहस्रलिंग नांवाचें सरोवर बांधलें. प्रसिद्ध जैनाचार्य **हेमचंद्र** हा याच्या आश्रयास होता. यावेळीं शेंकडो जैनग्रंथ लिहिले गेले, तथापि यानंतर ब्राह्मणपंडितांनीं पुन्हां जोर केला व जैनांचें प्राबल्य कमी होत गेलें तें आज गिरनारपर्वतावरच कांहीं शिल्लक राहिलें आहे! जयसिंग व कुमारपाल यांच्या कारकीर्दीत पुन्हां हिंदुसंस्कृतीनें जोर केला.

कुमारपालानें अनेक मंदिरांचा पुन्हां जीर्णोद्धार केला व सोमनाथाचें देऊळ पुन्हा पहिल्यापेक्षा उत्कृष्ट बांधलें. याचवेळीं डाकूरचें देवस्थान उदयास आलें व १२ व्या शतकापासून शिव व विष्णु यांची उपासना गुजराथेंत फार जोरांत सुरू झाली. अर्वाचीन गुजराथी भाषाही प्रायः रजपूत व काठेवाडी भाषांच्या मिश्रणानें नवीन तयार झाली आहे. गुर्जर राजांच्या स्तुतिपर रासा भाट व चारण लोक गाऊं लागले, पण पंधराव्या शतकापर्यंत गुजराथी भाषेंत म्हणण्यासारखें वाङ्मय तयार झालेंच नाहीं. **मीराबाई** ( शके १३२५—१३९२ ) व **नरसी मेहता** ( शके १३३७–१४०३ ) हे वैष्णवभक्त झाले तेव्हांपासून गुजराथी भाषा ऊर्जित दशेस आली. नरसी मेहता यांच्या कवितेंत त्यांच्या पूर्वीं होऊन गेलेल्या आपल्या नामदेवांच्या कथांचा उल्लेख आहे ! वैष्णवधर्माच्या प्रसाराबरोबर गुजराथी वाङ्मयाला खरा प्रारंभ होऊन मिराबाई व नरसी मेहता यांनीं आपली मधुर रचना गुजराथी भाषेंत केली व १५० वर्षांनीं पुन्हां दुसरी लाट आली त्या लाटेबरोबर प्रसिद्ध वेदांती कवि **आख्खो, प्रेमानंद** व **सामळभट** ही त्रयी निर्माण झाली. गुजराथींतले उत्तमोत्तम कवि हे पांचच. तात्पर्य, ज्ञानेश्वरकालीं गुजराथी भाषेंत वाङ्मयाची उभारणीच झाली नव्हती. ज्ञानेश्वरनामदेवानंतर १०० वर्षांनीं गुर्जरभाषासुंदरीनें आपले नेत्र उघडले व त्यांत मीराबाई व नरसी मेहता या दोन दिव्यतारका प्रथमच चमकूं लागल्या ! भागवतधर्माच्या लाटेनें महाराष्ट्र व्यापला तीच लाट गुजराथभर पसरली व गुजराथी भाषेंत मराठी भाषेप्रमाणें भक्तिरसात्मक वाङ्मय निर्माण झालें.

---

## ६ बंगाली.

मागधी भाषेंतून बंगाली भाषा निघाली असल्यामुळें व मगध (बहार) हा बुद्धधर्म व जैनधर्म यांचें उत्पत्तिस्थान व विकासस्थान असल्यामुळें बंगाली भाषेंतील पहिलें वाङ्मय ह्या धर्मांच्या प्रसारास वाहिलें गेलें व

पुढेंही दीर्घकाळपर्यंत बंगाली भाषेंतील हिंदु वाङ्मयावर त्या धर्माचेंच परिणाम पुष्कळ झाले. बंगाली लोक बंगाली भाषेला बांगला, बंग किंवा वंग भाषा म्हणतात. बंगाली वाङ्मयांत प्रथम 'डाकेर वाचन' व 'धर्ममंगल काव्यें' हे रचनाविशेष ११ व्या शतकांत लोकप्रिय झाले. त्यावर बौद्धांच्या विचारांची छाप प्रथम पडली पण पुढें ब्राह्मणांनीं ब्राह्मण-धर्माचीं तत्वें गोवून त्याच जातीचीं काव्यें केलीं व तीं बंगालभर पसरलीं. त्यांच्या कर्त्यांपैकीं एक 'धर्ममयूर' नांवाचा ब्राह्मणकवि १२ वे शतकांत झाला. बौद्धांचा 'सहजपंथ' व त्या पंथाचें तांत्रिक वाङ्मय यांचा पगडा कांहीं काळ बंगाली लोकांवर पडला होता. त्या पंथानें निर्वाणप्राप्तीचें मुख्य साधन सौंदर्योपासना ठरविली! त्याचा परिणाम वाईट झाला. वैवाहिक बंधनें व सामाजिक आचार हे त्यामुळें ढिले पडले. बौद्धमतांत संन्यास ह्म० स्त्रीत्याग मुख्य मानीत, पण हा अस्वाभाविक असल्यामुळें बुद्धपंथच मागें पडला. शिव व दुर्गा ( पार्वती ) यांचें ऐक्य आहे व हें जाणून संसार करीत असतांना समाधिसुख भोगतां येतें हें तत्व शिवदुर्गोपासनेनें बंगाली लोकांस शिकविलें. बुद्धांच्या संन्यासकल्पनेचा अतिरेक होऊन अनीति फैलावली होती तिला शिवदुर्गापूजेनें चांगला बंध पडला. शिवसंप्रदाय पुढें अद्वैताकडे झुकला व गूढ झाला तेव्हां राधाकृष्णांची उपासना पुढें आली. शके ११८० च्या सुमारास जयदेवकवींचें 'गीतगोविंद' काव्य निर्माण झालें. त्याचा परिणाम होत होत शकशतक चौदाव्यांत बंगाल्यांतील प्रसिद्ध व लोकप्रिय कवि **चण्डिदास** व **विद्यापति** यांचीं राधामाधव-प्रेमाचीं पवित्र व मधुर गाणीं बंगाल व बहार प्रांतांकडे फैलावलीं. बंगाली लोक अत्यंत बुद्धिवान् व मधुरभक्तीचे प्रेमळ भक्त आहेत हें त्यांच्या ह्या वेळेपासूनच्या पुढील सर्व वाङ्मयविस्तारावरून प्रतीतीस येते. भारत व भागवत ह्या ग्रंथांची बंगालींत भाषांतरें झालीं व कृष्ण चैतन्यांच्या परमदिव्यस्फूर्तीनें बंगाल्यांत चैतन्य ओतलें. वैष्णवधर्मानें बंगाल व्यापला गेला, पण हा वैष्णवसंप्रदायाचा बंगाल्यांतला उत्कर्षही

शके १४०० नंतरचा आहे. तामीळ वाङ्मयांत संबंदर व अप्पर किंवा मराठी वाङ्मयांत ज्ञानेश्वर व नामदेव यांच्या भेटीची व प्रेमळ संलापांचीं जशीं गोड वर्णनें आढळतात त्याप्रमाणें विद्यापति व चंडीदास ह्या समकालीन समकृष्णप्रेमी कवींच्या भेटींचीं गोड वर्णनें बंगालीभाषेंत आढळतात. हे दोन बंगाली कवि १५ व्या शतकाच्या प्रारंभीं बंगाल्यांत झाले. **विद्यापति** व **चण्डिदास** ह्या कवींच्या कृष्णस्तवनपर गीतांनीं बंगाल्यांत कृष्णभक्तीला चालना मिळाली हें खरें असलें तरी धर्मस्थापनेचें कार्य शास्त्री, पंडित व कवि यांच्या हातून होत नाहीं, राष्ट्रांत व राष्ट्राच्या धर्मांत चैतन्य भरण्याचें काम करण्यास देवाभक्तांच्या विभूतीच जन्माव्या लागतात ! बंगाल्यांत जन्मलेली ही विभूति म्हणजे **कृष्णचैतन्य उर्फ गौरांग प्रभु** ही होय. कृष्णचैतन्यांचा जन्म शके १४०६ फाल्गुन शुद्ध १५ ह्या दिवशीं झाला. आपल्या आयुष्याच्या ५० वर्षांतील प्रत्येक क्षण त्यांनीं श्रीकृष्णाच्या नामसंकीर्तनांत वेंचला. कृष्णगुणानुवादांत मोकळ्या मनानें गातनाचत यांनीं हजारो जीवांच्या हृदयांत आध्यात्मिक भक्तीची ज्योत पेटविली ! नामसंकीर्तन, नाचणें, गाणें याच्या योगानें ते श्रोत्यांनाही तल्लीन करीत. यांनीं पतितांस, वेश्यांस व ठकांसही प्रेमविव्हल करून देवाच्या भजनीं लावले. पंढरपूर व जेजूरी येथें ते राहून गेल्याचे उल्लेख सांपडतात. प्रेमानंद हें ईश्वराचें रूप आहे असें ते मानीत. कृष्ण मायेचा स्वामी व जीव मायेचा दास व मायेंतून उत्तीर्ण होण्यास प्रेमभक्ति हें एकच एक साधन असा तुलसीदासांप्रमाणें त्यांचा उपदेश असे. मोक्षाहून भक्ति श्रेष्ठ अशी त्यांची शिकवण असे. त्यांचे अनेक भक्त निघाले. कृष्णचैतन्य, नित्यानंद व अद्वैतानंद हे या संप्रदायांत तीन प्रभु मानले जातात. नित्यानंदास कृष्णचैतन्यांनीं पीठाधिकारी नेमले. त्यांचे वंशज नडियाद येथें राहतात. कृष्णचैतन्यांनीं बंगाल्यांत क्रांति केली. त्यांचीं अनेक चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांचा शिष्य सनातन यानें ‘ रसामृतसिंधु ’ हा अत्यंत प्रेमळ ग्रंथ लिहिला. **गोविंददास**

( शके १५३८ ते १६१२ ) हा प्रतिचंडीदास होय. मलधर बसू यानें भागवतावर स्वतंत्र काव्य लिहिलें असून त्यांत राधाकृष्णप्रेमाचें बहारीचें वर्णन केलें आहे.

---

## ७ हिंदी.

हिंदी भाषा ही मध्यभारताची मातृभाषा होय. राजस्थानी हिंदी, पंजाबी हिंदी, काश्मीरी हिंदी, बिहारी हिंदी, मध्यप्रांतीय हिंदी, असे हिंदी भाषेचे दहा पांच प्रकार आहेत व त्यांत थोडथोडा फरकही आहे. हिंदी भाषा बोलणारे लोक सुमारें १२ कोटि आहेत ! मराठी काव्यवाङ्मयांत जशी ओवी व अभंग ही दोन वृत्तें प्रमुख आहेत, तशीं हिंदीचीं दोहा, सोरठा, चौपाई, छप्पाई ही मुख्य वृत्तें आहेत. राजपुतान्यांत बहुधा प्रत्येक राजाच्या दरबारीं राजकवि असत. हे चारण व भाट राजे महाराजांच्या संगतीला राहून राजाचें यशोगायन करीत. हिंदी कवितेचा उगम भाटांच्या गायनांत आहे. हिंदी भाषेचा पहिला कवि **चंदभाट** हा होय. याला हिंदीचा जनक म्हणतात. चंदभाट हा दिल्लीचा शेवटचा हिंदुराजा पृथ्वीराज चव्हाण याच्या संगतीला होता. हा विद्वान् असून राजकार्यनिपुण होता. पृथ्वीराजाचा व त्याचा स्नेह होता. महंमदघोरीबरोबर झालेल्या शेवटच्या युद्धांत पृथ्वीराज मारला गेला, त्याच युद्धांत आपल्या स्वामीबरोबर चंदभाटही धारातीर्थीं पडला. ही गोष्ट इ. स. ११९१ ( शक १११३ ) मध्यें झाली. तेव्हां पृथ्वीराज ४३ वर्षांचा होता, व चंदकवि ६५ वर्षांचा होता, अर्थात् चंदभाटाची हयात शके १०४८ ते १११४ ही ठरते. चंदकवीनें 'पृथ्वीराजरासो' नांवाचा पृथ्वीराजाच्या चरित्रवर्णनपर ग्रंथ केला तो हिंदी भाषेंतला पहिला मान्य ग्रंथ होय. हा मुकुंदराजाच्या वेळीं ह्म० ज्ञानेश्वरीपूर्वी शंभर वर्षें झाला. ह्या ग्रंथाची भाषा प्रौढ, माहिती परिपूर्ण व वर्णनें रसभरित आहेत. ह्या ग्रंथांत पृथ्वीराजानें युक्तीनें इतर राजांबरोबर ज्या लढाया

केल्या त्या लढायांचें व ज्या राजकन्या पळवून आणल्या त्यांच्या प्रणयलीलांचें वर्णन आहे म्हणजे ग्रंथांत शृंगार व वीर हे दोन रस प्रधान आहेत! ग्रंथांत परमार्थ नाहीं! खणाखणीचीं युद्धें, मृगया, कोठें कोठें सृष्टिसौंदर्य व तरुणींचे विलास या विषयांचीं भरपूर वर्णनें आहेत! पृथ्वीराजा विषयविलासी व पराक्रमी होता. त्याचें वर्णन करण्यांत कवीनें आपली रसिकता व बहुश्रुतता खर्च केली आहे.

विषयलंपटता, आपापसांतलीं वैमनस्यें व घरभेदीपणा या क्षत्रियांच्या दुर्गुणांमुळें हिंदुस्थान मुसलमानांच्या ताब्यांत गेला हें ह्या चंदभाटाच्या ऐतिहासिक काव्यावरून स्पष्ट होतें! शक १२५० च्या सुमारास चंदकवीच्याच घराण्यांत झालेल्या **सारंगधर** भाटानें हम्मीरराजाच्या वर्णनपर हम्मीररासो व हम्मीरकाव्य हे हिंदी ग्रंथ लिहिले. तात्पर्य, हिंदी भाषेंतला पहिला ग्रंथ जरी ज्ञानेश्वरीच्या अगोदर शंभर वर्षें झाला असला तरी तो एका विषयी व अपेशी राजाच्या वर्णनाचा आहे व त्याच्यानंतर २।३ शतकें असल्या शाहीरांच्याच किरकोळ कवनांत हिंदी भाषा आटली! हिंदी भाषेचा प्रसार हिंदुस्थानभर ज्या वैष्णव सत्कवींच्या ग्रंथांमुळें झाला ते बहुतेक सर्व सत्कवि १४ ते १६ व्या शतकांतले आहेत. हे सत्कवि वैष्णवधर्माच्या लाटेबरोबरच निर्माण झाले आहेत. रामानंदशिष्य कबीर ( शके १३४० ) व नानक ( शके १३९१ ते १४६१ ) हे सत्पुरुष व कवि म्हणून प्रख्यात आहेत. महात्मा गोरखनाथ यांची हिंदी कविता बरीच प्रसिद्ध आहे पण त्यांचा कालनिर्णय करितां येत नाहीं! त्यांचे गद्यग्रंथ हें हिंदींतलें पहिलें गद्य म्हणतात. शके १४००–१६०० ह्या दोनशें वर्षांचा काळ हिंदीवाङ्मयाच्या उत्कर्षाचा काळ होय. ह्या काळांतले दोन महाकवि म्हणजे **सूरदास व तुलसीदास** हे होत. वल्लभाचार्यांचा जन्म ( श. १४०० ) झाल्यापासून कृष्णभक्तीला तिकडे महापूर आला. परमकृष्णभक्त सूरदास हे शके १४०५ मध्यें जन्मले. शके १४२५ ते १५०० ह्या काळांत कृष्णभक्तिपर पद्य-

रचना अतिशय झाली. ह्याला सौरकाल ह्म० सूरदासांचा काल असें म्हणतात, व शके १५०० ते १५५० हा तुलसीदासांचा काल मानला जातो. सूरदासादि निःसीम भक्त होऊन गेल्यानंतर त्यांच्यांतली भक्ति वजा जाऊन राधाकृष्णावर नुस्तीच शृंगारपर कविता होऊं लागली! तुलसीरामायणानंतर तिला अपाप आळा पडला. तुलसीकालांतच केशवदास, बलिभद्रमित्र, नाभादास, रहीम, मुबारक वगैरे चांगले कवि झाले. विठलनाथसुत गोकुळनाथ यांनीं २५० वैष्णवांच्या चरित्रावर २ गद्यग्रंथ लिहिले! तुलसीरामायणाचा हिंदी वाङ्मयावर एवढा मोठा प्रभाव पडला कीं रामयश गाणारे अनेक कवि झाले व चौपाईवृत्तांत काव्य लिहिण्याची प्रणालीच पडून गेली. त्यांच्यानंतर थोड्याच काळांत **सेनापति** ( श. १५७१ ), **बिहारी** ( श. १५८४ ), **भूषण**, **मतिराम** व **लाल** असे पांच बडे कवि हिंदींत झाले व हिंदी वाङ्मयाची प्रतिष्ठा अतिशय वाढली. भूषण ( भूखन ) कवीची मराठी वाचकांत प्रसिद्धी आहे. भूषणनें 'शिवराजभूषण' व मतिरामानें 'छत्रसालयश' हीं काव्यें गाऊन हिंदी वाङ्मयाला वीररसात्मक काव्यांची जोड करून दिली. सूरकालीं भक्तिसमुद्र उचंबळला व याकालीं वीररसाचें उत्थान झालें.

---

## ८ भागवतधर्माची प्रचंड लाट.

पाहिला मराठी ग्रंथ अध्यात्मपर आहे तर पाहिला हिंदी ग्रंथ राजवर्णनपर आहे. पहिला सिद्धाची वाणी आहे, दुसरा राजाश्रित भाटाची राजस्तुति आहे. १४ व्या शतकांत मात्र रामानंद, कबीर, नानक, गोरखनाथ, वल्लभाचार्य हे हिंदीचे बडे पुरस्कर्ते झाले, त्याच काळांत बंगाल्यांत विद्यापति व चण्डीदास झाले. यांच्यापूर्वी तेराव्या शतकाच्या पूर्वार्धांत ज्ञानेश्वरनामदेवादिकांनीं मराठीचें ऐश्वर्य पूर्ण वाढविलें असून तिला अजरामर करून ठेविली होती. पंधरावें व सोळावें शतक मराठी, हिंदी, गुजराथी, बंगाली ह्या चारही भाषांना अत्यंत भाग्योत्कर्षाचें गेलें.

ह्या काळांत मराठींत एकनाथ, दासोपंत, मुक्तेश्वर, रमावल्लभदास, तुकाराम, रामदास व इतर अनेक मोठमोठे संतकवि झाले; हिंदींत सूरदास, तुळशीदास, केशवदास, बिहारीलाल वगैरे संतकवि झाले; गुजराथ व राजपुताना नरसीमेहता व मीराबाई यांनीं गाजविला व बंगालप्रांत कृष्णचैतन्यांनीं चेतविला, हीं दोन शतकें साऱ्या देशीभाषांना भाग्याची गेलीं. देशी भाषांत जे अविनाशी स्वरूपाचें वाङ्मय निर्माण झालें आहे तें याच दोन शतकांतलें आहे. ह्या साऱ्या वाङ्मयाची प्रेरकशक्ति भागवतधर्म हीच होती ह्याच भागवतधर्मानें सर्वांच्या आधी तामीळ देशांतल्या संतकवींना स्फूर्ति देऊन त्यांच्यांत संबंदर, अप्पर, माणिक्क वासहर, नंद इ० भक्तकवि निर्माण केले होते. तीच लाट महाराष्ट्र, गुजराथ, राजपुताना, मध्यप्रांत व बंगाल ह्या प्रदेशांत पसरून तिनें १५ व्या व १६ व्या शतकांत सारा हिंदुस्थान व्यापला, व देशी भाषांच्या उत्कर्षाचा माध्यान्ह झाला. भाषांचा विस्तार, वाङ्मयाचा विकास, व राष्ट्रधर्माचा उत्कर्ष या काळीं झाला.

---

## ९ देशी वाङ्मयाचा आत्मा एक आहे.

सर्व हिंदी वाङमयांत एकरूपता आहे कारण सर्व प्रांतांची संस्कृती एक आहे व ती संस्कृति जिवंत ठेवणारीं तीर्थक्षेत्रें हिंदुस्थानभर पसरलेलीं असून तीं सर्व हिंदूंना पूज्य व मान्य आहेत. तीर्थयात्रेच्या निमित्तानें हिंदुस्थानभर हिंडून येण्याचा सर्व हिंदूंचा, विशेषतः सर्व संतसज्जनांचा, परिपाठ आहे. श्रीशंकराचार्यांनीं चारी बाजूला चार धाम स्थापन केले यांत त्यांचा एकीकरणाचाच हेतु होता. काशी, गया व प्रयाग ही त्रिस्थळी फिरून आल्याशिवाय पूर्वजांना सद्गति नाहीं या भावनेमुळें दक्षिणेकडचे गुजराथेंतले व बंगालचेही हिंदु उत्तरेकडे जाऊन येतात. काशीची कावड रामेश्वरला व रामेश्वरचा सेतु काशीला नेण्यांत सारा देश पाहण्यांत यावा हाच हेतु असावा. अष्टविनायक व बाराज्योतिर्लिंगें हिंडणारे

हजारो लोक असतात. महत्वाचीं तीर्थक्षेत्रें भरतखंडाच्या सर्व भागांत आहेत. हिंदुस्थानांतील देशी भाषांच्या वाढीला व परस्परसंगतीला तीर्थयात्रेच्या मिषानें सर्वप्रांत पाहून येण्याचा प्रघातही पुष्कळ अंशीं कारण झालेला आहे. ज्ञानेश्वरनामदेवांनीं उत्तरेकडील यात्रा केल्या व नामदेव हे तर पंजाबांत कांहीं वर्षें राहिले होते हें आपण मागील खंडांत पाहिलेंच आहे. पैठणास राहणाऱ्या नाथांचें मराठी भागवत काशीस लिहून प्रगट झालें. 'वाराणशी पाहिली द्वारका' असें तुकोबांनीं म्हटलेंच आहे. समर्थांचा संचार तर सर्वप्रसिद्धच आहे. बंगालचे चैतन्यप्रभु पंढरपूर, व जेजूरी पाहून गेल्याचें त्यांच्या चरित्रांत नमूद आहे. काशी, प्रयाग, गया, अयोध्या, द्वारका, जगन्नाथ, पंढरपूर, नाशीक, श्रीरंगम्, कांची, श्रीशैल्य, गोकर्ण, रामेश्वर इत्यादि क्षेत्रें साऱ्या हिंदूंना सारखींच पूज्य आहेत. यात्रेच्या निमित्तानें सर्व प्रांतांचे एकमेकांशीं दळणवळण वाढतें, यात्रेकरूंबरोबर आचारविचारकल्पनांचा विचारविनिमय होतो व माणसांबरोबर नानाशब्दही प्रांतोप्रांतीं फिरून कांहीं माणसाळतात व कांहीं रूपांतर पावतात. मराठी भाषेंत किती तरी कानडी, गुजराथी, हिंदी, आरबी, फारशी शब्द घुसून ते पक्के रूढ होऊन गेले आहेत. ते काढून टाकून भाषा सोंवळी करायचा प्रयत्न करणें म्हणजे तिचें आंग सोलण्याइतकें आत्मघातकीपणाचें वाटतें! मागे सांगितलेल्या आठ भाषांपैकीं मराठीला कानडी व गुजराथी भाषा शेजारधर्मामुळें परस्परसंगत झालेल्या आहेत. बंगाली भाषा व मराठी भाषा या दूरपणामुळें बऱ्याच भिन्न राहिल्या. हिंदी भाषेचा मात्र सामान्यस्वरूपामुळें परस्परांशीं निकट संबंध अधिक आहे. महाराष्ट्रीयांची त्रिस्थळी हिंदीभाषेच्या प्रांतांत असल्यामुळें व त्यांचें काशीप्रयागकडे पूर्वापार जाणें येणें असल्यामुळें हिंदी—मराठींचें नातें अधिक जवळचें वाटतें. बहुतेक मराठी साधुसंतांनीं हिंदींत पद्य-रचना याच कारणासाठी केलेली आढळते. हिंदी ही इतर प्रांतीय भाषा-पेक्षां मराठीला जवळची आहे. नामदेवांच्या गोष्टी नरसी मेहत्याच्या

काव्यांत उल्लेखिलेल्या आहेत. नरसीमेहत्यांची हुंडी पटवल्याची गोष्ट मराठी साधुसंतांना माहीत होती. एकनाथांच्या कवितेंत रैदास चामार ( रोहिदास चांभार श. १३६८ ), जन जसवंत, सूरदास, कबीर, मीराबाई यांचे यांच्या गोष्टींसह उल्लेख आलेले आहेत. कबीराचे देव शेले विणी, रोहिदासासवें चर्म रंगवूं लागे, मिराबाई विषाचा पेला प्याली या गोष्टींचे नाथांनीं उल्लेख केले आहेत. तुकोबांच्या अभंगांत यांचे उल्लेख असून दादू पिंजारी, लतीफ मुसल्मान यांचेही उल्लेख आहेत.

---

## १० सर्वांचा सिद्धांत एकच.

एका वेदाचे चार वेद झाले व त्यानंतर त्यांच्या आधारावर अनंत ग्रंथ रचले गेले तरी सर्वांचा सिद्धांत एकच आहे हें 'बृहद्वाक्यवृत्तिटीकेंत' **रमावल्लभदास** फार बहारीनें सांगतातः—सोन्याच्या खोटींतून हजारो अलंकार घडतां येतात, कापसांतून कल्पाल तितकीं वस्त्रें तयार होतात, एकाच उदकावर तरंगांच्या नाना पंक्ति असतात, अथवा " मुळीं एक गहू । त्याचे होती प्रकार बहु । परमात्मा तैसा वेदीं चहूं । एकचि सर्वी वर्णिला असे । एकचि वेदार्थ निका । मग देशोदेशींचा आइका । अपार भाषा अपार टीका । परी निर्वाण अर्थ एकचि ॥ अनंत सिद्धांच्या अनंत वाणी । तेथें अनंत दृष्टांतांच्या अनंत खाणी । देती ज्यालागीं पुराणीं । तें तूं ब्रह्म अवधारीं ॥ " ह्या अनंत ग्रंथांतून तूं एकच सार घेऊन कृतार्थ होः " अवधारीं तें एकचि सकळ । परब्रह्म तूं सत्य केवळ । माया महत्त्वादि अकळ । त्रिगुणविस्तार जाणावा ॥ जाणावा आपण—जैसा तैसाचि आहे । प्रपंच तंव मृगजलवत् पाहे । ऐसी धारणा धरूनि राहे । दुसरें नाहीं सर्वथा " ( बृहद्वाक्यवृत्ति अ० ६ ).

असें आहे तर नवीन नवीन ग्रंथ लिहिण्याच्या खटाटोपांत तूं कां पडतोस ? अशी कोणी शंका काढील तर त्यास उत्तर देतातः—

खरें म्हणाल तर मला बोलण्याचा ' उबग ' ह्या० कंटाळा आला आहे.

नवीन कांहीं लिहिण्यासांगण्यासारखें नाहींच, पण माझ्या लेखनव्यवसायाला दोन कारणें आहेतः ( १ ) 'मज बोलविती संत जिवलग–' माझे मित्र मला स्वस्थ बसूं देत नाहींत व ( २ ) दुसरें असें कीं 'उगें राहवेल केविं मग । प्रबोध पूर्ण जाहलियां?' पूर्ण चंद्रोदय झाल्यावर चंद्रकांताला पाझर फुटल्याशिवाय कसा राहील? अमृताचें आरोगण ( सेवन ) झाल्यावर ढेकर आल्याशिवाय कसे राहतील? नदी सागराला मीनली कीं पुढील प्रवाह खुंटेल पण मागचा यावा ( लोंढा ) येतच राहील त्याप्रमाणें 'देहें भक्तीचा उठावा । आवरिला जायना'. उगाच रिकामटेकडा बसून तरी काय करूं? श्रीकृष्णानेंच श्रमहरणार्थ हा धंदा माझ्या मागें लावून दिला आहे म्हणून लिहिण्यासांगण्याचा उद्योग मी करीत आहे! येणें माझा श्रम हरतो व श्रोतयांचाही श्रम हरतो, ( बृहद्वाक्यवृत्ति अ० १० ) राहवत नाहीं म्हणून बोलतों, स्वसुखार्थ बोलतों अथवा देवच बोलवितों असेंच सर्व सत्कवि म्हणतात.



## ११ मराठी वाङ्मय हा सुखासनाचा मार्ग आहे.

त्र्यंबकरायांनीं आपल्या '**बाळबोध ग्रंथांत (शके १४९४ ते १५०२)**' मराठी भाषेविषयीं अभिमानाचे सरस उद्गार काढले आहेत. 'इंद्रियें श्रवणीं ठेवून' ह्म० सर्वेंद्रियांचें कान करून 'सुवाणी' ( पवित्र वाणी ) व 'सघन' ( भरीव ) अशा मराठी भाषेंतील ग्रंथ वाचावेत.

**जैसा सुखासनाचा मार्गु । तैसा महाराष्ट्रप्रसंगु ।**
**अंगीं बाणे राजयोगु । रोकडाची ॥ ८१ ॥**
**ये मऱ्हाठीचे पलुवें । जीव उगमातें पावे ।**
**तरी कासया उलथावे । पानाचे कवळे? ॥ ८२ ॥**

'मराठी भाषेंतील' अध्यात्मग्रंथवाचनाचा योग म्हणजे सुखासनाचा मार्ग आहे, तत्काळ राजयोग अंगीं बाणून जातो, मराठी भाषेचा पदर धरून जीव मूळ ब्रह्मपदापर्यंत लीलेनें जातो, तर मग

संस्कृत पोथ्यांचे ढीग उपसायचे श्रम तरी कां घ्यावेत? ' ही भाषा ' आर्ष ( मुळांची ) ' आरुती ' (अलीकडची, अर्वाचीन) आहे, तरी तींत ' वेदशास्त्रांचें ' ' दोहन ' ( सार ) आलें असून ब्रह्मज्ञान ' रोकडें करींचें कांकण ' तसें प्रत्यक्ष आहे- उधारीचें नव्हे! ' आदि-वाचा जी गीर्वाण वाणी ' तिच्या हृदयांतून सारा अर्थ काढून तो जीवांच्या पदरीं आम्हीं बांधीत आहोंत. ही ' सुदेशी ' म्हणजे मऱ्हाठी खरोखर संस्कृताचा गर्भ आहे असेंच समजा. कर्दळीचा कापूर बनवितात तसा मराठी ग्रंथ म्ह० संस्कृत ग्रंथांचा गाभाच होय! देववाणी ही वापीकूप आहे, त्यांतील अर्थ हें पाणी आहे, तें देशीभाषारूप पोहऱ्यांनीं वर आणले ह्मणजे सर्वांच्या उपयोगीं पडतें, आणि सामान्य जनांना तरी अर्थाचीच गरज आहे! संस्कृत भाषेंतील अर्थज्ञान मराठी भाषेच्या द्वारें लोकांस समजावून सांगावें, नाहीं तर तें नुस्तें संस्कृत-मध्यें गुरफटून राहिलें तर त्याचा काय उपयोग? आणि मऱ्हाठी भाषेची योग्यता तरी काय सामान्य आहे?

**वापीकूप देववाणी । मध्यें सखोल अर्थपाणी ।**
**ते सुदेशी सेंदणी भरूनी । आहाच कीजे ॥ ९२ ॥**
**अर्थज्ञान पदें प्रासें । वरि बैसती प्रमाणें सुरसें ।**
**ते मऱ्हाठी पुरवील भडसे । विद्वज्जनांचे ॥ ९३ ॥**
**धन्य धन्य हे मऱ्हाठी । हें ब्रह्मविद्येची कसवटी ।**
**हा द्वारशिलेचे पोटीं । परिसु जोडिला ॥ ९४ ॥**

विद्वानांचे मनोरथ पुरविण्याची शक्ति मऱ्हाटींत आहे. तिच्यांत गुह्यार्थज्ञान आहे, ललित पद्यरचना आहे, अनुप्रासादि शब्दचमत्कार आहेत, सुरस प्रमाणांसह प्रमेयांची मांडणी आहे. मराठींत कमी काय आहे? ही ब्रह्मविद्येची कसवटी आहे-ब्रह्मविद्येची परीक्षाच आहे! संस्कृत भाषेच्या खाणीच्या दाराशीं सांपडलेला हा परीस आहे! ' ही घरिंची कामधेनु । आंगणीचा संतानु ( कल्पवृक्ष ) ' आहे, हा

भरून वाहणारा अमृताचा रांजण आहे ! हा पदरीं बांधलेला चिंतामणी आहे, हा आंगणांत सांपडलेला मोक्ष आहे—' बापु रे हें पवित्र वाणी । ऐसीच आहे ! ' ' ही ब्रह्मरसाची पव्हे ( पाणपोई ) आहे, ही लिहितांवाचतां जिव्हेला नटनाच ह्म० उल्हास वाटतो, अशा थोर मराठींत-कवि म्हणतात मी माझा ग्रंथ लिहिला आहे तो हळवा ( हलका ) समजूं नका ! ही सुगंधाची विकास पावलेली कळी आहे—हिचा सुगंध मनांत भरला नाहीं तोंवरच ' महाराष्ट्र बोली ' ह्मणून हिला कोणी नाक मुरडील ! ' केतकीकंटकामाझारी । ही आहे आमोदाची पेटारी. '

**हा समर्थ ग्रंथ उल्हाटे । तैं सर्वज्ञता प्रगटे ।**
**आत्मा राकडाचि भेटे । हें सामर्थ्य याचें ॥ १०२ ॥**

---

## १२ ही गोडी संस्कृतांत कैंची ?

**कृष्णदास मुद्गल** हे ' मराठी व संस्कृत ' याविषयीं बोलतांना ह्मणतात कीं ' वाल्मीकिकृत महाकाव्य ' तेंचि परिसा मऱ्हाष्ट्र । भवच्छेदक सुखदातें'—हें मूळातच भवदुःखनिवारक व सुखदायक आहे तें मी तुह्मांस मऱ्हाठी भाषेनें सांगतों. ' ही चारी पुरुषार्थ साधून देणारी अमृतधारा आहे. युद्धकांडाच्या प्रस्तावनेंत कवि म्हणतोः—

**कथापंथीं महाराष्ट्रवचनें । परि हीं रसिकें अतिगहनें ।**
**जैसीं वनमक्षिकांचीं वदनें । मधूतें स्रवती ॥ १-१०१ ॥**
**नाना संस्कृत हें चंद्रमंडळ । महाराष्ट्र चंद्रिका केवळ ।**
**संस्कृत स्वातीचें जळ । मराठी मुक्ताफळें ॥ १०३ ॥**
**जैसें दधीचें मथन केलें । त्यांतूनि नवनीत निवाडिलें ।**
**तैसें संस्कृतापासूनि जालें । महाराष्ट्रकवित्व ॥ १०४ ॥**
**इक्षुदंड रसनायकु । शर्करा पुढें तयाचा पाकु ।**
**गोडीचा विचार अधिकु । रसनायकीं जाणावा ॥ १०५ ॥**

**असो हें बोलणें वाउगें । आतां वदूं कथेचेनि मार्गें ।**
**श्रोतियांचें मंडळ साहित्यरंगें । शृंगारूं हळू हळू ॥ १०७ ॥**
**मऱ्हाठी वक्तृत्वीं असे रुची । ऐसी संस्कृतामाजीं कैंची? ।**

इतकेंही असून संस्कृतच श्रेष्ठ असा कोणाचा आग्रह असेल तर कवि विचारतोः—

**सुवर्णपात्रीं क्षीर दुहिलें । ते काये रुची दुणावलें ? ।**
**तेंचि मृण्णयपात्रीं घटीं घातलें । माधुर्य पालटेल काई ? ॥१८-११४॥**

———

## १४ संस्कृतप्राकृतच्या अभिमान्यांची खडाजंगी !

'अरबी भाषेंतील सुरस गोष्टींत शोभून जाण्यासारखी एक मनः-कल्पित सुरस गोष्ट दासोपंतांनीं गीतार्णवाच्या दुसऱ्या अध्यायांतील 'वेद-वादरताः' ह्या पदावर टीका करितांना सांगितली आहे. गोष्ट मोठी विचित्र, लांबलचक पण मनोरंजक आहे. त्या गोष्टीच्या पोटांत संस्कृत-मराठी भाषेचा वाद मोठया गमतीनें आणला आहे म्हणून त्याकडे आपणांस लक्ष देणें जरूर आहे. साऱ्या गोष्टीला सुमारें साडेबाराशें ओव्या दिल्या आहेत ! ओव्या धावऱ्या, सुबोध व सुरस आहेत. सारी गोष्ट सांगण्याच्या भरीस न पडतां मुद्यापुरता तिचा मी येथें उल्लेख करितों. एका वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणाचे दोन पुत्र 'तुम्हीं विद्याहीन न व्हावें। माझें नाम राखावें' ही बापाची अंतकाळची आज्ञा मानून विद्याभ्यासासाठीं बाहेर पडले. 'उत्तरे गेला जेष्ठु। दक्षिणे गेला कनिष्ठु !' दोघेही कालां-तरानें विद्वान् झाले. वडिल भाऊ विद्या पूर्ण करून घरीं परत आला-'कनिष्ठुही संपूर्ण जाला। परि विद्यामदें आगळा।'

**नाइके प्राकृत आदरें । बोले संस्कृतेंचि उत्तरें ।**
**अभ्यासूनि सकळ शास्त्रें । मदा आला ॥ २२१६ ॥**
**होईल तरी हो मरणें । परि प्रतिष्ठा आपुली वांचवणें ।**
**संस्कृतेंवांचूनि न बोलणें । बोलवितांही ॥ २३८४ ॥**

त्यानें ग्रामाकडे प्रयाण आरंभिलें, पण मार्गांत एक विघ्न आलें. मार्गी तस्कर आड आले, त्यांनीं याचें वित्त हरण केलें पण हा न बोले, 'प्राकृत ह्मणौनि कांटाळे। साहे घाये'—मार खाल्ला पण प्राकृत बोली बोलेना! 'मुखशंख' करावे, पण 'मग जाला विचारवंतु। नये करूं स्वराघातु। प्रणवु तो स्वयं अनंतु। नादरूपी!' सोळाही स्वरांचा त्यानें विचार केला, 'ययापरी सकल स्वर। देवरूपचि ते साचार। पीटितां अपराधु पाप थोर। आंगीं वाजे.' मग ३६ वर्णांचा विचार केला. 'तंव ते स्वरींच वर्ण भरले! अतेव देवतामय झाले' तेव्हां शंख करण्यासही वेदशास्त्राचा त्याला आधार दिसेना! व्याकरण साह्यास घेतलें पण त्यांतही 'अबद्ध शंखाचें स्फुरण' असेंच ठरलें. बोंब ठोकणें सशास्त्र होईल कीं कसें याचा विचार करण्यांत एक दिवस गेला! 'सभंवता लोकांचा मीनला पाळा' पण हा प्राकृत बोलेना! 'ऐसियाचेनि संगें। शाहाणियाही वेड लागे' असें लोकांस वाटलें. यानें मोठा हुंकार केला तेव्हां लोकांस भय वाटलें. लोक पळत सुटले. 'नगर हालवलें समस्त। बाळकें तेंही भयभीत। ययापरी उद्वस समस्त। पांढरी पडली!' हा ब्राह्मण एक विस्तीर्ण वृक्ष पाहून त्यावर वळंघला. येथें एक राक्षस आहे असें लोकांत पसरलें. त्या वृक्षाखालीं एक वऱ्हाड उतरलें पुढें रात्रीं चोरांचा त्यावर दरोडा पडला. मध्यरात्रीं वृक्षावरून मोठाले हुंकार आले. वऱ्हाडी घाबरून मोकाट पळाले. चोरही भेदरले! 'सांडूनि शस्त्रें वस्त्रें। तस्कर पळाले दिगंतरें। प्राण वांचले थोरें। प्राचीनें म्हणती॥ पायांतें आढिया वेंगडी! मुखीं वळे मौन बोबडी! हृदयीं धकाधक केवढी! काय सांगों!'—असो. ही गोष्ट मी येथेंच सोडून देतों. त्या शब्दपंडिताचें मूर्खत्व व लोकांचा भोळवटपणा या दोहोंचें अत्यंत हास्यविनोदपूर्ण वर्णन सोप्या भाषेंत यापुढें आलें आहे! हास्यविनोदाचें बहारीचें वर्णन आहे! शेवटीं वडीलभाऊ धाकट्याच्या शोधार्थ तेथें आला. त्यानें भावाची समजूत काढली, लोकांची भयभीति दूर केली. सेवट आनंदांत झाला. पोट धरधरून हांसायचें

असेल तर ही समग्र गोष्ट मूळांत वाचावी. वडील भावानें प्राकृत भाषेच्या वर्तीनें धाकटयाची कशी समजूत मांडली तेवढेंच पाहूं, धाकटा भाऊ संस्कृताचा अतिरिक्त अभिमानी! ‘ संस्कृतेंवांचूनि न बोलणें। शास्त्रप्रमाणेंचि देणेंघेणें। अनंत ग्रंथ संग्रहिले येणें। तयाचि हेतु ॥ ’ संस्कृत भाषेवांचून बोलायचें नाहीं, सामान्य लोकव्यवहारांत सुद्धां शास्त्राप्रमाणानींच बोलायचें, असा हेतु त्यानें मनांत धरल्यामुळें हजारो संस्कृत ग्रंथांच्या पोथ्यांचीं त्यानें कपाटें भरून ठेवलीं! त्या पोथ्यांच्या राशींत एकही प्राकृत ग्रंथ औषधालाही नव्हता! आपल्या सर्वज्ञपणाच्या घमेंडींत प्राकृत लोकांशीं बोलणेंच त्यानें टाकून दिलें! ‘ प्राकृतें बोलविलाही न बोले। आइकोनि प्राकृत कांटाळे। ’ आणि चुकून प्राकृत शब्द त्याच्या कानांवर पडलेच तर त्याला वाटे कीं आपल्या उच्च संस्कृतीची मोठी हानि झाली! ‘ येणें वासना मळली। म्हणौनि संस्कृतें चोखाळी! ’ संस्कृत वाचून तो त्या पापाचें प्रायश्चित्त घेई! ‘ प्रबंध कवित्वरचना। प्राकृत केली ते मानीना! ’ प्राकृत भाषेंतलें गद्यपद्य कितीही चांगलें असलें तरी मानायचेंच नाहीं! अनेक युक्तया–प्रमाणें दाखवून तो त्यावर दोषारोप करी. ‘ कवित्व नावडे प्राकृतांचें। सकळही कर्तव्य त्याचें। सत्य न मनी, ययाचें। ऐसें मत. ’

**संस्कृत वाणी देवांची। वेदरूपें ईश्वराची।**
**आणि सकळां ऋषेश्वरांची। स्वर्गवासिया ॥ २५९९ ॥**
**तेचि आपण बोलतां। तयाची पाविजे समानता।!**
**देव मनुष्य तत्वता। होइजे कीं ॥ २६०० ॥**
**प्राकृता वाणीं बोलणें। मानवीं मूर्खीं मूर्खपणें।**
**वेदशास्त्र नेणणें। वैय्याकरण जेहीं ॥ २६०१ ॥**
**आपण तयांसी अनुवादतां। अथवा शब्दें तेणें बोलतां।**
**तयां पामरांची समानता। आंगीं वाजे! ॥ २६०२ ॥**
**देखोनि वायसांचिये सभे। हंसें न राहिजे तेथ उभे।**
**समानता आंगीं झोंबे। तया मूर्खांची ॥ २६०३ ॥**

**लसनाचिये संगतीं । कापुरा दोष लागती ।**
**ह्मणौनि हीनांची सांगती । सांडिली आह्मी ॥ २६०५ ॥**
**देवशब्देंचि ' वो ' ह्मणणें । देवशब्दीं चि अनुवादणें ।**
**मानिती आठही वैय्याकरणें । जया बोला ॥ २६०६ ॥**
**वरि वेदशास्त्रपुराण । निबंध करूनि प्रमाण ।**
**कार्याकार्यी प्रवर्तन । नित्य आमुचें ! ॥ २६०७ ॥**

त्या पंडिताचें मत ह्या आठ ओव्यांत स्पष्ट आलें आहे. सांप्रतच्या काळांत इंग्रजी भाषा व त्यांतील विचार सर्वस्वी प्रमाण मानून प्राकृत भाषेला व प्राकृत लोकांच्या रहणीला व आचारविचारांना तुच्छ करणारे विद्वान् कांहीं थोडे नाहीं झाले ! अजूनही नाहींत असें नाहीं ! थोडे आहेत त्यांतलाच हा एक संस्कृताभिमानी व प्राकृतविद्वेषी पंडित समजावा. इंग्रज श्रेष्ठ व त्यांची वाणी श्रेष्ठ, ते ' स्वर्गवासी ' आम्ही पाताळांतले, त्यांच्या भाषेंत ग्रंथ लिहून व भाषणें करून 'त्यांची समानता' पावण्याची धडपड करणारे, ' वायसाचिया सभेंत आम्हीं हंस उभे राहिल्यास आम्हांला कमीपणा येईल ' अशा घमेंडीनें जुन्या लोकांच्या सभा, मंदिरें, कथाकीर्तनें यांचा विटाळ मानणारे, इ० इ० प्रकारें जुन्या परंपरेच्या लोकांपासून दूर राहणारे एकांडे विद्वान् आजच्या आंग्लविद्याविभूषितांत कांहीं सांपडतात त्यांच्याच एककल्ली विचाराचा वरील पंडित होता असें समजावें ! त्यावेळीं संस्कृत भाषेला-ती धर्मभाषा व संस्कृतिभाषा म्हणून-जो मान होता तोच आज इंग्रजीला-ती राजकारणाची व जगद्व्यवहाराची भाषा म्हणून-मान आहे ! सत्कारमानाला पात्र झालेल्या भाषेचें पूर्ण ज्ञान असूनही लोकांच्या कल्याणार्थ लोकभाषेचा पुरस्कार करणारे दुर्मिळ असतात ! संस्कृत भाषेच्या ह्या फाजील अभिमानाचें खंडन कर्वानें वडील भावाच्या मुखानें कसें केलें आहे व युक्तिवादानें (शास्त्रतः व व्यवहारतः) प्राकृत भाषेचा पुरस्कार कसा केला आहे तें आपण आतां पाहूं:—

आत्मत्वें निर्विकल्प ब्रह्मानुभव घेणें हें मानवीजीविताचें ध्येय आहे.

भाषा हें केवळ साधन आहे. 'जेथें इंद्रियें गळालीं। मनाची स्फूर्ति निमाली। तरंगापरी विराली। बुद्धि जेथें ' असें ब्रह्म चारी वाणींच्या पलीकडे आहे, तेथें संस्कृतप्राकृत हा विचारच नाहीं. बाभळ आणि चंदन दोन्ही अग्नींत सारखेंच भस्म होतात. चैतन्यापासून उत्पन्न होणारें नादब्रह्म सर्वत्र सारखेंच आहे. स्वरूपीं मीपणाची स्फूर्तिच नाहीं तेथें भिन्न भाषांचे शब्दसमूह कोठचे आढळणार ?

**संस्कृत अथवा प्राकृत। जे जे भाषा जेथ जेथ।**
**ते ब्रह्मात्मस्थिति समस्त। ब्रह्माची होये॥** २६२८ ॥

चिन्मात्र वस्तुच शब्दरूपानें व अर्थात् नाना भाषारूपानें आकारते! एका सुवर्णाचे नाना अलंकार–' तेथें भेदु मानावा विचारें। कवणें आतां ? ' ब्रह्म आणि नाद एकरूपच आहेत, तेथें नाना भाषांचे भेद कोठे आहेत ?

**संस्कृत अथवा प्राकृत। समान ब्रह्मचि समस्त।**
**अथवा–निर्विकल्पीं निश्चित। कांहींच नसे॥** २६३३ ॥

शब्दांत प्रयोजन नाहीं, अर्थज्ञानांत कांहीं आहे; पण त्या अर्थाची ह्म० ब्रह्माची प्राप्ति गुरुकृपेनें होत असते, शब्दानें नाहीं! ब्रह्मज्ञानाचें साधन शब्द नाहीं, तर कर्म, भक्ति, योग, वैराग्य हें आहे आणि हें तर क्रियात्मक आहे, शाब्दिक नाहीं! 'यज्ञ यज्ञ, संध्या संध्या, भक्ति भक्ति' ह्या शब्दांनीं कांहीं काम होत नाहीं. त्याग ह्म० दातृत्व हें शाब्दिक काय उपयोगाचें ? हातांतून पैसा सुटणें याचें नांव त्याग! अभ्यासाच्या गोष्टी सांगून कोणी योगी होत नाहीं–तेथें मनाचें जे अमन करितात तेच धन्य होत! रोगनिवृत्तीसाठीं औषधांची यादी वाचून काय होणार ? पोटांत औषधच घेतलें पाहिजे. भोजन म्हटलें कीं ढेकर आला असें होतें काय ? त्याला जेवलेंच पाहिजे. मी भवपार झालों, मुक्त झालों असे शब्द उच्चारल्यानें कोणी मुक्त होतो काय! मी काशीला पोंचलों, फूल हुंगलें, सुख भोगलें–काय येणें ' शब्देंचि होय पारणें।

महासुखाचे? ' तात्पर्य ' क्रियेचें अवबोधन, पदार्थाचें अभिधान, वस्तुचें लक्षण कळावें ' एवढेंच शब्दाचें प्रयोजन आहे आणि हें कोणत्याही भाषा बोलणाऱ्या लोकांना त्यांच्या त्यांच्या भाषेंत रूढ असलेल्या शब्दाच्या योगानें होतें, तेव्हां बाकीचे शब्द तेवढयापुरते निरर्थकच नाहींत काय? वस्तु हातीं आली कीं नाना भाषीं तें सांगण्यांत मतलब काय?

**कणु घेऊनि भूस । देइजे जैसें पश्वादिकांस ।**
**तत्व जाणोनि शब्दास । तैसें सांडावे ! ॥ २६६२ ॥**

शब्दाचा एक उपयोग आहे बोवा! उदरपूर्तीकारणें मूर्ख लोकांना शब्दावडंबरानें ठकवितां येतें!

**शास्त्रें समग्र शिकावीं । अपार वटवट करावी ।**
**नाना उपायीं आणावी । आपणां योग्यता ॥ २६६४ ॥**
**नाना विद्या जाणोनी । नाना मतें शिकोनी ।**
**नानाविध जिंकोनी । वादी लोक ॥ २६६५ ॥**
**आंगीं योग्यता आणावी । मग ते अभिमानें पोषावी ।**
**संसारिकांप्रती दावावी । साधावा रुका ! ॥ २६६६ ॥**

ज्याला अर्थ ( पैसा ) पाहिजे त्याला क्रियेची ( आचरणाची ) चाड काय? अर्थार्थी मनुष्य शब्दाचें वाग्जाळ पसरण्यासाठीं संस्कृतचें ज्ञान मिरवतो. ' आला रुका पुरे ' आतां भाषाज्ञानाचें प्रयोजन काय? आतां संसारमार्गीं लोकांत प्राकृत भाषेनें व्यवहार करावा! असो ' भाषाचि परम ' असें मानूं नये. संसारनगरपेठेंत नाना भाषांचीं नाना नाणीं चालत असतात. जें नाणें एकाला खरें तें इतरांना खोटें– त्यांना तें काय होय? संस्कृत शब्दांचेंच नाणें सर्वत्र चालतें असें थोडेंच आहे!

संस्कृतांत एक ' **घट** ' शब्द आहे. पण त्या घटाचे भेद लोकभाषेंत कितीतरी आहेत! हारा, डेरा, रांजण, मुढा, पडगा, सुगड, तौली, घडी, घागरी, घडौली, अलंदें, चिटकी, मोरवा, पातेली, सांजवणें—

**ऐसे प्रतिभाषेवेगळाले । घट असती नामाथिले ।**
**एकें संस्कृतें सर्व कळे । ऐसें केसेन ? ॥ २६७६ ॥**

संस्कृतांत एक ' **मृत्तिका** ' म्हटली म्हणजे झालें. पण मातीचे प्रकार किती आहेत ? सनघट, चोपण, गव्हाळी, चिकणी, पन्हवट, मळी, चुनवट, माळवट, खळी, खळगा, खात, उतें, गोटल, खडाळ, पांढरी, सेडू, मुरुंबाळ, तांबट, काळी, करळ, इ० इ०

**जळस्थानांचे** प्रकार पहाः— नदु, नदी, वोहळ, झोति, झिरपें, खळाळ, धार, घाळणी, पीळ, धोधें, भंबरा, टांकें, बावी, पोखरणी, बारव, विहिरी, अडु, धरणी, तळें, इ०.

**ऐसे भेद जळस्थानांचे । येक येक बहुतां नामांचे ।**
**सारी प्रयोजन त्यांचें । संस्कृत कैसें ? ॥ २६८१ ॥**

संस्कृत एक ' **कंबल** ' शब्द आहे, पण त्याचे मराठी पर्याय पहाः— जाडी, घोंगडें, चवाळें, कांबळा, आसन, गवाळें, खोगीर, जेन, चोगा, आंगडें, दुताई, कडा, गडेंट, कोचा—' ऐसे भेद ठायीं ठायीं । नामें वेगळालीं. ' असो. असे अनंत पदार्थ आहेत. ' पदार्थभेदा काय मिति आहे ? ' त्या सर्वांचें नांव सर्वत्र काय एकच असतें ?

**कोठे कोठे पुरवावे ? संस्कृतें भेद प्रकाशावे ? ॥**
**व्यवहारा योग्य नव्हे । म्हणोनियां हे ॥ २६८५ ॥**

हजारों शब्द व रचनाविशेष असे आहेत कीं ज्यांना संस्कृत रूप देणेंच अशक्य आहे ! सिट, मासिटे, कापलग, खाराड, झुणें, दुरंग, सेला, पासोडी, पडदा, पडम, पडदाणी, झिळ, विरळ, सागरवानी, कर्सादेविणकरीचे ' नानाविध **कपडे** यांस प्रत्येकीं संस्कृत काय नांव देशील ? नाना देश, नाना भाषाप्रचार, नाना पदार्थ, हे सारे संस्कृत शब्दांनीं कसे जाणतां येतील ?

**ऐसे शब्द बोलतां । जन्मु न पुरे सर्वथा ।**
**न प्रकाशमती संस्कृता । पाषाणही परी ॥ २६९४ ॥**

गोटा, गोटलि, गोटाळा, चिरा, बंडा,: शिरसाळा, कोदवा, किनरी,

हैसाळा, खवला, मुरंबाळा, कुरुंद, सेळू, गोरगोटी, हेदु;—' ऐसा पापाणांचा भेदु । बोल बोल पा ! ' संस्कृत वाणीशिवाय मी बोलणार नाहीं, प्राकृत शब्दांचा आश्रय घेणार नाहीं, असा आग्रह धरशील तर ' व्यवहार येणेंकरून । न चले तुझा ! ' बायकापोरांसीं, नोकर-चाकरांशीं, वाणीव्यापाऱ्यांशीं तुझा व्यवहार कसा चालेल ? निद्रा-भोजन संस्कृतांत कसें करणार ? संस्कृत बोलण्यांतच प्रतिष्ठा आहे असें मनांत आणशील तर ती तुझी कल्पना आहे. ' आतां सांडा हा चाळा । यया संस्कृताचा ! '

दासोपंत महापंडित असूनही त्यांचें प्राकृत भाषेचें ज्ञान किती अगाध होतें याची यावरून कल्पना करावी. नाथदासोपंतासारख्यांचे मराठीवर अपरिमित उपकार झाले आहेत असेंच कोणीहि सुजाण कबूल करील.

---

## १५ एकनाथांचें मराठीवरील प्रेम.

नाथांचें मराठी भाषेवरील प्रेम उत्कट होतें. त्यावेळीं पंडित आपले विचार संस्कृत भाषेच्या द्वारां प्रगट करीत, सर्व धर्मकृत्यें संस्कृतमधून होत व फार मोठा समुदाय अगदीं अज्ञान दशेंत असे. एकीकडे संस्कृ-ताचे अभिमानी पंडित व दुसरीकडे अज्ञसमाज. ह्या अज्ञजनसमाजास धर्माचें व नीतीचें रहस्य त्याच्या बोलींत सांगून त्यांचा उद्धार करावा अशा लोककल्याणाच्या प्रबळ इच्छेनें नाथांनी मराठीचा पुरस्कार केला. नाथ स्वतः गाढे पंडित होते. पंडित सारेच ब्राह्मण होते. तेव्हां आप-ल्यापैकींच एक ब्राह्मण अठरापगड जातींच्या कैवारानें संस्कृतांतील ज्ञान-भांडार मराठींत आणून संस्कृतचें महत्त्व कमी करीत आहे हें त्यांस सहन न होऊन त्यांनीं नाथांचा परोपरीनें छळ केला व तो शांतपणानें सोसून नाथांनीं आपलें लोकोद्धाराचें कार्य अव्याहत चालविलें, निरपेक्ष ज्ञानदानाचें कार्य करून ' खरा ब्राह्मण ' असें सर्वतोमुखीं म्हणविलें.

नाथांनीं मराठीचा पुरस्कार कसा केला, कोणत्या युक्तिवादानें त्यांनीं पंडितांचें सकुंचित मत खोडलें हें आपण त्यांच्या स्वतःच्या उद्गारांवरूनच पाहूं. ज्ञानेश्वरांनीं आपल्या अनुयायी व सहकारी मंडळांत आपलें कार्य केलें, नाथांना पंडितांचें आगर जें पैठण त्यांत राहून त्यांच्याशीं थोडें फार झगडून मराठीचा गाडा पुढें ढकलावा लागला! अर्थात्च हा आपला उद्धारक असून आपल्यासाठीं स्वजातीयांचा छळ सोशीत आहे याची जाणीव जनतेस झाल्यामुळें, नाथांच्या निरपेक्ष लोकसेवेमुळें व त्यांच्या आध्यात्मिक योग्यतेमुळें जनतेनें सहजच त्यांना डोक्यावर घेतलें. नाथांचें ज्ञानसत्र सर्वांच्या कल्याणास कारण झालें. नाथांनीं आपल्या भागवतांत व इतर ग्रंथांत मराठी भाषेच्या संबंधानें व आपल्या कवित्वासंबंधानें काय काय उद्गार काढले आहेत त्याचा आपण येथें विचार करूं.

( १ ) नाथांचा पहिला ग्रंथ जो **चतुःश्लोकी भागवत** त्यांत ते म्हणतातः ' श्री भागवत आणि भाषे मऱ्हाटे । हें बोलणें नवल वाटे । पूर्वी नाहीं ऐकिलें कोठें । ' भागवत आणि तें मराठी भाषेंत ! याचें कोणाला मोठें नवल वाटेल ! संस्कृत ग्रथ शालजोडी असली तर माझा हा महाराष्ट्री ग्रंथ ' घोंगडी ' समजा. मी संतांचें लडिवाळ आहे झणून ' तुम्हीं माझे मराठीचें कोड चौगुण करीत आहांत. ' ' माझिया बोला प्राकृता । ग्रंथार्थ परिसतां साधुसंतां । सुख उपजेल ' असा माझा विश्वास आहे. ह्या ग्रंथांत ' प्रेमरहस्य ज्ञानगोडी ' आहे. ' माझे वांकुडे तिकुडे आर्ष बोल । त्यामाजीं ब्रह्मज्ञान सखोल । नित्य नवी प्रेमाची वोल । हे कृपा केवळ संतांचीं ' ( चतु० भाग० ओवी ९८२ ते १०१५)

( २ ) **शुकाष्टकांत** त्यांनीं म्हटलें आहे कीं, ' जैसा तळहातींचा आवळा । तैसा ग्रंथीं अर्थु दिसे प्रांजळा ' म्हणजे मी संस्कृत भाषेंतील अद्वैतासारखा विषयही मराठींत प्रांजळ करून दाखविला आहे.

( ३ ) **स्वात्मसुखांत** नाथ म्हणतात कीं भानुदासाच्या कवित्ववेलीला एकनाथ हें फळ आलें असून संत त्यामुळें सुखी झाले आहेत,

कां कीं त्यानें ' जी जीवाआंतुली गोडी। अनिर्वाच्य चोखडी। ते लाविली कवित्ववाढी। वाचेच्या आळां '.

( ४ ) **बालक्रीडेच्या अभंगांत** त्यांनीं शारदेची प्रार्थना करितांना म्हटलें आहे कीं, या एकनाथानें ' हरिनामाचा व्यवहार जगीं वाढावा ' यासाठीं ' घातलें दुकान मोलेवीण ' ह्म० हरिभक्तीचा जगांत प्रसार व्हावा यासाठींच निरपेक्षबुद्धीनें हा कवित्वाचा पसारा मांडला आहे. नाथांनीं एका स्फुट अभंगांत म्हटलें आहे कीं, पुराणें किंवा शास्त्रमतें पाहून मी कवित्व करीत नाहीं, हा नुस्ता शाब्दिक संवाद नाहीं किंवा वादबुद्धीनें मी कवित्व लिहित नाहीं तर ' सबाह्य परमानंद हृदयामाजीं ' भरला आहे तोच माझ्या वाचेंतून प्रकट होत आहे. ' नव्हें हें कवित्व प्रेमरसकाढा। भवरोगपीडा दूरी होय '— हें नुस्तें कवित्व नव्हें, तर हा प्रेमरसकाढा आहे, याचें सेवन केल्यानें भवरोगाची पीडा दूर होईल.

( ५ ) **भावार्थरामायण**–राम बलात्कारानें ही राम कथा माझ्याकडून वदवीत आहे असें त्यांनीं चार वेळ म्हटलें आहे. किष्किंधाकांडाच्या आरंभीं ते म्हणतात– " करूं जातां भोजन। ग्रासोग्रासीं स्मरे रघुनंदन। मागें घालूनि जेवण। राम रामायण स्वयें वदवी॥ सांडोनि रामकथा-लेखन। मज करितां गमनागमन। मार्गीं श्रीराम रामायण। स्वयें संपूर्ण प्रकाशी॥ बोलों जातां फुकट कहाणी। तेचि रामकथा होय वाणी। वाचा खिळिली रामायणीं। वचनावचनीं श्रीराम॥ काय नेणों। श्रीरघुनाथा। माझी आवडे मऱ्हाठी कथा। बळात्कारें होय वदविता। न करितां राहों नेदी॥ " निजलों असतां स्वप्नांत राम स्वतः रामायण दाखवितात व आपलें रहस्य सांगतात, सुषुप्तींतही पाठ थापटून मला उठवितात व रामायण लिहायला सांगतात! रामानें अशी माझी पाठ पुरवली आहे! माझ्या कवित्वाचें कर्तृत्व सारें रामाकडे आहे, मजकडे कांहीं नाहीं; म्हणून ' कथा भूषणदूषण। माझें अंगीं नलगे जाण '! ग्रंथाचें निंदक व वंदक दोन्ही मला ब्रह्ममूर्ति आहेत. ह्या रामकथकडे पाहणारे लोक तीन प्रका-

रचे आहेत. ' ज्ञानी निवती परमार्थबोधें । पंडित निवतो पदबंधें । लोक निवती कथाविनोदें । ग्रंथसंबंधें जग निवे. ' ग्रंथांत गुह्यार्थ राखून परमार्थ मुख्यत्वें वर्णावा हें कवित्वाचें अंतरंग आहे. कवित्वाचें मुख्य लक्षण त्यांनीं असें केलें आहेः ' मुख्यत्वें ग्रंथीचें राखावें प्रेम । प्रतिपदीं प्रतिपादावें परब्रह्म । हाचि कावित्वाचा कवित्वधर्म । श्रोते सप्रेम होती सुखी. ' आतां ' शब्दचातुर्यशोभेनें ' संतुष्ट होणारेही आहेत; पण परमार्थ ज्ञानगर्भ अशा कथाच जगाला कल्याणकारक होत असतात. ' याचे मराठी बोल । परी अमृतातें करिती फोल । क्षीराब्धीहूनि अतिसखोल । नित्यनवी बोल स्वानंदसुखाची ' असे नाथांचे श्रोते तेव्हांच म्हणूं लागले होते !

( ६ ) **भागवतांत** मराठी भाषेविषयीं आपली प्रेमोत्कटता नाथांनीं प्रगट केली असून संस्कृताभिमानी पंडितांची समजूत पाडण्याचा प्रयत्न चार वेळां चांगला केला आहे.

मराठीच्या गौरवास्तव ते म्हणतातः—

**संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवि । मा प्राकृतीं काय उणीवी ? ।**
**नवीं जुनीं ह्मणावीं । कैसोनि केविं सुवर्णसुमनें ? ॥ १-१२२ ॥**

सोन्याच्या फुलांत नवीं जुनीं असा कृत्रिम भेद करण्यांत अर्थ काय ? ' जें पाविजे संस्कृत अर्थे । तेंचि लाभे प्राकृतें ' मग प्राकृत भाषेला कमी लेखण्यांत शहाणपण कोणतें ? राजा सिंहासनावर बसला काय किंवा शिकारीवेषानें जंगलांत बसला काय - तो राजाच आहे. ' देशभाषा-वैभवें । प्रपंचपदार्थी पालटलीं नांवें ' म्हणून कांहीं ब्रह्मसुखांत न्यूनाधिकभाव होत नाहीं. आणिक एक विचार आहेः—

**संस्कृत वाणी देवें केली । प्राकृत तरी चोरापासोनि झाली ? ।**
**असोतु या अभिमान भुलीं । वृथा बोलीं काय काज ? ॥ १-१२८॥**
**आतां संस्कृता अथवा प्राकृता । भाषा जाली जे हरिकथा ।**
**ते पावनाचि तत्वता । सत्य सर्वथा मानली ॥ १-१२९ ॥**

संस्कृत भाषा देवानें केली आणि प्राकृत भाषा काय चोरांनीं केली ?

या दुरभिमानाच्या गोष्टी सोडून द्या. ईश्वराचें ज्ञान संस्कृतांत काय किंवा प्राकृतांत काय सारखेंच पवित्र आहे. स्त्री बाळंत झाली कीं दुसऱ्याच दिवशीं नारळाच्या अंगरसांत ह्म० दुधांत काळा कडूबोळ शिजवून तिला प्यायला देतात, तो बोळ साखरेचाच केला तर तो काय कडू लागेल? 'साखरेचा बोळ केला। परी कडूपणा नाहीं आला। तैसा ग्रंथ प्राकृतभाषा जाला। असे संचला स्वानंदू' (९-४९४). प्राकृत भाषेंतच ब्रह्मानंद मिळाला तर घेण्यास प्रत्यवाय कोणता? मोत्यासाठीं पाणबुडे खाऱ्या समुद्रांत बुड्या मारतात, पण दैववशात् सुंदर मोतीं जर परसांतल्या विहिरींत सांपडलें तर तें काय टाकून द्यावें? सोन्याचें पेंडुकें केलें तर कांहीं कोणी तें दगड म्हणून उकिरड्यांत फेंकून देत नाहीं, त्याच्या सोनेपणाला किंमत देतात. 'तैसें भागवत प्राकृत जालें। परी नाहीं चुकलें निजज्ञाना!' संस्कृतापेक्षां मराठी ग्रंथ वाचण्यांत कष्ट कमी पडत असून जर सुलभरीत्या अर्थलाभ होतो तर तो अवश्य घेतला पाहिजे. पारखी जो आहे तो हिरा कोठेंही दिसला तरी गांठी बांधून घरीं आणणारच!

**तैसे ज्ञाते विद्वज्जन। ग्रंथु मराठी देखोन।**
**उपेक्षा न करितां करावा यत्न। पारखोनि चिद्रत्न साधावया॥**
**ज्यांसी निजसुखाची आवडी। ते प्राकृतीं न काढिती खोडी।**
**घेती ज्ञानगर्भाची गोडी। अवस्था गाढी परमार्थीं॥ ९-५०१॥**

ज्ञान कधीं शिळें होत नाहीं!:—

**कालचाचि आज उगवला। तो सूर्य काय ह्मणावा शिळा?।**
**कीं आजिचा अग्नि सोवळा। कालचा काय वोवळा म्हणों ये?**
**तेवीं सनकादिकांचें जें ज्ञान। तेंचि मराठी भाषेमाजी जाण।**
**येथें ठेवूं जातां दूषण। दोषी आपण होइजे॥**

शेंकडों ग्रंथ पाहतांही न मिळणारा ज्ञानार्थ हे 'माझी मराठी' सांगत आहे; 'जें विवेकें न देखवे दिठी। वेदां न बोलवे। गोठी' अशा निःशब्दाच्या सांगे गोठी। चिन्मात्रीं मिठी घालूनी'-ही माझी मराठी

वेदापलीकडील आत्मानुभव तळहातीच्या आवळ्यासारखा प्रत्यक्ष करीत आहे, रोकडा ब्रह्मानुभव सर्वांस देत आहे, पण याचें श्रेय मजकडे नाहीं, माझ्या श्रीगुरुजनार्दनाची ती कृपा आहे. ( अ० १४ )

व्युत्पत्तिज्ञानाच्या अभावीं भोळ्या भावानें 'प्राकृत स्तवन' केलें तरीही भगवान् प्रसन्न होतात. ते भाषेकडे पाहत नाहींत, भाव पहातात. भाषा कोणतीही असली, शब्द कोणत्याही भाषेंतले असले, तरी ते त्यांना चालतात. त्यांना फक्त निर्मळ भाव पाहिजे असतो.

**वेदशास्त्र हो कां पुराण । कां प्राकृत भाषास्तवन ।**
**येथें भावाचि श्रेष्ठ जाण । तेणें नारायण संतोषे॥अ०२७-३४७॥**

या आमच्या मऱ्हाठी गोष्टी आर्ष आहेत, पण यांत 'शुद्ध सोलीव मथितार्थ' आहे, यांत स्वानंदतुष्टी परिपूर्ण' आहे. संस्कृत भाषेंत काय किंवा प्राकृत भाषेंत काय सांगितलेलें 'ज्ञान मुख्य' आहे; भाषेनें ज्ञानांत कांहींएक पालट होत नाहीं ( अ० २९ ) !

**संस्कृत प्राकृत परवडी । सज्ञान सेविती स्वानंदगोडी ।**
**गाय काळी आणि तांबडी । परी दुधीं वाकुडी चवी नाहीं १८**
**देखोनि मराठी गोठी । वृथा न म्हणावी चावटी ।**
**पहावी निजबोधकसवटी । निजात्मदृष्टीं सज्जनीं ॥ १०२४ ॥**
**देवासी नाहीं वाचाभिमान । संस्कृत प्राकृत त्यासमान ।**
**ज्या वाणीं जाहले ब्रह्मकथन । त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे१०२९**
**माझी मराठी भाषा चोखडी । परब्रम्हें फळली गाढी ।**
**संतसज्जन जाणती गोडी । त्यालागी जोडी जोडिला ग्रंथ ॥**
**॥ अ० २९-१०३३ ॥**

---

## १६ नाथांच्या मराठीचें मराठपण.

नाथांच्या भाषेंत संस्कृत, फारशी व मराठी ह्या तीनही भाषांतील ..दांचा यथायोग्य भरणा असून तिचें मराठीपण उत्कर्षाला पावलें आहे. चतुःश्लोकी भागवतादि ८।१० प्रकरणांवर संस्कृत टीकाग्रंथांची व

शास्त्रीय ग्रंथांची छाया आहे, तरी तीं सुबोध व सरस आहेत. त्यांच्या अभिजात भाषेचा व विचारांचा उत्कर्ष त्यांच्या भागवतांत दिसतो. भागवत व स्फुट प्रकरणें ह्यांत फारशी भाषेचे शब्द नाहींत. त्यांच्या अभंगांच्या गाथ्यांत देव, भक्त व नाम यांना धरून जे अभंग आहेत त्यावरही फारशी भाषेचा संस्कार नाहीं. फक्त उपदेशपर अभंग व भारुडें यांत मात्र फारशी भाषेंतील शब्द विपुल आहेत. 'हिंदुतुर्क संवाद' तर फारशीचा नमुनाच आहे. अर्जदास्त, ताकीदपत्र, अभयपत्र, कौल इत्यादि प्रकरणें मराठी-फारशीमिश्रित आहेत. भारुडांत, उपदेशपर अभंगांत व सरासरी निम्या गाथ्यांत थोडे फारशी शब्द आहेत पण लौकिक मराठींतले शब्द व वाक्यरचना यांचे उत्कृष्ट नमुने पाहायला मिळतात. त्यांच्या गाथ्यांत त्यांचीं कांहीं सर्वोत्कृष्ट व लोकप्रिय झालेलीं पदें आहेत;

उदाहरणार्थः—

**( १ ) माझा कृष्ण देखिला काय । कुणि तरि सांगा ग ॥ माझा० ॥**
**( २ ) कृष्णा धांवरे लवकरी । त्रिभुवन हरुषे भारी ॥ कृष्णा० ॥**
**( ३ ) भूत जबर मोठं गडे बाई । झाली झडपण करुं गत काई ॥ भूत० ॥**
**( ४ ) नाथाच्या घरची उलटीच खूण । पाण्याला लागली कैसी तहान**
**( ५ ) धोंगडं माझं बोलणं कान्होबा । धोंगडं माझं बोलणं ॥**
**( ६ ) सगुण गुणमाया । आलि कोल्हाटिण खेळाया ॥**
**( ७ ) झाली संध्या संदेह माझा गेला । आत्माराम हृदयीं प्रगटला**
**( ८ ) भक्तीचे उदरीं जन्मलें ज्ञान । भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान ॥**
**( ९ ) भिंगाचं भिंगुलं खांद्यावरि आंगुलं ॥**
**( १० ) आई मज मारूं नको । मज मारूं नको । नाहीं नाहीं मी खादली माती । आई मज मारूं नको । मज मारूं नको ॥**
**( ११ ) कशी ही थट्टा । भल्याभल्यासि लाविला बट्टा ॥ ध्रु० ॥**
**( १२ ) एडका मदन । तो केवळ पंचानन ॥ ध्रु० ॥**
**( १३ ) कानावाटे मी नयनासी आले । शेवटीं नयनाचा नयन मी झाले**
**( १४ ) सगुणचरित्रें परम पवित्रें हरिचीं वर्णावीं ॥**

( १५ ) **कृष्णा एक पांखरूं आहे । तें मुखेविण चारा खाये ।-**
( १६ ) **कसें बोटानें दाखवूं तुला रे । घे अनुभव गुरूच्या मुला ॥**

( २ ) नाथांच्या अभंगादि स्फुट काव्यांत व जोहारादि भारुड प्रकरणांत लोकांची बोली इतकी उत्कृष्ट वठली आहे, मराठी भाषेचें मराठपण त्यांत इतकें सुंदर विकास पावलें आहे कीं, त्याला मराठींत खरोखरीच तोड नाहीं. नाथांची भाषा अगदीं घराऊ आहे. ग्रंथकारांनीं '**ग्रांथिक**' भाषा वापरावी कां '**व्यावहारिक**' भाषा आपल्या ग्रंथांत उपयोजावी असा अलीकडे एक वाद निघाला आहे. लोकांत वावरणारा लोकांच्या बोलींतच लिहिणार व बोलणार व ग्रंथांतच डोकें खुपसून राहणारा ग्रांथिक भाषाच बोलणार व लिहिणार हें उघड आहे! ज्ञानेश्वरी व नाथभागवत ह्या ग्रंथांची भाषा **नागरी मराठी** आहे, पण नाथ लोकांच्या उद्धारासाटीं लोकांच्या आखाड्यांत उतरले तेव्हां लोकांच्या खास बोलींतच तें बोलूं लिहूं लागले. तिला **खेडवळ** किंवा ग्राम्य ( वाईट अर्थानें नव्हे ) मराठी म्हणा पाहिजे तर ! लोकांच्या बोलींत लोकांना समजेल असें बोलतो तोच लोकनायक लोकप्रिय होतो व भाषेचा उद्धर्ता तोच होय. अगदीं घराऊ भाषेचीं उदाहरणें:—

( १ ) **बारा सोळा मुलें झालीं आल्या सुनानातु ।**
**द्रव्य होतें सरोनि गेलें-कंबरेवरी हातु ॥**
( २ ) **हाट करूनि घरासी आणली बसली वसरीच्या कांठीरे ।**
**घरची बाईल बाहेर निघाली वसवसून लागे पाठींरे ॥**
( ३ ) **वेणीफणी काजळकुंकू केला टाकमटिक्का ।**
( ४ ) **कन्यापुत्र पोट पिकेल । दारचा वेल मांडवा जाईल ॥**
( ५ ) **हातीं भोपळा घ्यावा । भिकेसी हा उपाय बरवा ॥**
( ६ ) **कांहीं पडतां जडभारी । वाचे ह्मणे विठ्ठल हरी ॥**
( ७ ) **कनककांता नये चित्ता । तोचि परमार्थ पुरता ॥**
( ८ ) **जग झोडी जगझोडी । नांव ठेविले लाडी ।**
( ९ ) **जिता नाहीं अन्न । मेल्या करितीं पिंडदान ॥**

(१०) काळाचे आहारीं । पडतीं शेवटीं निर्धारीं ॥
(११) वाढवितां कर्मभ्रम । न कळेची परब्रह्म ॥
(१२) प्रायश्चितांच्या कोटी । पळताती बारावाटी ॥
(१३) फुगडी घाली मीपणाची । वेणी गुंफी त्रिगुणाची ॥
(१४) कृपेचा कोवळा । पाळी भक्तांचा तो लळा ॥
(१५) मर्कटासी मदिरा पाजिली । तेंवीं भुलली विषयांसी ।
(१६) दवडोनियां हिरकणी । वेंचीं आनंदें गारमणी ॥
(१७) तुटेल बंधनाची बेडी । होईल कैवल्याची जोडी ॥
(१८) मिथ्या हा संसार । अवघा मायेचा बाजार ॥
(१९) विषयप्राप्तीलागीं जाण । धरी बकापरी ध्यान ॥
(२०) करिती कुंथाकुंथी । शिकविले नायकती ॥
(२१) उठा की जी मायबाप कशी लागली झोप ।
हुजूर जाउनीयां एवढी चुकवा खेप ॥
(२२) ऐक्यत्वाचें बिरडें ( गांठ ) जोडी ।

( ३ ) पुढील सुंदर **शब्द किंवा वाक्यार्थ** नाथांच्या अभंगांत वारंवार येतातः—

( १ ) नामामृतसंजीवनी ( २ ) नामरसायन ( ३ ) कुर्वाळिलें वदन । चालिलें स्फुंदन ( ४ ) पीक पिकलें प्रेमाचें ( ५ ) मनाचें मोहन जीवाचें जीवन ( ६ ) सचेतनीं पूजा ( ७ ) तुमचें कृपेचें पोसणें ( ८ ) गाढवां सांगातीं सुकाळ लाथांचा ( ९ ) अर्थापोटीं नाहीं परमार्थ ( १० ) त्याची पोळी पिकली ( ११ ) वळचणीचें पाणी आढयाला गेलें ( १२ ) खोटे नाटे जडे मुटे ( १३ ) संसाराचें बिरडें फिटलें ( १४ ) भक्तिसुखें दोंद वाढलें ( १५ ) देह काळाचें भातुकें ( १६ ) भक्तिसुखापुढें ब्रह्मज्ञान लाळ घोटी ( १७ ) त्याहीं मांडिला घराचार ( १८ ) जळीं स्थळीं काष्ठीं भरला ( १९ ) काय याचे मुखीं बैसे दांतखीळ ( २० ) अमृत विकून कांजी प्याला ( २१ ) पायीं पडली बेडी प्रपंचाची ( २२ ) चित्त वित्तावरी । भक्ति लोकाचारी ( २३ ) उभ्या

बाजारा फजिती ( २४ ) ब्रह्मा मुंगी धरूनि स्वरूप तुझें सांवळें ( २५ ) गोमटीं गोजिरीं पाउलें साजिरीं ( २६ ) झडतो नामाचा चौघडा ( २७ ) बु:गुंडा व्हइल तुला बरगुंड व्हइल ( २८ ) श्वानाचा तो धर्म करावी वसवस ( २९ ) तिखट नखें बोंचकरितो ( ३० ) जीवाचें जीवन जनीं जनार्दन.

( ४ ) **अनुप्रासात्मक व ध्वनिमधुरशब्दांचीं** कांहीं उदाहरणें पहाः—

भोगी का त्यागी अथवा हो योगी; वेदांत, धादांत सिद्धांत; मुमुक्षु-साधकसिद्ध; वादक, निंदक भेदक; दैन्य, दुःखदारिद्र्य; दिवाळी; दसरा धनमान, भाळेभोळे, भुक्तिमुक्ति, साबडेभोबडे, उंचनीच, हीनदीन-वाणी, मुक्त मुमुक्षूंचें माहेर ( पंढरपूर ), सत्याचा सेतु, भावाचा भुकेला, भाविक–टवाळ, मेरु–मशक, चित्ताचा चोरटा, विषयी–मुमुक्षु, सांडीमांडी, आनंदकंद, राज्यांतीं नरक, जीव दिक्क झाला, भांबडभूत, भोचक, डालगज बायको, लेंकुरवाळी इ०

एकनाथ हे अर्वाचीन मराठीचे जनक आहेत यांत शंका नाहीं.

( ५ ) नाथांच्या मराठीचा आणखी एक विशेष सांगायचा आहे तो हा कीं त्यांनीं जोशी, आंधळा, पांगळा, डोंबारी, भुत्या, मुरळी, कोल्हा-टीण, इ० विषयांवर जीं भारुडें लिहिलीं आहेत तीं त्यांच्या नेहमीच्या पद्धतीनें जरी अध्यात्मतंतूनें विणलीं आहेत तरी त्यांची भाषा त्या त्या विषयाला पूर्णपणें अनुरूप अशी आहे, म्हणजे प्रत्येक पात्राची भाषा त्या त्या पात्राला साजणारी असून त्या त्या पात्राचें विशिष्ट साहित्यही त्याबरोबरच पूर्णपणें वर्णिलें आहे ! ह्या म्हणण्याच्या सिद्ध्यर्थ चारदोन उदाहरणें देतोः—

( १ ) **मल्हारी** देवाचे सेवक **वाघ्या व मुरळी** यांच्या वर्णनांत त्यांचीं दिवटी, बुधली, कोटंबा ( वाडगा ), भंडार, घंटा, तुणंतुणं, घुंगरी, जेजुरीची वारी इ० सर्व प्रकार यथातथ्य आले आहेत.

( २ ) **संन्याशी** म्हटला कीं ' वरवर शेंडी बोडी । जानवें तोडून धोत्रें फाडी । हातीं घेउनि दंड लाकडी ' नारायण नारायण म्हणणाऱ्या संन्याशाची मूर्तिच पुढें राहाते.

( ३ ) **भुत्या** म्हटला कीं तो आपलें चवंडक वाद्य, परडी, संबळ, पोत घेऊन उभा !

( ४ ) **कोल्हाटीण** आली कीं चोहटयावर वेळू पुरून त्यावर उफराटया उडया, तो ढोलगें पिटणारा कोल्हाटी, चार हिजडे वगैरे सर्व आलेच.

( ५ ) **सौरी म्हणजे शिनळ**—हिच्या वर्णनांत हिचें नुस्तें ओंगळ चित्र उभें आहे. आमचे सभ्य वाचक ' अश्लील ' ह्मणून बिचकतील यास्तव येथें कांहीं लिहीत नाहीं ! सौरीवर नऊ पद्यें आहेत. त्यांत सौरीचें सारें चरित्र आलें आहे !

( ६ ) **ढालगज**:— मूळमायेच्या ह्या वर्णनांत अध्यात्म आहेच, पण भाषा अगदी प्राकृत ! ' पहिलें कोठेंच नव्हतें कांहीं ' असें तें शून्य- ' तिथें एक ढालगज निर्माण झाली. ' ती ' इंद्रादिकांस ह्मणे बाहुली । अमरपुरी तिची वरकुली '-ती मूळची कर्णकुमारी । तिचा बाप तो ब्रह्मचारी । ... । तिनें बापचि दादला केला । ... तो तियेसि शिवला नाहीं । वांझ गर्भीण झाली पाही । व्याली पांच पंचविस पोरें तीही ॥ ऐसी व्याली ते सकळ सृष्टी । न पडतां भ्रताराचे दृष्टी । एका जनार्दनी या गोष्टी । विचारा सद्गुरूच्या मुखीं. "

असो. अधिक विस्तार येथें नको. हस्तामलक व शुकाष्टक ह्यांवर टीका लिहिणारे नाथ अडाणी, अशिक्षित व त्याहूनही खालच्या लोकांत मिसळून त्यांना अध्यात्माचे धडे देत त्यांचा उद्धार करण्याच्या उद्योगांत आहेत हें पाहिलें म्हणजे त्यांच्या व्यापकतेची कमाल वाटतें स्वतः खालीं न येतां खालच्यांना वर कसें घ्यावें हें ' नाथांनीं 'च जगास शिकविलें ! ' अनाथ ' बिचारे काय शिकवणार ! '

---

## १७ सत्कवि व असत्कवि.

रमावल्लभदास म्हणतात कीं ‘ कवि नसते धरणीवरी । परमार्थ कळतां केवि तरी ? ’ त्यांच्यानंतर ३० वर्षांनींही दासबोधांत ‘ नसतां कवींचा व्यापार । तरी कैचा असतां जगदुद्धार ? ’ असेंच म्हटलें आहे. महाराष्ट्रीय संतांनीं संस्कृत ग्रंथांचें रहस्य मराठींत सांगून जडमूढांच्या उद्धाराचा मार्ग अतिशयच सोपा करून दिला. ‘ उदर भराव्याकारणें । नरस्तुति जेणें करणें । भगद्भाव न धरणें । तेणें पावणें अधोगति. ’ ज्यांत ‘ भावार्थ नाहीं ना भक्तिज्ञान । वैराग्य नाहीं ना ज्ञानध्यान । शांति नाहीं ना समाधान । ते अज्ञान शीघ्र कवि ! ’ ह्या कवींचा उपयोग कोणाला ? हे ‘ देहाभिमान वाढविती । शांति समाधान उडविती । भक्तियुक्त ज्ञान बुडविती ! ’ पारमार्थिक कविही नवरसांचेंच स्वरूप दाखवितात पण ते भक्तिज्ञान संभाळून वर्णितात. “ शृंगारीं हरीच वानिती । वीरामाजी हरीच दाविती । करुणांत हरीच आठविती । हास्य वानिती हरीचें ।। रुद्रावेशें हरी सांगती । भयानकीं हरी बोलती । बीभत्स हरीच म्हणती । अभ्दुत गती हरीची ।। गाताति हरीचा शांतरस । तेणें न बाधती नवरस । ते गुणातीत डोळस । भव–कसकस निवारिती ।। या लागीं हरिचरणीं तत्पर । निरभिमानी निर्मत्सर । ते तारक कवि परात्पर । मी सादर त्यांच्या पदरजीं ।। ” ( चमत्कारीं टीका अ० १५ )

कवि म्हणजे गाणारे. कवित्व आणि गायनकला यांची खरोखर एकरूपताच आहे. गायनाचे अंगीं अद्भुत शक्ति आहे. ‘ गायनकला सद्यः फळे । तानकर्में वृत्ति गळे । माजीं नाम माझें विवळे । तें खूण कळे मजलागीं ! ’ ‘अशा प्रेमळ गायकांची धन्य आहे. पण गायक प्रायः–गायन विद्या कमावून पोटाच्याच मागें लागतातः ‘ मज न जाणती ते गायक असंत । धनवंत उपासिती ! ’ (अ० १० ) ते ‘ कवित्व–पदबंध–व्युत्पत्ती । गायनकला पूर्ण शिकती !–’ इतकें श्रम करून– ‘ तेणें धनमानासी धांवती ’– एवढी धनमानाची वासना हे सोडतील तर काव्यगायनाच्या साह्यानें उद्धरून जातील ( अ० १३ )

## १८ मराठीची वकिली !

मराठी भाषेची तरफदारी करितांना मुक्तेश्वर आपल्या सुललित वाणीनें ( आदि० ) सांगतातः—

**वेदशास्त्रस्मृतिपुराणें । नाना इतिहासव्याकरणें ।**
**गाळूनि विचाररसायणें । द्वैपायनें कुशलत्वें ॥ ८६ ॥**
**सुरस सुंदरी पवित्र मृष्टी । पक्वान्नें निपजवूनि पाठीं ।**
**संस्कृतशब्दसुवर्णताटीं । श्रेष्ठश्रेष्ठां वोगारिलीं ॥ ८७ ॥**
**तेंचि रसायण दुर्बळपणीं । महाराष्ट्र भाषा-रंभापर्णीं ।**
**वाढिलें, तरी भुकाळू जनीं । न सेविजे किमर्थ ? ॥ ८८ ॥**

" वेदशास्त्रपुराणांचें रहस्य महाभारतांत ग्रथित करून गीर्वाणभाषेच्या सुवर्णताटांत थोरथोरांना ( संस्कृतज्ञांना ) जीं स्वादिष्ट पक्वान्नें व्यासांनीं वाढलीं तींच म्यां दुर्बळानें महाराष्ट्रभाषारूप केळीच्या पानावर वाढली तर भुकाळू जनांनीं ( भारतकथाजिज्ञासूंनीं ) कां सेवूं नयेत ? " अवश्य सेवावींत हा भाव.

**तेवीं अर्थीं घालितां दृष्टी । न म्हणे संस्कृत मराठी ।**
**रत्नकुंभीं कीं मृत्तिकाघटीं । गंगोदक सारिखें ॥ ९३ ॥**

राजांना वीररस, विप्रवर्यांना वेदसारांश, परमहंसांना तत्त्वार्थबोध, चतुरांना युक्तिबुद्धीचा सागर, विलासी जनांना शृंगार, शास्त्रीपंडितांना त्यांच्या त्यांच्या आवडीचे विषय- याप्रमाणें ज्याला जें पाहिजे तें त्याला माझ्या या ग्रंथांत मिळत असल्यामुळें—

**पर्वतांमाजी कनकमेरु । तडागांमाजी क्षीरसागरु ।**
**महाराष्ट्रकाव्यांसि गुरु । हा गौरवु इये ग्रंथीं ॥ १८ ॥**
**व्यासवचन इक्षुदंडु । गाळूनि सुरस सारांश गोडु ।**
**देशभाषा वळले लाडू । नांवदेचे आवडी ॥ १९ ॥**
**व्यासग्रंथागिरीचें सोनें । संस्कृत खोटिये गाळूनि मनें ।**
**देशभाषा घडिले लेणें । साहित्यरत्नीं सुजडित ॥ २१ ॥**

**तें लेववितां कर्णभूषण । कां हो परतें करावें कान ? ।**
**श्रोतेहो ! तुम्हीं विचक्षण निर्मत्सर विचारा ॥ २२ ॥**

संस्कृतकथानकांचा मधुररस काढून त्याची साखर बनवून मी देशभाषेंत गोड लाडू बनविले आहेत व हें काम मी लौकिकार्थ किंवा धनार्थ केलें नसून 'आवडीनें' केलें आहे. उंसाची कांडीं दांतांनीं फोडतांना जे श्रम होतात किंवा तोंडें वांकडीं तिकडीं करावीं लागतात तसे कष्ट येथें घ्यावयाला नकोत ! आबालवृद्धांना हे गोड लाडू आयासावांचून खातां येतात. दुसरा सुंदर दृष्टांत ऐका. 'मूळ भारत, हा एक महापर्वत आहे पण तो सोन्याचा पर्वत आहे. त्याचें लागेल तितकें सोनें घेऊन तें परिश्रमपूर्वक खोटींत घालून गाळून घेऊन व याप्रमाणें स्वच्छ शुद्ध करून त्याचें मराठी भाषेंत मी अलंकार घडविले आहेत व साहित्यशास्त्रांतील नानाविध सुंदर रत्नांत ते जडवून मराठी वाचकांस आयते अर्पण करीत आहे !' सभापर्वाच्या उपसंहारात मुक्तेश्वरानें 'संस्कृतभाषेच्या कापसांतून हा मराठी ग्रंथपट मी तयार केला आहे व हा 'अतिथोर ग्रंथ' झाला आहे' असें म्हटलें आहे.

'गंगोदक रत्नकुंभांत किंवा मृत्तिकाघटकांत जसें सारखें' तसा भारतेतिहासरस प्राशन करणें हें संस्कृताच्या द्वारें काय किंवा मराठीच्या द्वारें काय सारखेंच नव्हे काय ? संतहो ! अर्थाकडे दृष्टी द्या. दुराग्रह सोडा व मराठी काव्य ऐका व वाचा, म्हणजे तुम्हांस कळेल कीं, 'देषभाषा परी भांडार । साहित्याचें जाणिजे !' रस काढून आयतां पेला भरून मी तुमच्या हातीं देत आहे.

# २५ महानुभाव वाङ्मय.



( लेखकः--यशवन्त खुशाल देशपांडे, एम्. ए., एल्. एल. बी. )

शारदाश्रम, यवतमाळ.

## १ भिन्न भिन्न लिप्या.

आमचे विद्वान् मित्र श्री. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं आज्ञा केल्यावरून हें प्रकरण लिहावयास घेतलें आहे. मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या प्रथम खण्डामधील महानुभावप्रकरण श्री. पांगारकर यांनींच स्वतः लिहिलें आहे तथापि प्रेसमध्यें पाठविण्यापूर्वी त्यावरून एकवार नजर फिरविण्याचा मान त्यांनी आम्हांस दिला होता. प्रस्तुत प्रकरणाच्या न्यूनाधिक्याची मात्र सर्वस्वी जबाबदारी आमच्यावर आहे, हें अर्थातच निराळें सांगणें नको.

पहिल्या खण्डामध्यें शके १२७२ पर्यंतचा काल येऊन गेला आहे आणि द्वितीय खण्डांत शके १२७२ ते शके १५७२ पर्यंतचा म्हणजे नामदेवांच्या निधनापासून तों तुकारामाच्या प्रयाणापर्यंतचा तीनशें वर्षांचा काल आला आहे. या कालास श्री. पांगारकर यांनीं एकनाथ-तुकारामांचा काल असें स्थूलमानानें नांव दिलें आहे. तेव्हां या प्रकरणांत या तीनशें वर्षांमधील महानुभाव वाङ्मयाच्या विकासाचा इतिहास दण्याचा मी प्रयत्न केला आहे.

या कालाच्या आरंभीं महानुभाव वाङ्मयामध्यें अपूर्व क्रान्ति घडून आली. यापूर्वी महानुभावीय ग्रन्थकार आपले ग्रन्थ सरळ मराठीमध्येंच लिहित असत. परन्तु यापुढें त्यांनीं आपले ग्रन्थ सांकेतिक लिपींत लिहावयास सुरवात केली ! असा बदल करावयास काय कारणें झालीं, यासंबंधीं महानुभावीय वाङ्मयांत कोठें उल्लेख असल्याचा हा काळ-

पर्यंत आढळ झाला नाहीं. त्या संबंधीं तर्कावरच भिस्त ठेवणें भाग आहे. कै. भावे म्हणतात " आपला धर्म व आपलीं धर्मपुस्तकें आत्मपंथीयांशिवाय इतरांस सुगम असूं नयेत या बुद्धीनें गौप्यता सुरू झाली. व संकेत लिपी प्रचारांत आली. " परन्तु निरनिराळ्या लिप्या कां निर्माण झाल्या यासंबन्धीं त्यांनीं कोठें खुलासा केला नाहीं. आम्ही स. १९२५ मध्यें " महानुभावीय मराठी वाङ्मय " या ग्रन्थांत (पृ.५०) लिहिलें आहे "नाथपन्थ इत्यादि इतर पन्थीयांकडून या महानुभावपंथास उपसर्ग होत असावा व या किंवा इतर दुसऱ्या कांहीं कारणामुळें आपली ब्रह्मविद्या, आपलीं मतें आणि धर्ममतें इतरांपासून गुप्त ठेवण्याची आवश्यकता या पंथीयांस नागदेवाचार्यानन्तर ५० वर्षांच्या आंतच भासूं लागली. या कार्याकरतां महानुभावपंथांच्या निरनिराळ्या आम्नायांनीं निरनिराळ्या संकेत लिपी तयार करून त्यांत आपले ग्रन्थ लिहिले आहेत. " वरील ग्रन्थ प्रकाशित झाल्यानंतर महानुभावांचे अनेक ग्रन्थ उपलब्ध झाले आणि त्यांच्या वाङ्मयाचा अभ्यास वाढला, त्यावरून सांकेतिक लिपींच्या निर्मितीसंबधानें आणखी मीमांसा करणें आवश्यक झालें आहे.

श्रीमद्भगवद्गीतेंत १८ व्या अध्यायांत भगवंतांनीं अर्जुनास म्हटलें आहेः—

**इदंते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चा शुश्रूषवे वाच्यं नच मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥**

या श्लोकांवर टीका करितांना श्रीज्ञानेश्वरांनीं ज्या ओव्या लिहिल्या आहेत, त्यांतील प्रमुख ओव्या खालीं दिल्या आहेतः—

**तरि जें हें तुवां पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था ।**
**तें तपोहीना सर्वथा । सांगावें ना ॥ ७६ ॥**
**गीता नेदीं तैसी तापसा । गुरुभक्ती हीना ॥ ७८ ॥**
**तैसि तपभक्तिमेधा । ते याचि जाण प्रबुद्धा ॥**
**जो माझयाचि कां निंदा । माझीचि करी ॥ ९४ ॥**

---

१ महाराष्ट्रसारस्वत पा. ६७.

**येयाकारणें धनंजया । तो भक्तु मेधावी तपिया ।**
**तर्‍ही नको बापा शास्त्रा इया । आतलों देवों ॥ ९५ ॥**

या अवतरणावरून भगवंतानें जो तपस्वी नाहीं, जो भक्त नाहीं, गुरु-सेवा करीत नाहींत अथवा निन्दक आहे अशांना माझें गीताशास्त्र सांगूं नको म्हणून अर्जुनाला उपदेश केला आहे. श्रीज्ञानेश्वरांनींही तोच अर्थ ज्ञानेश्वरीमध्यें विशद केला आहे. अनधिकाऱ्यांना आपलें शास्त्र सांगूं नये ही प्रथा वैदिकधर्मांत पुरातन कालापासून आहे. फार तर काय पण चांडालादिकांच्या कानींही वेद जाऊं नये असा निर्बंध आहे.

याच परंपरेस अनुसरून आपलें शास्त्र आपल्या पंथाबाहेर जाऊं नये, तें आपल्या पंथांतच राहावें ही प्रथा महानुभावांत पडली. महानुभावांचें नाथपंथीयांशीं आणि इतर पंथीयांशीं वादविवाद होत. त्यांच्यापासून आपलें शास्त्र गुप्त ठेवावें हा तर त्यांचा हेतु असावाच. विशिष्ट लिपींत ग्रंथ असले तर ते अन्यांच्या हातीं पडले तरी परंपराप्राप्त साधना-शिवाय त्याचा उपयोग करतां येऊं नये, हाच उपदेश सांकेतिक लिपी निर्माण करून तीत ग्रन्थलेखन करण्याचा असला पाहिजे. अगदीं प्रथम लिपी सह्याद्रिवर्णनग्रन्थाचे कर्ते राघवोपाध्ये उर्फ खळो व्यास यांनीं शके १२७५ च्या सुमारास तयार केली. तिला सकळ–सगळ लिपी असें म्हणतात. आज बरेचसे ग्रन्थ याच लिपीत लिहिलेले आढळून येतात आणि ती लिपी महानुभाव पंथाच्या बहुतेक सर्व आम्नायांत प्रचलित आहे. ही निर्माण झाल्यानंतर महानुभावपंथांत अनेक लिपी निर्माण झाल्या. आज अशा लिपींची संख्या जवळ जवळ २५ आहे. त्यांमध्यें सुंदरी लिपी, पारमांडल्य लिपी, कवीश्वरी अंकलिपी या प्रमुख आहेत. त्यांपैकीं सुंदरी लिपी श. १२८५ मध्यें, पारमांडल्य लिपी श. १२९० मध्यें निर्माण झाल्या. कवीश्वरी अंकलिपी श. १३२५ च्या सुमारास गुर्जर शिवव्यासानें कल्पिली. याशिवाय वज्रलिपी, सुभद्रालिपी, सिंह-लिपी ह्याहि कमीअधिक प्रमाणानें प्रसिद्ध आहेत.

सगळ लिपी ही एक सर्वसाधारण सांकेतिक लिपी प्रचारांत असतां अशा विविध लिपी तयार होण्याचें काय कारण असावें, हा प्रश्न स्वाभाविकपणें उपस्थित होतो. त्याचें कारण आमच्या मतें पुढील वस्तुस्थितीमध्यें दिसून येतें. नागदेवाचार्य श. १२२४ च्या सुमारास दिवंगत झाल्यानंतर कवीश्वर भास्कराचार्य हे द्वितीय आचार्य झाले. महीन्द्र भट्टानें तयार केलेलें चरित्रग्रन्थ, प्रकरणवशाची पोथी ही कवीश्वराचार्यांजवळ होती. मध्यंतरीं सुलतानाची धाडी आल्यामुळें आचार्य कोकणांत गेले, बरोबर ग्रंथांची झोळी होती. तिकडे चोरांनीं लुटलें त्यांत चरित्रग्रन्थ आणि प्रकरणवश ग्रन्थ हे नाहींसें झाले. चरित्रग्रन्थादि प्रवित्र ग्रन्थ गुरुंच्या देखरेखीखालीं घोकण्याची प्रथा होती. मूळग्रन्थ नाहींसें झाल्यावर अर्थातच ज्यांना ते ग्रन्थ पाठ होते अशा अधिकरणांनीं आपापल्या शिष्यपरिवाराकरितां ते आठवणीनें लिहून काढले. या कारणामुळें चरित्रग्रन्थाचे निरनिराळे पाठ प्रचलित झाले. कवीश्वराचार्यानंतर परशरामाचार्य हे तृतीय आचार्य झाले. परंतु त्यांच्यानंतर सबंध महानुभावपंथाला मार्गदर्शक अथवा नियंत्रक कोणी प्रमुख आचार्य न होतां परशरामाचार्य याच्या सम्मतीनेंच पंथांतील तत्काळीं प्रमुख अधिकरणांच्या तेरा शाखा अथवा कुळी अस्तित्वांत आल्या; त्यांना आम्नाय असें म्हणतात. पुढें कालान्तरानें या आम्नायांच्याही उपशाखा अस्तित्वांत आल्या! या आम्नायांतील अधिकरणांनीं आपापल्या शिष्यवर्गाकरितां चरित्रपाठ तयार केले. वरील सर्व पाठ मुखोद्गत असलेल्या ग्रंथावरून उतरले असल्यामुळें लीळांच्या संख्येंत, क्रमांत आणि खुद्द लीळांतही मेळ राहिला नाहीं.

चरित्रग्रंथाप्रमाणेंच प्रकरणांची पोथी ज्याला सिद्धांतसूत्रपाठ म्हणतात तीही कोकणांत चोरांच्या लुटींत नाहींशी झाली होती. हा सूत्रपाठ केशव व्यास यांनीं चरित्रग्रंथांतून श्रीचक्रधरांचीं वचनें एकत्रित करून तयार केला होता. तो नाहींसा झाल्यावर तोहि मुखोद्गत

असल्यामुळें पुन्हां लिहून काढण्यांत आला, हाच पाठ सर्व महानुभाव पंथांत रूढ आहे. फक्त पारमांडल्य आम्नायामध्यें मात्र भिन्न पाठ आहे. तो पाठ पारिमांडल्य आम्नायाचे प्रवर्तक गोपाळ पंडित–उर्फ आनेराज व्यास यांनीं चरित्रग्रंथांतून श्रीचक्रधरांचीं वचनें उद्धृत् करून तयार केला आहे. याप्रमाणें पंथांत चरित्रग्रंथांचे आणि सिद्धांतसूत्रांचे भिन्न पाठ निर्माण झाल्यामुळें आमच्या अधिकरणानें तयार केलेला पाठच अधिक शास्त्रशुद्ध आणि सत्य आहे अशी भावना निरनिराळ्या आम्नायांत उत्पन्न झाली. त्याचबरोबर आपले पाठ शुद्ध ठेवण्याची आणि ते इतरांस म्हणजे पन्थाबाहेर आणि आपल्या आम्नायाच्या कुळीच्या अनुयायांशिवाय पन्थांतील इतर व्यक्तींनाहि पण ते कळूं नयेत म्हणून आपल्या अनुयायांनाच कळेल अशा सांकेतिक लिपींत ग्रंथ लिहिण्याची प्रथा सुरू झाली. स्वतंत्र सांकेतिक लिपींत फक्त चरित्रग्रंथ आणि सूत्रपाठ एवढेंच आढळून येतात; आणि बाकीचे महानुभावीय धर्मग्रंथ आणि इतर ग्रंथ महानुभावांना सामान्य अशा सगळ लिपींत दिसून येतात.

---

## २ मुनि व्यास आणि स्थानपोथी.

शके १२७२ च्या सुमारास महानुभावपंथास बरेंच स्थैर्य आलें होतें. पंथाचा प्रसार सर्व महाराष्ट्रभर झाला होता. त्या पंथास पूज्य असलेल्या अवतारी विभूति श्रीदत्त, श्रीकृष्ण, श्रीचक्रपाणी, श्रीगोविंद-प्रभु आणि श्रीचक्रधर यांच्या लीळांनीं पवित्र झालेलीं स्थानें सर्व महाराष्ट्रभर आणि महाराष्ट्राबाहेरही पसरलेली होती. त्यांपैकीं कित्येक स्थानांवर झालेल्या लीळा तर कित्येकांच्या आठवणींत होत्या. पुढील पिढीस त्या समजाव्या म्हणून त्या स्थानांवर स्मृतिचिन्हें रहावीं आणि तीं एकत्रित अशी एखाद्या ग्रंथात वाचावयास मिळावीं म्हणून त्या दिशेनें प्रयत्न करण्यांत आला. कुमाराम्नाय कोठी उर्फ मुनि व्यास या महा-

त्यानें अशा पवित्र स्थळीं ओटे बांधविले आणि या सर्व स्थानांवर काय काय लीळा झाल्या व तीं स्थळें कोठें आहेत याचें वर्णन करणारा एक गद्यग्रंथ लिहून ठेवला. त्या ग्रंथास स्थानपोथी असें म्हणतात. हा श. १२७५ च्या सुमारास लिहिला. हा ग्रंथ अद्याप अप्रकाशित आहे परंतु त्यांतील ऋद्धिपुरविषयक स्थानांचा भाग आम्हीं संपादन केलेल्या श्रीऋद्धिपूरवर्णन नांवाच्या ग्रंथांत परिशिष्टरूपानें दिला आहे. त्यावरून दिसून येईल कीं, लेखकानें स्वतः त्या त्या स्थळीं जाऊन स्थळांचें मोजमाप, चतुःसीमा इमारतीचें वैशिष्ट्य इत्यादि टिपून घेऊन परिश्रमपूर्वक ग्रंथ तयार केला आहे.

ऋद्धिपूर येथील प्रसिद्ध तिन्ही मठांपैकीं त्रीपुरुषांच्या मठासंबंधानें असें लिहिलें आहेः—

**श्रीरिधपुर नगर : तेया नगराचा नैऋत्यकोणी : पसीमे महा प्रसीध विसाळ : पूर्वाभिमूख [1]जगती असे : तिये जगतीभीतरि : [2]वाव्य कोणी : पूर्वाभिमूख राजमवु असे : तेया राजमटाचा [3]अग्न कोणी : उत्तराभिमूख : त्रीपुरुषांचा मटु : तेथचे [4]विसेख : पाइरीया : ३ : तेयांसी खळ : १ : पूर्व पसीम पटीसाळ : २ : तेथ पटिसाळेचां पूर्वीली सीरा [5]खातें : तेथ गणेसु : तणेसीं खेळू : ४ : भीतरी रीगतां पुर्वीली दार संकेसीं आसन : ५ : तेथुचि द्रावड देसीचेया ब्राह्मणासि भेटी : देस भाषानुवादु : ६ : तेथीचे मर्दना : आंगणीं मादनें पाइरिया खालि पांडा एका मादनें : ७ : पाइरियां वरवंडेयांवरि वस्त्रे वेढणें : ८ : भीतरि पूर्वीली भीत भंगेसीं : आसन : पसिमीली : ९ : समोरीले खांबेंसी : आरोगण : १० : मधीलां दोहीं खांबेंसीं खेळु : ११ : त्रीपुरुषेंसीं खेळु : १२ : एवं त्रीपुरुषांचा मटु ॥ * ॥**

छोटीं छोटीं वाक्यें, मोजके शब्द, उपमादृष्टांतादि अलंकारांचा

---

१ आवार. २ वायव्य. ३ आग्नेय. ४ विशेष–वंदनीय स्थानें. ५ कोनाडा.

अभाव असें तत्कालीन गद्यलिखाणाचें वैशिष्ट्य होतें. या स्थानपोथी-मध्यें रिधपूर, फलटण, सिन्नर, पैठण, नाशीक, मेहकर इत्यादि अनेक शहरांचा व स्थळांचा उल्लेख असून तत्कालीं त्या त्या ठिकाणीं असलेल्या प्रसिद्ध स्थानांचा, मंदिरांचा देवतांचाही उल्लेख आढळतो. मात्र चरित्र-ग्रंथांमधून वरील पांच अवतारी पुरुषांशीं संबंध अशाच स्थानांसंबंधींच तो उल्लेख आहे हें वर आलेंच आहे.

---

## ३ न्याय व्यास यांचा हेतुस्थळ.

न्याय व्यास बाइंदेकर हे उपाध्य आम्नायांतील होत. श्रीचक्रधारापासून यांची सहावी पिढी येते. जनोपाध्ये यांची प्रसिद्ध शिष्यीण आणि उपाध्यआम्नायप्रवर्तक कमळाउसे इच्या शिष्यीणीचा हा शिष्य होय. यांनीं श. १२७५ च्या सुमारास लीळाचरित्र या ग्रंथावर हेतुस्थळ या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यामध्यें श्रीचक्रधरांनीं निरनिराळीं सूत्रें कोणत्या प्रसंगीं व काय हेतूनें सांगितलीं याचें विवरण आहे म्हणून या ग्रंथास हेतुस्थळ म्हणतात. तो गद्यांत आहे. न्यायव्यासांच्या नांवावर अनेक संस्कृत व मराठी ग्रंथ आहेत. त्यांत स्मृतिवृद्धाचार, लीळा-प्रयुक्ति, सिद्धांतस्थळ इत्यादि प्रमुख आहेत. यांनीं वज्रलिपी आणि सुंदरी लिपी या दोन लिपी तयार करून प्रचारांत आणल्या. सगळ लिपीच्या खालोखाल सुंदरी लिपीमध्यें लिहिलेले बरेच ग्रंथ आढळतात.

---

## ४ बहाळे नारो व्यास यांचें ऋद्धिपूरवर्णन.

बहाळे नारो व्यास यांनीं आपला श्रीऋद्धिपूरवर्णन हा ओवीबद्ध उत्कृष्ट काव्यग्रंथ शके १२८५ मध्यें पूर्ण केला. हा ग्रंथ सटीप संपादन करून आम्हीं प्रसिद्ध केला आहे. कालानुक्रमानें या ग्रंथाचें विवरण या द्वितीय खंडांत यावयास पाहिजे होतें. परंतु हा ग्रंथ महानुभाव वाङ्मय-यांतील प्रमुख साती ग्रंथांपैकीं एक असल्यामुळें व साती ग्रंथांचें विवरण

प्रथम खंडांत रा. पांगारकर यांनीं केलें असल्यामुळें या काव्यग्रंथाचें विवरणही प्रथम खण्डांत येऊन गेलें आहे. पुनरुक्तिदोषास्तव तें मी येथें करीत नाहीं.

महानुभावपंथांतील आरंभीचे कवि आणि ग्रंथकार संस्कृत वाङ्मयाचे पंडित, व्युत्पन्न ब्राह्मण होते. त्यांनीं केलेली मराठींतील ग्रंथरचना अर्थात् संस्कृत वाङ्मयावर आधारलेली होती. संस्कृत वाङ्मयांतील रीति, वृत्ति, अलंकारशास्त्र, रस, वृत्तें इत्यादि सर्व प्रकार त्यांनीं मराठींत जसेच्या तसे घेतले. एवढेंच नव्हे तर आशीर्नमक्रियादि सर्व काव्यलक्षणें प्रारंभीच्या काव्यांत आढळून येतात, भास्कर कवीचा शिशुपाळवध आणि नारो व्यास यांचें श्रीऋद्धिपूरवर्णन हे काव्य ग्रंथ संस्कृत साहित्यशास्त्राच्या कसोटीस पूर्णपणें उतरतात असें आढळून येईल.

## ५ बोपदेवशिष्य पंडित भीष्माचार्य.

महानुभाव सांप्रदायांत भीष्माचार्य नांवाचे ४।५ कवि आणि ग्रन्थकार होऊन गेले. त्यांत बोपदेवशिष्य पंडित भीष्माचार्य हे प्रमुख होत. हे तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेले. देवगिरीच्या रामदेवराव यादव यांचे दरबारांतील प्रसिद्ध विद्वान् कवि व ग्रन्थकार बोपदेव हे या पंडित भीष्माचार्यांचे विद्यागुरू होते आणि उपाध्यआम्नायांतील हेतुस्थळकर्ते न्याय व्यास हे त्यांचे दीक्षागुरु होते. पंडित भीष्माचार्यांनीं संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषेंत बरीच ग्रन्थरचना केली आहे. दिनकरप्रबंध ( अध्याय २४ ) आणि ब्रम्होपनिषदावरील धाराबिम्बसांज्ञिक भाष्य हे याचें प्रमुख संस्कृत ग्रन्थ होत. दिनकरप्रबन्ध हा कवीश्वराम्नाय जयकृष्णसूरी यांचे वचनावरून आणि दत्तात्रयप्रबन्ध हा जंबूकोपाभिध कमळाकर विख्यात योगी यांचे वचनावरून लिहिल्याचा उल्लेख आहे.

पंडित भीष्माचार्यांच्या नांवावर :कै. भावेकृत कविकाव्यसूचिमध्यें

अनेक मराठी ग्रन्थ नमूद आहेत. त्यांत पदार्थदीपिका, मार्गप्रभाकर, धनंजयकोशावरील टीका, पंचवार्तिक, मुक्तामाला, नामविभक्ति, सिद्धान्तस्थळ इत्यादि प्रमुख आहेत. यांची गीतगोविन्दावर 'महाराष्ट्रसुबोधिनी' नांवाची मराठी टीका प्रसिद्ध आहे. नामविभक्ती हा ग्रन्थ व्याकरणशास्त्रावर असून पंचवार्तिक हा भाषाशास्त्रावरील ग्रन्थ आहे. पंचवार्तिक हा ग्रन्थ श्री. मोने यांनीं 'मराठी भाषेचे व्याकरणकार' या ग्रन्थांत प्रकाशित केला आहे.

## ६ पंचवार्तिक.

पंचवार्तिक या ग्रन्थासंबंधानें कै. भावे यांनीं महाराष्ट्रसारस्वतांत जें विवरण केलें आहे (पृ.२०९) तें महत्त्वाचें असल्यामुळें येथें उद्धृत केलें आहे:-

" पंचवार्तिक म्हणण्याचें कारण असें कीं यांत (१) सूत्रलक्षण, (२) सूत्रप्रकृति, (३) सूत्रकारक, (४) सूत्रव्याख्यान, व (५) सूत्रस्वरूप अशीं पाच प्रकरणें आहेत. यांत भाषाशास्त्राच्या निरनिराळ्या भागांचें नियम सांगितले असून त्यांचीं उदाहरणें महानुभावी 'सूत्रग्रन्थांतून दिलीं आहेत. पहिलें प्रकरण 'सूत्रलक्षण' हें आहे. यात सूत्राचे चार भेद सांगितले आहेत. (१) वचन, (२) वाक्य, (३) प्रकरण आणि (४) महावाक्य. प्रथम सूत्र म्हणजे काय ? तर 'अध्याहारें कां पूर्वपदानुवृत्तिसमवेत अल्पाक्षरें असंदिग्ध पदें असेतिः तेंही पदींकरून जेणें प्रयोगें अर्थज्ञान सूत्रिजे म्हणिजे मुद्रिजे, तया प्रयोगातें सूत्र म्हणिजे. 'आतां' सूत्राचे चार भेद कैसे ? तर सूत्राचे चार भेद (१) वचन, (२) वाक्य, (३) प्रकरण, (४) महावाक्य." तें केविं ? तरः—

(१) वचनापासौनि अर्थ निफन्नला तो वचनार्थ: (२) वचनापासौनि वाक्य निफन्नलें, (३) वाक्यपासौनि प्रकरण निफन्नलें, (४) प्रकरणांपासौनि महावाक्य निफन्नलें.

एकीं दों शब्दीं आचारविचाराचा निर्वच तें निर्वचन बोलिजे. जेथें निर्वच नाहीं ते शब्दः लीलेचे दों चौं वचनांचा समुच्चय तें वाक्यः सातांपांचा वाक्यांचा मेळावा तें प्रकरणः सांतापांचा प्रकरणांचा बांधा तें महावाक्य बोलिजे आणि अवघेया महावाक्यांचा आवांका तो पेंडी बोलिजेः अवघेया निरुपणाचा आंवाका, अवघेया प्रकरणांचा समुच्चय यांते पेंडी बोलिजे.

या पुढें वचनप्रकरण आहे. याला 'वचनप्रतिभिज्ञा' असें नांव दिलें आहे. यांत एक विशेष असा आहे कीं, द्विवचन वारंवार सांगितलें आहे. द्विवचनाला छाट चुकून एकदाही दिली नाहीं. आपण संस्कृताप्रमाणें ग्रन्थ लिहावा या भावनेनें हें द्विवचन आलेलें दिसतें. कारण द्विवचनाचीं दिलेलीं उदाहरणें प्रायः अनेक वचनांसारखींच आहेत. या पुढें लिंगप्रकरण आहे. अव्ययाला अलिंग म्हटलें आहे. जसें 'ची, आन, कीं, पर, मा, के, का, एवमादि अव्ययः तिये लिंगरहितें म्हणोनि तयांतें 'अलिंग' बोलिजेति. या पुढें 'सूत्र प्रकृति' म्हणून एक प्रकरण आहे. यांत सूत्राचा अर्थनिर्णय तो कसा ? हें सांगतांना म्हटलें आहे कीं—"निर्णय तीन प्रकारचा ( १ ) शब्दाख्य, ( २ ) संप्रदायाख्य, ( ३ ) रहस्याख्य भेदें त्रिविध जाणिजे. शब्दाख्य निर्णय तो व्याकरणादि प्रधानः छंदोलंकारसंगीत शास्त्रीं करून निर्धारः संप्रदायाख्य निर्णय तो श्रवणमनन निदिध्यासना करून निर्धारिजेः—रहस्याख्य निर्णय तो सद्गुरुमुखें परसूत्रें निर्धारिजेः—यावीण वचनार्थाचें अज्ञान असें म्हणोनि वचनार्थ अन्यथा उमटे? तेणें तो शास्त्रप्रतीत होयःभट्टी भाणितिलें 'अगा केशवा देया हें शास्त्र म्हणजे वचनरूप ईश्वरः तें वचन जैं अन्यथा वाखाणिजे तर तो तया वचनरूप परमेश्वराचा पतित बोलिजे। तेणें तो परमेश्वर दुखावला गा। वचनाचा यथार्थ उमटे। हें जै नसे तै वाकम दिगमाची परी होये म्हणोनि सूत्र प्रकरण बोलिजैल." असें म्हणून या पुढल्या म्हणजे कारणप्रकरणास सुरवात केली आहे. यांत

सात विभक्ती व त्यांचे निरनिराळे अर्थ सांगितले आहेत. यांतच ‘ समासप्रकरण ’ गोंवलें आहे. समासांचीं लक्षणें वगैरे आहेत. यापैकीं एक दोन उदाहरणें देतों. “ प्रथमांतें पदें समासिजेति तो कर्मधारय समास जाणिजेः यथाः महंत जें राष्ट्र तें महाराष्ट्रः महंत जो पुरुष तो महा पुरुषः कर्मधारयसमासीं मध्यमपदाची लोप आणिजे तै मध्यमपद-लोपी बोलिजेः स्वसत्ताअधिष्ठित जो देश तो स्वदेश...आतां द्वंद्वः अनेक लिंगें प्रथमांतें एकत्र समासिजती तो द्वंद्वसमास जाणिजे,”...यांत कांहीं नियम सांगितले आहेत. जसें...द्वंद्वसमासीं पूज्यपद पूर्वी योजिजे. द्वंद्व-समासीं इकारांत उकारांत जें पद तें पूर्वी योजिजे यथा ‘ हरिहरः ’ द्वंद्व समासांत अल्पस्वर पूर्वी योजिजे...इ० इ० ” वरील अवतरणावरून दिसून येईल कीं इंग्रजी अंमल येण्यापूर्वी कित्येक शतकें अगोदर मराठी भाषेवर व्याकरणादि शास्त्रीय संस्कार झाले होते. पंडित भीष्माचार्य यांचें भाषाविषयक वरील दोन ग्रन्थ या दृष्टीनें फार महत्वाचे आहेत.

असाच एक शास्त्रीयस्वरूपाचा गोपाळपंडित उर्फ आनेराज व्यास यांचा द्वात्रिंशल्लक्षण नांवाचा एक संस्कृत ग्रन्थ आहे त्यावर पंडीत भीष्माचार्य यांनीं महाराष्ट्रटीका केली आहे. याची एक प्रत महंत दत्त लक्षराज यांना चमत्कारिक परिस्थितींत मिळाली. नांदूरा ( वऱ्हाड ) येथें एका बाईच्या येथें या टीकेचीं तुटित पानें उतरंडीच्या फुटक्या मडक्यांना सांधण म्हणून आणि फाटक्या डाल्यांना अडकण म्हणून लाविलेली महंतमजकुरांना मिळाली ! या शास्त्राला द्वात्रिंशल्लक्षणशास्त्र हें नांव दिलें आहे. एखाद्या ग्रन्थाचा सोपपत्तिक विचार करावयाचा म्हणजे त्या ग्रन्थाचा ३२ लक्षणांनीं विचार करावयाचा असतो. तीं लक्षणें म्हणजे १ प्रतिज्ञा, २ प्रमाण, ३ दृष्टान्त, ४ उपपत्ति, ५ व्यावृत्ति, ६ विषयप्रदानता, ७ विशेषप्रबोध, ८ उत्सर्ग, ९ अपवाद, १० निषेध, ११ न्याय, १२ विरोधपरिहार, १३–१६ काक्कादिचतुष्टय ( १३ काकु, १४ कक्षा, १५ भावार्थ, १६ प्रकरण,)

१७ अस्तित्व, १८ निर्देश, १९ निर्णय, २० पक्ष, २१ प्रभेद, २२ आशंका, २३ आक्षेप, २४ कार्य, २५ लक्षण, २६ स्वरूप, २७ कारण, २८ हेतु, २९ संबंध, ३० प्रतीति, ३१ विशेषण, आणि ३२ आम्नायपद्धति अशीं हीं ३२ लक्षणें आहेत! वरील टीकेंत या लक्षणांची व्याख्या देऊन त्यांचें उदाहरणानें स्पष्टीकरण केलें आहे. शारंगधर पुसदेकर या कवीनें श्रीमद्भगवद्गीतेची कैवल्यदीपिका म्हणून मराठी टीका १६ व्या शतकांत लिहिली आहे त्या टीकेच्या प्रारंभीं हीं ३२ लक्षणें देऊन या लक्षणाच्या आधारें गीतेचा अर्थ विशद केला आहे! पंडित भीष्माचार्यांनीं केलेल्या टीकेस लक्षणरत्नाकर हें नांव दिलें आहे. ती टीका अद्याप अप्रसिद्ध आहे.

## ६ गीतगोविंदाची महाराष्ट्रटीका.

महानुभावीय वाङ्मयांत श्रीमद्भगवद्गीता इत्यादि धार्मिक ग्रन्थावरच टीका लिहिल्या नसून इतर ग्रन्थांवरही टीका लिहिल्या आहेत. पंडित भीष्माचार्य यांनीं लिहिलेली जयदेवकविकृत 'गीतगोविंद' या काव्यग्रन्थावरील 'महाराष्ट्रसुबोधिनी' नांवाची टीका अशाच प्रकारची आहे. गीतगोविन्दाच्या बाराही सर्गांवर ही टीका लिहिली आहे. ती टीका गोपालदास वादीन्द्र यांनीं संशोधिली आहे.

शेवटच्या समासाची टीका अशी आहेः— इति श्रीजयदेवकविविरचिते म्ह० ऐसेया श्रीजयदेव एतें नामें जो कवि तेणें। विरचिते म्ह० केला ऐसा जो। गीतगोविंद संकीर्ण म्ह० श्लोकाष्टपदियायुक्त जे सपूर काव्य त्याचां ठायीं। स्वाधीनभर्तृकावर्णनें म्ह० स्वाधीनपतिका जे नायिका तियेचें आहे वर्णन कां जयाचां ठायीं। ऐसिये परीचा। सुप्रीत पीतांबरः। सुप्रीत म्ह० प्रसन्न आहे। पीतांबर म्ह० श्रीकृष्ण कां जयाचा ठायीं। ऐसिये परीचा। द्वादश सर्ग म्ह० बारावा सर्ग। समात म्ह० संपला॥ १२॥

## ७ मार्गप्रभाकर.

पंडित भीष्माचार्य यांचा मार्गप्रभाकर म्हणून ओवीबद्ध उत्कृष्ट ग्रन्थ

आहे त्याचें ज्ञान, भक्ति आणि वैराग्य असे तीन खंड आहेत व एकंदर ओव्या ८१० आहेत. ग्रन्थाचें मार्गप्रभाकर नांव कां ठेविलें यासंबंधीं आरंभींच सांगितलें आहे.

**तयांचेनि प्रसादें मार्गप्रभाकर, । ग्रन्थ निर्माणु मनोहरु ।**
**जेणें नासे अंधःकार, । अज्ञान तमोमय ॥ ६ ॥**
**प्रभा शब्दें ब्रह्मविद्या । जे मुख्य सकळां वेदविद्या ।**
**जियां प्रभाणें मुख्य विद्या । विद्याविनोदें ॥ ७ ॥**
**तियें ब्रम्हविद्येचें साधन । परमार्गु दुसरें निर्गुण ।**
**तेथ वैराग्य-भक्ती-ज्ञान । हे तीन भेदें ॥ ८ ॥**
**एक एका अंतर्गत । एक प्रधानु एकु अंगभूत ।**
**द्वादशभेदें असेति विख्यात । एकैका तत्वांचे ॥ ९ ॥**
**यथा सूर्यमंडळीं द्वादश कळां । तैसें प्रतितत्वीं भेद निर्मळ ।**
**म्हणौनि ग्रन्थांतेंचि नामु कुशळा । प्रभाकरू ॥ १० ॥**

या प्रमाणें प्रत्येक खंडांत वैराग्य, भक्ति आणि ज्ञान यांच्या द्वादश कळा शास्त्रीय रीतीनें वर्णिल्या आहेत.

या काव्याच्या शेवटीं कवीनें बंधासंबंधानें पुढीलप्रमाणें व्याख्यान केलें आहे.

**गायत्री छंदापासौनि धृतीपर्यंत । ग्रन्थ ओवियांचे तीन चरण जाणावे निश्चित ।**
**प्रतिष्टेपासौनि जगतीपर्यंत । चौथां चरणें ॥ ४२७ ॥**
**बंधाचे मुख्य दोनि मार्ग । एक गौड दुसरा वैदर्भ मार्ग ।**
**देववाणीचे जे बंधवर्ग । तो वैदर्भमार्ग ॥ ४२९ ॥**
**छप्पन्न भाषांचे जे बंध । तो जाणावा गौडमार्ग विविध ।**
**गौडमार्गी गाथाचे दोनिभेद । बाहुल्याभिप्रायें ॥ ४३० ॥**
**एकि बोलिजे धृपदी गाथा । दुजी ते श्लोकपदी गाथा ।**
**तीन पांच सा एवमादी चरण बहुतां । ते धृपदी बोलिजे ॥४३१॥**
**च्यारिचरण असेति जेथ । ते जाणिजे द्विधा श्लोकपदीं गाथा ।**
**अधृति अजगती ऐसी नामभिन्नता । मग प्रासी भेद अणेकें ४३२**

## ८ निर्वेदस्तोत्र.

दार्यंव्यास कवीश्वर यानीं श. १३०० मध्यें १२५ ओव्यांचें एक स्तोत्र लिहिलें आहे त्यास निर्वेदस्तोत्र हें नांव आहे. तें लाहोर येथें जयंतराज यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे. हें निर्वेदस्तोत्र महानुभावांच्या नेहमीं प्रचारांत आहे.

## ९ भीष्माचार्य लासूरकर.

भीष्माचार्य उर्फ भित्रबा लासूरकर या नांवाचे एक ग्रन्थकार होऊन गेले ते पारमांडल्य आम्नालयांतील नागनाथाचे शिष्य होत. त्यांनीं श. १३२० च्या सुमारास आनेराजव्यासकृत सुभाषितांताक्षरविर मराठी-मध्यें टीप लिहिली आहे. तसेंच हयग्रीव व्यासकृत दशम स्कंदावर गद्यराज म्हणून श्लोकबद्ध नियमक काव्य आहे त्यावरही टीप लिहिली आहे.

## १० पंडित ज्ञानदेवकृत पंडुगीता.

पंडुगीता या नांवाचें एक छोटेसें ओवीबद्ध प्रकरण आहे त्यांत एकूण ३८५ ओव्या आहेत.

पंडित भीष्माचार्य यांची रचना गद्य, ओवीबद्ध आणि टीकात्मक अशी वर आली आहे. या शिवाय यानीं अनेक वृत्तांमधून श्लोकबद्धही रचना केली आहे. त्यामध्यें गद्यराजस्तोत्र हें विशेष उल्लेखनीय आहे. या स्तोत्रांमध्यें श्रीकृष्ण, श्री दत्तात्रय, श्रीचक्रपाणी, श्रीगोविन्दप्रभु आणि श्रीचक्रधर या अवतारी पुरुषांच्या लीला वर्णिल्या आहेत. या रचनेमध्यें शब्दालंकारांकडे विशेष भर दिला असून उत्कृष्ट अनुप्रास साधले आहेत. या शिवाय या गद्यराज स्तोत्रांत दुसरा विशेष असा आहे कीं ज्या वृत्तांत रचना केली आहे त्या वृत्ताचें नांव कवितेंत सार्थ गोविलें आहे. नमुन्या करितां पांचश्लोक येथें देत आहे.

**श्रीमच्चक्रेशकीळां स्फुरित निजकळां उद्धरू जीवकोिळां ।**
**साकारादि स्वलीळां धरुनि निजकळां भूतळीं दिव्य जाला ।**
**तद्गीता केलिगाथा हरिजवळि कथा पंचकृष्णादि नाथा ।**

बांधो बांधी सुगाथा विदित परपथा स्रग्धरा तामपंथा ॥ ३ ॥
मंदाक्रान्ता विरहदलिता स्वामि तूं राक्षि आतां ।
माते नेता स्वचरणगता होसि तूं सर्ववेत्ता ।
देवाधीशा सकलकलसा केवळी केशवेशा ।
भावानाशा सदय पुरुषा माधवा यादवेशा ॥ ९० ॥
खेळे लीळा क्षोणी हेळा केळा बाळा भक्ताशीळा ।
मोदा मोळा नंदोधूळा दंताकीळा विद्युन्माळा ॥ २८२ ॥
महाशक्ति माता विचित्रा अनंता ।
भवामूलहंता महाबोधकर्ता ।
सुखानंददाता समस्ता सुजाता ।
भुजंगप्रयाता प्रभो रक्ष शांता ॥ २८१ ॥
दयादिशक्तिभूषिता मयादिशक्तिराजिता ।
कृपादिशक्तिशोभिता प्रमाणिकादि भारता ॥ २९१ ॥

याप्रमाणें या स्तोत्रांत एकूण २९९ श्लोक आहेत. गुरुवंदन.

आता नमू देवव्रतगुरू । जेणें मस्तकीं ठेविला अभयकरू ।
तेणें मज दीधला कवित्व वरू । भणे ज्ञानदेवो ॥ ९ ॥

या मध्यें देवव्रत हें भीष्माचें नांव असल्यामुळें प्रस्तुत ज्ञानदेव हा भीष्माचार्यांचा शिष्य असल्याचें दिसतें. प्रकरणाच्या शेवटीं ‘ इति श्री. भीष्माचार्यशिष्य ज्ञानदेवों विरचिते पंडुगीता संपूर्णम् ’ असा समास आहे.

अन्य देवतांची भक्ति न करितां माझीच भक्तिकर करावी असा श्रीकृष्ण अर्जुनास उपदेश करितात. त्या संबंधीं खालील ओव्या महत्वाच्या आहेत.

माझेनि नामस्मरणें । जीवासि होय पालटणें ।
जैसी भिंगरूटी करी समलक्षणें । कीटकीयेतें ॥ २९१ ॥
जियांरूपाचिये वोपें । अनंता सूर्यांचा प्रकाशुलोपे ।
तेयां तेजाचियेनीये । तरळेति डोळे मायाशक्तीचे ॥ २९२ ॥
आब्रह्मा परुता प्रकाशे । आत्मारामु होवौनि असे ।
तो भक्तांचा हृदयी असे । अखंडितु ॥ २९३ ॥

जरी भणसी देव गहनु । तरी ते थोर पावले अभिमानु ।
परी काइसां मशकु रावणु । तेनें बांदौडी घातले ॥ २९४ ॥

यानंतर रावणाच्या बंदिशाळेंत असलेल्या देवतागणांचें वर्णन केल्या नंतर पुढें म्हटलें आहेः—

पाहे देव तेहेतीस कोडी । रावणें घातले बांदौडी ।
ते काय फेडिती सांकडी । मागतेयांची ॥ ४२९ ॥
ह्मणौनि गा सुभद्रापती । न करावी पां देवतांची भक्ती ।
कां जे तिया मोक्षपदा आड येती । विघ्न करीति साधकां ॥३३०॥
जे तेयांची भक्ति करीति । तेयां राज्यलक्ष्मी देती ।
परी दुःखभोगांची संश्रुती । तेयांचेनि न चुके ॥ ३३१ ॥
देवां राक्षसें बांदौडी घालिजे । अणेंगे परी जाचिजे ।
आणि ते या देवांची भक्ति कीजे । यापरौता मूर्ख नाहीं ॥ ३३२ ॥
रामें रावण वधिलियापाठीं। देवीं सांडिलिया एकमेकांच्या भेटी
तेणें भयां रिगाले गिरिकपाटीं । अद्यापीवेऱ्हीं ॥ ३३३ ॥
एकीं रिगाले जळीं । एकीं बैसले ती वडींपिंपळीं ।
एकीं राहिले झाडांतळीं । छाया धरौनिया ॥ ३३४ ॥
ऐसियां परी देव सूटले । ते दाहीं दिशां पळाले ।
एकु गिरीपर्वतीं राहिले । महारण्यीं ॥ ३३५ ॥
जरी भणों देवदेवां । तरी तेतीसकोडीं माजी कवण ध्यावा ।
दशावतारी ओळखावा । कवणेंपरी ॥ ३३६ ॥
जरी रामु ध्यावा चित्तीं । तेयांची वाणावी गुणसंपत्ती ।
तरी तो स्त्रियेकारणें दुःखप्राप्ती । करिता जाहला ॥ ३३७ ॥
जेयांते देवो भणिजे । तेही रावणें गांजीजे ।
तेयांची आंतोरी नेईजे । कपटरूपें ॥ ३३८ ॥
जरी तिन्हीं देवो भणो सबळु । तरी ते अनुसूयें केले बाळु ।
ऐसे ते देवो सकळु । अपयशरूपें ॥ ३३९ ॥

## ११ महानुभावांच्या धार्मिक वाङ्मयांचे विभाग.

चौदाव्या शतकाच्या सुरवातीच्या वाङ्मयाचे निरीक्षण करण्यापूर्वी महानुभावांच्या धार्मिक वाङ्मयाच्या धार्मिक विभागांचे विवेचन करणें प्रस्तुत आहे. ते विभाग म्हणजे १ श्रुति, २ स्मृति, ३ वृद्धाचार, ४ मार्गरूढि, आणि ५ वर्तमान हे होत. श्रीचक्रधरांचे लीळाचरित्र आणि श्रीदत्तात्रय, श्रीकृष्ण, श्रीचक्रपाणी आणि मी गोविन्दप्रभु यांचीं चरित्रें श्रीचक्रधरानीं प्रसंगविशेषीं आपल्या शिष्यांना लीळारूपानें सांगितलीं आहेत. तीं चरित्रें आणि तदंतर्गत असलेलीं श्रीचक्रधराचीं सूत्ररूप वचनें यांस श्रुति म्हणतात. परशरामबावांनीं जो श्रीनागदेवाचार्यांचा चरित्रग्रन्थ लिहिला त्याला स्मृति अथवा आचार्यस्मृति असें म्हणतात. स्मृतीनंतर म्हणजे परशुरामाचार्य इत्यादिकाचे संबंधीं अथवा तत्कालीन आचारविचारासंबंधीं जो ग्रंथसमूह त्याला वृद्धाचार असें म्हणतात. परशुरामाचार्यासमक्षच महानुभावपंथाचे तेरा आम्नाय झाले. या तेरा आम्नायांचे निरनिराळे वृद्धाचार झाले. श्रीगुर्जर शिवव्यास इत्यादिकांच्या काळीं संप्रदायासंबंधीं रूढ झालेल्या बाबीसंबंधानें जो ग्रन्थसमूह झाला त्याला मार्गरूढी असें म्हणतात व हल्लीं त्यानंतर जो संप्रदायविषयक ग्रन्थसमूह झाला त्याला वर्तमान असें म्हणतात ! हा वर्तमान काळ साधारणपणें सोळाव्या शतका पासून अलीकडची समजला जातो. हे विभाग केवळ धार्मिक आणि सांप्रदायिक वाङ्मयाचेच मानण्यांत येतात. या विभागांत ज्याचा समावेश होत नाहीं असें महानुभावांचें अफाट वाङ्मय आहे. या सर्वच वाङ्मयाचा आपणास विचार करावयाचा असल्यामुळें या विभागावरच दृष्टि ठेऊन आपलें भागावयाचें नाहीं.

## १२ गुर्जर–शिव–व्यासांचें तिन्ही स्थळ.

गुर्जर–शिव–व्यास हे कवीश्वर आम्नायांतील अचल मुरारीमल्ल यांचे शिष्य होत. गुर्जर–शिव–व्यासांचें पूर्वाश्रमीचें नांव शिवपाळ असून ते श्रीचक्रधर यांचे वंशातील सहावे पुरुष होत. यांच्या वडिलाचें नांव धर्म-

पाल. शिवपाल हे गुजराथेहून पैठण येथें आले व त्यांनीं अचलमुरारमल्ल यांचे जवळून दीक्षा घेतली. त्यांनीं आपल्या बरोबर आपला पुतण्या संगपाळ यासही आणलें होतें. संगपाल यानें आपल्या चुलत्याजवळूनच दीक्षा घेतली. शिवपाल यास महानुभावपंथांत गुर्जर-शिव-व्यास असें म्हणतात आणि संगपाल यास सोंगे राज-व्यास म्हणतात. सोंगेराजयास गोविंदराज विद्वांस हे अति वैराग्यनिष्ठ शिष्य मिळाले त्यामुळें यांच्या गादीस विद्वांस हें नांव मिळाले. गुर्जर-शिवव्यास आणि सोंगराज व्यास या उभयतांच्याही गाद्या विद्यमान आहेत.

गुर्जर शिवव्यासांनीं बरीच सांप्रदायिक व धार्मिक ग्रन्थरचना केली. तथापि आचार, विचार आणि लक्षण या वरील तिन्ही स्थळांची बांधणी केल्याबद्दल त्यांची फार प्रसिद्धी आहे. त्यांनीं उपाध्य आम्नातील धाराशिवकर ओंकारव्यास यांचे शिष्य सिंद्धांते हरिव्यांस यांच्या सहायानें श्रीचक्रधरांच्या मुखांतून निघालेल्या सूत्ररूप वाक्यांना आधारास घेऊन शके १३२५ च्या सुमारास तिन्ही स्थळांची बांधणी केली.

या स्थळनामक ग्रन्थांत प्रथम लक्षण आचार विचार आणि या तिन्ही विभांगांतील प्रथम सूत्र सांगून त्यावर टाचणें म्हणजे भाष्य केलें आहे त्यास भाष्य, लापिका इत्यादि नांवें आहेत. या भाष्याची कल्पना यावी म्हणून आचारस्थळ आणि विचारस्थळ यांतील एक एक उतारा पुढें देत आहे. हें भाष्य गद्यांत आहे.

### आचारस्थळ.

जीवाचा स्वधर्म : गुरु धर्म : । वेगळा जीवासि काइधर्म असे : तो धर्मशक्तीसहीत दीधला : आतांचि कां : ब्रह्मविद्ये अनुखंगिका : भणौनि : गुरु : शक्तिमंतु जीउहि शक्तीमंतु : ॥ छ ॥ स्वः भणिजे जीउ : भाओ : भणिजे तेयांचे जाणे : ते काई : ना : गुरु प्रकटे : भणिजे : अवतरौनि दास्य दे : ते मुचे : भणिजे : संसारापासौनि सुटे : ॥ : मग व्याप्ति : स्वभाओ : भणिजे : पूर्वपक्षे : ज्ञानें : पक्षें सन्निधान : विपक्षें : अनंताः

सीधांतें दास्य : दुखी : जीव नीराकरिले : विषय प्रेम : भणिजे : निष्प-यत्वें आवडी : वियोगी ॥ १३४ ॥ नुरे तें प्रेम : सोडु न शके ते प्रीतिः साहावासें वीटु नुपजे ते आवडि : पहिलें आवडि : मग प्रीति : मग प्रेम : एक एकाची उत्तरावस्था : प्रेम हा सेवट : । : दुर्लभ : भणिजे : दुष्करी कष्टानें पेर्वाजे : कांजें : तंव जीव विद्याचां ठाईं तव सुक्रुत वर्तेः ते मनुष्यानां सहस्त्रेपु : मग : दुखी : हे विपायें ठेलें पुरे : तो काक-तालीय न्यावो : । : कां दुखी : स्तीत्व : मग वियोगु : मानुश्ये हे कदापि नुघरे : भणौनि : दुर्लभ : ॥ १३५ ॥

## विचारस्थळ.

आतां दुसरें विचारस्थळमालिका : सखळेसहीत लापिकासहीत सांधीत अर्तीजेति : ॥ ० ॥ तेंचि कैसें : ना आधी सखळा : मग : लापिका : मग : मालिका : ज्ञानमोचक : भणिजे : इश्वराचें चतुर्विध ज्ञानमोचक तरी : ज्ञानमोचकां पाः भणिजे : ना : ते : दे मतीज्ञानभाक्ति वैराग्य : एके मोचकें : एकें अमोचकें : ॥ १ ॥ हेंचि केविः ना बांधलिये गाइचेनि : निष्ठ : मग क्रिया उभयेरूपा : चर्या : मग : ऐसेयासि साध्ये ही अमोचकें : तरी ऐसा वीरधर्मी होउनी : कर्ता : जरी साक्षी : तयाचे काइ लक्षणा : ना आपण करीना : जरी आणीका करवीना : करीता : तरी : देखे : तो साक्ष : जे : ॥ ० ॥ भणिजे : तो दृष्टा होउनी : जरी : उदास : जे ॥ ११ ॥ तरि : ऐसा त्र्यंस नीरुपन अरूधाः एक कैसा ना तेथ वेगळा करून ए : भणौनि एथ अस असीया : ऐसा कांहीं भाव नाहीं : हें ज्ञानप्रकाशीं निरूपावेयाचि कारण : साधीले : ॥ ० ॥ त्र्यंस भणिजे : तीहा मीळौनि : जरि : एक कैसा : भणिजे तीहीचा योगु : । एक कैसा ? : भाणिजे : ना तेथ वेगळें : करूं नयेः जै काळ भइ । धर्म तरि : हा परी हासके : ॥ श्रीमुखेंचि : अज्ञानचिः जरि जनैल : जरि : एराचिये पाती एर जाणावें : भणौनि निरूपावया कारण ऐसा उच्चारा ॥ १२ ॥

हा ग्रन्थ बराच मोठा असून त्यांत महानुभावीय पंथाचें तत्त्वज्ञान भरलें आहे.

## १३ चाल्हणशिष्य नृसिंहकवि.

चौदाव्या शतकाच्या प्रथम पादामध्यें चाल्हणशिष्य नृसिंहकवि हा प्रसिद्ध ग्रन्थकार होऊन गेला. याचा गुरु चाल्हेराज उर्फ चाल्हण पंडीत यानें सत्वानुवाद, ज्ञानप्रकाश आणि शास्त्रसंबोधनीटीका असे तीन ग्रन्थ लिहिले आहेत. हा फार विद्वान् असून त्याचा शिष्यपरिवार-ही फार मोठा होता परन्तु हा स्वतःच्या ग्रन्थापेक्षां आपल्या शिष्याच्या ग्रन्थांमुळेंच फार प्रसिद्ध आहे. नृसिंहकवीनें आपल्या गुरुच्या नांवानें 'चाल्हनसंकेत' अथवा 'संकेतगीता' नांवाची श्रीमद्भगवद्गीतेवर टीका लिहिली आहे. या गीताटीकेशिवाय नृसिंहकवीनें रुक्मिणीस्वयंवरावर ही ओवीबद्ध ग्रन्थ लिहिला आहे. रुक्मिणीस्वयंवरग्रन्थांत कवीच्या परंपरेसंबंधानें खालील ओव्या आहेत.

**जे आचारविवेकें शुद्ध । तपस्वियां जालें वृद्ध ॥**
**ते नमीन परमसिद्ध । नागार्जुनादिक ॥ ३३ ॥**
**कवी भास्कराचियां प्रतिबिंबा । न राहेचि मोह प्रलंबा ॥**
**ते या उपदेशिले नागाम्बा । परमसिद्धान्तें ॥ ३४ ॥**
**त्याचा मुनिकमळाकरु प्रसिध्दु । जो ब्रह्मानुभुतीचा सौरसपदु ॥**
**तेयांचा करी तुझे अनुवादु । जनकतनयां ( सीताम्बा ) ॥ ३५ ॥**
**ते सगुणा चांगुणा । जे प्रसन्न जाली चाल्हना ॥**
**तेयाचा नरसिंह कवी जाणा । वीनवीतसे ॥ ३६ ॥**

यावरून नागदेवाचार्य, भास्कराचार्य, नागाम्बा, मुनि कमळाकर, सीताम्बा, चाल्हन, नृसिंह अशी परंपरा येते. कवीच्या कालासंबंधानेंही याच काव्यांत उल्लेख आहे तो ग्रंथसिद्धीच्या अनुरोधानें दिला आहे:—

**शर पक्ष रामचंद्र सुभानुनामा । शकारम्भा मधुराकोत्तमा ।**
**तै विवाह रुक्मिणी कृष्ण परब्रम्हा । जाला श्रीदत्तवर्दें ॥ १३१३ ॥**

यावरून ग्रंथसिद्धीचा काळ शके १३२५ चैत्र शु॥ १५ असा

आहे. या रुक्मिणीस्वयंवराचे एकूण १४ प्रसंग असून एकंदर २३१७ ओव्या आहेत.

ग्रंथकर्तृत्वासंबंधीं कवि लिहितोः—

**चाल्हराजाचा वंशीं । मंत्र जाले नर्सिंहासी ।**
**तो विणविताये संतासी प्रबन्धकरणी ।। ६७ ।।**
**कवित्वाचेनि मिषें । गाईन देवांची चरित्रें सुरसें ।**
**जे कां भागवतीं शुकव्यासें । कथन केलीं ।। ६९ ।।**
**न बोलों कथेविरहितु । पसरु नेघोंचि बहुतु ।**
**महाकवींचेनि मतु । प्रबंधीं वदों ।। ७० ।।**
**परी आपुलेया मतीसारिखें । कांहीं एक बोलेन मुखें ।**
**बोबडा बोलीं बाळकें । रंजवीतु जैसें ।। ७१ ।।**
**आतां असो हे रंकवृत्ती । श्रोते असलगै भाविती ।**
**भजति वेडयासि मती । कैंची स्फुरेल ।। ७२ ।।**
**आतां आरंभु कथा । मान देवौनि समस्तां ।**
**कां जे जऱ्हीं जाला जाणता । तऱ्ही नेणीव हे निकी ।। ७३ ।।**

श्रीरुक्मिणीस्वयंवराप्रमाणेंच संकेतगीता अथवा चाल्हणसंकेतनी ही गीताटीका ओवीबद्ध आहे. त्यांत एकूण १३८९ ओव्या आहेत. आजवर श्रीमद्गीतेवर इतक्या टीका असतां ही गीताटीका कां लिहिली याचें कारण सांगतांना कवीनें त्यापूर्वी होऊन गेलल्या बऱ्याच टीकाकारांचा उल्लेख केला आहे. त्या विशेष हा कीं पंथाबाहेरील टीकाकारांचाही उल्लेख त्यामध्यें आहे. त्या ओव्या अशाः—

**भूषण कवी भास्करासारिखे । निवृत्तिसोपानज्ञानदेवो निके ।**
**तयांची सरी केंवि ठाके । दैवहत ।।**
**शंकरभाष्य शंकरानुसारु । ज्ञानदेवो बोलिली अति पसारु ।**
**तया अद्वैती भारु । भणौनि लाठा अर्थु ।।**
**श्रीधराचार्य पंडित श्रेष्ठु । पदव्याख्यानीं स्पष्टु ।**
**परि पदार्थज्ञानेंविण द्रघष्टु । अर्थु केंवि सुचे ।।**

लाडा रामेया भाऊ सुचला । परि तो आवरोनि बोलला ।
गंगाधरें अर्थ केला । तो पदक्रमेंचि ॥
एवं टीकाकारां समस्तां । गीतार्थाची अपूर्णता ।
तो बिल्वकापुरीं महिन्द्र पंडिता ॥ श्रीगुरु निरोपिते झाले ॥
परी तोहि नयेचि अर्थु । नाहीं प्रवृत्ति हेतु ।
नुपुरेचि माझा मनोरथु । गीतार्थविषयींचा ॥
पहिलिया समस्ताहि टीका । परी शब्दार्थुचि नेटका ।
सिद्धान्तभट्ट आंवाका । तो दिसेचिना ॥
साही शास्त्रांची योग्यता । तेयांही न कळेचि गीता ।
मां शौच्या नृसिंहाची पात्रता । किती एक ! ॥
असो हे उभय मातु । ऋणी सांघेल कटकीचा वृत्तांतु ।
तो अनुवादेल सुतु । चाल्हेराजाचा ॥

येथें एक गोष्ट विशेष प्रामुख्यानें मांडावयाची आहे कीं महानुभावीय वाङ्मयांत किंबहुना समग्र मराठीवाङ्मयांत श्रीमद्भगवद्गीता आणि श्रीकृष्णरुक्मिणीविवाह या विषयावर जितकी ग्रंथरचना झाली तितकी अन्य कोणत्याहि विषयावर झाली नाहीं. धार्मिक दृष्टीनें आणि वर्ण्य विषयाच्या उच्चतेमुळें हे विषय इतके आवडीचे झाले आहेत कीं त्यांवर अनेक मोठमोठया कवींनीं आणि ग्रंथकारांनीं आपली लेखणी चालविली आहे.

---

## १३ यादवसाम्राज्यानंतर.

शके ११९५ मध्यें भास्कर कवीश्वराचें सुप्रसिद्ध शिशुपाळवध काव्य निर्माण झालें. तेव्हां महाराष्ट्रावर देवगिरीच्या यादवांची सत्ता होती. बाजारांत, राजदरबारीं आणि अंतःपुरांत मराठीचें साम्राज्य होतें. सुबत्ता आणि शांतता महाराष्ट्रांत सलोख्यानें नांदत होती. तो काळ वाङ्मयाच्या अभिवृद्धीस फार अनुकूल होता. राजदरबारांतून कवींना आणि ग्रंथकारांना उत्तेजन मिळत असे त्यामुळें अर्थातच वाङ्मयवृद्धीला

अवसर मिळाला. परंतु लवकरच महाराष्ट्राचें दुर्दैव ओढवलें. दिल्लीच्या सुलतानांच्या स्वाऱ्या दक्षिणेंत व्हावयास लागल्या. त्याचा परिणाम शेवटीं शके १२३८ मध्यें देवगिरीचे जाधवांचें राज्य नष्ट होण्यांत झाला. महाराष्ट्रावर भिन्न धर्माच्या, भिन्न संस्कृतीच्या परकी अशा मुसलमानांचा अम्मल सुरू झाला. गुलबर्गा येथें शके १२६९ च्या सुमारास बहामनी राज्याची स्थापना होईपर्यंत मध्यवर्ति सत्ता दिल्ली येथें बरीच दूर होती आणि महाराष्ट्रांत दिल्लीहून आलेले सुभेदार कारभार चालवीत. बहामनी घराण्याचे पहिले ३–४ बादशहा यांना आपला जम बसवावयाचा असल्यामुळें त्यांचा हिंदु प्रजेस फारसा त्रास झाला नाहीं. परंतु महमूदशहा बहामनी याच्या कारकीर्दींत ( श. १३०८ ते श. १३२१ ) हिंदु प्रजेस त्रास व्हावयास लागला. त्यांतच त्याच्या कारकीर्दींत प्रसिद्ध दुर्गादेवीचा दुष्काळ पडून अनेक हिंदु घराणीं परागंदा झालीं. त्यापुढील बादशहा फिरोजशहा यानें महाराष्ट्रांत मुसलमानी धर्माचा बराच प्रसार केला. त्याचा भाऊ अहमदशहा हा शके १३४४ मध्यें गादीवर आला. याच्या कारकीर्दींत हिंदूंना भयंकर त्रास झाला. यानें वरंगळवर स्वारी करून तेथील राजास ठार केलें. त्याच्या बायकामुलांना बाटवून मुसलमान केलें. हिंदूंचीं देवळें पाडून तेथें मशिदी बांधल्या. हा अत्यंत क्रूर म्हणून ख्याती होती. याच्या व यापुढील बादशहा हुमायूनशहा याच्या कारकीर्दींत हिंदू प्रजेचा अमानुष छळ झाला. या उभय बादशहांची कारकीर्द ( श. १३४४ ते १३८५ ) ही महाराष्ट्राला अत्यंत घातुक झाली. हिंदुधर्म, हिंदुसंस्कृती यांची अत्यंत गळचेपी झाली. या सर्व कारणांचा अर्थात्च महाराष्ट्रांतील, धर्म, भाषा आणि समाज यांवर अनिष्ट परिणाम झाला. बहामनी घराण्याच्या पुढील ३।४ बादशहांच्या कारकीर्दींत खुद्द त्यांची राजधानी गुलबर्गा येथेंच अंदाधुंदी माजली आणि खून, मारामाऱ्या, रक्तपात इत्यादिकांना पूर आला. खुद्द बादशहानें नेमलेले सुभेदार मध्यवर्ती सत्तेला

जुमानीनासे झाले आणि त्याचा शेवट श. १४१२ च्या सुमारास बहामनी राज्याचीं पांच शकलें होण्यांत झाला. तीं पांच राज्यें म्हणजे गोवळकोंडें, विजापूर, बेदर, अहमदनगर आणि एलिचपूर येथें स्थापन झालीं. यांपैकीं पहिल्या तीन बादशहातींमध्यें महाराष्ट्राचा जरी कांहीं भ.ग अंतर्भूत होत होता तरी पण तेलंगण आणि कर्नाटक या प्रांतांशीच प्रत्यक्ष संबंध होता. अहमदनगर आणि एलिचपूर या दोन ठिकाणीं स्थापन झालेलीं राज्यें सर्वस्वीं महाराष्ट्रांत होतीं. याशिवाय या दोन्ही बादशहातींचा विशेष हा होता कीं त्यांचे उत्पादक ब्राह्मण कुळांत जन्मले असून दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडून बाटलेले होते.

एलिचपूरच्या इमादशाहीचा संस्थापक फत्ते उल्लाइमादुल्मुल्क हा मूळचा ब्राह्मणाचा पोर, परंतु श. १३४४ मध्यें अहमदशहा बहामनी यानें विजयानगरवर स्वारी केली त्यावेळीं तो सांपडला. त्याला त्यावेळच्या शिरस्त्याप्रमाणें मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन एलिचपूर येथील सुभेदाराच्या स्वाधीन केलें तेथेंच तो बाटला पण आपल्या कर्तबगारीनें पुढें आला. त्याला आपल्या हिंदुत्वाची जाणीव होती. एलिचपूरजवळील गाविलगड किल्याचा दरवाजा बांधतांना त्यावर त्यानें विजयानगरच्या हिंदुराजांचे जयचिन्ह त्या दरवाजावर कोरलें आहे.

अहमदनगरच्या निजामशाहीचा संस्थापक मलिक महमद याचा बाप-मलिक हसन हाही मूळचा ब्राह्मण असून विजयानगरच्या स्वारीतल्या गर्दीत मुसलमानांच्या हातीं लागला. यालाही पण बाटून मुसलमान व्हावें लागलें. हा पूर्वीं वऱ्हाडांत मोडत असलेल्या व हल्लीं निजाम स्टेट मध्यें अंतर्भूत होत असलेल्या प्रसिद्ध पाथरी परगण्याचा वतनदार कुळकर्ण्याच्या घराण्यांतील होता. ही जाणीव मलिक महमद आणि त्या पुढील बादशहा यांना होती. हा पाथरी परगणा वऱ्हाडच्या इमाद शाहीच्या अमलांत होता. परंतु तो आपल्या वतनाचा परगणा आहे सबब आपल्या राज्यांत असावा अशी अहमदनगरच्या बुऱ्हाण निजामशहा यांत चुरस

लागली. या परगण्या बद्दल इमादशाही आणि निजामशाही यां मध्यें झगडा होऊन लढाया. झाल्या शेवटीं श. १४५० नंतर तो परगणा बुऱ्हाण निजामशहा यानें मिळवला आणि तो त्यानें पाथरी येथें राहणाऱ्या आपल्या ब्राह्मण भाऊबंदांच्या स्वाधीन करून दिला. अद्याप ही तो त्या ब्राह्मण घराण्याकडे आहे !

या गोष्टी प्रामुख्यानें नमूद करावयाचें कारण कीं या बादशहातींत मुसलमानांचा हिंदूविपर्यी दृष्टिकोण थोडा बदलत चालला होता. हिंदुना नामोहरम करण्याचें बहामनी वंशानें स्वीकारलेलें धोरण बदलून हिंदूंना प्रजा म्हणून स्वार्थदृष्टीनें तरी जिवंत ठेवण्याचें धोरण या नवीन शाह्यानीं स्वीकारलें. हिंदूंना या बादशहातींत प्रधानाच्या, सेनापतीच्या इत्यादि मोठमोठया मानाच्या जागा मिळूं लागल्या. हिंदूना स्वास्थ्य मिळूं लागले. देशांत सुबत्ता व्हावयास लागली. हिंदुधर्म आणि संस्कृति यांचा महाराष्ट्रांत पुन्हा जम बसूं लागला. आणि शके १३५० पासून शके १४५० पर्यंतचा एक शतकाचा काळ हिंदुसंस्कृतीबरोबर मराठी वाङ्मयालाही कष्टतर गेला तो नाहींसा होऊन श. १४५० नंतर त्यास ऊर्जितावस्था यावयास लागली.

वरीलकारणामुळें १३५० पासूनच्या शेदीडशे वर्षांत मराठी वाङ्मयांत म्हणण्यासारखी ग्रन्थरचना झाली नाहीं. महानुभाव वाङ्मयाचीही जवळ जवळ तीच स्थिति आहे. महानुभाव वाङ्मयांत जी थोडी बहुत ग्रन्थरचना या काळांत झाली ती सर्वस्वीं धार्मिक स्वरूपाची होती. तिचा केवळ नामनिर्देश करणेंच योग्य आहे.

## १४ शके १३५० ते शके १४५० पर्यंतचे ग्रंथ.

कानउदय पंडीत नांवाच्या ग्रन्थकाराचें आचारविचारलक्षणत्रयीवर एकादशप्रकरण सूत्रभाष्य म्हणून तयार केलेले गद्यरूप भाष्य आहे. तसेंच शिवाचार्य शिष्य गोविंदमुनी पारमांडल्य यांचा लक्षणरत्नाकर-

भाष्य म्हणून एक ग्रन्थ आहे. तसेंच पारमांडल्य चक्रपाणी यांचे सिद्धांत-भागवत हीं त्याच सुमाराचें आहे.

कवीश्वर आम्नाय दिक्षीत श्री गोविन्दराज गुरु बल्लाळ या कवीचा एक छोटासा भक्तिप्रबोध नांवाचा सुंदर ओवीबद्ध ग्रन्थ आहे. त्यांत भगवद्भक्तीचा महिमा वर्णन केला आहे. यांत ३२५ ओव्या आहेत. लाहोर येथें नन्दलालका ठाकुरद्वार म्हणून कृष्णमन्दीर आहे तेथें जयतिराज या महानुभावीय संन्याशाजवळ तो मिळाला. मनश्चक्षुसमोर भक्ती-प्रभावानें श्रीमूर्ति उभी ठाकली असतां तिचें मानसपूजन केलें त्याचें सुंदर वर्णन कवीनें पुढील ओव्यांत केलें आहे.

**तेणें स्मरणे आकर्षिली ॥ श्रीमूर्ति पुढा उभी जाली ॥**
**मग तेने आसनी बसविली ॥ अनुतापाचिया ॥ २६७ ॥**
**आवडीचेनि उचंबळे ॥ नेत्रजळ हेलावले॥**
**तेने उष्णोदके केले ॥ चरणक्षाळण ॥ २६८ ॥**
**ते षट्कर्म टाकिले झाडौनि ॥ विकारविकल्पाचे संमार्जन करौनि ।**
**मग काम क्रोध वाटौनी ॥ भरलिया रंगमाळिका ॥ २६९ ॥**
**घांसौनि चतुष्टयें परेशू ॥ जे उगाळीताति कस्तूरीचा वासू॥**
**ते तप चंदन परेशू ॥ आर्चिले आपलेनि करे ॥ २७० ॥**
**मोगर्‍यां चांपेकळियाहुनि परिमळी ।**
**मन सुमनें ओळगाविली श्रीदेवरायासी ॥ २७१ ॥**
**श्रीकंठीं कंठमाळा निरंतर ॥ गळा गळदंडा हातसर ॥**
**आवडीसहित अनुराग दोर ॥ गुंफौनी औळगविली ॥ २७२ ॥**
**कुल्लाळे चतुराननें ॥ उचलौनि आनिले धुपटने ॥**
**काळा सांधौनि यंत्री धरिले तेने ॥ तो कांडार सांगैन आतां २७३**
**सात खण चौदा उथाळी॥बाहातर ओवरिया एकवीस पानतळी ॥**
**तेथ बाहुळे रोखिले तळी ॥ कुमर उमेशंकराचा ॥ २७४ ॥**
**नाना परिचे प्रकाशू ॥ सात खणी आसीमसाहासु ॥**
**चहु वेदाचे अंशू ॥ तेथ बेली राखिलिया ॥ २७५ ॥**
**तेतीस कांडीसहित इन्द्र ॥ उमेसहित ब्रह्म रुद्र ॥**

परिवारेसहित फनेन्द्र ॥ देखीले खनोखनी ॥ २७६ ॥
दहा दहा झळुंबके पांच खानी ॥ वरिला खनीं दोनदोनी ॥
वागवावया गुन तिन्ही ॥ एकवटले ॥ २७७ ॥
नव जाळंधरी तेयां ॥ केली धू कौंडेल तो जावया ॥
तेथ कणक परियेळ भावाचा ॥ रत्नदीपु उजाळिला जीवाचा ॥
मग ओंवाळिला स्वामि विस्वाचा ॥ दोही करी ॥ २७९ ॥
अनुसरण विडा ओळगौनी ॥ जीवे निंबलोण उतरौनि ॥
स्मरण विस्तारौनि ॥ घाली दंडवते ॥ २८० ॥

## १५ कवि कृष्णमुनीकवीश्वराम्नायकृत ब्रम्हाण्डगोलक.

हा ग्रन्थ ओवीबद्ध असून ओवी संख्या २४५ आहे. ग्रन्थकर्तृत्वाचा शक, कर्त्याचें नांव आणि ग्रन्थकर्तृत्वाचें कारण ग्रन्थांतीं तीन ओव्यांत सांगितलें आहे.

ऐसा हा ब्रह्मांडगोळकु । सिद्धी पावला गा साद्विवेकु ।
मनुशताधिक द्विज प्रमोदें निकु । मृगशीर्ष राकेसी ॥ २४३ ॥
जो पार्था बोध करी सर्वेश्वरू । तेयां नावें कविकिंकरू ।
कविकुळीं दिक्षेसी निरधारू । परियसां बुधजनो ॥ २४४ ॥
ऐसें ब्रह्मांण्डज्ञान संपूर्ण । बोलावियां हेचि कारण ।
जे निरसावे अज्ञान । म्हणौनियां ॥ २४५ ॥

मुनिशताधिक द्विज यावरून महंत दत्तराज हे कवीचा काल शके १४३२ असा देतात तथापि द्विज म्हणजे ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य असा अर्थ घेतल्यास शके १४०३ असा मानावा लागेल.

श्रीकृष्णांनीं पार्थास अठरा अध्यायांनीं गीता सांगितल्यावर पार्थाच्या आणखी कांहीं शंका उरल्या त्याचें श्रीकृष्णानें हा अध्याय सांगून निरसन केलें अशी कवीनें कल्पना केली आहे.

त्रिविधां ब्रह्मावेगळें । चतुर्थ ब्रम्ह नकळे ।
तें कळलेयां मग विवळे । धमाधमु ॥ ४ ॥
ओब्रह्मभुवनाल्लोका । मागां सांगितला यादव तिळका ।
तरी तेयां स्वरुपांची स्थितीचा अवाका । साधिजोजी ॥ ५ ॥

मग घालौनि लोटांगनु । पार्थ धरी श्रीचरणु ।
जी तुझें निजधाम कवनु । ते सांघै देवदेवां ॥ ७ ॥
पुढतिं अर्जुनें विणविलें । जी जीवुं शब्दें कांई बोलिजे ।
आ ब्रम्हु हें नांव ठेविलें । कवणासी जी ॥ ८ ॥
परमात्मा तो कवणु । सगुण कीं निर्गुणु ।
त्यांचे कैसे स्वरूप लक्षणु । ते सांघै देवा ॥ ९ ॥
माया तें कवणशक्ती । तियेची कैसी स्वरूप स्थिती ।
ती एकदेशीं कीं व्याप्ती । सांघै देवराया ॥ १० ॥
अविद्या कवणे ठाईं होती । जीवांसी लागैली कवणें रिती ।
आणीकसे विणती पुढती । तेही सांघै स्वामिया॥ ११ ॥
स्थूल सुक्ष्म कवणें निर्मिला । हा कांईसेयांचा जाला ।
जीवांसी संसारु पाठीं लागैला । कांईसेयांस्तवू ॥ १२ ॥
जी हें एवढें प्रचंडु । कैसे रचिलें हे ब्रह्माण्डु ।
देवताचक्र उदंडु । यांची गणीतु असे की ॥ १३ ॥
हें निरोपावें जी श्रीकृष्णा । मज श्रवण करावे ज्ञानां ।
विणवीतसे पुनः पुनः । कर जोडौनिया ॥ १४ ॥

याप्रमाणें पार्थानें प्रश्न केल्यावर श्रीकृष्णानें त्यांचीं उत्तरें दिलीं तीं या ग्रन्थांत कवीनें वर्णिलीं आहेत. उत्तरें वर्णिल्यावर उपसंहारात्मक पुढील निरूपण कवीनें श्रीकृष्णाच्या तोंडीं घातलें आहे.

तरी हा ब्रह्माण्डगोळकु । तुज निरोपिला एकु ।
अनंते ब्रह्माण्डें चैतन्यदेसकु । रची संहारी माझिये इच्छे २३५
माझेंनि ज्ञानें पाहातां । सकळ फळें नासीवंतु गा भारता ।
भक्तांकारणें फळदाता । अविनाशु मी एकु ॥ २३६ ॥
माझी ब्रह्मविद्या जाणौन । जे मज रीगती शरण ।
तेयांचे अवघे भवभ्रमण । चुकवीन मीं ॥ २३७ ॥
ऐसीं पराविद्या सारू । निवडावेयां ब्रम्हविद्या थोरू ।
तें सकळा अतःपरू । बोलिजेगा ॥ २३८ ॥
चतुर्वेदें नेति नेति मातें निरुतें । येरुं शास्त्रें आगममतें ।

**पुराणादि ठाकैलें आरुते । ते केवीं मातें जाणती ॥ २३९ ॥**
**षट्शास्त्रें सा दर्शनें । भांबाविली अन्यथाज्ञानें ।**
**आणि अष्टादश पुराणें । माझा नेणती मार्गु ॥ २४० ॥**
**ऐसा आले अपरापरू । कव्हणीच नेणती माझा पारू ।**
**तो मी घेवौनि अवतारू । तारी जीवजातांसी ॥ २४१ ॥**
**मज भक्तांवांचौनि ॥ सखा नाहींचिगा कव्हनीं ॥**
**तरी मज शयनासनीं भोजनीं ॥ विसरों नको ॥ २४२ ॥**

श्रीमद्भगवद्गीता आणि विशेषतः भागवत यांवर हा ब्रम्हांडगोलक ग्रन्थ रचिला आहे. याच विषयावर किंबहुना हाच परन्तु २८३ ओव्या असलेला एक ग्रन्थ आहे. त्यांत ग्रन्थाचें नांव निष्कळंकाध्याय असून ग्रन्थकर्त्याचें नांव व शक दिला नाहीं, कवीनें स्वतःस दास श्रीगुरूचा असें म्हटलें आहे. वर उल्लेखिलेला ब्रह्माण्डगोलक ग्रन्थ मंगलाचरणासुद्धां जशाचा तसाच थोड्या फार शब्दांच्या फरकानें यांत आला आहे.

याच विषयावर गोपाळराम वादीन्द्र दर्यापूरकर या कवीचा विस्तृत ग्रन्थ असून त्याची ओवीसंख्या ११९२ आहे व त्याचें नांव निष्कलंकाध्याय ब्रह्माण्डगोलक असें दिलें आहे. या वादीन्द्र गोपाळदासानें अनेक ग्रन्थांचें शोधन केल्याचा त्या त्या ग्रन्थांच्या शेवटीं उल्लेख आढळतो. या कवीचा काळ सोळाव्या शतकांतील आहे. वादीन्द्र गोपाळदास आणि गोपाळदास दर्यापूरकर ही एकच व्यक्ति असून त्याची भगवद्गीतेवरील मराठी गद्यटीका प्रकाशित झाली आहे. या कवीनें शोधलेल्या ग्रन्थांपैकीं कवि लक्षधीर याचा मार्गप्रभाकर, महाराष्ट्र काव्यदीपिका, दिवाकर कपाटेकृत मतिप्रबंध, जयदेवकवीच्या गीतगोविंदाची पंडित भीष्माचार्यांनीं केलेली मराठी टीका हे ग्रन्थ प्रमुख होत. कवि लक्षधीर, दिवाकर कपाटे आणि वादीन्द्र गोपाळदास हे जवळजवळ समकालीन असून तिघेही कवीश्वर आम्नायांतील आहेत.

वादीन्द्र गोपाळदासानें निःष्कलंक ब्रह्मांडगोलकाची पूर्वपीठिका

आपल्या ग्रन्थांतच दिली आहे ती महत्वाची असल्यामुळें येथें दिली आहे.

इति निर्वचनोपनिषद् श्रुती । किंचिदुद्घादिली वज्रसूचिप्रती ॥
परी हे सिद्धान्तनिर्वचती । अन्यव्यावृत्ती महद्वाक्य ॥ १ ॥
एवं निष्कलंकाध्याय श्रीपती । बोलिला परावाणी पार्थापती ॥
ते उपशान्ती करावी श्रोती । म्हणे देवदासु ॥ १०९९ ॥
ब्रह्मविद्येचेनि विवरें । दोही अर्थाप्रती आधारें ॥
ग्रन्थु निर्मिला मुनिश्वरें । पूर्वी पुरुषोत्तमें ॥ ११०० ॥
अन्यव्यावृत्तीचेनि क्रमें । गीताभागवतोक्तसंभ्रमें ॥
नाम ठेविले पुरुषोत्तमें । निष्कळंकाध्याय ॥ ११०१ ॥
ग्रन्थ संख्या सवाशत । कवन केलें संकळित ॥
तें क्रमभंगें तृटित । देखिलें देवदासें ॥ ११०२ ॥
मग ते न्यूनता पुरविली । परी भ्रष्ट युक्ती मिश्र केली ॥
ग्रन्थासी नाम्रा ठेविली । ब्रह्माण्डगोळकु ऐसी ॥ ११०३ ॥
पावने तीनि रातें । ओवीसंख्या ग्रन्थाते ॥
आपुलेनि युक्तपंथें । अर्थापत्ती आधारें ॥ ११०४ ॥
परी ते न सरे व्युत्पन्नापुढें । ऐसें देखौनि धडफुडें ॥
शोधन केलें निवाडें । गोपाळदासें ॥
पहिला निःकलाध्यावो । शोधिला लावौनि अन्वयो ॥
तसाचि शोधिला पहाहो । ब्राह्मांडगोळकु हा ॥ ११०६ ॥
तेथें विस्तारभयें संकळिलें । पावने पांचशतें संख्यामान केलें ॥
परी तद्युक्तीनें नाहीं सांडिलें । कार्यकारणहेतु ॥ ११०७ ॥
नेयांही शोधना उपेरी । आपुलेयां सिद्धांतकुसरीं ।
दुसरें शोधन बरवेया परी । केलें गोपाळदासें ॥ ११०८ ॥
गोपाळदासें वादीन्द्रें । शोधिलें दरयापुरकरें ।
तें पाहावें अतिचतुरें । विवेकां दृष्टीं ॥ ११०९ ॥
भ्रंमाचि होतें काव्यग्रथनु । झौणिन ठेविजे दूषणू ।
जें उपयोगीकु प्रमाणु । तेंचि ग्रहण कीजे ॥ १११० ॥
अकराशतें द्वादशाधिकु । ग्रंथें ओंवियां सकळिकु ।

ाहोनि श्रोता वाचकु । संतोषती पै ॥ ११११ ॥

यावरून दिसून येईल कीं मूळ निष्कळंकाध्याय ग्रन्थ १२५ ओव्यांचा ुरुषोत्तम मुनीनें केला. पुढें देवदास यानें त्यात आणखी प्रकरणोचित पष्टार्थदर्शक भर घालून तो ग्रन्थ २७५ ओव्यांचा केला व त्याचें नांव ह्माण्डगोलक असें ठेविलें. त्यानंतर पण्डित गोपाळदास दर्यापूरकर ांनीं शोध करून प्रकरणोचित स्पष्टार्थदर्शक आणखी २०० ओव्या ालून ४७५ ओव्यांचा ग्रन्थ केला. पुढें तेवढयानेंहि मध्यमप्रतीच्या ाचकांच्या अंतःकरणांत या प्रश्नाचें विशदीकरण होणार नाहीं म्हणून उपरोक्त गोपाळदासानें त्यांत स्पष्टतार्थ ओव्या घालून त्याचा विस्तार १११२ ओव्यांनीं केला ! वर उल्लेखिलेल्या कृष्णमुनी याच्या नांवानें नमूद केलेला २४५ ओव्यांचा ब्रह्माण्डगोलक ग्रन्थ आणि दास श्रीगुरूच्या नांवानें उल्लेखिलेला २८३ ओव्यांचा निष्कलंकाध्याय या दोन्हींहि ग्रन्थांचा अंतर्भाव गोपाळदासाच्या निष्कलंक ब्रह्माण्डगोळकांत थोड्या- फार फरकानें झाला आहे.

उपाध्य आम्नायांतील भीष्माचार्य द्वितीय यांना वाइदेशकर भीष्मा- चार्यही म्हणतात. ते शके १४६० च्या सुमारास होऊन गेले. यांनींही अनेक ग्रन्थ केले आहेत. त्यांचा उल्लेख श्री. भावे यांच्या कविकाव्य सूचीत आला आहे. त्यांत निरुक्तप्रकरणवश हा त्यांचा प्रमुख ग्रन्थ होय.

याच सुमारास कवीश्वर आम्नायांत मुरारमल्ल विद्वांस होऊन गेले. हे वाहेव्यासांचें शिष्य होत. यांनीं गीताभाष्यादि १२२ प्रमेयें लिहिलीं आहेत. यांचा काल शके १४७६ ते १५२७ असा आहे. यांच्या, गोपी- भास्कर, कवि लक्षधीर इत्यादि शिष्यांनीं बरीच ग्रन्थरचना केली आहे.

## १६ संतोषमुनि कृष्णदास यांचें रुक्मिणीस्वयंवर

पंधराव्या शतकांतील महानुभावी यांचा विशेष आवडता ग्रन्थकार संतोष- मुनि कृष्णदास हा होय. हा कवि पारमांडल्य आम्नायांतील असून आम्नायप्रवर्तक प्रसिद्ध गोपाळ पंडित उर्फ आनेराज व्यास यांचेपासून

या कवीची सातवी पिढी येतें म्हणून आम्ही महानुभावीय मराठी वाङ्मयांत म्हटलें आहे आणि त्या ग्रन्थाच्या शेवटी हरीराज करसालकर यांच्या संग्रहांतून जी ग्रन्थकारांची परंपरा दिली आहे तिच्यावरून या कवीची चौदावी पिढी येतें. तथापि महंत दत्तराज यांच्या टिपणांत जी परंपरा दिली आहे तीवरून आनेराज व्यासापासून या कवीची दहावी पिढी येते, आणि या ग्रंथकर्तृत्वाचा शके १४७६ हा काल २-३ पोथ्यांवर ग्रन्थांत दिला आहे त्यावरून या दहा पिढया विसंगत नाहींत. ती परंपरा अशीः—नागदेवाचार्थ—गोपाळपण्डीत—नागनाथमुनी—विरक्तमल्यनाथ—भीष्माचार्य—बल्लाळमुनी—भीवबा—तुकेराज—भानोव्यास—संतोषमुनी कृष्णदास. महंत दत्तराज यांनीं ही गुरु परंपरा या आम्नयाच्या वृद्धाचारावरून घेतली आहे.

संतोषमुनी याच्या रुक्मिणी स्वयंवराचा पंथांत बराच प्रसार असल्यामुळें याच्या बऱ्याच प्रती मिळतात. आम्हांस त्या हरीपूर हजारा, अमृतसर, पेशावर येथेंही पहावयास मिळाल्या. कांहीं पोथीवर लेखन शक १५२९-३० असा आढळून आल्याचें महंत दत्तराज म्हणतात. परंतु बऱ्याच पोथ्यांवर शक १४७५-७६ हाच शक नमूद आहे. या स्वयंवराचे २५ अध्याय असून एकूण संतोषमुनीच्या ग्रन्थाच्या ३२०५ ओव्या आहेत. तथापि उमरावती जिल्ह्यांत मांजरी ह्मसलें म्हणून एक गांव आहे तेथें रंगोबादादा या महानुभावाजवळ दुंडबद्ध पोथी आहे. तीवरून हा ग्रन्थ शके १६४१ मध्यें पौषदाख्य गोपाळमुनी या महानुभावानें हा ग्रन्थ शोधिला आणि त्यांत भर घालून या ग्रन्थाच्या एकूण ३७४० ओव्या केल्या आहेतः—

कवीनें ग्रन्थरचनेच्या स्थलकालाविषयीं आणि स्वतःविषयीं खालील प्रमाणें उल्लेख केला आहेः—

**कुंकुमठाणें ग्राम गंगातीरीं ॥ तेथें ग्रन्थारंभिला सिंध्नेश्वरीं ॥**
**तो संपूर्ण सिद्धी गेला श्रीनगरीं ॥ भिल्लमटीं जाणा ॥ २१ ॥**

गुरुवार शुद्ध फाल्गुण ॥ द्वितीया नंदांग स्वरवेदभू पुनः॥
शाके श्रीनगरीं ग्रन्थ जाला पूर्ण॥श्रीकृष्णरुक्मिणीस्वयंवरू॥२२॥
ऐसा तीनि सहस्त्र दोन शत पांच गणित ॥
सिद्धी पावला मासां एकांत ॥
कवी संतोषमुनि म्हणे श्रीकृष्णनाथ ॥
पावो प्रीती स्वामी माझा ॥ ३२ ॥
ऐसा हा ग्रन्थ श्रीरुक्मिणीस्वयंवर ॥ अशोधीत होता चिरकाळवर
मग शोधिला दत्ताचेनि वर ॥ पौषदाख्यमुनि गोपाळें ॥ १५७ ॥
शाके सोळाशे एकेचाळीस ॥ विकारी संवच्छरा माघमास ॥
प्रतिपदा तिथीस ॥ शुक्रवारीं त्रय प्रहरीं ॥ १७४ ॥
बिडकीण ग्रामाहौनि वायोकोणीं ॥ मालविहिरे कोश प्रमाणें जाणीं
तेथ पौसदाख्य गोपाळे वास करौनि ॥ ग्रन्थु शोधिला कथान्वयीं॥१७५॥
पौसदाख्य कृष्णराजात्मजु ॥ ज्ञानभक्तीवैराग्यें नरेशराजु ॥
तत्सुत मुनि पोपाळ सहजु ॥ ग्रन्थु शोधिला यत्नेंकरोनी ॥ १६६ ॥
ऐसें हें रुक्मिणीस्वयंवर ॥ सातशतें आणि तीनि सहस्त्र ॥
चाळिसाधिकु ओंव्या असेति निर्धार ॥ शोधाचेंनि अर्थें ॥ १७७ ॥

हें स्वयंवर कवीनें भागवत आणि पद्मपुराण यांचा आधार घेऊन आणि ' बहुतां ग्रंथांचें अदोहनु ' करून ग्रंथ रचिल्याचें नमूद केलें आहे. या ग्रंथांत कवीनें भूवर्णन, अष्टदिशां राज्य नामावळी, सेनासंख्या, द्वारका, वनश्री, रुक्मिणीहरण, युद्ध, विवाह आणि शेवटीं सर्व सोहळा इत्यादिकांचें वर्णन करून शेवटीं कवी प्रसाद मागता झाला.

रुक्मिणी स्वयंवर कथेची श्रेष्ठता वर्णितांना कवीनें म्हटलें आहेः—

हे शब्द ब्रह्मीची मुद्रिका आद्यावतः ।
तेयावरी वेद पुराणें रत्नें समस्त ॥
तेयांमाजीं माणिकलें श्रीभागवत ॥ उत्तमु श्रीकृष्णकथा ॥ १८॥
तेयां माणिकामाजी कीळपाडिखर ॥
तैसें श्री भागवतीं कथा रुक्मिणीस्वयंवर ।
उत्तम परिकर पवित्रसार ॥ दुर्लभु तिहीं लोकीं ॥ १९ ॥

तसेंच महाराष्ट्रभाषेची थोरवी कर्त्यानें पुढील शब्दांत वर्णिली आहे. त्यांत त्यानें विनोदही पण साधिला आहे:—

**मागां व्यासादिक महामुनीं ॥ कथा बोलिले संस्कृतवाणी ॥**
**तें आतां महाराष्ट्रभाषां करौंणि ॥ वाणीजताये ॥ ४२ ॥**
**अपभ्रंश पिशाच्च जाणी ॥ मागधी आणि सौरसैनी ॥**
**संस्कृत प्राकृत या षट्वाणी ॥ आणिकें छपन्न भाषा ॥४३॥**
**या सां भाषांचे प्राकाविस्तार ॥ करावेया मऱ्हाटी एक चतुर ॥**
**तियेचेंनि प्रसादें जाणिजेति विचार ॥ षद् भाषांचे ॥ ४४ ॥.**
**ह्मणौनि संस्कृताची टीका ॥ महाराष्ट्री म्हणिजताये आइका ॥**
**जैसी हेमाची मुद्रिका ॥ गरुडपाचु ॥ ४५ ॥**
**तैसी हे छप्पन भाषांचा मुकुटी ॥ शोभे सुहावी सुंदर गोमटी ॥**
**आणि संस्कृता वाढविलें पोटीं ॥ वागवी करीं धरौनिया ॥ ४६ ॥**
**जैसी स्नेहाळु जननी ॥ आपल्या वागवी करीं धरौनि ॥**
**तैसी षट् भाषालागौनि ॥ व्यापारुवीतु असे ॥ ४७ ॥**
**येणें श्रोते कोपती मनी ॥ ह्मणती संस्कृत तंव देववाणी ॥**
**तियेसी उपमा कांरे ॥ सानी ॥ दीधली तुवां ॥ ४८ ॥**
**तरी सांघैन एक परिहारु ॥ आइका करौंणि विचारू ॥**
**हा सहजेचि शब्दोच्चारू ॥ पदघटना ऐसीचि असे ॥ ४९ ॥**
**महाराष्ट्री स्त्रीलिंग वाक्य ॥ आणि संस्कृत तंव नपुंसक ॥**
**म्हणौनि बालकत्व आइक ॥ ॥ तेयासीचि साजे ॥ ५० ॥**
**ऐसीं ते सर्व भाषांची जननी ॥ उत्तम पवित्र महाराष्ट्री वाणी ॥**
**कां आदिपुरुषें अंगिकारिली म्हणौनि ॥ अनिवार ब्रीदें जाली॥५१॥**
**तिया महाराष्ट्रिया भाषा ॥ रुक्मिणीस्वयंवरू आइका ॥**
**तें श्रवण जालिया महापातकां ॥ क्षाळन करी ॥ ५२ ॥**

शके १४५० नंतर महाराष्ट्रांत राजकीय स्थैर्य आल्यामुळें आणि हिंदुसमाजास स्वास्थ्य मिळाल्यामुळें स्वाभाविकपणेंच धर्माकडे जनतेला लक्ष्य घालावयास सवड मिळाली आणि तदनुषंगानें वाङ्मयाच्या अभिवृद्धीकडे प्रवृत्ति झाली. या शतकाच्या अखेरीस दासोपंतएकनाथां-

सारखें प्रतिभाशाली संतकवी महाराष्ट्रांत निर्माण झाले. ज्ञानेश्वरी-सारख्या राष्ट्रीय ग्रंथाचें शोधन होऊन त्याच्या प्रसारास चालना मिळाली! आणि गीतार्णव, एकनाथी भागवत इत्यादि बहुमोल ग्रंथाची निर्मिति झाली. महानुभावीय वाङ्मयांतही पण असेंच झालें. निष्कळंक, गीतगोविंदाची महाराष्ट्रटीका, इत्यादि ग्रंथांवरही शोधकारांची लेखणी फिरून ते ग्रंथ नव्यानें प्रचारांत आले अाणि विविध विषयांवर ग्रंथरचना व्हावयास लागून वाङ्मयांत अत्युत्कृष्ट भर पडावयास लागली. या लेखांत पंधराव्या शतकाच्या अखेरपासूनच्या महानुभावीय वाङ्मयाचें विवरण येईल.

## १७ मराठीचा पंजाबांत प्रवेश.

पंधराव्या शतकाची अखेर महानुभाव पंथ आणि वाङ्मय यासंबंधानें विशेष महत्त्वाची आहे. कारण याच सुमारास महानुभाव पंथाचा आणि वाङ्मयाचा महाराष्ट्राबाहेर पंजाबांत प्रथम प्रवेश झाला. पंजाबांत सारंगकोट येथें कृष्णराज या नांवाचें क्षत्रिय गृहस्थ असत. त्यांचा दक्षिण देशात म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेस उंटावरून मालाची ने आण करण्याचा व्यापार होता. एकदा व्यापारानिमित्त फिरत असतां वऱ्हाडांत कवीश्वर आम्नायांतील " माधेराजबुआ " या महानुभाव सत्पुरुषाची गांठ पडली. त्यांचा उपदेश कानीं पडल्यामुळें कृष्णराजाची संसार-मार्गावरून निवृत्ति झाली व त्यांनीं महात्मधर्माची दीक्षा माधेराजबुवा ंच्याजवळ घेऊन त्यांनाच धर्मगुरु केले. परत पंजाबांत गेल्यावर कृष्णराजांनीं एकांतवास स्वीकारून ब्रह्मविद्येंत काळ घालविण्यास सुरवात केली. सारंगकोट येथें त्याचा भाऊ रहात असे, तो शाक्तपंथी असून देवीचा निस्सीम उपासक होता. प्रथम त्याच्या चार मुलांना व नंतर त्यालाही महात्मधर्माची दीक्षा देऊन गुप्त ब्रह्मविद्येचा त्यांना परिचय करून दिला. कृष्णराजाचा शिष्य विधिचंद्रशर्मा याच्या एका

ग्रंथाचा काळ श. १५२७ असा आहे त्यावरून आणि पंजाबी वृद्धाचारा-वरून कृष्णराजाचा काल १५ व्या शतकाचा अखेर येतो. यानेंच महानुभाव पंथाची पताका पंजाबांत प्रथम नेली. थोड्याच कालांत या पंथाचे मठ आणि कृष्णमंदिरें पंजाबांत मोठमोठ्या शहरीं स्थापण्यांत आलीं व हा ग्रंथ पुढें सरहद्द प्रांत, काश्मीर आणि अफगाणिस्थान येथवरही जाऊन पोचला! या पंथाचा विशेष हा कीं, यांचे धर्मग्रंथ मराठी भाषेंत असून महाराष्ट्राबाहेरही या पंथीयांनीं याच भाषेंतील ग्रंथांचा प्रसार केला. काश्मीर काबूल येथील मठांत आणि कृष्णमठांत पूजास्तोत्रें इत्यादि अद्यापीही मराठींतून होत असून मराठी ग्रंथांचा संग्रह प्रत्येक मठांत व मंदिरांत असतो. आमच्या पंजाबांतील आणि सरहद्द प्रांतांतील प्रवासांत असले संग्रह तपासतांना पुष्पपूर ( पेशावर ) आणि कालयवनपुरी ( काबूल ) येथें लिहिलेल्या अनेक मराठी हस्त-लिखित ग्रंथांच्या प्रति आढळल्या! मराठी वाङ्मयाचा महाराष्ट्राबाहेर प्रसार करण्याची महानुभाव पंथाची ही कामगिरी मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत अपूर्व आहे.

---

## १८ शके १५०० ते १५७२

या पुढें शके १५०० पासून शके १५७२ पर्यंतच्या ग्रन्थविस्ताराचा परामर्ष घेतला आहे या काळांतील पहिला ग्रन्थ म्हणजे दिवाकर कपाटे कृत मतिरत्नाकर अथवा मतिप्रबंध हा होय. प्रस्तुत ग्रन्थ आणि मयंक-सुत मुरारीकृत दर्शनप्रकाश हे दोन ग्रंथ एकत्र असे स. १९०१ मध्यें पुणें चित्रशाळा प्रेसमध्यें छापिले आहेत. मतिरत्नाकर हा ग्रन्थ शके १५१९ मध्यें संपूर्ण झाला. कवीनें आपली माहिती ग्रन्थांत दिली आहे.

**शके पंधरासें वर्षे अष्टदश ॥ दुर्मुख नाम संवत्सरे आनि श्रावण मास॥**
**दक्षिावसरु आनि चतुर्दश ॥ दिन देव गुरू ॥ १ ॥**
**देशु वैराट ( वाई ) ग्राम भिल्लवटिका ( भिलवडी ) ॥**
**तेथ प्रवर्त्ति जगदेक नायका ॥**

**मुरारिमल्ल नाम योगतिळका ॥ भेटावयासी ॥ २ ॥**
**जो नागेन्द्रु गुरुका ॥ सिद्धान्तसौरभ्य चाफेकळिका ॥**
**नातरि प्रमयरत्नमालिका ॥ भोगपिळायासी ॥ ३ ॥**
**नागेन्द्राशिष्य् मुरारिमल्ल जवळीका ॥**
**दैवयोगें परमार्थु जोडिला निका ॥**
**तेनें बरें मत प्रबंधग्रन्थिका ॥ म्हणे मुनि दिवाकरू ॥ ४ ॥**
**शके पंधरासें वर्षे एकुनविस अवधारी ॥**
**हेमलंब संवत्सरी पूर्णावलिनगरीं ॥**
**भाद्रपद शुद्ध द्वादशी गुरुवारीं ॥ ग्रन्थ संपूर्ण जाला ॥ ५ ॥**

यांत उल्लेखिलेला मुरारिमल्ल हा कवीप्रमाणेंच कवीश्वराम्नायांतील आहे. दर्शनप्रकाशकार मुरारी भिन्न असून तो शके १५६० च्या सुमारास उपाध्यआम्नायांत झाला. हाही ग्रन्थ कविसमकालीन गोपाळदासानें शोधिला, छापील प्रतींत ८१८ ओव्या आहेत परन्तु पेशावर येथील कृष्णमन्दिरांत आम्हांस मिळालेल्या पोथीवरून गोपाळदासानें ग्रन्थ शोधल्यावर त्यांत बरीच भर घातली असें दिसतें. त्या पोथीतील ओवी

**दिवाकर कपाटीयें मतप्रबन्धु केला ॥ तो गोपाळदासें सोधीला॥**
**आगळाही वाढाविला ॥ संख्या नवशतें शतश्लोक ॥ १५ ॥**

ग्रन्थाचा उद्देश पुढील ओळी वरून स्पष्ट होतो !

**हा प्रबन्द सकळवादिया त्रासु ॥ कुतर्क गर्व गजा ज्ञानांकुसु ॥**
**गुणग्राहका निर्मळ उपदेशु । मतप्रबन्धु ॥**

तसेंच शेवटच्या समासाची ओवी । एवं प्रबन्ध संपूर्ण मिति ॥

**इति दिवाकरमुनींविरचित श्रुती ॥ इतर मतखंडणें स्वमत प्रतिष्ठापिती ॥**

**मतप्रबन्ध रत्नाकर ॥ यावरून तोच बोध होतो ।**

या ग्रन्थांत कवीनें वेदश्रुति, पांडव, राम आणि नारद या गीता, शिवपुराण, भगवद्गीता, भागवत आणि श्रुतिस्मृति यांतील श्लोक स्वमत पुष्ट्यर्थ दिले आहेत.

कवीनें आपल्या पंथीयांचे विशिष्ट पद्धतीचें द्वैतमत प्रतिपादितांना शांकराच्या अद्वैताचें खंडण करण्याचा प्रयत्न केला आहे. तसेंच दार्शनिकमतें, जैन, लिंगायत ( शिवाचार ), नाथपंथ इत्यादि अनेक मतांचे खण्डण करण्याचा प्रयत्न करून शेवटीं नवविधाभक्तिचें वर्णन करून श्रीकृष्णाच्या अनन्यभक्तीचें वर्णन केलें आहे. महानुभावपंथीयांचें तत्त्वज्ञान समजावे यांस मतिरत्नाकर आणि दर्शनप्रकाश या उभय ग्रन्थांचा चांगला उपयोग होतो.

## १९ कवि कृष्णडिंभ विराट.

हा कवि उपाध्य आम्नायांतील विराटदेशोपनाम ( वाइदेशकर ) मयंकराज यांचा शिष्य असून कृष्णमुनि उर्फ कविडिंभ हें नाव त्यानें धारण केलें आहे. यानें भगवद्गीतामहात्म्य, फलटणमहात्म्य, ऋद्धिपूरमहात्म्य, कृष्णजन्माष्टमी इत्यादि ओवीबद्ध प्रकरणें रचिलीं आहेत. साधनामृत स्तोत्र, रंडिकास्तोत्र, तीर्थमालिका इत्यादि श्लोकबद्ध रचनाही बरीच केली आहे. याशिवाय त्यांचीं पदें धावे इत्यादि स्फुटरचना पुष्कळ आहे. त्याचा विशेष प्रसिद्ध असा ग्रन्थ म्हणजे रुक्मिणीस्वयंवर हा ग्रन्थ होय. तो श्लोकबद्ध असून नवखण्डात्मक आहे म्हणून त्यास नवखण्ड रुक्मिणीस्वयंवर असें म्हणतात; दुसरें नांव कल्पद्रुम असें आहे.

फलटणमहात्म्य आणि ऋद्धिपुर महात्म्य हे ग्रन्थ सैह्याद्रिखण्ड आसितदेवलसंवादरूप आहेत. प्रथम ग्रंथांत श्रीचक्रपाणी यांच्या चरित्रविषयक वर्णन असून ग्रंथाचे एकूण १३ अध्याय आहेत; आणि द्वितीय ग्रंथांत मुख्यतः श्रीगोविन्दप्रभु यांचे चरित्रविषयक वर्णन असून ग्रंथाचे एकूण दहा अध्याय आहेत व ८८२ ओव्या आहेत. या द्वितीय ग्रंथांत श्रीचक्रधराचा अवतार सांगतांना महाराष्ट्राची खालीलप्रमाणें कवीनें व्याख्या केली आहे.

**कलयुगीं अवतरूनि प्रशान्तें । अंगिकरोनि चक्रधरनामातें ॥**
**महाराष्ट्रीं केलें निर्माण तीर्थातें । क्रीडा करोनीया ॥ ६७ ॥**

**विंध्याद्रीपासोनि दक्षिणदिशेसी । कृष्णानदीपांसुनि उत्तरेशीं ॥**
**झाडी-मण्डळापासोनि पश्चिमेसीं । कोकणपर्यंत ॥ ६८ ॥**
**महाराष्ट्र बोलिजे चक्रधर । क्रीडा केली जेथ जेथें ॥**
**तीये जाणावीं पवित्र माहातीर्थें । महात्म्य दर्शनीचें ॥ ६९ ॥**

कवि कृष्णडिंभाचे ईशस्तवनपर पांच धावे आहेत ते वाचले असतां श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या करुणपर सुप्रसिद्ध " धांवरे रामराया किति अंत पहासी " या प्रसिद्ध धाव्याची आठवण होते. " धावजी दत्तराजा तूंचि कैवारी माझा " धावजी प्रभुराया रक्षि प्राणा माझीया । भवभय नासुनीया नेइ मज निजठाया " हे त्यापैकीं दोन धाव्यांचे आरंभ आहेत.

कविकृष्ण डिंभाचे रूक्मिणीस्वयंवर हा ग्रंथ श्लोकबद्ध असल्याचें वर आलेंच आहे. या काव्यांत कवीनें अक्षरगणात्मक आणि मात्रागणात्मक अनेक वृत्तें योजिलीं आहेत. येथें आपणास पांच अक्षरांपासून सव्वीस अक्षरांपर्यंत एकेका चरणांत अक्षरें आहेत अशीं वृत्तें सांपडतील. महाराष्ट्रास अपरिचित अशीं किंबहुना मराठीस अपरिचित अशीं किती तरी वृत्तें या काव्यात आलीं आहेत. या कवीइतका विविधवृत्तें योजणारा महानुभावीय वाङ्मयांतच काय परंतु सबंध मराठी वाङ्मयात दुसरा कोणी कवि झाला नाहीं. या कवीचा काळ या काव्यांत खालील श्लोकात दिला आहे.

**शाके वेद धराधरेषु कुमिते मासेच शुक्रे गुरौ ।**
**चाब्दे मंगलकारके शुभकृते द्राक् पौर्णमास्यां तिथौ ॥**
**वैराटोपसमाभिधौ मुनिवरः कृष्णः स्वयं चाकरोत् ।**
**सो श्रीशःकमलास्वयंवरमहाकल्पद्रुमंचालिखत् ॥**

यावरील श्लोकावरून शके १५३४ शुभकृत नाम संवत्सरीं ज्येष्ठ शुक्ल पौर्णिमा गुरुवारीं ग्रन्थ समाप्त झाल्याबद्दल महंत दत्तराज यांचें म्हणणें आहे.

कवीच्या या ग्रन्थासंबंधानें आणि त्यानें योजिलेल्या विविध वृत्तासंबंधानें कै. भावे यानीं आपल्या मुंबई मराठी ग्रन्थालयाच्या रौप्य ज्युबिली

प्रसंगीं वाचलेल्या निबंधांत उल्लेख केला आहे. या कवीचा छंदःशास्त्राचा अभ्यास बराच दिसतो. मराठीमध्यें प्रचलित असलेलीं अक्षरगणवृत्तें आणि मात्रागणवृत्तें आहेतच पण याशिवाय अपरिचित अशा कांहीं वृत्तांचीं नांवें अशीं आहेत. तरंगिणी, कल्हार, गौरी, उज्वला, चंदन-वल्ली, वनमाला, सुरती, सुरत्स, सुरमा, सानंद, चंद्रकळा, फनिंद्रा, रामा, रमण, सुमुखा, विमळा, गंधानक, मंद, संभोगाव्रती, चित्रकळा, मनोहरा, पंक्ती आणि सुंदर ही कांहीं नांवें आहेत ! तसेंच मात्रावृत्तांचीं कांहीं अपरिचित नांवें आहेत तीं ललित, चौबोला, हीरक, पादाकुल अशीं आहेत. याशिवाय संगीत चंद्रशेखर ध्रुवकताल छंद म्हणून तालात्मक छंदांतही एक पद्य दिलें आहे. तें पद खालीं देतों.

**सद्घन चिद्घन नायकु जो संसृतिसागर तारकु वा ॥**
**तद्गुणकीर्तनगायकु जो तोचि जनां शिवकारकु वा ॥ १२ ॥**
**जानाति विद्वर जानतरी संगित गायनु नृत्य परी ॥**
**सज्जन भीमनृपा मलये कृत्य सुमानसु निश्चिल वा ॥ १३ ॥**

तसेंच मात्रावृत्तांपैकीं चौबोला मात्राचें एक उदाहरण देतों.

**मागिल राजधरा बहुतां बहु । धैर्य उदार्य कळा भरणी ॥**
**वर्णित बंदीजन प्रचुरोज्वल । सुंदर मंगल कीर्ति जनी ॥**
**नास्ति तया मति ईश्वर पत्कज ? । पूजन वंदन आर्तजनीं ।**
**भीमकभाग्यफलागत रुक्मिणि । दान करी हरि सायुजनी ॥२२॥**

पादाकुलक मात्रा छंद

**हस्तक युगळे जोडुनि दोन्हीं । लाउनि दृष्टी हरितनुचरणीं ॥**
**तारस कारस चंचळ तरळा । लक्षितु बाळा वल्लभु डोळां ॥**
**न कळे वेदां नकळे देवां । न कळे आगमधरमां सखां ॥**
**जो पै तारक सृष्टी जीवां । तो पति शिवसी, रुक्मिणि हावां ॥६२**

हीरक मात्राछंद

**कर्म जनित बंध बहुत नाश करित, तत्क्षणीं ॥**
**ज्ञानभारित कृत्यचरित, मोक्ष सुपथ, लाहुनी ॥**

**सर्व दारिठ दिव्य सुभट, सौख्य सुपिठ, पाउनी ॥**
**प्रेम सुरत, भावसहित, नित्य रमत, रुक्मिणी ॥ १० ॥**

उपाध्य आम्नायांत दोन मयंकराज होऊन गेले. पैकीं हा कवि बहुधा पहिल्या मयंकराजाचा शिष्य असावा. दुसऱ्या मयंकराचाच शिष्य प्रसिद्ध दर्शनप्रकाश ग्रन्थाचा कर्ता मुरारिमल्ल हा शके १५६० मध्यें विद्यमान होता.

## २० कमळाकर—कोमराज अंतवर्णन.

अनंतमुनि उर्फ आयमुनी कारंजकर या नांवाचा कवीश्वरआम्नायांत एक कवि होऊन गेला. त्याचा श्रीकृष्णरुक्मिणीस्वयंवर, बाळक्रीडा, पंचकृष्ण नाममाळा इत्यादि गेय ओवीछंदांत अनेक ग्रन्थ आहेत हा गेय ओवीछंद म्हणजे हल्लीचा अभंग छंदच होय. या छंदांचे उदाहरण खालीं दिलें आहे.

**लक्षिलें कंसासी । मर्दोनि भूमीसी । मग वैकुंठासी । पाववीला ११२**
**लवलाहे कृष्णें । बांदौडी तोडून । राज्यीं उग्रसेन । स्थापियेला ११३**

या कवीचा काळ

**शके शें पंधरा । चौऱ्यांशी वधारा । ताम संवछरा । शुभकृत ॥१८४**
**कारंज विख्यातु । कमलाख्य सुतु । सुस्तवी अनन्तुड । आयमुनि १८७**

या कवीची इतकी माहिती देण्याचें कारण या कवीचा गुरु कमळाकर उर्फ कोमराज याच्या अंतांच्या वर्णनात्मक ओव्या उपलब्ध आहेत आणि त्या ओव्या लिहिणारा कवि कमळाकरांच्या अंतसमयीं विद्यमान होता असें त्यांतील वर्णनावरून दिसतें. त्या ओव्यांपैकीं खालीं दिल्या आहेत.

**वोखटे पैं जाले । कमलाख्यु गेला । धर्मु अंतुरैला बहूतांचा ॥ ८ ॥**
**परमार्गि होता । मायेवो सृंगारू । गेला मुनीवरू । कोमराजु ॥ ११॥**
**कारंजपीटीये । होता भूषामणी । नेला चक्रपाणी। कोमराजु ॥ ३० ॥**
**शके पंकराशें । आणिकु ते तीसी । सांडिले आम्हांसी । कोमराजें ३१**
**बुद्धिवारीं बीजे । शुद्ध पूषमासी । पेणें जाले त्यासी । कोमराजा ४०.**

**विरोध कुसत । नामें पै वत्सरू । गेला मुनीवरू । कोमराजु ॥ ४१ ॥**
**दिवसा साजनीं पाहारीं तीसरा । भेटी जापीश्वरा । कोमराजा ॥४२॥**
**अविद्या दिपत । नासोनि सकळां । पावला केवळा । कोमराजु ॥४४**
**नित्य पदीं माये । आनंदी सौरसु । कमलाख्या वासु । तेथ जाला ४६**
**प्रभुपदीं पूत । खेडनामें पुरी । वसे सरोवरी कोमराजु ॥ ५० ॥**
**ऐसा पैं वियोगु ॥ कमलाख्यें दिल्हा । चगुरे गाईला सेवा भावें ॥'५१**

यामध्यें कोमराज यांचा निधनकाल शके १५३० असा आहे. ह्या ओव्याही गेय आहेत. ओवीछंदापासूनच अभंग छंद निघाला असावा असें अनुमान करण्यास आणखी एक ज्ञानेश्वरपूर्वकालीन पुरावा आहे. आद्य कवयित्री महदाइसा उर्फ महदंबा इचे मातृकी रुक्मिणीस्वयंवर नांवाचें छोटें काव्य आहे त्या काव्यालाही हाच छंद योजिला आहे. त्या काव्यांत त्याला ओवीछंदच म्हटलें आहे. ती ओवी अशीः—

**जालें हें संपूर्ण रुक्मिणी सैवर । मातृकी नागर । वोवींबंधी ॥ १०७॥**

---

## २१ लक्षधीर कवि.

प्रस्तुत लक्षधीर कवीचे रुक्मिणीस्वयंवर, ज्ञानदर्पण, महाराष्ट्र-काव्यदीपिका आणि ज्ञानमार्तंड असे ग्रंथ आहेत. या ग्रंथलेखनाचा क्रम कवीनेंच ज्ञानमार्तंडकाव्यांत दिला आहे तो असाः—

**प्रथम रुक्मिणी स्वयंवरू आइका । मग ज्ञानदर्पणु काव्यदीपिका ॥**
**इयें करौनि ज्ञानमार्तंड देखा । जातां शेवटीं ॥ २९७ ॥**

या कवीसंबंधानें ज्ञानदर्पणकाव्यांत स्वतःच कवीनें माहिती दिली आहे. त्यावरून मयुरगिरी म्हणजे खानदेशमधील हल्लींचें मुल्हेर येथें सोमवंशी राठोड कुळांतील प्रतापशहा यांचे म्हांबाईचे पोटीं जन्मलेले बहिरमशहा आणि जयदेवराणा हे राज्य करीत होते त्यांच्याशीं तत्कालीन दिल्लीश्वर म्हणजे अकबर बादशहा यानें सख्य केलें होतें. या बहिरम-शहाच्या आश्रयाला अनेक विद्वान् असत त्यांत नाशीक येथील कृष्ण याज्ञवल्की याचा शिष्य मधुकर हाही होता. याचें नांव महादेव शिवराम

खेरकार असून तो सोमवंशी क्षत्रीय होता. यानेंच कथाकल्पतरू नांवाचा प्रसिद्ध ग्रंथ रचिला आहे. मयुरगिरी म्हणजे मुल्हेर आणि शैलाद्रि म्हणजे साल्हेर या दोहों गडांमधून नळगंगा वाहते तेथून जवळच मांगेश्वर आणि तुंगेश्वर असून तेथें कार्तिक पौर्णिमेला यात्रा भरते. अशा पवित्र स्थळीं लक्षधीरकवीनें ग्रंथ पूर्ण केल्याचें कवीनें लिहिलें आहे. साल्हेर येथेंच सोमवंशी कुळांत इंद्रसेन आभीरराव होता त्याचा पुत्र बचराज याचेपासून अनुसूया इचेपोटीं कवि लक्षधीर याचा जन्म झाला. या कवीचा गुरु मुरारि मल्ल हा असून गोपाळदास हा गुरुबंधू होता. या कवीला एक पुत्र मल्लिनाथ नांवाचा असून एक कन्या जयंतिकाबाई नांवाची होती.

ज्ञानदर्पण हा ग्रंथ कवीनें आपला मुलगा मल्लिनाथ याला ज्ञान व्हावें म्हणून शके १५४३ मध्यें लिहिला. याचे ६ उल्लास असून एकूण ७२९ ओव्या आहेत. या ग्रंथांत अनुक्रमें बालत्वादि आख्यान, तारुण्यवृद्धत्व-निरुपण, नरकव्यवस्था, अभेदवाद, शृंगाररस, भक्तिभेद, व शेवटीं ज्ञानवैराग्य आणि मुक्ति यांचें वर्णन आहे.

**तुमचे लाधौनि प्रसन्नत्व । करैन अपूर्व ग्रन्थकर्तृत्व ॥**
**जो अभ्यासिता ये व्युत्पन्नत्व । कळाकौशल्य ॥ ९ ॥**
**हा ज्ञानार्पण ग्रन्थ । पाहिन तो दिसे पदार्थ ॥**
**साहित्य शृंगार परमार्थु । सांग विचक्षणा ॥ १० ॥**
**इये ग्रंथीचा भक्तिरसभेदु । सांघों अनुछिष्ट अनुवादु ।**
**जो साहित्यवल्लीचा कंदु । फुलला रव पुष्पीं ॥ ११ ॥**
**जेंविला मकरंदरतीं । विचक्षण भ्रमरांचा हातीं ॥**
**लागलेया होय तृप्ती । डुलती आनंदें ॥ १२ ॥**
**सरळु आणि अर्थ गर्भु । ग्रन्थ हा अति दुलभु ॥**
**आइकता न करावा विलंबु । म्हणे लक्ष थोर कवी ॥ १४ ॥**

महाराष्ट्र काव्यदीपिका या ग्रंथाच्या ५६ ओव्या असून त्यांत महा-राष्ट्राच्या आवडत्या अशा ओवीछंदाचे प्रकार वार्णिले आहेत. त्यासंबं-

धानें विवरण ऋद्धिपूरवर्णनाच्या प्रस्तावनेंत आम्ही यापूर्वींच केलें आहे. या छोटया काव्याच्या शेवटीं कवि म्हणतो, " ऐसी हे ओवी-काव्यदीपिकाः महाराष्ट्र युक्ती योजौनि देखा। जैसी व्याकरणी संस्कृती श्लोका। बोलिली मुद्रा ॥ ५५ ॥ या छंदःशास्त्रावरील ग्रंथांत कवीनें साडेतीन चरणी, चार चरणी, साडेचार चरणी उर्फ चौहड आणि पांच चरणी असे सलक्षण आणि सोदाहरण प्रकार सांगून शिवाय साडेचार चरणी ओवीचे अक्षरांच्या न्यूनाधिक्यामुळें एकंदर शुद्ध १६ व मिश्र ६ असे बावीस प्रकार सांगितलें आहेत! सर्वांत कमी अक्षराची साडेतीन चरणी ओवी ती लघुचरणी अशी तिची व्याख्या दिली आहे; त्याचप्रमाणें सर्वांत जास्त अंतराची साडेतीन चरणी ओवी ती अति दीर्घा व

**चौदा पंधरा सोळा। तिही चरणीं अक्षरांचा मेळा ॥**
**सेवटीं दश एकादश दिसती डोळा। ते अती दीर्घा ॥**

अशी व्याख्या दिली आहे.

ज्ञानमार्तंड या काव्याचे एकूण तीन प्रसंग असून फक्त ३०० ओव्या आहेत. हें काव्य शके १५४४ मध्यें पूर्ण झालें. या काव्यांत संहारप्रकरण, शब्दसिद्धांत, रागनादभेदलक्षण आणि सिद्धांतनिर्णय हें वर्णिले आहेत.

या काव्यांतील नमनाच्या ओव्यांत कवीनें आपल्या पंथाचें तत्त्वज्ञान फार सुंदर रीतीनें गोविलें आहे.

याशिवाय या कवीचे कविलक्षण निर्णय-ज्ञानदर्पण टीप, गुह्य-प्रकारनिर्णय इत्यादि बरींच स्फुटप्रकरणें आहेत. कविलक्षणाच्या एकूण १३ ओव्या असून देशवळ, भारिखु, केवळु, आरजु, उद्धट, सरळ, बरळ, होतोत्तम, तस्कर, सामान्य आणि प्रेमळ असे कवीचे प्रकार केले आहेत. व त्यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत.

लक्षधीर कवीचीकन्या जयंतिकाबाईचींही कांहीं स्फुट पदें उपलब्ध आहेत. तिचे सासुरवासिनी हें पद खालीं दिलें आहे.

**मजनीं सांगातिनी माझिये । जीवींचे हितकारिणी ॥**
**सखेबाई स्नेह तुजसी । घडविला सोयरे ॥ ध्रु० ॥**
**न करिसि रागरोषु : तरि मी सांगेन सासुरवासु : जुनाट माया सासु : तिने कष्टु लाविला सोसु : धुरंधरु हा सासुरा : काचा पल्लव नाहीं उस्वासु : कठिण हा भरतारु : यांचा कोपु कैसा सोसु ॥ १ ॥ अष्टांगु आटले कामक्रोध देरीं : आणिकु पांच असेति वैरी : तेही बांधोनि दोरी : सर्पिणी ठेविली द्वारीं : चौघी नणदा मज जाचतील परोपरी ॥ २ ॥ सहाही देराजीया जळो जळो : ह्मणि मज देतील शापु : अष्टही बाळ त्यांचा मज पडला संतापु : नव सवती मत्सर बहुअंतीं करितिल कोपु : पांच सावतर काढिताति मज भेटवी मायबापु ॥ ३ ॥ आतां मी न राहे न राहे वो सासुरीं : माझे माहेर उत्तरपुरीं : प्रथम गुरु लक्षधीर त्याची मी कुमरी : गुरुराज भीष्मु तेणें रक्षिले परात्परीं ॥ ४ ॥**

## २२ शार्ङ्धर भोजनें यांची तीर्थमालिका

तीर्थमालिका हा वृत्तात्मक ग्रन्थ उपाध्य आम्नायांतील शाङर्गधर भोजने यांनीं लिहिला असून त्यात श्रीचक्रपाणीचरित्र, लीळाचरित्र आणि श्रीगोविंदप्रभुचरित्र या ग्रन्थांत ज्या ज्या स्थळीं लीला केल्याचें वर्णन आहे त्या त्या पवित्र स्थळांचा उल्लेख त्या त्या लीळांसह उल्लेख आला आहे. या तीर्थमालिका ग्रन्थात सरासरी २४६ ग्रामनामांचा उल्लेख आहे ती त्यांपैकीं बहुतेक महाराष्ट्रांतच अंतर्भूत आहेत, प्रस्तुत ग्रन्थ सोलापूर येथें शके १८२७ मध्यें बाळकृष्णदादा कानडे यांनीं छापिला आहे.

## २३ नवरसी नारायणाचे महाभारत

प्रस्तुत नारायण हा कवी शाङ्र्गधर भोजने याचा शिष्य होय याचे ओबीबद्ध महाभारत समग्र असल्याचें कळतें. त्यांपैकीं फक्त शल्यपर्व उपलब्ध झालें असून त्याच्या एकंदर २३४९ ओव्या आहेत. भारत-कथेची स्तुती करतांना कवी म्हणतो. ‘सकळ शास्त्रांमाजीं सारु । पुराणा-

अर्थी महाथोरु ॥ कथाभारती सुंदरु । तिहीं लोकीं असे ॥१३॥' आपल्या कवितेसंबंधीं "मऱ्हाटिया भाषा विचक्षणु । माजीं शैल्यपर्वे बोलैन रत्नु ॥ नाना नवरसीं सालंकरणु । भूषवीण श्रोतेयांलागीं ॥ २४ ॥ "

या काव्यांतील वर्णनशैली ओघवती असून थोडया शब्दांत सरस वर्णन करण्याची कवीची हातवटी फार उत्कृष्ट आहे. कवीनें स्वतःस नवरस नारायण हें टोपणनांव घेतलें आहे. या ग्रन्थांत श्रीकृष्णकथा बदलून सांगितली असून मूळभारतांत नाहींत अशा अनेक गोष्टी नव्या घातल्या आहेत.

## २४ मुरारमल्ल कविकृत दर्शनप्रकाश.

प्रस्तुत दर्शनप्रकाश हा ग्रंन्थ उपाध्य आम्नायांतील बीडकरशाखेपैकीं मुरारिमल्ल कवि यांनीं शके १५६० मध्यें तयार केला. हा ग्रन्थ ओवीबद्ध असून त्यांत निरनिराळें धर्मपंथ आणि मतें या संबंधानें माहिती दिली आहे. यांत एकूण ७६ प्रकरणें आहेत. ग्रन्थरचनेच्या साहित्याविषयीं कवि सांगतात.

**इतर ग्रंथ नाना बहुवस । तैसा हा नव्हे दर्शनप्रकाश ॥**
**जे सकळाहुनि सार विशेष । तो सांगताये कवी ॥ ६०४ ॥**
**निगम आगम वेद । पुराणविद्या बहुशास्त्रभेद ॥**
**याचीं शोधनी प्रसिद्ध । दर्शनप्रकाश केला ॥ ६०५ ॥**
**तर मग शोधनी कैसी केली । सकळांचीं मुळें श्रुतिसूत्रें गाणिली**
**साध्य साधनें सांगितलीं । उपग्रंथ तेही ॥ ६०६ ॥**
**काळ पदार्थ अध्याय चाणा । उपनिषदें नावें गणना ॥**
**धांडोळोनि परमेश्वरविचारणा । केली जेणें ॥ ६०७ ॥**

याप्रमाणें निरनिराळ्या संस्कृत ग्रन्थांतील उतारे देऊन कवीनें त्यावर ओवीबद्ध निबरण केलें आहे. षड्दर्शनादि निरनिराळ्या मतांचें विवरण करून शेवटीं 'म्हणोनि सकळ लोक उत्तम । परमेश्वरभक्ती करी नेम । ते पद पावती मोक्षासम ।' श्रीकृष्ण म्हणे ॥११४२॥ असा कवीनें निर्णय काढिला आहे.

## २५ विश्वनाथ व्यास बीडकर.

हे कवीही उपाध्य आन्मायापैकीं असून रेवेराज यांचें शिष्य होते. ते मुरारमल्ल यांचें समकालीन होते. यांनीं आचार, दृष्टांतस्थळ वगैरेवर महाभाष्य केलें असून श्री हयग्रीव व्यासकृत गद्यराज स्तोत्र, दामोदर-पंडीत कृत साठी चौपद्या इत्यादिकांवर टीका लिहिल्या आहेत. यांचा प्रसिद्धग्रन्थ म्हणजे ध्यानामृतस्तौत्र होय. तें शके १५६३ मध्यें हिख-ळिये नगरांत पूर्ण केलें. हें स्तोत्र श्लोकबद्ध असून त्यांत अनेक तऱ्हेचीं वृत्तें योजिली आहेत. या स्तोत्रावर पुढें बऱ्याच टीका झाल्या आहेत.

## २६ गोपी भास्कर.

कवि गोपीभास्कर हे कवीश्वर आम्नायांतील गीताभाष्यादि प्रमेयकार मुरारमल्ल विद्वांस यांचे शिष्य होत. यांचा काल शके १५१५-१६०० असा आहे. पूर्वाश्रमी हे अहमदनगर येथील मुधोपंत देशपांडे यांचे पुत्र होत. यांना बाळपणींच गुरूच्या पायीं अर्पण केलें होतें. यांनीं दीक्षा घेतल्यानंतर अनेक मराठी ग्रन्थ लिहिले आहेत. त्यांत सिद्धान्तराजभद्र, आचारमहाभाष्य, विद्यासारभाष्य आणि भगवद्गीता इत्यादि ग्रन्थ लिहिले आहेत. याशिवाय यांचा शुकदेवचरित्र म्हणून एक सप्तप्रकर-णात्मक ओवीबद्ध ग्रन्थ आहे. या ग्रन्थांपैकीं शुकदेवचरित्र शके १५६९ मध्यें भगवद्गीतेवरील भास्करीटीका शके १५७२ मध्यें आणि सिद्धान्त राजभद्र शके १६०० मध्यें लिहिल्याबद्दल त्या त्या ग्रन्थांचें शेवटीं उल्लेख आहे.

### भास्करी टीका.

संस्कृतमध्यें भिंगारकरी म्हणून भगवद्गीतेची टीका आहे तीवरूनच ही भास्करीटीका मराठींत केल्याचें कवि सांगतात.

**संस्कृते पढती भिंगारकरी : मराठीया युक्ति भास्करी :**
**या दोही टीकेमाझारी : अर्थोक्ती सारिसीच असे ॥ १ ॥**
**भिंगारकरी ज्ञानधेनुका : त्याचे वत्स भास्करीटीका :**

**श्रोते वक्तेया पाठका : अमृतप्राशन होय ॥**

यापूर्वी झालेल्या टीकासंबंधानें बोलतांना कवि आपल्या भास्करी-टीकेसंबंधानें म्हणतो—

**सर्वळा संबंध लापिका । ज्ञानार्थ हे पदटीका ।**
**भास्करनाम सवातिका । म्हणीजतांय यासी ॥ २ ॥**
**ब्रह्मविद्या आश्रितु । संस्कृत शब्दार्थु ।**
**भास्करी महाविख्यातु । टीकेमाजी ॥ ३ ॥**
**गंगाधरी लक्ष्मीधरी । रामदेवी आनि भिंगारकरी ।**
**विदुजणी आनि चातुरी । शैल भाषेच्या ॥ ४ ॥**
**पद छेंद पदार्थु जाण । वाक्य ग्रह वाक्य जान ।**
**अक्षेप आणि समाधान । संस्कृत व्याख्यान हे ॥ ५ ॥**
**ऐसी नव्हे भास्करी टीका । श्लोकानुक्रम असे नीका ।**
**सिद्धान्तार्थु शाब्दिका । व्याख्यान हें ॥ ६ ॥**
**श्रीधराची संबोधनी । शंकराशिष्य अनुसरणी ।**
**व्रजकाचार्ये बाळानिधि । बोलिले असती ॥ ७ ॥**

या टीकेचा लेखनकाळ

**शके पंधराशे बाहात्तरी । आश्विन शुद्ध पक्षांतरी ।**
**दशमी मंगळ द्वितीय प्रहरी । भास्करी पूर्ण ॥**

असा आहे.

गोपीभास्कराचा शुकदेवचरित्र म्हणून ओवीबद्ध ग्रन्थ आहे त्यांत सात प्रसंग असून एकूण ६२१ ओव्या आहेत त्याचा : शके पंधरा शत एकून हात्तरीं : सर्वजित संवच्छरीं : माहा शुद्ध त्रितियें बुधवारीं : प्रथम प्रहरीं संपूर्ण जाले ॥ ' असा लेखनकाल आहे. याशिवाय हेंच शुकदेव-चरित्र वाढवून तें ८४८ ओव्यांचें केलें आहे. तें कवीनें किंवा अन्य कोणीं वाढविलें हें कळावयास मार्ग नाहीं. या ग्रन्थाची सुरवात ' प्रथम नमन श्रीगुरु समर्था : त्यांनीं मुद्रा दीधली कवित्वा : तयाचेनि प्रसादें आतां : इतिहासी कथा सांघनै ' अशी कवीनें केली आहे. हें प्रकरण

भागवत दशमस्कंदांतील शुकाख्यानावरून रचिल्याबद्दल शेवटीं समासांत सांगितलें आहे.

स्त्रीसंगर्ताचें गौणत्व दर्शवितांना शुकाचार्योचे मुखीं खालील युक्तिवाद घातला आहे.

**भगं पडलीं राया इन्द्रा । कलंक लागला चन्द्रा ॥**
**रुखमांगदा नरींद्रा । घडला पुत्रवधु ॥ ९८ ॥**
**स्त्रीत्व जालें नारदा । विटंबना जाली ऋषीशृंगा ॥**
**रावण पावला भंगा । राक्षसांसहित् ॥ ९९ ॥**
**ब्रम्हया जाला अपमान । भस्मासुरा जालें दहन ॥**
**मृत्यु पावला दुर्योधन । श्रापें द्रौपदीचेनि ॥ ७०० ॥**
**तिलोत्तमेकारणें । दोन्ही दैत्यां जालें मरणें ॥**
**पुरुरवा भुलविला उर्वशीनें । ... ... .. ॥ ७०१ ॥**
**कामाचेनि अभिमानें । सैवरीं आटतीं सैन्यें ॥**
**नाडले बहुताकारणें । आयुष्य तुटतीं ॥ २ ॥**
**जन्ममरणाचा ठेवा । स्त्रीसंगेंचि जोडला ॥**
**जीवां जन्माजन्मीं तुझियां सेवा । गेलियां रंभे ॥ ३ ॥**
**तुवां अर्जुना केला नपुंसक । पक्षिया केला वेदघोष ॥**
**तैसा नको मज देख । रंभे जाय जाय ॥ ४ ॥**

## २७ कवि मंडळीक एल्हन.

प्रस्तुत कवि कवीश्वर आम्नायांतील प्रसिद्ध प्रमेयगीताभाष्यकार मुरारीमल्ल विद्वांस याचा शिष्य चाहिराज याचा शिष्य होय. मुरारीमल्ल विद्वांस हे ऋग्वेदी ब्राह्मण असून मोगलाईत राहात असत. यांचें उपनांव विद्वांस असें होतें. हे प्रख्यात धर्मोपदेशक असून यांचे २५०० अनुयायी होते. यांच्या नांवावरूनच यांच्या गादीस विद्वांस असें नांव पडलं. यांचें आयुष्य शतमान असून यांचा अंत शके १५२७ वैशाख शु॥ ५ शनिवारीं अर्ध रात्रोपरांत झाला असें एका श्लोकात नमूद आहे. या मुरारीमल्ल विद्वासांचा एल्हन कवि हा नातु होय. हा कवि आपल्या

कवितेंत स्वतःस मुरारीनातु एल्हन किंकर असें म्हणवितो. या एल्हन-कवीचे श्रीकृष्णरुक्मिणीस्वयंवर आणि बाळक्रीडा हे दोन ग्रन्थ प्रसिद्ध आहेत. रुक्मिणीस्वयंवराच्या एकूण ५२३ ओव्या आहेत. परंतु बाळक्रीडा हा ग्रन्थ मोठा असून त्याच्या एकंदर २४ अध्याय आणि ३२०८ ओव्या आहेत. काव्य या दृष्टीनें रुक्मिणीस्वयंवरापेक्षां बाळक्रीडा या काव्याचा दर्जा उच्च आहे.

रुक्मिणीस्वयंवरांतील रुक्मिणीचीपत्रिका ११ ओव्यांत वर्णिली आहे. त्यांपैकीं खालील ५ ओव्या दिल्या आहेत.

**स्वस्तिश्री सर्वज्ञा । राया चक्रधरा । नति अवधारा । किंकरीची ॥**
**तेव्हांचि भीमकें । तुझेया चर्णासी । नम्र हृषीकेशी । लावीएलें ॥**
**तवारी रुक्मीया । तुज स्वामीसळा । मग शिशुपाला । देवो केलें ॥**
**सिंहाची अंतौरी । नेइजे जंबुकें । मादवा आईकें । लाज कोणां ॥**
**माझी हे विणती । परिसोनि देवें । मनोर्थ पुर्बावें । किंकरीचें ॥**

रुक्मिणीस्वयंवर ग्रन्थ केव्हां लिहिला याचा ग्रन्थांत उल्लेख नाहीं पण बाळक्रीडा हे काव्य शके १५८० मध्यें पूर्ण झाल्याचें त्या काव्यांतच आहे. तो श्लोक असा—

**शके पंधराशे आशींसीं । विलंबी संवत्सरें श्रावण मासी ।**
**शुद्ध पंचमी पड़तुर देशीं । वडालिये सिद्ध झाला ग्रन्थु ॥**

प्रस्तुत काव्य भागवताच्या आधारें लिहिलें असें सांगतांना ' मागां शुकें परीक्षिता : संस्कृतु निरोपिली कथा : ते महाराष्ट्रिया भाषा आतां: सांघैन श्रोतेयासी : ॥ असें सांगून कथेस सुरवात केली आहे.

कवीची वर्णनशैली ओघवती असून थोडया शब्दांत पुष्कळ अर्थ आणण्याची कवीची हातवटी उत्कृष्ट आहे.

कंसाच्या रंगसभेंत यावयास श्रीकृष्ण निघाला असतां तो पहाणारास कसा दिसला याचें तीन ओव्यानीं वर्णन केलें आहे.

**मदनमुक्ता वनिता चित्तीं । कृष्णु देखिला मदनमूता ।**
**वृद्धें शिशुवच्छीपती । देखिला बालकृष्णु ॥**

भक्तां आत्मबुद्धीं जाणा । आत्माचि देखती जगजीवना ।
ज्ञानिया ज्ञानमूर्ती जाणा । प्रतिभाषता ॥
नृपवरा दिसे नृपती । विद्यावंतासी विद्यामूर्ति ।
धनुर्वाड्या धनुर्पती । कंसा काळुचि जैसा ॥

### एल्हणकृत अष्टविवाहवर्णन.

वरील काव्यापेक्षांही सरस आणि उत्कृष्ट असा श्रीकृष्ण अष्टविवाह-वर्णनपर काव्यग्रन्थ एल्हणकवीच्या नांवावर प्रसिद्ध आहे. या काव्यांत प्रथमतः श्रीकृष्णाच्या अष्टनायकांचे विवाह वर्णन केल्यावर नंतर सोळा सहस्त्र कन्यांशीं श्रीकृष्णानें विवाह केल्याची कथा सांगितली आहे. याप्रमाणें विवाहकथा पहिल्या अकरा प्रसंगांत सांगितल्यावर शेवटच्या प्रसंगांत श्रीकृष्णाची वसंतक्रीडा वर्णन करून ग्रन्थाची समाप्ति केली आहे. कै. भावे यांनीं या कवीला १४ व्या शतकांत घातलें आहे. परंतु हा कवि १४ व्या शतकांत झाल्याबद्दल कांहीं आधार दिला नाहीं. वरील मुरारमल्ल विद्वांसाचा नातु एल्हणकवि आणि हा एल्हणकवि एकच कीं काय हेंहि पण सांगावयास कांहीं आधार देतां येत नाहीं. कारण या एल्हणकवीनें काव्यांत स्वतःस नुसतें एल्हणकवी असेंच म्हटलें आहे. शिवाय या ग्रन्थाची जी प्रत मिळाली ती तृतीय असून तींत फक्त ११२५ ओव्या आहेत; आणि वसंतक्रीडेचें कथानक ऐन रंगांत येतांच मध्यें खंड पडला आहे. म्हणजे पहिल्या ११ प्रसंगांमध्यें ८०० ओव्या खर्ची पडल्या असून १२ व्या प्रसंगाच्या ३२५ ओव्या आहेत. यावरून फारशा ओव्या गहाळ झाल्या नसाव्या असें वाटतें. कवीनें ग्रन्थारम्भींचें नमनांत आपलें कुळ अथवा गुरूचें नांव दिलें नसून शेवटील ओव्या गहाळ असल्यामुळें कवीचा काळ अथवा स्थळ याचाही बोध होण्यास तुर्त कांहीं मार्ग नाहीं. तथापि बाळक्रीडा आणि अष्टविवाह या दोन्हीही काव्यांत प्रथम गणेश आणि नंतर शारदा यांना नमन केलें आहे. तसेंच दोन्हीही काव्यांची वर्णनशैली आणि भाषा-

सादृश्य यावरून दोन्हीं काव्यें एकाच कविचीं कृती मानण्याकडे मनाची प्रवृत्ती होते. कांहीं असलें तरी मण्डळीक एल्हणकवीच्या श्रीकृष्ण-रुक्मिणी विवाह आणि बाळक्रीडा या काव्यांचा निर्देश केल्यानन्तर एल्हणकवीच्या या अष्टविवाहकाव्याचा झालेला निर्देश यथोचितच आहे असें कोणीही म्हणेल.

या संबंध काव्यांत श्रीकृष्णाच्या वसंतक्रीडेचा प्रसंग फारच बहारीचा वठला आहे. किंबहुना या प्रसंगासारखें सात्विक शृंगाररसाचें दुसरे उदाहरण मराठी वाङ्मयांत सांपडणार नाहीं असे म्हटलें तर अतिशयोक्तीचें होणार नाहीं.

प्रस्तुतकाव्यांत कामिनीच्या पुरुषार्थाचें वर्णन संग्रामाच्या रूपकानें पुढीलप्रमाणें केलें आहे:—

**देवा मदन जाळिला जी चंद्रमौळीं । तें रतीची राणीव खोमली ।**
**आम्हीं संजोवनमंत्रे नांदती केली । जीववतीं अनंगातें ॥ ९३५ ॥**
**कंदर्प जिंतिला विरागी । आम्हीं कैवारा पावलों वेगीं ।**
**महाप्रतापें रणरंगीं । उभिया ठेलों ॥ ९३६ ॥**
**तेथें तारुण्याचिये संग्रामभूमीं । दर्शनें हटकिले यमुनियमीं ।**
**मग तिरस्करिलें वर्मकर्मीं । पूर्वप्रनीतिचा ॥ ९३७ ॥**
**तिया वनिता विलासांचिया संग्रामा । धीर न चलतीचि विरामा ॥**
**तेव्हेली पवर्तलो क्षात्र धर्मा । धनुर्विद्येचिया ॥ ९३८ ॥**
**चढवौनि भ्रूभंगाचीं कोदंडें । अनुकारगुण टणत्कारिले फुडें ॥**
**मोकलीलि सघानकांडें । तिखटांकटाक्षांचीं ॥ ९३९ ॥**
**तेणें फोडिलीं धैर्याची वज्रांगी । दुसरें संधान कडतरलें विरागीं ॥**
**तीसरें आदळलें अनुरागीं । वर्मी महामोक्षाचा ॥ ९४० ॥**
**निहटी स्तनभरांच हातगुंडे । बोडाविलें उरस्थलांचे खेडें ॥**
**हातें पडिताडिले खांडे । स्पर्शनाचें ॥ ९४१ ॥**
**तेणें मारें मुसावलें । ध्यानास्त्रमंत्रातें विसरलें ॥**
**हातीचें विवेकशस्त्र पडिलें । भूमिके मोहाचिये ॥ ९४२ ॥**

**मग झळंबौनि रूपाचेंनि अंचळें । सिंपले श्रृंगार कर्पूरजळें ॥**
**विषयवासना वदन तांबूळें । भरिलें स्मित हास्याचेनि ॥**
**बैसवौनि आलिंगनाची सपाटी । संयोगसुखा घातली गाठीं ॥**
**ऐसे विषय राम करौनि सृष्टे । नांदते केलं ॥ ९४४ ॥**

अशी स्त्रियांची अहंता ऐकून 'सत्य तुमच्या सामर्थ्याची थोर ख्याति परि तुम्ही स्त्रित्वाचिये येवौनि जातिः जन्मलेयाति वाया" असा देवानें उपहास करतांच एका रमणीला कोप आला आणि लगेच ती देवास म्हणते. "हे कांई वो बोलणें: आम्हा साळयाचि खांडिले राणेपणें आमुचेंया पवाडेयांची जालीं पुराणें: ते काइ विसरलें देवो:"

**पाहावा जेणे विटंबिला शंकरू । तो महान दाटला कैसा लेकरु ॥**
**ते मायराणी आदिगुरु । आम्हा बायलांचा ॥ ९५१ ॥**
**विष्णु धरिले स्त्रीरूप मोहिनी । देखोनि ब्रह्मा भुलविला ततक्षणीं ॥**
**कैसा विचळला तपापासौनि । आमुचेनि बालभें ॥ ९५२ ॥**
**लवणासुराचेनि मांसे । नारायणु बुडाला न दिसे ॥**
**तो हात देवोनि अनियासे ॥ काढिला कमलजा देवीं ॥ ९५३ ॥**
**पतिव्रते दमयंतिचेनि अभिलाषें । देव नळ जाले तनासरिसें ॥**
**ते सामर्थ्यबळ नेणवे कैसें । आम्हां बाइलांचें ॥ ९५४ ॥**
**गौतमाचिये अहल्येलागौनी । इंद्रें केलो कपटकरणी ।**
**तैहौनि चंद्र कळंकिया सहस्रनयनी । मूर्ती इंद्राची ॥ ९५५ ॥**
**देवर्षि नारदु वाखाणे तो हिंडे सोळासहस्र राउळगणें ।**
**सेवटीं स्त्री होऊनि जने । साठी संवच्छर पुत्र ॥ ९५६ ॥**

याप्रमाणें अबलांचा पुरुषार्थ एक रमणी वर्णन करते. तितक्यांत दुसरी म्हणते अग हे कशाला सांगावयास पाहिजे 'येथ प्रत्यक्षा नलगे प्रमाणः आतां हातलेंबिये दादुलेपणः जाणवैल राउळीचेः अशा प्रकारच्या थट्टा, विनोदाच्या पार्श्वभूमिकेवर एल्हणकवीनें हा वसंतक्रीडोत्सवाचा प्रसंग चित्रित केला आहे.

## २८ चक्रपाणी व्यास वर्धनस्थ.

या काळांतील एक महत्त्वाचा कवि म्हणजे चक्रपाणी व्यास वर्धनस्थ हे होत. यांचा विशेष म्हणजे हा कवि राजपुताना येथील असून याचें पूर्वाश्रमींचें नांव चाल्हण पंडित होतें व हा जातीनें सारस्वत ब्राह्मण होता. दैववशात् वऱ्हाडांत उपाध्याम्नायांतील संतराज वर्धनस्थ ( बीडकर ) या महानुभावमहात्म्याचा समागम झाल्यामुळें त्यांचेपासून शके १५०५ मध्यें यानें महानुभावपंथाची दीक्षा घेतली व दीक्षा घेतल्यावर त्यांनीं चक्रपाणी व्यास हें नांव धारण केलें. हा कवि ब्रह्मविद्येमध्यें निष्णात होता. त्यानें संस्कृत, हिंदी, मराठी इत्यादि भाषेंत ग्रंथरचना केली त्यांत संस्कृत समुदाय सूत्रपाठ, तसेंच मराठींत पाठांच्या लापिका, सरवळे, दृष्टांत-स्थल याशिवाय नित्यदिनी लीलास्तोत्र व इतर श्लोक आणि ओवीबद्ध कवित्व केलें आहे. हे बहुधा ऋद्धपूर येथें राहत असत आणि तेथेंच ते शके १५६५ मध्यें देवदर्शनास गेले ( समाधिस्थ झाले ).

---

## उपसंहार.

याप्रमाणें शके १२७२ ते शके १५७२ पर्यंतच्या काळांतील मुख्य मुख्य कवींसंबंधानें आणि त्यांनीं महाराष्ट्र सारस्वतांत टाकिलेल्या वाङ्मय-संपत्तीसंबंधानें संक्षेपतः विवेचन केलें आहे. याशिवाय अनेक कवि या काळांत या पंथांत निर्माण झाले व त्यांनीं कमीअधिक प्रमाणानें मराठी वाङ्मयांत भर टाकिली आहे. या कवींच्या कृतींपैकीं फारच थोडया मुद्रित झाल्या आहेत. बरीचशी ग्रन्थसंपत्ती अमुद्रितच आहे, एवढेंच नव्हे तर ती इतस्ततः विखुरलेली अशी पडलेली आहे. ती एकत्रित करण्याचा अद्याप व्हावा तसा प्रयत्न झाला नाहीं. आज जी या ग्रंथभाण्डाराची थोडीबहुत माहिती पुढें येत आहे त्याचें बऱ्हंशीं श्रेय माहूरचे देवदेवेश्वर संस्थानचे पट्टाधिष्ठित महंत दत्तलक्षराज यांनाच आहे. त्यांनीं आज कित्येक वर्षेंपर्यंत ग्रंथनिरीक्षणाचा आणि संग्रहाचा

जो आस्थापूर्वक आणि निरलस असा उद्योग केला आहे त्यामुळेंच आम्हांस या कविकृती महाराष्ट्ररसिकांपुढें अंशतः मांडतां आल्या आहेत. या समग्र ग्रंथभांडाराचें चिकित्सापूर्वक अध्ययन करून त्याची फलनिष्पत्ती एका छोटयाशा प्रबंधांत मांडणें आजच्या परिस्थितींत तरी एका व्यक्तीच्या आटोक्याबाहेर आहे. आपल्या मराठी भाषेंतील हा अमोल ठेवा एका विशिष्ट पंथाच्या मंजूषिकेंत गुप्त होता तो जर मुद्रित होऊन सर्वांस सुलभ झाला तर त्यानें आपल्या मराठी भाषेंतील ग्रंथभाण्डारांत अमोल भर पडेल आणि मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या अभ्यासकांस त्याचा फार उपयोग होईल अशा प्रकारची जाणीव मराठी भाषेच्या रसिकांत या आमच्या छोटया लेखामुळें उत्पन्न होईल असा आम्हांस भरंवसा वाटतो.

शेवटीं एक गोष्ट आम्हांस नमूद करणें अवश्य वाटतें ती ही कीं महानुभावांचें वाङ्मय हे एका विशिष्ट पंथाचें असलें तरी तें वेदानुयायी पंथांच्या वाङ्मयाच्या चौकटींत बसणारें आहे. त्यानें आपल्या संस्कृतीची पूर्वापार चालत आलेली उज्ज्वल परंपरा पुढें चालविली आहे, महाराष्ट्राच्या पडत्या काळांत धार्मिक संघटणास हातभार लाविला आहे, स्त्रीशूद्रादि सामान्य जनतेस मार्गदर्शक असा भक्तिभावाचा दीप अखंड तेवत ठेवला आहे, कधीं काळीं महाराष्ट्रास भाग्याचे दिवस आले तर त्याचें श्रेय इतर पंथीयांबरोबर या वीतरागी पंथासही अंशतः मिळेल यांत तिळमात्र शंका नाहीं.

इति शम्.

# पांगारकरांचीं पुस्तकें



१ **भक्तिमार्गप्रदीप** ( आवृत्ति पंधरावी ):—यांत साधुसंतांच्या प्रासिद्ध भूपाळ्या, आरत्या, श्लोक, अभंग, पदें वगैरे सर्व यथाक्रम दिले आहेत. नित्य-प्रार्थनेचें सर्वलोकप्रिय पुस्तक. किं. ८८.

२ **मोरोपंतचरित्र व काव्यविवेचनः**—प्रकरणें २१ व पृ. सं. ६२५. " जगाच्या वाङ्मयांत पहिल्या दुसऱ्या प्रतीचे जे विरल ग्रंथ आहेत त्यांत याची गणना " राजवाडे यांनीं केली आहे. मोरोपंत व त्यांची कविता याविषयीं संपूर्ण विवरण करणारा हा ग्रंथ हस्तलिखित कविता व पत्रें मिळवून लिहिला आहे. किं.२८८.

३ **ज्ञानेश्वरचरित्र व ग्रंथविवेचन**( आवृत्ति दुसरी ):—" या ग्रंथाची भाषा भक्तिरसानें ओथंबलेली व वक्तृत्वपूर्ण असून विवेचन रसभरित आहे " ( केसरी ) " ज्ञानेश्वरांचें उदात्त चरित्र मोहक व ओजस्वी भाषेंत पांगारकरांनीं वर्णिलें आहे. " ( चित्रमय जगत् ) किं. १८८.

४ **तुकाराम चरित्र** ( आवृत्ति दुसरी ):—" हा वारकरीसंप्रदायाचा रहस्य-ग्रंथच आहे. यांत वारकरीपंथाचीं प्रमेयें व विधिनियम, ज्ञाननिष्ठ सगुणोपासनेचें तत्त्व, चित्तशुद्धीचे उपाय, नामसंकीर्तनाचें महत्त्व, भक्तिरसाचा आनंद, इ. गोष्टींचा सांगोपांग विचार तुकोबांच्या अभंगाधारें केला आहे. पांगारकरांची वाणी प्रसंगानुसार प्रेमळ व सणसणीत, भाविक पण चिकित्सक, सरळ पण भेदक, व साधी पण वेधक अशी आहे. ग्रंथ फार सुरस व हृदयंगम झाला आहे " ( वि. विस्तार ). " सर्व प्रकरणांतून पांगारकरांच्या व्यापक व विस्तृत व्यासंगाचा परिपाक अनुभवायला मिळतो. " ( केसरी ). किं. रु. २.

५ **मुक्तेश्वरचरित्र आणि काव्यविवेचन**:—कवीचें चरित्र व त्याच्या काव्यांतील गुणविशेषांची माहिती यांतील विवेचनावरून व मार्मिक उताऱ्यांवरून सहज होणारी आहे. सुंदर सृष्टिवर्णनें, कुस्त्यांचीं वर्णनें, सर्वत्र विखुरलेलीं नीतितत्त्वें, सर्व कांहीं यांत आहे. किं. रु. १.

६ **एकनाथचरित्र** ( आवृत्ति चौथी ):—नाथचरित्राची ही चौथी आवृत्ति वाढवून छापली आहे, नाथांचें समग्र चरित्र यांत साधार दिलें असून त्यांच्या ग्रंथांतलि वेंचक वचनें व लोकप्रिय गोष्टी यांत दिल्या आहेत. किं. ८१२.

**७ संतचरित्रमाला**:--यांत कांहीं प्राचीन, कांहीं अर्वाचीन व कांहीं समकालीन अशा ४३ संतांचीं चरित्रें दिलीं आहेत. किं. १ु८.

**८ मोरोपंतांचे वेंचे** ( दुसरी आवृत्ति ):—पंतांच्या अगाध कवितासमुद्रांतील विविध विषयांवरचे उत्कृष्ट वेंचे एकाच ग्रंथांत पाहिजे असल्यास हा ग्रंथ अवश्य संग्रहावा. काव्यशास्त्रावर प्रस्तावना देऊन पंतांचें संक्षिप्त चरित्रही नवीन जोडलें आहे. किं. १॥१२.

**९ समर्थसंजीवनी उर्फ रामदासी वेंचे**:--यांत प्रपंच, परमार्थ, राजकारण व विविध प्रकरणें ह्या चार भागांत समर्थांच्या सर्व कवितेंतील सुंदर वेंचे दिले असून प्रारंभीं सर्व प्रकरणांचा विस्तृत सारांश जोडला आहे. पृ. सं. ४००. किं. रु. २.

**१० सार्थ मनोबोध**:—समर्थांचे मनाचे श्लोक सविस्तर विवरणासह दिले आहेत व मनाचें रूप, श्लोकांची संगती व श्लोकांचे वर्गीकरण केले आहे. किं. ॥१२.

**११ कविरामायण**:--संस्कृत व प्राकृत रामायणें व शेंकडों स्फुट प्रकरणें यातून उत्कृष्ट वेंचे संगतवार दिले असून हे स्वतंत्र रामायण तयार केलें आहे. किं. ॥४.

**१२ आनंदलहरी** ( कवितासंग्रह ):—ह्यांत पांगारकरांच्या स्वतःच्या कवितेपैकीं ४० स्फुट प्रकरणें दिलीं आहेत. १८ स्तोत्रें, ८ प्रकरणें महाराष्ट्र, संत व सद्ग्रंथ, ६ प्रासंगिक व ८ उपदेशपर. किं. ॥१२.

**१३ नारदभक्तिसूत्रें**:—हीं ८४ संस्कृत सूत्रें, त्यांचा अर्थ व त्यांवरील विस्तृत विवरण पाहून भक्तिशास्त्राचा यात सांगोपांग विचार केलेला आढळून वाचकांस भक्तिप्रेमोदधि सांपडल्याचा आनंद होणार आहे. किं. ॥८.

**१३ नवविधाभक्ति**:—यांत नवविधाभक्तीचे नऊ प्रबंधांत सविस्तर स्पष्टीकरण केलें आहे. किं. ॥६.

**१५ पारिजातकाचीं फुलें** ( तिसरी आवृत्ति ):—परमार्थविचाराची संतति उत्पन्न करणारे सूत्रप्राय अर्थगंभीर स्वतंत्र व स्फुट विचार विषयवारीनें दिलें असून पुस्तक विवेचक भाविकांस प्रिय झालें आहे. किं. ॥८.

**१६ भक्तिमणिमाला**:—मूळ भागवतांतील उत्तमोत्तम अशा ५५० श्लोकांची निवड करून मूळ श्लोक व त्यांचा कथासंदर्भ देऊन साधुसंतांच्या वचनाधारें त्यांचें सविस्तर विवरण केलें आहे. किं. १॥८.

**१७ मुमुक्षूंतील निवडक निबंधः**--( भाग १, २, ३ ) प्रत्येक भाग किं. १॥८. मुमुक्षु साप्ताहिकात पहिल्या १५-२० वर्षात जे संपादकीय लेख आले त्यांतील निवडक लेख या तीन भागात प्रसिद्ध केले आहेत. हे जवळ असले म्हणजे २० वर्षांचा 'मुमुक्षु' चा समागम केल्याचा लाभ होणार आहे. तीनही भागांत मिळून ९० निबंध आहेत. घंटा, होळी व शिवलिंग याचे रहस्य, मूर्तिपूजा, राष्ट्रीय प्रार्थना, रामजन्मोत्सव, कृष्णावताराची माधुरी, पंढरीची यात्रा व पालख्यांचे समारंभ, भारतीवीर, निंदकांचे उपकार, वेदांताची चार मतें, हिंदुधर्म, आमचे पुढारी संतच, डिस्प्रेस्ड क्लासेस मिशन उर्फ पंढरीचा भागवतधर्म, भागवतधर्माचें मंदिर, मातृभाषेचें प्रेम, धर्माकडे केव्हां वळणार, वाङ्मय तप, प्रेमामृतमाधुरी, आगरकर, गीतारहस्य इ. महत्त्वाचे सुंदर निबंध यांत असून प्रत्यक्ष घडलेल्या सात उत्कृष्ट गोष्टी दिल्या आहेत. एकदम रु.३॥८.

**१८ सार्थ दासबोधः** वर शुद्ध केलेल्या मूळ ओव्या व खालीं सरळ भाषांतर. कल्याणस्वामींच्या मूळ प्रतीवरून धुळेकरांनीं सटीप ग्रंथराज प्रसिद्ध केलाच आहे. कल्याणस्वामींचे बंधू शिरगांवमठाचे अधिकारी दत्तात्रयस्वामी यांच्या हातची शके १६०६ च्या भाद्रपदमासांत लिहून तयार झालेली मूळ प्रत ग्वाल्हेरीस आहे. तेथें जाऊन अक्षरशः तपासून घेऊन रा. पांगारकर यांनीं ही प्रत तयार केली आहे. ग्रंथाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं दोनही प्रतींचा मेळ घातला आहे, व १५० ठळक पाठभेद व ५० लेखनभेद दिले आहेत.

**१९ निबंधमाला-तिचें स्वरूप आणि कार्यः**—विष्णुशास्त्र्यांच्या निबंध-मालेचे मूळ अंक मोठ्या प्रयासानें मिळवून मालेवर टीकापर हा स्वतंत्र निबंध लिहिला आहे. निबंधमालेची पुरी ओळख या निबंधाने होइल. प्रथम शास्त्री बोवांचें संक्षिप्त चरित्र दिलें आहे, मालेंतील मुख्य व अवांतर विषय, गुणदोष-विवेचन इ. यांत आहे. किं. ०।१०.

**२० निरंजनमाधवांची कविताः**—भाग १ किं. रु. १ व भाग २।३ एकत्र सं. किं. १॥८. पहिले बाजीराव पेशवे यांच्या वेळचा हा कवि. यांचीं स्तोत्रें, सांप्रदायपरिमळ उर्फ आत्मचरित्र, ज्ञानेश्वरविजय, चिद्बोध रामायण, स्फुट प्रकरणें हीं संशोधन करून त्यांचा जीर्णोद्धार केला आहे.

**२१ तुकारामचरितामृत**--तुकोबाचें प्रेमळ चरित्र अभंगांत गाइलें असून नित्यपाठास उपयुक्त आहे. किं. ०५.

**२२ श्रीसमर्थग्रंथभांडार:**—समर्थांची एकंदर कविता एकत्र सटीप छापलेली आहे. किं. ४॥८.

**२३ समर्थग्रंथभांडार** ( भाग २ रा ):—यांत दासबोधाशिवाय बाकीची समर्थांची सर्व कविता प्रकरणें पाडून व्यवस्थित दिली आहे. किं. रु. २॥८.

**२६ श्रीएकनाथी भागवत** ( सटीप ):—निर्णयसागर प्रेसमध्यें सुंदर छापलेलें. चौथी आवृत्ति. किं. रु. ६.

**२७ ज्ञानेश्वरांची प्रभावळ:**—श्रीज्ञानेश्वरमहाराज व त्यांचे समकालीन नामदेवराय, जनाबाई, चोखामेळा इ. सर्वजातीय २८ संत यांच्या ग्रंथांतील निवडक नित्यपाठाच्या उपयोगी असे सुंदर वेंचे विषयवारीनें दिले आहेत यांत ज्ञानेश्वरांच्या २५०० ओंव्या व सर्व संताचे ४०० उत्कृष्ट अभंग दिले आहेत. टीपा भरपूर, प्रस्तावना सुंदर. किं. रु. २.

**२८ मराठी वाङ्मयाचा इतिहास-खंड पहिला-अर्थात ज्ञानेश्वर-नामदेवांचा काल:**—वेदविद्या, उपनिषद्विद्या, गीता, भागवत, शिवविष्णु संप्रदाय व भक्तिमार्गाचें अनादित्व, बुद्धापासून रामदेवराव जाधवापर्यंतच आडीच हजार वर्षांचा भरतखंडाचा इतिहास, तामीळांचें साम्राज्य, तामीळ संत व तामीळ आचार्य, हीं सात प्रकरणें पूर्वार्धांत असून उत्तरार्धांत महाराष्ट्रदेश व मराठे लोक, महाराष्ट्री उर्फ मराठी भाषा, आदिकवि मुकुंदराज महानुभावपंथाचें मराठी वाङ्मय, गोरक्षनाथ व नाथपंत, श्रीज्ञानेश्वरदर्शन भक्त नामदेवाचें चरित्र, संतमळा व त्याचें अभंगवाङ्मय, ज्ञानेश्वरीचें अंतरंग ज्ञानेश्वरी सृष्टि व नामदेवांची पंजाबांतील कामगिरी अशीं अकरा प्रकरणें आहेत. पृ. सं. ८३२. किंमत रुपये चार.

पत्ता:— **ल. रा. पांगारकर, नाशीक सिटी.**